# प्रकाशकांचें निवेदन

समग्र सावरकर वाङ्मय या ग्रंथमालेतील दुसरा खंड कथा–कादंबरी हा आज प्रसिद्ध होत आहे. या खंडात स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर यांचे प्रामुख्याने कथावाङ्मय अेकत्रित केलेले आहे. 'काळें पाणी' व 'मला काय त्याचे ?' या त्यांच्या कादंबऱ्या यातच समाविष्ट केल्या असल्याने या खंडास 'कथा–कादंबरी खंड' हे नाव दिले आहे.

सावरकरांच्या सर्व कथा किंवा गोष्टी या करमणुकीकरिता लिहिलेल्या नसून समाजात राष्ट्रधारक व क्रान्तिकारक विचार प्रसृत करण्याचे अेक अुपयुक्त साधन म्हणून त्यांनी वापरलेले आहे. सावरकरांच्या सर्वच कथा, कादंबरी किंवा गोष्टी या वास्तववादी असून त्यात प्रत्यक्ष घडलेल्या घटना प्रसंगाची नावे बदलून व संगति जुळवून लिहिलेल्या असल्यामुळे त्या कथा असल्या तरी कल्पित कथा नसून सत्य-कथा आहेत.

अितिहासात जशी अेका घटनेभोवती अनेक व्यक्तींच्या विविध कृत्यांची गुंफण केलेली असते तर कथावाङ्मयात काही प्रमुख व्यक्तींच्या भोवती अनेक घटनांची गुंफण केलेली आढळते. पण या कथा वास्तव घटना असल्यामुळे त्यांना अितिहासाचा जिवंतपणा आहे व त्या विचारधनाने खचित आहेत.

## सावरकरांच्या गोष्टी–समाजचित्रें ५०१–६१

गाणे मात्र त्याच्या तोंडाबाहेर निघण्याचे अकस्मात् बंद झाले. मालतीला वाटलें की, ओव्या म्हणतांना आजीला दम लागला ह्यामुळे ती सहसा चूप बसली असावी. आजीला विसावा द्यावा आणि गाण्याची गोड लहर तिला आलेली होती तीही मोडू नये म्हणून आपली पाळी आली असे समजत ती स्वतःच पुढच्या ओव्या म्हणू लागली. तिच्या आजीने तिला ज्या ममतेने रसरसलेल्या ओव्या म्हटल्या होत्या त्याच्या त्या गोड शब्दाशब्दागणीक तिच्या हृदयाला आनंदाच्या गुदगुल्या झाल्या होत्या. प्रियकराच्या प्रेमळ आराधना ऐकण्याची ओढ लागण्याच्या आधी मुलींना आजीच्या लडिवाळ कौतुकासारखी गोडी दुसऱ्या कशात बहुधा वाटत नाही.

संध्याकाळच्या वेळी पश्चिमेकडची समोरची बाजू उघडी असलेल्या आपल्या ओटीवरच्या झोपाळ्यावर बसलेली ती सुरेख सडपातळ बांध्याची किशोरी आपल्या सुस्वर गाण्याची माधुरी आपणच उपभोगीत उंच उंच झोके घेऊ लागली. झोपाळा एका बाजूच्या उंचीवरून उतरत असतां वाऱ्याने तिच्या पाठीवरचा पदर फडफड करीत जेव्हा उडे, तेव्हा वाटे की, संध्याकाळी दूरवरच्या घरट्याकडे उडत जाणाऱ्या कोण्या सुंदर पक्ष्याच्या पंख्यातील मागे राहिलेले हे पातरही असे पक्ष

# समग्र सावरकर वाङ्मय

## खंड २ रा

### कथा-कादंबरी विभाग

## मला काय त्याचें ? (अर्थात् मोपल्यांचें बंड) २६१–३५४



## परिशिष्ट ३५५–४३६.

## सावरकरांच्या गोष्टी—समाजचित्रें ५०१–६१२

योगानंदाविषयी गावातील कुटाळ टोळीतही काही टवाळकी होऊ नये इतकें ांचें वर्तन देवलसी, निर्लोभ, सरळ आणि साधे असे. भजनात ते रंगले म्हणजे ा सत्पुरुषाचें, जगाचें वा देहाचें भानच सुटे असें दिसे. त्यांची मुख्य साधना भजन च असे. बाकी कोणताही ढोंग-धत्तुरा त्यांच्या मठात दिसत नव्हता. शिष्यसंप्रदाय ात्र भरपूर, त्या साधूच्या मागे मागे शिस्तीने चालताना, मठात शिस्तीने वागताना हमी आढळे. मथुरेतून त्यांचा तळ आता लवकरच हलणार होता, त्यासाठी ह्या विटच्या सप्ताहात भजनाची धुमश्चक्री चालू होती. शेकडो लोक रात्री तेथे दाटत

तुलसी मगन भये । हरिगुणगानमें ॥
मगन भये । हरिगुणगानोंमें ॥ ध्रु०॥
कोअी चढे हाथी घोडा पालखी सजावे ॥
साधु चरण पैंया पैंया चिंटिया बचावे ॥
मगन भये । हरिगुणगानामें ॥ तुलसी०॥

झांजांच्या झणझणाटात रक्ताचा बिंदुन् बिंदु थरथरूं लागला. भक्तिरसाच्या डोहात सारा समाज जणू डुबत होता। हरिनामावाचून अितर कोणत्याही मनोवृत्तीचा ध्वनि अैकू येअीनासा झाला, पण तो अेकाचा दुसऱ्याला तेवढा अैकू येअीनासा झाला का ज्याला त्याला देखील अैकू येत नव्हता, हे कोणी सांगावे ?

अितक्यात त्या अुच्च चढलेल्या शतकंठनिनादी सुराला अुतरवीत पदाची चरणे योगानंदजी अेकटेच अितक्या तल्लीनपणे म्हणू लागले की शिष्यादिक भजनिकांनी झांजांची गोंगाटी साथ बंद करून चिपळ्यांची साथ धरली. 'तुलसी मगन भये हरिगुणगानामें ॥' हे चरण गोड अुलटापालटीने हळुवार सुरात गात गात योगानंद अुभे राहिले.

त्या पदाचा अर्थ काही योगानंद सांगत नव्हते. पण ज्यांना कळे त्यांना त्या भजनात अर्थाचे शब्द अैकू येत : ह्या जीवनाची साधना जो तो आपल्या आवडीप्रमाणे आचरीत आहे, आनंदाच्या मागे जो तो लागला आहे. कोणी भोगातून तर कोणी योगातून, जशी ज्याची आणि जितकी ज्याची मनाची अुन्नति तशी त्याची आवड. 'स्वभावो मूर्ध्नि तिष्ठते।' तेव्हा बाह्य साधनांचा वाद हवा कशाला ? तुम्हांला आनंद होअील त्यात तुम्ही रमा, त्यांना आनंद होअील त्यात ते रमोत. माझ्यापुरते विचाराल तर तुलसी मगन भये । हरिगुणगानामें । हरिगुणगानामें । हरिगुण

अर्धी वाट दाटीने रेचारेचलेली. तीतून शिष्याने रमाबाओींना जवळजवळ ओढीतच आणले 'जा, आता सडक घरी जा' तिथे उरलेल्या दोन्ही मातांना आधीच नेऊन पोचवले आहे.' असे आश्वासून उत्तर ऐकण्यात वेळ न दवडता तो शिष्य अितर कोणी स्त्रीमाणूस दाटीत सापडले असल्यास त्याला वाचवून घरी पोचवण्यासाठी निघून गेला, दाटीत मिसळला

रमाबाओी धडधडत्या हृदयाने झपाझप पावलांनी घरी चालल्या स्वामीजींनी ऐवढ्या दंगलीत आपणा सर्वांची अितकी विशेष काळजी घेऊन घरोघर पोचवावे हे अुपकार ऐकीकडे आठवीत आणि दुसरीकडे मालती दारासीच आपली वाट पहात किती घाबरलेली असेल तें चिंतीत त्या घराशी आल्या अंधारातून त्यांनी ओटीवर पाहिले, पण मालतीचा वा कोणाचीच चाहूल लागेना. कंदील लावून पाहिले, दाराला कुलूप जसेच्या तसेच! मालती पुढे आल्याचा काहीच सुगावा नाही भजनाच्या शेवटी जी रेटारेटी झाली, त्यात चुकलेली मालती ओक्साबोक्शी रडते आहे, असा

लेल्या मालतीच्या केसांच्या अस्ताव्यस्त बटा हाताने सारून, तिचें तोंड पुसून, पांघरूण नीट घालून मग हसतमुखाने सडासंमार्जनाला लागायची त्या बाईला नित्याची निश्चित सवय! त्या अंथरुणावरील ते लाडकें मुखमंडळ आज दिसेना. हृदयात धडकी भरली, वाओीट तेच विचार मनांत उसळून आले, पण मनांत देखील न उच्चारता रमाबाओी ज्या उठल्या त्या तडक नायडूबाओींच्या कडे मालतीच्या शोधाला निघाल्या.

पण वाट चालून थोडया पुढे जातात तोंच रमाबाओींना नायडूबाओीच पल्याकडे येताना दिसल्या आणि त्या अेकट्या!

धावल्या धावल्या रमाबाओींनी विचारले, 'म्हणजे! मालती कुठे आहे?'

आश्चर्याने नायडूबाओी उत्तरल्या, 'म्हणजे! मालती तुमच्याबरोबर गेली, म्हणून मला स्वामीजींच्या अेका शिष्यानेच सांगितले!'

'अग बाओी! माझी मालती! कुठे हो असेल ती?'

सद्‌गदित कंठांत अडखळलेले असे काही शब्द उद्‌गारीत रमाबाओी अेखाद्या कळा मारल्या हुंदके देत रडू लागल्या.

नायडूबाओी त्यांच्याहून धीराच्या बाओी होत्या किंवा त्यांच्या पोटची अेकुलती अेक लेक काही हरवलेली नव्हती. म्हणूनही त्यांचा धीर टिकून राहिला असावा. रमाबाओींना हात देत त्या म्हणाल्या.

'असं काय घाबरता अगदी? तुम्हाआम्हा साऱ्याच स्त्रियांना जसं स्वामीजींनी बुद्धया माणस धाडून दंगलीतून सोडवलं तसंच मालतीला पण वचावून सांभाळून ठेवलं असलंच पाहिजे. चला, स्वामीजीकडे जाऊ या प्रथम. मालती होय होय तिथेच अगदी सुरक्षित आहे, चला.'

ली आणि मालच्या दगलीत हरवली असली, तरी ती कुठे आणि कशी आहे हे योगानंदजी आपल्या 'जलादर्श' यंत्रात पाहून आपल्याला नक्की सांगतील,—' विचार त्या भाविक आर्यांच्या घाबरलेल्या मनाला थोडा तरी आधार देत होता. स्वामी आपल्याला ह्या संकटातून काही तरी अुपायाने सोडवीलच सोडवील, असें ने समाधान त्यांस करीत होत्या आणि त्या निर्लोभी स्वामीवरील श्रद्धेची ती ी टेंपीत त्या लटपटत असताही मंदिराकडे झपझप चालल्या होत्या.

नायडूबाओी ह्या भाविक असल्या तरी भावड्या नव्हत्या. लुच्चे साधु त्यांनी हेले होते, पण म्हणून सगळेच लुच्चे असतात, असा अद्वातद्वा वाद कोणी घातला त्याला त्या हाणून पाडीत. योगानंदजींची, कोणापासूनही काही न मागता जेल ते सांगण्याची प्रवृत्ति आणि त्यांनी सांगितलेले भूतभविष्य अगदी लवाडीचें काय, पण अगदी खोटें असल्याचाही लोकांत नसलेला बोभाटा, ह्या दोन ष्यावरून योगानंदांविषयी त्यांचा चांगला ग्रह झालेला होता. ते सच्छील, ोपकारी साधुपुरुष आहेत हे तर अुघडच होते, पण त्यांच्या अंगी भूतभविष्य विष्याची अेक दैवी दृष्टि, काही अंतर्ज्ञान आहे, ह्याविषयीही नायडूबाओींना श्वास वाढत चालला होता. थोडीशी शंका वाटे पण ती त्यांच्या प्रामाणिकपणा-षयीची नसून भूतभविष्यवर्तमान ज्ञानाची सिद्धि मुळी कितीं अचूक असते, विषयी होय. त्यांची परीक्षा घेण्याची ही बरी संधि आली असा विचार त्या यडूबाओींच्या मनात, मालतीवरील ह्या संकटाने त्यांच्या हृदयात झालेल्या

गाची तंद्री अुतरण्याच्या आत जर काही गुरुजींनी सांगितलं तर तितकंच काम तें ावं नि कोणतीही अधिक चर्चा न करता आज परतावं. अुद्याचं अुद्या.'

अेक शंभर प्रश्न रमाबाअींना अेका श्वासात विचारून टाकायचे होते; तका त्यांच्या मनात त्या महंतानं वर्तविलेल्या मालतीविषयीच्या वृत्ताने चिंताकुल चारांचा गोंधळ अुडवून दिला होता. पण निरुपाय! अेका अुत्तराने त्यांचे भर प्रश्न ठिकच्या ठिकाणी थिजून टाकले. तें अुत्तर म्हणजे त्या अुग्रट शिष्याचें चूप' म्हणून दटावणारें बोट. अर्थात् जो अेक प्रश्न विचारायची अनुज्ञा मिळाली तो तेवढाच रमाबाअींनी व्याकुळपणे विचारला,

'आता आम्ही पुढे काय करावं म्हणजे हें संकट टळेल? महाराज, कृपा रून ...'

शिष्याने 'हां!' म्हणून बोट पुन्हा दटावलें. रमाबाअींच्या वाक्याची लांबी रलेल्या मापाच्या बाहेर वाढलेली होती!

महंतांनी गुंगीतल्या गुंगीत आळेपिळे दिले आणि तुटक, विसंगत शब्दांत ते टपुटू लागले,

'हा!—आगे? अच्छा! किसको भी अिधर अुधर मत बोलो! बोलाल ोकात तर मालती अुरलेली लाज सोडून वैरीण बनेल! अिथे कुणापाशी, वकार शब्द मालती हरवल्याचा काढणं नाही! अबीके अबी थेट नागपूरला जाव. लडकी मैदानमें भेटेल! पण अुशीर कराल अिथे—अेक रात्र काढाल—मिळणार नाही! नागपूरहून मुलगी—बस्स्, चल देगी दूर दूर दूर! जाव लवकर नागपूर—मैदानमें! देख, देख, देख!! ही पाहा मालती! आऽ आऽ आऽ! बेटा, आ!

करून फळ, दक्षिणा परत घेऊन, गुपचूप त्याच पावलीं बाहेर पडल्या; गुपचूप मंदिराबाहेर आल्या. वाटेला लागताच रमाबाओी काही बोलू लागल्या तोंच नायडूबाअींनी धेतावणी दिली,

'अं हूं ! वाटेने नाही. जें काय बोलणं तें घरी !'

नायडूबाअींच्याच घरी त्या प्रथम गेल्या. जातांच नायडूबाअींनी विचारले,

'आहे का हो तो गृहस्थ तुमच्या ओळखीचा ? तुमच्या मुलाचा कोणी मित्र मालतीशी अितकी लगट करील असा ? मालती अशी थोडी अडकली होती का कुणाच्या लोभात ? तुमचा तिला नकार होता की काय ?'

बिचाऱ्या रमाबाअी! सकाळपासून अितका वेळ अिनक्या चमत्कारिक धक्क्यांनी त्यांचें हृदय हादरत आले होतें की, आता त्यांच्या मेंदूची विचारशक्तीची नियाच अगदी मंदावत आली होती. त्यातल्या त्यातही शेवटच्या प्रश्नाने चमकून त्या म्हणाल्या

'कौन गली गये श्याम ? ' हे रसाळ चरण अितक्या आततेन भक्त गाऊ लागे शब्दाशब्दाला आळीपाळाने अुचवीत निचवीत मधुर आलापात आळवू लागला का ज्याच्या त्याच्या हृदयात ज्याच्या त्याच्या प्रियकराची मूर्ति दिसू लागली आपणच आपल्या प्रियाला शोधीत आहोत, असा भास होअू लागला 'कौन गली गये श्याम ? ' सांग ना सखे कोणच्या आळीत माझा प्रियकर लपला आहे ? मी गोकूळ धुंडून आले वृंदावन धुंडून आले, व्रजात पाहून आले पण माझा प्रियकर सापडत नाही सांग ना सखे तो मनमोहन कुठे आहे ? कौन गली गये श्याम ? '

संसारप्रवण तरुणतरुणींच्या हृदयात त्यांच्या अैहिक प्रियकराच्या स्मृति जागून भेटीची गाढ व्याकुलता थरथरू लागली पुसू लागली 'कौन गली गये श्याम ? '

अध्यात्मप्रवण साधुसंत भक्तांच्या हृदयांना त्यांच्या प्रियकराची ओढ व्याकुळवू लागली हा जीव जन्मजन्माच्या गोकुळवृंदावनातून ज्या कृष्णाचा शोध करीत ज्या कृष्णाची ओढ लागून रसरूपरंगस्पर्शांच्या फुलोरी कुंजाकुंजातून त्या आनंदकंद देवाच्या शोधासाठी सारखा धावत आहे त्याच्या भेटीची अुत्सुकता आततेने तेच विचारू लागली कौन गली गये श्याम ? सांग ना सखे तो देव कुठे आहे की ज्याच्या आकर्षणाने हा जीव असा कासावीस होअून युगोयुग सारखा धावत चालला आहे ? ज्याच्या मुरलीनादे जगविस वाटत तो मुरलीधर कुठे

लागले, 'खाली बसा', 'अहो शहाणे !', 'ओढा खाली! हात धरून बसवा!' पण ओरडण्याकडे वा अुपहासाकडे किंचित्‌ही लक्ष न देता तो वाक्पीठावर गेला आणि न विचारताच वर चढला. भजनाच्या रंगात मन पूर्वक रंगलेल्या अेखाद्या भक्ताच्या अंगात दैवी आवेश संचारतो किंवा अर्धवेडा अेखादा मनुष्य मोठमोठ्या सभांतील नुसत्या जनसमर्दाच्या देखाव्यानेच वारा प्यायल्यासारखा होतो, पण हा गृहस्थ अर्धवेडाही दिसत नव्हता, भावडाही दिसत नव्हता नीटनेटका वेश, अैट-बाज, समंजस मुद्रा होती त्याची म्हणून तो वाक्पीठावर चढताच महंताच्या त्या चौकडीतील शिष्याने त्याला नम्रपणे विचारले,

'काय हवं आपणाला ? असं अेकदम वाक्पीठावर चढणं सभाविनयाला धरून नाही '

परंतु तो गृहस्थ ते अैकलं न अैकलेसे करून थेट महंताच्या जवळ गेला आणि त्याला म्हणाला,

'तुम्हाला बाहेर कुणी मोठे गृहस्थ भेटायला बोलावीत आहेत, चला '

महंतानी त्या गृहस्थाला स्वत अुत्तर न देता शिष्याकडे बोट दाखविलं शिष्य म्हणाला,

'त्या थोर गृहस्थाना स्वत आत येअू द्या मखूल अेका देवालाच काय ते सामोरे जातात, माणसाला नाही '

त्या शिष्याकडे दुर्लक्ष करून तो गृहस्थ योगानंदाना दटावून म्हणाला,

'तुम्हालाच आलं पाहिजे बाहेर '

त्या दटावण्यासरशी महंतही चमकल्यासारखे झाल्यावाचून राहिले नाहीत

'भजन संपेतो आम्हाला येता येत नाही' ते काही तरी शंकेने अडखळत अुत्तरले

'तुम्ही होअून येत नसाल तर मी तुम्हाला न्यायला आलो आहे बोला येता की नाही ?'

'हा अुद्धटपणा कामाचा नाही' शिष्याने रागावून त्या गृहस्थाला फटकारले 'असे आहात तरी कोण ते अेवढे थोर गृहस्थ ? नाव सांगा '

'पोलिस सुपरिंटेंडंट साहेब !'

ह्या शब्दासरशी योगानंदस्वामींची ती प्रशांत मुद्राच नव्हे तर त्यांचा तो मंदिरातील सर्वशिष्टान्न आविर्भावही झटक्यासरसा पालटून तो कोणी दुसराच अुल्लख, तापट आणि भांडखोर पुरुष दिसू लागला त्या बोलावू आलेल्या गृहस्थाने ते पोलिस सुपरिंटेंडंटचे नाव पुरते अुच्चारले नाही तोच अेखाद्या वज्रमुष्टीसारखा बळकट ठोसा त्याच्या नाकावरच लगावून योगानंदस्वामींनी जी अुडी घेतली ती अितक्या लांब पल्ल्यावर होती की नाकावरील ठोशासरशी चक्कर आलेला तो पाचारक गृहस्थ चांगला दांडगा असताही स्वतःला सावरून त्याने योगानंदामागे

जी अुडी घेतली ती योगानंदाच्या अुडीच्या अर्धी लांब देखील पडली नाही त्या चारी शिष्यांनीही योगानंदाच्या पाठोपाठ आपले धारदार चिमटे अुपसून चौथ्याचौथ्यावरून खाली अुड्या झोकल्या होत्या दाटलेल्या मंडळीत त्या गोसाव्यांच्या तशा धडाधड अुड्या पडताच तेथे मोठा गोंधळ माजला आरडत ओरडत तिकडचे लोक अुठून अुभे राहिले, रेटारेटी सुरू झाली

पण तो सर्व प्रकार अितक्या झटपट चालू होता की, अुड्या पडलेल्या बाजूची लोकांची दाटी आरडाओरड करून अुठेतो सभेच्या अितर बाजूंना काय झाले ह्याची म्हणण्यासारखी वार्ताही नव्हती आणि ज्यांना काही तरी धक्काबुक्की चालू होअून महंत अुडी टाकून परतत आहेत अितकं दिसले त्या लोकांनाही तसं का घडत आहे ह्याची तर मुळीच कल्पना नव्हती 'अहो काय ? झाल काय ?' अितकेच जो तो मोठमोठ्याने विचारीत होता त काय म्हणून घडत आहे का घडत आहे हे प्रश्न मनात येण्याअितका सुद्धा वेळ मिळाला नाही धाडधाड अुड्या टाकून ती गोसावी मंडळी दाटीत जी घुसली ती नीट धीटपणे वाट कापीत जवळ जवळ दिसेनाशी झाली कारण शेकडो लोकांनी त्या आकस्मिक आरडाओरडी-सरशी रेटारेटी करीत पुढे घुसून त्या प्रांगणात अेकच गोंधळ अुडवून दिला होता तो त्या गोसाव्यांच्या पथ्यावरच पडल्यासारखा झाला कोणी म्हणाले 'महंताच्या अंगात ' महावीरजीका संचार हुआ ! ' '—हनुमानजीचा संचार झाला ! म्हणून ते अुड्डाण घेत रामचंद्राच्या देवालयाकडे धावत आहेत !' कोणी म्हणाले, 'कुण्या वेडपटाने महंतजींना त्रास दिला म्हणून ते वैतागले !' आणि कोणा कोणी तर त्या प्रशान्त भक्तिरसाच्या शांततेत गुंग असता ही अेकदम झालेला आरडाओरड अैकून क्षणभर भान सुटल्यासारखेच झाले त्या स्वामीचे सुरेल भजन चाललेल्या प्रशान्त प्रांगणातून अुचलले जाअून आपण सहसाच दुसऱ्या कोण्या स्थळी, कोण-त्याशा दंगलीत फेकलो गेलो आहोत की काय असे तो आकस्मिक दृश्यपालट

महताने आणि त्याच्या शिष्यांनी त्या समोरच्या द्वाराला टाळून भाविक लोकांनी दाटलेल्या द्वाराकडे मुसंडी मारली त्याच्या मागोमाग त्या पोलिस सुपरिंटेंडंटच्या निरोप्याच्या हातून निसटून ते गोसावी त्या भाविक जनांना भरविलेल्या द्वारापाशी आले देखील आता आणखी अेक मुसंडी घेतली की द्वारात, की लगेच द्वाराबाहेर.

अशा कृतनिश्चयाने ते पाची गोसावी त्या द्वाराशी भिडले आणि तेथे दाटी करून अुभे राहिलेल्या त्या त्यांच्या नित्याच्या भाविक श्रोत्यांना 'वाट द्या' म्हणून घाअीघाअीने म्हणाले

(अन्) सहसाच त्या भाविक भक्तांची त्या द्वारापुढची ती दाटीच अेकेरी ओळीने खांद्याशी खांदा भिडवून पसरत पसरत त्या पाची गोसाव्यांना मधोमध घेणारे अेक वर्तुळ घालून अुभी ठाकली त्यातील प्रत्येकाने आपापले पिस्तुल देखता देखता अुपसले आणि त्या गोसाव्यावर रोखून त्याच्या पुढाऱ्याने योगानंदाला आज्ञा सोडली

'यावं अेक पाअूल पुढे टाकशील तर मारलाच जाशील'

वैष्णवी गंध, वैष्णवी मुद्रा, माळा, भगवीं वस्त्र प्रभृति धारण केलेले, भजनात तल्लीन दिसणारे नित्य नेमाने अगदी आरंभापासून येअून भावड्या मुद्रा करून बसणारे आणि साध्यासिध्या माणसासारखे दिसणारे हे नेहमीचे श्रोते अेकदम अेकजात पिस्तुलें रोखून त्या बिचाऱ्या साधुशील सत्पुरुषाच्याच अंगावर अुलटले! देवावतारी भगवद्भक्त म्हणून प्रत्यही ज्याच्या पाया पडले त्याच्याच जिवावर अवस्मात् अेकजुटीने अुठले!! 'हे आहे तरी काय?' असे दिङ्मूढ झालेले शेकडो लोक कुजबुजू लागले, शेकडो भयभीत होअून प्रांगणाच्या बाहेर निसटून जाअू लागले काहींच्या मनात सहानुभूतिही जागून त्या धर्मपरायण भक्ताला सोडविण्यासाठी दंगल करावी, असेही येअू लागले

पण त्या महंताच्या पक्के ध्यानात आले की, 'ह्या नाना ढगाखाली आणि डागाखाली छपून बेपातर केलेले हे तीस चाळीस गुप्त पोलिसातील लोकच ह्या तिन्ही द्वाराशी प्रत्यही भजनाला येअून बसत असले पाहिजेत! त्याचं कपट आपणाला अुमगल नाही खरं! आपण त्यांच्या पञ्ज्यात पुरतेपणी गवसलो खरे!!' तरीही अेक शेवटचा अुपाय म्हणून त्यांनी अत्यंत कर्कश आणि अुच स्वराने त्या खळबळलेल्या समाजाला हाकारलं,

'अहो, अिथे धर्माचा अभिमानी कुणीच नाही का? भगवाना, आता तूच तुझ्या भक्तासाठी धाव!'

त्यासरशी समाजातील कित्येक प्रामाणिक सज्जन चिडले त्यांना महंताविषयी जी काय प्रत्यक्ष माहिती होती ती त्यांच्या मनात अढळ श्रद्धा जागविणारी होती त्या अपरिग्रही, निर्लोभी, स्वधर्मप्रचारक भक्तावर, न जाणो, मिशनरी प्रभृति परधर्मीयांनीच काही कुभांड रचले नसेल कशावरून? अशा भावनेने काही धाडसी

स्वधर्माभिमानी लोक खवळले. पोलिसांवर दोन-तीन दगडही पडले, शिव्या-गाळीचा तर नुसता मारा चालला.

अितक्यात मुख्य द्वाराने लाठीबंद पोलिसांच्या तुकडीसह स्वत: पोलिस सुपरिटेंडेंट आत आले, वाक्पीठावर चढले आणि खणखणीत आवाजात सर्व लोकांना अुद्देशून आज्ञापिते झाले,

' लोकहो, योगानंद हें नांव घेतलेल्या ह्या मनुष्याने अियं जें अवडंबर आजपर्यंत रचलं त्यावरून हा कुणी महान् भगवद्भक्त आहे, असं आपणासारख्या निर्बंधशील नागरिकांना वाटणं साहजिक होतं. पण आम्हांला ह्याची जी पूर्वकीर्ती आहे ती अैकतांच ती आपली सहानुभूति साहजिक असली तरी सर्वस्वी अनाठायी होती, हें आपणा सर्वांना कळूनच येअील. ह्या स्वामीचं सोंग घेअून वावरणाऱ्या योगानंदाचं खरं नांव जरी आपण अैकाल तरी आपण आश्चर्याने थक्क व्हाल. ह्या योगानदस्वामीचं खरं नांव रफिअुद्दिन अहमद असं आहे. हा पंजाबी मुसलमान. ह्याच्यावर पूर्वी अत्यंत क्रूरतेने घातलेल्या दोन दरोड्याचा आरोप सिद्ध होअून ह्याला पूर्वी पंजाबमध्ये सात वर्षं काळ्या पाण्याची शिक्षा झाली होती. त्याप्रमाणे ह्याला काळ्या पाण्यावर धाडण्यात आलं असता हा चार वर्षांनी तेथून पळाला. गेलीं दोन वर्षं ह्याने ह्याच्या ह्या चार शिष्यांप्रमाणेच अनेक दुष्ट लोकांना भोवती जमवून पुन्हा अनेक चोऱ्या, दरोडे, अपहरण प्रभृति भयंकर अुपद्रव द्यायला आरंभलं आहे. गेल्या वर्षी पोलिसांनी ह्याच्या टोळीला अरण्यात वेढलं असता तिने पोलिसावर अचानक गोळया झाडल्या नि पोलिस अधिकाऱ्याला घायाळ करून नि त्याच्याच घोड्यावर स्वार होअून हा धाडसी दुष्ट पसार झाला. त्यानंतर तो बेपत्ताच होता; पण हाच तो, असा संशय आल्यावरून ह्याच्या भजनात आम्ही,

प्रकारचा जमाव होता कामा नये. नाही तर लाठी चालवून पोलिसांना तो मोडावा लागेल. वॉरंटाप्रमाणे आमचं कर्तव्य आम्हांला बजावलंच पाहिजे. त्यांतील तथ्या-तथ्य निवडायचं कर्तव्य न्यायालयाचं. पोलिस, दहा मिनिटांच्या आंत ह्या पाची अपराध्यांना बेड्या ठोकून तुरुंगाकडे घेऊन चला नि हें पटांगण मोकळं करा.'

दहा मिनिटांच्या आत त्या पांची गोसाव्यांच्या हातापायांत बेड्या ठोकून त्यांना तुरुंगाकडे नेण्यात आलें आणि त्या साऱ्या जमावाची आपोआपच पांगापांग होऊन त्या पटांगणात चिटपाखरू सुद्धा दिसेनासें झालें !

परंतु तो पकडलेला गोसावी खरोखरी कोण होता ? स्वामी योगानंद की रफिउद्दिन अहमद ?

आणि मालती ? तिचे काय झालें ?

\+ + +

## ५. अलाहाबादचा तुरुंग

'अच्छा हुजूर !' लटकावलेला हा दंडा पुन्हा थमरेला नि आपली मासी ही लवचीक जीभ ह्या दंड्यापेक्षा अधिक धरामतीची आहे ती हुजूर ! ह्या दंड्याने माणूस घायाळ होतो, पण ह्या जिभेने जिवेच मारला जातो. तरवारीने मान तोडून टाकून जीव घेता येतो, पण रक्त गळत, जिभेने मान जशीची तशी ठेवून जीव घेता येतो नि पुन्हा पुराव्याला रक्ताचा बिंदु सुद्धा पडलेला मिळत नाही म्हणूनच तरवारीने केलेली हत्या पकडली जाते, पण जिभेने ज्याला प्राण घेता येतो त्याला सावर हत्याची सूट ! '

'चूप ! लगा बकनेको -' जाव तुझ्या दंड्यासारखीच तुझी जीभ देखील सभाळता सभाळता मला पुरेस होत '

'अच्छा साब ! दंडा थरथरेला परत लटकावला तशी जीभ पण लटकावून टाकली वधा टाळायला ' पुन्हा अेक मुजरा ठोकून जमादार बाहेर परतला

'अे जमादार, अंदर आव हमारा बूट किधर है आज ? Damn fool.' भूल गया तुम ? जाव, लाव '

बंदिपालाची ती शिवी म्हणजे आपल्या विसराळूपणाचे कौतुक करणाराच अेक अिंग्रजी शब्द आहे अशा समाधानाने जमादाराने ती अैकताच लाजून जीभ बाहेर दाखवली, चावली, लगेच त्या अभिनयालाही लाजून तोंडावर हात ठेवून तो हसला आणि लगोलग चोरट्यासारखा बाहेर जाअून बूट घेअून आत आला आपल्या तोंड पुसण्यापासून शिकरण्यापर्यंतच्या हरकामी हातरुमालाने बूट झाडून त्याने तो बंदिपाला-पुढे हळूच ठेवला आणि रुमाल साफ करण्यासाठी थोडा झटकू लागला, नाचसाडची सिगारेट काढून बंदिपाल म्हणाला,

'झटकता काय रुमाल ? माझ्या बूटाने तुमचा रुमाल मळला नाही, त्या गदळ रुमालाने माझा बूटच मळला असेल ! '

'सच बात है हुजूर आपला बूटच माझा अन्नदाता आहे साब आपल्या पायतनाची सेवा बारा वर्षे करतो आहे म्हणून तर आज शिपायाचा जमादार झाला आहे हा बंदा '

हा पुन्हा बकत बसतो की काय अशा भीतीने त्याला नवा कोणताही विषय मिळू नये म्हणून शजारी कागद टक करीत [ टाअिप करीत ] बसलेल्या कारकु-नाला बंदिपालसाहेब म्हणाले,

'अच्छा, दादा लाव तुम अपने कागद सह्या विह्या काय बोला पाहू कशा-वर हव्यात त्या ? '

जमादार गेल्यास बघताच तो निमगोरा जेलर त्या कारकुनाकडे पाहून, पण काहीसे मनाशीच म्हणाला,

'काय गोडबोल्या आहे हा गळेकापू ! अेक वेळ त बंदिवानातले बेरड पुरवले, पण हे शिपायांतील साव बेरड नकोत '

कारकुनाला ठाअूक होतेंच की, नाव न घेता आपलीही गणना त्या दुसऱ्या वर्गातच आहे हेंही जेलरसाहेब त्याच वाक्यात सागत आहेत बंदिपाल कारकुनापाशीं त्या शिपायासंबंधीं जो हा अभिप्राय देत होता तोच अभिप्राय ते कारकुनदादा आणि ते शिपाअी अेकटे बसले म्हणजे त्या जेलरसाहेबाविषयीही देत असत त्यामुळे नेहमीं पिटपाट होत असल्याने कोणीच कोणाच्या पाठीमागे बोललेले शब्द मनाला लावून घेत नसे प्रत्येकाची आतली बिंगे प्रत्येकाला माहीत असल्याने आणि प्रत्येकाच्या झाकल्या मुठीत प्रत्येकाचा थोडाफार वाटा असल्याने गेली बारा वर्षे तो दादा आणि तो बंदिपालसाहेब हे त्या तुरुंगाच्या संस्थानाचा कारभार अेखाद्या समाअीक कुटुंबाप्रमाणे अेकमेकाना संभाळून गुण्यागोविंदाने हाकीत होते. नवनवे पर्यवेक्षक [ सुपरिंटेंडेंट ] येत आणि जात, पण जसे ते बंदिगृह अढळचे अढळ होते, तसेच हे जमादार, दादा आणि जेलर ह्याचे समाअीक कुटुंबही गेली बारा वर्षे तेथे अढळ राहिलेले होते

बंदिपालाची आज्ञा अैकून जमादार तुरुंगाच्या आत जाताजाताच मनाशी विचार करीत होता त्यानें दोन लाकडी फाटकें अुघडून आतल्या अेका मध्य-भागीच्या पटांगणात पाय टाकताच हाक मारली,

'शिवराम, शिवराम हवालदार किधर है ? बुलाव अुनको '

थोड्याच वेळात शिवराम हवालदार धापा टाकीत, टाचेला टाच हाणून, ताठ अुभा राहून आणि मुजरा ठोकून जमादारापुढे ठाकला सगळ्याना 'चले जाव' करून जमादार अेकट्या अुरलेल्या शिवरामला म्हणाला,

'शिवराम, आज काळ्या पाण्याहून पळून आलेल्या कुणा दरोडेखोर बंदिवानाला त्याच्या साथीदारासह ह्या बंदिगृहात धाडण्यात यणार आहे जेलरसाहेबानी सक्त बजावलं आहे की, ही बातमी कुणाला कळता कामा नये '

'अच्छा जमादारजी !'

'हां हां, आताच कशापायी नरड दाबता मास? कुणाला त्यांच्याशी मी बोलू देईन तर ना! कोणचा हल्नट बापाचा लेक त्या दरवडेखोराशी बोलायला येतो तो येऊ तर दे! मग तो मोठा जमादार का असेना ह्या तुरुगाचा? नहीं नहीं जमादारसाहेब क्षमा मागतो, आपली आज्ञा किती ततोनतपणे मी पाळीन त सांगायच्या झोकात बोलून गेलो तस'

'अरे, पण मला हव तेच तू ऐका अर्धी बोलल्लास बाबा हें बघ, शिवराम जे अशा धवाडाच्या प्रकरणी विशेष वालायच ना तें तूच त्या दरवडेखोराशी बोलायच मी चकार शब्द काढणार नाही प्रथम तू सार जुळवून आणीता ह्या कामी तू आहेसच तसा पक्का पाताळयंत्री! म्हणून तर तुलाच मी अशा विश्वासाच्या जागी नेहमी नेमतो हें बघ, अशा ऐखादा अट्टल दरोडेखोर जेव्हा यतो कधी काळी तेव्हाच काय ती तुमची आमची पिकायची तर पिकणार पोळी! अशी कुळ गे-सवाशाखाली जात नाहीत बहुधा त्याच्याच गाठीला असल्या तर गिया असणार नाही तर हे भुरटे शेकडा चोर जे ह्या तुरुगातून येतात त्याच्या कनवटीला असणार काय नि आमची मुठ ते दाबणार काय? तो तुरुगातून पळू शकणार नाही ह्या-विषयी काय तो कडेकोट बदोबस्त ठेवला की चाल आपल भरवशी कर्तव्य! बाकी त्याला काय लागल ती चैन करू दे आतल्या आत – जर तो आपल्याला काय लागेल त ओकून आपली रिकामी मूठ भरू पाहत असेल तर! पण सावधानपणे रा! प्रथम बघ कूळ कस काय त नीटपणे चाचपून, नाही तर फट म्हणता ब्रह्म-हत्या! आल ध्यानात? ह, जा आता तो चौक, त आवार, ती अेकलकोडी, खाली करून झाडून ताळाबद करून ठेव जा ती टोळी येईल्च सध्याकाळपर्यंत, पण कुणापाशी त्याच्या येण्याविषयी बोल्ता कामा नये ह चकार शब्द!'

'छट, ती चिंताच सोडा!' असे आश्वासून शिवराम हवाल्दार ता फाशी-वाला चौक साफसूफ करण्यास निघून गेला त्याने पहिल्या धडाक्याला त्याचा जो अेक विश्वासातला बंदिवान होता त्याला बोलावल आठ-दहा वर्षांची लाब शिक्षा भाल्ला तो बंदिवान त्याच्या कामाच्या तडफेमुळे मुकादम झालेला होता त्या बंदिवानाच्या मुकादमाला शिवराम हवालदाराने तो फाशीवाल्या अपराध्यासाठी म्हणून अगदी अलग राखलेला पण घातपात करणाऱ्या अितर भयकर बंदिवाना-नाही निराळे काढण्यासाठी मधून मधून अपयोगात आणल्या जाणाऱ्या खोल्याच्या गाळ्याचा चौक, त आवार, त्या अकलकोड्या झाडूनपुसून ठेवण्याचे ताबडतोब काम सांगितल आणि कडकपणे बजावल का,

'आज हा चौक असा मोकळा करून ठेवण्यात यत आहे हें कुणाला मुद्दा सागता कामा नय कधी नव्हता असा बदोबस्त ठेवला पाहिजे मोठे भयकर वरड आहेत त!'

मुकादमाची जिज्ञासा नुसती अुताला चालली पण हे भयकर वेरड कोण ते सरळपणे विचारता हवालदार गोप्य राखण्याच्या अैटीने आणखीच ताठरायचे हे ओळखून तो आडवळण घेअून म्हणाला

हालेच्या ! हवाल्दारजी, गेल्या वर्षी मोठमोठी काळ्यापाण्याची शिक्षा झालेल्या दरवडेखोराची टोळी आली तेव्हा ती काळ्या पाण्यावर जाअीतो आपल्या आशीर्वादे मीच सांभाळली ना ? तुम्ही त्याच्या चिठ्या दिल्या, त्या बाजारांत तुरुगाच सामान विकायला नेताना कुणी पोचवल्या त्याच्या घरी ? 'हळकुड ' कुणी आणली मुठी भरून ? हृदा पदुयाने जिवावरची कसरत केली ती हवालदारजी !'

'अरे काळ्या पाण्यावर जाणाऱ्या वेरडापेक्षा काळ्या पाण्यावरून पळून आलेला वरड किती भयकर असला पाहिजे बाबा !

हा काळ्या पाण्यावरून पळून आलेला कुणी दरवडेखोर असला नातरी '

'हा ! चूप ! त मी सागणार नाही पण काय रे मुकादम ह कूळ जर वर दिसल तर त्याच्या चिठ्ठ्या पण नेशील का तगा ? का काळ्या पाण्यावरून आले-ल्याशी पाहताच शपूट घालशील ? जी हळकुड मिळतील त्यात तुला पण अेखाद्या नवऱ्यामुलासारखा हळदीहून पिवळा करीन !'

मुकादमाला हव होत त सार कळल 'तस हळकुडा च कोणतही काम माय राव ! काळ्या पाण्यावरून पळून आला तर काय माणसाला लाडगा होतो थोडाच ?'*(त्या तरंगातल्या शब्दकोशात हळकुडाचा अर्थ सोन्याची नाणी असा

झाला असाच, असा अेका पायातच बूट घातलेला, तिरप्या फेटयाचा सोगा सुटलेला, कुत्र्यासारखा पट्टा गळयात गुडाळलेला, साऱ्या बदिवानाच्या रांगेतून तिकडे कार्यालयात मोठया फाटकापुढे घेअून या 'चलाव! तुज्या बापाचा—त्या सुपरिटेंडेट-साहेबाचा—तिकडे मला टेलिफोन आलेला की दरवडेखोराची अेक पकडलेली टोळी आताच येणार म्हणून नि तू अिथे पाय रगडून घेत पडलास काय ? चलाव!'

सगळयाच्या पुढे त्या हवालदारजीचे ते विचित्र सोग, त्याच्यामागे तोंडाला रुमाल लावून हसणारा तो जमादार, त्याच्यामागून तो मुकादम, ते बदिवान अशी ती मिरवणूक पुढे, व वाटेने जेथे जेथे बदिवानाच्या रागामधून जावे लागले, तेथे तेथे त्या खो खो हसत आहेत आजूबाजूला आणि ती गमत पाहत मनातून हसणारा पण वरवैर सतापाने ताठरलेला तो निमगोरा बदिपाल सगळयाच्या मागून अशी ती स्वारी बदिगृहाच्या मोठया फाटकातील मुख्य कार्यालयापाशी आली

तो त्या भयाण तुरुगाच्या त्या मुख्य लोखडी द्वाराच्या जाड गजाना धरून बाहेरच्या बाजूला अुभा असलेला अेक गोरा सार्जट बदुकाना सगिनी रोवलेल्या दहा-पाच शिपायासह अुभा असलेला बदिपालाला दिसला - त्याच्यामागे बाहेरूनच अैकू येणारा पायबेडयाचा खळखळाटही अैकू आला येणार होती ती दरवडेखोराची टोळी आली दिसेल, हे बदिपालाच्या ध्यानात आले त्या बाह्य सकटाला तोड देण्यासाठी गृहकलह मिटवून कामाळू आणि विश्वासू जमादार-हवालदाराची अतर्गत जूट करणे प्रथम अवश्य, असा त्या तुरुगातील टीचभर राजकारणातला बखेडा मिटवावयाचा विचार झटक्यासरशी करून बदिपालाने जमादाराला सागितले,

'शिवरामला सोडून द्या झाली तेवढी विटबना पुरे पुन्हा असे करू नकोस

हवालदाराला देखरेख करायला सांगितलें आणि कार्यालयात जाअून सार्जंटकडून सारे कागद समजावून घेअू लागला.

अिकडे तो मुकादम केव्हाच तुरुंगात जाअून त्याच्या विश्वासातील बंद्यांना सांगता झाला होता की,

'आज काळ्या पाण्याहून पळून आलेला कुणी अट्टल अपराधी येणार. पण कुणालाही हें कळता कामा नये.'

त्या बंद्यांनी दुसऱ्याला बंदिवानांना, त्यांनी तिसऱ्यांना तीच गुप्त बातमी त्याच अटीवर कुजबुजून सांगता सांगता त्या बंदिगृहातील प्रत्येक बंदिवानाला कळून चुकलें होतें की, 'आज कुणी काळ्या पाण्यावरून पळून आलेला बेरड येणार आहे, पण हें कुणालाही कळता कामा नये !' त्यामुळे ज्याला निमित्त सापडलें तो तो बंदी, वार्डर, मुकादम, शिपाअी त्या टोळीला पाहण्यासाठी त्या पटांगणाच्या जवळपास कोठे तरी येअून रेंगाळत होता. शिपायांचा घोळकाही तेथे जमाच होता. ह्या अेवढ्या जणांच्या समक्ष असल्या अट्टल दरवडेखोरांवर आपण सत्ता गाजवीत आहोत, ह्याची गर्विष्ठ जाणीव शिवराम हवालदाराच्या फुगलेल्या छातीत सुद्धा मावेनाशी झाली. आपल्या करड्या शिस्तीचें प्रदर्शन करून सर्वांवर आपली छाप पाडावयाची अनावर अिच्छा होअून त्या दरवडेखोरांतील त्यातल्या त्यात म्यालेल्या आणि सौम्यशा दिसणाऱ्या अेकाला हवालदाराने अुगीचच दंडुक्याने डिवचून

कुत्र्याना अधिक स्वतंत्रता असते ! त्यातही सार्जंटचा कुत्रा तो ! शिवराम हवाल-दार त्याला कुरवाळू लागले टॉमने आपले दोन पाय अुचलून हवालदाराच्या कंबर-पट्टचावर ठेवले, अितक्यात त्या निर्ढावलेल्या दरोडेखोराने मोठ्या अजीजीने हाक मारली,

'थोडे अिकडे याल का, रावसाहेब? अेक अर्ज आहे दासाचा'

'ह्या अुद्धट, दुष्ट माणसावर देखील आपली छाप पडलीच तर!' असे 'रावसाहेब' अशा त्या दरोडेखोराच्या नम्र संबोधनाने हवालदाराने ताडले आणि त्याच्याकडे दयाळू थोरवीने जाअून तो म्हणाला,

•'काय हवं? बोल, भिअू नकोस'

तो तो लुच्चा दरोडेखोर गालात हसून मोठ्याने म्हणाला,

'मी तुम्हाला अुठे बोलावलं मी त्या टॉम कुत्र्याला बोलावलं, त्याला सांगणार होतो की, असा बेशिस्त अुभा राहू नकोस हा अलाहाबादचा तुरुंग आहे प्रत्येकाने अिथे शिस्तवार अुभं राहिलं पाहिजे'

पुन्हा सारे बंदिवान आणि शिपाअी पण हसले हवालदार संतापले,

'शुद्ध गाढव आहात तुम्ही लोक!'

नम्रपणे हसत दरोडेखोर अुत्तरला,

'आणि आपण आमचे सरदार! बोलाल तंच खरं!'

तोच बंदिपाल त्या पटांगणात सार्जंटासह त्या बंदिवानाची ओळख सार्जंटा-कडून रीतसर करुन घेण्यासाठी आला पहिल्या धडाक्याला सार्जंटने बंदिपालाला दाखवला तो निर्ढावलेला, अुंच, छची हसू आठावर सदान् कदा असणारा अपराधी

'हाच तो योगानंद-अर्थात् रफिअुद्दीन-काळ्या पाण्यावरुन पळालेला बंदी. ह्या दरवडेखोराच्या टोळक्यातील पहिल्या क्रमांकाचा आरोपी'

सार्जंटची ह्या दरवडेखोराशी गेल्या महिनाभर तो त्याच्या हातात होता तेवढ्यात, खूप घसट झाली होती आणि त्या आरोपीच्या अशा निरुपद्रवी वागण्यातही जी अेक खोच असे ती सार्जंटालाही आवडू लागली होती. बंदिपालाला जेलर साहेब म्हणायचें सोडून रफिउद्दीन 'प्रिझनरसाहेब' म्हणून म्हणताच त्याच्या अिंग्रजी भाषेच्या अज्ञानाची टर अुडविण्यासाठी सार्जंट मोठ्याने हसला.

'छान छान! तुरुंगावरचा हा जो अधिकारी तो जर 'प्रिझनरसाहेब', तर तुझ्यासारखे जे दरोडेखोर तुरुंगातील कैदी ते 'जेलरसाब' म्हटले पाहिजेत नव्हे का?'

'ऑफ कोर्स मि. सार्जंटसाहेब! यस्! तुमच्या बबर्जी अिंग्लिशला तें मानवत नसेल पण करेक्ट ग्रॅमॅटिकल अिंग्लिश म्हणजे मी म्हणतो तेच. जर प्रिझन म्हणजे तुरुंग नि जेल म्हणजेही तुरुंगच, तर प्रिझनर नि जेलर ह्या दोन्ही शब्दांचा कोणता तरी अेकच अर्थ होत नाही का? व्याकरणाप्रमाणे तरी जो जेलर तोच प्रिझनर. प्रिझनर नि जेलर अेकाच माळेचे मणी. अिंग्लिश कशाशी खातं तें मलाही कळतं बरं का मि. सार्जंटसाहेब!'

'योगानंदच आहेस तू! बरं, काय रे रफिअुद्दीन, तुला चारदा फटके मारले ते काय म्हणून रे? तें नाही सांगितलंस?' सार्जंट जिज्ञासला.

'ते कारण अगदी सरळ आहे बघा. पण ह्या जेलरसाहेबांना राग येणार नाही तर सांगतो. दोन जेलरनी माझ्या म्हणण्याप्रमाणे मला चोरून अफू खाऊ दिली नाही ह्यासाठी मी त्यांच्या डोक्यात थाळीपाट मारलं म्हणून दोनदा फटके खावे लागले नि दोनदा आणखी दोघा जेलरसाहेबांच्या म्हणण्याप्रमाणे मी त्यांना चोरून हव्या तितक्या पैशाची लाच चारली नाही म्हणून मला फटके खावे लागले.'

त्याला फाशीच्या अेकलकोंडीत विशेष बंदोबस्तात ठेवलें होतें. म्हणजे त्याच्या खोलीपाशी जमादार आणि शिवराम हवालदार ह्यांच्यावाचून कोणालाही जाता येत नव्हतें. पण त्यामुळेच तो सर्वांपेक्षा अधिक चैनीत होता. अपेक्षेप्रमाणेच शिवरामाच्या हस्तकानी त्या दरोडेखोराचे जे काही साथीदार अलाहाबादला अजून लपून छपून मोकळे राहात होते, त्यांना बंदिगृहातील त्या रफिअुद्दिनच्या चिठया पोचवल्या आणि यथेच्छ ' हळकुंडें ' कारागृहात जाअू-येअू लागलीं. थोडी अफू, बरीच तबाखू आणि अधून मधून मिठाअी रफिअुद्दिनच्या अेकलकोंडीत गुप्तपणे पोचू लागली आणि अप्रत्यक्षपणे त्याच्या नगद, पिवळ्याधमक सोन्याच्या गिन्या जमादार, दादा आणि जेलर ह्यांच्या खिशांत पडू लागल्या.

रफिअुद्दिनच्या योगानंदस्वरूपातील जटा, दाढीमिशा सगळ्या अुतरून गळून गेल्या असून आता तो अेक छटेलं मुसलमान बनलेला होता. त्याला योगानंदाच्या वेषात, भेषात, आणि भजनात ज्यांनी तल्लीन झालेलें पाहिले, त्यांना तो अेक मुसलमान दरोडेखोर आहे हे जसें स्वप्नात सुद्धा खरें वाटलें नसतें, तसेंच त्याला ह्या फाशीच्या अेकलकोंडीत अेका अट्टल मुसलमीन दरोडेखोराच्या स्वरूपात पाहणाऱ्यांना त्याने अेकदा हिंदु साधूच्या वेषात हजारो लोकांना झुलवले-भुलवलें होतें, हें सागून सुद्धा शक्य वाटलें नसतें. तरीही योगानंदपणाचें अेक चिन्ह अेका अर्थी त्याच्यात होतें असें म्हणता आले असतें. तें म्हणजे, सुखदु खे समे कृत्वा तुल्य-निंदास्तुतित्वाचें ! त्याला जेव्हा कोणी विचारी की, तुला आता भयंकर शिक्षा होण्याचें भय किंवा चिंता कशी वाटत नाही ? तेव्हा तो जिव्हेंणी मुरडून आणि भुंवई अुडवून नेहमीप्रमाणे गालातल्या गालात हसे.

' त्यात ती कसली चिंता ? फाशी मला होत नाही—जन्मठेप काळं पाणी झाल्यावाचून राहात नाही ! और हमको काला पानीमें तो जो पुण्य और मजा आती है वह तुम्हारे काशीजीमें भी नही मिल सकती—मक्काजीमें भी नही मिल सकती ! हम लोगोंकी काला पानीही काशीजी है !'

' पण तुला फाशी होणारच नाही कशावरून ? भयंकर क्रूरपणाने कित्येकांना तू ठार मारलंस, मुलामुलींचे तू गळे कापलेस, असे राक्षसी आरोप तुझ्यावर ! तू फाशी जाणार, असं स्वतः जेलर साहेब म्हणतात.' असें शिवरामाने कधी हटकलें की तो हसे.

' अरे जेलर क्या जानता है ? छप्पन भाषा, छप्पन वेष, छप्पन बंदिगृहांचं पाणी प्यालेल्या माझ्यासारख्या दरोडेखोराला पुराव्याच, शिक्षेचं, अपराधाचं निर्बंधनियमाच जे अनुभविक ज्ञान असत ते असल्या जेलरना तर काय, पण मोठमोठ्या जज्जांना नसत ! त्या ज्ञानाच्या जोरावर आम्ही दरोडे मारताना सुद्धा कायदेशीरपणाने मारतो. फाशी होअील अशा गाढवपणाने, ठार मारतो त्याना देखील ठार मारीत नाही ! बाबा, तुमच्या हिंदु लोकाची गीता भी मैंने पढी है !

'हत्वाऽपि स इमाँल्लोकान् न हन्ति न निबध्यते !' ह्यालाच म्हणतात 'योगः कर्मसु कौशलम् !'

हिंदु अधिकाऱ्यांच्या पहाऱ्यात तो असे संस्कृत श्लोक म्हणे, भजनें गाई की त्या भावड्यांना तो अतर्यामीचा खराच कोणी अवधूत आहे असा भुरळ पडावी आणि कारागारातही त्या हिंदु शिपायादिकांची त्याला सहानुभूति मिळावी.

मुसलमान अधिकाऱ्यांच्या पहाऱ्यात गप्पा छाटताना त्याने कुराणातील खरीखोटीं दहापांच आयतें (मंत्र) म्हटल्यासारखें करावें, निमाज तर, उरलेल्या खेवड्याशा दाढीला दहादा गंभीरपणें कुरवाळीत मोठ्या तल्लीनपणें दिवसभर पढतच राहावें आणि सांगावें की,

'देखो. मी दरोडे जे जे मारले, ज्या ज्या मुली पळवल्या, ज्यांचे ज्यांचे हातपाय तोडले तोडवले, प्राण घेतले, लूटमार केली, ते सारे काफर हिंदु होते वरं ! इमानदारोंके (मुस्लिमके) बालको भी कभी धक्का नहीं लगाया ! अल्ला रहीम है. काफरांना शिक्षा दिल्याविषयी खुदाताला माझ्यावर केली तर दयाच करील. नव्हे का ?'

'अर्थात् !' त्या मुस्लिम जमादाराने म्हणावें आणि ठाव न लागणाऱ्या कोण्या जुनाट अंधाऱ्या विहिरीत आपण डोकावतो, तसें त्याच्या डोळ्यांत डोकावत

(मघुलीजनाबाची) महत्त्वाची भर पोलिसापाशी असलेल्या स्वतंत्र पुराव्यात टाकून सरकारने त्याच्यावर खटला भरला आणि खटल्याची नेमलेली तारीख रफिउद्दिन प्रभृति सर्व आरोपींना कळविली.

(खटल्याच्या दिवशी, लग्नाच्या दिवशी नवरा मुलगा जसा सजतो तसा औत्सुक्याने आणि ऐटीने आपल्या वेसाची, देहाची, वेषाची, कारागारात करता आली तितकी सजावट करून, पायातील बेड्या ताठरपणे खळखळवीत तो रफिउद्दिन दरोडेखोर शिपायाच्या संगीनपाहऱ्यात कारागृहाच्या दाराबाहेर मोठ्या तोऱ्याने हसत खिदळत पडला. ' काळ्या पाण्यावरून पळून आलेला पराक्रमी पुरुष तो हाच ! ' असे भावीत सारे त्रिभुवन आपल्याकडेच पाहत चालले आहे असे त्याचे त्याला वाटत होते आणि आता कोर्टात काय काय चेष्टाकुचेष्टांनी जज्जाला देखील हसवत गारीगार करून सोडावे ह्याचेच काय ते विचार त्याच्या मनात घाटत होते. आपल्या भयंकर अपराधाची क्रूर कथा ऐकताच कोणा लोकांच्या अंगावर शहारे येतील, आपणास कोणी लोक राक्षस म्हणून छी थू करतील, आपणाला कठोर दंड भोगावे लागतील, ह्याची त्याच्या मनात सुद्धा धुगधुग वाटत नव्हती. प्रेत, रडारड, चिता ह्यांना सरावलेल्या स्मशानातील धर्मशाळेवरील चौकीदाराला जशी स्मशानाची भीति वाटत नाही, तो कार्यक्रम जसा त्याचे नित्याचे आह्निक, त्याचा स्वाभाविक कार्यक्रम बनलेला असतो, तसेच त्या निर्ढावलेल्या दरोडेखोराला न्यायालय, पुरावा, शिक्षा, बेड्या, बंदिशाळा, जन्मठेप, काळे पाणी ह्या साऱ्या वस्तूंचा परिपाठ इतका सरावाचा झालेला होता की, त्याचा त्याला काहीच बाऊ वाटेनासा झाला होता. सैतानाप्रमाणेच त्याच्या मनाने ' Oh Evil! Thou be my Good ! ' असेच घेतलेले होते.

## ६. रफिअुद्दिनचें अंतरंग

. . कोर्टात त्या भयंकर दरोडेखोरांचा खटला भरात आला होता. वकील, त्यांचे कारकून, शिपायांचा मशस्त्र तांडा, पत्रेवाले, अशा दरोडेखोरांच्या खटल्यांचा विशेष चटक असलेले बरेच सभ्य गृहस्थ आणि काही गावगुंड, ह्यांची न्यायालयात दाटी झालेली असे. त्या क्रूर नरपशूंची नृशंस कृत्ये अैकताना कित्येकदा स्वतः न्यायमूर्तींच्या, सवयीनें निर्ढावलेल्या मनालाही धक्का बसे. निःपक्षपातीपणालाही क्रोध आवरेनासा होअी, गावगुंडांच्या अंगावरही शहारे येत. नृशंस आणि क्रूर श्वापदांना मनुष्यवस्तीतून मनुष्य रानावनात हाकलून देअू शकला, पण मनुष्यांच्या मनातल्या मनातच नृशंस श्वापदें अजूनही कशी दबा धरून घर करून वावरत आहेत तें भयानक सत्य मनातील भुयारांची कुलुपें जेव्हा केव्हा अशी अुघडी राहून ती नृशंस श्वापदें सैरावैरा धावू लागतात तेव्हाच काय तें नाकारता येणें अशक्य होअून जातें. माणुसकी म्हणून ज्याला आपण म्हणतो ती सुशोभित नगरी अेक कवेट्टा नगरी आहे. तिच्याखाली कढत असलेल्या भूकंपीय राक्षसकींचे थरचे थर पसरलेले असतात. केवळ दयादाक्षिण्य, मायाममता, न्यायान्याय ह्याच्या पायावरच ती माणुसकीची कवेट्टा नगरी अुभारलेली असल्यामळे अटळ असलीच पाहिजे असा भ्रमात

त्याला हसू असें क्वचितच येतें ! ' तें लक्षण केव्हा केव्हा कसें खोटें पडतें तेंही त्याने कोठे तरी दुसऱ्या भूमिकेकडून वदवलें असते. क्रूर असताही रफिअुद्दिन जसा गंमत्या तसाच तो दुर्वृत्त असताही देखणा असे. न्या. ऑक्लंड मनात म्हणत, 'ह्याने अेका महाकवीच्या वरील सूक्तालाच नव्हे तर दुसऱ्या महाकवीच्या 'न ह्याकृतिस्सुसदृशं विजहाति वृत्तम्' ह्या कालिदासीय सूक्तालाही खोटं पाडलं आहे!' सुंदर माणूस सद्वृत्त असतेच असें नाही, अितकेंच नव्हे, तर त्याच्या दुर्वृत्ताहूनही ती त्याची सुंदरता केव्हा केव्हा अधिक विषारी असते. गुलाबांच्या दाट फुलोरी ताटव्याच्या आड कपटाचा कडेलोट तेथेच आहे तें ती कळूही देत नाही.)

त्या दरोडेखोरांच्या टोळीने केलेल्या नृशंस क्रौर्याचे अत्याचार पोलिसानी भरभक्कम पुराव्याने त्यांच्या पदरात घातले. त्यात ज्या अेका अप्रत्यक्ष पण महत्त्वाच्या पुराव्याची भर त्या रफिअुद्दिनच्या टोळीतील सरकारी क्षमेचा साक्षीदार झालेल्या हुसनभाअी नांवाच्या आरोपीने घातली, त्याच्या त्या स्वीकारोक्तीतील निवडक आशय तेवढा जरी येथे दिला तरी तो रफिअुद्दिनच्या राक्षसी कृत्यांची रूपरेषा वाचकांच्या लक्षात यायला पुरेसा होणार आहे. पोलिसांच्या स्वतंत्र पुराव्याने समर्थिलेला त्या स्वीकारोक्तीतील [ कबुलीजबाबातील ] तो आशय असा —

'माझं नांव हुसनभाअी. मी हायस्कूलपर्यंत शिकलो. कारकूनही होतो. पुढे जुगाराच्या नादाने पैशाची चोरी करू लागलो. माझं मूळ गाव खानदेशात. रफिअुद्दिनची काळ्या पाण्यावर जाण्याच्या पूर्वीची माझी ओळख. त्याने पंजाब लखनौकडे लूटमार करून आणलेली काही संपत्ति तो माझ्या घरी लपवून ठेवी. पण म्हणूनच मला तो त्याच्या टोळीत प्रत्यक्ष दरोडे घालायला कधी नेत नसे नि माझ्याकडे पोलिसचं लक्ष वेधू नये म्हणून माझ्याकडे अुघडपणे फारसा येत नसे. पुढे तो शिक्षा होअून काळ्या पाण्यावर गेला नि त्याचा संबंध अगदीच तुटला. काही वर्षांनी अेके दिवशी तो माझ्या दारात जेव्हा अचानक अुभा राहिलेला मी पाहिला, तेव्हा मेलेलं माणूस जिवंत झालेलं दिसावं तसंच मला झालं. काळ्या पाण्यावर गेलेला मनुष्य नि जिवंत येअू शकतो, ही कल्पना सुद्धा मला नव्हती. त्याने सांगितलं की, तो मंत्रबळाने अदृश्य होअून समुद्रावरून चालत परत आला. त्याने मंत्राने भारलेला अेक ताअीतही मला दाखवला. माझ्याकडे त्याची असलेली मागची तीन चार हजाराची ठेव मला त्याने बक्षीस म्हणून देअुन टाकली असही

गोळा कराव्या नि ह्याच्या गुद्दा सगळ्यानों वाटून घ्याव्या. भजनाच्या वेळी होणाऱ्या दाटीत हिंदु मुली काही नाही तरी असवारे आम्ही गेल्या अेका वर्षं दीड वर्षांत पळवून गुलाम हुसेन नावाच्या बलुच्याच्या हस्ते अुतरेकडे धाडून दिल्या त्या प्रत्येक सावजामागे आम्हाला स्वतंत्र 'बक्षीस' मिळे ह्या मुसलमानाना न लुटण्याचा जो बहाणा करीत असे तोही, ह्याचा प्रत्यक्ष संबंध जेव्हा आमच्या टोळीशी आला तेव्हा किती खोटा होता, ते आम्हाला कळलं कोण्या मुसलमानाला लुटायचं म्हणजे तो त्याला 'काफराचा दोस्त' अितकी शिवी काय ती देअी नि शपथेतून मोकळा होअी. आम्हालाही ते सोयीचं शास्त्र मनापासून आवडे हा जितका क्रूर तितकाच विनोदी आहे पण बहुरूपेपणात हा अितका पटाअीत आहे की, ह्याचा मूळ स्वभाव विनोदी की क्रूर ते मलाही सांगता येत नाही बेडरपणाच्या सोबतीलाही ह्याचा हा गमत्या ढंग फार अुपयोगी पडतो ते काहीही असल तरी तो अत्यंत क्रूर कृत्य करतो तेव्हाच तो अत्यंत गमतीत येतो अितकं मात्र खर.

'ह्याच्या क्रौर्याची मलाही अगदी शिसारी येण्याचे दोन प्रसंग, मी पाहिलेला प्रत्यक्ष पुरावा म्हणून सांगतो. खानदेशातील ज्या मुसलमान डॉक्टराच्या घरावरील दरोड्याचा अेक आरोप ह्या खटल्यात आमच्यावर केलेला आहे, त्या दरोड्यात मी होतो. आम्ही दार मोडून आत शिरताच ह्याने माडीवरून निसटून चाललेल्या डॉ. रहमान ह्याच्या पायावर कुऱ्हाड घातली. पायाचा तुकडा पडला. डॉक्टर तिथेच मरून पडला, पण तरीही केवळ कुऱ्हाड चालवायच्या त्वेषानंदात मोठ्याने हसत ह्याने, मी नको नको म्हणत असता, त्या डाक्टरार्ची खाड खाड अुडवली. अितक्यात पलंगाखाली दवलेली त्याची दोन मुलं दिसली ती गप्प होती. मी कळ-वळून म्हणालो, 'राहू दे त्याना. भयाने ती गप्प, अर्धमेली, बेशुद्धच पडली आहेत'

'तो म्हणाला, बेशुद्धीत सारेच डोळे मिटून गप्प असतात. शुद्धीवर येताच वाचा फुटते, डोळे अुघडतात नि मग कोर्टात दरोडेखोर कोणते ते हेच अुघडलेले डोळे नि हीच फुटलेली वाचा ओळखील नि तुझ्या-माझ्या गळ्याला तात देअील.' असं म्हणून ह्याने त्याच कुऱ्हाडीच्या अेकेका घावासरशी त्या लेकराचे प्रत्येकी दोन-दोन तुकडे अुडवले. ते अघोर कृत्य पाहताच मला देखील घेरी आली. पण त्या दरोड्यात दहा हजाराची लूट आमच्या हाती पडली, त्यामुळेच काय ती त्य' घेरीची बाधा माझ्या मनाला फारशी झाली नसावी नि मं त्याच अुन्मार्गावर पूर्ववत्

प्रतिशेत खरा अर्थ किती तें मला सांगता येत नाही. पण हा खानदेशात पळून आला तेव्हा मात्र त्याच्याबरोबर बिहारमधून बळाने पळवून आणलेली एक हिंदु कायस्थाची तरुण कन्यका होती खरी. ती त्याच्या कडक पहाऱ्यात असे. तिच्यावरच ह्याचं प्रेम अितकं वाजिल्वेड होतं की, ह्या मनुष्यासारखा कुणीही मायाळू स्वभावाचा माणूस सापडणार नाही असं वाटे. तसंच पाहिलं असता हा आमच्या टोळीतल्या सवंगड्यांशीही राखी तोवर चांगली मैत्री राखी. त्या तरुण रमणीवर हा जरी लुब्ध होता तरी ती मात्र दुःखाने झुरणीला लागलेली दिसे. केव्हा केव्हा जिवावर अुदार झाल्यासारखी भासे. ती अेकदा देवाला हिंदु धर्मपद्धतीने हात जोडून प्रार्थीत असताना रफिअुद्दिनने पाहिलं. त्याने लाटात येअून तिला कुरवाळीत

झुलवली, झटकन् हिसडून तिची साडीही अर्धीमुर्धी फेडून टाकली नि तो कामोन्मत्तमला निलज्जतेने म्हणाला,'

'बघ बघ ही परी घे, पोटभर बघून घे ' .

'हा विषयांध ह्या विकृत लहरीत आता तिला करतो तरी काय म्हणून कामावेशान थरथरणारा मीही जो डोळे भरून तिच्याकडे पाहतो .

'तोच—

आपण दगड अुचलून भिरकावतो तशा सावश बळाने त्याने त्या सुदर मुलीला त्या बुरुजावरून त्या नदीच्या महापुरात दूरवर फेकून दिली 'बघ भरल तिच ' अस म्हणून तो मोठ्याने हसला

'राक्षसा ! ' मी अेकदम ओरडला

'आधी ती गमत तर बघ हीच गमत दाखवायला तर मी तुला अिथे बोलावल ! '

'दोनदा ती निरपराधी सुदर रमणी लाटावर आली दोनदा लगोलग खाली गली त्या महापुराच्या मध्येच अेक अुच खडक वर डोक काढून अुभा होता अेक प्रचड लाट खळखळन तिकडे वळली, तीत गुरफटलेली ती तरुणी नि तिची ती गुलाबी साडी स्पष्टपणे दिसली ' .

'अुच टागलेल काचेच सुदर झुबर अकस्मात् तुटून खाली कोसळताच जशा त्याच्या काचेच्या ठिकऱ्या ठिकऱ्या अुडतात नि त्याच्या ज्योतीच्या ठिणग्या पागून त्या ज्योति अचानक विझतात, तशी ही प्रचड लाट त्या खडकावर आपटताच त्या जलौघाच्या पाढऱ्या शुभ्र ठिकऱ्या ठिकऱ्या अुडाल्या नि त्या अत्यत अनागस काचनगोर तरुणीच्या मस्तकाच्या चिघड्या होअून तिच्या प्राची प्राणज्योति अेकदम मावळल्या ! ती पुन्हा काही पाण्यावर आली नाही ! .

'राक्षसा, काय केलस हें ? मरणाच्या डोहात तिला का ढकललस ? मी शोकत्वपात स्फुदस्फुदून हुडसल

'मरणाच्या नव्हे वेड्या, तिच्याविषयी बोलायच तर तिच्या भाषत बोल तिच्या सस्कृत भाषत पाण्याला मरण नाही म्हणन पाण्याला जावन म्हणतात मी तिला जीवनाच्या महापुरात फेकल ! तो हसला

ती आज मेली नसती तर अुद्या गुप्त पोलिसाना माझा पत्ता देती आहेस कुठे ? '

'महाराज मा ह्याच्याअितक्या अुलट्या काळजाचा नसलो तरी पापशून्याना चटावलेला होतो त्यातही अलौकिक सत्कृत्याप्रमाणेच अलौकिक दुष्कृत्यातही लोकाच्या मनावर छाप पाडण्याचा अेक दुःशक्ति असतेच ती छाप पडून ह्याच्या भयकर दुष्कृत्यामुळे आमच्यावरील ह्याचा प्रभाव वाढत गला नि ह्याच्या योगानदपणाच्या ढगातही आमचा यथच्छ स्वार्थ साधत असल्याने आम्ही ह्याची साथ करीतच राहिला

नंतर आम्ही मथुरेला आलो. ह्यानं धनपुतळ्यासारख्या अेका जल्लादा प्रमाणेच ढोंग काढलं होतं नि भूतभविष्यवर्तमान त्या यांत्रिक यंत्रवळें हा अचूक सांगतो असा बोभाटा आम्ही सर्वत्र करीत चाललो होतो. कुठेही गेलो की आम्ही परस्थ, व्यापारी, वकील, डॉक्टर अशा निरनिराळ्या सोंगांनी पृथक्पणे गावात हिंडावं नि योगानंदजींनी अमुक चमत्कार आमच्या समक्ष केले, अमुक भविष्य अचूक सांगितलं अशा थापा गावात पृथक पृथक स्थळी स्वतंत्र ठोकण्यात मारू लागावं. कुणी मंडळी ह्याच्याकडे भूतभविष्य विचारायला येताहेत असं कळलं की आमच्यापैकी कोणी तरी अेकानं अेक परका श्रीमंत गृहस्थ म्हणून ह्याच्यापुढे बसून ह्याला काही तरी विचारावं नि ह्यानं काहीही अुत्तर दिलं की

अहो आश्चर्य ! कोण ही अद्भुत दैवी दृष्टि ! आपण म्हणता ते ततोतंत सत्य ठरलं ! अगदी बिनचूक ठरलं ! अशा ह्याची वाहवा करून वेळवेळे अेखादी मोठी रक्कम ह्याच्या देवस्थानाला देअून परत जावं. म्हणजे ज्याच्या समक्ष आम्ही हें ढोंग करू त्या मंडळातालं बहुतेक स्त्रीपुरुष विश्वासभोळेपणाच्या मानसिक सायीला हटवून बळी पडत. ज्या प्रकरणी योगानंदाची अुत्तरं खोटीच पडत ती तेवढीच सोडून जी योगायोगानं वा गोगयाने खरीं ठरत त्याचाच आम्ही जिकडे तिकडे पृथक्पणे गाजावाजा करीत हिंडावं. मथुरेतही हे आमचं ढोंग असंच भरभराटीत आलं असता डॉ. नायडू नावाच्या बाआी आमच्या नादी लागल्या. त्यांनी बोलता बोलता त्यांच्या घरोब्याच्या अेका नागपूरकडाल बाआीचा नि त्यांच्या अेकुलत्या अेक मुलाची हकीकत सांगितली नि त्यांना मथुरेला आणलं आहे असं त्या म्हणाल्या.

ती माहिती अैकताच हा योगानंद वेडा अेकान्तात नेअून मला म्हणाला, ‘ मी काळ्या पाण्यावर असताना माझ्या जोडीला सैन्यातून शिक्षा झालेला, अेक बंदिवान असे. दुसरं कुणाही माणूस माझ्या शेजारी ठेवण्यात येत नसल्या मुळे त्याचा माझा पुष्कळ स्नेह जमला. त्याच्या घरची सारी माहिती मला त्याने वेळोवेळी सांगितली. डॉ. नायडूबाआी नागपूरच्या ज्या बाआीला नि तिच्या मुलाला आणणार म्हणाल्या ती त्या बंदिवानाची आआी नि त्याची ती नवजवान बहीण असली पाहिजेत ! डॉ. नायडूबाआींनी सांगितलं ते ते नावगाववृत्त ततोतंत जुळत. तीच ही मुलगी आली माझ्या हातात आता मालू. मालू मालती ! ही रे ही मालतीच ! हाय रे मालती ! तिला मी दहादा गजेत घेतली आहे ! मालती ! मरो मालती !

अरे पण काळ्या पाण्यावर ना तू होतास ? मग तिला गजेला घेतलं म्हणतोस तें काय स्वप्नात ? तिच्या नुसत्या नावावरच अितका लंपट ? मी अुपहसू लागलो. तो म्हणाला

( हमन, हिंस्र पशूंना अुपाशी कोंड नि मांस देअूं नकोस मग अेक रक्ताळ हाडूक काय ते त्याच्यासमोर टाक नि बघ तो हिंस्र पशु ते हाडकच किती मिटक्या मारून चघळतो ते तसेच कामविकार मनाच्या पिंजऱ्यात जिथे वर्षानुवर्षे अुपाशी कोंडला जातो त्या काळ्या पाण्यावर स्त्रीचे जे नाव कानावर पडते ते नावच अितके मनात भरते की त्या स्त्रीची अेक मूर्ति होअून अुठते त्या काल्पनिक मूर्तीवरच मन लंपट होअून जाते वास्तवात नाही तर स्वप्नात तिच्याशी रमते हिंदु लोकांतील अुषेचे सुंदर आख्यान तू अैकले आहेस? स्वप्नातला प्रिय पुरुष तिला प्रत्यक्ष दिसणाऱ्या पुरुषापेक्षाही विव्हळविता झाला तसेच माझे झाले) वारंवार त्या तवढ्या अेकट्या जाड बंदिवानाशीच बोलणे भाग पडल्यामुळे नि त्या बोलण्यात अुपवर मुलीची अशी हिचीच गोष्ट वारंवार निघाल्यामुळे माझ्या अुपाशी कामेच्छेवर त्या कल्पनेची त्या नावाचा जो अेक छाप बसला तो आता दुसऱ्या कोणत्याही प्रत्यक्ष स्त्रीची बसत नाही नि काय गंमत पाहा त्या नावाच्या स्त्रीची ती कामातुर कल्पनाच आता प्रत्यक्षपणे भोगता येणार! बस्स तिला पळवावयाची!'

तिला पळवायचे ठरताच आम्ही नेहमीची युक्ति योजली भजन संपून जनसमूह परतताना जिथे मालती तिच्या आजीबरोबर दाटीत चालली होती तिथे आमच्यापैकीच दोघातिघांनी खोटी मारामारी मांडली त्यासरशी दाटीत दंगल अुडाली त्यात तिला आजीपासून वेगळी पाडली मग आमच्या ह्या योगानंद स्वामींच्या अेका शिष्याने साळसूदपणे घरी पोचवायसाठी म्हणून तिला जी हाती घेतली ती थेट गुलाम हुसेनच्या अड्ड्यावरच नेअून सोडली ती रात्र तिथे ह्या दुष्टाने मालतीच्याच शेजेवर काढली

दुसऱ्या दिवशी त्या अपहरणाचा काही अेक बोभाटा होअू नये म्हणून मालतीच्या आप्तेष्टांना आम्ही मायाममतेच्या जाळ्यात पकडून दूरवरच्या भलत्याच वाटेला लावून दिले ह्या दुष्टाला काळ्या पाण्यावर ह्या मालतीच्या भावाचे रंगरूपवृत्त सारे माहीत पडलेले होते ते ती माहिती अतदृष्टाची म्हणून ह्याने त्याला सांगितली तिच्या त्या आजीला देखील त्याच्या मस्तकावर झालेला जो

गडबडीत त्या बिचाऱ्या अुपवर मालतीला घेअून तो राक्षस गुलाम हुसेन कुठे
फरारी झाला त्याचा सुगावा मात्र अजून कुणालाच लागलेला नाही त्या अत्यंत
निष्पाप, निरपराध, असहाय कोमल कन्यकेची काय काय विटंबना त्याने केली
असेल, धिडवडे काढले असतील देव जाणे ! !'

न्यायगयत असताही त्या न्यायाधीशाचे ओठ रागाने अेकीकडे फुरफुरू लागले
तर दुसरीकडे डोळ्यातून करुणेची टिपे घळघळ गळू लागली ! श्रोत्यातही
अनेकांच्या डोळ्यातून पाणी आले

आणखी अेकाच्या डोळ्यातून दयेची टिपे सारखीं घळघळत होती, पण तो
न्यायाधीशही नव्हता, न्यायालयातील श्रोताही नव्हता, तर होता त्या दरोडेखोरा-
तील्च अेक आरोपी — तो पश्चात्तप्त किशन

तो दिसण्यात कुरूप, वाचेचा संयत, वयाने तरुण, मनाचा कोवळा, वर्तनाचा
वाणेदार भासत होता त्या साऱ्या खटल्यात तो मान खाली घालून बसलेला असे
तो आता त्याचे वक्तव्य [ Statement ] देण्यासाठी जेव्हा अुठला तेव्हा मान
ताठ वर करून, शांतपणे अनेक शब्द निवडून योजीत आणि त्याच्या डोळ्यात
मालतीच्या विटंबनेच्या वरील अुल्लेखासरशी आलेली आसवे पुशीत तो म्हणाला,

' मी काशीला वेदान्तविद्येचा अेक विद्यार्थी होतो माझ्या चित्तात विरक्ति
अुत्पन्न होअून कुणा तरी गुरूच्या सान्निध्यात भक्ति नि योग ह्याची काही साधना
घडावी असे आले मी पुढे मथुरेला आलो तिथे त्याच वेळी ह्या योगानंद गोसा-
व्याच्या भजनाचा नि अंतर्ज्ञानाचा मोठा गाजावाजा झाला होता त्याला भाळून
मी ह्याचा शिष्य झालो मला सारंगी चांगली येते भजनही येत ह्यासाठी भजनात
मी ह्याची साथ धरू लागलो अेक आठवडाही अुलटला नसेल तोच ह्या टोळक्या-
तील काही जण ' हा हिंदु नव्हे, ह्यासाठी ह्याला दूर ठेवावे ' असे काहीसे
कुजबुजत असल्याचे माझ्या कानावर आले ह्याच्या काही तरी गुप्त घालमेली
चाल्लेल्या आहेत अशीही शंका वाटली पण ह्या योगानंद म्हणवणाऱ्या मनुष्याकडे
मी त्या वेळी गुरुदेवाच्या भावनेने पाहात असल्यामुळे नि त्याचे कोणतेही वावडे
पाअूल मला न दिसल्यामुळे अितर शिष्याच्या अपराधाचा दोष ह्याच्या माथी मी
मारला नाही बोलावल्यावाचून ह्याच्या मठीत वा बैठकीत शिरलो नाही त्यापुढे
दोन-तीन दिवसानंतरच रात्री भजनानंतर लोक परतताना दंगल झाली, त्या
रात्री मला योगानंदाने बोलावून सांगितले की,

' मालती दंगलीत तिच्या आअीपासून ताटातुटली आहे तिला तिच्या विवा
नायडूबाअींच्या घरी सुरक्षित पोचवण नायडूबाअीबरोबर ती अिथे जेव्हा जेव्हा
आली तेव्हा तेव्हा तूच त्याच्याबरोबर त्याच्या घरी मी धाडी त्यामुळे तिचा
तुझ्यावर विश्वास असल्याचे ती म्हणते नि तू बरोबर असशील तर ती ह्याच
रात्री माझ्या मोटारहाकयासह माझ्या मोटारीतून परत जाअू अिच्छित तर तिला
घेअून जा.'

'मी तें आनंदानें मानलें. मालतीला मोटारींत घेऊन बसलों. सांत्वनाचे शब्द मी तिच्याशी बोलण्यांत थोडा गुतलों. तेवढ्यांत मोटार मथुरेच्या कुण्या अनोळखी भागांत घुसून कुण्या अनोळखी घराशीं उभी राहिली. मी विचारतां मोटारवाला म्हणाला,

'नायडूबाअींनीं अिथे अुतरायला सांगितलें आहे. त्या आंतच आहेत.'

'असें म्हणून मालतीला त्यानें त्या घरांत नेलें. लगेच बाहेर येऊन मला म्हणाला, 'परंतु या' अशा कुणाच्याही विश्वासघातकी आणि पाताळयंत्री कटाचा लवलेशाही परिचय वा शंका नसल्यामुळे मोटारींतून अुतरतांना मालती आंत बोलावीत असताही तिच्याबरोबर मी आंत न जातां मोटारवाल्याच्या शब्दासरशी लगोलग परतलों. पण मला त्यानंतर मठांत न बोलावतां दुसऱ्याच अेका देवळांत जें ठेवण्यांत आलें तें दुसऱ्या दिवशींच्या रात्रीं भजनाच्या वेळीं मात्र साथ धरायला काय तें त्या सभेंत आणण्यांत आलें. त्या सभेच्या शेवटीं ह्या टोळीतच मी असल्यानें मलाही धरण्यांत आलें. मी मालतीच्या विश्वासाला अपात्र नि साहाय्याला अक्षम ठरलों ह्याचा मला अत्यंत खेद वाटतो. जर माझा कांहीं अपराध असेल तर तो माझ्या मतानें हाच. न्यायाधीशाच्या मतानें कोणता ठरेल तो ठरो!'

आरोपींपैकीं सर्वांचीं वक्तव्यें, पोलिसांचा सव पुरावा, खटल्याचें सारें काम संपत आलें. पण रफिअुद्दिन अर्थात योगानंद स्वतःच्या बचावाचें म्हणून कांहीही बोललेला नव्हता, चेष्टा काय त्या करीत होता, हसत होता. ह्या साऱ्या आरोपींच्या वतीनें मिळून सरकारनें होअूनच एक वकील दिलेला होता, पण रफिअुद्दिन त्याची देखील मधून मधून टिंगल करण्यापुरताच काय तो त्याच्याशीं संबंध ठेवीत होता. त्याच्याविरुद्ध त्याच्या टोळीतील फुटलेल्या साक्षीदारांनीं त्याच्या क्रूर कृत्यांचा जो पाढा वाचला, त्या वेळीं तो त्यांच्यावर मुद्दा रागावलेला दिसत नव्हता. न्यायाधीशांची मात्र त्याची बरीच धसट झाल्यासारखी दिसे. ह्या पैशाचिक मनुष्याच्या अघटित मनाला अेखाद्या शास्त्रीय विषयाप्रमाणें खोल अभ्यासण्यासाठीं न्यायाधीश त्याच्याशीं खोदून खोदून बोलत, त्याला हसूं देत, बोलूं देत, निरखून पाहात. शेवटीं खटल्याचें काम संपायच्या आधीं पुन्हा अेकदा त्यांनीं रफिअुद्दिनला

घुमाकूळ उडवणाऱ्या कुणा तरी रफिउद्दिन अहमद नावाच्या अधमाधम, हत्यारी नि नृशंस अशा दरोडेखोराच्या तोंडासारखं माझं तोंड नि अंगलटीसारखीच माझी अंगलट दुर्दैवाने ततातंत केस न् केस घडलेली असावी नि त्यामुळेच ह्या साऱ्या सज्जनाला मीच तो पापी होय असं सात्त्विक संतापाच्या भरात प्रामाणिकपणाने वाटलं असावं!

'महाराज, माझ्या ह्या कथनाला भरभक्कम पुराव्याने मी सिद्ध करून देऊं इच्छितो. वास्तव तो मूळचा खराखरा पापी दरोडेखोर रफिउद्दिन अहमद सापडेतो तरी मला निर्दोषी म्हणून सोडून द्यावं. नाहीतर पोलिसांनी तरी त्याला पकडून आणावं की त्याला पाहताक्षणीच माझं म्हणणं किती अक्षर नि अक्षर खरं आहे हं आपल्या तत्काळ ध्यानात येईल. महाराज, आरोपीला स्वसंरक्षणार्थ अवश्य तो पुरावा पुरवायला शक्य ते साहाय्य देणं हे न्यायधीशाचं कर्तव्य आहे नि मला माझा जेव जो पुरावा देणं आहे तो देता येण्यासाठी जे साहाय्य मी मागतो तं देणं आपल्याला अगदी शक्य आहे. मला निर्दोषी म्हणून सोडून द्या की मी त्या खऱ्या रफिउद्दिन अहमदला धरून आणतो. नाही तर मी त्याचीच साक्ष काढतो आपण कोटाकडून त्याला धरून आणीतो मला जामिनावर सोडावं. असा हाच माझा बचाव—माझा Defence!' (पोलिसांकडे पाहून) क्या दस सोनारकी

'बरं तुझ्याविरुद्ध साक्ष देणारा हा हसनभाओी तुझ्या ओळखीचा आहे का ? ह्याची काय काय माहिती तुला आहे ?'

'ह्या मनुष्याला मी ओळखतो पण त्याच्या ह्या नावाला मात्र ओळखीत नाही. ते ह्या तुरुंगात आल्यानंतर काय ते मला अैकू येअू लागले. ह्याच्याविषयी माझी माहिती म्हणजे अितकीच की, हा 'रामलाल' असे आपले नाव सांगून माझा शिष्य बनला होता. ही अेक गोष्ट, नि दुसरी ही की, ह्याला भांग गांजा नि चरस ही तिन्ही बळकट व्यसनं आहेत. त्याच्या नशेत ह्याला नाही नाही ते आभास होतात. त्या नशेत सगळ्यांनाच तसे होतात, पण ह्याचा विशेष असा की, नशेत झालेल्या त्या आभासाचा ठसा ह्याच्या चित्तावर, भुताचा ठसा भ्यालेल्यावर पडतो तसा, अितका अुत्कटपणे पडतो की शुद्धीत आल्यावर देखील ह्याला ते आभास नसून घटनाच होत्या Facts च होत्या, असे ठामपणे वाटत रहाते. माझ्याविषयी त्याने घटना म्हणून ज्या सांगितल्या त्या त्याच्या गांजाच्या गुंगीतले नि भंगड नशेतले असेच आभास काय ते होत. तुरुंगातही ह्याला भांग, गांजा, चरस जर न मिळता तर पोलिसांना त्याला त्या गुंगीत सांगितलेल्या साऱ्या खोट्यानाट्या गोष्टी खऱ्याच वाटून त्याने हे साक्षीत सांगितलेले गप्पोडे पुराण केव्हाही सांगितले

कुणाची येत नसे मी लोकाना ठकवल नाही, अुलट जर कुणी कोणाला फसवल असेल तर मला भावड्याला ह्या लुच्च्या लोकानीच ठकवल असं आता वाटत कारण साधुशील शिष्य म्हणून माझ्याभोवती गोळा होअून ह्या लुच्चानी माझ्या नावाने मग न कळत गुरुबाजीच स्तोम माजवून किती जणाना लुटल, छळल, ठकवल त अेक देवच जाणे ! 'माझ ध्यानच तिकडे नव्हत '

'तो तुझा अतश्चक्षु आजही अुघडा आहे काय ? असल्यास माझ्याविषयी आत्ताच्या आत्ता अेक-दोन भविष्य तरी वर्तवून दाखवशील का ?'

'होय सरकार हा न्याय जसा माझ्या बाह्य चक्षूना सध्या दिसत आहे तसाच आपल्या भविष्यातील दोन गोष्टी तरी माझ्या अतश्चक्षूपुढे कालपासून अगदी स्पष्टपणे प्रकटल्या आहेत. सागणारच होतो मी ती भविष्य पण "

'पण जर ती दोन्ही भविष्य खोटी ठरतील तर ?'

'तर आपण मग तिसर भविष्य विचारू नये सपल !'

'बर, साग पाहू ती माझ्याविषयीची दोन भविष्य तरी ! गडबडगुंड्याच्या मोघम भाषेत नकोत हं अगदी स्पष्टपणे अर्थ लागेल अशा शब्दात हवीत साग '

'अगदी स्पष्टपणे सरळ अन्वय असलेल्या भाषेत महाराज, मी आपल्याला शुभ असलेल अेक भविष्य वतवतो की, आपला मृत्यु आपल्याच डोळ्यानी पाहण्याचा दु खद प्रसग आपणावर कधीही कोसळणार नाही ! दुसर तितकच बिनचूक पण मला अशुभ असणार भविष्य, हे की, ह्या खटल्याच्या निकालात आपण मला निर्दोषी ठरवून केव्हाही सोडणार नाही ! छाती असेल तर हें माझ भविष्य आपण खोट पाडून दाखवाव '

ह्या वेळचा त्या निगरगट्ट आरोपीचा तो लटक्या वीररसाचा आणि त्या छद्मी गालातल्या गालात हसण्याचा आविर्भाव पहाताना गाभीर्य सुटून खो खो हसल्याविना न्यायालयातही कोणालाच राहवले नाही चितेने, भयाने थरथरणारे आरोपी देखील हसले हसला नाही असा अेकच — तो किशन

हसण्याचा असा त्या खटल्यामधील त्या आरोपीना शेवटचाच प्रसग होता आता हसत केलेल्या भयकर पापाची फळे भोगण्याची वेळ जवळ आली होती

कारण न्यायाधीश न्यायीचे त्या दिवसाच काम सपवून लगेच अुठले आणि खटल्याचा अुरलेला विधि अुरकून 'चौथ्या दिवशी निर्णय सागण्यात येअील ' अस अुद्घोषिल गेले

# ७. गुलामहुसेनच्या तावडींत मालती

अवघ्या पृथ्वीतलावर जी खाल्डियन, ग्रीक, पारशी, यहुदी, ख्रिस्ती, मुसलमानी, प्रभृति धर्मक्षेत्रे आहेत, त्यात अत्यंत प्राचीन असताही अत्यंत आधुनिक कालापर्यंत आपले महत्त्व व आकर्षण अबाधित राखणाऱ्या आणि जसे द्वापारी तसेच आजही कोटि कोटि हिंदूंचे ज्ञानतीर्थ असलेल्या श्रीकाशी क्षेत्राच्या आसमंतातील अेका अुपवनातून अेकान्तपणे वहात जाणाऱ्या गंगेच्या काठाला अेक जुनाट घाट होता. सन्निध वस्ती अशी नव्हतीच. अेक ल्हानसे महादेवाचे ओसाड देअूळ आणि त्याच्यालगत काही वेलांची व साध्या ज्ञापयाची जुनाट झाडे अितकाच काय तो त्या स्थलाचा ठेवणींतला अलंकार होता.

अेखादी महाराणी राजसभेतील सामंत-नृपतींच्या, सेनापतींच्या प्रधानमंडळाच्या मानसन्मानांना राजकीय थाटाने दिवसभर स्वीकारीत स्वीकारीत थकून गेल्यावर संध्याकाळी आपल्या अंतःपुरात येते, केस मोकळे सोडते, अलंकार, वेष निराळा अुतरून ठेवते आणि अगदी साधे, घरगुती पातळ-पाल्हे तेवढे घालून अेकान्त अुद्यानात मनमोकळेपणे फुलझाडांच्यामधून फिरते तर फिरते, कोचावर पहुडते तर पहुडते, तशी भागीरथी काशी नगरातील जणिव घाटा घाटावर लाखो भक्तगणांच्या राजेमहाराजे, सैनिक, पुरोहित, पंड्यांच्या पूजापुरस्कारांना ठामडौलात स्वीकारीत स्वीकारीत आल्यानंतर आता ह्या संध्याकाळच्या वेळी त्या अेकान्त स्थळी मनमोकळेपणी लहरीलहरीने वाहात होती. समोर आकाशात संध्याकाळच्या सूर्याने लाल गुलाबी रंगारंगांनी काठोकाठ भरलेल्या पश्चिम क्षितिजाच्या हौदातून रंगच रंग

'पण देवा, न्यायी दया सुद्धां निःपक्षपातीच असली पाहिजे, नव्हे का ?' तो घुटमळला, 'मग–मग माझ्याहूनही अगदी निरपराध नि अनागस असलेल्या त्या कुमारीची दया आपणास अजून कशी आली नाही ? न्यायाधीशाने मला ह्या भयंकर खटल्यातून निर्दोष सोडलं असलं तथापि माझं मन मला अेका दोषाविषयी सारखं खात आहे. माझ्या हातानें न कळत का होईना, पण मी मालतीला तिच्या घरी पोंचवायचंच सोडून त्या भलत्याच पत्त्यावर–तो पत्ता तिच्या घराचा नव्हे हं माहीत असता–तिला नेऊन सोडलं, ती 'आंत मजबरोबर चल,' असं म्हणत असताही अजागळ विश्वासाने तिच्याबरोबर भलत्याच घरात गेलो नाही नि काही अशी तरी त्या दुष्ट नरपशूच्या–त्या गुलाम हुसेनच्या–हाती ती असहाय कुमारी सोपवून देण्याच्या दोषाचा मी वाटेकरी झालो (कळून झालो नाही, पण जें मला कळायला हवं होतं, जं कळवून घेणं हें त्या वेळी मी अंगीकारलेल्या कामगिरीत माझं कर्तव्य होतं, तें करायला मी चुकलो. हा माझा निष्काळजीपणा सुद्धां अेक दंडनीय अपराध आहे. नैर्बंधिक अपराध नसला तथापि नैतिक अपराध तरी आहेच आहे.

'माझ्या नसत्या अपराधाच्या आरोपातून माझ्या पहिल्या नवसाला पावून माझी सुटका करणाऱ्या देवा, माझा मलाच जो घडला असं वाटत आहे त्या ह्या असल्या अपराधाच्या दोषातूनही माझी सुटका कराल का ? ह्या माझ्या दुसऱ्या नवसालाही पावाल का ? अेक तर त्या बापड्या मालतीची त्या हिंस्र नरपशूच्या हातून सुटका करण्याची संधि नि सामर्थ्य मला द्याव. पण तें जवळ जवळ दुर्घटच. ती कुठे आहे हें देखील कुणाला ठाऊक नाही. त्यांत मी वित्तीं दुर्बळ, यःकश्चित्, त्या निर्ढावलेल्या पाप्याच्या सशस्त्र कपटाचारास सर्वथैव अपरिचित. तेव्हा तें संधि नि तें सामर्थ्य येणं मला दुर्घटच असलं, तर निदान देवा, तुझ्या न्यायी दयेनं

पाहण्यासाठी ? पण मग देवाचे सर्वज्ञत्व तें काय उरलं ? भक्त खरा की खोटा तें दुष्टांहातीं त्या भक्ताचे असह्य हाल हाल केल्यावाचून देवाला कळत नाही असे म्हणणे देवाच्या सर्वज्ञपणासच नव्हे तर परमदयाळूपणालाही बट्टा लावणेच नव्हे का ? दरोडेखोरांपासून गावाचे रक्षण करण्याचे सामर्थ्य अंगी असताही नि दरोडा पडणार हे माहीत असताही जो अधिकारी प्रथम दरोडेखोरांना गावातील निरपराधी लोकांना यथेच्छ लुटू देतो, हाणमार, जाळपोळ करू देतो नि मग त्यांच्या केविलवाण्या हाकांना नि नवसांना पावून त्यांच्या रक्तबंबाळ घावांवर फुकट औषध लावायची व्यवस्था करवितो, त्या अधिकाऱ्याचे ते दयाळूपण वाखाणण्याजोगेच म्हणायचे काय ? का.. '

अेकामागून अेक अुसळून येणाऱ्या ह्या शंकांच्या त्या अकस्मात् महापुरात तो तरुण अगदी गुदमरल्यासारखा झाला आणि त्याने त्याचा तो लोट मोठ्या नेटाने यळें बळें थोपवून त्यात बुडता बुडता आपलें चित्त त्यातून वाचवले

'पाखंड ! पाखंड ! ' असे मोठमोठ्याने स्वतःशीच म्हणत तो झपाझप येरझाऱ्या घालू लागला त्याचे चित्त थोडेसे स्थिरस्थावर झाल्यावर त्याने जणू त्या शंकाविचारांनी मळलेल्या चित्ताला अक्षरश प्रक्षाळण्यासाठीच गंगेच्या त्या पवित्र आणि शीतल जलाची आचमनें केली विचारांचा ओघ दुसरीकडे नेण्यासाठी सूर्य पश्चिम दिशेला खेळत असलेल्या रंगपंचमीच्या अुधळपट्टीची तो शोभा पाहत

तील भयाण अेकलकोंडीत, अंधकारात नि काय होथील ह्याच्या भयंकर चिंतेत चाचपडत होतो माझ्या पायातील त्या बेड्या तुटून निर्दोष सुटून, आज मी अिथे मोकळेपणी ह्या ताज्या मोकळ्या वायूला श्वासोच्छवासीत आहे पण मालती? अरेरे! ही गुलाबी पश्चिम जशी त्या अंधाराच्या पकडीत सापडताच काळवंडून गेली तशीच ती सुंदर किशोरी त्या हिंस्र राक्षसाच्या तावडीत आज काळवंडून गेलेली केस अस्ताव्यस्त विखुरलेली भीतीने जिचं सारं हसू ठार मारलं आहे नि म्हणूनच चिंतेची प्रेतकळा जिच्या तोंडावर पसरली आहे अशी कुठे तरी पडलेली असेल! काही तर्क सुद्धा करवत नाही ती त्यांनी पळवून कुठे नेली असेल ह्याचा!'

तो अुठून पाटावर अिकडून तिकड फेर्‍या घालू लागला त्याला प्रथम गेल्या कित्येक दिवसाच्या सवयीने भास झाला की पायात बेड्या आहेतच चालताना त्या आवरून धरण्यासाठी त्याचा हात कंबरेखाली चाचपडू लागला मग आपण सुटलो आहोंत बेड्या तुटल्या आहेत तुरुंगाच्या कोठडीत आपण नाही हें आठवून मनाशीच तो हसला दूरवर कोठे तरी पाहत मालती कोठे असेल ह्याचे वेलगाम तर्कवितर्क करीत तिच्याविषयीचे अनेक काल्पनिक प्रसंग जुळवीत काही हिंडत काही थांबत राहिला

तो किसन होता योगानंद अयान रफिअुद्दिन अहमद ह्याच्या दरोड्याच्या खटल्यात तो सापडण्याच्या आधी न्यायवेदान्तशास्त्र अभ्यासण्यासाठी तो काशीलाच जेव्हा राहत असे तेव्हा ह्याच महादेवाच्या देवालयात तो अेकान्तपणे येअून बसे त्या देवतेलाच तो आपले आराध्य दैवत मानी पुढे त्या योगानंदाच्या ढांगधत्तुऱ्याला बळी पडल्यानंतर जेव्हा तो त्याच्यासह पकडला गेला तेव्हा बंदिशाळेत त्यानं ह्याच देवतला आपली निर्दोष सुटका व्हावा म्हणून नवस केले होतें त्या खटल्याचा निकाल अलाहाबादच्या न्यायालयात चार-पाच दिवसापूर्वीच लागला होता रफिअुद्दिन अहमदला जन्मठेप काळं पाणी आणि त्याच्या साथीदारांपकी बहुतेकांना सात ते दहा वर्षांच काळे पाणी अशा कडक शिक्षा ठोठावण्यात आल्या सुटले असे दोघे—अेक हुसनभाअी क्षमेचा सरकारी साक्षीदार झाला म्हणून आणि हा किसन पूर्ण निर्दोषी म्हणून

तेथून सुटताच तो थेट काशीला आला आणि त्याच्या त्या आवडत्या अेकान्त देवळातच अुतरला त्याला घरदार कुटुंब असं काही अुरलेलं नव्हतच तो अगदी निर्धन म्हणून त्याला कोणी कधी फारसं विचारीत नसे तो काहीसा कुरूप म्हणून त्याला कधी कोणी भाळलेलं नव्हतं मथुरेला असता मालतीला आणताना वा पोचवताना तो अट्टल सोदा रफिअुद्दिन योगानंदाच्या वेषात वावरत होता तेव्हा त्यानं ह्या किसनलाच तिच्याबरोबर सोबतीला द्यायला जें चार पाच वेळा निवडलें ते किसनच्या दुसऱ्या कोणत्या सद्गुणासाठी नसून त्याच्या त्या थोडफार कुरूप-पणाच्या अवगुणासाठीच होतं त्या अर्थी तरी त्याच्या कुरूपपणाचा त्याच्यावर

होतें त्याच्या दाराशी आला. त्याच्या मागें मागें सुरक्षित अंतरावरून मार्ग काढीत येणारा किसन ह्या वेळावेतो त्या दगडी मंडप्यापाशी येअून गुलाम हुसेनला त्या घरांतील कोणी दार अुघडून सामोरें येतें कीं काय, तें डोळे ताणून, ताणून पाहू लागला. घरातून अुजेड हालतांना दिसतांच त्याच्या अेकदम मनात आलें की, आत कोणी तरी माणूस आहे. ती मालतीच नसेलना ? औत्सुक्याने त्याचें हृदय धडधडू लागलें. पण गुलाम हुसेनने घागर खाली ठेवून, कंबरेचें काही तरी सोडून त्या बंद दाराच्या वरच्या चौकटीच्या कडीपाशी हात नेताच किसनच्या ध्यानात आलें की दाराला बाहेरून कुलूप आहे. त्यावरून आत कोणी नाही असें आढळून त्याचा अेकदम हिरमोड झाला. मालती जरी काहीं हाताशी येअून पुन्हा नाहींशी व्हावी, अशीच त्याला तळमळ लागली. अितक्यात गुलाम हुसेनने कुलूप काढून दार सताड अुघडलें.आणि थोड्या दरडावणीच्या अवाजात तो गुरगुरला,

'रोशन, रोऽऽशन, बत्ती बाहेर लाव! क्या ? नहीं आती ? घसेटके ले आवू ?'

ते शब्द अैकताच किसनचें अंग थरारलें. आत कोणी तरी स्त्री आहे. ती फडक पहाऱ्यात कोंडलेली असली पाहिजे. बाहेर जायचें तर हा राक्षस तिला आत कोंडून, बाहेरून कुलूप लावूनच काय तें दूर जातो. ती ह्याचें सांगणें मनापासून मानीत नाही. हा तिला प्रसंगी फरपटत घसटून ओढीत आणण्याशिही कमी करीत नाही. अितकी विस्तृत माहिती त्या अेका चारशब्दी वाक्यासरशी किसनच्या कानावर पडली. त्याच्या अपेक्षेला ती अितकी तंतोतंत जुळली की, ती ओठातल्या ओठात

'आव ! तू हम या रो पर मैं अभी तेरे साथ प्रेमकी मजा लुटुंगाही'
देख तो देख तेरा वह सुंदर मुंह ! नहीं अुठाती मुंह अूपर ? तो अैसा मैं जबरन
अुसे अूपर अुठावूंगा और मेरे आंखे भरभरके तेरी खुबसूरतीकी शराब पी लूंगा !'

असे लाडात येअून बोलत त्याने त्या रमणीचे वदनमंडळ बळे बळे वर
अुचलून दोन्ही हातानी त्या दिव्याच्या अुजेडात धरले डोळे भरभरून तिच्या सुंदर-
तेचे मद्य ता पिअू लागला, झिंगू लागला आणि त्या मुखाचे मटामट मुके घेत
म्हणाला,

'वाह् वाह् ! अिस अंधेरी रातमे नया चांद ! अै रोशन, क्या बोल्ती थी
तुम्हे तेरी मा ? माल्ती ? अै माल्ती ! मेरी जान !'

त्या अंधाऱ्या रात्रीत अेखादा नवा चंद्र अुगवावा तसाच ते माल्तीचे मुखमंडल
गुलाम हुसनला सुंदर भासले ते पाहताच ती अंधारी रात्र किशनला अधिकच
काळोखी भासू लागली त्या दिव्याच्या प्रकाशात अुचलून धरलेले ते तिचे मुखमंडळ
स्पष्टपणे दिसताच, ती मालतीच आहे हे किशनला निःशंकपणे कळून चुकले आणि
ज्या माल्तीला अेखाद्या सोन्याच्या ताटात गंफून ठेवलेल्या पूजेच्या शुभ्र आणि
पवित्र पुष्पमाळेसारखी त्याने मथुरेला पाहिली होती, तिलाच त्या आगळ आणि
आडदांड हरामखोराच्या मांडीवर, घाण चिखलात पडलेल्या निर्माल्याप्रमाणे तशा
किळसवाण्या दुर्दशेत पाहताच त्याच्या डोळ्यापुढे अेकदम अंधेरी आली

'माल्ती, तुम मेरी बोली समझती नही ? अच्छा ? मैं तेरे तूटेफूटे, मराठीमे
बोल्तो सुन ! तू अैसी दुखम का ? तुझी मा तुला आठवते ? अिस लिये तू अब-
तक दांडगाअी करते, असी रडते, मला झिडकारते ? राज तो मेरे बिछोनेमे तेरेको
लेताही है ! फेर बळसे हम तुझ्यापासून जे छिनावून घेतोच है त सुख तू हमन
हसते हसत क्या देत नहीं मुझे ? तुझी आअी भी तुझ्यापास आणून ठेवू ? बोल
तुझ्या आअीला मी पळवून आणतो देख, फेर तो सुखाने हसत सोयगी का माझ्या
बिछान्यावर ? तुझ्या आअी '

"मेल्या ! माझ्या आअीचं नाव तरी पुन्हा काढू नकोस ह्या तुझ्या हलकट
तोंडातून ! आग लागो तुझ्या तोंडाला !' संतापाने त्याच्या हातानी वर
अुचलेले आणि आता रागाने रडकुंडीला आलेलें तोंड तिने अेका हिसक्यासरशी
सोडवीत मालती जो डोके खाडकन् फिरवायला गेली तो तिच्या डोक्याचा तडाखा
गुलाम हुसेनच्या हनुवटीला बसून त्याच्या दाताच्या कवळ्या अेकमेकावर अशा
कचकल्या का त्याच्या डोक्यात झणझणून कळच अुठली त्यान संतापाने माल्तीच्या
गालात ताडदिशी अेक चपराक हाणली आणि तिला जी ढकलून दिली तो ती
भुअीवर धाडकन पडली

"'राक्षस ! घोट घेतो ह्याच्या नरडीचा !' असं पुटपुटत दयेच्या आणि
त्वेषाच्या ल्हरात किशन अेकदम गडग्यावर चढ लागला 'तुझा प्राण तरी घेतो

अेक अुपकारच झाला होता खरा. कारण त्याच्या कुरूपपणामुळेच मालतीशी त्याचा परिचय झाला आणि त्या परिचयात त्याच्याशी दयाळू प्रेमळपणाने असे बोलणारे आणि बरा म्हणणारे पहिले माणूस त्याला भेटले. मालतीने आणि तिच्या आईने किशनच्या सुशील स्वभावाला किती तरी वाखाणावे! त्या दोन चारदां घडलेल्या सहवासात किशनला वाटे, ह्या दोघींचा आपल्यावर खरोखरच दयालोभ आहे. कारण त्याची, त्याच्या जन्मात त्या वेळपर्यंत कोणी मुळीच विचारपूस केली नव्हती, त्यामुळेच मालतीने आणि तिच्या आईने त्याच्याशी बोलावे ते दोन साधे गोड शब्दही त्याला विशेष ममतेचे द्योतक वाटत असत. त्याचा मात्र त्या दोघींवर लोभ जडला होता खराच आणि त्याच्या जन्मात जडलेल्या त्या पहिल्याच लोभालाही त्याला जेव्हा असे अंतरावे लागले आणि त्याच्याच चुकीमुळे त्याच्यावर दयालोभ करणाऱ्या त्याच व्यक्तींवर असे भयंकर संकट गुदरून त्यांचा सत्यानाश झाला, तेव्हा ते शल्य त्याच्या मनात सारखे सलू लागले. अगदी सहजा-सहजी मालती जी त्याला हाक मारी तशी गोड हाक त्याच्या जन्मात त्याला कोणी मारली नव्हती.

'मालती, पुन्हा अेकदा तशी गोड हाक दे ना मला! किशऽन!' त्याने मालतीसारखी गोड हाक आपली आपणच मारून पाहिली. पुन्हा थोड्या विसंगत विचारांच्या प्रवाहात देवळात आला, तेथेही येरझारा घालीत राहिला आणि शेवटी स्वतःशीच मोठ्याने म्हणाला,

'छट्! मोठमोठ्या पोलिसांना त्या नीच गुलाम हुसेनचा ठावठिकाणा मिळेना तिथे तो मला कसला मिळणार? नि मिळाला तरी मी असहाय पामर त्या चांडाळ-चौकडीच्या हातून तिची सुटका ती काय करणार? अशक्य अशक्य! ते शक्य असेल तर तू देवा, तुला अेकट्यालाच काय ते! सोडीव ना मालतीला! भेटीव ना तिला मला! तुझी अिच्छा मला पामराला काय कळणार? मी ती विचारीतच नाही! पण माझी अिच्छा मला कळते, सांगितल्यावाचून मला राहवत नाही!

कोण वर घागर भरून पाणी न्यायला अितक्या किररं सध्याकाळी गंगेवर आल आहे? अिथे माणसाची ये जा अशी फार थोडी! हा पाणवठा असा नाहीच! अशा वेळा पाण्याची घागर भरून नेणार माणूस म्हणजे त जवळपासच कुठे तरी अुतरलेल असल पाहिजे! असेल बिचारा पायस्थ कुणी तरी!

असे मनात म्हणत किशन त्या घागर भरून अुठणाऱ्या माणसाच्या पुसट आकृतीकडे साहजिकच पाहत राहिला पण घागर खाद्यावर घेअून, शीळ घालात तो माणूस पत्रीवडच्या आल्या वाटने न जाता देवळाजगतच्या वाटेने जा जा जवळ येअू लागला ता ता किशनहा मनात अधिकाधिक चमकत चालला निरखून पाहू लागला वेळाच्या आड आड लपत गेला आणि करमणूक म्हणून ताडाने शीळ घालीत खाद्यावर घागर घेअून जाणारा तो मनुष्य देवळाजवळून पायवाट चालत आपल्या नादात थोडा पुढे जाताच किशन सतापाच्या भयाच्या आणि काहीशा आनदाच्या भरात पुटपुटला

'हाच! अगदी निश्चित! हाच तो गुलाम हुसेन! खटल्यात हसनभाअीने सांगितलेली कहाणी जर खरी असेल तर मालतीला पळवायच काम ह्यानेच केल! पण ह्याने तो बलुचिस्थानसारख्या दूरच्या प्राती धाडली? की विकली? की स्वत पाशीच ठेवली? हा अिथे कुठ? चोरट्यासारखा लपून राहतो आहे ह्या ओसाड बाजूस बहुधा! पण जर ती त्याच्यापाशीच असेल तर! दिसेल का मला! अेकदा तरी मालती दिसल का पुन्हा अरे, पण ह्या काळ्या अधारात! थावतो काय मी मूर्खासारखा तिथे? काय भ्याड आहे हे मन! म्हणे आपल्या हातात काही नाही नि हा तर अट्टल नराधम शस्त्रही असणारच! (अतिविचारीपणा हा कधी कधी नामर्दपणा होतो तो असा!) जायचच ह्याच्यामागे! न जाणो मालतीही त्याने अिथेच कुठे तरी दडवलेली असली तर? काय योग! जीव घेअीन, मात्र

होते त्याच्या दाराशी आला. त्याच्या मागे मागे सुरक्षित अंतरावरून मार्ग काढीत येणारा किशन ह्या वेळपावेतो त्या दगडी गडग्यापाशी येऊन गुलाम हुसेनला त्या घरातील कोणी दार अुघडून सामोरें येते कीं काय, तें डोळे ताणून ताणून पाहू लागला. घरातून अुजेड हालतोसा दिसताच त्याच्या अेकदम मनात आले की, आत कोणी तरी माणूस आहे. ती मालतीच नसेलना ? औत्सुक्याने त्याचे हृदय धडधडू लागले पण गुलाम हुसेनने घागर खाली ठेवून, कंबरेचे काही तरी सोडून त्या बंद दाराच्या वरच्या चौकटीच्या कडीपाशी हात नेताच किशनच्या ध्यानात आले की दाराला बाहेरून कुलूप आहे. त्यावरून आत कोणी नाही असे आढळून त्याचा अेकदम हिरमोड झाला. मालती जशी काही हाताशी येऊन पुन्हा नाहीशी व्हावी, अशीच त्याला तळमळ लागली. अितक्यात गुलाम हुसेनने कुलूप काढून दार सताड अुघडले आणि थोड्या दरडावणीच्या आवाजात तो गुरगुरला,

'आव ! तू हम या रो पर मैं. अभी तेरे साथ प्रेमकी मजा लुटुंगाही! देख तो देख तेरा वह सुंदर मुंह ! नही अुठाती मुंह अूपर ? तो अैसा मैं जबरन अुसे अुपर अुठावूंगा और मेरे आंखे भरभरके तेरी खुबसूरतीकी शराब पी लूंगा !'

असे लाडात येअून बोलत त्याने त्या रमणीचे वदनमंडळ बळें बळें वर अुचलून दोन्ही हातानी त्या दिव्याच्या अुजेडात धरले. डोळे भरभरून तिच्या सुंदरतेचे मद्य तो पिअू लागला, झिंगू लागला आणि त्या मुखाचे मटामट मुके घेत म्हणाला,

'वाह वाह ! अिस अंधेरी रातमे नया चांद ! अे रोशन, क्या बोलती थी तुझे तेरी मा ? मालती ? अे मालती ! मेरी जान !'

त्या अंधाऱ्या रात्रींत अेखादा नवा चंद्र अुगवावा तसेच ते मालतीचे मुखमंडल गुलाम हुसेनला सुंदर भासले. ते पाहताच ती अंधारी रात्र किशनला अधिकच काळोखी भासू लागली. त्या दिव्याच्या प्रकाशात अुचलून धरलेले ते तिचे मुखमंडळ स्पष्टपणे दिसताच, ती मालतीच आहे हें किशनला निःशंकपणे कळून चुकले आणि ज्या मालतीला अेखाद्या सोन्याच्या ताटात गफून ठेवलेल्या पूजेच्या शुभ्र आणि पवित्र फुलमाळेंमारखी त्याने मथुरेला पाहिली होती, तिलाच त्या ओंगळ आणि आडदांड हलकटाच्या मांडीवर, घाण चिखलात पडलेल्या निर्माल्याप्रमाणे तशा किळसवाण्या दुर्दशेत पाहताच त्याच्या डोळ्यापुढे अेकदम अंधेरी आली.

'मालती, तुझ मेरी बोली समझती नही ? अच्छा ? मैं तेरे तूटेफूटे मराठीमे बोलतो सुन ! तू अैसी दुखमे का ? तुझी मा तुला आठवते ? अिस लिये तू अब-तक दांडगाअी करते, असो रडते, मला झिडकारते ? रोज तो मेरे बिछोनेमे तेरेको लेताही हूं ! फेर बळसे हम तुझ्यापासून जे छिनावून घेतोच है ते सुख तू हमने हसते हसते क्यों देत नहीं मुझे ? तुझी आअी भी तुझ्यापास आणून ठेवू ? बोल. तुझ्या आअीला मी पळवून आणतो देख, फेर तो सुखमे हसत सोयेगी ना माझ्या बिछान्यावर ? तुझ्या आअी ...'

'मेल्या ! माझ्या आअीचं नाव तरी पुन्हा काढू नकोस ह्या तुझ्या हलकट तोंडातून ! आग लागो तुझ्या तोंडाला !' संतापाने त्याच्या हातानी वर अुचललेले आणि आता रागाने रडकुंडीला आलेले तोंड तिने अेका हिमक्यासरशी सोडवीत मालती जो डोके खाडकन् फिरवायला गेली तो तिच्या डोक्याचा तडाखा गुलाम हुसेनच्या हनुवटीला बसून त्याच्या दाताच्या कवळ्या अेकमेकावर अशा नेचवल्या की त्याच्या डोक्यात झणझणून कळच अुठली. त्याने संतापाने मालतीच्या गालात ताड्दिशी अेक चपराक हाणली आणि तिला जी ढकलून दिली ती ती भुअीवर धाडकन् पडली

'राक्षस ! घोट घेतो ह्याच्या नरडीचा !' असे पुटपुटत दयेच्या आणि त्वेषाच्या लहरीत किशन अेकदम गड्यावर चढू लागला 'तुझा प्राण तरी घेतो.

नाही तर माझा तरी देतो !' अशा ऊर्मीसरशी तो जो गड्ड्यावर एक पाय रोवतो तों तो पाय, खालचा दगड निसटून दगडाच्या एका खोलगट भेगेत अडकला. त्यासरशी त्याच्या आवेशाची ऊर्मीही अडखळली. पाय सोडवीतो दुसरा विचार लगोलग त्याच्या मनाला म्हणाला, 'तुझ्या प्रतिज्ञेपैकी गुलाम हुसेनचा प्राण तरी घेतो, हा विकल्पापेक्षा, नाही तर माझा प्राण तरी देतो, हाच विकल्प काय तो अशा सामन्यात सफळण्याचा अधिक संभव ! हा अधम हुसेन सशस्त्र असणारच ! मी निःशस्त्र ! ह्या झटापटीत माझा घाव मालतीवर उलटून मालतीला हा ठार करणार नाही कशावरून ? पुन्हा ह्या घरात त्याचा आणखी एखादा साथीदार नसेल असेही नाही ! अशा निर्लज्ज अधमाचा शृंगार अनेकदा समाईक सुद्धा असतो, हे त्याचा साथीदार जो हसनभाई त्यानेच त्या खटल्यात शपथेवर सांगितले आहे ! छट्, आताच असे साहस करणे म्हणजे मालतीला संकटातून सोडवावयाची ही चालून आलेली अद्भुत योगायोगाची सुवर्णसंधि गमावणे होय !' वरचा पाय दगडाच्या पकडीतून सोडवीतो विसावला अंधारात आपण पुन्हा कधी अलक्षितपणे लपतो, असा घाईघाईचा होऊन गेला तो पुन्हा गड्ड्याआड दबून आपली काय होत ते एकीकडे पाहत होता आणि दुसरीकडे त्याच्या मनात 'आता मी करू तरी काय' ह्याविषयीच्या उलटसुलट पळत्या विचारांची तुमळी संदेहात्मक

गुलाम हुसेनने तिला स्वत: खाली बसून, पुन्हा वळें वळें उठवली आणि जवळ घेऊन तिला तो कुरवाळू लागला,

' प्यारे मालती, कुलपात दिवसभर कोंडून ठेवतो असलिये तू गुस्सा करती पण पोलिसांना तुझा पत्ताच लागू नये, तुला धरून नेली तर तुमकोंही वे पोलिस हाणमार करेंगे ! दुसऱ्या कुणा तरी दुष्टाच्या पिंजऱ्यात हें पाखरू पडेल ! तुझे हे नखऱ्याचे पंख उपटून टाकतील बरं का माझे मोहक मैने, ते चांडाळ ! हे लाड, नखरे, मी म्हणून तुला चालू देतो बरं ! तुझी कुण्या लांडग्याने दुर्दशा करू नये, म्हणून तुला ह्या मेंढवाड्यात असं कोंडून ठेवाव लागतं बर कुलूप घालून, माझ्या लाडक्या कोकरा ! पण आता दोन-चार दिवसातच मी तुला अेकदम अितक्या दूर नि अशा अेका वनात घेऊन जातो की, तिथे अिकडच्या पोलिसांचा बाप देखील आपला छडा लावू शकणार नाही ! तो हरामी रफिअुद्दिन तर पडलाच त्या काळ्या पाण्याच्या नरकात जन्मभर. जन्मठेप ! तो सारा खटला निकालात निघाला ! आता आपला विसर पोलिसांनाही आपोआपच पडेल. त्यातही अशी जागा आता मला ह्या रम्य वनात सापडली आहे की, जिथे अुघडपणे तुला मन- मोकळं नांदता येअील ! हे दरोड्यात कमावलेले रत्नांचे दोन हार, हें सोनं नि ही तू माझी सोनी ! बस्स, भोगच भोग ! विलासच विलास ! जन्माला पुरून अुरतील माझ्या तुम्ही सारे ! आजवर कमाअी, आता रमाअी ! मिळकतीचा भोग! प्यारी, हसो ना ! हस, हस !' तो तिला गुदगुल्या करू लागला.

त्या गुदगुल्या मालतीला अस्वलाच्या प्राणघेत्या गुदगुल्यासारख्या लागल्या. ती हसली काकाबीस होअून, पण त्या गुदगुल्यांनी किशनला मात्र खऱ्या गुदगुल्या झाल्या आणि तो हसला अत्यंत सतोषानें. गुलाम हुसेनच्या तोंडून पोलिसचें नांव निघताच त्याला अेकदम गुरुमंत्र मिळाल्यासारखें झालें. अंधारात हातचमक [हँड बॅटरी] अचानक सापडावी तसे होअून तिचें त्याच्या चित्तातील बटन दाबताच, त्याला पुढच्या अुपायाची वाट लखकन् दिसली.

बस्स् ! परस्परे नि पावणे बारा ! आताच्या आता पोलिसचौकीवर जाअून गुप्तपणे ही बातमी सांगायची ! अठरा वर्षांच्या आतील कुमारिका पळवणे हा गुलामहुसेनचा एक नवं दंधिक घोर अपराध, मालतीचा नव्हे ! त्यात गुलाम हुसेनवर दरोड्यांचीं वॉरंटेंही असणारच ! खटल्यातला तो अेक फरारी. तेव्हा तो आता फाशीवर झोके घेणार आणि मालती पुन्हा त्या तिच्या मथुरेतील आनंदाच्या झोपाळ्यावर ! तशीच त्या गोड गोड ओव्यांच्या लकेऱ्या घेत अुल्हासाच्या आकाशात कोण्या सुंदर पाखरासारखी अुडू पाहात पुन्हा झोके घेणार ! अहो आनंद ! तिची ती प्यारी ' किशऽऽन !' ही लाडिक हाक त्याला पुन्हा अैकू आली.

आनंदाच्या भरात ती बातमी पोलिसांना देण्यासाठी किशन लपत छपत

चाहूल लागू न देता गडग्याच्या आड आड होत वाटेकडे जाण्यासाठी वळला, तोच त्याने अवस्मात् अेक भयंकर किंकाळी फोडली 'अय्यायाया !' असे तो विव्हळला

'भा ! भो ! गुरं गुर्रर ! ' करीत किशनच्या पोटरीचा गोळा दातात धरून अेक विक्राळ कुत्रा तिला सारखा हिसडीत तोडू लागला

तो त्या घेरापानी पाठलेला गुलाम हुसेनचा शिकारी कुत्रा होता

गडग्यापाशी आत कोठेसा फिरत असता चाहूल लागून तो अंधारात गड-ग्यावर चढला होता आणि किशन हालताच त्याची दृष्टि किशनवर आणि त्याच्या चोरट्या चालीवर पडून त्या विक्राळ कुत्र्याने अेका झेपसरशी किशनाच्या पोटरीचा घडकडून चावा घेतला. अंधारात नकळत घेतलेल्या त्या असह्य चाव्यासरशी हेतु नसताही किशन जितक्या मोठ्याने किंकाळला तरी तो. कुत्रा पोटरी सोडीना. अुलट अधिकच वेगाने तो मारखी तोडीत, गुरगुरत, झुजत राहिला.

कोणी तरी गडग्यापाशी अशी मोठी किंकाळी फोडलेली अैकून तो कामातुर गुलाम हुसेनही चमकला. होय ना होय, ह्या आपल्या माहबुदळ कुत्र्यानेच कोणा वाटसरूला अंधारात लोळवले असले पाहिजे, असे ध्यानात येताच, आपल्या ह्या चोरट्या वसतीपाशी कोणाचाही गोगाट होअून तिकडे लोकांचे लक्ष वेधावे हे सवट त्याला नको असल्यामुळे ते प्रकरण झटपट सामोपचाराने विझवून टाकण्या-साठी कंदील तेवढा घेअून आणि मालतीला 'घरात जा' म्हणून सांगून गुलाम हुसेन धावत धावत गडग्यापाशी आला, तावर किशनने गडग्यातला अेक दगड काढून त्या विक्राळ कुत्र्याच्या डोक्यावर घातल्यामुळे पोटरी सोडून विव्हळत तो थोडा हटला, पण पुन्हा थोडी चाल करून भुंकत, गुरगुरत, किशनचा दुसरा चावा घेण्यासासाठी झुजत राहिला

किशनच्या फाडलेल्या पोटरीतून रक्ताची धार वाहात होती, असह्य वेदना होत होत्या, हलण्याची सोयच अुरली नव्हती गुलाम हुसेन जवळ येताच किशनने वतावणी केली,

आणून ठेवले पाण्याने त्याचा घाव धुऊन पुसून, त्याच्या नेहमीच्या रामबाण औषधी त्या घावात भरून रक्त थांबवले, पट्टी बांधली, किशनला त्या ओडक्यावर लोडासारखें टेकवले आणि कंदिल वर त्या आकड्याला टांगला

कंदील खाली होता तोवर त्या औषधपाण्याच्या गडबडीत गुलाम हुसेनचे, कोणच्याही कपटाची शंका न आलेले लक्ष त्या पायस्थाच्या घायाकडेच बहुतेक होते त्यातही त्याने मागे किशनला मथुरेला जे पाहिले होतें, तें योगानंदी संप्रदायाच्या गोसावी वेषात आज किशनचा वेष कोणा दरिद्री भटक्यासारखा होता, त्यामुळे तर त्याची ओळख पटणें गुलाम हुसेनला कठीणच झाले होते. कंदील वर टांगल्यानंतर ओडक्याशी टेकून, थकून, गप्प असलेल्या किशनच्या तोंडावर स्वच्छ प्रकाश पडला

अितका वेळ घरात असली तरी खिडकीतून त्या पायस्थाच्या सा या हाल चाली पाहात असलेल्या मालतीच्या मनात तो पायस्थ कोण, ह्याविषयी दहादा अेक शंका येऊन गेली होतीच त्या कंदिलाच्या प्रकाशात किशनचे तोंड आता नीट न्याहाळता येताच मालतीची जी शंका होती तो पक्का निश्चय झाला. ' किशन !' मालतीच्या ओठातल्या ओठात अेक हाक सुद्धा थरथरून गेली त्याला मथुरेला पाहिल्यानंतर त्याचे काय झाले तें तिला काहीच माहीत नव्हतं आपल्या आअीची पुढची बातमी ह्याला असली पाहिजे, हा विचार तिच्या मनात, त्याला नक्की ओळखताच पहिल्या झटक्यासरशी आला पण परपुरुषाशी आणि त्यातही योगानंद-गुलाम हुसेनादि ज्या चांडाळचौकडीने तिला पळविले त्याच्या त्या अधम अपराधाची माहिती ज्याला असण्याचा अुत्कट संभव, अशा ह्या तिच्या घरोब्याच्या पुरुषाशी अुघड बोलताच त्यापायी तिचाच नव्हे तर त्या किशनचाही घातपात करायला हा हिंस्र गुलाम हुसेन सोडणार नाही, अशी भीतिही मालतीला तत्काळ पडली. ती घाबरली, बावरली. पण लगेच अुत्सुकतेपायी अुघड नसली तरी किशनची अेकान्त गाठ हा राक्षस गुलाम हुसेन निजला म्हणजे-तरी घेअीनच घेअीन, मग काय वाटेल तं होवो, असा तिचा कृतनिश्चय बोलता बोलता झाला. ती डोळ्यातून टिपे गाळीत किशनकडे टकमक पाहात राहिली तोंच, त्या खिडकी-कडे रागाने ताठरलेल्या गुलाम हुसेनची दृष्टि पडताच मालती झटकन् मागे सरली

कारण त्या कंदिलाचा प्रकाश, थकव्याने डोळे मिटून ओंडक्यावर टेकलेल्या किशनच्या निश्चल तोंडावर पडताच मालतीला जी शंका आली तीच गुलाम हुसेनला आली होती त्यातही खिडकीतून अत्यंत लोभाळू दृष्टीने किशनकडे टक-मक बघणाऱ्या मालतीला त्याने पाहताच त्याची शंका शतपट बळावली. तीच पक्का निर्णय करण्याची युक्ति पण त्याला लगोलग सुचली बेसावध, गुंगीत पडलेल्या त्या घायाळाला गुलाम हुसेनने हेतुत च त्या संशयित नावाने हाक मारली,

'किशन, किशन !'

किशन दचकून जागला आणि आपल्या नावाची ओळख, पटवायची नाही हे ध्यानात येण्याच्या आधीच उत्तरला,

'ओ ! ओ !'

'अरे हरामखोरा ! पकडला का नाही तुला? दुसरी वेषाने नाव चोरून जिथे टेहळणी करायला आला होतास काय ? किशन, बोल !' मूठ वळवून क्रोधाने कापणाऱ्या घोगऱ्या आवाजात गुलाम हुसेन फणफणला, 'बोल, तू मालतीचा माग काढीत अिथे आलास की नाही ? तू नि तो पाजी हसनभाअी तुम्हीच विश्वासघातकी सरकारी साक्षीदार नाही का कोर्टातले ? माझ्या गळ्याला तात देअू पाहता काय ? काफरा बेअिमान !'

'तुझा बाप बेअिमान ! तुझ्याशी अिमान ?' किशन त्वेषासरशी अुठून अुभा राहिला

'सुरा भोसकून तुझं पोटारं अुपसलंच समज मी ! माझा सुरा ! सुरा ! ' ओंडक्यावर गुलाम हुसेनने पाहिलं सुरा नव्हता तेथे तो घरात खाटेवर अुगारती आह असे त्याला आठवले

आत दाराशी अुभ्या असलेल्या मालतीलाही तेच तत्काळ आठवल तिने झटपट खाटवरचा सुरा काढून, अंगावरच्या कपड्यात तो आपल्या कंबरेला लपवून ती अेका कोपऱ्यात जाअून अुभी राहिली ह्याच सुऱ्यान भोसकून मालतीच्या समक्ष गुलाम हुसेनने त्याच्या अेका बिघडलेल्या साक्षीदाराला मथुरेहून पळून येताना अेका रानात डोळ्याचं पातं लवते न लवते तो भोसकून ठार मारलं होतं. तसाच आता किशन मरणार, म्हणून ती भयाने थरकापत होती, रागाने बेछूट

मालतीलाही त्या जिवावरच्या संकटात विचार असा अुरलाच नव्हता, भान सें नव्हतेंच. जी अूर्मि अुठे ती अुठे. किशनच्या नरडयाला गुलाम आणि गुलाच्या नरडयाला किशन पकडीत, सोडवीत, ते दोघेही खाटेवर पडतात,

'आण, आण ! ' गुलाम हुसेन ओरडला, 'मालती तो सुरा आण, ' त्यारशी मालती सुरा अुपसून धावलीही. पण अेवढयाशा सुऱ्याने धिप्पाड माणूस रेल तरी कसें, अशा बेभान अवस्थेतही अेका बळकट शंकेने ती थांबली.

'कसं म्हणजे काय ?- भ्याड पोरी, तुझ्या समक्ष त्या सायीदाराचं पोतडं ह्याच त्याने गुलामहुसेनने अेका भोसकीसरशी बाहेर अुपसलं, नाही का ? ' तिचेंच मन तला फटकारते झालें.

'आण, सुरा आण ! ' गुलाम हुसेन अेक हात लगदालगदीतून पडल्या पडल्या ोडवीत आणि अुंच करीत, मालतीवर पुन्हा ओरडला.

'घे, हा घे सुरा ! ' असें दात-ओठ खाअून किंचाळत ती पिसाळलेली ालती सुरा अुपसून धावली आणि तिने किशनला दाबून धरणाऱ्या पण किशनच्या कडीत खाटेच्या कोपऱ्यांवर अुताणा होअून पडलेल्या गुलाम हुसेनच्या अधळपधळ ोटात तो लांब तीक्ष्ण सुरा भरसक बळाने खुपसला.

किती सहज तो आत गेला. त्या बेभान त्वेषातही मालतीला हसू आलें.

'अुगीच मी अितक्या बळाने खुपसला तो खुळ्यासारखा ! अर्ध्या बळानेही तो आरपार जाता ! '

'आं ! आं ! ' अशा दोन-तीन भयंकर डुरकाळ्या फोडीत गुलाम हुसेनचा धिप्पाड देह धप्पदिशी खाली पडला, तो पुन्हा काही अुठला नाही. आपल्याच घो घो अुसळणाऱ्या रक्ताच्या डबक्यात त्याचा प्राण बुडून गेला.

'मेला ! ठार मेला ! ' किशनने टाळी पिटली.

'किशन, पण आता पुढे काय ? ' किशनच्या डोळ्यांकडे टक लावून मालती

## ८. किशन व मालती यांना अटक

'पुढे काय?' ह्या मालतीच्या प्रश्नाचे काहीही अुत्तर क्षणभर न सुचल्यामुळे किंवा तसे पाहता पाच-पन्नास अुत्तरे अेकदम सुचून त्यांच्या अुलटसुलट आणि अेकमेकांना लोटून मारणाऱ्या गोंधळात शेवटचे सर्वांत अेसे कोणतेच मत चित्तात टिकत नसल्यामुळे किशनही गुमता ' पुढे ऽ ऽ पुढे ' असे पुटपुटत मालतीच्या मुद्रेकडे शून्यपणाने पाहत अुभा राहिलेला, ते आगळे-विगाळ प्रेत त्यांच्या पायाशी मधूनच अेखादा आचका देत पडलेले, त्याच्या घावातून रक्ताची अुसळी थाबून थाबून अेकदम अुसळत असलेली! असे दहा-पाच क्षण जातात न जातात तोच तो कुत्रा मोठमोठ्याने भोकाड पसरून दूर गड्यावर कोकलत आहे, नतर मोठमोठ्याने भुंकून भुकून आवाज माढीत आहे, असे किशनला अैकू आले.

वास्तविक त्याची ती जीव घेती-देती झुंज चालली, तेव्हापासूनच तो कुत्रा जवळ जायला भीत असला, तरी पळून जायचे नाकारून गड्यावर सारखा अिकडे तिकडे धावत, थांबत, तमाच मोठमोठ्याने मधूनच केकटत होता, मधूनच वळावळाने भुंकत होता, कोणाचे तरी आजूबाजूने साहाय्य मागावे, लोकांना जमवावे तसा 'धावा हो!' 'धावा हो!' असा जणू आर्त हाका मारीत होता पण अितका वेळ ह्या जिवावरच्या प्रसंगात त्याचा तो गागाट किशन-मालतीला अैकूच आला नव्हता. त्यांच्यावाचून त्यांना बाहेरचे जग असे आठवलेच नव्हते पण आता कुत्र्याच्या गोंगाटाकडे लक्ष जाताच किशन जो तिकडे दचकून वळून पाहतो, तो त्याला बाहेरचे सारे जग जसे आपणा दोघांकडे, आपल्या दोघांच्या रक्ताने माखलेल्या हातापायांकडे आपल्या दोघांच्या मध्ये ठार मारून टाकलेल्या गुलाम हुसेनच्या विकाळ धुडातून मध्येच रक्ताच्या चिळकांड्यांकडे टवकारून पाहात आहे—'हेच ते हत्यारी! धरा! पकडा!!' असा बोटे दाखवून दाखवून गोगाट करीत आहे, असा अचानक भास झाला त्याच्या मनाची गुंगी खाडकन् अुतरली आता अिथे आपण अेक क्षणभर रेंगाळलो, तर त्या दुष्टाच्या मुऱ्यात वाचलेला जीव फाशीच्या तावडीत अडकेल ... आणि ही मालती सुद्धा फासावर!! कल्पना देखील भयंकर!!

त्या धक्क्यासरशी त्याने अेक मोठा धोंडा अुचलून प्रथम त्या कुत्र्याला मारला, तोच त्याला त्या बाजूने अेका अुचवट्यावरून शेजारच्या शेतातील दोनतीन लोक कंदील घेअून आपल्याकडेच पाहात आणि बोलत आहेतसे दिसले

त्या कुत्र्याच्या केकाटण्याने आणि सारख्या भुंकण्याने ते त्यांच्या शेतातल्या माळावर केव्हापासून दचकून अुभे राहिले होते नतर त्या झोपडीपाशी गुलाम हुसेनची आणि किशनची झालेली झोंबाझोंबी, शिवीगाळ, आरडाओरड आणि शेवटी गुलाम हुसेन पोट भोसकले जाताच जेव्हा कोसळला, तेव्हा त्याने फोड-

लेल्या दुरवाळचा ह्याच्या अस्पष्ट देखाव्यावरून आणि गोंगाटावरून तेथे काही तरी भयंकर प्रकार घडत आहे, हे त्या शेतकऱ्यानी ताडलेच होते पण भयाने त्याची जिज्ञासा आवरली होती आपण तेथे गेलो तर स्वत च अेखाद्या नसत्या वालटात सापडू, असा पोक्त विचार त्यानी केला होता आणि तेथूनच काय दिसेल आणि अैकू येअील त्याची चर्चा करीत आणि मधून मधून आढळणाऱ्या त्या तडफदार स्त्रीविषयीच ही काही तरी सुदीपसुदी चालली असावी असा तर्क ल्ढवीत, ती माणस तेथे तशीच केव्हाची अुभी होती

त्याना पाहाताच 'आपल्या हत्येला वाचा फुटली ! ' अशी धडकी किशनला भरली त्याने म्हणण्यापेक्षा, त्याला न विचारता त्याच्या हातानेच वदील फट्दिशी माळवून अधारात मालतीचा हात धरला आणि म्हणाला,

'प्रत्यक्ष अियून निसटून जाअू चल आपल्याला पकडायला लोक जमत आहेत बघ ते गराडा पडतो आहे, चल '

'अरे, पण कुठे ? '

'वाट फुटेल तिकडे वाटेल तिथे, पण ह्या स्थळापासून दूर, दूर, दूर . शक्य तितक दूर चल लवकर '

'पण तुला कस चालवेल ? तुझा पाय पागुळलेला ? '

'अेक पाय पांगुळलेला, पण दुसरा आहे ना चालता ? त्यावर चालवेल तस चालेन पण आधी '

'आणि हे प्रेत ? '

'मरू दे, सडू दे त्या दुष्टाला ! नाही तर त्याच्या त्या कुत्र्यालाच खाअू दे ते ! निसट, चल आधी अियून पण थाव, सुरा दे अिकडे त्याची ओळख सुद्धा कुणाला न पटली पाहिजे ! '

अस म्हणून सुऱ्याने प्रेताच्या तोंडावर अधारातच चचाचच वार करून किशनने ते विद्रूप केल 'ह आता आण कुलूप कोठे आहे ते '

मालतीने अधारातच चाचपडत खोलीतून कुलूप घेतले बाहेर पडताना तिचा पाय डबजिनी त्या रक्ताच्या डबक्यात पडला तिलाही धडकी भरल्यासारख झाले. तिने तो सुरा आपल्या पोटगुळी खुपसून ठेवला तशीच ती पुढे जाअून, ते मोडके तोडके दार कसेबसे लावून त्याला कुलूप घालू लागली हात कापू लागला, पण अेकदाचे कुलूप लागल आणि मनुष्याला जी अेक अुपजतशीच सवय लागलेली असते, तीप्रमाणे तिने कुलूप लागताच किल्ली कबरेला खोवली. तो रक्तबंबाळ सुरा मघा कबरेला खोवला होता तो तेथेच नीट आहे की नाही -ते पुन्हा चाचपून पाहिल त्या सुऱ्याच्या जवळिकेच्या जाणिवेसरशी तिला पुन्हा पुरते अवसान आणि बळ चढल 'ह चल, कापू नकोस किशन, ह्या माझ्या हातावर टाक भार ह अस नि चल त्याचा आधार घेअून चालवेल तितक ही वाट माझ्या पायवळणी पडलेली

आहे अगदी. थांब दगड घेऊ दे दोन चार हाती. बघ त्या पिसाळ कुत्र्याला आगे-मागे चावा घेईल ते मेल त्पत छपत मागे येऊन !

काळोखातून तो गंडगा ओलांडून त्या चबुतऱ्याला वळसा घालून तीं दोघे कशीबशी त्या वाटेला लागली

'आता कुठे वळतेस ! नगराकडे ?'

'छट, वेड्या ! ह्या सगळी रक्ताळलेली आपण, प्रथम गंगेवर जाऊन धुऊन, न्हाऊन स्वच्छ नि सभ्य बनू चल आधी '

'खरच तिथल्या देवळातच प्रथम चल रात्र तिथेच काढू माय विन्हाडही तिथे आहे ! तिथून तर मघा अिकडे आलो ! प्रथम तिथे थोड थोपू ही रात्र पहाटे स्नानबिन नि देवी आणखी काय असेल ते ! अयाया ! पायाच्या कळा सोसत नाहीत ग आता देऊळच गाठू ये आधी '

देवळात येताच अेकट्या किशननेच नव्हे तर अितक्या वेळच्या अुत्तेजनाने मन आणि तन अगदी दुवळत चाललेल्या मालतीनेही भुअीवरच सपेल अंग टाकल तिला दुरून किशनने पडल्यापडल्याच आश्वासिले तू स्वस्थ नीज तो सुरा अिकडे दे मा पहारा देतो आता दुःख सार विसर अ काही वेळ '

'दुःख ? छट ! मला सागू का ह्या वेळेला काय वाटत आहे ? आनद ! अवसान ! कस सागू ? माझ्या घरी अेकदा अेक नाग निघाला दाराच्या वडापाशी तो कुठे तरी असे आमची आजी देवळसी त्याला दूध ठेवी वाटीत त पिताना कितीदा तरी आम्ही त्याला दुरून बघाव आजी म्हणे 'साप झाला तरी जीव ना ? त्याला क्रिया असत तो दूध देण्याला कधी डसत नाही पण त्याच काय विघडल काय की तो त्या दिवशी पटकन् घरात निघाला नि माझ्याशी खेळत असलेल्या माझ्या अेका लहान मावसबहिणीला डसून मला डसायला धावला आम्ही सगळीं मुल जीव घेऊन पळालो 'साप साप !' अेवच आरोळी ठोकली त्यासरशी आमच्या गड्यान येऊन अेका टोल्यासरशी त्याच टाळक नेकल तो

मालतीला गुलाम हुसेनच्या घरी अटक झाल्यानंतर नायडूबाओीची आणि तिच्या आओीची त्या छपी योगानंदाने कशी फसवणूक केली आणि त्यावर विश्वासून त्या दोघीजणी मालतीला शोधायला नागपूरला कशा गेल्या आणि नंतर त्यांचा पत्ता त्याला सुद्धा कसा नव्हता, तें किशनने थोडक्यात सांगितलं पण तें संपत होतें, तांव मालतीच्या सज्ञ मनाचे सारे व्यापार ग्लानीमुळे जवळ जवळ बंद पडत आले होते ती काही अैकत न अैकत केव्हा खाली लवंडली आणि निजली तें तिला कळले नाही किशनही भुअीवरच पडला त्याच्या मनात त्या कृत्यांच्या भयंकर भावी परिणामांचे विचार नुसते कोलाहल माजवीत होते मधून गुंगी, मधून तो कोलाहल, मधून ती पायाची कळ तो तसाच तळमळत पडून राहिला दोनदा त्याला बुटाची टापटाप अैकू येअून तो भीतीच्या धडकान अुठला, बाहेर जाअून पाहून कोणी नाही असं कळून पुन्हा आत येअून पडला पोलिसाच्या आकृति त्याचे डोळे मिटले की त्याच्यापुढे अुभ्या राहात, त्याला धरीत आहेतसं वाटे तन्हा तो पुन्हा डोळे अुघडी धीर धरी आणि पहाटे निसटून जाण्यासाठी काय करायचे, ह्याचे बेत गुंगीगुंगीतन करू लागे

मालतीचे सज्ञ मन जरी किल्ली संपलेल्या घड्याळासारखं साफ बंद पडलेले होतं तरी त्या ग्लानीच्या गाढ झोपेतही तिच्या असंज्ञ मनाच्या थरातून किशनच्या चित्तातील कोलाहलासारखाच घृति भीति माया-ममता-त्वेष द्वेषाच्या नाना स्मृतींचा आणि कल्पनांचा अेकच कोलाहल माजून राहिलेला असला पाहिजे ती मध्येच दचकत हसत, घोरत होती स्वप्न पडता पडता तिला झोपेत असे भासले की ती आओी सगळी त्या मथुरेच्या झोपाळ्यावर प्रेमळ ओव्या म्हणत अेका दोरीने अुंच अुंच झोके घेत आहे तोच झोपाळा अुचावून अेकदम तिच्याखालून निसटला आणि त्या दोरीच्या विळख्यात तिची मान करकच्च आवळून ती लोंबकळली श्वास गुदमरून गळफास बसून तिची जीभ बाहेर पडली आणि तशा भीषण अवस्थेतील तिला तीच पहात आहे त्या धक्यासरशी 'मेले मेले! धाव! आओी, गळफास बसला मला!' असं स्पष्टपणे किंकाळून मालती ताडकन अुठली थर थर थर कापू लागली, धापा टाकीत झोपेत बंद झालेला श्वास बळाबळाने घेअू-सोडू लागली.

किशनही ताडकन अुठला अंधारातच ती धावरून अुभी होती, तेथे चाचपून तिच्या खांद्यावर अेक हात ठेवून दुसऱ्या हाताने पाठ थोपटीत धीर देअू लागला तोच मालतीने थरकापल्या दोन्ही हातांनी त्याच्या गळ्याला मिठी मारली किशन, मला अुभं राहवत नाही मला कसलीशी धडकी भरली आहे मला पोटाशी घट्ट घेअून शेजारी नीज लाजू नकोस मी होअून ज्याला आपल्या शेजारी निजायला घेत आहे असा तूच पहिला पुरुष आहेस!'

तिला अगदी जवळ घेअून किशन निजताच ती पुन्हा अितक्या ग्लानीत गाढ झोपी गेली की जशी ती मध्यंतरी पुरती जागी झालीच नव्हती झोपेतच चालण्या-बोलण्याचा जो अेक रोग असतो त्याचा जसा काही तिला अेक झटका आला होता.

आम्ही षटक नि षटकी ह्या दोघांही बहीणभायांना शिक्षा देशो—जन्मठेप काळ पाणी !'

ते शब्द ऐकताच किसनच्या डोळ्यातून जरी टपटप टिपे गळली तरीही फाशी टळल्यामुळे त्याला काहीसे हल्केही वाटले पण त्या शब्दास काही तरी भयंकर अर्थ भरला आहे, असे अधुकपणे वाटत असताही त्याच्या भीषणतेच अगदी स्पष्ट चित्र तिच्या मनापुढे अुमटले नसल्यामुळेच की काय, मालती 'जन्मठेप काळ पाणी ' हे भयंकर शब्द ऐकतानाही सुन्नपणे तशीच पाहात राहिली पण न्यायाधीश अुठू लागताना मात्र ती अेकदम गहिवरल्यासारखी होअून विनविती झाली,

' अेक क्षणभर ! थांबा ना ! कृपावंत महाराज मला अितके सांगा की, काळ्यापाण्यावर मी गेले तरी माझा हा भाअू कि—नव्हे, षटक माझ्या सगतीच राहील ना ? आपल्या बंदिपालाला तेवढी आज्ञा देअून ठेवाल ना की, काळ्या पाण्यावरही आम्हा दोघांना अेकत्रच ठेवले जाव ? दया व्हावी !'

' अजाण मुली, ते का न्यायाधीशाच्या हाती असते ? काळ्या पाण्यावर पुरुषांची नि स्त्रियांची बंदिगृहे अगदी निरनिराळी असतात त्यातही अेकाच खटल्यातील सर्व अपराध्यांना तर पुरुष पुरुषांत वा स्त्री स्त्रियांतही सहसा अेकत्र राहू देत नाहीत '

न्यायाधीशाने हे शब्द सहानुभूतीच्या स्वरात जरी अुच्चारले तरी मघाच्या त्याच्या शिक्षा सांगणाऱ्या भावनाशून्य शब्दाहूनही मालतीला ते दारुण वाटले. ' जन्मठेप काळे पाणी ' ह्या शब्दातील भीषणतेपेक्षा किसन आता नित्याचा दुरावणार ह्या कल्पनेतील भीषणता तिच्या मनाला अत्यंत असह्य स्पष्टपणे पटकन् समजून घेता आल्यामुळे त्याच्या अुच्चारासरशी मात्र ती अकस्मात विव्हळली, स्फुदून स्फुदून, ' नका हो ! नका हो !' असे अर्धवट वाक्यच घोळीत प्रार्थू लागली !

न्यायाधीशाच्या मनाला प्रथमपासूनच तिच्या अपराधाची निरपराध बाजू रिझवीत होती पण निर्बंध म्हणजे निर्बंध ! तो अुल्लंघ्य ! म्हणूनच ते खटला चालेतो ममतेचे म्हणून काही बोलले नव्हते पण सबंध खटल्यात धीराने निश्चल असलेली आणि जन्मठेप काळ्यापाण्याची भयंकर शिक्षा अैकतानाही न गहिवरलेली ती मुलगी तिच्या भावापासून ताटातुटणार हे अैकताच अशी स्फुदस्फुदून रडू लागलेली पाहताच, त्या न्यायाधीशाचेही मन पाझरले आणि काही तरी आश्वासन देअून तिला समाधानण्यासाठी ते बोलून गेले

' रडू नकोस मुली, काळ्या पाण्यावर जर तुमची वागणूक नीट राहिली तर काही दहा-पाच वर्षांनी तुम्हाला लग्न करण्याची अनुज्ञा मिळायची सोय आहे मग त्या बेटातल्या बेटात तरी तुम्ही सुखाने अेकत्र राहू शकाल '

मग बेलावरच्या झाडावरून त्याला कोकिळाची अगदी पहाटेची ललकारी जेव्हा ऐकू आली, तेव्हा किशनने मालतीला मोठ्या कष्टाने हालवून पुरती जागी केले

'मालती, मी पुढच्या बेताची सारी आखणी नक्की केली आहे धीर मात्र धरला पाहिजेस धैर्य नाही ना चळू देणार?'

'वेड्या, मी आता काही स्वप्नात का आहे? स्वप्नातल्या गळफासाने जे भितात, त्याच्यातील कित्येक खऱ्या गळफासाला मात्र मुळीच भीत नाहीत!'

'पण गळफासाची गोष्ट काढतेस कशाला? थोडक्यात ऐक -तू आता गंगेत जाऊन हा तुझा मुस्लिम वेष नि रक्ताने डागळलेले कपडे गंगेत बुडवून टाक स्नान कर नि ह्या माझ्या गाठोड्यातील हें धोतर ऐखाद्या भिकारणीसारखे नेसून हा कटोरा घेऊन ह्या आडवाटेने अशी निसट नि खेड्यापाड्यातून मार्ग काढीत घरी आईला जाऊन भेट नि '

'छट्! थांब माझ्या आईचं नाव आता पूर्णपणे विसर अरे, ती मला पाहताच माझं तोंड कुरवाळायला जर पुन्हा धावली तर तिचेही हात ह्या माझ्या तोंडावरील रक्ताच्या डागाने रक्ताळतील! तिच्या अंगावर माझ्या हाताच्या कर्माचे शितोडे उडून त्या साध्वीची निर्मलताही डागळेल मी माझ्या आईच्या अंगणातले ऐक निर्मळ फूल होते, तेव्हा मला मालती म्हणत! पण आता मी ते फूल नाही आता मी झाले आहे समाजाच्या वाटेतील ऐक काटा! वाटेल तिथे धुळीत पडेन, पण पुन्हा आईच्या अंगणात पडून तिच्या पायात तरी खसकन् मोडणार नाही आता माझं नाव देखील मी बदलणार फूल नाही काटा! मालती नाही, कटकी!! आता पुन्हा आठवण ठेव अं, मालती म्हणायचं नाही कटकी ''

मागत नि गल्लोगल्लीतून फिरत असते तसेच आजवर भटकत आले. काही दिवसांपूर्वी मामी ही वहीण भीक मागत असता, एकाकी गाठून त्या मुसलमानी गुंडाने बळाने ओढून आपल्या घरात घातली, कोंडून ठेवली. मागे मागोत मी मात्र त्याच्या दारापुढे आलून ओरडताच नि त्याला 'बहीण सोडून दे' म्हणून दटावताच तो सुरा उपसून माझ्यावर तुटून पडला. झटापटीत तोच सुरा हिसकून मी त्याचा मुडदा पाडला. माझी बहीण सोडवली. अशात पथ्यान अिथेच रात्र कोंडून आत्ताच अुठलो नि पोलिसांत आपण होअून आम्ही सगळी बातमी देणार होतो तों तुम्हीच आलात.'

मालतीला विचारता प्रसंगावधान राखून तिनेही धीटपणाने किशनच्या वरील बयानाला तंतोतंत जुळेल असे सांगितले. त्या मुसलमानी गुंडाचे नाव-गाव पूर्ववृत्त काहीच आपणाला माहीत नाही असे तिला त्याविषयी पोलिसांनी खोद-खोदून विचारता तिने ठामून अुत्तर दिले.

अंगणातील तिची रक्ताळलेली वस्त्रे, हात, सांड मैटीला सोवलेली ती त्या पडक्या घराची किल्ली आणि तो रक्ताळ सुरा मालतीच्या अंगावर सापडला ते ते टिपून त्या दोघांनाही पकडून ते चालू लागले. त्यांच्याबरोबर त गावकरीही परतले. आपणावरच काही आळ यघू नये म्हणून त्यांनीच त्या पडक्या घराकडे चाललेल्या काही तरी भयंकर प्रकाराची बातमी जी पोलिसांना रातोरात पोच विली होती तिचा ओळखदेखप्रभृति सारा शक्य तो पुरावा त्यांना पोलिसात नोंदवल्यावर त्यांना घरोघर परत धाडण्यात आले. 'अपराध माझा! माझ्या बहिणीला सोडून द्या परत धाडा!' अशी विनंति किशनने करताच त्याला दटावण्यात आले. 'इतकी पुरावा तुम्हा दोघांविरुद्ध आम्हाला तुम्हा दोघांनाही अटक करणे भाग. अपराध कुणाचा ते अती न्यायाधीश ठरवतात ना आम्ही, ना तू.'

किशन आणि मालती ह्या दोघांवरही खटला भरला गेला. अपराधाला लगोलग सापडले त्या हत्येपुरता पुरावा जय्यत. अपराधाचे धागेदोरे कोठे गुंतलेले नव्हते. त्या ठार केलेल्या माणसाचे पूर्ववृत्त सर्वस्वी अज्ञात. सुऱ्याच्या घावांनी छिन्न-विच्छिन्न झालेल्या त्याच्या मुद्रेमुळे त्याची ओळखही दुर्घट आणि त्या नादात पडण्याचे त्या खटल्यापुरते काहीच कारण आडवेही आलेले नव्हते. ह्या सर्व परिस्थितीमुळे कोणत्याही खोलात फारसे न जाता त्या हत्येपुरताच आरोप ठेवून खटला चालवून पोलिस मोकळे झाले. बचाव असा त्याच्या बयानापलीकडे आरोपींच्या वतीचाही नव्हताच.

शेवटच्या दिवशी न्यायाधीशाने निकाल दिला—

'कोणत्या आरोपीने प्राणघातक वार केला हे चांगलेसे सिद्ध झाले नाही. सिद्ध झाले ते हे की दोघांनीही ह्या हत्येत जाणूनबुजून भाग घेतला. म्हणून

आम्ही फटक नि कटकी ह्या दोघाही बहीणभावाना शिक्षा देतो—जन्मठेप काळ पाणी !'

ते शब्द अैकताच किशनच्या डोळ्यातून जरी टपटप टिपे गळली तरीही फाशी टळल्यामुळे त्याला काहीसे हलकेही वाटल पण त्या शब्दात काही तरी भयकर अर्थ भरला आहे असे अंधुकपणे वाटत असताही त्याच्या भीषणतेचे अगदी स्पष्ट चित्र तिच्या मनापुढे अुमटले नसल्यामुळेच की काय माल्ती 'जन्मठेप काळ पाणी ' हे भयकर शब्द अकतानाही सुन्नपण तशीच पाहात राहिली पण न्यायाधीश अुठू लागताना मात्र ती अेकदम गहिवरल्यासारखी होअून विनविती झाली,

'अेक क्षणभर ! थावा ना ! कृपावत महाराज मला अितक साग की, काळ्यापाण्यावर मी गेल तरी माझा हा भाअू कि—नव्हे कटक माझ्या सगतीच राहील ना ? आपल्या बदिपालाना तेवढी आज्ञा देअून ठेवाल का की, काळ्या पाण्यावरही आम्हा दोघाना अेकत्रच ठेवल जाव ? दया व्हावी !'

अजाण मुली त का न्यायाधीशाच्या हाती असत ? काळ्या पाण्यावर पुरुषाची नि स्त्रियाची बदिगृह अगदी निरनिराळी असतात त्यातही अेकाच खटल्यातील सर्व अपराध्याना तर पुरुष पुरुषात वा स्त्री स्त्रियातही सहसा अेकत्र राहू देत नाहीत

न्यायाधीशाने हे शब्द सहानुभूतीच्या स्वरात जरी अुच्चारले तरी मघाच्या त्याच्या शिक्षा सागणाऱ्या भावनाशून्य शब्दाहूनही माल्तीला ते दारुण वाटले. 'जन्मठेप काळ पाणी ' ह्या शब्दातील भीषणतेपक्षा किशन आता नित्याचा दुरावणार ह्या कल्पनेतील भीषणता तिच्या मनाला अत्यत असह्य स्पष्टपण पटकन् समजून घेता आल्यामुळे त्याच्या अुच्चारासरशी मात्र ती अकस्मात विव्हळली, स्फुदून स्फुदून 'नको हो ! नको हो !' असं अर्धवट वाक्यच घोळात प्राय

ते शब्द ऐकताच जशी काही काळ्या पाण्याची जन्मठेप रद्द होऊन ती सुटलीच असा, त्या संकटाच्या वादळात भावावून गेलेल्या मालतीला मनातल्या मनात आनंद झाला 'महाराज, तुमच्या तोंडात साखर पडो ! लग्न करता येईल ना मला हवं त्याच्याशी ? बंदिगृहातील सारी शिस्त मी अक्षर न् अक्षर पाळीन् वर !'

(तिच्या स्त्रीय निसर्गातील साऱ्या यौवनसुलभ भावना त्या कल्पनेसरशीच तृप्तल्यासारख्या झाल्या किशनशी तिचं लग्न लागलेच असें तिला होऊन गेलं. पण वेडे मालती, कल्पना म्हणजे वस्तुस्थिति नव्हे ! अितक्या कठोर, निर्दय निघृण अनुभवानंतरही हे तुला अजूनही कळलं नाही ना की, मनुष्य हा स्वतःच्याच शिस्तीचे, पापपुण्याचे आणि कर्मविकर्माचे फळ तेवढे काय ते भोगीत नसून ह्या प्रत्यक्ष जगात तरी समाजाच्या पापपुण्याचं आणि कर्माकर्मांचेही फळ अिच्छा नसली तरी भोगीत असतो, त्याला दुसऱ्याच्या कृत्याचेही फळ प्लेगाच्या साथीत केवळ वातावरणीय संसर्गाने निरोग्यालाही प्लेग होतो, तसं भोगावे लागते !)

तुझ्या दैवी तरी तेच लिहिलं असल्याचं आतापर्यंत प्रत्ययाला आलं नाही का ? नाही तर तुझ्या देहाची, मनाची, भावनांची, असह्य आणि भयप्रद विटंबना आजवर ह्या कोमल वयात अशी सारखी होत रहावी, असे तू स्वतः कोणते पाप केलं होतस ? कोणता अपराध केला होतास ? कोणाचे काय बुडवलं होतस ? आपल्या आजीच्या ममतेच्या अंगणात अुमललेली मालती, तू अेक मालतीच्या कोवळ्या निर्मल फुलाची अर्धफुल्ल कळी ! जशी शरद्‌ऋतूतील चंद्रकोर अशा आम्ही तुला प्रथम जेव्हा पाहिली तेव्हा जमकरट्याला देखील तुझी तुझ्या अपराधावाचून ही दुर्दशा होईल असं भविष्य करवलं नसतं, दुष्टातील दुष्ट पिशाच्चालाही तुला असा शाप अुगीच देववला नसता !

आणि ती असह्य दुर्दशा अितकी लाजिरवाणी की, सहानुभूतीपुढे सुद्धा अुघडी करून सांगता येऊ नये त्या आडदांड, ओंगळ आणि अभद्र नरपशूंची अघोर वासना जेव्हा जेव्हा तुझ्या लज्जेचा बळी घेत गेली, तेव्हा तुझ्या कोवळ्या अंगाची जी आग झाली आणि कोवळ्या भावनांची राख जी झाली, ती हे अनागस कुमारिके तू स्वतः होऊन अेखादा नीतिनियम विनय वा शिस्त भंगिलीस म्हणून का झाली ? त्या अघोर दुर्दशेतून तुला आणि तुझ्यासारख्यांर अबलांना साह्यार्थ-साठी हा किशन पुढे आला त्याने नीतिनियमाचा, परोपकाराची आणि विनयाची चाड बाळगली आणि तुम्ही त्या राक्षसाच्या रक्ताचा पाट वाहावून ती त्याच्या अत्याचाराची आग विझवली म्हणून अत्याचारी ठरलात तुम्ही ! समाजात काळोखी लागली तुम्हाला ! काळ्या पाण्यावर पाठवणी होणार तुमची ! समाज-पीडक अत्याचाराचा नायनाट करणाराच जेव्हा जेव्हा समाजपीडक अत्याचारी

म्हणून दंडिला जातो ! नीतिनियमाची खरी शिस्त पाळणे हाच अपराध ठरून यासाठीच वशिस्तीचे फळ भोगावे लागते !

हा दोष कोणाचा ? हे असे का होते ? किंवा हे असे होऊ नये ह्यासाठीं काय अुपाय योजावेत ? हा प्रश्न येथे अगदी गैरलागू, अगदी अप्रस्तुत हे असं होते तर आणि म्हणूनच मान्ती, तू स्वत शिस्त पाळलीस की तिचे पारितोषिक तुल मिळालेच पाहिजे, पडलेल सुखस्वप्न खरे ठरलेच पाहिजे असं ठाम मत गृहीत धरू नकोस !

परतु सुखस्वप्ने खरी ठरतच नाहीत असेही काही नाही तेव्हा सुखस्वप्नात हसते आहेस रमली आहेस, तशी क्षणभर खुशाल हास, रम पण त्याला अेक स्वप्न समजून त्यात रम जाग आल्यावर ते स्वप्नच सत्य ठरेल, असे ठाम समजू नकोस म्हणज झाले

* * *

## १ अंदमानचे चलान

कलकत्त्याच्या बदरावरील धक्क्यावरच अेक पटागण अगदी रिकाम करण्यासाठी पोलिसाचा धावपळ चालली अकूण अेक मनुष्य काढून देण्यात आल ते हटवलेले लोक दूरवर जाअून मिळल त्या जागी दाटून, काय होत त पहाण्यासाठी काणी कोणाच्या खांद्यावरून तर कोणी पुढच्याना बळ रेटून बरावीत टाचेटाचेवर अुभे राहिले

अितक्यात जिकडून तिकडून गजबज झाली आया ! चलान आया ! चलान आया !

'चलान' म्हणजे तुरुगा-तुरुगातून साचलेले काळचा पाण्यावरचे दडित अेकत्र करून अदमानला धाडण्यासाठी त्या धक्यावरील पटागणात ज्या अेक गटाने आणण्यात यतात तो गट

साऱ्या अपराधात जे अत्यत घातक आणि नृशस अपराध असतात, तो ज्याच्या हातचा मळ झालेला आहे अशा हत्यारी आगलाव्या विपदायी दरोडेखोर अित्यादि अट्टल पाप्याना बहुधा काळचा पाण्याची शिक्षा देण्यात यते त्यातही पुन्हा चाळणी होअून जे अतिवृद्ध अल्पवयी अिक्डाल बदिशाळेत सद्वर्तनाने सुधारणीय ठरलेले ते वगळून अुरलेले जे अट्टलातील अट्टल अपराधी बहुधा त्यानाच काळ्या पाण्यावर पाठविण्यात यते राजकीय प्रकरण वगळले तर कोणत्याही सुव्यवस्थित

समाजाला ज्याचे अस्तित्व असाध्य महामारीच्या साथीमारखेच भयप्रद वाटल्यावाचून राहणार नाही, असेच क्रूर, हिंस्र, उच्छृंखळ सर्व ह्या काळ्या पाण्यावर धाडण्यासाठी काढलेल्या 'चलाना' त भरलो केलेले असतात अपवाद काढले तर नियम असा हाच

परंतु त्या पटांगणात त 'चलान' येताना त्याची काहीच माहिती नसलेल्या कोण्या नव्या मनुष्याने किंवा भाबड्या सज्जन जर त्याला पाहिले असते तर? तर त्या चलानाचा त्याला राग न येता उलट कींवच आल्यावाचून राहती ना कारण ते बिचारे किती निस्तेज, बहुतेकांच्या माना खाली, बहुतेकांच्या डोळ्यात टिपे — निदान मनात धडकी, ताठ उभारलेली, शेजारच्या मनुष्यासमुद्धा चकार शब्द न काढता किंवा बोललाच कोणी तर असाच्या मुलीसारखा लाजत तुमना पुटपुटत, चाराचाराच्या रांगानी अगदी माघे भिकार गणवेश घातलेले, माजून पाऊल टाकीत, शिपाई 'धाव' म्हणताच धावत 'बैस' म्हणताच बसत, 'ऊठ' म्हणताच उठत शमवाडी लोक पण थोडी मुद्धा गडबड न करता त्या पटांगणात चालत होते अितक्या शांत, दांत सयत जावाचा तो कळप! शेमवाने शेळ्यामेंढ्यांचा कळप कसाईखान्यात नेला जातानासुद्धा त्याच्याहून अधिक गडबड करीत जातो, कमी केविलवाणा दिसतो! असा त्या बापड्या दीनदुबळ्याचा त्याच्या आईबापापासून, गुरालेकरापासून बायकापोरापासून त्याची जन्माची ताटातूट करून काळ्या पाण्यावर त्या तेथल्या अनन्वित छळाला आणि कष्टाला बळी द्यायला असे नेले जाव ना? राजनिर्बंधाचा हा कोण निष्ठुरपणा, शिक्षेचा

पण जर का धारदार संगिनी ठासलेल्या बंदुकांचा आणि दंडुक्यांचा गराडा एक घटकाभर काढून टाकून त्या चलानातील त्या माना खाली घातलेल्या आणि टिप गाळणाऱ्या 'बापड्या' ना मोकाट सोडले असते तर? डोळ्यांतून दयेचे एकही टिपूस न गाळता त्या चलानातील त्या बहुतेक बापड्यांनी अर्धा कलकत्ता जाळून राख केला असता, उरलेला अर्धा कलकत्त्याच्या माना मुरगाळून हाहाकार उडवला असता! सर्कशीच्या रिंगणात भाले आणि काटेरी चाबूक परजीत राहणारे नेते जोवर समोर आणि आजूबाजूला असतात तोवर सिंहव्याघ्रही जसे सुसभ्य नागरिकाप्रमाणे रिंगणात शिस्तीने चालतात, तसे ते चलान शिस्तीत चालत होते त्या संगिनी आणि ते दंडुके त्याला वेढून उभे होते म्हणून! अपवाद वजा जाता त्या चलानातील बहुतेकांची ती सभ्यता तो विनय ती दीनता ती टिपें नीतीचा नव्हती तर होती निव्वळ निरुपाय भीतीची! अशा उच्छृंखल खलांनाही समाजस्वास्थ्याला पोषक अशी शिस्त लावता येते पण ती गीतेच्या पारायणाने नव्हे तर संगिनीच्या पोलादानेच काय ती!

अगदी गोगलगाईसारखे बापडे दिसणाऱ्या ह्या चलानातील दहा-पाच व्यक्तींची जरी थोडी ओळख तुम्हाला करून दिली तरी मळमळत्या दयेला त्यांच्या ह्या दुर्दशेकडे नुसतें पाहून जी कीव येत तीच शिसारी येईल आणि अशा हिंस्र मानवी श्वापदांतही जी माणुसकी असतेच असते तीच तेवढी जिवंत ठेवून त्या हिंस्रतेचे रोगाणु प्रतिरोधण्यासाठी वरवर अत्याचारी वाटणाऱ्या ह्या धारदार संगिनींचे टाचेच (अंजेक्शनेंच) कसे अवश्य आहेत ते ध्यानी येईल हे आलच

भावाच्या मृत्यूनंतर त्याच्या अेकुलत्या लहान मुलाला विष देववून मारायचा कट केला आणि त्या पायी तो मुलगा मेला. हेतु ? त्या शल्ल्या पुतण्याचा काटा वाटेतून निघाला, म्हणजे त्याचा निर्वंश होअून सारी समाअीक मत्ता ह्याला अेकट्याला गिळंकृत करता यावी !

हा जो दुसरा दंडित तो अेका अर्थी सुधारणीय अपराधी म्हणता येअील. वयाने तो सतरा-अठरा वर्षांचा मुलगा. नांव गोपाळ, मुद्रा गयाळ. त्याच्या घरच्या बाप, चुलता, प्रभृति मोठ्या माणसांनी त्याच्या शेताचा लिलाव केल्याच्या रागानें त्याच्या गावातील सावकाराचा सूड अुगवण्यासाठी त्याच्या घरावर दरोडा घातला. मोठ्या माणसांबरोबर हा मुलगाही गेला. सावकाराला खाली पाडून ते झोडपीत असता ह्याने जात्याची तळी अुचलून त्या बिचाऱ्या सावकाराच्या डोक्यात घातली. त्याचा मेंदूच बाहेर पडला. सावकाराचा अपराध हा की, ह्या कुटुंबाने त्याचें ऋण फेडण्याचें तर राहोच, पण अुलट त्याची गंजी, रास, गुरें सुद्धा जाळली, मारलीं, म्हणून त्याने खटला केला आणि रीतसर लिलाव करून ह्याचे शेत विकले ! ह्याच्या बापाला फाशीच झाली. हा मुलगा दुय्यम, म्हणून ह्याला जन्मठेप काळें पाणी !

पण हा तिसरा बापडा पाहिलात का ? किती शिस्तीत अुभा, किती व्यवस्थित, निर्बंधशील (Law-abiding) दिसतो आहे तो ह्या धारवंद सगिनींच्या चकचकाटांत! पण जेव्हा तो चकचकाट त्याच्या वाटेवर पडला नव्हता आणि ती वाट तो त्याच्या स्वभावाच्याच अंधळ्या अुजेडात काय ती न्याहाळून स्वतंत्रपणें चालला होता, तेव्हा हा नागरिक कसा चालला होता माहीत आहे ? तें त्याच्या शिक्षेच्या ह्या नोंदीत वाचा. हा बलुची, तिकडील अुदंड टोळ्यांतील अेक माणूस. नांव अल्लाबक्ष. हा सिंध प्रांतातील तुरळक हिंदु वसतीवर ह्या टोळ्याचे जे वारंवार दरोडे पडतात त्यांत भाग घेता घेता अितका क्रूर बनला की,त्याला हिंदु मुलांमुलींच्या मासाचे लचके तोडून खायची राक्षसी चटक लागली. शेवटी अेकदा ! पेशावरला जाणाऱ्या अेका आगगाडींतील स्त्रियांच्या डब्यात अेक हिंदु स्त्री आपल्या तान्हुल्यासह अेकटी बसली आहे असें टेहळून तो त्या डब्यात शिरला, सुरा रोखून तिच्या लज्जेचा बळी

घेतले, पण नृमांसभक्षणाच्या अघोर हौशीवाचून त्याच्यात वेडासारखे काहीच चिन्ह दिसेना, अुलट तो हिंदूंच्याच कोवळ्या मुलामुलींचे मांस लचके तोडून खात आणि रक्त मिटक्या मारून पीत असल्याचे, त्याच्या त्या राक्षसीपणालाही अेक संतानी धर्मबंधन असल्याचे, त्याच्या पिशाच्चपणालाही अेक पद्धत असल्याचे सिद्ध झाले. त्याला जन्मठेप काळे पाणी होअून वेड्याच्या रुग्णालयात काही दिवस बंद केले. तेथेही वाह्यातपणावरून जेव्हा दोनदा पन्नास-साठ फटके खाल्ले, तेव्हापासून काय ते त्याने वेड्याचे सोंग सोडले, शिस्तीने राहिला आणि आता काळ्या पाण्यावर धाडला जात आहे. फटक्यासरशी त्याचे वेड अुतरले! सगिनीच्या धारेवर राक्षसी-पण तासले जाताच राक्षसानाही कधी कधी माणसाचा आकार येतो तो असा! अनमानधपक्याच्या मंत्राच्या पाण्याने माणसाळत नाहीत अशी हिंस्र श्वापदे; रोखठोक सगिनीच्या पाण्याने माणसाळवता येतात, निदान निरुपद्रवी तरी करून टाकता येतात की नाहीं !?

दीत, फेसाळून, हिसाळून अफाट रागाने चवताळल्याप्रमाणे खळखळाटत होता. त्या दंडितांमध्ये बहुतेकांना समुद्र असा पाहण्याचा तो पहिलाच प्रसंग असल्यामुळे त्या अफाट जलाशयाला तशा अफाट रागाने खवळलेला पाहताच त्या नुसत्या भीषण देखाव्याच्या धसक्यासरशीच सारखे धडधड होऊं लागले. दंडितांना अेकमेकाशी बोलायची सवत 'ना'. असताही त्या धसक्यासरशी कोणाशी तरी आणि काही तरी अुद्गारल्यावांचून राहावेनासेंच होअून जो तो शेजारच्या दंडिताशी कुजबुजूं लागला, 'हाच तो काळ्या पाण्याचा समुद्र!' 'बापरे, ह्या अुंच तुंबळ लाटा अुसळताना पाहूनच माझा जीव खालीवर होत आहे!' 'अरे, काळ्या पाण्यावर धाडतात त्यांना ह्या अफाट समुद्राच्या पार कोणचं बेट आहे त्यावर नेतात, ते तरी खरं का रे?' 'मी तर अैकलं आहे, ही निव्वळ थाप म्हणून! आम्हांला ह्या थापेने फसवून मोठ्या थोरल्या आगबोटीवर चढवलं नि भर समुद्रात नेलं की बुडवून टाकतात साफ!' नवख्या दंडिताना थरथरकापवणाऱ्या शंका, निर्ढावलेले दंडित त्यांना देत असलेली प्रत्युत्तरें ह्यांची कुजबूज वाढत वाढत दबलेल्या कोलाहलाचे स्वरूप घेअूं लागली, तेव्हा पोलिसांची सहनशीलता संपून त्यांनी पुन्हा दरडावले, 'चूप! नहीं तो दंडुकेसे पीटे जावोगे!'

त्यासरशी पुन्हा सारे गप्प झाले. निर्ढावलेले आणि कारागारांत वारंवार रावलेले जे बंदिवान असतात, ते रखवालदाराची दृष्टि चुकवून शिस्त कशी मोडावी ह्यांत पुरते पटाअीत, पण नवखे बंदिवान त्यांच्या नादी लागून शिस्त तोडूं जाताच पटकन् पकडले जाणारे. त्यातही शिस्त तोडणाऱ्या निर्ढावलेल्या आणि दडम बंदिवानांच्या वाटेला सहसा न जाता नवख्या नरम बंदिवानांवर शिस्त मोडल्याचा राग काढणे रखवालदारांनाही सोपे जाणारें असते. त्यामुळे पुन्हा कोणी गलका करते कीं काय, हें पाहणाऱ्या अेका रागीट रखवालदाराने त्याच्या पलीकडे बसलेल्या दोघा-तिघा, मघापासून कुजबुजत असणाऱ्या पण निर्ढावलेल्या आणि दंडम न दिसणाऱ्या दंडितावर अुघडपणे तिकडे लक्ष नाही असें दाखवीत असताही चोरून डोळा ठेवला. थोड्याच वेळात पुन्हा जिकडे-तिकडे हळूहळू कुजबूज वाटत चालली आणि पचतही चालली आहे, हे पाहून त्या दोघां-तिघांपैकी जो अल्पवयी नवखा अेक जण, समुद्रांत नेअून बंदिवानांना बुडवतात, ह्या कल्पनेने पूर्वीपासूनच धडकी भरल्यासारखा झाला होता, तो आपल्या शेजारच्या अेका शिकल्यासवरल्यासारख्या दिसणाऱ्या दंडिताला अगदी गयवया करून पुनः पुन्हा विचारूं लागला,

'बाबूजी, कहो ना! अिसी समुद्रमें डुबायेंगे क्या हम सबको?'

'बच्चा, नहीं नहीं.' अेक निर्ढावलेला दंडित मध्येच, पोलिस पाठमोरा आहेसा पाहून झटकन् म्हणाला, 'अे बात झूट है! काळ्या पाण्यावरून पळून आलेल्या अेका पटाअीत पट्टधारास मी स्वतः तुरुंगात पाहिलं आहे. अंदमान म्हणतात त्या बेटाला. त्यावर नेअून सोडणार आम्हा साऱ्यांना!'

'आं! क्या बोले ?' तो मुलगा नवा जीव आल्यासारखा होअून अुद्गारला, 'काळ्या पाण्यावरून कुणी कुणी पळून परत सुद्धा येअू शकतो ? बाबूजी, तुम कहो तो हम सच मानेंगे अिस बातको !'

'दहा हजारांत अेखादाच ! असा नराधम अपराधी काळ्या पाण्यावरून पळून आलेला मी सुद्धा पाहिला आहे !'

हें वाक्य तो बाबूजी (साक्षर बंदिवानाला आणि कारकून वा मोठ्या योग्यतेच्या दंडिताला बंदिवानांत 'बाबूजी' संबोधितात.) शक्य तितक्या सावधपणे शेवटी बोलतो न बोलतो तों पाठ वळवलीसे दाखवून त्यांच्यावर लक्ष ठेवणाऱ्या त्या पोलिस रखवालदारानें झटकन् पळून धावून बाबजींना पकडलें. कारण पकडलें न जाता शिस्त कशी मोडावी, ही विद्या बंदिवासाचा प्रसंग अुभ्या जन्मात पहिल्यानेच आलेल्या आणि सरळ सरळ तें मोठ्याने बोलण्याची सभ्य जगतांतील सवय सुटून बंदिगृहात अवश्य तितका लुच्चेपणा अंगी अजून न मुरलेल्या त्या 'बाबूजी'चे ते शब्द त्यांची अिच्छा नसताही बरेच मोठ्याने निघून गेले होते.

रखवालदाराने बाबूजींवर झडप घालून त्याच्या कुडत्याचा गळा पकडून त्याला अुभे केलें आणि आपल्या जमादाराकडे खेचीत नेअून म्हणाला, 'वारंवार चूप बैस म्हणून सांगितलं असताही हा बंदिवान सारखा गलका करीत आहे. अितकंच नव्हे, तर अितर बंदिवानांना चिथावीत आहे की आपण काळ्या पाण्यावरून तुरुंग फोडून पळून जाअू.'

'काय ?' संतापाने लाल होअून जमादार ओरडला, 'काळ्या पाण्यावरून पळून जायचा कट ? नांव काय ह्या बेरडाचं ?'

रखवालदाराने त्या बाबूजीच्या छातीवरील बिल्ला पाहून जमादाराला त्याचें नांव सांगितले, 'कंटक.'

जमादाराने नांव आणि त्याच्या बिल्ल्यावरील बंदिक्रमांक आपल्या खिशातील नोंदवहीत टिपला आणि दरडावून तो म्हणाला, 'कटक, तुझा हा अपराध जर मी वर कळवला, तर तुझ्या गळ्याला तात लागेल. काळ्या पाण्यावरून पळणाऱ्याला पळताना गोळी घालतात, पकडला की फांशी देतात, माहीत आहे ? काळ्या

मुलगा नुसता थरथर कापत अुभा राहिला पण कटकवरील ह्या आरोपा-विषयीची पोलिसांनी चालविलेली ती सारी बाचाबाची मुळापासून अैकत असणारा तो निडावलेला बंदिवान पटकन् अुत्तरला,

'जमादारजी, हा बाबू आम्हाला सागत होता की, काळ्या पाण्यावरून कस पळायच ते त्याला ठाअूक आहे, तसा पळालेला अेक जण त्याचा पुढारी आहे नि आम्ही जर त्याच्या कटात मिसळू नि गुप्त बेत न फोडायच्या तशा शपथा घेअू तर अेका वर्षाच्या आत सगळे जण तुरुग फोडून काळ्या पाण्यावरून निसटून घरी परत येअू मी ह्याला म्हटल, 'आपण नाही बुवा येणार अशा भयकर कटात, नि घेणार शपथबिपथ '

त्या अट्टल सोद्या बदिवानाची ही साक्ष अैकताना तो कटक नुसता दिङ्मूढ होत्साता आ वासून अुभा राहिला मग अेकदम अुद्गारला, 'अरे, हें काय चालट' अितक्या अुलट्या काळजाचा मनुष्य असू शकतो अ ! अेक अक्षर देखील खर नाही हा सागतो त्यातील जमादारजी, शपथ देवाची मी '

दणकन् अेक दडुका कटकच्या माडीवर जमादाराने हाणून गर्जना केली, 'चूप ! ' बस्स्, त्या सार्‍या साक्षीपुरावा-आरोपावचावाचा न्यायनिर्णय त्या अेका दाटक्यात समारोपिला गेला

तोच घण घण घण कर्णची तरी घटा घणघणू लागली ' त्या तिघाना फोडून निरनिराळ्या रागातून बसव ' असे त्या पोलिस रखवालदाराला सागून जमादार धावतच घटा वाजली तिकडे निघून गेला ते चलान अदमानला जाणार्‍या आगनावेवर चढवीतोपर्यंतच त्याचा भार त्या जमादारावर असल्यामुळे आणि ती घटा ती, आगनाव येण्याचीच होती म्हणून कटकच्या त्या प्रकरणाचा जमादाराला तेथेच विसर पडला अेकदा आपल्या हातून त्या चलानाची व्याद आगनावेवर पाठवली की सुटलो आपण ! मग ते तिकडे पळोत वा जळोत ! त्याचे सव्यापसव्य हा जमादार असल्या भानगडींचे प्रतिवृत्त वरच्या अधिकार्‍याकडे पोचवत स्वत कशाला क तत बसणार ?

जमादार निघून गेला, ते प्रकरण विसरला, पण माडीवर हाणलेल्या त्या दडुक्याचा रट्टा विसरणे त्या बिचार्‍या कटकला थोडेच शक्य होते ? त्याच्या माडीत कळ येअून तो विवळत तसाच बसवले त्या रागत बसला त्या अन्यायाने, अपमानाने आणि विशेषत त्याला प्रतिकारण्याच्या सपूर्ण अक्षमतेने कटकला जगण्याची सुद्धा लाज वाटू लागली काळ्या पाण्यावर जगण्यासाठी जितकी निर्लज्ज तितिक्षा अवश्य, तितका तो त्या सद्गुणात अद्याप प्रवीण झाला नव्हता

पण कारागृहे आणि काळे पाणी ह्यांचेच जीवन ज्याच्या अस्तित्वावर आधारले आणि समर्थिले जाअू शकते, अशा निर्ढावलेल्या निर्लज्जातील तो साक्ष देणारा दडित बसल्या बसल्या त्या कटककडे पाहून फिदी फिदी हसत होता अुल्टा

शेजारच्या दंडितांना आपली अेक बढाओी म्हणून तो कटकवर घातलेले बालंट सांगत होता, 'अच्छा, जिवावर बेतली होती माझ्याच, पण दिली दबडून त्या शेळपट बाबूच्या शेपटावरच ! कटकच्या तंगडीवर असा अेक रपाटा देवला मी यव ! '

कटकला माडीत कळ अुठत असल्यामुळे सारखे अुकिडवे बसवेना शिपाअी, तर सारखा ओरडू लागला 'हा, अुकिडव ! सीधा बैठ !' कटकवर शिस्त मोडल्याचा दुसरा अन्याय्य प्रसंग गुदरणारच होता

पण अितक्यात जिकडून तिकडून त्या संगिनीवाल्या रखवालदाराचा गर्ज झाला 'अुठो ! महाराजा आया !'

कटक चमकून अुठला आणि जिज्ञासेने बघू लागला अेवढे कोणचे महाराज अिकडे येत आहेत ?

निढावलेले अनुभवी बंदिवान सारे अुठून समुद्राकडे बोट दाखवून कुजबुजले, 'महाराजा ! आरे बघा ते !'

कटक पहातो तो अेक मोठी आगबोट भा ऽ ऽ असा बब भुकीत त्या खळखळणाऱ्या लाटांच्या जंगलातून वाट कापीत धक्क्याकडे हळूहळू येत आहे, तिच्यावर 'महाराजा' असे अगडबंब नाव लटकले आहे

'महाराजा आया' म्हणजे हं जलयान, हे जहाज, आले ! हेच का आता मला काळ्या पाण्यावर नेणार ? त्या जलयानाला पाहताच कटकच्या पोटात धडकी भरल्यावाचून राहिली नाही

आजवर सहस्रावधि भल्याबुऱ्या स्त्रीपुरुष अपराध्यांना ह्या 'महाराजा' जलयानात ह्या धक्क्यावरून अुचलून काळ्या पाण्यावर नेअून सोडले असेल, पण त्यातील हजारी अेकाला देखील पुन्हा काही ह्या धक्क्यावर परत आणून सोडले नाही जो अेक काळ्या पाण्याचा दंडित म्हणून ह्या जलयानावर चढला काळ्या पाण्यावर गेला, तो गेला! ह्या जगाला तो मेला, हें जग त्याला मेले ! स्मशानात--मसणवटीत वाहून नेले जाताना प्रेताला जर काही वाटणे शक्य असेल, तर त्याला जें वाटत असेल, तेंच काळ्या पाण्यावर जाण्यासाठी जेव्हा दंडितांना ह्या 'महाराजा'वर चढविले जाते, तेव्हा त्यांना वाटत असते निदान त्यांच्या त 'वाटण्या'ची माणुसकी ज्यांच्यात अुरलेली असेल, त्यांना तरी तसेंच वाटत की, 'महाराजा' हं जहाज नमून आहे अेक थडगं ! ह्यात जो गाडला, तो पुन्हा जरी बाहेर पडलाच तरी पडणार त्या काळ्या समुद्रापलीकडील यमपुरीत ! यमलोकी ! ह्या लोकी नव्हे ! कटकला कळत होते आणि म्हणूनच ह्या 'महाराजाला' पाहिल्याबरोबर त्याच्या हृदयात धडकी भरली त्या वेळेपर्यंत तो मनाला विचारीत असे, 'ह्या समुद्राला काळं पाणी का म्हणतात ? तसं पाहिलं तर समुद्र ओलांडणं म्हणजे जातपात, धर्म नष्ट होणं हिंदुसमाजापुरता तरी अेक सामाजिक मृत्युच होणं, अशी सिंधुबंदीची रूढि जेव्हापासून हिंदुसमाजात बळावली, तेव्हापासून

समुद्र तितका काळे पाणीच वाटू लागला. काळाचा–मृत्यूचा–समुद्र भासू लागला. पण त्यातही ह्या अंदमानच्या जन्मठेपेवर जाणाऱ्यानाच काळ्या पाण्यावर जाणारे असे भयंकर नाव का मिळाले ?' त्या समुद्राचे पाणी कटक किती वेळ तरी बसल्या बसल्या पाहात होता, पण ते विशेषण काळे का तें काही त्याला आकळेना. पण ते 'महाराजा' जल्याने वचनाचे आणि 'आता ते मला ह्या आजवरच्या आप्तेष्ट जात गोताच्या जगातूनच नव्हे तर जीवनातूनच हिसडून अत्यंत दुर्दशेच्या घृणा मृतसडात नेऊन खचित खचित गाडणार' ही प्रत्यक्षता पटताच त्याच्या हृदयात जी धडकी भरली, त्यासरशी मात्र त्याला तो सारा समुद्र खराखरच काळा काळा कभिन्न दिसू लागला. त्याला काळे पाणी का म्हटले तें त्याला कळले–नव्हे, काळे पाणी ह्या नावाहून दुसरे यथार्थ नाव त्याला दिले असतें तर तें वदतोव्याघातच कसे झाले असतें ते त्याला पटले.

हा कटक म्हणजेच वाचकहो, तुमच्या ओळखीचा तो किशन. त्याला आणि मालतीला जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा झाल्यानंतर त्याची जी ताटातूट झाली ती झालीच. तिला कोणत्या बंदिगृहात धाडले ते त्याला पत्ता करूनही कळले नाही. त्याला निरनिराळ्या कारागारात काढीत कोंडीत दर चार–पाच महिन्यांनी साचलेले काळ्या पाण्याचे दंडित गोळा करून अनेक टोळी काळ्या पाण्यावर धाडण्याच्या पद्धतीप्रमाणे ह्या टोळीत धाडण्यासाठी जेव्हा कलकत्त्याला आणण्यात आले तेव्हा त्या जिवावरच्या संकटातही अेक स्निग्धभीषण जिज्ञासा त्याला चैन पडू देत नव्हती. न जाणो, मालतीला पण ह्याच 'चलाना'त जन्मठेपीवर काळ्या पाण्याला धाडण्यासाठी आणली जाअील की काय ? तिला तशा दुर्दशेत पाहणे टक्लण किती असह्य, किती कटू ! पण त्या निमित्तें का होअीना पण तिला निदान पाहणे, संकट भोगणेच तर अेकत्र भोगताना वाटून घेऊन भोगणे त्यातल्या त्यात गोड ! गुपचूपपणे त्याने किती शोध केला, पण दंडित स्त्रिया अशा काही त्या चलानात पाठवल्या जाणार नव्हत्या आणि असल्या, तरी त्यांना पुरुषी चलानाच्या दृष्टीला सुद्धा शक्य तो न पडता धाडण्याची स्वतंत्र व्यवस्था ठेवलेली असते तीच योग्य

ठेवलेलें पण रूप तेच त्याने आपल्याला ओळखलें तर? तो क्रूर नराधम आपला सूड उगवण्यासाठी पुन्हा वाटेल तो अत्याचार करायला सोडणार नाही आपल्यालाही प्रत्याघात केल्यावाचून राहवणार नाही ह्या आधीच गुदरलेल्या अेका भयंकर संकटात दुसऱ्या भयंकर यातनाची घोरपड गळ्यात पडणार होवो काय होईल ते आता! जे वाअीट ते झालच आहे–जन्मठेप काळे पाणी काय, मृत्यु काय अुडदात काळे-गोरे ते काय निवडायचे? अशा विचारे किशन त्या आपत्तीला तोंड देण्याची मनोमन सज्जता करीत असताही ती आपत्ति टळेल तर बरें, असेच त्याला वाटत होते. म्हणूनच त्या चलानात तो रफिअुद्दिन किंवा त्याच्या त्या खटल्यातील कोणीही साथीदार दिसत नाही हे पाहून त्याला ती अेक नवी आपत्ति तरी टळली, हे बरे वाटले होते फासावर चढवले जाताना सुद्धा डोळे बांधून चढवले म्हणजे थोडे बरेच वाटते त्यातल्या त्यातही!'

ते चलानचे चलान खणखण खळखळ बेड्या वाजवीत, प्रत्येकाच्या खांद्यावर अंथरूण, हाती थाळीपाट, चार-चाराची रांग अेकेकाची होअून 'महाराजा'वर चचरत चचरत झाकाडच्या घेत लाटावर बळकट हेलकावे घेणाऱ्या त्या जल्यानाच्या अरुंद शिडीवरून अेकदाचे चढले ते 'महाराजा'-जलयान केवळ काळ्या पाण्यावरीच ये-जा करण्यासाठी राखलेले, गेली तीस-चाळीस वर्षे तरी अशा शेकडो 'चलाना'ना जन्मठेपेवर नेअून सोडीत आलेले! त्यावर पाअूल टाकताच लाटांच्या हेलव्याची सवय नसलेल्या आणि हृदयातील अुदास, निराश धडधडीच्या हेलकाव्याने आधीच चक्करलेल्या किशनला अगदी भोवळ आल्यासारखी झाली ही आगनाव जन्मठेपेवर नसली, मृत्युठेपेवरच आपल्याला नेत आहे, असे त्याला होअून गेले अेका खांबाला टेकून तो भोवळ सावरीत होता, तोच शिपायाने 'आगे बढो!' म्हणून दडुक्याने त्याला ढोसले त्यासरशी रांगेत पुन्हा नीट अुभा होअून सर्व बंदिवानासह तो आगनावेतील अगदी खालच्या, पाण्याच्या आत बुडालेल्या जाड तळाशी अुतरून आला पाहातो तो लोखंडी गजाचा बनलेला अेक

होओना, पण समसमानता अशी चोख की त्यापेक्षा वर्णभेद, जातिभेद, धर्मभेद, स्थितिभेद अधिक निगरगट्टपणे नाकारायला रशियाच्या बोल्शेव्हिझमाची देखील छाती होऊ नये !

किसनही त्या दाटीत धमाधमा आपली वळकटी ठेवून मटकन खाली बसला त्याला पूर्वीपासूनच मळमळ वाटत होती त्यात पडावातून बोटीवर येताना तर अनेक बंदिवानांना जशा भडाभड उलट्या होत होत्या, तशाच त्यालाही येऊ लागल्या ओकण्याची स्वतंत्र जागा कोठली ? जो जेथे बसला, तेथच ओकू लागला त्यातही निलज्ज दंडेलीत जो जितका अधिक आततायी, त्याचा तितकी अधिक सोय बळाने धक्के मारून आपण शक्य तितके पाय ते पसरीत शिपायांनी शिव्या दिल्या, दडुके मारले, तरी त्याची त्यांना लाजच नव्हती सवयीने तितकशी भीतिही नव्हती पण ज्यांना ती भीति असे आणि दुसऱ्याची मुंडी मुरगाळण्यात थोडी तरी लाजही वाटे, अशा भ्याड किंवा माणुसकी अगदीच कोळून न प्यालेल्यांनाच ती दहशत त्या पोलिसांच्या आणि नीच दंडितांच्या शिव्या आणि

रफिअुद्दिन नाही का काळया पाण्यावरून पळून थाला? मलाही तस येता येणार नाही कशावरून ? '

ह्या गुंगीतल्या अस्ताव्यस्त पण बळकट विचारासरशी त्याची मरू घातलेली आशा अेकदम अेक अुसळी मारल्यासारखी चमकून अुठली मरणासन्न मनुष्य अकस्मात् प्रबळतेने हातपाय झाडतो, तशी त्याची आशा सहसाच झडझडून बळावली त्याने तर्कशास्त्र अभ्यासले होते आणि (कुतर्क हाही एक तर्कच आहे ! शक्याशक्यता, साध्यसाधने, ह्याचा अेक अडथळा आशेच्या आणि घाताच्या झट-क्याला अडवीत नसतो बुडता जो काडीचा आधार घेतो, तो जसा घेतल्यावाचून राहवत नाही म्हणून घेतो,) तसा त्याच्या काळया पाण्याच्या अथांग समुद्रात बुडणाऱ्या आशेने त्या विचाराना पटकन् कवळले आणि त्याचे त्या बेभान गुंगी-तले सार भान तेच अेक वाक्य अेकवटून अुद्घोषू लागले, 'काळया पाण्यावरून पळायच ! बस्स्, पळायच ! '

खळ ऽऽऽखळ्ऽऽऽ सळसळाटत आगनावेची चाके, पखयंत्रे, समुद्राच्या पोटात ढवळावे तशी ढवळू लागली 'निघणार ! सुटणार ! बोट काळया पाण्याकडे सुटणार ! ' पोलिस, बंदिवान नाखवा, नावाडी, अधिकारी, चाकर, साऱ्याच्या तोंडातून हा एकच ध्वनि अुठू लागला

तोच खाडखाड् बूट अुडवीत दोन गोरे सार्जंट बेडी हातकडी ठोकलेल्या अेका बंदिवानाला सक्त पहाऱ्यात खाली अुतरवीत त्या पिंजऱ्याच्या दाराशी ठेपले धाडकन् त दार अुघडले आणि त्या पिंजऱ्यात, त्या विशेष बंदोबस्तात आणलेल्या अट्टल दंडिवासह ते सार्जंट आत शिरले

त्या खडखडीसरशी चमकून अेवढे सार्जंटबिर्जंट कोणाला घेअून येताहेत, ते पाहण्यासाठी विशान पडल्यापडल्याच टाळे अुघडीत तिकडे बघू लागला तोच !

जशीं पेंढार्‍यांच्या काही पुढार्‍यांनीं पुढे संस्थानें झालीं, तसेच धाडशी दरोडे-खोर जेव्हा जेव्हा राज्यें स्थापून राजे होतात, तेव्हा तेव्हा राजे होताच ते राजा-प्रमाणेच वागूही लागतात. त्यांचा अन्याय वजा जाता अितरांच्या न्यायान्यायाचे निवाडे ते नीस करतात. त्यांची लूट वजा जाता अितरांना आपसात लुटू देत नाहीत. त्यांना यावासा वाटेल तो अुपद्रव वजा जाता अितर प्रकरणी दुसऱ्यांना आपसातील उपद्रव कमी करण्यासाठी दयाळूपणाची अुदारताही दाखवितात.

'रफिअुद्दिन अेक क्रूर मनुष्य होता. त्याची क्रूरता सवळून अुठण्याअितका त्याच्या मनाचा कल जोवर कोणी मोडीत नव्हतें, तोवर तोही निव्वळ मनुष्य-पणानेच वागत होता. त्याने काळ्या पाण्याच्या नावाने घाबरलेल्याना कितो तरी धीर द्यावा, "घबराव मत्! दहा हजार लोक तिथे चांगले पंचवीस, तीस-चाळीस वर्षं जिवंत राहतात; कित्येक बायका, मुलंबाळं अना पसारा वाढवून संसारही थाटतात; शेती आहे, गुरंढोरं घरंदारं सर्व काही आहे तिकडे! अरे, मी तुम्हासारखाच प्रथम घाबरलो होतो, पण तिकडे गेल्यावर चांगले हजार रुपये गाठीला बांधून बसलो होतो. घबराव मत्, पट्ठे, घबराव मत्!' कित्येकाना, रेच-अुलटयाचा फारच त्रास झाला असता त्याने शिपायांशी आणि वेळी डॉक्टरशीही भांडून त्यांनाच, बंदिवानांना कसें वागवलें पाहिजे, ते नियम का मोडता असें फटकारून, कप्तानसाहेबांना सांगू म्हणून दमदाटीही करून, औषधें देणें भाग पाडावें. त्याला हवी असलेली चण्यापोह्यांची पोटगी जे त्याला आपल्या वाट्याची अर्पीत, त्यांना तो त्याला नको असलेल्या विड्यांची थोटके चोरून घ्यायलाही देअी. त्याच्याच चरित्रातील खऱ्याखोट्या प्रसंगाच्या अशा अवाच्या सवा गोष्टी तो सांगे, अशी पदें, भजनें गाअी, की त्या बंदिवानांना त्यांच्या आजाराचें आणि हालअपेष्टांचें सुद्धा काही वेळ विस्मरण व्हावें, मन रमावें. त्या प्रत्येक जन्मठेप्यापुढे मागे, वर, खाली पिशाच्चासारखा अेकच प्रश्न त्या दुर्धर प्रसंगी अुभा असे, 'काळं पाणी कसं असेल? काय काय भयंकर यातना तिकडे भोगाव्या लागतील? त्यातून येतच असेल, तर सुटका कशी करून घेता येते? प्रत्येक मनुष्याला 'यमपुरी कशी असेल?' ह्या प्रश्नाची जशी असह्य जिज्ञासा, तसेंच 'महाराजा'वरील जन्मठेप्याला 'काळं पाणी कसं असेल?' ह्या प्रश्नाचें अेक वेड लागलेलें असते! ज्याला जो भेटेल, त्याला तेंच विचारावेसें वाटे. अशा मनःस्थितीत काळे पाणी प्रत्यक्ष भोगून आलेला तो रफिअुद्दिन म्हणजे त्या लोकांना यमपुरीचा भूगोल रेखाटणारें मूर्तिमंत गरुडपुराणच वाटला! किसनच्याही मनात त्याला ती माहिती विचारावी आणि विशेषतः तो काळ्या पाण्यावरून कसा पळाला ती रोमहर्षक कथा अेकावी अशी अुसळी येत होती. पण ओळख निघण्याच्या भीतीने 'भीक नको पण कुत्रा आवर' असें धोरण अवलंबून किसनने पहिले अेक-दोन दिवस रफिअुद्दिनकडे अुघडपणे बघण्याचा प्रसंग देखील टाळला.

परंतु रफिअुद्दिन थोडाच स्वस्थ बसणार होता ? त्याचा पहिलाच कार्यक्रम म्हणजे त्याला दिसले त्या त्या विशेष बंदिवानाच्या खटल्याची आणि चरित्राची माहिती विचारण्याचा होता जन्मठेपेवर जाणाऱ्या प्रत्येक बंदिवानाची कथा म्हणजे अेकेका अजब कादंबरीचे भयानक ! असाधारण दुष्टता, सुष्टता, विक्षिप्तता, सवटे, सुटका, रक्तपात, हत्या, अुपद्रव, सूड, सुख दुख, दुर्दशा ह्याचा तो कोलाहल ! तो पिंजरा म्हणजे जगातील कोणत्याही ग्रथालयात न सापडणारे असे भावना अुचंबळून आणि अुन्मळून सोडणाऱ्या कादंबऱ्यांचे अेक कपाट ! नव्हे, खलनायकाचे जिवंत प्राणिसंग्रहालय ! पहिल्या वर्गातील अुतारू कोण्या आगबोटीवर जसा रोमहर्षण कादंबऱ्यांची पुस्तकं चाळीत केबिनमध्ये गुगून पडतो, तसाच रफिअुद्दिन त्या पिंजऱ्यामध्ये त्या अेकेका दंडिताचे रोमहर्षक चरित्र चाळीत नुसता रंगून गेला होता किशन जरी चुपचाप, समुद्र लागून मरगळलेला आणि थिल्लरपणे अंथरुणा-वरच पडलेला होता, तरी त्याच्याकडे रफिअुद्दिनचे लक्ष दोनदा-तीनदा जायचे न गेल्यच होते आपल्या खटल्यातील त्या ' अुल्लू किशन ' ची त्याची मुद्रा किती तरी मिळते, असे आश्चर्यही रफिअुद्दिनला अेकदा-दोनदा वाटले, पण किशनसारखा अेक ' मुर्दाड अुल्लू ' अेकदा तशा भयंकर खटल्यातून निर्दोष सुटल्यावर पुन्हा असल्या भानगडीत कधी काळी पडेल ह्याची कल्पना देखील त्याला असंभाव्य वाटल्यामुळे रफिअुद्दिनच्या मनाला तो विचार अेकदा चाटून गेला तरी चिकटून असा मुळीच राहिला नाही तरी देखील त्या जिवंत रहस्यकथा वाचता वाचता हें पुस्तकही कसल आहे, असे वाटून रफिअुद्दिनने दोघा तिघाच्या शेवटी विचारलेच, ' हा प्राणी कोण बुवा ? न हालतो, न हसतो, न बोलतो, न चालतो ! अगदीच थिल्लर ! भुरटा चोर दिसतो कुणी ! '

## १०. अंदमानच्या वाटेवर !

'रफिअुद्दिनची दृष्टि किसनच्या दृष्टीला भिडताच हा आताच आपल्यावर झडप घालणार असे होअून किसनच्या मुठी मारामारीच्या अुसळीने आपोआप वळल्या. पण अेका क्षणात रफिअुद्दिनने आपल्याकडे पाहिले तसेच अितर बंदिवानांकडेही तो पाहू लागला आहे, तो कोणत्याही प्रकारे चलबिचल झालेला दिसत नसून त्याचे सारे लक्ष, त्याची वळकटी त्यातल्या त्यात अघळपघळपणे कोठे टाकता येअील ह्याच विवंचनेत गुतलेले आहे, असे किसनला दिसले त्या अवकाशात त्याला थोडा विचार करायलाही वेळ मिळाला 'जर ह्याने मला पक्के ओळखले नाही तर ? तर आपणही आपली ओळख ह्याला होअू देअू नये आपण कटक ह्याच नावाचा दुसरा कुणी बंदिवान आहोत, अशीच ह्याची समजूत शक्य तो करून द्यावी, कर-वेल तो ह्याच्याशी ओळख व्हायचीच टाळाटाळ करावी, असा त्या अवकाशात किसनने निश्चय केला आणि तो पुन्हा आपल्या वळकटीवर डोके टेकून, मिटल्या-सारखे वाटणाऱ्या पण किलकिले असणाऱ्या डोळ्यांनी, रफिअुद्दिनच्या हालचाली

आता किर्रर्रं अंधकार पडला होता. तें जलयान कलकत्याचें बंदर सोडून काळ्या पाण्याच्या वाटेला लागून समुद्रातून भर वेगात चाललें होतें. कलकत्याहून अंदमानला जायला जे चार पांच दिवस लागतात, त्यांमध्ये बंदिवानांना केवळ पोहे आणि फुटाणे ही कच्ची पोटगीच काय ती मिळते. कारण त्या दंडितांतील बहुतेक जण घाबरलेले, समुद्रप्रवासाचा जन्मातला तो पहिलाच प्रसंग असल्यामुळें अेकसारख्या अुलटया होणारे, खाण्यावर वांछाच नसते असे असतात आणि दुसरें कारण की, अेवढया शंभर शंभर जणांच्या संपाकपंगतीची सोय आणि व्यय करण्याची अधिकाऱ्यांनाही खुमखुमी नसते. त्याप्रमाणे सर्व बंदिवानांना चणेकुर-मुरेपोहे—जे सध्याकाळी पिंजरा बंद करतानाच वाटून दिले होते ते—अुलटया होणाऱ्या बहुतेकांनी तसेच ठेवलेले होते. पण रफिअुद्दिनला तो काळ्या पाण्याचा समुद्र म्हणजे अेक जुनाच सोबती होता. रफिअुद्दिन घाबरलेलाही नव्हता. अुलटया होणाराही नव्हता, त्याला अुलट खमंग भूक लागलेली होती. त्याची छाप त्या साऱ्या दंडितावर आधीच पडलेली. सम्राटच होता तो त्यांचा! तेव्हा त्याने आपला कर राजा अुकळतो तशा निष्पाप भावनेने त्याच्या आसपासच्या त्या दंडितांकडून त्यांची पडलेली पोटगी चक्क मागून घेतली. अेक दोघांनी अळंटळं करताच काही तरी दुसऱ्याच निमित्ताने भांडण अुभारून, शिव्या हासडून त्यांना दरडावलें आणि त्यांचीही पोटगी अुपटली. तो चण्यांचा आणि पोहे-कुरमुऱ्यांचा ढीग फाकून टाकून रफिअुद्दिन आता पिंजऱ्याच्या गजाशी कोणाची तरी वाट पाहत थोडा अुभा राहात होता. थोडा बसत होता. त्याला कोणी बंदिवानाने विचारले तर सांगत होता,

आज-सुद्धा 'बाबू' चे महत्त्वाचे काम मिळणार ! मनुष्यहत्येचा अपराध तात्कालिक आवेशात घडणे हा अेक त्यातल्या त्यात सौम्य अपराध समजला जावा, हें रफि-अुद्दिनसारखे उलट्या काळजाचें निर्ढावलेले नृशंस पापीच ज्या काळ्या पाण्यावर जिकडे तिकडे पसरलेले आहेत, त्या यमपुरीत अगदी न्यायाला धरूनच होतें ! त्यामुळे तिकडे गेलेल्या दंडितामध्ये जो अशा तात्कालिक आवेशात घडलेल्या हत्येसारख्या अपराधाचा बंदिवान असतो तो सुधारणीय बंदिवानाच्या वर्गात नोंदविला जातो आणि त्याला पुष्कळ सौम्यपणे — काळ्या पाण्याच्या क्रूरतेतील सौम्यपणे — वागवले जात त्यातही अशा 'सुधारणीय' वर्गातील बंदिवानांपैकी जर कोणी लिहिणारा वाचणारा असेल तर त्याला काळ्या पाण्यावर बंदिवानातील लेखकाची जागा मिळते त्याच्या हाती साहेबाच्या सान्निध्याची किल्ली पडल्यामुळे अितर निढाव लेल्या दरोडेखोरादिक बंदिवानाच्या भवितव्याची बरीच सूत्रें त्या लेखक बंदि वानाच्याच प्रतिवृत्तान्तावरून चालविली जातात काणाला वॉडर करणं वॉडरांना लाभाची सोयीची कामं वाटून देणं, कारद्वारावरील आवक जावक टिपण, शिपायांची अुपस्थिति ठेवणे, मोठमोठ्या कारखान्यांचे आयव्ययगणन ठेवणे, अशी कामं ह्या लेखक बंदिवानाच्या हाती हळूहळू सोपविली जातात, त्यामुळे निढावलेल्या बंदि वान वॉडर प्रभृति दंडितांवरच नव्हे, तर स्वतंत्र अशा शिपाअी-कामगारांवरही ह्या बंदिवान लेखकवर्गाची मोठी छाप पडलेली असते त्याची सगळी लाचलुचपतीचें अर्धापिल्ली अुघडकीला आणणें वा अुबविणं पुष्कळ अशी ह्या बंदिलेखकाच्या हातीच असते ह्याच बंदिलेखकांना 'बाबू' म्हणतात दंडित, जन्मठेप्याच्या परिभाषेत !

सापडणार नाही कशावरून? अशी निकराची धाडसी आशाही कटकला मोहवू लागली! गारुडी जसा नागाशी तसा कटकही रफिअुद्दिनाशी त्याच्या विषारी दंशाच्या टप्प्याबाहेर शक्य तों राहून करता येईल तसा खेळ करू लागला. याची आपल्याला काहीच माहिती नाही, हें रफिअुद्दिनच्या मनावर पूर्णपणे ठसविण्यासाठी गप्पांचा अड्डा रात्री पडला तेव्हा किशन म्हणाला,

'पण मिय्याजी, आपल्यासारखा धाडसी नि चतुर पुरुष काळ्या पाण्यावरून पळून येण्याच्या दुष्कर अशा लपडावी साहसात तिकडे यश मिळवतो नि अिकडे देशात गुखरूप पोचल्यानंतर हिंदी पोलिसाच्या जाळ्यात पुन्हा न फसण्याची जी खबरदारी साधी चतुराशी ती करण्यास चुकून त्यांच्या जाळ्यात अितक्या पक्केपणी पुन्हा फसतो, हें झालं तरी कसं? चोऱ्या, दरोडे अित्यादि दुष्कृत्यांपायी अेकदा भयंकर ठोकर खाल्ली असता आपण हिंदुस्थानात पळून आल्यानंतर पुन्हा या संकटमय अुपद्व्यापात पडले नसतेत तर बरं झालं नसतं का? तुम्हांला काळ्या पाण्यावरून पळून येण्यात जी जिवावरचीं संकटं भोगावी लागलीं असतील तीं ह्या चुकीमुळे सारी निष्फळ व्हावी नि पुन्हा तीच दुर्दशा भोगायला जावं लागावं ह्याचं मला फार वाअीट वाटतं, म्हणून विचारल्यावाचून राहावत नाही!'

कंटकबाबू, क्या कहूं! मैंने सचमुच बडे प्रामाणिकपणसे अपना जीवन चलानेका निश्चय किया था! काळ्या पाण्यावरून पळून हिंदुस्थानात येताच मी फकिरीच घेतली!! हिंदु साधूवरही माझी भक्ति बसल्यामुळे मी योगाच्या अभ्यासाला लागलो. कंटकबाबू, तुम्ही सारे जण खरं माना न माना, पण देवाच्या शपथेवर सांगतो की, पूर्वी दरोडे, चोऱ्या, अुपद्रवादि पाप मी जी केलीं ती केलीं पण काळ्या पाण्यावरून आल्यानंतर मी जर कशाचा लोभ धरला असेल तर तो, भक्तीचा, योगाचाच काय तो होय. भोग असा मला रुचेनासाच झाला. आणि खरं पाहता मजवर हें संकट जें पुन्हा गुदरलं ते माझ्या कोणत्याही नव्या दुष्कृत्यामुळे नसून धर्मन्यायाने वागायचा निश्चय केल्यानंतर जें अेक सत्कृत्य माझ्या हातून

सरदाराची अेक अत्यंत सुस्वरूप मुलगी होती. तिचं नांव मालती. ती जितकी गोरीपान, सौंदर्याने निर्मळ, तितकीच देवलसी. मी योगाचा अभ्यास हिंदु स...... करीत असता भगवी कफनी घाली नि देवळात बसे. तिथेच ती पूजेला येअी. मला पाहता पाहता तिची माझ्या साधुत्वावर म्हणा, रूपावर म्हणा, पण फारच भक्ति जडली. तिने पूजेचीं फुलं मलाच वाहावी, नैवेद्यही दाखवावा, भजनाला रात्र पडेतो बसावें. अेक वेळीं तिला अशीच रात्र झाली. तेव्हा 'अेकटी घरी जायला भीति वाटते, आपण घरापर्यंत मला पोचवा,' म्हणून तिने गळ घातली. माझ्या गुरुजींना विचारून निःसंकोचपणाने मीही तिला पोचवायला निघालो. देअूळ गावापासून लांब, मध्ये अेक आघराअी, निर्जन, तिथे येताच अेकदम घाबरून गेल्यासारखी मालती माझ्या अंगाला लगटली. स्त्रीस्पर्श मला तर वर्ज्य! पण काय करणार? तिने गळ्यालाच मिठी मारलेली! थरकापत ती म्हणाली, 'माझ्यावर अेक मनुष्य पापी दृष्टि ठेवून आज कित्येक दिवस मला सतावतो आहे. मी तुम्हांला देवासमान मानून भजते, तुमच्याकडे येते, जाते, तें असह्य होअून मला त्याने काल अिथेच अडवलं होतं नि ठार मारायची धमकी दिली होती. ह्यासाठी मी आज तुम्हाला सोबतीला घेतलं! मला त्याची आत्ताच चाहूल लागलीशी वाटते!' मी विचारलं, 'तो कोण? त्याचं नांव काय?' ती म्हणाली, 'किशन! त्या नीचाचं नांव किशन!'

'तें नांव अैकताच माझ्या अंगावरही रोमांच अुभे राहिले! कारण ती व्यक्ति माझ्या चांगल्या माहितीची होती! काळ्या पाण्यावर मी पूर्वी गेलो त्याच्या आधी आम्ही जे दरोडे मारीत असू त्या टोळीतच किशन हा अुलट्या काळजाचा दरोडेखोर सामावलेला होता. पळून आल्यानंतर तो मला ग्वाल्हेरलाच गुप्तपणे भेटला नि मी पुन्हा त्याच्या दुष्कृत्यात भागी ठेवावी असं म्हणाला. पण मी 'माझे हातच नव्हे तर मनही सर्व पापामुळे धुअून देवाच्या सेवेला वाहिलं — तूही आता असंच कर!' असा अुपदेश त्याला देताच तो शांत न होता अुलट खवळला. माझी तीव्र निर्भर्त्सना करून माझा सूड अुगवायची धमकी देता झाला. त्या सर्व माहितीमुळे मी किशनला चांगलाच ओळखून होतो! किशन अेक अधम होता. किशन हा अेक निर्दय भामटा होता. किशन भयंकर दुराचारी होता. वृत्तीने दुष्ट असताही तो बुद्धीने निव्वळ अेक गद्दा होता! कंटकबाबूजी, आप जो क्षमा करेंगे तो केवल हसीकी अेक बात बतलावूंगा! सांगू? हसू येतं आता मला त्याचं! पण मी ह्या पिंजऱ्यात कोंडलो गेल्यानंतर प्रथम प्रथम जेव्हा

आहे, त्यांत मीच किशन आहे की नाही हें चाचपण्याचा तर ह्याचा हेतु नाही ना ? अशी शंकाही 'कटक'ला आली आणि त्याचा तोच हेतु असल्यास तो निष्फळावा ह्यास्तव रफिउद्दिनने किशनला हासडलेल्या शिव्यांची गुप्त चीड, मारुतीच्या नावाचा त्याच्या तोंडी चाललेला तो उद्धार ऐकताच वाटणारा सोपहास तिरस्कार आणि ती शंका ह्या सर्व विचारांची सळवळ आतल्या आत दाबून कटक रफिउद्दि-नच्या आणि बंदिवानांच्या हसण्यांत आपलेही हंसू मिळवीत म्हणाला, 'ठीक, मिय्याजी, ठीक तो किशन अखेर निव्वळ गद्धा होता म्हणतां नि माझा तोंडवळा त्याच्यासारखाच तुम्हांला दिसला म्हणून सांगतां, म्हणजे माझा तोंडवळा गद्धया-सारखा आहे असं वा तुमचं म्हणणं ?'

हसत पण हात जोडून रफिउद्दिन क्षमा याचूं लागला, 'हं काय बाबूजी ! किशनची बुद्धि गाढवासारखी होती, पण त्याचा तोंडवळा चांगल्यापैकीं होता, हें मी आपल्या तोंडवळ्याशीं ताडून सुचविणार होतो ! कुठें सदाचारी कटकबाबू नि कुठें तो दुराचारी किशन ?'

मोठ्याने हसत म्हणू काय हवा तोच प्रश्न झाला असें वाटून रफिअुद्दिन मिटक्या मारीत बोलला, 'मित्रा, शपथ देवाची! मालतीचा राग! तशा स्थितींत तिथे शुकदेव जरी असता तरी त्याला सुद्धा आला नसता! मालती! हाय! मेरी गोरीपान मखू मखू मालती! तिचा राग? अरे मित्रा, ती माझी जान आहे जान! सगळे बंदिवान खो खो हसले!

भर रंगभूमीवर कोण्या काळ्याकुट्ट नटाच्या तोंडावर फासलेली रंगाची पूड मध्येच कोठे पुसून गेली असता त्याचा काळा रंग तेवढ्या जागीच डांबरी चट्ट्या-सारखा जसा दिसू लागतो तसें त्या ढोंगी मनुष्याच्या मनाचे मूळचें काळेपण ती साधुत्वाची शुभ्र पूड अशी पटकन् पुसली जाताच अुघडें पडले! पण नट जसा लोक हसताच सावधून तो काळा चट्टा रुमालाने झाकून मूळचा अभिनय पुढे कसा-बसा संपवून टाकतो, तशा गोंधळात रफिअुद्दिनने मनाची सावरासावर केली.

'पण मला हो ना म्हणायला तिने वेळच दिला नाही. कुठलासा कसल्या त मोहनाचा अेक रुमाल तिने माझ्या नाकाशी घट्ट धरला; त्या श्वासाने मी गुंगल्य सारखा झालो नि निपचीत पलंगावर पडलो. अर्धा बेशुद्ध, प्रतिकाराला पुर अक्षम! फेर क्या पुछते हो यार! बस्स् मोहनास्त्राने हालचाल बंद केलेल्य भान हरपलेल्या माझ्यासह ती प्यारी मालती मनसोक्त आनंद लुटीत राहिल पहाटेच्या वेळेला तिने हुंगायला दिलेल्या त्या मूर्छाचूर्णाची गुंगी ओसरून मी पुरत भानावर आलो नि म्हणालो, 'अे जादूगारीण! अब तो मुझे छोड दे! सकाळ तुझे लोक मला पकडतील, तुला पकडतील!' ती म्हणाली, 'छट्! प्रियकरा, काय बोलतोस! कामरूप देशातील अेका मांत्रिकाने मला अेक विद्या शिकवल आहे. मी तुला अेक पोपट करून ह्या सोन्याच्या पिंजऱ्यात दिवसभर ठेवीत जाअीन; रात्री पुन्हा तुझं रूप तुला येअून तू माझ्याशी असाच रममाण होत जा!' हें तिच बोलणं अैकताच मी भीतीने थरथर कापू लागलो! पुराण्या कथानकांतून अश कामरूपातील मांत्रिकांच्या विद्या शिकून माणसांना पक्षी करून ठेवलेल्या जादू-गारीण राजकुमारींच्या मी ज्या अजब गोष्टी वाचल्या होत्या, त्या मला आठवल्या!

मध्येच अेक छद्मी बंदिवान हसला, 'त्या अजब गोष्टींतीलच ही अेक गोष्ट नांव बदलून तर सांगत नाही ना मिय्याजी आपण?'

पाहिजे ! आणि ह्या अवलियापुरतेच पहायचे तर हिंदु अवलिया अगस्ति हाच ह्या मुस्लिम अवलियापेक्षा अधिक करामतीचा होता हे उघड आहे की नाही हें तुम्हीच सांगा. कारण ज्या समुद्राचे पाणी नाकातोंडात भरून हा मुस्लिम अवलिया गटांगळ्या खाता झाला, तो समुद्रच मुळी त्या अगस्ति ऋषीच्या होती केवळ स्पुदाम !'

सारे हिंदु बंदिवान खिजमतदार खो खो करून हसले ! जो तो म्हणू लागला 'भली जिरवली !'

पण ह्या एकाएकी झालेल्या गलबल्याने रागावून पिंजऱ्यावरील पहारेकरी ओरडला, 'अरे बदमाश लोग ! तुम्हाला चुपचाप बोलायची सवलत दिली, त्याचा हा परिणाम करता काय ? काळ्या पाण्याच्या पिंजऱ्यात आहां, की आपल्या बापाच्या बंगल्यात ? उठा जा, आपापल्या अंथरुणावर जाऊन निजा ! जाव ! जाव !

सारे जण त्या कडक आज्ञेसरशी पटापट आपापल्या अंथरुणावर जाऊन पडले, तरी देखील पहारेकरी रफिउद्दिनच्या अंगा हळुहळू न पिवळा चालला असल्यामुळे रफिउद्दिनकडे काही त्याने प्रत्यक्ष असा त्या आज्ञेचा रोख दाखविला नव्हता. ह्यामुळे रफिउद्दिन मात्र तसाच एकटा कटकबाबूच्या अंथरुणापाशी टेकाव धरून पण गुपचूप असा थोडा वेळ बसला. मग वातावरण शांत झालेले पाहून, एकान्त साधून कटकबाबूच्या अगदी कानाशी बोलू लागला :

'कटकबाबू, आजची ही ह्या पिंजऱ्यातील अखेरची मोकळेपणी बोलण्याची शेवटली रात्र ! उद्या ही आगबोट खाऱ्या पाण्याला लागणार. आपण सर्वजण त्या भयंकर तुरुंगातील कोठड्यांतून, एकेकाकडी कोठड्यांतून तल्वद कुलुपबंद केले जाणार ! मला प्रथम प्रथम फार कडक पहाऱ्यात ठेवण्यात येईल. फार कठीण सक्त काम देण्यात येईल, छळ होईल. पण तुम्ही लवकरच बाबू '

'मनीषा! मिय्याजी, माझा तो निर्धार आहे, नुसती अिच्छाच नव्हे! पण मार्ग कोणता? साधन काय? तुमच हे बोलण प्रामाणिकपणाच आहे हे मी कस समजू? तो खरी खरी माहिती जर मला पटेल अशी सागाल, तर मी तुमच्यावर विश्वसेन!'

'अच्छा कटकबाबू, तुमको वह सब बात मैं सधि मिलतेहि सच कहूँगा देखो, भाओभाओीका नाता जितना अपने घरमे प्यारा लगता है अुतनाही जो नाता तो काले पानीमे प्यारा समजा जाता है वह 'चलानी' यह है! अेकाच चलानात जे येतात ते सारे दडित अेकमेकाचे 'चलानी' ह्या नात्याचे भाअीबद होतात! हे एक नव गोतच बनत तिथे! आपलही तेच नात जुळल आहे. तुम्ही माझे चलानी आहात—माझे भाअी आहात! कटकबाबू, तुम्ही माझ्यावर विश्वास टाका, टाकू नका, पण मी तुम्हाला माझ वचन दिल तुम्ही माझे भाअू, माझे चलानी मी तुमच्या जीवास जीव देईन! केल तर तुमच हितच करीन विश्वासघात तर कधीही करणार नाही! (दरोडेखोर तर खरेच आम्ही, पण आमच्यात एक विशेष असतो, तो हा की, आम्ही जितके दुष्ट होअू शकतो तितकेच मनात आल तर सुष्टही होअू शकतो तुम्ही माझ्याशी भाअीबदी निष्कपट ठेवून पाहा! अुपकार केला तर आमच्यासारखा हिंस्र पशुसुद्धा कधी कधी अुपकारकर्त्याला विसरत नाही, अुपद्रवीत नाही, प्रत्युपकारिल्यावाचून सोडीत नाही!—जसा त्या अड्रोक्लीजला तो सिंह!')

'रफिअुद्दिन!' पहारेकरी घाओघाओीने ओरडला, 'अूठ जावो! पहारा

झाले ! अेका अबलेच्या रक्षणापायी ह्या जंजाळात फसलो, धरमके लिये मैंने यह बलिदान किया !'

'आणि ती राजकुमारी ? त्या मालतीचं पुढे काय झाले ?' अेक बंदिवान दुःखाचा अुसासा टाकीत पुसू लागला.

'क्या पूछते हो भाओ ! वह प्यारी मालती ! माझ्या विरहाने वेडी झाली ! हाती अेक माळ घेअून 'हाय रफिअुद्दिन, हाय रफिअुद्दिन !' असा जप करीत मथुरेच्या वाटेवाटेने जो भेटेल त्याच्यापुढे आज ती हे सुरेल पद गात विचारीत भटकत आहे—'बता दे सखि कौन गली गये शाम ?'

रफिअुद्दिन ते पद गाअून दाखविण्याच्या बेतातच आला होता पण स्वतःच्या अुन्मदाच्या त्या गोष्टीचा पाल्हाळ अगदी असह्य झालेल्या बटकन ते विषय अेकदाचा बदलून टाकण्याची ही संधि साधून विचारले,

'पण मियाजी मंत्रविद्येने समुद्रावर पायी चालत जाण्याची अलौकिक शक्ति जर आपल्या अंगी आहे तर आपण आताच अुडी घेअून परत देशी का जात नाही ?'

कितने भोले हो बटकबाबूजी आप! पोलिसांसमक्ष अुडी टाकली तर भूमीवर पाय ठेवताच ते पुन्हा पकडतील ! और दूसरी बात असी है कि ती विद्या स्त्रीस्पर्श झाला की नाम दर्शनाशी होते ! मालतीच्या आधी मी स्त्रीस्पर्श असा कधीच केला नव्हता ! आता पुन्हा तीन वर्षे तरी अखंड ब्रह्मचर्य पाळल्यावाचून देह तसा हलका होणार नाही की तो पाण्यावरही अलगद चालवता यावा ! वीर्य संचय झाला का त्याचे तेजोमय ओज मस्तकातून अुंच जाअू पाहाते त्यामुळे देह आपोआप वर अुचलला जातो ह्यालाच योगविद्येत लघिमासिद्धि म्हणतात ती साधली की जलस्तंभनमंत्र सफळतो ! मग काळ्या पाण्याचा समुद्र म्हणजे बच्च्यांनी अथरलेली सतरंजी ! तिच्यावर नुसते मनात आले का चालावे !'

'पण मियाजी ह्या जन्मठेपीच्या स्थळाला सुद्धा काळे पाणी का म्हणतात?'

मेरे गुरुने कही थोडी है ! सुनो ! सृष्टीच्या आधी जेव्हा जिवडे तिकडे पाणीच पाणी होत, तेव्हा मक्काशरीफमे अेक औश्वरका प्यारा अवलिया रहता था. औश्वराने त्याला सांगितलं, ' अेक नौका घे नि पूर्वेकडे चालू लाग ! अगदी सूर्य अुगवतो तिथपर्यंत ! जिथे तुला हव तिथे, तुला हवी त्या आकाराची भूमि, त्या आकाराचा पदार्थ तू समुद्रात टाकताच निर्माण होईल ! माणसासाठी आता समुद्रातून अधिक स्थल मी निर्मु अिच्छितो ! ' औश्वराची आज्ञा होताच अवलिया तसाच नौकेत बसून समुद्रात चालला मक्का सोडून कित्येक महिने गेले तरी समुद्रात मनाजोग स्थल कुठे निर्मावं ते त्याला कळेना अितक्यात आकाशवाणी झाली, ' तुनो नाव वल्हवितो आहेस तिथेच स्थल निर्माव ! ' त्यासरशी अवलियाने आपली वेलबुट्टींनी सजविलेली सतरजी समुद्रावर अथरली ! आणि कोण आश्चर्य ! त्या सतरजीचीच लगोलग नाना वेलीलताफुलांनी दवरलेली अेक विस्तीर्ण, सुपीक सपाट भूमि झाली ! तीच ही हिंद ! हे हिंदुस्थान ! तोवर औश्वराला अेक नोकराचा बळी देअून अवलिया निघून नाव वल्हवीत ल्हेला बळमा घालून पुढे चालला तो अेक प्रचड वादळ झाल, त्याची नाव अुलटली; सारी वस्तविस्त बुडाली अवलियाही गटांगळ्या खाअू लागला तो बुडताच, पण कुराणशरीफ अुसके हातमे था, अुसको वादलका बाप भी न डुबा सकेगा ! त्या कुराणशरीफला अुंच करताच तो तरला, त्याने नाव पुन्हा सुलटी केली, तोच आकाशवाणी झाली, 'ह्या समुद्रात अशी वादळ नेहमी होतात. तेव्हा अियल्या या समुद्रातील जलप्रवासाला सुरक्षितपणा यावा, म्हणून जिथे अेक स्थल निर्माव ! ' ही आकाशवाणी अैकताच तिथे काही वस्तु फेकावी म्हणून अवलिया पाहू लागला, तो त्याच्यापाशी काही वस्तुच नाही ! अेक हाती कुराणशरीफ नि दुसऱ्या हाती खाण्यासाठी म्हणून मोठ्या काळजीन धरलेल अेक कावडीच अड तेवढ होत तेव्हा अवलियाने ते अड

# ११. अंदमानातील आदिवासीलोक

जगात आजही काही भूभाग असे आहेत की, ज्यांना भूगोल आहे, पण अितिहास असा नाहीच. काळे पाणी ज्याला आज म्हणतात, तो अंदमानचा द्वीपपुंजही त्या भूभागातच गणला पाहिजे.

ज्या काळी हिंदुराष्ट्राने आपल्या स्वतःच्या पायात सिंधुनदीची बेडी स्वतःच ठोकून घेतली नव्हती, विधर्मीयांसहच नव्हे, तर स्वधर्मीय हिंदूंहिंदूंतसुद्धा, विजातीयांसह खाण्याने वा पिण्याने जातच जाते, धर्मच बुडतो, असा वाण्याळ धर्मभोळेपणापायी हिंदुस्थानाबाहेर गेल्याने विधर्मी, विदेशी, विजातीयांसह अन्नोदकव्यवहार घडून आपली जात नष्ट होणारच, ही भ्रामक भीति हिंदु-राष्ट्राच्या पोटात अुत्पन्न झाली नव्हती आणि तिच्या योगाने तिन्ही बाजूंच्या समुद्रावरच नव्हे, तर चौथ्या बाजूच्या भौमिक सीमेवरही 'अटके'च्या धार्मिक चौक्या बसून कोणीही हिंदु देशाबाहेर असा ज्या काळापासून जाअीनासाच झाला, त्या साधारणत अिसवी सनाच्या नवव्या-दहाव्या शतकाच्या काळापूर्वी हिंदुराष्ट्राचे त्रिविक्रमशील चरण, ह्या सिंधुनदीच्या बेडीने जखडलेले नसल्यामुळे पूर्व-पश्चिम-दक्षिण समुद्रांना आणि महासागरांना अुल्लंघून राजकीय, धार्मिक, सामाजिक दिग्विजय करीत त्या काळच्या ज्ञात जगात आपणां हिंदूंचे महासाम्राज्य गाजवीत चाललेले होते. परदेशगमन त्या काळी मुळीच निषिद्ध नसल्यामुळे, परदेशगमननिषेधाची अवदसा त्या काळी आठवली नसल्यामुळे हिंदु रणतरींची [war ships] प्रचंड नौसाधन [आरमारे] दिग्दिगंती अप्रतिहतपणे संचरत होती. ज्याला परकीयांनी लिहिलेल्या आणि पढविलेल्या आजच्या आमच्या हिंदुस्थानच्या चाटर्या भूगोलात 'अरबी समुद्र' ह्या मानहानिकारक नावाने संबोधिले जाते, त्या आमच्या पुरातन 'पश्चिम समुद्रा'तून अेका बाजूला आणि ज्याला आमच्या आजच्या कूपमंडूकांनी 'काळे पाणी' असे समुद्रगमनभीरु नाव दिले आहे,

विष्णु, बुद्ध, प्रभृति देवतांचीं देवालयें, वेद, मनुस्मृति प्रभृति शतावधि संस्कृत ग्रंथांची ग्रंथालयें, हिंदु वाणिज्य, कला, संस्कृति हीं सयाम, जावा, ब्रह्मदेश, हिंदुचीन, वाली ते फिलिपाअिन्सपर्यंत तरी शतकाशतकें भरभराटलेली होतीं, हा निर्मळ अितिहास आहे

पण, त्या अितिहासात अंदमान द्वीपपुंजासारख्या लहान लहान बेटाचा नामनिर्देशही अजून सापडू नये, ह्याच त्या कालाच्या प्राचीनत्वामुळे आणि अितिहासविरक्तेमुळे फारसे आश्चर्य वाटायला नको

तरीही, अंदमानशी आपल्या भारतीयांचा संबंध असल्याची आज सापडण्यासारखी पहिली खूण म्हणजे त्याचे नाव जावा हे नाव जसे त्या देशाच्या आकारावरून यवद्वीप असं ठेवल, तसेच अंदमान हे नावही त्याच्या अंडाकृतीवरूनच भारतीयांनी ठेवलेलं असावे, असं पुढे सापडणाऱ्या अेखाद्या विरुद्ध पुराव्यापर्यंत तरी समजण्यास हरकत नाही त्यापुढील त्या बेटावर भारतीय प्रत्यक्षपणे गेल्याचा आणि ती बेट जिंकल्याचा निर्विवाद असा अैतिहासिक पुरावा म्हणजे पांड्य राजाची शिलालेखीय प्रशस्ति होय ह्या अेका प्रशस्तीवरून हं सिद्ध होतं की, पांड्याचा अेक प्रबल सेनापति अिसवी सनाच्या दहाव्या शतकाच्या आगेमागं ह्या समुद्रावर दिग्विजय करण्यासाठी मोठमोठ्या रणतरींचे अेक प्रबळ नौसाधन घेअून निघाला होता परतीरावरील आजच्या पेगूवर त्याचे जलसैन्य चढून जाअून तो देश त्याने जिंकला परतताना त्या भारतीय हिंदु सैन्याने अंदमानादिक बेटावर स्वामित्व स्थापून त्याने पांड्य साम्राज्याला जोडले ह्या स्पष्ट अुल्लेखावरून ह्या द्वीपपुंजाच्या अितिहासाची जी अेक पहिली ओळ काय ती लिहिता येते ती येते

पण ती ओळही लिहिता लिहिताच अपुरी राहते कारण भारतीय सैन्य तेथ गेले होते हे जरी निश्चित, तरी तं हिंदु सैन्य वा त्या हिंदु राज्याचे कोणी अधिकारी वा नागरिक तेथे राहिले की नाही, ह्याचा काहीच पत्ता अद्यापि लागलेला नाही आम्ही अंदमानात असताना अेकदा अेका विश्वसनीय अिंग्रज अधिकाऱ्याने आम्हाला सांगितलं होतं की अंदमानात खणताना कोठेसे अेका राजवाड्याचे अवशेष सापडत आहेत पण पुढे त्याचं काय झाले ते अद्यापिही आम्हाला काही अेक कळले नाही तसा अेखादा अुत्खननीय शोध लागला वा न लागला तरीही ही गोष्ट निश्चित आहे की अंदमानात बाहेरच्या लोकांची अशी कोणतीही वसाहत गेल्या तीन हजार वर्षाच्या अैतिहासिक कालात तरी टिकली

बाहेरच्या लोकांच्या संबंधाने त्या बाहेरच्या लोकांच्या अितिहासात अंदमानचा अितिहास जसा काही सापडत नाही, तसाच त्यांच्या स्वतःच्या लोकातही अितिहास असा अेका अक्षराने सुद्धा आढळत नाही, हें सांगणेंच अनावश्यक. कारण अंदमानात त्याचे स्वतःचे असे लोक जरी आहेत, तरी त्यांना अक्षर कशाशी खावें, हेंच मुळी अद्याप माहीत नाही.

आणि परंपरेच्या दंतकथात्मक अितिहासाविषयीही म्हणाल, तर त्या अंदमानातील मूळ निवासीयांचे दंत जरी अत्यंत बळकट आणि तीक्ष्ण आहेत, तरीही त्यांना कथा अशी मुळीच नाही. कथेची कल्पनाच अजून आलेली नाही. (कारण स्मृति असते, तेथे कथा संभवते.) पण अंदमानचे मूळ निवासी जे आहेत, त्यांची स्मृतिशक्ति अद्याप अितकी अपक्वावस्थेत आहे की, त्याना चार दोन वर्षापूर्वीच्या घटना देखील आपल्या अर्थी. आठवत नाहीत. आठवण म्हणून आपण ज्याला म्हणतो, तशी आठवण त्यांना राहातच नाही. ओळख देखील ते फार लवकर विसरतात. मग जातीय सुसंगत, सांघिक स्मृति आणि परंपरेच्या प्राचीन कथा ह्या कोठल्या असणार! प्राण्याच्या कळपाला किंवा वानरांच्या समूहाला जितकी परंपरा आणि सामाजिक स्मृति, तिच्याहून काही अंशी अधिक अितकीच काय ती त्याची सामाजिक स्मृतिशक्ति विकसलेली दिसते. त्यामुळे दंतकथात्मक असाही कोणता अलिखित अितिहास स्वतःचा असा अंदमानच्या लोकांना नाही.

मिळून काय ? जगातील अन्य राष्ट्राच्या वाङ्मयात अेका वर दिलेल्या पांड्य राजांच्या प्रशस्तीवाचून अंदमानविषयी अैतिहासिक अुल्लेख नाही. युरोपियन व अरबी प्रवाशांचे मध्यकालीन अुल्लेख केवळ भूगोलविषयक, अंदमानातील काही *अितिहास सांगणारे नव्हेत; आणि अंदमानी जाती अवघ्या अगदी रानटी,* आदिम, अविकसित मानव, त्यांच्या स्वतःच्या लिखित कथा राहोतच, पण जातीय पूर्ववृत्ताच्या दंतकथाही नाहीत. ज्याला भूगोल काय तो आहे, अितिहास असा नाहीच, असा अंदमान हा अेक अजस्र भूभाग आहे. त्याचा सारा अितिहास म्हणजे

अेका हाडाला आपण अिकडे लावतो, तरी तें हाड आता मूळापेक्षा अगदी सपाट झालेलें आहे. पण तिकडे अगदी अंदमानात नसलें, तरी त्या द्वीपपुंजाच्या आजूबाजूच्या भूभागात आजही अशीं मनुष्यें कधी कधी आढळतात की, ज्यांचें माकडहाड चांगलें दोड-दोन अिंच अुंचावलेलें आणि पुढारलेलें असतें. आम्ही अंदमानला असता असा अेक रानटी मनुष्य तेथील डॉक्टराने आम्हांला औषधालयात आलेला दाखवला. त्याचें माकडहाड, शेपटीचें तें हाड, असेंच पुढे घुसलेलें, वाढलेलें, त्याला खुर्चीच्या पाठीला टेकून ज्यायोगे सरळ बसता येअीना असें वर लावटलेलें होतें. त्याला लागून शेपटीच्या केसांच्या झुबक्याचा स्नायु तेवढा लोंबलेला नव्हता. तो तेवढा लोपलेला होता. त्याची हनुवटी आणि गालफडें हींही माकडाशी कितो तरी मिळतीजुळती दिसत. त्याची चाळीस-पन्नास शब्दांचीच का होअीना, पण अेक भाषा होती की जी जातिवंत मर्कटमनुष्याना, 'ओरांगओटांग '–' गोरिल्यां 'ना असते. ह्या ओरांगओटांग वा गोरिला वानरमाकडांचीही अेक भाषा आहे. तिचे बरेच शब्दही काही प्रवासी प्राणिशास्त्रज्ञांनी मोजण्याचे यत्न केले आहेत. पण तरीही ती मनुष्यभाषेच्या वर्गात मोडणारी नाही. पण ह्या आम्हीं पाहिलेल्या पुच्छास्थिअवशिष्ट माणसाला कोणती तरी मानवी भाषेत मोडणारी भाषा येत होती, मनुष्यवाणी होती, हा मुख्य फरक आढळला.

हा अपवादात्मक प्राणी म्हणून सांगितला, पण अंदमानमधील अगदी तज्जन्य अशी अनादिकालापासून निवसत आलेली जात जी 'जावरा' ती काही शेपटीचे हाड असलेली नाही. त्यातील माणसे साधारणतः चार-साडेचार फूट अुंचीची, वर्ण काळाकुट्ट केस राठ, आखूड आणि बुचक्यानी वळून वळून असतात. दाढीमिशी अशी पुरुषानाही येतच नाही. ते सगळे अगदी अुल्लिंग ! मनुष्यप्राणी 'सुधारत सुधारत' आपल्या अिकडे आजच्या यांत्रिक युगात ज्या अवस्थेप्रत पोचला आहे, ती आपली सुधारणा आणि ते आपलें यंत्रयुग हाच आपल्यातील ज्या अेका संप्रदायाला मनुष्यजातीला झालेला अेक दुर्धर शाप वाटतो, त्या साध्या राहणीच्या यंत्रयुगविद्वेषी पंथाच्या तोंडाला अगदी पाणी सुटावें, अितकी साधी राहणी ह्या 'जावरा' जातीत अनादिकालापासून तो थेट आजपावेतो चालत आलेली आहे. कपडे वापरण्याचा मोह असा त्यांना पडतच नाही. नागवेपणा हा जर साधुपणा

छानछोकीच्या व्यसनापायी सुधारलेला मनुष्य अगदी अधोगतीला चाललेला आहे, अशा विवेचनेने ज्यांना अन्न गोड लागत नाही, त्या आपल्याकडील 'साध्या राहणी' च्या अभिमान्यांना हें ऐकून आनंदच होईल की, हे जावरा छानछोकीपासूनही अगदी अलिप्त आहेत त्यांच्यातील स्त्रियांत एखादी तरुणी अगदीच विलासलोलुप निघाली, तर एखादे झाडाचे पान तेवढे कटीपुढे लटकावते आणि एखादा पुरुष फारच नटवा निघाला, तर त्याची सारी छानछोकी रंगदार लालसर मातीचे पट्टे अंगावर ओढण्यातच काय ती सामावलेली आणि संतुष्टलेली असते यंत्रयुगाला अधोगति म्हणणाऱ्यांच्या भाषेत बोलायचे तर ह्या जावराची फारच प्रगति झालेली आहे यंत्रयुगाच्या प्रलोभनापासून ते अगदी अलिप्त आहेत त्यांना मोटारी, आगगाड्या तर काय, पण बैलगाडी, गाडी अशीच ठाऊक नाही त्यांना खुर्ची माहीत नाही, आगपेटी माहीत नाही, जोडा माहीत नाही, बंगला माहीत नाही, शेती माहीत नाही, जिल्बी माहीत नाही, द्राक्षे माहीत नाहीत, लोणी माहीत नाही, बाजरी माहीत नाही, ना 'भिगी वॉटर' ची गोष्टच दूर 'मनुष्य-जातीवरील' मनुष्याच्या असमाधानाचे, कलहाचे, कृत्रिम जीवनाचे संकट ज्या एकाच कारणाने ओढवलेले आहे, असा 'साध्या राहणी'च्या आपल्या अिकडील अध्वर्यु समजतात त्या 'सुधारणे'च्या नावापासूनच नव्हे तर अिच्छेपासून सुद्धा हे जावरा अलिप्त, अकल्पित आहेत

पण म्हणून 'साध्या राहणी'ने, 'यंत्रयुगाच्या शापापासून विमुक्त झाल्या'ने निसर्गाकडे परत फिरल्याने, मनुष्यात निरपवाद समाधान नांदू लागेल, म्हणून जे 'Back to Nature' वादी लोक म्हणतात, त्याप्रमाणे ह्या जावरात ते समाधान नांदत आहे काय ? मुळीच नाही, शेती नाही, नांगर नाही, बँकेत नोटा नाहीत, बंगला नाही, पण जी एखादी दाट अरण्यातील खबदाडीतील जागा किंवा मांसाचा तुकडा तात्पुरत्या अग्राधिकाराने एका जावऱ्याचा असेल, त्यावर दुसऱ्याची दृष्टि पडताच, वा पडू नये म्हणून त्याला वाहावी लागणारी चिंता, करावी लागणारी निरवानिरव आणि प्रसंगी लढावी लागणारी झुंज ही तितकीच उत्कट आणि भयंकर

मरेतो झुजावे लागते नुसत्या साध्या राहणीने 'यंत्रयुगाचा शाप' तेवढा सुटला की जर समाधान आणि शांतता नांदती, तर हे जावरा जीवन्मुक्तच समजावे लागते! कारण ते जवळ जवळ माकडाअितक्यात 'साध्या राहणी' चे अुपासक आहेत, 'निसर्गा'ला धरून आहेत, पण असंतोष, असमाधान, जीवनकलह ह्यांची पातळी आणि प्रकार जरी भिन्न असले, तरी त्यांची तीव्रता आणि अपरिहार्यता त्या त्या जावराच्या 'नैसर्गिक' युगातही आमच्या यंत्रयुगाहून काही कमी असलेली आढळत नाही अुलटपक्षी त्यांच्या जीवनाचा विकास माकडाच्या जीवनाहून जो फारसा जास्त झालेला नाही, त्याचे कारण ही साधी माकडराहणीच होय हही अुघडच आहे

अंदमानातील वर अुल्लेखिलेली जावरा जात, ही अेक त्यातल्या त्यात अगदी आदिम, रानवट, सुधारलेल्या आजच्या आमच्या वळणाच्या परकीय लोकांपासून सदैनोडपणे, भयाने आणि द्वेषाने दूर राहू अिच्छिणारी अशी असली, तरी अंदमानातील मूळ निवासीयांच्या अितर अनेक जाती त्या जावराहून चालीरीती, राहणी, घटना प्रभृति प्रकरणी भिन्न प्रकारच्या आहेत, त्या त्या मानाने पुढारलेल्याही आहेत त्यांच्या पृथक्‌पणाचा आणि साम्यतेचा बसून अभ्यास केलेल्या अिंग्रजी समाजज्ञांनी त्यांच्याविषयी जी माहिती दिलेली आहे, तिची साधारण रूपरेखा आपल्या ह्या कथानकाला लागू तितकी खाली देअू

अंदमानात ज्या दहाबारा तत्रस्थ मूळ लोकांच्या जाती आहेत, त्यांची काही नावे 'कारी, कोरा, टबो, बी, बलवा, जावरा, जुवअी, कोल' अित्यादि प्रकारची आहेत शेवटचे 'कोल' हे नाव ध्यानात घेण्यासारखे होय कारण, आपल्या अिकडील वन्य वा डोंगरी कोळी लोकांशी ते नाव आणि त्या लोकांचे रानटी चरित्र तुलनार्ह वाटते ह्या जातींचे मध कोणी घनदाट जंगलात, तर कोणी अुंच डोंगरातून, तर कोणी समुद्रतटालागून राहात आले असल्याने, त्यांच्या चालीरीती, भावभावना, रंगरूप ही वरील परिस्थितिभेदाने, आणि क्वचित् वंशभेदाने निरनिराळी आहेत त्यामुळे त्यांच्या सरसकट वर्णनात जी काही विसंगति आढळेल, तिचा अुलगडा वाचकांना करता येतो

जावरा प्रभृति जाती अत्यंत क्रूर असतात पूर्वी वादळात कित्येक परकी जल्याने ह्या बेटांना लागून फुटत वा फसत तेव्हा त्यांवरील निःसहाय लोकांवर तुटून पडून त्यांची हे जावरा प्रभृति अंदमानी लोक क्रूरपणे कत्तल करीत आजही त्यांच्या ओळखीच्या तत्रस्थ जातींबाहेरील कोणत्याही परकीय वा अंदमानीय जातीची मनुष्ये दिसताच हे रानटी लोक निबिड झाडीतून त्यांवर तीक्ष्ण बाणांचा मारा करून वा अेकट्यादुकट्या मनुष्याला पकडून ठार मारतात क्वचित् कधी कोणाला जीवदान मिळालेच तर त्याचे भाग्य अद्‌भुतच समजावे जावरांनी ठार मारलेल्या अशा लोकांच्या मढ्यावर दगडांचे ढीग रचलेले असतात. आपण जंगलात ठार

केलेल्या अशा परकीय माणसाची बातमी त्या परकीय शत्रूंना पक्षी नेऊन देतात, अशी अेक समजूत त्यांच्या काही जातींत आढळून येते. कारण ते पशुपक्ष्यांना माणसांहून फारसे भिन्न समजतंच नाहीत.

ह्यांच्यात स्त्रीपुरुषांसंबंधी रीतीभाती निरनिराळ्या असतात. स्त्रीपुरुषांचीं कामें बहुधा वाटलेलीं असतात. स्त्रीचें स्थान पुरुषापेक्षा अुणें समजतात. म्हाताऱ्या स्त्रियाना सन्मानाने वागवितात. लग्नाआधी स्त्रिया पुरुषांशी सलगी करतात. अविवाहित स्त्रियांना लैंगिक निर्वंध फारसे नसतात. काही जातींत त्या आपला वर आपणच निवडतात. काहीत आअीबापांनी लग्न ठरवलें की लग्न ठरलें, असें मानतात. अिकडे बहुपत्नीत्वही फारसें नाही आणि बहुपतित्वही नाही. काही जातींत पुरुष आपल्यापेक्षा तरुण अशा दुसऱ्या विवाहित स्त्रीशी फारसा बोलत नाही. त्याचप्रमाणे आपल्या बायकोच्या बहिणींना ते स्पर्शत नाहीत. मुलांचीं नावें निराळीं, मुलींचीं निराळीं, असा प्रकार बहुतेक जातींत नाही. आअीच नांवे ठेवतें. गर्भारपणाचीं चिन्हें दिसू लागताच गर्भाचें नांव ठेवण्यात येते. पण काही जातींत मुली वयात आल्या की त्यांना ठरलेल्या सोळा फुलांपैकी ती वयात येत असता जीं फुलें फुलत असतील, त्यांपैकी अेका फुलाचें नाव ठेवण्यात येतें. ही ह्या रानवट लोकाची ललितप्रवृत्ति आमच्या नागर लोकांतील मुलींना दगडी, धोंडी, भिमी अशी नावें ठेवणाऱ्या अरसिक प्रवृत्तीहून अधिक सुभग नाही काय ? पुरुषाची लग्नें पंचविसा-नंतर आणि स्त्रियांची अठराच्यानंतर बहुधा होतात.

ह्यांना मुले फार आवडतात. पण काही जातींत मुलें सातआठ वर्षांची झाली की आअीबापांशी अेकत्र राहत नाहीत, तीं निराळा आयुःक्रम पाटतात. आयुःक्रम असा सर्वांचा अेकच आणि मोजका. भक्ष्याकरिता दिवसभर शिकार करणें आणि रात्री झोप येअीतों नाच नाच नाचणें ! नाचण्याच्या समारंभात स्त्री पुरुष अुल्लिंग, अेकत्र !

ह्या लोकांतील पुरुष त्यांतल्या त्यात चांगले दिसतात. स्त्रिया मात्र अगदी वघ्यड स्त्रियांचीं ढुंगणें बेडौल आणि शरीराच्या मानाने फारच स्थूल असतात. त्यांचें सौंदर्य वाढविण्यासाठीच की काय कोण जाणे, त्या स्त्रियांच्या डोक्याचे केस काढून तीं अगदी गुळगुळीत केलेली असतात ! त्या अंदमानीय सौंदर्यसृष्टीला तरुण स्त्री अशा केस काढून गुळगुळीत केलेल्या डोक्यानेच अधिक सुरेख शोभते असें वाटतेसे दिसतें. आपल्या कवींना सुंदरीचे ओठ तोंडल्यासारखे आहेत, ही अुपमा जशी आवडते, तशीच त्यांच्यात जर कोणी कवि असेल, तर त्याला त्यांच्यातील सुंदरींचीं डोकीं सोललेल्या आणि तासलेल्या नारळासारखीं लोभनीय वाटतात, अशी अुपमा सहज सुचत असेल, रचतही असेल. कारण सोललेला नारळ हा नारळीच्या झाडांचा सुकाळ असलेल्या त्या अंदमानीय रानातील त्या नैसर्गिक नागरिकाचा अेक मोठा आवडता पदार्थ आहे !

त्या लोकांची बुद्धि लहानपणी चाणाक्ष असते पण तिची वाढ झटकन् खुटते. स्मरणशक्ति अगदी थोडी, अर्थात् बौद्धिक दूरदृष्टि त्यांच्यात नाहीच म्हटले तरी चालेल मागे आणि पुढें पाहून वागणारा प्राणी तो मनुष्य, अशी अेक मनुष्यत्वाची व्याख्या आहे तिला ही अदमानी माणसे अपवाद। त्याना चालू क्षणी काम, क्रोध, लोभ प्रभृति विकाराची जी अूर्मि येअील, तीप्रमाणेच ते चालतात मागील दहा वर्षांची बाकी वा पुढील दहा वर्षांची योजना वा पुरवठा असा त्याच्यात नाही. क्षुधा, तृष्णा, राग, द्वेष ह्याची तत्काळ तृप्ति झाली की तो प्रश्न सेयेच मिटला शत्रूचा वा अपराध्याचा सूड हा देखील त्या अूर्मीत ते जो काय घेतील तोच नाही काळ नाहीसा होअून तो विपक्षीय मनुष्य जर पुन्हा त्याच्यात आला, तर त्याचा राग, अपराध आणि सुडाचा निश्चय ही सारी ते लोक बहुधा विसरून जातात तो मनुष्य त्याच्यात पुन्हा मिसळतो अर्थात् स्मृतिशक्ति अशी तुटपुंजी असते, हे जे त्याच्याविषयी म्हणतात, त आपल्या स्मृतिशक्तीच्या आणि बौद्धिक दूरदृष्टीच्या प्रदीर्घकालीन टिकाअूपणाची तुलना करूनच काय ते म्हणता येअील कारण त्या जातीनाही काही स्मृति, काही दूरदृष्टि असलीच पाहिजे जातिगत अुपजत आणि व्यक्तिश अर्जित स्मृति आणि दूरदृष्टि माकडाच्या कळपातही असते, मग ही तर आदिम असली तरी माणसेच।

त्याची भाषा अगदी मोजक्या शब्दाची जे, प्रत्यही अगदी शारीरिक आणि प्राथमिक भावभावना, आवश्यकता, त्या व्यक्तविण्यापुरते त्यातही ते थोडे अपुरेच, कारण त्याच्या भाषेत अेक मुख्य शब्द बोलून टाकला की त्याच वाक्य करण्याच काम हावभाव हेच काय ते पुरे करू शकतात। हातवारे, मान, डोळे ह्याच्या अभिनयानेच ते शब्दापेक्षा परस्पराशी अधिक बोलतात कोणी पाहुणा कोणाला भेटला तर ते प्रथम अेकमेकाकडे गुमते टक्काहून पाहत राहणे हा पहिला शिष्टाचार समजतात अथात्, अेकमेकाना ओळखण्यात जो धोका त्याच्या हीन स्मृतीमुळे आणि परकीयाच्या कपटामुळे त्यानः सोसावा लागतो, त्या जातीय अनुभवामुळेच नीट पारखून घेण्याच्या आधी कोणाशी न बोलण्याची ही चाल पडली असावी। आणि मग खाकरून खोकरून आगताशी बोलण्यास आरभ करणे, हा दुसरा शिष्टाचार। प्रत्येक जातीची अेक निराळी पोटबोली असने साधारणत वीस मैलावर पोटबोली बदलते

कोणी मरण पावल असता त्याची आप्तमडळी मुक्त कठाने रडतात लहान मूल मेले तर आअीबापाच्या खोपटीतच पुरतात अितर कोणी विशेषत मोठे माणूस वारले, तर त्याची मोट बाधून प्रथम झाडाच्या डोलीत व्यवस्थितपणे ठेवण्यात येते त्या जागेभावती वेताच्या पानाच्या माळा बाधण्यात येतात त्या स्थगावडे तीनअेक महिने कोणी जात नाही ही स्मशानाची जागा निराळीच ठेवतात हे सुतक चालू असता ते भुरी माती डोक्याला फासतात आणि त्या दिवसात

असे हे अंदमानीय जंगली नागरिक ह्या अेकदोन जिल्ह्याअेवढ्या टापूत अवघे तीनचार हजारही असतील नसतील. तेही विखुरलेले, बाकी सगळें घनदाट जंगलच जंगल. अितकें घनदाट आणि वगाहती मनुष्याचा पाय आत न पडलेलें दुर्गम की, त्याची नक्की पाहणीही गेल्या तीसअेक वर्षांपर्यंत झालेली नव्हती ! मोठमोठे वृक्ष, त्यांवर आणि त्यांमधून शेकडो प्रकारच्या काटेरी बिनकाटेरी लतावेलीतृणांच्या घनदाट गुंतागुंतीची दाटी, वरून जवळजवळ बाराही महिने — निदान नअू महिने तरी — सारखा पडणारा पाअूस; धरनेवर मुसळधारा, नाही तेव्हा झिम झिम; तळाशी त्यामुळेच पाणीच पाणी सदा साचलेलें; त्यात वृक्षलतावेलींच्या त्या अथाग दाट रानाचा पालापाचोळा वर्षानुवर्षं सारखा थरावर थर पडत असलेला, वर्षानुवर्षं तसाच कुजत असलेला; जिकडे तिकडे त्या दलदलीत भरभराटणाऱ्या लक्षावधि माशा, मोठमोठे डास, जळवा, भयंकर सापसुरळ्या, विषारी जीवजंतु, ह्यांचा अेकच सुळसुळाट! वृक्षांत वृक्ष, वेलींत वेली, काट्यांत काटे, झुडपांत झुडपें दाटून, गुंतून असे अेक रानटी छतचें छत मैलोमैल पसरलेलें की, सूर्य वर आकाशात तळपत राहिला, तरी किरणाचा स्पर्श त्या रानाच्या तळाला असा म्हणण्यासारखा म्हणजेच ती दलदल सुकविण्यासारखा, युगायुगे होअूच नये; प्रकाशही पुरता असा युगोयुगें पडूच नये ! जंगलांची वाढ मैदानातच नाही, तर जे डोंगर मधून मधून आहेत त्यांवरही तेंच जगल तसेंच चढून गेलेलें ! त्यायोगे हीं बेटे दुरून जरी हिरवी गार आणि मोहक दिसली, तरी मनुष्यवस्तीला पूर्वीपासून अगदी प्रतिकूल अशी ठरली. जे काही अिंग्रजी धाडसी लोक वसाहत स्थापण्याचा प्रयत्न करते झाले, त्यांना सुद्धा अगदी अठराव्या शतकाच्या साधनांनी सुद्धा तेथे पाय टिकविता टिकविणे दुर्घट झाले. दोनदा त्यांनी स्थापलेल्या वसाहती तेथील त्या लक्षावधि विषारी जीवजंतूंनी आणि दलदलीतील रोगाणूंनी कत्तल करून टाकल्या, माणूस नि माणूस रोगराअीने ठार केलें, वसाहती अुठून गेल्या.

ह्या अंदमान बेटांना जे परकीय लोक, अपघातपरत्वे जलयानें वादळात सापडून किंवा वसाहती स्थापण्यासाठी येत, त्यांच्यावर जावरा प्रभृति तत्रस्थ रानटी मनुष्ये विषारी तीरांचा मारा करून धरून फाडून टाकीत, हें तर खरेंच, पण तसल्या तेथील मानवी प्रतिकाराने ह्या बेटांचे 'स्वातंत्र्य' अनादिकालापासून सतराव्या ख्रिस्ती सनापर्यंत जे अबाधित राहिले, ते केव्हाही राहिले नसतें. ह्या बेटांचे ते स्वातंत्र्य जे असे अबाधित राहिलें तें तेथील त्या सापसुरळ्या, जळवा आणि त्या दलदलीतील असंख्य विषारी माशा, डास व रोगाणु अित्यादि कडव्या 'देशभक्तां'च्या, लक्षावधि सूक्ष्म सैनिकांच्या 'स्वातंत्र्य भक्ती'ने होय. परकी स्वाऱ्यांचा हेच रोगाणु नुसता धुव्वा अुडवून देत आले.

तेथील अशा ह्या घनदाट जंगलातील जावरांपेक्षा जळवांच्याच सैन्याचा पराक्रम अचाट ! आजही त्या जंगलात ते कापण्यास जेव्हा बंदिवानांच्या टोळ्या

जातात, तेव्हा त्याना ह्या जळवा रक्तबंबाळ करून माघाच्या पिटीत आहेत ! झाडावरून त्या जळवांचे थर चढलेले असतात, पायाखाली पालापाचोळ्यांचे थरा-वर थर, साचलेल्या दलदलीत त्या जळवांचे लक्षावधि 'देशभक्त' सैनिक दबा धरून दडलेले असतात ! मनुष्यें आत घुसलीं, त्यांचा वास आला रे आला की झाडावरून त्या जळवा पटापट अंगाडोक्याखांद्यावर उड्या घेतात, पायाखालून भराभर मांड्यावर चढतात. जी जेथे चिकटली, ती तेथे सुपसूप रक्त पिऊं लागलीच. हाताने बुचके काढून टाकावे तरी आटपत नाहीत. दंशच दंश. त्यातच विषारी डास, काटेरी झुडपें आणि भयंकर मापसुरळ्या. अेक अेक फूट लांबीच्या. शंभर शंभर पायांच्या. 'दाट थरचे थर. त्या सापसुरळ्याचा -- त्याना 'कानखजुरे'.असें म्हणतात तिकडे बंदिवान -- दंश अितका विषारी की, अंग भयंकर सुजतें, आग मनस्वी, केव्हा केव्हा तें अंग लुळेंच पडतें. क्वचित् प्राणघातही होतो. त्या मानाने साप तिकडे थोडे. पण जी अेक फुरशासारखी जात आहे ती डमताच प्राण घेणारी. विंचू पूर्वी नव्हते म्हणतात, पण आताशा तेही सापडतात. अशा त्या जंगलात बंदि-वानांतील कंटकांतील कंटक आणि क्रूरांतील क्रूर बंदिवानही जेव्हा टोळ्याच्या टोळ्या बळाने हुसकीत जंगल काटायला नेल्या जातात, तेव्हा चळचळ कापतात. मारीत, पिटीत नेलेली अशी शंभर शंभर माणसे दिवसभर त्या भयंकर अरण्यात ते सक्तीचें काम करून संध्याकाळी जेव्हा परततात, तेव्हा अेकेकाच्या अंगावर चिकटलेल्या जळवाच्या सूक्ष्म दंशातून रक्ताच्या बारीक धारा वाहात असताना, पायात काटे, अंगावर डासांच्या गांधी अुठलेल्या, दलदलीच्या चिखलाने लडबड-लेल्या त्या बंदिवानाच्या टोळ्या अगदी रडकुंडीला आलेल्या असतात, ह्यात काय नवल ? त्यातही त्या जंगलात मधमाश्यांचे आणि गांधीलमाश्यांचेही साम्राज्य आज-वर अबाधित! ते कोण्या माणसानी असें अुपद्रविले जाताच त्या मधमाशा आणि गांधीलमाशाही त्या परक्या शत्रूवर तुटून पडून आपल्या ह्या स्वदेशाच्या आणि

नाच बंद ठेवतात काही महिन्यानंतर मेलेल्या माणसाची हाडे धुऊन त्याचे तुकडे करण्यात येतात मग त्याचे निरनिराळे दागिने करून त त्या मृताचे स्मरण म्हणून वापरण्यात येतात रोग झाल्यास ह्या हाडाच्या दागिन्याचा स्पर्श करताच रोग बरा होतो, अशीही समजूत आढळते पण ह्या सर्व हाडात मृताच्या कवटीचा मान विशेष ! त्या कवटीची जितर हाडात गुफलेली अेक माळ करून ती मानेवरून पाठीवर टाकलेली असते आणि ती कवटी तशी वापरण्याचा अधिकार विधवा, विधुर आणि अत्यंत निकटचा नातलग ह्यानाच काय ता असतो

मेल्यानंतर भूत होत, असा काही जातीचा विश्वास ! काहींची समज की, अदमानात त्याना ठाऊक ते त सव प्राणी जे हिंडतात ते आपलेच पूर्वज ती ती रुपे घेऊन हिंडत आहत स्वत च्या भुताची कल्पना त्याना सावलीपेक्षा समुद्रात पडणाऱ्या त्याच्या प्रतिबिंबाकडूनच मूळ आलेली असावी कारण प्रतिबिंबाला ते भूत समजतात आणि त मेल्यानंतर दुसऱ्या ठिकाणी राहायला जात असे मानतात

ह्याच्यात धार्मिक दृष्टीचे कमकाड अस नाहीच म्हटल तरी चालेल लग्न मृत्यु अित्यादि प्रसंगी ठराविक रीति, व्यावहारिक चाला असतात, पण धार्मिक स्वरूपी कोण्या दवदवेच्या प्रार्थना वा पूजा वा मंत्रतंत्र – फार काय, धार्मिक असा कोणी पुरोहित सुद्धा नसतो परंतु त्याच्यातील विश्वकर्त्या कल्पना अस अगदीच नाही म्हणून त्याना काणी हिणवू नये कारण आमच्या अगदी अीश्वरदत्त पुस्तकातून सांगितलेल्या काही धर्मसमजुतीना आणि वहामानाच्या गोष्टींना हार न जाणार अस थोडेसे ब्रह्मज्ञान आणि कुराणपुराण त्याच्यातही आहे अुदाहरणार्थ पुलगा ह्या दैवताने हे जग निर्मिले, मेल्यानंतर ज्या जगात भुत निघाण्यास जातात त अद्भुत जग अेका मोठ्या जगड्व्याळ नारळाच्या वृक्षाने तोलून धरलेले आहे, जशी शेषाच्या मस्तकावर पृथ्वी ! पुलगा त्याच अद्भुत अुंच जगात आताशा राहतो, पण पूर्वी तो अदमानातील सर्वात अुंच पर्वत जो 'सॅडल पीक' त्याच्या शिखरी राहात असे ! कैलासावर जर आमचे महादव शकर राहतात, मुसा पैगबराचा महादेव अल्लाह जर सीनाय पर्वतावर येत असे, आय सी अेसू चे महादेव

ह्या पुलग्याव्यतिरिक्त अदृश्य शक्तीत समुद्राचे भूत 'जुरवीन' आणि अरण्याचे भूत 'अेरम चौग' ही मोठी खाष्ट आहेत पुलगा देखील ती मानीत नाहीत, जसा सैतान अल्लाला देखील सहसा बधत नाही. पण त्यातल्या त्यात अेवढे बरे आहे की, हे जगलाचे खाष्ट भूत 'अेरम चौग' आगीला भिते ह्या समजुतीमुळे ह्या अदमानी जगली जाती आग नेहमी बरोबर पाळतात, आग विझू देत नाहीत, जसे आम्ही हिंदु, पारशी अखड अग्निहोत्र पाळतो।

अुत्तरध्रुवासारख्या अगदी हिममय आणि अग गोठवून टाकणाऱ्या थड प्रदेशात मनुष्य वसत असता त्याला अुष्णतेसाठी आगीचे अखड सान्निध्य अत्यत आवश्यक आणि म्हणूनच आवडते असणारच पण त्या काळी आगपेटीसारखे आग चेतविण्याचे झटपट साधन माणसाला गवसलेले नसल्याने आणि लाकडावर लाकडें किंवा गारगोट्यावर गारगोट्या घासून विस्तवाची ठिणगी पाडून प्रयासाने आग पेटवावी लागत असल्यामुळे ती अेकदा पेटल्यावर पुन्हा सहसा विझू न देता सारखी भडकलेली ठेवणे अपरिहार्य होते त्यामुळेच उत्तरध्रुवाकडील आर्यांत अग्नि-प्रस्थ वाढले असावे त्याला प्रथम सदाचाराचे आणि मग धर्मकर्तव्याच रूप येअून आमची अग्निहोत्रसंस्था बनली ह्या आम्ही लावलेल्या आमच्या अग्निहोत्राच्या अुपपत्तीला अदमानातील ह्या वन्य अनार्य जातींचे हे वरील अग्निप्रस्थ बळकट पुष्टि देते आहे कारण त्या घनदाट जगलात मोठमोठ्या किंवारी डासाचे आणि माशाचे थवेच्या थवे, साप-सुरळ्या-अळवाचा नुसता चिवार सुळसुळाट जेथे तेथे दलदल, बहुधा अधकार! अशा 'जगलाचे' हे भूत भ्यायले तर आगीलाच भिणार! आग तेथे अत्यत अुपयुक्त, पण त्या जगली लोकामध्ये आजही आग पेटविणे आगपेटी नसल्यामुळे प्रयासाच गारगोटी झाडून ठिणगी पाडायची, त्यामुळे अेकदा पेटलेली आगच आगी पेटविण्यासाठी शक्यता पेटत ठेवणे अवश्य ह्यामुळे जगलाचे भूत जे 'अेरम चौग' त्याला सदोदित धाकाने दूर ठेवण्यासाठी सदोदितचे प्रदीप्त अग्निहोत्र अवश्य झाले

पण तरीही त्याची दैवीकरणाची कल्पनाशक्ति त्या आगीअितकी आज्वल्य नसल्यामुळे आगीचा अग्निदेव झाला नाही आगोटीचे अग्निहोत्र झाले नाही आमच्या आग पाडायच्या लाकडाची सुद्धा जशी अरणी देवता होअून ती समनक आव्हानली जाते तशी त्याच्या गारगोट्याना 'चमक पाड. प्रसन्न हो'

# १२. अंदमानच्या बंदिगृहात !

काळे पाणी येताच आगनावेतून बंदिवानांना पायात ठोकलेल्या बेड्यांसह जे अुतरवितात, ते थेट त्या बेटावर समुद्राच्या अुताराजवळच बांधलेल्या टोलेजंग विस्तीर्ण आणि मुख्य अशा अेका कारागृहाकडे सशस्त्र पोलिसांच्या पहाऱ्यात घेअून जातात

ह्याच कारागृहाला कक्ष-कारागार (Cellular Jail) असे नाव आहे, त्या 'सेल्युलर जेल' ह्या नावाचे, बंदिवानांच्या बोलीत 'सिल्व्हर जेल' (रुपेरी बंदिगृह) असे मोहक रूपान्तर झालेले आहे अर्धवट शिकलेले असे जे बंदिवान ह्या जन्मठेप्यात असतात, त्यांना 'सिल्व्हर जेलमध्ये न्या !' हे पोलिसांच्या तोंडचे शब्द अैकताच मोठे आश्चर्य वाटते रुपेरी तुरुंगात जायचे ? काही देवळांच्या खांबांना वा कळसांना रुप्याचे पत्रे मारून जसे मढविलेले असतें, तसा रुप्यात ज्याचा निदान दहावा भाग तरी मढविलेला आहे, अशा अेखाद्या विलक्षण आणि भव्य कारागृहाचे दृश्य त्यांच्या डोळ्यांपुढे ते 'सिल्व्हर जेल' हें नाव अैकताच अकस्मात् अुभे राहतें काळ्या पाण्यावर सगळेच विचित्र ! कोणी सांगावे, पाणी जसे काळे, तसे तेथील कारागृहही रुपेरी नसेल म्हणून !

निदान ते 'सिल्व्हर जेल' हें नाव तरी बंदिवानांच्या आणि पोलिसांच्या तोंडून वारंवार अैकत असतां कटकला तरी आकर्षक वाटले वास्तविक पाहता भयंकर आणि अट्टल पाप्यांना त्यांच्या भीषण पापांचा कठोर दंड देण्यासाठी ज्या बेटात नेअून सोडायचे, त्याचे नाव जसे अंगावर काटा अुभा राहण्यासारखेच 'काळे पाणी' असे पाडले गेले, तसेच त्या कारागृहाचेही नाव ठेवले तरी, 'नरकद्वार' किंवा 'छळघर' असे अेखादेच थरकाप पाडणारे असावयास हवे होते ! पण ते नाव तरी निदान किती मोहक ! 'सिल्व्हर जेल !' रुपेरी तुरुंग !

नुसते नावच मोहक नव्हे – तें पाहा, येथूनच ते भव्य बंदिगृह दिसत ते पाहा ! तेच तो सिल्व्हर जेल ! आ ? तो ? अगदी सिल्व्हर–रुपेरी नसले, तरी किती आकर्षक आहे ते भवन ! रेखीव ठाकठीक, नीटनेटके, धीर गंभीर, स्वच्छ,

गल्ली तीन मजली पांच-सहा पाखें त्या मध्यस्थित टावरच्या चहूबाजूंनी लांबवर विस्तीर्ण पसरलेली मोठी मोठी अंगणें मध्यें सोडलेली वर्तुलाकार सभोंवती नारळीकेळींचें दाट वन ! त्या अंदमानातील घनदाट जंगलांत केव्हां केव्हां मधू मधू तीस-चाळीस फूट लांबीचे प्रचंड अजगर जसे वेटाळें घालून पहुडलेले आढळतात तसा तो अजगरच जणूं काही ! अजगरासारखाच किती मोहक दिसायचा !

त्यांत प्रत्येक बंदिवानाला स्वतंत्र अशी ती अेकेक अेकलकोंडी खोली गजांचें बंद दार असणारी ठेवलेली असे. जशा त्या सातशें-साडेसातशें अेकलकोंड्या सात्याच खोल्या त्यात आहेत म्हणूनच त्यास Cellular jail कक्षाकारागार हें यथार्थ नाव ठेवलेलें होतें.

त्या प्रचंड खोलीत बाहेरून पाहणाऱ्याच्या डोळ्यांना प्रकाश भरपूर दिसे पण प्रकाशाचा विशेष हा असे की त्या खोलीत पाऊल टाकून गजाच्या दाराला अेकदा का बाहेरून कुलूप ठोकलें गेलें की डोळ्यांना किती जरी लख्ख दिसलें तरी हृदयांत अेकदम काळोख पसरावा ! जीव गुदमरावा ! त्या प्रशस्त खोलीची अेकलकोंडी होऊन पडावी !

तशा अनेक अेकलकोंडींत त्या काळ्या पाण्याच्या बंदिवानांचे त्यांनाही अेकच बंदी अशा अलग करून कोंडण्यांत आलें. तीन चार दिवस त्या अेकलकोंडीत अेकेकटा बंदिवान तसाच डांबून ठेवल्यानंतर त्याच्या शिक्षापत्रकांतील माहिती निरीक्षून त्यांच्या अपराधांच्या आणि पूर्ववृत्ताच्या अनुरोधें निरनिराळे वर्ग पाडण्यात आले. जे तात्कालिक क्षोभांत अपराध करून गेले आणि प्रथमच दंडित त्यांचा सुधारणीय म्हणून अेक वर्ग. जे निढावलेले अपराधी त्यांचा दुस्सुधारणीय यांचा भयंकर म्हणून दुसरा वर्ग असे अपराधविज्ञानास (Criminology) धरून दोन वर्ग पाडण्यात आले. कटक पहिल्या वर्गात पडला आणि तो अिंग्रजी, हिंदी शिक्षितही असल्याने महिना दोन महिन्यांतच रुग्णालयात बंदीलेखकवर्ग जो असतो त्यात थोडफार लिहिण्याचें काम मिळून बंदिवानांत तो बाबू म्हणून गाजणार हें अुघड झालें. परंतु रफिअुद्दिनचें शिक्षावृत्त भयंकर वर्गांत मोडून त्याचेवर अंदमानांतच पांच वर्षेपर्यंत त्या कारागारांतच बंद ठेवण्याचा आणि कडक पहाऱ्यात वर्तन चोख दिसेतों सक्त काम करण्याचा प्रतिबंध घातला गेला.

अंदमानला आतांना भयंकर आणि निढावलेले (Habitual) बंदी धाडण्यात येत नाहीत. त्यामुळें तिकडील बंदिवानांना बऱ्याच सवलती आजकाल मिळतात. पण तीनपस्तीस वर्षांपूर्वी भयंकर आणि निढावलेले असे अट्टल दंडितच बहुधा तिकडे धाडण्यात येत असल्यामुळें त्यांना राबवून घेण्यासाठीं तसेच कडक नियम आणि त्यांची दुष्ट खोड जिरवण्यासाठीं तसेंच सक्त काम योजावें लागे. त्यावाचून दुसऱ्या कोणत्याही [illegible] व्यवस्थेला तसले राक्षसी दंडित ताळ्यावर आणणें

आणि समाजाला हितकारक अशीं कामें त्याच्याकडून करवून घेणे, निदानपक्षी समाजाला त्याच्या स्वैर अस्तित्वापासून भोवणारा उपद्रव टाळणे, जवळजवळ असाध्यच होणार होतें

रफिउद्दिनसारखे उलट्या काळजाचे काही दंडित (Convicts) तसल्या कडक व्यवस्थेलाही धूळ चारून काळ्या पाण्यावरून मुद्दा पळून जात, देशाला परत पोचत आणि परत समाजावर अघोर अत्याचार करीत, असे आढळून आल्यामुळे रफिउद्दिन मागे पळून गेल्यानंतर मधल्या काळात ही व्यवस्था अधिकच कडक करण्यात आली होती त्या दुर्दमनीय बंदिवानानाही पुरून उरावे असेच त्याच्याशी प्रसंगी त्याच्याहूनही कठोरपणे वागणारे चाणाक्ष अधिकारी त्या बंदिवासागारावर मध्यंतरी नेमण्यात आले होते रफिउद्दिन काळ्या पाण्यावर आता जेव्हा पुन्हा धाडण्यात आला तेव्हा त्याची गाठ अशाच अेका सवाअी दंडम बंदिपालाशी पडणार होती

आपल्या पूर्वीच्या परिचयाची व्यवस्था आणि अधिकारी बदललेले आहेत, हे रफिउद्दिनच्या ध्यानात तेव्हाच आले आणि ह्या नव्या अधिकाऱ्याच्याही डोळ्यात धूळ फेकण्यासाठी जेथे जे जे लागू पडेल तेथे ते ते वुगल्या मनधरणी, पायधरणी, माह्यात बकबक, शिवीगाळ, खुळेचार दांडगाअी, हसरी तोंडपूजा वा खटयाळ निगरगट्टपणा, अित्यादि प्रकारच्या वर्तनाचे साधन योजायला त्याने आरंभिले

त्या नव्या बंदिपालाने, भयंकर आणि अधम असे जे नवे बंदिवान येत, त्याच्या पूर्ववृत्ताच्या सरकारी टिपण्यावरून त्याच्याविषयी काय धोरण ठेवावयाचे ते मनात ठरवावे आणि मग त्याच्या प्रस्तुतच्या मनोवृत्तींना चाचपून पाहण्यासाठी त्याच्या अेकदा दोनदा समक्ष गाठीभेटी घेत असावे अवश्य तेथे प्रथम अगदी मनमोकळेपणाने बोलण्याचा आव आणावा, सौम्यपणा दाखवावा आणि मग स्क्रू हवा अितका पक्का दाबीत चलावे त्याप्रमाणे त्या नव्या चलानातील बंदिवानानाही त्याने चाचपण्यास हळूहळू आरंभ केला पाच-सहा दिवस त्याना अेकलकोडीत कुजत टाकल्यानंतर अेके दिवस बंदिगृहावरील मुख्य जमादारासह तो बंदिपाल रफिउद्दिनच्याही कोठडीपुढे अचानक यभून टेपला

बंदिपालसाहेब स्वत ज्याच्या अेकांतकोठीपुढे (Solitary cell) न बोलावता जातात, त्या बंदिवानाचे महत्त्व अितर दुर्लक्षित बंदिवानात अेकदम वाढते ! त्या नरपशु समाजात आपण अेक मुख्य प्रस्थ आहोत असा त्या बंदिवानाचाही अहंकार चढतो तसाच रफिउद्दिनलाही तत्काळ चढला तो अितक्या सर्वत पहाऱ्यात अेकलकोंडीत गाग्या कुजत पडला होता की यांणी चिटपाखरू जरी त्याच्याशी बोलायला आले असते, तरी भाग्य समजता—मग आता तर स्वत ‘भार त्याच्याकडे आपण होअून आले आणि यताच विचारता झाले,

'क्या, रफिअुद्दिन ! ठीक आहे ना तुझ? काही गाऱ्हाण बिऱ्हाण ?"

'सरकार, आप ही मावाप हैं अब हमारे!' रफिअुद्दिन अगदी नम्रतेचा बुरखा घेअून गयावया करू लागला, ' मला हव तर फाशी द्या परतु ह्या अेकल-कोंडीत अस अेकट बदीत काबून ठेवू नका! चकार शब्द कोणाशी बोलायची चोरी! मी असा अेकटा ह्या भयकर् अेकान्तात आणखी काही दिवस राहीन तर वेड लागेल मला वेड !

'अेकटा राहायला तू कटाळलास ?' बदिपाल हसला 'अेवढच ना तुझ्या ह्या तळमळण्याच कारण? अच्छा, जमादार ह्याला अेक बिबी आणून द्या सोबतीला! आमच्या त्या स्त्रियाच्या बदिखान्यात हव्या तितक्या बिब्या आहेत!'

बदिपाल चेष्टेखार आहे हें पाहताच रफिअुद्दिन अेकदम पाघळला त्यातून बिबोचीच गाष्ट निघालेली! त्याची मुद्रा लगेच रगेल झाली आणि तो म्हणाला,

साब, त्याला स्त्रियाचा बदिखाना का म्हणता? बहुतेक बदिवान त्याला बिबीघर म्हणतात आणि आमच्यात जे खरे रसिक आहत, ते तर त्याला म्हणतात चिडियाखाना! – पाखरान'! पण साब, त्या पाखरानातल पाखरू तुम्ही आमच्या सारख्याच्या वाट्याला कुठल येअू देणार! तो समोर बसला आहे ना काथ्या कुटीत–तो काळा कुरूप कोळसा! तशा डोमकावळ्याना काय ती तुम्ही देणार ती पाखर! साब, खरोखरीच हा काय वर पक्षपात सरकारचा? तो डोमकावळा–तो कटक–गाशाच चलानी तोही गळेकापू दडित, जन्मठेप काळ्या पाण्याचा अपराधी! मीही तसाच पण मला पाच वर्षे ह्या बदिशाळेत–ह्या अेकलकाडीत–सडत पडण्याची शिक्षा, नि त्याला लगेच कोठडीतून बाहेर काढून त काथ्या कुटण्याच हलक काम दिल गेल नि सागितल गल की तुला लवकरच बदिलेखकात नेमू म्हणून! त्याला लिहिनावाचता यत तर मला पण काही येतच की साब! (ह्या बाबूना लिहिता येत तर साब आम्हाला लढता यत!) पलटणात होतो मी सरकार! मद आहे मो साब! पण आम्हाला भयकर म्हणून या काळया पाण्यावर अेकलकाडीत सडत टाकता नि बाबूना, ह्या डोमकावळ्याना ह्या भेपपानाना सुधारणीय' म्हणून निवडून त्याना लग्नाची परवानगी देता! आणि त्या पाखराना तल्या वाटेल त्या पाखराला पाळायला नेअू देता! हा अगदी अन्यायाचा नियम नाही का? साब! आम्ही शिपाअी लोक दारचे शिकारी कुत्रे! जिवावर बतली तरी जो पाळील त्याच्या पायी प्राण द्यायला माघार घेणार नाही अशाना कोठडीत सडवीत मारण्यापेक्षा सरकारने मला वाटेल त्या लढाअीवर धाडाव, शत्रूच्या तोफेच्या तोंडावर सोडाव! सरकारकामी माय शिर द्यायला हटणार नाही बघा'

'अरे वा! अगदी वेळेवर सागितलस बघ हू! सरकारला अेक शिर हवच होत की आता! ते जररेवाले आहेत ना? ह्या काळ्या पाण्याच्या घनदाट जगलातील राक्षस? माणसाच्या शिरातील कवटी काढून ते तिला तासून मासून,

त्यांत रंगी शिपल्या खचून अशा अेक मुरेख दारूचा पेला तयार करून देतात म्हणे, की यंव ! तसा अेक पेला लंडनच्या प्रदर्शनांत ठेवायचा आहे सरकारला ! त्या जररेवाल्याकडे देतो धाडून तुला ! तुझं डोकं अगदी फक्कड आहे त्यांना हवी तशी पोकळ कवटी पुरवायला !' साय मोठ्याने हसले.

'माझं डोकं ? छट् ! त्या समोरच्या डोमकावळ्याचं–त्या कंटकचं डोकंच त्या कामी अधिक अुपयोगी ! साव, डोनयाच्या कामी बाबूलोकच अधिक डोकेबाज! लवचीक डोकं असतं तें तासायला–घासायला तशा जडावाच्या कामाला !'

'पण तें त्या कंटकचं डोकं ब्राह्मणाचं आहे, होय ना जमादार ? ब्राह्मणाची कवटी म्हणे मरीव असते, मेंदू असतो तिच्यात ! आम्हांला पोकळ कवटी हवी तुझ्यासारखी !. आम्हांला पोलिसानी कळवलं आहे की, त्या कंटकचं घराणं मोठं, कुलशील, बुद्धिमान् समजलं जाअी नि त्याचा बाप म्हणे मोठा शास्त्री होता !'

'हो हो तर ! नुसता शास्त्रीच नव्हे, हा कंटकचा बाप मोठा ज्ञानी नि परोपकारी पण होता साब ! त्याच्या बापाने आपल्यापाशी असलेली अपरंपार संपत्ति शेवटी अेका अनाथालयाला धर्मार्थ देअून टाकली !'

'हूं ? अशी होती तरी किती ती संपत्ति ?' आश्चर्याने जमादार मध्येच पुसून गेला.

'तीन भरतुकडीं मुलं नि अेक मुलगी !' रफिअुद्दिन हसला. भोळा जमादार फजीत पावल्यासारखा झाला. रफिअुद्दिन पुढे सांगू लागला, 'तीं सारीं मुलं त्याने अनाथालयाला दिलीं ! त्या भुक्कड मुलांतला हा कंटक पडील माअू अिथे बाबू बनू पाहतो आहे ! आणि ती बहीण कलकत्त्याच्या मासळी बाजारातली, बिडी बनके पानपट्टीका दुकान चलाती है साब ! मैंने खुद अुसको देखी है, पान भी चुंबाया है अुसके दुकानका ! किधरका कुल और किधरका शील ! पोलिसको इसने जो कुछ गपोड बातें बतायी अुसको अुन्हें भी लिख मारी, और क्या ! अैसे भुक्कड आदमी को आप बाबू बनाते, और हमारे सरीखे सरकारके विश्वासु पलटनवाले मर्द सिपाहिओंको कुत्तेके मौतसे मरवाते हैं अिस कोठडिओंमें !'

' परंतु, तुम काले पानीसे पीछे भागा हुआ बंदिवान है ! यह भूलो मत !'

'सरकार, माझा अक्षम्य अपराध आहे तो ! पण पश्चात्तापाने माझं मन राख झालं आहे आधीच ! त्या दुष्कृत्याने मी काय मिळवलं ? पहिल्यापेक्षा शतपट अधिक यातनांत मात्र पडलो पुन्हा त्याच कोठडीत बेड्यांनी हातपाय जखडलेल्या बंदीमध्ये येअून ! आता तुम्ही हुसकलंत तरी काळ्या पाण्यावरून परत जाणार नाही मी ! द्याल तें काम करीन, सांगाल तेव्हा अियेच घरदार करीन. पण लग्न तेवढं लावून द्याव अं सरकार माझं ! अियेच आता माझी माती पडणार ! तरी ह्या अेकलकोंडीतून काढाव अेवढीच आपल्या पायी विनवणी !'

'अच्छा जमादार, अुद्यापासून ह्याला तेलाच्या घाण्याच --- कोलूच काम द्या! जर तू नीट पुर पुर काम करीत राहिलास, तर सहा महिन्यानी तुला हलक काम देअीन, पण बघ, तुझी ही वाह्यात बडबड करण्याची खोड सोडली पाहिजे तुला! कुणाशी अवज्ञेचा चकार शब्द बोलता कामा नये आणि ध्यानात घर की, जर पुन्हा बंदिगृहाचा रस्ता धरलास, मस्ती केलीस, तर हाडन् हाड तोडून काढीन! पळून जाण्याचा यत्न करणाऱ्या दंडिताली अेकदम गोळी घालायचा नवा अधिकार आम्हाला आता देण्यात आला आहे! मागल्या सरकारी ढिलाअीच्या भरवशा-वर पूर्वीच्या फंदात परत पडू नकोस! गाठ आता माझ्याशी आहे! तुझे मागचे अपराध मी विसरतो, पण समाजाला ह्यापुढे तरी अुपद्रव न देता कष्ट करून पोट भरशील तर! जमादार, ह्याला ह्या अेकलकोंडीतून काढून घाडा घाण्यावर नि तियल्या बंदिवानात मिसळू देत जा दिवसभर रात्री बंद करीत जा अिथेच.

त्या पक्षकारागृहात प्रत्येक चाळीच्या अंगणात अेक छपरी बांधलेली होती. त्यातच ते पायकोलूचे म्हणजे पायघाण्याचे काम चाले अेका मोठ्या लाकडी घाण्याला अेक जुवासारखा मोठा दांडा जोडून त्याला प्रत्येकी दोन माणसे लावीत. घाण्यात सरसू (मोहरीच्या जातीचे बारीक दाण्याचे धान्य) घालून प्रत्येकी तीस पौंड तेल संध्याकाळपर्यंत काढावे लागे बैलाच्या ठायी जुपलेली ती माणसे दिवस-भर त्या घाण्याभोवती गरागरा फिरत. त्याच्यात कुणी कुचराअी केली, तर त्याना बैलासारखे हाकण्यासाठी वॉर्डर नेमलेले असत त्या छपरीत अशा घाण्याची ओळच्या ओळ असे आणि त्या सर्वांवर देखरेख करण्यासाठी अेक तांडेल -- दंडितांपैकीच चढवलेला अेक दुय्यम जमादार -- नेमलेला असे त्या कामाचे कष्ट अितके कठीण असतात की, अट्टल दंडित सुद्धा त्या छपरीत पाय टाकताच रडकुंडीला येत त्यांच्या-तील निगरगट्ट सोदे फारच अळटळ करू लागले तर संध्याकाळी तेल पुरे काढीतो त्याना तसेच ते जुपून ठेवीत ते प्रसंगी रात्री सातआठ वाजेता! संध्याकाळचे जेवण सुद्धा रात्री तेल पुरे करीतो दिले जात नसे! अशी सक्ती होती, म्हणूनच ते अट्टल दरोडेखोर, हत्यारी, गावगुंड, प्रभृति निढावलेले दंडित काहीतरी शिस्तीत राहात, त्याच्याकडून काही तरी काम करून घेता येअी जे दयाळे वा बंदिगृहात

त्याला सोप्यातले सोपे वाटले पहिल्याच दिवशी ताडेलाच्या हाती अेक 'हळकुंड' रफिअुद्दिनने हात हलविताना चुपचाप देताच त्याची जुनी मैत्री नवी झाली आणि रफिअुद्दिन दिवसभर माडी ठोकून गप्पा छाटीत पडून राहू लागला त्याच्या जागी ताडेलाने दुसरा अेखादा थापडबाजीचा दंडित चोपून लावावा, सध्याकाळच्या आत रफिअुद्दिनच्या वाट्याचे तेल पुरेपूर रफिअुद्दिनच्या नावे मोजून देण्यात यावे, असे चारपाच दिवस लोटले

ह्या दंडित ताडेलाच्या हाताखाली जे दंडित वॉर्डर होते, त्यात जोसेफ हा त्याच्या फार भरवशाचा झाला होता कारण ताडेलाला मोठमोठे लोटे भरून तो दही चोरून आणून देत असे बंदिवानाना आठवड्यातून दोनदा दही मिळे ते वाटल गेल की ह्या चाळीतील बंदिवानाच्या पुढील सारे दही हा जोसेफ वार्डर धावदपटशान काढून नेअी आणि तें ताडेलाला देअी, तो छपरीच्या आड तें चोरून गट्ट करी ह्या जोसेफला दागिने आणि पैसे गिळकृत करण्याच्या लोभाने त्याच्या दोघा लहान लहान मेहुण्याना भुलवून, जेवायला घरी आणून अन्नात विष देअून ठार मल्याच्या अघोर अपराधापायी जन्मठेप झाली होती आणि हा ताडेल, मत्सरापायी आपल्या बायकोचे कुऱ्हाडीने खांडोळी अुडविण्याच्या अपराधासाठी काळ्या पाण्याची जन्मठेप शिक्षा गेली दहा वर्षे भोगीत आला होता अशी ही त्या ताडेलाची आणि त्या जोसेफ वॉर्डरची जोडा हाती त्या चाळीतील भाग्याना जुपलेल्या चाळीस-पन्नास बंदिवानाना हुकमीत राहण्याचे काम आणि वाटल त वरून तेल पुरते पिळून घेण्याचे दायित्व (जबाबदारी) ह्या जोडीकडे असे जे पैसे चारीत वा अत्यंत दडम पण ताडेलाचे दास, त्याना चक्क बसवून ठेवण्यात येअी आणि त्याच काम जे त्यातल्या त्यात सद्वर्तनी, गयाळ, सोसाळू, त्याना मरेतोपर्यंत राबवून भरून

वेताने आणि अशी वेळ साधून बंदिपालाकडे गुपचूप जाऊन सांगत असे 'शठासि आणावा शठ' ह्याच न्याये ह्या शठाच्या राज्यात व्यवस्था ठेवणे भाग असल्याने बंदिपालसाहेबही अशा हेरांना नेहमी हाताशी धरीत त्यांनी आणलेल्या चुगल्या-पैकी अनेक दुष्कृत्यें अपरिहार्य म्हणून पोटात घालीत जी अगदीच अक्षम्य, ती स्वये जाऊन अचानक पकडीत, पण अशा वेताने की, जोसेफसारख्या पटाईत हेरा-मेच ती चुगली केली, हे बंदिवानाच्या ध्यानात सहसा येऊ नये, हे हेर आहेत ह बाहेर फुटू नये नाही तर त्याच्यासमोर त्याच्यावर विश्वासून कोणीच काही दुष्कृत्य करणार नाही!

आठ दिवसांनी दुपारी बारा वाजता, लेख्यालयातले सारे लेखक, गणक घरी गेले असता, बंदिपाल अवेळी एकटाच लेख्यालयात आला 'शिपाई!' म्हणून त्याने हाक मारताच पहाऱ्यावर असलेला एक शिपाई आत आला! 'जोसेफ वॉर्डरको बुलाव!' असे बंदिपालाने आज्ञापिताच शिपायाने बंदिगृहात जाऊन जोफेसला बंदिपालाकडे धाडले आणि आपण पुन्हा पहाऱ्यावर बाहेर येऊन उभा राहिला

'क्या जोसेफ?' बंदिपाल पुसू लागला, 'घाण्याच, तुझ्या चाळीतील छपरीत कस काय चालल आहे काम? तो नवा दंडित रफिअुद्दिन घाण्याच त्याच्या वाट्याच तेल पुरपूर पिळून देतो का? त्याच्याशी कुणाच काही सूतबीत जमत आहे की काय?'

'साब, त्याच तेल तो पुरं पुर मोजून देतो '

'ह? पहिल्या दिवसापासून पुर काम करतो तसला नाठाळ दंडित सुद्धा? खर सांग; चाचरू नकोस!'

'साब, तेल पुर पुर मोजून देतो तो, पण ते सगळ तो स्वत पिळीत नाही आपली सकाळची बंदिगृहातल्या फेरीची वेळ टळेतो तो घाणा कसाबसा ओढतो, पण पुढे तो बसून राहतो नि त्याच काम दुसरा कोणी तरी दिवसभर घाणा ओढून पुर करतो ताडेलच बदली माणूस देतो '

'काय?' बंदिपाल संतापला, 'तू मला हे अितके दिवस न सांगता दाबून ठेवलस? मग तुला मी कशाला ठेवल आहे तिथ टेहळणी करायला?

'क्षमा करावी साब! पण मागे अितर काही दंडितांना असच बसवून ठेवून नि बदली माणूस देऊन ताडेल काम करून घेतो म्हणून मी गुपचूपपणान आप-णाला कळवल, तेव्हा आपण तिकडे कानाडोळा केलात, म्हणून मी भ्यालो सच ते आताही सांगायला!'

'केव्हा कानाडोळा करायचा नि केव्हा नाही, तो प्रश्न माझा आहे खरेच जे दुबळे वा सुधारणीय त्यांना शिस्त केव्हा दिली असली तरी चालेल काम पुर झाल की आटोपल पण हा रफिअुद्दिन अनेक अधमाधम अपराध केलेला, त्यात

काळ्या पाण्यावरून पळालेला! त्याच्याशी कोणाचही सूत पटता कामा नये बोल, ताडेल त्याला का बसवून ठेवतो? तो का रफिअुद्दिनाचा मिंधा ? '

'सरकार, ते मला अजून पक्क कळल नाही नाही तर ती गुप्त बातमी मी तेव्हाच दिली असती पण होय ना होय रफिअुद्दिनने ताडेलाला पैसा चारला असावा ! '

'पैसा ? नि रफिअुद्दिनपाशी ? त्याची झडती साजसवाळ करून स्वतः जमादार घेतो ना ? माझी सक्त आज्ञा आहे तशी ! '

'झडती करून घेतो जमादार ! पण रफिअुद्दिनपाशी पैसे आहेत खरे कुठे तरी लपवलेले 'नाही तर तबाखू नि अफू पण ताडेल अितकी त्याच्यासाठी स्वत च्या पैशातून चोरूनमारून बंदिगृहात कशाला आणवणार होता ! '

'हा ! त्यातीलच काही तमाखू नि अफू तुलाही ते चारीत असतील म्हणून तू ती चुगली अजून मला केली नव्हतीस ! '

'देवाची शपथ, साब, मी शिवलो नाही कधी त्याच्या तबाखूच्या चिमटीला मुद्धा पण ताडेलाला तो पैसा देतो, ह्याचा पक्का पुरावा मिळाल्यावाचून मी चुगली करतो, तर आपण मलाच खोट पाडतेत, म्हणून मी डोळा तेवढा ठेवून होतो ताडेलाच्या पोटात शिरून मी त्याच बिंग लवकरच अुजेडात आणीन साब बहुधा अुद्याच त्याची काही तरी देवघेव होणार आहे पुन्हा, अशी भाषा मी अैकली आहे छपरीआड साब, पण मला ताडेलाची भीति वाटते, मी नुसता वॉर्डर ! जर मला आपण, धनीसाब, ताडेल कराल ना '

'तर तू त्या ताडेलापेक्षाही जास्त पैसे खाअून दुर्जन निघशील ! बर, तू धरून दे पुराव्यासुद्धा रफिअुद्दिनचे पैसे घेताना त्या ताडेलाला, किंवा रफिअुद्दिन पैसे कुठे लपविता ते तरी पकडून दे, मग बघेन तुझ्या बढतीच काय ते ! जा, लाग आपल्या कामाला पण थांब, तुला मी अेकटाच बोलावला ह्यामुळे बंदिवानांना तुझा हेर म्हणून संशय येअील अेवढ्यासाठी हे काहीतरी अुघड काम घेअून जा- ताडेलाला सांग की, सरसू तेलाची तीन मोठी पिंप आत्ताच्या आत्ता भर मद्रासच्या तारवावर चढवायची आहेत ती तापडतोड ! ही घे चिठ्ठी ! हू जा ! अेवढ्या-

त्याच्याकडे येत असलेला त्याने पाहिला. त्याला बंदिपालाने वरूनच बंगल्यावरच येे म्हणून अनुज्ञा दिली. जोसेफला पहारेवाल्या शिपायाने बंगल्यात जाअू दिले.

जाताच जोसेफने बंदगी करून सांगितले, 'साव, आत्ताच्या आत्ता चलाल तर पुराव्यासह ताडेलला पकडता येअील. रफिअुद्दिनने सोन्याची गिनी ताडेलाला दिली, ती आपल्या धुडत्याच्या खालच्या पट्टीला असलेल्या चोरखिशात घालून ताडेलाने शिवून ठेवली आहे. रफिअुद्दिनपाशी आणखी दोन गिन्या तरी त्याच्या अंगावरच आहेत. तंबाखू नि अफू ताडेलाने त्याला आणून दिली, तीही सरसूच्या पोत्यात सध्यापुरती कोंबून ठेवून ते दोघे छपरीच्या मागच्या बाजूला आडोशाला निष्काळजीपणाने झुलक्या घेत पडले आहेत. मी कपडे धुवायच्या निमित्ताने चाळीबाहेर पडलो, तो कुणी नाहीसं पाहून तडक आपल्याकडे आलो पण धनी ! माझं नाव मात्र सांगू नये ! नाहीतर माझं टोकच फोडतील ते कुणी तरी बंदिवान मला गाठून कुठे तरी ! पण आपण मात्र लवकर जाव.'

'ठीक जा तू. हे सारे पकडले गेले तर तुला बढती मिळेल ! तू आपल्या कामावर त्या छपरीत जाअून बैस जा गुपचूप.'

जोसेफ जाताच बंदिपालाने जमादाराला आपल्यासह घेतले आणि नेहमीची खालची वाट टाळून, वरच्या टॉवरच्या तिसऱ्या मजल्याच्या वर्तुळात येअून आणि साऱ्या चाळींची दारे त्या टॉवरमध्ये जी बाटोळी लागलेली होती, त्यातून रफि-अुद्दिन असलेल्या चाळीचे ते तिसऱ्या मजल्याचे दार वरच्या वर अुघडून तो बंदिपाल अचानक त्या छपरीच्या अंगणात खाली अुतरला कोणी पाहते न पाहते तो तिच्यामागे त्या आडोशाला आला, तो जोसेफने सांगितल्याप्रमाणे रफिअुद्दिन आणि ताडेल झुलक्या घेत पडलेले आहेत आणि रफिअुद्दिनच्या घाण्याला अेक

भीतीने गागरून नव्हे तर अुलट अेखाद्या विथरलेल्या सकशीतील वाघासारख्या-रयाची सारी हिंस्र वृत्ति अंगात अुसळून, डोळे वटारून, ताठरपणे त्या अडविणाऱ्या वॉडरचे हात मधून मधून झटकीत !

जमादारान ताडेलाच कुडते काढून पट्टी फाडली, तो खळकन अेक सोन्याची गिनी खाली पडली !

' ह्या रफिअुद्दिनची पण झडती घ्या !' बंदिपालाने आज्ञा दिली जमादार पुढे झाला बंदिपालाच्या आड जमादार थोडासा येताच रफिअुद्दिनने स्वतःच्या पोटकुळीस खोचलेले काहीतरी कमरेमागे हात नेअून चलाखीने काढले त्यासरशी जमादार ओरडला,

' साब ! साब ! ह्याने पोटकुळीचे पैसे हाती घेतले आहेत, गिन्या आहेत साब ह्याच्या हातात ! ह्या, ह्या हातात ! धरा, हा हात हा !'

जमादार, वॉडर हाताशी झगडतात तोच रफिअुद्दिनने गिरकी मारून बंदिपालाकडे पाठमोरे होताच हातातले काहीतरी ताडात टाकल

' ताडात घातल्या गिन्या ह्यान ! हो हो धनी, अगदी गिन्याच ! मी पाहिल्या ! आत्ता ह्याच्या ताडात आहेत !' जमादार वाडर प्रतिज्ञेवर ओरडू लागले

बंदिपाल ओरडला ' ताड अुघड ! रफिअुद्दिन अुघड ! ताड अुघड !'

अेक-दोन वेळा जमादाराच्या हाताला हिसडून मान खालीवर केल्यानतर रफिअुद्दिन स्पष्ट शब्दात ठासून म्हणाला

' काय निष्कारण छळ हा साहेब, आम्हा बापड्याचा चालवला आहात ह्या लबाड हलकटाच्या चुगल्या अैकून ! हें पाहा ताड अुघडतो ! आहे काही तरी आत ? बोलता तरी आठ असत का मला जरतोडात सोन्याचीखाण असती तर!'

आ वासून रफिअुद्दिन जमादाराला वेडावू लागला, बंदिपालासमोर आ वासून दाखवू लागला जाभ वर घे मागे न हा जबडा नीट अुघड ! तो अुघड! बंदिपाल म्हणे तसतस रफिअुद्दिनने केले पण ताडात काही अेक आढळले नाही !

' क्या जमादार किधर है अिसके मुहमे गिनिआं ?' बंदिपालान विचारले,

ओशाळलेला जमादार थोडा चाचरत पण पुन्हा तेच सांगू लागला,

' काही म्हणा साब ह्याच्या ताडात काही तरी होतच होत !'

काही तरी माझ्या ताडात होतच, आहेही, पण तें काही तरी म्हणजे सोन्याच्या टिकल्या जडवलेले माझे दात ! त चमकताना तुझ्यासारख्या भुक्कडाला सोन्यासारखे वाटले, भासले असाव नि आज ना अुद्या रे दुष्टा तुझ्या नरडीला तच फोडल्यावाचूनही राहणार नाहीत !'

रफिअुद्दिन बळजपण जमादाराला खिब्या हासडू लागला ! हा दुजन बिघडला आहे, असे पाहताच बंदिपाल गरजला

'बेड्या ठोका आताच्या आता ह्याच्या हातांत! आणि धरून ठेवा त्याला अिथे! मालेची हिसडफिसड करीत होता, तेव्हा गिळलही असेल त्याने न समजू देता कांही तरी!'

रफिअुद्दिनच्या हातांत बेड्या ठोकून शिपाअी त्याला धरून ठेवताहेत तो बंदिपाल छपरीत गेला आणि ते कोपऱ्यातले सरपणाचे पोतें अुपसून पाहिलें तो आत अेक मोठी जुडी आणि तीतच अफूची डबी सापडली!

जोसेफने दिलेली गुप्त बातमी ततोतंत खरी होती. दुरून जोसेफ सगळे सगळे तिऱ्हाअीतपणे पाहत होता. पण अेवढ्या घोटाळ्यात जो मुख्य अपराधी रफिअुद्दिन त्याच्या अंगावर किंवा त्याला गोत्यांत आणण्यासारखें काहीच सापडलें नाही. तरी सुद्धा हजारांत एखादा बंदिवान अितका वेडर आणि खट्याळ असतो की, पकडला जाण्यापेक्षा वस्तु गिळून टाकून नाहीशी करायला सोडीत नाही, ह्याचे दोन-तीन अनुभव त्या बंदिपालालाही आलेले होते. त्याचा विचार करून त्याने रफिअुद्दिनचा पिच्छा पुरविण्याचे ठरविलें. ताडेलाला तात्पुरतें बमी करून त्यावर खटला भरला आणि डॉक्टरला बोलावून रफिअुद्दिनला ओकारीचें औषध देण्यास सांगितलें.

हातकड्या घालून कोठडीत नेअून रफिअुद्दिनपुढे ओकारीचें औषध ठेवताच त्याने तो पेला भिंतीवर भिरकावून दिला. तो पुरता पिसाळला. 'बळाने पाजा त्याला!' बंदिपाल गरजला. वॉर्डर, जमादार, शिपाई पुढे सरसावले. ओढाताण करीत, लाथाबुक्या खात-देत, रफिअुद्दिन शेवटी खाली पडला. त्याचे हातपाय दाबून तोंडचाप असतो तो घुसवून, त्याचे तोंड अुघडून, औषध अेकदाचें पाजलें गेलें. पहारे बसविले. संध्याकाळपर्यंत दोन-चार अुलट्या झाल्या, पण कांही एक पडलें नाही. बंदिपालही थोडा कचरला! कारण रफिअुद्दिनने पैसे गिळताना त्याने स्वतः पाहिलेले नव्हते. रफिअुद्दिन तर 'जमादारानेच कुभांड केलं आहे' म्हणून धडाधड अगदी गलिच्छ शिव्या जमादाराला हासडीत होता. पण प्रथमची

आपल्यावर त्या दिवसभर छळाचा आणि अन्यायाचा भडिमार व्हावा ह्या विचारासरशी त्याच्या अंगाचा संतापाने लाही लाही होत होती. त्याने जगाचा पूर्वी का आता कोणता तरी छळ केला होता काय ? वा दुसऱ्या कोणाला काही तरी उपद्रव दिला होता काय ? असा प्रश्न त्याच्या वाऱ्यालाही कधी उभा राहिला नव्हता । छळ म्हणजे त्याला त्रास होईल असा लोक जे जे करीत तो, अेवढीच काय ती छळाची-त्याची कल्पना ! त्याच्या अिच्छेविरुद्ध दुसरे कोणी जें जे करतील तो अन्याय ! ह्यापलीकडे त्या शब्दांना त्याच्या कोशात अर्थच नव्हता ! त्या जमादाराने जर त्याला गिन्या लपवितांना पाहिले नसते, तर कशाला हा प्रसंग येता? पाहूनही जर त्या जमादाराने मागितले नसते, तर सारे निभावते ! त्यावरही बंदिपाल जर त्याकडे कानाडोळा करून तो वागेल तसे त्याला वागू देता, तरी सुद्धा काय बिघडले असते ; अर्थात् तसे न करता त्या जमादाराने ते पहावे, मागावे, आणि बंदिपालने त्याला अंगे सडवावे, त्याची तंबाखू-अफू तोडावी, त्याच्या गिन्या पकडण्याची कामटेगिरी चालवावी, हा केवढा दुष्टपणा त्याचा ! किती अन्यायी छळक आहेत हे सारे !' मला अेवढ्याला पाडले, कुदलले, नि दिले पाजून !!'

हेच हेच विचार त्याच्या तापलेल्या आणि पिसाळलेल्या मस्तकात गरगरू चकरू लागले संताप ! संताप ! संतापून गेला तो अगदी ! त्या जमादाराचा आणि त्या बंदिपालाचा गळा घोटू की रक्त पिअू ! पण काय अुपाय ! तरी देखील काही तरी सूड असा घेतलाच पाहिजे. कोठडीत बंद करून जाताना जमादाराने त्याच्या हातातली हातकडी काढलेली होती. पण नुसता हात काय करणार ? पण हो रे हो ! लाहोरच्या बंदिगृहात त्या नूरमहंमदाने वेडाचे सोंग घेतले होते, तेव्हा अगदी असेच केले होते नाही का ! बस्स, त्याने वेड साधावे म्हणून जे केले, तेच मी सूड साधावा म्हणून करणार ! यव रे यव ! येअूदे आता सकाळी माझे दार अुघडायला त्या जमादाराला ! बंदिपाल नि तो डॉक्टरही तेव्हाच येअील तर किती बहार होअील ! रेंचे देता काय मा नो मला ! ह ह ह ! अशी अुडेल अेकदाची की यव रे यव !

असा काय जो त्याने सुडाचा बेत म्हणून मनात योजला, तो घडताच त्याच्या अपमानाची भरपाअी होअून त्या छळवादी जमादारादिकांची जी दुर्गति होणार तिच, ती जशी आता झालीच आहे, असे चित्र त्याला दिसू लागले ! तो पोट धरधरून समाधानाने स्वतःशी हसू लागला.

बंदिगृहात हजारात अेखादा अपार दंडित जेव्हा केव्हा असा काही भलताच पदार्थ गिळून बसतो आणि त्याला रेचाचे औषध द्यावे देण्यात येते, तेव्हा सकाळी त्याची खोली अधिकारी स्वतः अुघडतात आणि भंग्याकडून त्याच्या रेचाच्या कुंडीची झडती घेण्यात येते, तो पदार्थ पोटाबाहेर पडला की नाही, ते निरीक्षिण्यात येते. त्याप्रमाणे भंग्याला घेअून जमादार आणि दोन वॉर्डर सकाळीच

'रे दुष्कर !' बंदिपाल गरजला, 'बंदिगृहाचे नियम तुला आता आठवतात काय ? लोकांच्या मानां सचावच कापणाऱ्या राक्षसा, तुझी मान सुरंगाळली जाताच नेवढा न्याय नि अन्याय कळू लागला अं तुला ! 'गळेकापू' ही शिवी आहे समजलं ना तुला ? ठोका आणखी ! मेला तरी चिंता नाही ! पण ! पाणीतला विडा !'

रफिअुद्दिन आता मात्र सरोसरीच नरम आला तो धापा टाकीत पडला

भग्याने रफिअुद्दिनच्या कुंडीतला रेच बंदीपालासमक्ष ओतून पाहिला त्या पाणीत रफिअुद्दिनच्या पोटातून काही गिळलेला पदार्थ पडला आहे की काय ! त्यात काही मिळेल, हा रफिअुद्दिनला धास्तीच नव्हती, कारण त्याने गिनीबिनी काही गिळलीच नव्हती मुळी ! बंदिपालाची फजिती झालेली पाहून तो अुलट आनंदला ! तशा पायाळ अवस्थेतही तो निगरगट्ट दुष्कर मदळ विनोदाने अुपहासला

'काय ? सोनंच सोनं पडलं नाही पोटातून माझ्या ? घ्या ! घ्या ते वाटून तुम्ही सगळे आवडेल तितकं !'

डॉक्टर सुद्धा ओशाळला

'आपण अुगीच ह्याला त्रास दिला पर्यवेक्षक महाराज (सुपरिंटेंडेंट) रागावणार तर नाहीत ना ? ह्याने काही गिळलं होतसं दिसत नाही !' डॉक्टर बाहेर येअून बंदिपालाला इंग्रजीत म्हणाले

बंदिपाल अुत्तरला, 'ते दायित्व माझ्यावर ! तुम्हाला माणसाच्या प्रकृतीची परीक्षा कळते, राक्षसाच्या नि रानडुकराच्या नव्हे ! कारागृहातील अंग तस अमन, ह्याचा तुमच्यासारख्या ह्या विभागात नवीनच चाकरी वर आलेल्या डॉक्टराना पुरता अनुभव आलेला नाही ! ह्याला पुन्हा अेक ओकारीचं औषध दिलंच पाहिजे !'.

'काय ? ओकारीच ? त्याचा काही अुपयोग नाही ! ह्याच्या पोटात काही साण नसावं, नाही तर पहिल्यादाच अुमळतं'

'पोटात नाहीच पण—थांबा, पुन्हा नक्की पाहून सांगतो' असे बोलून बंदिपाल जमादाराला म्हणाला, 'हं ! ह्याला हातकडी ठोका, भग्याकडून धुअून काढा'

हें वाक्य बंदिपाल अुच्चारीत आहे, तोच रफिअुद्दिन पुन्हा चिडला,

'काय ? भग्याकडून मला धुवायचं ? मी काय पायखान्याची फरशी आहे ? माझी जात बाटवणार ? भग्याचा जीव घेअीन ! तू साहेब नाहीस ! कुणा भग्याच्याच पोटचा'

हा अपशब्द अैकताच पुन्हा साऱ्यांनी त्याला लाथाबुक्याखाली कुदलला आणि बंदिपालाने स्वतः त्याच्या गळ्याच्या फासळ्यापाशी अिनक्या बळाने दाबून तो

चिमटला की, रफिमुद्दिनने अेकदम किंकाळीच फोडली ! डॉक्टर घाबरला, पुढे होअून वदिपालाचा हात धरून त्याने त्याला बाजूला केले आणि समजावले

'हें काय ? रागाच्या भरात मारीत होतात की त्याला गळा दाबून ठार ! भलत सलत होईल बर अेखादे वेळी '

"भलत नाहीच, पण सलत मात्र झाल खरच?" वदिपाल हसला "डॉक्टर ह्या माणसाच्या गळयाला ' खोवडी ' आहे नि ती भरलेली आहे, ह्यात शंका नाही ! मी म्हणूनच गळा दाबून पाहण्याची ही संधि जुळवून आणली, कळल ? मी ती खोवडी दाबताच आतील वस्तु त्याला अेकदम सलली, बोचली म्हणून तो ओरडून पुन्हा पुन्हा ती गिळीत दाबून धरीत होता ताडातल्या स्नामूनी! उलटीच औषध द्या बळबट अेक, की 'खोवडी' अुघडलीच ह्याची !"

'पण 'खोवडी' म्हणजे काय ? " डाक्टर जिज्ञासले

त्याच थाडक्यात अस आहे की, पशु रवथ करण्यासाठी गळयाच्या ज्या पोकळीत चवण साठवन ठेवतात ती पोकळी मनुष्यालाही आपल्या त्याच जागी करून घेता येत अन्दत निढावलेले अपराधी गुरुपरंपरेने ह्या विद्यत पटाईत होतात ताडात एक शिशाची गोळी, तिला मासजाळत अेक रसायन लावून ते ठेवतात ती गळयाच्या कानाच्या बाजूला रुपेल अशा बेताने बरेच दिवस सारखी राहिली की भाराने मासात अुतरत त्या पोकळीला भोक पाडीत आत जाते

अेका आचक्यावर आचके! येणाऱ्या अुलटीस पाहून बंदिपालाने हातमंडी घालून पाडलेल्या रफिअुद्दिनाच्या गळ्याच्या फासाळ्यातील कानाखालच्या दोन्ही पोकळ्या बळकट दाबून धरल्या आणि बोटे वर वर सरकवीत नेली, ता अेका आचक्यासरशी तीन, चार, पाच गिन्या खळ खळ खळ करीत रफिअुद्दिनच्या तोंडातून भुअीवर पडल्या! आणि अेक लहान डबी–तीत अफू!

'गिन्या! गिन्या! पडल्या अुन्मळून! गिन्या!'' वाडर, शिपाअी, डाक्टर भंगी–सारे जण अेकदम गलका करून अुठले!

साळधान आनंदाने बेभान झाला तो जमादार! पुत्रजन्माचा आनंद झाला त्याला त्या गिन्यांची सुखप्रसूति होताच! त्याच्यावर खोटे बोलण्याचे जे किटाळ येणार होते ते टळले! अुलट अपराध पकडणारा पटाअीत जमादार असा तोच ठरणार होता आता!

आजवर रफिअुद्दिन खोबडीत भरभरून घेअून जाअी त्या गिन्यांच्या जिवावर तो ज्या अनेक वेळा अनेक बंदिगृहात पडला त्यात जिवंत राहिला होता, चैनात असे पण आता मात्र तो पहिल्यानेच बंदिवानात असा हताश झाला! अशा पाच गिन्या म्हणजे पाच लाख रुपयांची संपत्ति समजली जात बंदिगृहात! कारण तंबाखूची अेक चिमटी म्हणजे बंदिवान जगातला अेक रुपया! अेका रुपयाने जे काम बाहेर जगात करून घेता येते, ते तंबाखूच्या एका चिमटीने, आणि शंभर रुपयांत जे काम बाहेर करून घेता येते ते अफूच्या मात्रेअेवढ्या-अेका गोळीने बंदिगृहात करून घेता येते! अशा 'अेक चिमूट, एक रुपया' भावाने पाच गिन्या म्हणजे पाच हजार रुपये होते ते त्याचे! त्यावर स्वतः काही काम न करता पन्नास बंदिवान सेवेला ठेवून पाच वर्षे त्या कारागृहातील त्याचा सारा श्रीमंती संसार थाटणार होता! पण आता तो निष्कांचन,'भुक्कड' झाला! आता त्याला कोण विचारतोय बंदिवानात! हताश असा तो आज झाला!

फटके मारण्याच्या आधल्या रात्री रफिअुद्दिनला झोप अशी लागली नाही. फटक्याचे सपसप आवाज त्याला अैकू येत त्याचे मन थरथरू लागे तरीही त्याचे अैन्द्रजालिक वैद्यशास्त्र, त्याच्यासारख्याच अघोरी आततायाच्या संप्रदायात तो जे शिकला, त्याचा काही त्याला विसर पडलेला नव्हता, त्यावरील त्याचा विश्वासही अुडाला नव्हता! (फटके मारण्याच्या आधल्या रात्री जर मनुष्य आपलेच मूत प्याला तर त्याचे अंग आणि मन बधिर होते; "फटक्याची कळ फारशी लागत नाही," ही समजूत अशा अघोर आततायी दंडितात प्रचलित असते आणि त्याप्रमाणे ते ते 'ओसद' तो 'दवा' घेतात, ही गोष्ट अगदी खरी आहे.) रफिअुद्दिन पहाटेसच अुठला आणि त्याने त्याच्या पिण्याच्या टमरेलात स्वतःचे मूत्र मिसळून ते पाणी यथाविधि प्राशिले! त्याने कुराणातील काही आयतेही—मंत्रही म्हटले आणि नमाज पढून देवाला प्रार्थिले, 'फटक्यांच्या आघाताना वरच्या वर झेल! आग होअू देअू नकोस वातट्याची!' माणसाप्रमाणे राक्षसातही अैव देव असतोच! त्याने भुमी नखाने अुकरून त्या मंत्राने चिमूटभर माती भरली आणि तो अंगारा लावला आणि अल्लाच्या नावाचा अखंड जप करीत तो अैवल्याडीत अुजाडेता फेऱ्या घालू लागला

जंतुघ्न असें काही औषध अेका थाळीत आणि फटके संपतात त्या घावांवर बांधावयाच्या पट्टया हाती घेअून औषधालयाचा मिश्रक (compounder) आणि त्याच्या पाठोपाठ डॉक्टरही तेथें आला. शिपाअी रांग धरून ठाकले. अंगावर अेक लंगोटी तेवढी ठेवून रफिअुद्दिनला डोक्यापासून पायापर्यंत सताड अुघडें करण्यात आलें. त्यानें काहीअेक गडबड-बडबड सुद्धा केली नाही. त्याची नेहमींची आढदाढ खोड होती ती नव्हतीशी झाली होती. मुक्यानें तो आपली ती दुरवस्था जशी कोण्या दुसऱ्याची पाहावी, तशीच अद्याप पाहात होता. ती सर्व व्यवस्था तेथेंच अुभा राहून करविणाऱ्या त्या-त्याच्या शत्रु झालेल्या जमादाराला देखील तो अेक चकार शब्द बोलला नाही; बोलूच शकला नाही.

. . घण घण घण घंटा वाजली. तत्काळ टापटाप बूट अुडवीत टॉवरमध्ये बसलेला बंदिपाल बाहेर आला आणि त्याच्या मागोमाग चड्डी आणि जाकीट तेवढें अंगावर घातलेला, केस पिंजारलेला, दंडाचे बळकट स्नायु फुगलेला फटकेवाला ! त्याच्या हातात अेक लांब तीन बोटें जाडीचा सरळ वेत होता.

रफिअुद्दिन पाठमोरा बांधलेला, त्याला तें दिसलें नाही, पण दिसावें तसें भासलें. तो थरथर कापला !

'मारो !' बंदिपाल गरजला. त्यासरशी जणू काय वेतच ढुंगणावर सटकला असें होअून रफिअुद्दिननें केविलवाणी हाक फोडली, 'साब ! साब ! आस्ते ! अलगत तरी मारा !'

हातातील वेत सरसावून डोक्याभोवती फिरवून फटकेवाल्यानें नेम धरला.

'सात ! आठ ! नऊ ! दहा !' वेतामागून वेत सटक त चालले, मासात घुसत चालले। रफिअुद्दिन अर्धा बेशुद्ध, निपचीत पडला केवळ ठेवलेला साप जसा काठी लावताच तेवढ्यापुरता पुन्हा वळवळतो तसा वेताच्या फटकायासरशी अेकेक किंचाळी तेवढी शारीरिक प्रक्रियेपुरती त्याच्या तोंडून बाहेर पडू लागली ?

'अठ्ठावीस ? अेकोणतीस! तीस !!'

तो तिसावा फटका मारताच वेत फेकून देअून घामाघूम झालेला, धापा टाकीत मटकन् खाली बसला तो फटके मारणारा ? तो सुद्धा अितका थकला !

डॉक्टर झटकन् पुढे झाला तिकडीवरून सोडून खालीं पालथें निजविलेल्या रक्तबंबाळ रफिअुद्दिनची त्याने नाडी चाचपली, जिवंत आहे की नाही तो, अितकेच पाहाण्यापुरती! घावावर तात्कालिक मलमपट्टी करून रफिअुद्दिनला बंदिगृहाच्या रुग्णालयातील अेका अेकलकोंडीत नेले कोठडीला कडीकुलुपवून बंद केले

त्या रात्री घावाच्या कळावर कळा अुठून, आग आग होअून रफिअुद्दिनला खूप ताप चढला तापात मस्तकाची अुष्णता फार वाढली, म्हणजे मज्जाकेंद्रेही (Brain cells) अुत्क्षुब्धतात त्या मज्जाकेंद्रात विचाराच्या धक्याने जे कोणते आकस्मिकपणे डवचळते त्याची चित्रावलि (Film) तत्काळ अितक्या अुत्कटतेने प्रकाशून अुठते की, ती ती घटना जिवतपणे चालू आहेसे गुंगून पडलेल्या जिवाला भासते अितक्यात त्या विचारासंबधाने दुसरे मज्जापिंड चळले की ते त्याचा बोल्पट चालवू लागत देशकालाच्या क्रमाची जाणीवच स्थिरू शकत नाही त्यायोगे स्मृत घटनाभावभावनांची विक्षिप्त भेसळ होअून अनेक असंभाव्य दृश्ये प्रत्यक्षशी भासू

करीत करीत जेव्हा तो ती बिहारची हिंदु तरुणी पळवून वागलाणात येऊन लपला, तेव्हा त्याने ह्या भयकर अुपद्रवी दुष्कृत्यांना नित्याचा रामराम ठोकावयास हवा होता. ती तरुण स्त्री आणि तो पैसा घेअून सिंधकडे कोठे तरी अेक सद्गृहस्थ बनून, निर्वंधशीलपणे जी चैन करता येतो ती करून, शांततेत आयुष्य न्यावयास हवें होतें. आपल्या कृत्याना तो दुष्कृत्यें म्हणून देखील मनातल्या भाषेत संबोधून गेला. जसजशी तापाची गुंगी आणि फणफण चढत चालली, तसतसा हा शेवटचाच विचार त्याच्या चित्तात थैमान घालू लागला.

' अरेरे ! त्या बिहारीला—त्या बिहारच्या सुंदर पोरीलाच—रीतसर निक्का लावून बायको करून मी सुखाने नांदलो कां नाहीं ? अरेरे ! मी तिला भर महा-पुरात खापर फेकावं तशी की रे फेकली ! नीचा ! अरेरे ! पाण्यात गुदमरून काय रे तिच्या जिवाची—डोकं ठसकून खडकावर ! —आपटलं ! —फुटलं ! अबबब ! आजी ग ! कोण ह्या कळा ! ! '

...पुन्हा पुन्हा कण्हत, बडबडत, गुंगीत काहीच्या बाहीच पाहात, भावीत, त्याच्या डोक्यातील गुलाम हुसेनच्या स्मृतीचे केंद्र कोठून तरी डवचलें गेले.

' हरामी ... अे दुष्टा ! दे ती माझी मालती परत ! ठेव म्हणून ठेवली होती मी ती तुझ्यापाशी ! ... माझी, माझी आहे ती ... ठेवली आहे तुझ्या बापाने ! गुलाम, देतोस कीं नाहीस ... मारा ! हाणा ! ... पाय ओढला ! अय्याअी ! मेलो ! मेलो !

...... पुन्हा थोडा जागा झाला तो. ताप फणफणत होता. गुंगीतील गुलाम हुसेनशी झालेल्या मारहाणीत पाय आपटले होते त्याने त्वेषाने आणि त्यासरशी त्याचा घाव हिसडून विव्हळत अुठला होता तो. त्याला तेंच आठवू लागलें.

' मालती गुलाम हुसेनने पळवली नाही ? कुठे असेल ती ? अरेरे ! चोरावर मोर झाला नाही तो ! त्याच्या पिंजऱ्यातच ठेवली असेल त्याने त्या माझ्या छबेलीला ! '

लाहोरच्या बाजारात अुभ्या असलेल्या मालतीला अचानक पाहताच त्याने तिला जशी मिठी मारली 'प्यारी!—मालते!—'ओ! आव प्यारे रफिअुद्दिन मेरेको छोडके किधर गये थे पीतम आजतक?'

गळ्यात गळा घालून मालतीने जसे त्याला तिच्या बगल्यात नेले, दार लावून टाकले, त्याचे सारे कपडे काढले आणि अितक्यात तेथे असलेल्या अेका मोठ्या पेटीतून खाड्‌दिशी किशन सुरा अुपसून बाहेर पडला! बापरे! घात घात! ह्या दुष्ट स्त्रीने घात केला! ह्या मारेकऱ्याच्या, ह्या किशनच्या हाती मला सोपवलस काय? चाडाळणी, मालते, राक्षसी! 'चूप राक्षसा! किशन, बाध त्याला त्या तिकडीवर! बाध! माझ्या त्वेषाचा हा पाहा मी अेक बळकट वळीव वेत केला आहे तू किशन! ज्यावर हा माझ्यासह बसू पहात होता, त्याच ह्या पलगाची तिकडी कर!'

पलगाची अकस्मात् तिकडी झाली, मालतीच्या त्वेषाचा भयकर वेत झाला, बोलता बोलता स्वत मालतीची अेक केस पिंजारलेली, शेंदूर कपाळभर फासलेली, लाल लाल जीभ सापासारखी वाढणारी कोणी विक्राळ कृत्या झाली! किशनने अुद्दिनला तिकडीवर पक्का जखडला आणि त्वेषाच्या त्या वेताला तिने अुगारून रफिअुद्दिनच्या पाठीवर रक्ताचे कारजे अुडविणारा अेकच भयकर फटका मारला!

'अबबब! आय्याय्या! पाया पडतो, मालती, सोड! आयय्याय्या—हळू! मालती! क्षमा—क्षमा—क्षमा!—

पण मालती मोजीतच आणि मारीतच चालली ते रक्ताळ काटेरी फटके

'तीन! चार! पाच! पन्नास! शभर! वायूच्या झटक्यात स्वत:च ओरडून अुठला

'शभर!'

◆ ◆ ◆

## १३. नव्या वसाहतीतील लोक

'अुदे! अे अुदे! अग आज बोलत का नाहीस? घरात काय करते आहेस तिकडे? ये ये!'

साठी अुलटून गेल्ले पण अजून खणखणीत स्वर आणि सकस अगकाठी असलेला अेक पुरुष, आपल्या अेका साध्या बैठ्या आणि कौलारू घराच्या पुढील

झाडमारखण केलेल्या अंगणात खाटेवर येऊन बसता बसता आपल्या सात-आठ वर्षांच्या लहानग्या नातीला आवर्जून बोलावीत होता दुपारी त्या अंगणात दोन-तीन वाजता मावळी आली की तो त्या खाटेवर येऊन आताशी असाच बसत असे. कामकाज आटोपून कलत्या दिवसाला गुरढोर येतातून, मुले शाळेतून आणि त्याची सूनबाई — त्या नातवडांची आई — आपल्या चाकरीच्या कामावरून घरी येईतो तो म्हातारा त्या खाटेवर जेव्हा असा बसे तेव्हा त्याची सोबत म्हणजे अेक चर्ची आणि त्याची ती दोन लहान नातवंडे — अुपा आणि तिचा वडील भाअू बारा अेक वर्षांचा मोहन त्याना काही शिकवीत, काही गोष्टी सांगत, मधूनच समोरील फुलझाडांना झारीने पाणवीत किंवा मोहारलेल्या आंब्या फणसाच्या दिवसात अंगणाला लागून असलेल्या वाडीतील त्या त्या झाडांची राखण करीत तो तथे अगदी रमून गेलेला दिसे. .

त्याच्या घराच्या आजूबाजूला अेक तीस चाळीस तसाच घराचे आणि त्याहूनही साध्यासिध्या झोपड्यांचे मिळून अेक खेडे वसलेले होते ते खेडे होते जरी अंदमानात तरी दिसत होते अगदी अेखाद्या कोंकणातील खेडेगावाची थेट प्रतिमा ! कारण अेकदरीत अंदमान हेच मुळी आपल्या पूर्वसमुद्रावरील अेक प्रतिकोंकण आहे. झाडे, ऋतु पक्षी पीकपाणी, बहुतेक कोंकणचा थाट ! जर पश्चिमसमुद्राच्या कोंकण तटाला मुडपून पूर्वसमुद्रावर अुचलून धरले ना क्षणभर, तर त्या पूर्वसमुद्रात कोंकणचे जे पुसट प्रतिबिंब पडेल, तसेच अंदमान आहे कोंकणची रानविन तोडन मनु-

'हवा! पण तिथून धाडून द्या मला मोहनच्या हाती मी तिथे नाही येणार तुमच्यापाशी तुम्ही मग माझा पापा घ्याल वाल्च्यासारखा मला तुमच्या मिशा नाही वाटत लागत? तुम्ही वळ बोचवता त्या माझ्या गालाला तुम्हाला हवा तर विडा अिक्डेच धाडून द्या!' अुपेने तडजोडीची अट सुचवली

'अडल नाही माझं अेवढ!' ज्याला विडा हवा असेल ते पापा देअील! बर, मिशा न बोचवता पापा घेतला तर मग देशील का?' अप्पानी अुलट अट कळवली

त्या अुलट अटीला तिने तोडान जरी होकार दिला नाही, तरी अेकेक पाअूल भुअीवर घसटीत घसटीत अुपा हळूहळू त्या आजोबाजवळ येत चालली जणू काही ती होअून येत नव्हती तशी, पण तिला आजोबा बळेच ओढून नेत होते म्हणूनच ती पुढे चालली होती! अशा डौलाने अेकदाची आजोबाच्या हाताच्या आटोक्यात यअून ती थडकली, ताच आजोबानी तिला पकडून हसत हसत जवळ घेतले, रीतसर अेका गोड पाप्याची खडणी अुकळल्यानतर अेक विडा अुपेला आणि अेक मोहनला दिला आणि त्या आपल्या लडिवाळ लहान लहान नातवडाना दोन्ही बाजूना घेअून अ पा स्वत च्या हातावर आपल्या पानाबरोबर खावयाच्या तबाखूच्या बोकण्याला मळू लागले

जा जा अुपेचा विडा तिच्या तोडात रसरमून तिला गोड लागत चालला, तो ता तिची कळी खुलू लागली ती आपण होअून आजोबाच्य माडीवर केव्हा बसली आणि हसत हसत त्याच्याशी गुलगूल गोष्टी केव्हा करू लागली त तिच्या ध्यानात देखील आल नाही अुपा आणि मोहन ही दोन्ही मुले मोठी मोहक, खेळकर, बोलकी आणि तरतरीत होती

अितक्यात सन्मुखच्या अेका टेकडीवरून अेका मनुष्याला अुतरत असलेला पाहून मोहनने टाळी पिटली

'अप्पा, अप्पा, कटकबाबू येताहेत, कटकबाबू! ते ऽपाहा ते!'

अुपने पण अनुमोदिले

'हो रे हो कटकबाबूच ते!'

अप्पाजी त्या वेळेला जवळ पडलेले कलकत्याच अेक हिंदी पत्र वाचीत होते ते बाजूला सारून दृष्टि ताणताणून ते पुढे पाहू लागले, पण त्याच्या डोळ्याना चागलेसे दिसले नाही त्याना भासले दुसरच कोणातरी येत आहे

'कटकबाबू काही नाही ते, काही तरीच ओरडता झाल'

त्याचा नकार न खपून अुपा म्हणाली,

'कटकच हो अप्पाजी तुम्हाला नीट दिसत नसल तर माझ्या डोळ्यातून पाहा ह, पाहा ना! नाही जा, माझ्या डोळ्यातून पाहा!'

तिने आपले चिमकुले डोके अप्पाजींच्या अगदी तोंडाशी धरले, त्यांच्या डोळ्यापुढे ते अगदी पोचावे म्हणून त्यांच्या मांडीवर ती चढली, आपल्या मऊ मऊ केसांनी आच्छादिलेल्या डोक्याची मागची बाजू त्यांच्या तोंडावर टेकून त्यांच्या डोळ्यापुढेच आपले डोळे येतील अशी पाठमोरी बसली आणि ती चिमुकली अुषा आग्रह करू लागली,

'अप्पाजी, बघा ना माझ्या डोळ्यातून ! दिसत ? असं अं, आता दिसत ?' तिला ताच अेक खेळ झाला क्षणभर !

त्या अल्लड लेकराच्या खेळातल्या करमणुकीचा विरस होअू नये म्हणून आजोबांनीही आपल्या त्या ल्हानशा नातीचे ते कुरळमृदुल मस्तक आपल्या डोळ्यापुढे, अेखादी दुर्बीण धरावी तसे, अगदी गंभीरपणे धरले आणि तिच्या डोळ्यातून निरखून पाहिल्यासारखे केले आणि काय काय दिसते ते सांगू लागले,

'अगदी खरच ! अुषे, दिसत ग दिसत तुझ्या डोळ्यातून मला आता अगदी स्वच्छ ! बघ, कटकबाबूच ते येताहेत हो ! आणि ती बघ आमची चिमुकली अुषा अेखाद्या मोठ्या सुज्ञ आणि समजुतदार मुलीप्रमाणे आपली पाटीपेन्सिल नि पहिले पुस्तक घेअून त्यांच्यापाशी कशी शिकायला बसत आहे पाहा ! तो आमचा मोहन पण धडा वाचू लागला अं ! बघ सगळ मला तुझ्या डोळ्यातून कस स्वच्छ दिसत आहे आता हे सगळ असंच्या असं खर घडल पाहिजे अं ! नाही तर तुझ्या डोळ्यातून खोटं दिसत असं म्हणेन मी ! मग अळंटळं न करता बसशील ना शिकायला कटकबाबू येताच ?'

'हं शिकायला बसेन पण ! ' अुषा किंचित असंतुष्ट मुद्रा करून बोलू लागली पण तुमच्यापाशीच बसेन, कटकबाबूपाशी नाही ! '

'का ग ? ते कसे छान शिकवतात तुम्हा दोघांना ! गुरुजी पण गुरुजी आहेत ते कसे छान ! '

अिश्श ! कसले आले आहेत छान ! अप्पाजी, खरच त्यांना काही म्हणता

त्यासरशी 'वा रे वा ! खुळी रे खुळी ' असे तिला खिजवीत मोहन सारखा हसू लागला आजोबानाही हसू आले कुपातशी अगदी चिडायच्या बेतात आल्या

पण तितक्यात कटकबाबू अंगणात आले आणि नहमीप्रमाणे भेट म्हणून येणारा अेक खाऊचा पुडा त्याच्या हातात पाहताच चिडून हालघाओवर येणारे प्रकरण थोडक्यातच निभावल अुपेचे लक्ष पुड्याकडे वेघले आणि हसत हसत कटक-बाबूला ती सामोरी गेली

काय कटकगुरुजी,' अप्पा हसले, 'परीक्षेत तुमच्या विद्यार्थ्यांनी तुम्हालाच नापास केल आहे वर का !'

'ते कस बुवा ?' कटकगुरुजी जिज्ञासले

'अहो आमची अुपा म्हणते की, तुम्हाला पाढे सुद्धा येत नाहीत तुम्हीच काही अडल की तिला सारख विचारता की, वे पचे किती तीन दाही किती ? आणि तिने सागितल म्हणजे तुम्हाला त कळत ! तिला येत तितक सुद्धा तुम्हाला यत नाही !'

'काय गुरुजी, आमच्या अुर्वेला येत तितक सुद्धा तुम्हाला येत नाही, ही गोष्ट अगदी खरी ठरली की नाही ?'

'अगदी खरी ठरली, खरच बुवा ! नि आमच्या ह्या चिमुकल्या विद्यार्थिनीने गुरुजीलाच जो धडा शिकवला त्यासाठी गुरुजीच ह्या विद्यार्थिनीला ही फी पण देणार !'

कटकने खाअूचा अेक पुडा अुर्वेला दिला व दुसरा मोहनला दिला

आणि खाटेवर कटकबाबू बसू लागला त्याला स्थान देण्यासाठी अप्पाजी आपली मान मोडून बाजूला सरकू लागले पण तोच त्याच्या गुडघ्यात अेक कळ-कट कळ आली आणि ते 'आअी ग !' करून मोठ्याने कण्हू लागले

'अ ? अेकदम अितकी मोठी कळ आली ? काय झाल पायाला ?' कटक घाअीघाअीने विचारीत अप्पाजींचा पाय दाबू लागला

'अिथे, अिथे गुडघ्यात !' अप्पाजी गुडघा हळूहळू पुढे-मागे करीत, पाय पसरण्याचा यत्न चालवीत आणि कण्हत म्हणाले, 'ह्या गुडघ्यात गेले दोन दिवस अशीच असह्य कळ अुठत आहे थावल थोडा वेळ पाय पसरून ठेवला म्हणजे अेक फार जुना घाव आहे तो तिथे मुरलेला ! आता अशक्तपणाचे दिवस आले, त्यामुळे तो पुन्हा नडू लागला '

'जुना घाव ? कसला तो ?' कटक जिज्ञासला

'तो ? तो अेक अितिहास आहे ! तो घाव सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धात मला लागलेल्या अिंग्रजाच्या अेका गोळीचा आहे ! होय, अिंग्रजाच्या गोळीचा ! कारण मी बंडवाल्याच्या वतीने लढत होतो मी अेक बंडवाला होतो !' बोलता बोलता दुसरा पाय खाटेवर टेकून, दुसऱ्या पायावर ताठ अुभे राहून, छाती फुगत चाललेला तो वृद्ध पुरुष जणू होता त्याहून अधिक अुंच दिसू लागला

'तुम्ही बंडवाले होतात ? प्रत्यक्ष लढले होतात त्या बंडामध्ये अिंग्रजाशी ?' कटक हे प्रश्न तुटक तुटक शब्द जुळवून, विचारून, तो वृद्ध पुरुष गर्वाने ताठ्याशी त्याची मान होकारार्थी किंचित् हालवीत असता त्याच्याकडे विस्मयपूर्ण आदराने पाहात राहिला आणि त्या दृष्टीने पाहताच तो आजवरचा अेक साधा म्हातारा गृहस्थच कटकला अेक कसलेला झुजार, अेक बदनाम वीर, अेक पौराणिक योद्धा

नीट ठेवल्यामुळे ह्याच बेटात स्वतंत्र कुटुंब थाटून राहायची ज्याना आपल्यासारखी अनुज्ञा मिळते, त्या ह्या अंदमानातील दाखलेवाल्या [ Pass-holder ] जन्मठेपी गृहस्थाना ज्या घृणित अपराधासाठी पूर्वी शिक्षा झाली तें सागण्याचा बहुधा फार सकोच वाटतो स्वत च पूर्ववृत्त ह्या तुमच्या वर्गातील ते दाखलेवाले स्त्रीपुरुष बहुधा लपवू अिच्छितात ह्यासाठी पुष्कळ वेळा जिज्ञासा होत असताही मी आपल्याला आपल पूर्ववृत्त विचारायच टाळीत आलो पण आपण स्वत तरी, सत्तावनच्या त्या स्वातंत्र्ययुद्धात लढण हा राजकीय अपराध गणला जात असला तरी नैतिक नीचता नव्हे असच मानणारे आहात, हें अुघड आहे मग आपण होअून आपल तितक पूर्ववृत्त तरी मला का बर सागितल नाही ? सत्तावनच्या बडातील गोष्टी अैकायची मला ल्हानपणापासून फार आवड ! माझा आजा ब्रह्मावर्तात श्रीमत नानासाहेब पेशव्याचाच अेक आश्रित असे, सरा ल्हानपणी आमचे बाबा आम्हाला सागत सेनापति तात्या टोप्याच नाव तर त्याच्या तोंडी नेहमीच असे '

' त्याच वीरवर तात्या टोप्याच्या सैन्यातला मी अेक होतो ! '

' काय म्हणता ! अहाहा ! सेनापति तात्या टोपे ! ज्याच नाव लहानपणी आम्हाला अेखाद्या पौराणिक वीरासारख अद्‌भुत वाटे, त्या सेनापति टोप्याना प्रत्यक्ष पाहिलेला नि त्याच्या स्वातंत्र्यसैनिकातील अेक सैनिक असलेला पुरुष प्रत्यक्षपणे माझ्यासमोर आता अुभा आहे, ही कल्पना मला आता ह्या वेळीदेखील अद्‌भुतच आहे हे पाहा अप्पा, जर तुम्हाला त्यात काही धोका वाटत नसेल ना, तर निदान तुम्ही त्यात जी जी गोष्ट प्रत्यक्ष पाहिलीत ती ती तरी अैकाची माझी अुत्कट इच्छा आहे आहे या काही धोका त्यात ?'

' धोका ? बाबा रे, पूर्वी अेकदा तात्या टोप्याना मी ओळखतो अितक जरी सागितल असत तरी मला, जे झाड समोर दिसेल त्यावर टागल गेल असत ! मग मी तात्या टोप्याच्या पक्षाने लढलो हें सागायची गोष्टच दूर ! त्या वेळी ती माहिती सागायची जी धास्ती आमच्या मनाने घेतली त्या स्मृति आम्ही चित्ताच्या खोल भुयारात ज्या दडपून टाकल्या, त्या आता अुकरू म्हटल्या तरी अुकरवत नाहीत ! तस म्हटल तर आता तो काल पालटला आहे तें स्वातंत्र्ययुद्ध आता अितिहास झाला आहे प्रस्तुतच्या परिस्थितीशी त्याचा काही सबध अुरला नाही, असेल तरी अितिहासाचा वर्तमानाशी असला तितकाच काय तो ! स्वत अिग्रजी लेखकानी त्या वेळच्या माहितीचे शेकडो ग्रथ लिहिले आहेत मला स्वत अेक-दोन अिग्रज गृहस्थ अगदी मोकळ्या मनाने मी प्रत्यक्ष पाहिलेली माहिती विचारायला आले होते अिथे, पण ती पूर्वीची धास्ती जी अेकदा आम्हाला बसली, तीमुळे तें काही मनमोकळ सागवत नाही म्हणूनच काय ते मी होअून तुम्हालाही अद्याप तें वृत्त सागत नव्हतो नाही तर आता त्यात लपवायसारख काय आहे ?

पुन्हा, त्यापायी जी शिक्षा होणं तीच तर भोगायसाठी आम्हांला ह्या अंदमानात धाडण्यात आलं नि आम्ही त्या जन्मठेपेला आता भरुनही वसलो आहोत !'

'म्हणजे सत्तावनच्या बंडात लढण्यासाठीच का आपल्याला जन्मठेप झाली ? अंदमानमध्ये तेव्हापासूनच का जन्मठेपीचे बंदिवान धाडण्यात येत ?'

'सत्तावनच्या पांचपन्नास वर्षांपूर्वी अेकदा दोनदा अंदमानात वसाहत करायचा यत्न अिंग्रजांनी केला होता. पण त्या वेळी जीं थोडीं हिंदी माणसं अिकडे आणली, ती त्या भयंकर रानावनात नि दलदलीत अनादिकालापासून बुजबुजाटत आलेल्या रोगट जंतूंच्या नि वातावरणाच्या भक्ष्यस्थानी पडली. विशेषतः हिवतापाने तर त्यांचा नुसता फडशा पाडला नि ही बेट मनुष्यवस्तीला सर्वथा अयोग्य म्हणून टाकून दिली गेली, पण सत्तावनच्या बंडानंतर, क्वचित् ह्या बेटांच्या त्याच सद्गुणासाठी, त्या बंडात अिंग्रजाविरुद्ध लढतांना पाडाव केलेल्या आम्हा शतावधि बंडवाल्यांना ह्याच बेटामध्ये जन्मठेपीवर धाडण्यात आलं ! आणि आश्चर्याची गोष्ट ही की, आम्ही ह्या बेटावर सुद्धा सारेच्या सारे येताच मेलो नाही ! त्या घनदाट रानावनांना, त्या सडक्याकुजक्या दलदलींना, त्या भीषण रोगाणूंना, त्या मारक वातावरणाला, त्या असाध्य हिवतापाला आम्ही पुरुन अुरलो ! आणि अशा रीतीने ह्या आजच्या वसाहतीचे आम्हीच मूळ संस्थापक, आद्य पूर्वज, कुलपुरुष ठरलो ! ह्या बेटात वसाहत करण्यास्तव धाडलेल्या त्या पहिल्या बंडवाल्यांच्या जमावातलाच मी अेक ! अजून जीव धरुन अुरलेल्या त्या बंडवाल्यांतील चार पांचांपैकी वृद्धतम ! पण ह्या दीर्घ जीवनाच्या आनंदापेक्षा जेव्हा माझे सेनापति तात्या टोपे हे फाशी चढले...'

'तात्या टोपे फाशीवर गेले तेव्हा आपण तिथेच होतात ?'

'नव्हे, नव्हे ! तेच तर शल्य मनात बोचत आहे ! काळ्या पाण्यावर धाडले जाण्यापेक्षा आम्ही आमच्या सेनापतीसहच फाशी गेलो असतो तर आम्हाला अधिक आनंद झाला असता, हेंच तर मी सांगत होतो ! अिंग्रज त्या काळी आमचा शत्रु होता, पण तरीही अिंग्रज हा जातीचा वीर ! वीरतेची मनातून त्याला खरी पारख, ही गोष्ट आम्ही जाणून होतो. पाहा, तात्या टोपे मरेतों सशस्त्र युद्धात अिंग्रजांनीही तोंडात बोट घालाव अशा निकराने नि शौर्याने लढले. मृत्युदंडाच्या वेळी थेट फाशावर चढताना त्यांनी सांगितलं की, 'मी महाराष्ट्राच्या राजाचा, श्रीमंत नानासाहेब पेशव्याचा सेनापति; मी अिंग्रजांचा अंकित प्रजाजन नव्हे ! आमच्या राजाच्या आज्ञेने आमच्या स्वातंत्र्यास्तव झुंजलो, ह्यास्तव मी बंडवाला अपराधी होअूच शकत नाही !' ह्या त्यांच्या वीरोचित उत्तराचा अिंग्रजांच्या मनातही अितका वचक बसला, अिंग्रजांनाही अितका आदर वाटला की, तात्या टोपे ह्यांना फाशीवर मरण येताच ते पाहायला जमलेल्या शेकडो गोऱ्या लोकांनी त्या शूर पुरुषाच्या प्रेताभोवती गराडा घातला नि त्याचीं स्मृतिचिन्हें

म्हणून कित्येक अिंग्रजी, फ्रेंच स्त्रीपुरुषांनी त्याच्या केसांची झुलप कापून नेली फ्रान्सच्या पत्रांतून त्याचे दुःखद मृत्युलेख आले ! पण आम्ही त्याचे सैनिक असतां आम्हांला त्याच्याच संगती त्याच स्वातंत्र्ययुद्धांत मरण येण्याचं भाग्य लाभलं नाही त्याचं अंतिम दर्शनही झालं नाही !' त्या वृद्ध वीराने दीर्घ सुस्कारा सोडला.

आपण प्रथमपासूनच तात्या टोप्याच्या सैन्यांत होतां का? त्याच्या मृत्यूच्या आधी किती दिवस घायाळ झालेत? कसे पडलात अिंग्रजांच्या हातीं?'

'ती कथा लांब आहे ! थोडक्यांत म्हणजे, माझी नि पेशव्यांच्या कोणत्याही मंडळींची प्रत्यक्ष ओळख आधी मुळी नव्हतीच, आम्ही महाराष्ट्रीय ब्राह्मण मूळ बुंदेल्यांचे आश्रित म्हणून अुत्तर हिंदुस्थानांत वस्तीला गेलो पुढे माझ्या वडिलांच्या पिढीनं अरानगराच्या बाजूला आमचं कुटुंब स्थायिक झालं सत्तावनच्या आधी अेक दोन वर्षं श्रीमंत नानासाहेबांचे दूत आमच्या गांवांत येअून लवकरच अेक मोठं बंड होणार असं सांगत नि आमच्यांतील तरुणांमध्ये महाराष्ट्राची हिंदुपदपादशाही पुन्हा स्थापायची चेतना संचरवीत चालले मराठ्यांचा राजा स्वराज्यासाठी पुन्हा शस्त्र अुपसणार ह्या कल्पनेसरशीच माझं तरुण रक्त सळसळून अुठलं तोंच बातमी आली की, कानपूरला मोठं बंड होअून श्रीमंत नानासाहेब पेशव्यांनी कानपूर घेतलं नि अुघड युद्ध पुकारलं आहे ! मागोमाग प्रतिदिवस बातम्या येत चालल्या दिल्ली, लखनौ, जगदीशपूर, जिकडे तिकडे त्या राष्ट्रीय युद्धाचा वणवा भडकून राजेमहाराजे सरदार, भूमिदार, सैनिक, नागरिक, सारा हिंदुस्थान बंड करून अुठला आहे ! त्यासरशी आमची नगरी अरा अिथेही अेक सैनिक पथक बंड करून अुठलं नि आम्ही तरुण मंडळीहि त्यांतच शिरलो '

'मग? तियल्या अिंग्रजी सैन्याने तुम्हांला लगोलग पकडलं नाही?'

'अिंग्रजी सैन्य होतं कुठं तालक्यातालुक्याला? हिंदी सैनिक होते, तेच अुलटलेले ! अिंग्रज अधिकारी असा अेकच तिथे होता तो म्हणजे कलेक्टर, मॅजिस्ट्रेट असे सब अधिकार चालवणारा, अे ओ ह्यूमसाहेब सारं अरानगर अकस्मात अुलटलेलं पाहताच ह्यूमसाहेबाने जीव मुठीत घेअून पळायचं ठरवलं पण पळणार तरी कुठे? तेव्हां त्याच्या ठाण्याला गराडा पडायच्या आंत त्यानी अेक युक्ति योजली हात, पाय नि तोंडाला काळा रंग फासला, त्याच्या अेका हिंदी नोकराणीचा बुरखा मागून घेतला, तो अंगातोंडावर तिकडील स्त्रियांसारखा गुरफटून घेतला नि त्या स्त्रीवेषांत रातोरात ह्यूमसाहेब अरान्याहून निसटून गेले त्या वेळीं जिथे अिंग्रज दिसे तिथे बंडवाले मारीत, बंडवाला दिसे त्याला अिंग्रज मारीत ! पण तशा भयंकर स्थितीतही त्याच्याशीं विश्वासाने राहिलेल्या दोघा-तिघा हिंदी सैनिकांच्या साहाय्यानं अनेक प्रसंगीं त्याचा जीव वाचला नि शेवटी ते ह्यूमसाहेब दुसऱ्या ठाण्यावर असलेल्या अिंग्रजी छावणीत सुखरूप पोचले '

'अे ओ ह्यूमसाहेब? म्हणजे राष्ट्रीय सभा काढणारे ह्यूमसाहेब की काय?'

'होय. त्यानीच पुढे ती गस्या काढली. अितकेच नव्हे, तर ह्या बंडानं त्याच्यावर ओढवलेल्या ह्या भयंकर प्रसंगामुळेच हिंदी जनतेत पुन्हा तसा भयंकर असंतोष पसरू न देण्यानच अिंग्रजी राज्याची बळकटी आहे अशी त्याची निश्चिति पटली, हे त्याची पुढची काही भाषण जी मग्ग अिकडे अदमानात अेका साहेबा-कडून वाचायला मिळाली त्यावरून मला पुढे कळले. " सत्तावनच्या बंडातील अिंग्रजी राज्यावर कोसळलेल्या भयंकर अरिष्टात ज्याना दिवस काढावे लागले अशा कोणत्याही अिंग्रजी अधिकाऱ्याला हे मान्य झालेच पाहिजे की, हिंदुस्थानात माजणाऱ्या असंतोषाला आतल्या आत वाढू नि वाढू देता कामा नये ज्यायोगे त्या असंतोषाला वाचा फुटत राहील, त्याची वाफ साचण्याच्या आधीच जात राहील अशी काही सोय काढली पाहिजे वाफ बिनधोकपणे निसटायला जर कोणत विनधोक छिद्र — सेफ्टी व्हॉल्व्ह — तुम्ही ठेवणार नाही, तर ती अेंजिन फोडून बाहेर पडेल ! ते बिनधोक छिद्र म्हणजेच मी [नि]र्माडू म्हणतो तशी अेखादी राष्ट्रसभा ! " अशी यांची शहाणपणाची भाषण जी पुढे झाली, ते शहाणपण ह्यूमसाहेब त्या अन्याच्या अरिष्टातच शिकले !'

' मग अन्याहून कुठे गेलेत तुम्ही ? "

जाअू दे रे ते सारं ! झाली गेली गोष्ट ! आता काय त्याच ! आता नवी विटी नवं राज्य ! आहे ते निभावून नेलं पाहिजे ! "

'ते तर आहेच ! पण तुमच्या पुरतं तरी काही सांगा. कसे पकडले गेलेत तुम्ही ? "

'अन्याहून आम्ही तडक कानपूरला गेलो नि, सेनापति तात्या टोप्याच्या सैन्यात शिरलो वीस हजार अिंग्रजी सैन्यासह चालून आलेल्या जनरल विंढामचा कानपूरला ज्या तुंबळ लढाअीत सेनापति तात्या टोपे ह्यांनी पराजय केला, त्या लढाअीत बंडवाल्याच्या पक्षाने मी स्वतः लढलो होतो नि त्याच रणांगणात ह्या गुडघ्यावर अिंग्रजांची गोळी लागून घायाळ होअून पडलो असता अिंग्रजांच्या हाती पडलो परंतु मी अिंग्रजांच्याच हिंदी शिपायातील अेक, असं सांगून मी ती वेळ मारून न्यायची युक्ति योजली नि तसल्या धडाधुंद धुमाकुळीत अनेक असंभव गोष्टी जशा घडतात तसेच हेही घडून माझी युक्ति सफळली जनरल विंढाम तात्याटोप्याच्या हातून पराभव पावून जेव्हा अव्यवस्थितपणे माघारा परतला, तेव्हा त्याचे शेकडो घायाळ सैनिक त्याने घाअीघाअीने अेका सुरक्षित अिंग्रजी छावणीकडे धाडले त्यात मीहि धाडला गेलो तिकडे बरा झाल्यावर पुन्हा निसटणार तो अेका हिंदी शिपायानेच मी बंडवाला होतो म्हणून चुगली केली. पण इतर कित्येक सैनिकानी तो चुगलीखोरच बंडवाला म्हणून चुगली केली होती

'त्या वेळी अशा अुलटसुलट चुगल्या सारख्या चालू असत. अशा सावळ्या गोंधळात नि त्या वेळच्या अिंग्रजांच्या जिवावरच्या धादलीत वैयक्तिक चौकशी म्हणून पदार्थच नव्हता, सरसकट शिक्षा फाशी तर फाशी, जन्मठेप तर जन्मठेप !

वडलयवर द्यावा म्हणून शेवटी सरसकट क्षमा ! त्या घादलीत नि त्या सोडतीत मी होतो त्या वदिवानाच्या सरसकट तुकडीच्या नाव जन्मठेपीच तिकीट निघाल ! आणि हिंदुस्थानांतून वडवाल्याचा वश म्हणून वाढणच नको, अशा अटीपायी शतावधि वडवाल्याच्या जन्मठेपी टोळच्या तारव भरभरून, 'मनुष्यवस्तीला अयोग्य नि मारक' म्हणून अिग्रजी अधिकाऱ्यानीच त्या वेळी ठरविलेल्या ह्या अदमान बेटात आणून सोडल्या गेल्या त्यातच मीही अेक होतो अगदी पचविशीच्या आत होतो मनुष्यवस्तीला मारक म्हणूनच ह्या बेटात आणून सोडलेल्या त्या आम्हा शतावधि सत्तावनच्या वडवाल्यानी आपल्या असह्य कष्टाच, घोर यातनाच गोठलेल्या रक्ताच, भगलेल्या आशाच, झिजलेल्या हाडाच नि प्रेताच्या राखेच रक्तपाणी घालून त्याच बेटाना आज मनुष्यवस्तीला योग्य करून सोडल आहे तेच हे अदमान आपल्या हिंदूची भरभराटत चाललेली अेक नवी वसाहत होअून बसत आहे अितकच काय ते आमच्या जन्माच किंवा जन्मठेपेच सार्थक '

'पण आता अेकदा हिंदुस्थानात जाअून यायची अनुज्ञा का मागत नाही आपण ? आता दाखल्लेवाले ह्या स्वतंत्र वर्गाचे झालां आहात आपण अशा फ्रीपास–होल्डसना अनुज्ञा देतात ना दर्शी जायची ? काही प्रकरणी हिंदुस्थान आता पुष्कळ सुधारल आहे, पाहाव अेकदा आपण ते ! '

' काय पाहायच आता तिथे ? जशी ही काळ्या पाण्याची वसाहत भरभराटत चालली आहे म्हणून मी म्हटल, तसच हिंदुस्थान सुधारत चालल आहे हे तुम्ही म्हणता ! आधी आम्हा सत्तावनच्या दाखल्लेवाल्याना सुद्धा कोणी धाडीत नाही परत तो नियम आम्हाला लागू नाही, नि गेलो तरी जें हिंदुस्थान आम्हाला पाहायच होत ते आता आहे कुठें ? जसा जस हे जन्मठेपी अदमान तसच ते हिंदुस्थान ! ' त्याच्या हृदयात रुतलेले अेखादें शल्य जस कचकळले जावे तसे होअून त्या वृद्ध वीरान अेक दीर्घ नि श्वास सोडला

आपण ह्याला अुगीच दुखावल अस वाटून त्याला काही तरी समाधानाचे दोन शब्द बोलाव म्हणून कटक म्हणाला,

' काही झाल तरी देव न्यायाचा पाठीराखा आहे न्यायाचा जय शेवटी '

' छट् छट् ! (न्याय नि अन्याय ह्याचा जय नि पराजय ह्याच्याशी काही अेक सबध नाही हे आम्ही जितक स्थवर निकून तितक बर न्याय नि अन्याय हे प्रकरण निराळे ! जय नि पराजय हे निराळे ! जयापजयाचा जर कशाशी सबध असल्य तर तो पराक्रमाशी आहे न्यायाशी नव्हे ! ) ध्यानात धर, पाठ कर हा शब्द– पराक्रम ! जयाचा मत्र ! तो शब्द शीक ! '

' अप्पा, अप्पा, अप्पाजो ! ' त्याच चित्त त्या अुच वातावरणातून ओढून खस्- दिशी खाली आणीत ती चिमुरली अुपा हसली ' हें पाहा, अप्पा, तुम्ही देशील

चटकवावूंना नवे शब्द शिकवीत आहे! मी म्हटलं, त्यांना काही यत नाही, तच खरं! तेच खरं!' त्या लेकराला त्या विषयात तेवढेच कळलें

अप्पाही हसले 'लबाड कुठली!' असे म्हणत कटकने तिच्या गालावर कौतुकाने टिचकी मारली

ताच अंगणाच्या फाटकाशी गलेला माहून खिदळत आला

'आली! आजी आली! आजी आली!'

अुपेने पण सन्मुख पाहून तीच टाळी पिटली

'आजी आली! आजी आली!'

आणि काण पहिल्याने आजीला जाअून बिलगतो अशी चढाओढ लागून तीं दोन्हीं लेकरं धावलीं फाटकाशी आजी यताच माहनने तिला पहिल्याने धरलं मागोमाग अुपेन तिच्या गाड्याना विळखा घातला आजी पण त्या दोघाचे मटामट मुके घेत, त्याच्या मिठाच्या पचातून चालवत तितव चालत, त्याच्या मृदुल कुतला वरून प्रमान हात फिरवीत, खाटपाशी आली ताच कटक तिला दिसला

'वाजी वाजा! वाटच पाहात वसगा हाजात ना अिथे? भटला हो अेक दाची तुमची मैत्रीण मला! अगदी पोटभर बळून आले वर तिच्याशी' चितक वन्कत्र सागून ता अगदी सलगीच्या स्वरात आपल्या सासऱ्याला संबोधती झाली,

'खरच, अप्पाजी, मुलगी पण मुलगी आहे हो ती! किती मनमोकळी पण विनयशील, करारी पण प्रेमळ आहे ती बघा! आणि सुरेख तरी किती आहे म्हणून सागू! तिच्यात जर काही व्यंग असेल ना, तर त अेकच, तिच नाव! तिला कटकी हें नाव कुण्या अरसिकान ठेवल तें असो अगा फुलासारख्या कोमल मुलीच नाव गुलाब मालती असं काही तरी असायला पाहिजे होत! कटकवाबू तिच्यासाठी अितके तळमळत होत ते काही अुगीच नव्हते हो! कटकबाबू आहे खरीच वाजी तुमची मैत्रीण तुम्हाला चटका लावील अशी' निन, गमतीन डोळे किंचित अुडवीत आपला द्वयर्थी भाव सुचविला!

आज पाच वर्षे झाली, त प्रिय नाव 'मालती' नकळत का होअीना पण त्या वाणीच्या ताडून पुन्हा त्याच्या कानावर आल गली पाच वर्षे काळ्या पाण्यावर जी त्यान काढली, त्यात त्याच्या मनात ते सारख गुणगुणत होत पण अेक नाव म्हणूनच काय त! आज ती व्यक्ति, ती प्रिय मूर्ति, प्रत्यक्षपणे अगदी अेका हाकेवर काठे तरी अुभी आहे अस त्या नावात निवतपण आल! कटकच अस करण त्या कल्पनसरशी अितक भरून आल का, त्याविषयी अधिक काही पुसावयाला मुद्दा त्याच्या ताडून शब्द अुमटना तो स्वत काळ्या पाण्यावर आल्यापासून गली पाच वर्षे माग मालतीच शिक्षा लागल्यानंतर काय झाल ह्याचा त्या कटकला — तिन्नला — शोध लागला नव्हता आज ती मालती त्याला पुन्हा सापडली असा झाली! त्या वार्तेचा ता शोध करायला त्याने आज किती दिवस तरी सांगितल

हात ती बाओी काळ्या पाण्यावरील स्त्रियांच्या बंदिगृहात अेक स्त्रीजमादार म्हणून काम करीत असे आज तिला त्या काळ्या पाण्याच्या स्त्रीबंदिगृहात कट-कन सांगितलेली ती कटकी नावाची तरुणी भेटली आणि त्या बाओीने तिचा पत्ता कटकला हा असा दिला 'तुझी मैत्रीण किती चांगली! तुला चटका लागण्यासारखी आहे तुझी ती 'मैत्रीण!' असे, डोळे गमतीने मुडवून बोलताना कटकची ती जिवलग प्रिया आहे असा भाव जो तिने चेष्टेने सुचवला, त्याचा कटकला अनेका अभिमान वाटला का, 'ती माझी खरोखर सखीच आहे, मी तिच्यावर लपटलेला तिचा प्रियकर आहे, असे बोलून जायचा त्याला अनावर मोह झाला पण

'त्या सुरेख मुलीत जर काणते व्यंग असेल तर तिचे ते विसंगत नाव कटकी हेच' असे ती बाओी जे बोलून गेली होती त्याविषयी त्यांगोलग तिचा प्रतिवाद करून तिला सांगून टाकावे की, 'नाही तिच्यात त्या विसंगत नावाचे देखील व्यंग नाही! तिचे खरे नाव 'कटकी' नसून तुला हवे तसे 'मालती' चे आहे!' असाही त्याला अनावर मोह झाला पण

लिहिताना अितके लाज वाटणाऱ्या ह्या भावभावना त्याच्या मनात चमकून जाण्यास दहापाच क्षण देखील लागले नसताल। त्यातच त्याने विवेकही केला की, सध्या ते काही अेक सांगणे अिष्ट नाही ती माझी बहीण–नावे कटकीच आहे, सरकारी लिखाणाने शिक्षावृत्तान्तात नोंदल्याप्रमाणेच आमच्या हातून तिला पळवून नेणाऱ्या अेका दुष्टाचा वध झाला हाच काय तो आमचा अपराध! त्यासाठीच दोघांना पाठले हे जन्मठेप काळे पाणी! हे जे पूर्वी आपण सांगत आलो तेच पुढे सांगत चलावे तिच्या आओीचा वा आपल्या पूर्वीच्या मथुरेच्या ओळखीचा वा खट-ल्याचा या रफिअुद्दिनचा काही अेक संबंध दाखवू नये हेच अिष्ट, असे त्याने मना-मनात ठरवले पण

ही सारी विचाराची घडामोड त्याच्या चित्तात चालली असता तो नुसता-आपल्याकडे पाहात काही अनुच्चारित शब्द ओठावर पुटपुटवीत गांधळलेला दिसतो आहे, असे त्या बाओीने निरखून ती पुन्हा त्याच गाढ चेष्टेच्या स्वरात हसली,

'लाजलात हाय? कुणाचा अप्पाजींचा संकोच वाटतो होय तो विषय काढायला?'

'हो असेच दिसते! अप्पाजी हसले 'बरं तुम्ही आपले आत जा नि मन-मोकळी काम माहिती हवी तुमच्या मैत्रिणीला जो काय निरोप द्यायचा घ्यायचा तो आमच्या ह्या अनसूयेला सांगा आपला जा! तुमच्या प्रेमभावनांचा आम्हा सारख्या विरसलेल्या नि रूक्ष वृद्धापेक्षा आमच्या ह्या अनसूयेसारख्या गोडबोल्या, वत्सल नि वनवाळू स्त्रीचे हृदयच अधिक समरस होअू शकेल हे अगदी खरे जा, अनसूया चहा करतेस ना प्रथम?

त्या सहानुभूतिशील वृद्धाने आपल्या सुनेला थाट लावण्यास अेक वस्करणी न्हाऊ करण्याचे निमित्तही सुचवून दिले. अनसूयेने पण ते समयज्ञपणे ताडून आत जाता जाता कटकबाबूला पाचारले,

'या ना कटकबाबू, आतच या असे. मी न्हाऊ करते तोवर बोलू या! गोड गोड बातम्या किती तरी सांगते या तुम्हाला तुमच्या हरवलेल्या भगिनीच्या! या ना!'

बोलता बोलता तिने त्यून चिमुकल्या झुपेचे फुकूच किंचित् निटावर, मोहनच्या अगरख्याच्या कॉलरची घडीच सावरून घातली, मग दोघा लेकराचे हात आपल्या दोन्ही हातात घेऊन ती आत चालली. तिने 'या ना! आतच या' असे पुन्हा अेकदा घराच्या दारात शिरताना सुद्धा दिलेल्या आमंत्रणासरशी आणि त्याला ओढून नेण्यासाठी मागाऱ्या आलेल्या मोहनने त्याच्या चिमुकल्या हातात कटकची करंगळी धरून ती नेटाने ओढण्यास आरंभिल्यानंतर कटक अुठला आणि जणू काय मोहनच्या बळाने आपण ओढले जात आहो, असे समाधान मोहनला देण्यासाठी पण खरोखर पाहता वरवर निमित्त करण्यासाठी 'अरे बाळ, आलो आलो! मोठ्ठा स्ट्राँग करंगळी मारी!' असे हसत मोहनसह आत गेला. अप्पाजी पण ते पाहात मिस्किलपणे थोडेसे मनाशीच हसले आणि मग जवळ पडलेला 'साप्ताहिक टाअिम्स' ह्या अिंग्रजी पत्राचा अंक हाती घेऊन चाळीत बसले.

कटक आत आल्यावर अनसूयाबाअींनी त्याला जी जी हवी ती ती माहिती सांगता यअील तितकी रगाळपणे सांगितली. दुरावलेल्या, नव्हे नाहीशा झालेल्या प्रियजनाचा असा अनपेक्षितपणे पत्ता लागला असता प्रेमी हृदयाला त्याचे वृत्त किती पुसू आणि किती न पुसू असे कम होअून जाते आणि अशा वेळी त्याच्या मधून मधून कटाळवाण्या होणाऱ्या जिज्ञासेचाही विरस न करता समाधानाने हे प्रेमी दूताचे कम आद्य कर्तव्य असते, ते जाणण्याची सहृदयता अनसूयेत होती. तिला कटकने अेक महिन्यापूर्वी प्रथम विनविले होते की, 'ज्या स्त्रीकारागारावर ती स्त्रीजमादारीण होती त्यात त्याची अेक बहीण आलेली असली पाहिजे. त्याच्याच बरोबर तिलाही जन्मठेपेची शिक्षा झालेली होती, पण तिला हिंदुस्थानातच निराळ्या कारागृहात धाडल्यामुळे तिचे पुढे काय झाले, तीही त्याच्याप्रमाणेच काळ्या पाण्यावर धाडली गेली आहे की हिंदुस्थानच्याच कारागृहात ठेवली गेली आहे याचा कितीही शोध केला तरी त्याला काही अेक पत्ता लागलेला नव्हता. तेव्हा तो पत्ता अनसूयेने काढून द्यायचा शक्यतो यत्न करावा.' कटकने तिला ही विनति केल्यापासून अनसूया त्या शोधात होती. पण कटकने सांगितलेल्या 'कटकी' नावाच्या त्याच्या बहिणीसारखी कोणतीहि मुलगी त्या वेळी काळ्या पाण्याच्या स्त्रीकारागारात नव्हती, पूर्वीही आल्याचा सुगावा लागत नव्हता. परंतु ह्या महि-न्यात जे 'चलान' आले, त्यात कटकी नावाची अेक तरुण मुलगी जन्मठेपच्या

शिक्षेची, कंटकने दिग्दर्शविलेल्या विशीच्या आतील वयाची, रूपाची, जिच्या शिक्षावृत्तातील माहिती कंटकने दिलेल्या माहितीशी जुळते, अशी आली असल्याचें त्या अनसूया जमादारिणीच्या आठ-दहा दिवसापूर्वी लक्षात आलें होते आणि तिने तें कंटकला सहा-सात दिवसापूर्वी कळविलें होतें. तिला प्रत्यक्ष भेटून तिची माहिती शक्य तितकी तिच्याच तोंडून काढून घेण्याचें काम अनसूयेने तेव्हा अंगावर घेतलें होतें आणि त्याप्रमाणे संधि साधून 'कंटकी 'ला भेटून तिने तिची कारागृहातील घाअीत जितकी शक्य तितकी माहिती आज विचारून घेतली होती. तिचीच मार्ग-प्रतीक्षा अत्यंत अुत्सुक व्याकुळतेने करीत असलेला कंटक त्याविषयी ठरल्याप्रमाणे अनसूयेकडून काही तरी आज नक्की कळेल ह्याच आशेने आज त्यांच्या घरी, मोठ्या साहसाने त्या भागातील वरिष्ठ अधिकाऱ्याचा डोळा चुकवून आणि खालच्या चौकीदाराची मूठ दावून स्वतः आला होता.

कारण कटक हा बंदिवानातला बाबू असला तरी बंदिवानच असल्याने त्या 'दाखलेवाल्या ' स्वतंत्राच्या गावात असे वेळी अवेळी येण्याजाण्याचा त्याला परवाना नव्हता आणि म्हणूनच संध्याकाळची नावेबंदी चौकीचौकीवर होण्याच्या आधीच त्याला निसटून परत जाण्याचीही घाअीच झाली होती.

त्या घाअीघाअीत त्याने घरात जाताच अनसूयेला अितके प्रश्न अितक्या अध्ये मध्ये, अितक्या अंक्रमाने, काही अुगीच पुन्हा पुन्हा, तर काही अर्धवटच विचारले होते की, त्याचा सुसंगत मथितार्थ त्याच्या ध्यानात यायला आणि त्याप्रमाणे त्याला त्या अनुरोधे जे काही निश्चित निरोप सांगायचे त्याच्या रूपरेखा ठरवायला सुद्धा संधि वा अवधान राहिलें नाही. चोरटें गुरू चोरट्या शेतात शिरलें असता जसे भराभर दिसेल त्या गवताचे, कडब्याचे, हिरवळीचे घास खुडून तोंडात कोंबून घेतें, तसे त्या थोडक्या वेळात विचारवेल किंवा अैकवेल तितके तो विचारून आणि अैकून घेतो, तोंच साडेपाचाचा ठोका पडला. परतण्याची ती अुशिरातील अुशिराची

काळ्या पाण्यावर गेलेल्या दंडित स्त्रियांचीही व्यवस्था अशीच पण त्यांची बढती मात्र लवकर होअी काम पुरुषांसारखे कठीण नसे स्त्रीबंदिगृहात प्रथम पाच-अेक वर्षे त्यांना बंद ठेवीत मग अेका विहारस्थानात त्यांना सुटीत हिंडण्याफिरण्यास जाता येअी तेथे ज्यांना लग्नाची अनुज्ञा मिळे त्या बंदिवान पुरुषांनाही धाडण्यात येअी सबंध पहाऱ्यात त्यां स्त्रीपुरुष बंदिवानांना त्या सुटीत अेकमेकांची ओळख-देख, प्रेमपरिचय करू देण्यात येअी हे विहारस्थळ म्हणजे अंदमानच्या लंडनमधील 'हाअिड पार्क, पुण्याचा बंडगार्डन, त्या काळ्या पाण्यावरील पाण्याचं प्रेमोद्यान!' तेथे होणाऱ्या प्रत्यक्ष परिचयानंतर जर कोणा स्त्रीपुरुषांचे आपसात विवाह करण्याचे त्या दोघांच्याही संमतीने ठरल तर ते योग्य की अयोग्य ते निरीक्षून सरकार ज्यांना संमति देअील त्यांची नोंदपद्धतीने लग्न लावण्यात येत आणि 'दाखला' मिळून ते जोडपे दाखलेवाल्या स्वतंत्र गावी धाडून देण्यात येअी लग्नाला जातीपातींची अडचण मुळीच नसे घटस्फोटही ठराविक कारणासाठी मिळे

कोणी पुन्हा अपराध केला तर दाखला रद्द होअून त्या व्यक्तीला परत बंदीत पडावं लागे, रीतसर चौकशी होअून फाशीपर्यंत शिक्षाही मिळे हत्येचा प्रयत्न हाही भयंकर अपराध अंदमानातील बंदिवानांच्या प्रकरणी समजला जाअी उद्दंड, अघोरी आणि अमानुष प्रवृत्तीच्या शतावधि जन्मठेप्यांना अशा अत्यंत कडक शिस्तीत ठेवल्यावाचून त्या बेटात जीवनसुरक्षितता, शांतता आणि सुव्यवस्था राखणे अेकंदरीत दुर्घट होते

ज्या परिस्थितीमुळे सुशील मनातही अपराध करणे अगतिक होते ती परिस्थिति पालटावी, शिक्षण, सत्संग, मनोविकास अित्यादिकांच्या जोपासणीने त्याची मनेच समाजशील आणि सुसंस्कृत करावी, त्याच्यातील माणुसकी वाढवील अशी त्याच्या स्वभावाचीच सुधारणा करावी, त्याच्यातील माणुसकीचीच प्रगति व्हावी, हें अपराध्यांना वागविण्यातले तिसरे अुद्दिष्ट असले पाहिजे )

अेकदरीत पाहता अंदमानच्या अपराध्यांना वागविण्यासंबंधी जे धोरण तीस चाळीस वर्षांमागे आखले गेले होत, त्यात काटेकारपणे नसले तरी बऱ्याच प्रमाणात ह्या तिन्ही शास्त्रीय अुद्दिष्टांचे अेक अशास्त्रीय का होअीना, पण सहेतुक मिश्रण करण्यात आले होते, हें आम्ही वर वर्णिलेल्या काळ्या पाण्यावरील दंडिताच्या त्या वेळच्या वर्गवारीवरून, बढत्यांच्या क्रमावरून, सुधारणीय आणि दुःसुधारणीय अशा कसोटीप्रमाणे प्रत्येकी पात्रापात्रतेनुसार कडक वा लवचीक अशी विभिन्न वागणूक देण्याच्या धोरणावरून दिसून येअीलच

ज्या बंदिवानाचे दहाबारा वर्षांच्या कडक शिस्तीने, सक्त कामाने आणि कृत-कर्माचे यथेष्ट प्रायश्चित्तही भोगल्याने शील सुधारलेसे वाटे, त्याना 'दाखला' देअून अंदमानातल्या अंदमानात स्वतंत्रपणे राहण्याची अनुज्ञा मिळाल्यावर त्यांची गाव निराळी वसविण्यात आणि त्या सुधारलेल्यांच्या गावात चांगल्या वागणुकीची बारा वर्षे अजून न भरलेल्या बंदिवानांना मोकळेपणी जाअूयेअू न देण्यातही अधि-काऱ्यांचा हाच कटाक्ष असे की, अशा पृथक्करणाने त्या सुधारलेल्यांचे ह्या न सुधारलेल्या चंडप्रकृति बंदिवानांच्या अुपद्रवापासून संरक्षण व्हाव आणि त्यांच्या अुन्नतीने त्या दाखलेवाल्यांचे किंवा त्यांच्या तिथेच जन्मलेल्या नव्या पिढीच

त्याची योगायोगानेंच ओळख होऊन चांगला घरोबाही जो झाला तोही अत स्थ-पणेच होता आणि म्हणूनच आंजही त्या वसतीत तेथील चौकीदाराच्या अतःस्थ फुशीनेच काय तो, तो नेहमीप्रमाणे चोरटी भेट घेण्यास जेव्हा गेला, तेव्हा ती भेट सध्याकाळी चौकीवर ये-जा बंद करण्याच्या वेळेआधीच संपवून आणि अप्पाजींचा निरोप घेऊन असा त्या टेकडीवरून लपत छपत शेवटी बंदिवानांना सुपडच्या असलेल्या आणि त्याच्या रानतोडाअीच्या तुकडीची ठराविक वाट असलेल्या त्या मार्गाला लागताच त्याचा जीव अेकदाचा खाली पडल्यासारखा झाला

कटक विनधोकपणे वाटेला लागल्यानंतर त्याच्या मनात, अनसूयेच्या तोंडून मालतीविषयी त्याला जी माहिती पाच दिवसांनी मिळाली, तिच्या विचाराचें चक्र चालू झालें; गेल्या पाच वर्षांचा सारा अितिहासही त्याच्या डोळ्यापुढे अुभा राहिला त्या दोन्ही विषयातच, त्या दिवशी अप्पाजींनी सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धात भाग घेतल्याची जी गोष्ट त्याला सांगितली आणि तिच्या जाणिवेसरशी त्या कुटुंबाविषयी त्याला जो अेक राष्ट्रीय आदर वाटू लागला होता, त्याचे विचारही घोळत होते त्याच्या अनुषंगाने त्या कुटुंबाशी त्या कटकचा परिचय कसा झाला आणि कसा वाढत गेला, त चरित्रही त्याच्या त्या विहारचक्रात गुंफले जात होते आणि सगळ्यात महत्त्वाची जी चिंता, 'पुढे काय करावं ?' ती भविष्याची होअू पाहत-लेली घडामोड त्या होअून गेलेल्या घडामोडीच्या स्मृतींना पुन पुन्हा मागे सारीत, 'माझा, माझा निकाल पहिल्याने कर ! ' असे बजावीत त्याच्यापुढे दत्त म्हणून अुभी ठाकत होती

धरपकड होताना जें धोरण ठरलें होतें, त्याप्रमाणे आपल्या ' मालती ' ह्या नात्याने पूर्वीचें कोणतेंही वृत्त अुघडकीस न आणता कंटकचा आपण वहीण आहो, आपल्याला अपहरणाऱ्या अेका दुष्टाचा वध करण्याच्या साहसापायी कंटकला आणि आपल्याला जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा झाली, असेंच पूर्ववृत्त सांगितलें. शिक्षा झाल्यानंतर कंटकापासून वेगळें करून आपल्याला हिंदुस्थानात दुसऱ्याच अेका वंदिगृहात कोंबण्यात आलें, आणि तिथेंच गेलीं पांच वर्षं आपण सडत, कुढत, रडत पडलेली होतो ! कंटकचें काय झालें तें आपणास बरेच दिवस काही कळेना पण तो जन्मठेपीवर अंदमानात गेला, असा सुगावा वंदिवानांच्या सोंडून पुढे पुढे लागला. तेव्हापासून हिंदुस्थानातील त्या वंदिगृहात अत्यंत हालअपेष्टांमध्ये दिवस काढण्यापेक्षा आपणास अंदमानातील काळ्या पाण्यावरच धाडण्यात यावें, असें आपण सरकारपाशी सारखें धरणें धरलें आणि शेवटी त्याप्रमाणे आपलें चलान होअून आपणास काळ्या पाण्यावर धाडण्यात आलें ! — असें आपलें शिक्षेनंतरचें पूर्ववृत्तही कंटकीने अनसूयेला थोडक्यात सांगितलें.

मग त्या भेटीत कंटकी अनसूयेला म्हणाली,

' जमादारीणबाओी, माझ्या वयाला अजून विशी सुद्धा अुलटली नाही. पण जगातील अत्यंत असह्य यातनांचा जो भडिमार शमरवर्ष जगणाऱ्यांच्या वाट्याला, सहसा येत नाही तो माझ्या वाट्याला येअून चुकला. अितका छळ, अितकी विटंबना अितका जाच, अितकं दुःख मी आजवर सोसलं ! आणि विशेष हें की, बाओी, मी देवासन्मुख सांगते, माझा स्वतःचा असा अेकच दोष काय तो जो घडला तो सोडला, तर असा माझा अनन्वित छळ ज्याच्यासाठी व्हावा असा दुसरा कोणताही अपराध स्वतः माझ्या हातून असा घडलेला नाही ! आणि तो जो माझ्यातील माझा असा अेकच दोष तो म्हणजे हें मेलं माझं रूप ! मी जिथे जाते तिथे हें नडतं ! ह्या रूपापायी मी मातृगृहातून वंदिगृहात पडलें, ह्या रूपापायी वंदिगृहातही मी ज्याच्या हातात पडलें त्यांनी माझी विटंबना केली, ज्यांच्या हातात पडलें नाही त्यांनी म्हणूनच माझा छळ केला ! बाओी, आता हें जीवनच मला नकोसं झालं आहे ! हिंदुस्थानातल्या वंदिगृहातच मी अेकदा जीव देण्याचा प्रयत्न केला; पण तो फसून मला अुलट सहा महिने हातकडी नि कोठडीबंदीची शिक्षा झाली. छळापासून

या न्यायाधीशाचे शब्द अमृताच्या तुषाराप्रमाणे माझ्या मनातील कोमल अशा स्त्रीय लालसेला पुन्हा पुन्हा अंकुरवीत !

'अितक्यात मला कळले की, रफ्‌कही अंदमानातच आहे ! आत्मघाताच्या आधी अेकदा तरी त्याची भेट व्हावी, ह्या आतुरतेने मी हरप्रयत्न करून काळ्या पाण्यावर आले ! पण अिथे पाहते तों ह्या आगळ घाणीतच मला अजून वर्षानुवर्षं खितपत पडावं लागणार ! छे, छे ! बाअी, मी आता अेक दिवस देखील अिथे तशी सडत पडू अिच्छीत नाही ! ह्या देहाचा मला वीट आला आहे तुम्ही रफ्‌चची चिठ्ठीच तेवढी आणलीत म्हणून तुमच्यावर पुन्हा अेकदा विश्वासते येवढो दिखाअू आपले म्हणविणाऱ्यानी विश्वासघात करून मला अितक्या वेळा फसविले आहे की, तुम्ही मला फसविणार नाही असं काही मला सांगता येत नाही ! रागावू नका ! मी तुम्हांला खोटं म्हणत नाही, माझ्या दैवाला म्हणते पण तरीही तुमच्या माडीवर मी पुन्हा माझी मान देते कापाल ? कापा ! आअी मानते मी तुम्हाला, पाया पडते तुमच्या, मला तुम्ही फसवू नका ! नाही तर रफ्‌कचाच्या नावाने मी सांगत असलेलं हृद्गत विश्वासघाताने सरकारी अधि-

बंदिगृहात हिंदुस्थानातून आलेली नाही, असेच त्याला कळले होते. जेव्हा अनसूयाबाओीला त्याने ती माहिती सहा-सात महिन्यापूर्वी प्रथम विचारली, तेव्हा ही चटकी त्या स्त्रीबंदिगृहात आलेली नाही, हेच नक्की कळले होते. त्यायोगे मालतीला जन्मठेपची शिक्षा झाल्यानंतर तिचे काय झाले, ह्याची चिंता त्याला सारखी व्याकुळवीत होती. तिची आठवण झाली की त्याला अन्न गोड लागेनासे होअी. ती त्याला पूर्वी प्रत्यक्ष भेटत असे, तेव्हा देखील तिच्या स्पर्शासाठी तो जितका रोमांचित होत नसे जितका आता स्पर्शाच्या नुसत्या स्मृतीसरशी तो रोमांचित होअी. 'अन्न मिळते तेव्हा ते लागते त्याहून ते जेव्हा मिळेनासे होते तेव्हा त्याच्या स्मृतीतच ते शतपटीनी अधिक गोड लागते !' पुन्हा अनाशा त्याच्या मनात मालतीच्या त्या स्पर्शाची आठवण येताच पूर्वीप्रमाणे नुसत्या स्नेहाच्या भावनाच जागत नसून अुपभोगाच्या भावना अुद्दीपू लागत. 'ती प्रत्यक्ष माझ्यापाशी असताना मी तिचं आलिंगन घ्यावयाला कसा धजलो नाही, कोण जाणे !' ह्याचंच त्याला राहून राहून वाअीट वाटू लागले होते. शेवटच्या रात्री त्या तिला छळणाऱ्या मुस्लिम गुंडाला ठार केल्यानंतर जेव्हा त्या भयंकर साहसाच्या परिणामापासून बचावले जाण्यासाठी तो विनन त्या मालतीसह त्या देवळात मग काळोखात जाअून लपला होता, त्या रात्री तर झोपेतून भयाने थरकापत ती दचकून अुठली, आपण होअून त्याच्या गळी पडली आणि 'माझ्या सोबतीस मला घेअून नीज ये' असे आपण होअून त्याला पाचारून, त्याला लपटून निजली, त्या वेळची त्यां प्रत्येक हालचालीची आठवण नि आठवण आताशी तो रात्री अेकान्ती असता त्याला वारंवार व्हावी. मालतीच्या केसांच्या बटा, ती त्याच्या छातीशी बिलगून निजली असता, त्या रात्री त्याच्या गालावर जशा रुळत अगदी तशा पुन्हा जणू काय त्याच्या मुखावर आणि गालावर रुळत आहेत, असे त्याला भासे ! त्याचे सारे अंतःकरण कामकंपित होअून थरारे, पश्चात्तापाने तळमळू लागे की, 'त्या रात्री तरी निदान मी नुसत्या संयमाच्या नि भ्याड सकोचाच्या आहारी अुगीचका गेलो ! अमृताचा पेला अगदी ओठाशी धरला, पण पिण्याचं तेवढंच विसरलो ! तिच्या संगसुखाला जन्माचा

धरपकड होताना जे धोरण ठरले होते, त्याप्रमाणे आपल्या 'मालती' ह्या नात्याने पूर्वीचे कोणतेही वृत्त अुघडकीस न आणता कटकची आपण बहीण आहो, आपल्याला अपहरणाऱ्या अेका दुष्टाचा वध करण्याच्या साहसापायी कटकला आणि आपल्याला जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा झाली, असेच पूर्ववृत्त सांगितले. शिक्षा झाल्यानंतर कटकापासून वेगळे करून आपल्याला हिंदुस्थानात दुसऱ्याच अेका बंदिगृहात कोंदण्यात आले आणि तिथेच गेली पाच वर्षे आपण सडत, कुढत, रडत पडलेलो होतो! कटकचे काय झाले ते आपणास बरेच दिवस काही कळेना पण तो जन्मठेपीवर अंदमानात गेला, असा सुगावा बंदिवानाच्या तोंडून पुढे पुढे लागला तेंव्हापासून हिंदुस्थानातील त्या बंदिगृहात अत्यंत हालअपेष्टामध्ये दिवस काढण्यापेक्षा आपणास अंदमानातील काळ्या पाण्यावरच धाडण्यात यावे, असे आपण सरकारपाशी सारखे धरणे धरले आणि शेवटी त्याप्रमाणे आपले चलान होअून आपणास काळ्या पाण्यावर धाडण्यात आले! – असे आपले शिक्षेनंतरचे पूर्ववृत्तही कटकीने अनसूयेला थोडक्यात सांगितले.

मग त्या भेटीत कटकी अनसूयेला म्हणाली,

'जमादारीणबाअी, माझ्या वयाला अजून विशी सुद्धा अुलटली नाही पण जगातील अत्यंत असह्य यातनांचा जो भडिमार शंभर वर्षे जगणाऱ्याच्या वाट्याला सहसा येत नाही तो माझ्या वाट्याला येअून चुकला! अितका छळ अितकी विटंबना अितका जाच, अितके दुःख मी आजवर सोसले! आणि विशेष हे की, बाअी, मी देवासन्मुख सांगते, माझा स्वतःचा असा अेकच दोष काय तो जो घडला तो सोडला, तर असा माझा अनन्वित छळ ज्याच्यासाठी व्हावा असा दुसरा कोणताही अपराध स्वतः माझ्या हातून असा घडलेला नाही! आणि तो जो माझ्यातील माझा असा अेकच दोष तो म्हणजे हे मेले माझे रूप! मी जिथे जाते तिथे हे नडते! ह्या रूपापायी मी मातृगृहातून बंदिगृहात पडले ह्या रूपापायी बंदिगृहातही मी ज्यांच्या हातात पडले त्यांनी माझी विटंबना केली, ज्यांच्या हातात पडले नाही त्यांनी म्हणूनच माझा छळ केला! बाअी, आता हे जीवनच मला नकोसे झाले आहे!

त्या न्यायाधीशाचे शब्द अमृताच्या तुषाराप्रमाणे माझ्या मनातील कोमल अश स्नीय लालसेला पुन्हा पुन्हा अंकुरवीत !

'अितक्यात मला कुळल की कटकही अंदमानातच आहे ! आत्मघाताच्या आधी अेकदा तरी त्याची भेट व्हावी, ह्या आतुरतेने मी हरप्रयत्न करून काळ्या पाण्यावर आले ! पण अिथे पाहते तो ह्या आगळ घाणीतच मला अजून वर्षानु-वर्ष खितपत पडाव लागणार ! छे छे ! वाअी मी आता अेक दिवस देखील अिथे तशी राहत पडू अिच्छीत नाही ! ह्या देहाचा मला वीट आला आहे तुम्ही कटकची चिठ्ठीच तेवढी आणलीत म्हणून तुमच्यावर पुन्हा अेकदा विश्वासते थोकडो दिखाअू आपले म्हणविणाऱ्यानी विश्वासघात करून मला अितक्या वेळा फसविले आहे की, तुम्ही मला फसविणार नाही असे काही मला सांगता येत नाही ! रागावू नका ! मी तुम्हांला खोटे म्हणत नाही माझ्या दैवाला म्हणते पण तरीही तुमच्या मांडीवर मी पुन्हा माझी मान देत आपाल ? कापा ! आआ मानते मी तुम्हाला पाया पडते तुमच्या, मला तुम्ही फसवू नका ! नाही तर कटकबाबच्या नावाने मी मागत असलेले हृदगत विश्वासघाताने सरकारी अधि काऱ्यानाच कळवायचे, माझ्यावर नवेच संकट कोसळायचे ! नका ना भीति

कटकच्या मनातील डोळ्यापुढे त्या राक्षसिणींनी तिच्या ताडात फाडफाड मारल्यामुळे धामधाय रडत, सतापाने कापत, निरुपायाने कढत असलेली ती मालती अगदी वाट अडवून अुभी राहावी; तशी अुभी राहिली! करुणेने कासावीस झालेल्या त्या कटकच्या डोळ्यातून आसवे टपटप गळली त्याची दृष्टि बाष्पधूसर झाली! पण तरीही त्याची पाअुले झरळपणे ती वाट झपाझप काटीत चाललीच होती पुढे!

ह्या सर्व करुण वृत्तान्ताच्या दुःखद आठवणीने भारावलेल्या त्याच्या चित्तात पाणावलेल्या त्याच्या त्या बाष्पाकुल दृष्टीपुढे पुढचा बेत असा काही जुळून आलाच नाही पुढचा निश्चय मात्र ठरलेलाच होता वाटेल ते झाले तरी आता आपली नि मालतीची ह्या बंदिवासातून सुटका करायचीच तिचा आत्मघात टाळायचाच आयुष्यातले दोन दिवस का होअीनात, तेच दोन दिवस त्या साहसापायी आयुष्याचे शेवटचे ठरले तरी, मरायच्या आधी दोन दिवस का होअीना, पण मालतीच्या गाढ आलिंगनात प्रीतीच्या गाढ गुंगीतील स्वर्गसुखाला अुपभोगायचेच अुपभोगायचे! तिला सुखी करायचे, स्वतः सुखी व्हायचे!!

अितक्यात विचाराच्या अशा असंयत कल्लोळात अेखादी दिसण्यात अगदी क्षुल्लक दिसणारी अडचण अकस्मात सुचून माठमोठ्या मनोरथांची धाव जशी अेकदम थबकविते, ल्हान पेराअेवढा विंचू अेखाद्या महारथी वीराला देखील जसा झटकन् विव्हळायला लावतो, तशी अेक शंका कटकच्या त्या स्वर्गसुखाच्या भराला अेकदम नांगी मारून गेली! 'गाढ आलिंगनात तिला सुखी करायचं, दोन दिवस तरी तिच्या संगतीच सुख अुपभोगायचं!' ह्या रंगात त्याचे मन रंगले न रंगले

नि सुरुचि आहेच आहे ! तिच्या संगाच सुख नसल तरी सोवतीच सुख तरी मला दुष्प्राप्य होणार नाही ! त तरी ती होऊनच वाछीत आहे हें नि संशय !'

ह्या विविध भावभावनांच्या कल्लोळात त्याचे मन गुरफटून गेले आहे तोंच त्याच्या नेत्रांनी, जणू काय अेखाद्या पहारेकऱ्याने हालवून जागवावे तसे त्याच्या मनाला जागविले, 'सावध ! ती पाहा बंदिवानांची चाळ दिसू लागली बघ ! काय करायचे हें ठरविण्यातच वाट संपली ! काय करायचे त्याची वाट काय ?'

तसे म्हटले असता सारा जन्म काळ्या पाण्याच्या बंदिवासाच्या घाणीत कुजत पडावयाचे नाही, संधि साधताच बंदीच्या बेड्या तोडून निसटायचेच, हा निश्चय किशनचा आजचाच काही होता असे नाही ! काळ्या पाण्यावर येतांनाच त्याने तो निश्चय केला होता रफिअुद्दिनसारख्या अघोरी माणसाला आपल्या हाडवैराची ओळख न देता त्याचे अुद्देशाने किशनने जवळ केले होते त्याच्याशी गेल्या पाच वर्षांत काळ्या पाण्यावरही त्याच बेताची त्याने गुप्तपणे अनेक वार बरीच चर्चाही केली होती आणि त्या चर्चेच्या अनुरोधेच त्याने लाकुडतोडाअीच्या कामातच जी आपली नेमणूक करून घेतली ती करून घेतली होती अितकेच नव्हे तर त्या लाकूडतोडाअीच्या कामावरील शेसवाशे बंदिवानांचा तो मुख्य बंदिबाबू झाल्याबरोबर त्याने हस्ते परहस्ते खटपट करून युक्तीने रफिअुद्दिनलाही त्या कामावरील बंदिवानांतच आपल्या हाताखाली भरती करून घेतले होते परंतु त्याला मालतीचा काहीच सुगावा लागेना, ह्यासाठी त्या साहसाविषयी त्याने अगदी अचल अशी घेतली नव्हती ती त्याच्या मनाने जी आज घेतली, ती मात्र मालतीच्या निवाणीच्या निरोपाची तिच्या दुर्दशेच्या आणि आत्महत्येच्या बेताची अत्यंत चिंताजनक बातमी अैकल्या [illegible]

मनातच अुच्चारलेल्या त्या नावासरशी त्याने खमकन् आपली जीभ चावली! मघापासून तो आपल्या मनातल्या मनात मालतीविषयीच्या आठवणी काढीत असता मालती हेच ते तिचे प्रेमळ नाव तो योजीत आला होता. कटकी हें नाव योजताना त्याच्या मनातील त्या मालती ह्या नावानेच काय ते मुळापासून सभवलेले, सबद्धलेले, प्रेमळ भाव काही केल्या जागून अुठत नसत. त्यामुळे तो मनातल्या मनात बोलत होता तोवर तिला ती मालतीच म्हणत आला होता. पण मनाच्या काठोकाठ भरून राहिलेले ते नाव जर का ओठावर आलें तर आपण आणि तिने आजवर छपवून ठेवलेलें अज्ञातवासातील सारें गुपित फुटायचें, रफिअुद्दिनचें जुनें हाडवैर पटायचें, निळ्या आशेचा, पहिल्या आपल्या खटल्याचा, सारा सबंध अुघड व्हायचा! नसती विघ्न दत्त म्हणून अुभी रहायची! पुन्हा विसर पडू नये म्हणून तो स्वतःशी पुटपुटत अगदी घोकत चालला, 'मी कटक! कटक! आणि ती मालती नव्ह-

औषधपाणी, बंदिवानांतल्या बंदिवानांत अधिक सोय, चोरून मारून थोडी दुधाची जास्त धार, साखरेची पुडी, तंबाखूची चिमटी देखील अधिकाऱ्याचा डोळा चुकवून पुरविली होती. रफिउद्दिनला परत कोलूच्याच कामावर धाडण्याचा दिवस शक्य तो लांबवावा म्हणून 'सक्त कामाला अजून अयोग्य' असा अभिप्राय डॉक्टरकडून कंटकनेच आर्जव करून देवविला होता. रफिउद्दिनला गिन्यांचा उबारा नाहीसा झालेला, फटक्यांची त्याने आता चांगलीच धास्ती खाल्लेली, त्यामुळे तो पुढे पुढे दिलेले सक्त हस्तश्रम मुकाट्याने करीत राहिला. कंटक जसजसा वर चढत गेला, तसतसा रफिउद्दिन त्याचा अधिकाधिक ओशाळा बनत चालला, त्याची पायधरणी करीत चालला. त्याचा आपला काही अेक लागाबांधा नाही असे कंटक अर्थात वरवर, अधिकाऱ्यांना संशय येवूं नये म्हणून दाखवीतच होता. रफिउद्दिननेही तसेंच करावे म्हणून ठरलें होतें. पण आतून रफिउद्दिनला सारें साहाय्य कंटकच करीत होता; म्हणूनच रफिउद्दिनचे दिवस नीट गेले आणि शेवटी तीन वर्षाच्या आतच त्याला कक्षकारागृहांतून सोडून बाहेरच्या मोकळ्या चाळींतील बंदिवानाच्या कामावर धाडण्यात आलें. नंतर कंटकची आणखी बढती होऊन तो लाकूड-तोडाओचा मुख्य बंदिवान् होताच त्याने आपुन मुद्दाने रफिउद्दिनचीही भरती त्या कठीण कामाला लागणाऱ्या घट्टाकट्ट्याचा श्रमिकांत करून घेतली. कंटकच्या आश्रयावांचून आपले हाल कुत्रें देखील खातें ना, हें रफिउद्दिनला पूर्णपणे माहीत होतें. त्यामुळें काळ्या पाण्यावर येताच कंटकला-वागलें वागविलें जावें, त्याचें रफिउद्दिनच्या दुष्ट हृदयाला जें वैषम्य वाटे तें जाअून आता अुलट तो सदासर्वदा मनापासून प्रार्थू लागला, 'दुवा' करू लागला की, 'कंटकबावची बढतीच

शेपटीच्या खाली गुलाबी रंगाच्या मऊ मऊ पिसांचे अेक चिमुकले सुरेख फूल असते. त्या पाखराचा थवा त्या खोऱ्याच्या गोड गोड फाकांना चोचून चोचून मिटक्या मारण्यात गुग झाला की त्यांच्या आनंदात झुमारलेल्या त्या शेपटीच्या खालची ती रंगीत पिसांची वर्तुळे, गुलाबाची चिमुकली फुलेच फुले अंगणभर विखरून द्यावी अशी शोभू लागत. त्याची मोहनला आणि अुपेला मोठी गमत वाटे

अप्पा देखील त्या बुल्बुलाची गमत पाहात असता असावधपणे त्यांनी त्यांचा दुसरा पाय पटकन सरळ केला आणि त्यात अेकदम कळ अुठली 'आओ ग!' म्हणून ते किंचित् आरडले आणि कण्हू लागले

'अुपे, अग अप्पा कण्हताहेत!' धावऱ्या धावऱ्या मोहन आणि अुपा अंगणा-तून धावत अप्पाच्या खोलीत आली

'क्या हुआ अप्पाजी?' गोरेमोर तोंड करून अुपेने हिंदीत पुसले कारण ती मुले मराठीप्रमाणेच, किंबहुना मराठीहूनही हिंदीतच अधिक बोलत असत मराठी वाचकासाठी म्हणून त्यांचे सारे बोलणे मराठीतच सांगावे लागते अंदमान-मध्ये वसलेल्या मराठी, बंगाली, मद्रासी, पंजाबी सर्व मातापित्यांच्या पोटी अुपज-लेली मुले हिंदीतच बोलू लागतात तीच तिकडच्या मुलांची खरी मातृभाषा असते आपापल्या प्रांतिक भाषा जे काही आओबाप हौशीने म्हणून मुलांना बोलायला शिकवितात तितक्यानाच काय ती, ती यते

'काठे कळ आली माझ्या अप्पांना? मी चेपू? क्या तर खर आता बर वाटेल!' अुपेने आग्रह केला, मोहनने गळ घातली अप्पांनी अनुमोदन देताच मोहन त्यांचे खांदे चेपू लागला आणि दुखऱ्या पायाचे पाअूल अुपा दाबू लागली अप्पा खिडकीतून बाहेर टेकडीकडे पाहात राहिले वटकची वाट पाहता पाहता त्याला काय सांगायचे त्या विचारात ते गुंगले

तीन मिनिटे चार मिनिटे, पाच मिनिटे!—अुपा तिच्या कोवळ्या चिमुकल्या हातांनी देववेल तितके बळ देअून पाय चेपीतच होती पण अप्पांचे लक्ष विचारात गुंग! ते 'पुरे' म्हणायला विसरले अुपेचे हात दुखून आले पुरे बरं बाळ' असं कौतुकाने अप्पांनी म्हणावं आणि मग तिने काम पुरते केल्याच्या समाधानाने चेपणे बंद करावं अशी तिची हौस, पण तिचे हात थकत आले तरी अप्पा पुरे म्हणेनात आपण होअून थकले असं म्हणून चेपणं सोडावं तर मोहन हसणार! तें तिच्या जिवावर आले अधिक चेपणं पण जिवावर आलं थकता थकता ती रुसली, रुसता रुसता चिडली आणि शेवटी अप्पांच्या पाअुलावरच तो राग काढीत, तिने दोन चार चापट्या मारल्या आणि रडायला आरंभ केला!

'माझे हात तुटून गेले तरी तुम्ही काही पुरं म्हणून म्हणत नाही!'

त्या चापट्यासरशी आणि रडण्यासरशी अप्पा पण शुद्धीवर आले, हसत आणि कौतुकाने अुपेला कुरवाळीत समजावू लागले,

गौरव वाटतो ! आपल्याला किंचित् तरी सुखाने मरण यावं, असं कोणतंही कृत्य शक्य असतं तर मी केलंच असतं. पण मी स्वतःच आता सतीचं वाण घेऊन उभा! ह्या काळ्या पाण्याच्या भीषण काळपाशांना तोडून, निसटून जाण्याचा जिवावरचा खेळ मी करणार ! त्यात मरेन की जगेन कुणी सांगावं !'

'मी सांगतो कटक, त्या खेळात मरण हीच निश्चिती ! यशाचा संभव अत्यंत दुर्मिळ, अपवाद ! आजवर शेकडो मारले गेले त्या साहसात, बुडाले समुद्रात ! गेल्या पन्नास वर्षांत पन्नासजण देखील काळ्या पाण्यावरून पळून जाऊन देशाला पोचल्याचं नि तिथे नांदल्याचं मला आठवत नाही !'

'पण तरीही त्या पन्नासातच एकावन्नाव्याची भर मी टाकणार ! नाही तर मृत्यूची वाट चोखाळणार ! हे पहा अप्पाजी, ह्या काळ्या पाण्यावरील करंट्या, दुराचारी नि असह्य गाजणुकीच्या क्षुद्र जगतात असं जन्मभर जगण्यात तरी काय राम आहे बरं ? व्यक्तीचा विकास नाही, भावनेची भरारी नाही, माणुसकीला मान नाही, कुण्या उच्च नि भव्य ध्येयासाठी वा परोपकारापायी देह झिजवायचाही

पण ते प्रयत्न अगदी भलत्याच दिशेने करण्यात येत आहेत हें पाहा, कटक, कोणत्याही देशात अत्यंत अुद्दंड नि समाजाला सर्वतोपरी अुपद्रवी असा चोर, दरोडेखोर, हत्यारी, ह्यांचा अेक वर्ग असणारच असा समाजशत्रु झालेला जो वर्ग हिंदुस्थानात असेल, त्याला नीति नि निर्बंध ह्यांच्या मर्यादा अुल्लंघिणं अशक्य करून टाकण्यासाठी शक्तीने नि बळाने त्याचा निग्रह केलाच पाहिजे फाशी, जन्मठेप नि फटक्यांसारख्या ज्या शारीरिक शिक्षा, तसल्या अुग्र दंडावाचून त्या अुद्दंडाना केव्हाही नि कसलाही दरारा वाटत नाही तो दरारा नि कडक शिस्त ह्यांच्याच पेचात ते पकडलेले नि जखडलेले राहिले, तरच निर्बंधशील नि समाजशील नागरिकांचा त्यांच्या अुपद्रवापासून बचाव करता येतो समाजात शांतता नि सुव्यवस्था नांदू शकते तेव्हा सहस्रावधि दंडितांना अशा काळ्या पाण्यासारख्या वसाहतीत डांबून टाकणच राष्ट्राच्या हिताचं असतं नाहीतर त्यांना ठेवणार कुठे ?'

देशातल्या देशातच बंदिगृहं नाहीत की काय ? त्यांत त्या जन्मठेप्यांना जन्मभर डांबून टाका ह्या काळ्या पाण्यासारख्या पापभूमीत नि अशा अत्यंत छळक परिस्थितीत त्यांना जिवंत पुरून टाकणं ही निर्दयता तर आहेच आहे पण राष्ट्रीय हितही त्यात विशेष काही साधत असेही नाही ! तुम्हाआम्हाला ह्या नरकभूमीत ज्या यातना नि जं जीवन असह्य वाटतं, तसं आमच्यासह असणाऱ्या ह्या सर्व जन्मठेप्यांना वाटत नसेल काय ? ज्या दयेची अपेक्षा आम्ही करतो, तिचीच ते अत्याचारी असले तरी तेही करतात !'

'कटकबाबू तुमच्या अुथळ दयेचाच प्रश्न घेतला तर दंडितांना दंडच न करता मोकाट सोडणं, हीच खरी दया ठरेल ! तुम्हाला नि मला देशातल्या बंदि-गृहात राहणं तरी आवडतं का ? जन्मठेप तर राहोच, पण अेक दिवसही बंदिगृहात कोंडून घ्यायला कोण सिद्ध होअील ? मग काय अुथळ दयेसाठी समाजाला भयंकर अुपद्रव देण्यावरच आपली अुपजीविका व चैन चालविणाऱ्या अशा अुग्रप्रवृत्ति अपराध्यांना मोकाट सोडायचं ? पुन्हा त्या हिंस्र, हत्यारी, बलात्कारी नि अुपद्रवी अशा मूठभर नरश्वापदांच्या दयेसाठी बंदिगृहच सताड अुघडी करावं तर ज्या लक्षावधि सच्छील, पापभारू नि निरागस मनुष्यांना त्यांच्या अुपद्रवाच्या जबड्यात तुम्ही ढकलाल, त्यांची दया नको का यायला ? चोर अत्याचाऱ्यांवर दया करण्या-साठी निरपराध अशा लक्षावधि समाजावर ते अत्याचार होअू देणं ही निर्दयता लक्षपटींनी क्रूर नव्हे काय ? तेव्हा दयेच्या दृष्टीने देखील लक्षावधि निरपराध्यांना अुपद्रवापासून बचावण्यासाठी अपरिहार्यपणे जर चोर अुपद्रवी अपराध्यांना निर्दयतेनं निग्रहावं लागलं तर ती अल्प निर्दयताच अेकंदरीनं महनीय दया ठरते ! अपराधविज्ञानाचं वा दंडविज्ञानाचंही मूलभूत तत्त्व नि समर्थनही हेंच !'

'ह्यात शंका नाही पण देशातील बंदिगृहात '

' तेच सांगतो असं पाहा कटक्बाबू, देशांतील बंदिगृहांत जन्मठेप्यांना डांबून टाकलं तरच त्यांना अधिक निर्दयतेनं वागवल्यासारखं होत नाही का ? त्यांना चार भिंतींच्या आंत जन्मभर कुजत पडावं लागलं तितक्या स्त्रीपुरुषांची, प्रेमाची, मोकळपणाची, संततीची सारी भूक मारून मानसिक अुपासमारीत, तळमळ करीत त्यांना मरावं लागेल हा मानसिक अत्याचार नव्हे काय ? पण जर त्यांना ह्या काळ्या पाण्यासारख्या अेखाद्या स्वतंत्र वसाहतींत त्यांच्या अुद्दंड प्रवृत्तीला माणसाळविण्याअितक्या कठोर निर्बंधांत रावबून घेतलं आणि त्यातल्या त्यांत जी स्वतंत्रता त्यांना देता येअील तितकी दिली, तर त्यांना कौटुंबिक नि वैयक्तिक असं अधिक सुख भोगतां येईल आणि देशांतील सच्छील समाजाला त्या दंडितांना भोगू दिलेल्या स्वतंत्रतेपासून लवमात्र अुपद्रव होण्याचा संभवही मुळीच अुरत नाही ह्या काळ्या पाण्यावर आज तं सहस्रावधि अुद्दंड नि अुग्र लोकही पाहा कसे मोकळेपणी हिंडू शकतात स्वतःच्या रुचीप्रमाणे खाअूंपिअूं शकतात घरदार शेतीवाडी करूं शकतात त्यांच्या प्रेमळ वत्सल कामुक भावनांचाही जन्मभर कोंडमारा न होतां त्यांना विवाहसुख भोगतां येतं, मागच्या अेका अपराधापायीं त्यांच्या साऱ्या जन्माचा नि त्यांचा सत्यनाश न होतां सुधारलं जाण्याची नि संयमशील जीवन स्थापायची संधि पुनः पुनः मिळत राहते

' हिंदुस्तानांतल्या हिंदुस्थानांत अेका कारागाराच्या चार भिंतींत त्यांना डांबून टाकून जिवंतपणीं थडग्यांत पुरावं तसं ठेवणं ही दया का काळ्या पाण्यासारख्या वसाहतींत त्यांना कठोर निर्बंधाच्या कैचींतच पण माणसाळवून माणुसकीनं जीवनाचा आनंद कांहीं तरी अुपभोगू देणं हा खरी दया ! काळ्या पाण्यावर आल्यानंतर जे सुधारतात नि 'दाखलेवाले' होअून त्यांच्या मुलाबाळांनी गजबजलेल्या घरांत नवा जन्म झाल्यासारखे सुखानं नांदतात असे शेकडों जन्मठेप बंदिवान आज अंदमानांत आहेत त्यांना ' हिंदुस्थानांतील कारागृहांतच जर जन्मभर डांबून ठेवलं असतं तर बरं झालं असतं का ?' असं विचारा म्हणजे ते त्या भयंकर कल्पनेसरशी चरकून भितात नि ' आपण काळ्या पाण्यावर धाडले गेलो तेच बर-

'पण त्यातही ह्या अदमानाच्या वसाहतींना तर राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा असणारा असा विशेष आहे तो हा की, हे महत्त्वाचे बेट जे रोगट ओसाड नि मनुष्यप्रतिकूल होऊन पडलेले होते आणि जे बंदिवानांसाठी म्हणूनच काय ते हिंदुस्थानच्या कोणत्याही राजवटीत सहस्रावधि मनुष्य नि कोट्यवधि रुपये देऊन वसवले गेले नव्हते, ते हे अदमानचे महत्त्वाचे बेट, काळ्या पाण्यावर केवळ मरायला म्हणून धाडलेल्या त्या पतितांच्या कठोर परिश्रमांनी आज असे फळाफुलांनी डवरलेले, धान्यांनी समृद्ध, आरोग्यसंपन्न, अुपजाअू नि मनुष्य वसतीने गजबजलेले होऊन बसले आहे. वसाहतींना मिळविण्यासाठी राष्ट्रांना युद्धे करावी लागतात, पराक्रम करावे लागतात. पण आपल्या राष्ट्राला ही अशी नवी वसाहत केवळ आपल्या परिश्रमाने संपादून ह्या पतित नि परित्यक्त बंदिवानांनी वगान फुकटावारी मिळवून दिली आहे हे असे अर्थी खरे नाही का? जर हे सगळे दंडित हिंदुस्थानातील बंदिगृहातूनच जन्मभर कोंडले तर त्यांच्या परिश्रमाचा, साहसाचा, बुद्धीचा जितका अुपयोग नि जितका लाभ आपल्या राष्ट्राला येथे होतो तो करून घेता येता ना! तुम्हाला हे सांगणे नकोच की, ह्या दंडितवर्गात पुष्कळशी लोक मूळचे अत्यंत साहसी, धाडसी, कर्तृत्ववान् नि कोटक असेच असतात!'

'ह्यात काय शंका? समाजाला अुपद्रव देणाऱ्या दुष्ट कामी त्यांच्या त्या प्रवृत्तीचा दुरुपयोग झाला नसता तर तेच त्यांचे धाडस, कोटकपणा नि शौर्य वीराला शोभले असते. असेच अुद्दंड अपराध्यांची सैन्यात भरती करून सैनिक-शिस्तीत त्यांची तीच अुद्दंडता राबवून कित्येक सेनापतींनी मोठमोठे विजय मिळविले आहेत, कित्येक राष्ट्रांनी आपल्या स्वातंत्र्यसंग्रामांतून लढाया मारल्या आहेत! फार काय, पेंढाऱ्यांच्या अमरखान प्रभृति धडधडीत दरोडेखोर असणाऱ्या पुढाऱ्यांनाच टाकसारखी संस्थानेही स्थापलेली आहेतच की नाही?'

आहेतच! कटकबाबू तेव्हा राष्ट्रात असताना अुपद्रवी ठरलेल्या ह्या दंडितांच्या त्या साऱ्या गुणांना नि अवगुणांनाही कडक निर्बंधाच्या, सक्तीच्या नि भयाच्या दाबाखाली राबवून घेण्यासाठी अशा अेखाद्या काळ्या पाण्यावर धाडणेच अिष्ट. जे परिश्रम ते आपण होऊन राष्ट्रासाठी करत ना, ते त्यांच्याकडून कठोर सक्तीने करवून घेता येतात आणि त्यांच्या जीवनाचा राष्ट्रीय धन, सत्ता नि शक्ति वाढविण्याकडे अुपयोग करून घेता येतो. ह्यासाठी ही अदमानची बंदिवान वसाहत राष्ट्रीय दृष्टीने फारच अुपयोगी आहे. तीत सुधारणा शक्य त्या त्या करा. पण अदूरदर्शी धोरणाने नि अपात्री दयेपायी ती वसाहत केव्हाही रद्द पाडता कामा नये. पुन्हा असे पाहा की, अशा काळ्या पाण्याच्या वसाहतींवर न धाडता त्या सहस्रा-वधि दंडितांना जर हिंदुस्थानातल्या बंदिगृहातूनच स्वापुरते निरनिराळ्या कोठ-ड्यांच्या पिंजऱ्यातच जन्मभर कोंडून टाकू लागलेत तर त्यांच्या तारुण्याची माती करणारा तो निर्दय कोंडमारा त्यांना किती असह्य होईल नि राष्ट्रालाही किती

तोटयाचा ! कारण त्यामुळे त्या सहस्रावधि स्त्रीपुरुषाच्या संततीतही राष्ट्र मुकेल! राष्ट्राचे संख्याबळ घटेल त्यापेक्षा काळ्या पाण्यासारख्या स्वतंत्र नि नव्या वसाहतीत त्या दंडित स्त्रीपुरुषांना विवाहित जीवन अुपभोगायची संधि दिली तर प्रेमाच्या नि वात्सल्याच्या कोमल भावनांनी त्यांची स्वतःची माणुसकीही विकसेल नि त्यांची संतति ह्या वसाहतीची भरभराट करून आपल्या राष्ट्राला अेक नवा प्रदेश जिंकून जोडावा, तसा मिळवून देअू शकेल ! आजच पाहा ना, अेक नवा प्रदेशच नव्हे तर ह्या अंदमानात आपल्या हिंदुसंस्कृतीचं अेक नवं जानपदही भरभराटत चाल्लं आहे !'

'पण अप्पाजी, पापी, अपराधी नि दुष्ट असे जे दंडित असतात, त्यांच्या संततीतही ते ते अत्याचारी वा दुराचारी दुर्गुण अुतरतात असं अनुवंशविज्ञान सांगतं म्हणतात, त्याविषयी काय ?'

'ते अेक भरमसाट तर्कट आहे दुसरं काय ! वैयक्तिक वा कौटुंबिक दृष्टीने ते कितपत खरं आहे वा खोटं त्या अर्थी मी बोलत नाही, पण वसाहतीचा जो आपला प्रश्न चालू आहे, त्याविषयी तसा सिद्धान्त प्रतिपादणं म्हणजे निव्वळ तर्कट होय अहो हा ऑस्ट्रेलिया पाहा, कॅनडा पाहा, आफ्रिकेतील वसाहती पाहा ! अिंग्लंडमधील अत्यंत नृशंस नि दुराचारी अशा दंडितांची नि जन्मठेप्यांची तारवेंची तारवें भरून ते देश ओसाड असता प्रथम तिकडे नेअून सोडीत अिंग्लंडच ते असं काळं पाणीच होतं, पण आज त्याच दंडितांचे वंशज अनेक स्वतंत्र राष्ट्रं होअून बसले आहेत ? मोठे मोठे वीर कारस्थानी विधिमंडलसभासद निर्बंधपंडित त्यांच्यात निपजले तेथील आजच्या प्रतिष्ठितांतील कित्येकांचे पणजे चोर दरोडेखोर बलात्कारी, पापाचारी दंडित होते ! हं अंदमानच पाहा अिथली तरुण संतति स्त्रिया वा पुरुष मुलं वा मुली हिंदुस्थानातील कोणत्याही नगरात नेअून सोडा नि देखणेपणा सुशीलपणा, बुद्धि चलाखी, अित्यादि गुणांच्या कसोटीने त्यांना आळखून काढा ! ते हार जात नाहीत असंच आढळेल !

हे माझ्याच कुटुंबाचं अुदाहरण घ्या माझी पत्नी ही अेक रजपूत स्त्री होती हिंदुस्थानात लहानपणी तिचं लग्न झालं त्या लग्नाच्या तिच्या नवऱ्यास दोन बायका त्या सवतीमत्सरात भयंकर तेढ माजली असता नवऱ्याने हिलाच मारझोड करावी हिच्या अेका दुष्ट शेजाऱ्याने तिला शिकवलं की 'तुझ्या सवतीला मी देतो ती मंत्रित पूड अन्नात घालून दे की तिच्या जाचातून सुटशील' हिने त्या शेजाऱ्याला गळ्यातली सोन्याच्या मण्यांची माळ देअून ती मंत्रित पूड घेतली नि सवतीच्या अन्नात घालून ते तिला वाढलं ती पूड विषाची होती ! सवत तत्काळ मेली नि ह्या अठराअेक वर्षाच्या पोरीला त्या भयंकर अपराधापायी जन्मठेपेची शिक्षा ठोठावली गेली पण त्या शिक्षेच्या हययासरशी कोणत्याही तरा

दुष्कृत्याची तिच्या मनाने अशी धास्ती खाल्ली की, तिचा स्वभाव अत्यंत सरळ नि निर्बंधशील होऊन गेला. बंदिगृहाच्या भूमकठोर दगडी भिंती ह्याच काहीजणांना कोणत्याही नीतिग्रंथापेक्षा अधिक परिणामकारी संयम शिकवू शकतात ! काळ्या-पाण्यावरील जन्मठेपीत त्या रजपूत तरुणीचं वर्तन अितकं निर्बंधशील होतं की, मला लग्न करायची अनुज्ञा मिळताच मी तिच्याशीच लग्न केलं. दहाअेक वर्षं तिने गृहिणीचं कर्तव्य निरपवादपणे पाळलं, सुखाचा संसार केला. पुढे ती वारली. तिच्यापासून मला झालेला माझा अेकुलता अेक मुलगाही चांगला निघाला.

'त्याची बायको ही अनसूया, माझी सून. हीही अेका बंगाली कायस्थाची मुलगी, बालविधवा झाली. तिच्या दिराने तिच्याशी अनैतिक संबंध ठेवला आणि शेवटी तिला गर्भ राहताच अत्यंत अुग्र औषध देअून तिच्याकरवी भ्रूणहत्येचं भयंकर पाप करवलं ! पण समाजभयाने तिने जे पाप केलं, तेच अुघडकीला येअून तिला समाजदंड भोगावा लागला. तिचा दीर बेपत्ता झाल्यामुळे तिला जन्मठेप काळं पाणी झालं. पण म्हणून तिच्या स्वभावावरच काही नित्याचा असा राक्षसीपणाचा छाप पडला आहे का ? तिने काळ्या पाण्यावरील ठराविक शिक्षा भागताच जेव्हा माझ्या मुलाशी लग्न केलं, तेव्हापासून अितक्या प्रेमळ सच्छील नि कष्टाळपणाने आमच्या घरी ती नांदत आली आहे की, अशी सून देशात सुद्धा शंभरात अेखादीच आढळावी. पुढे माझा मुलगा तारखात्यावर नोकर झाला. दुर्दैवाने दोन-अेक वर्षांपूर्वी अपघात होअून समुद्रात बुडाला, पण त्याच्यामागे राहिलेल्या ह्या दोघा लेकरांचाच नव्हे तर माझा पण संभाळ ती करीत आहे. स्वतःच स्वैंपाकपाणी, घरकाम चाल-वीत, दारिद्र्यातही किती समाधानाने वागत आहे, तं तुम्हीच पाहा ! ह्या माझ्या लहान नातवंडांना, ह्या तिच्या दोघा लेकरांना, ही माझी सून अनसूया जिवाचं जीव की प्राण करीत आहे, त्यापेक्षा कोणती आअी अधिक वत्सल असू शकेल बरं ? अगदी सभ्य नि कुलीन समाजातही आपल्या सर्वांना अनुभव असेल की, जगातील सर्व देशामध्ये कुमारिकाच्या अल्लड वयात भ्रूणहत्येचं भयंकर दुष्कृत्य समाजाच्या अत्युग्र भयापायी घडतं, पण कित्येकींचं तें कृत्य छपलं गेलं तर त्या अितर कोण-त्याही कुमारिकाप्रमाणेच कुलीन नि सुशील समजल्या जातात, प्रेमळ पत्नी नि अत्यंत वत्सल माता होअू शकतात, जशी कुंतीदेवी !'

'त्याचं कारण हेंच की, दुष्कृत्याचा छंदच लागलेले नराधम जसे असतात, तसेच दुष्कृत्याची अत्यंत घृणा वाटत असताही केवळ असह्य छळाच्या भयानंच काय तं, ह्या क्षणिक बेभानपणाच्या झिणझिणीतच काय तं ज्यांच्या हातून दुष्कृत्य घडून जातं, असेही अपराधी माणस असतात. दंडित वर्गापैकी त्या पहिल्या राक्षसी प्रवृत्तीच्या अपराध्यांना कठोर दंडाच्या भयाने वठणीस आणता येतं. ह्या दुसऱ्या पापभीरु प्रवृत्तीच्या अपराध्यांना सहानुभूतीच्या अभयदानाने सुधारता येतं. तस्मा

दंडित म्हटला की तो माणसातून नित्याचा अुठला, अितकेच नव्हे तर त्याची संततिही वंशपरंपरा पापप्रवणच असणार, असे समजणे म्हणजे मुळातच अेक भरमसाट तर्कट ! आणि त्यावर आधारलेला जो समज की, दंडिताच्या वंशाहतीची संततिही जन्मतःच माणुसकीला मुकलेली अशी असणारच असणार, तो समज तर जितका भरमसाट, तितकाच अत्याचारी आहे ! '

' निःसंशय ! निःसंशय ! आणि अप्पाजी, त्या तर्कटाला जसा अंदमानातील तरुण संततीने छेद पाडला आहे, तसाच आणखी अेका, विशेषतः आपणा हिंदूंच्या दृढ तर्कटालाही छेद पाडला आहे. हिंदु समाजातील सर्व जाती — निदान पुष्कळशा — अेका पाळीत आलेल्या असताही त्यांच्यात स्पर्शबंदी, रोटी-बंदी, बेटी-बंदी प्रभृति जे खंदक पूर्वीच्या सहस्रावधि वर्षांच्या परिस्थितीत हितकर म्हणून गणले गेले, ते तसेच ठेवणे आजही हितकर आहे, जर या ते खंदक बुजवले नि जातीजाती-रोटीबेटी व्यवहार चालू केला तर तो सर्वस्वी मोठा अनर्थावह झाल्यावाचून राहणार नाही, संस्कृति निकृष्ट नि प्रजा अधम होअील, अशी जी अेक धार्मिक छापाची भीति आपल्या देशात हिंदु समाजाला ग्रासून टाकीत आहे ती किती भ्रान्त आहे हेही अंदमानातील ह्या नवोदित हिंदु जानपदाने प्रत्यक्षपणे दाखवून दिले आहे! अंदमानात गेली पन्नासअेक वर्षे सर्व हिंदु जाति नि सर्व प्रांतिक वर्ग सरमिसळपणे अेकत्र नांदत आहेत. पुष्कळ प्रमाणात अस्पृश्यतेची बेडी तुटली, रोटीबंदीची निदान स्पृश्यवर्गात तर आठवण सुद्धा बुजली. बंगाली, पंजाबी, मद्रासी, मराठी, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य नि शूद्र कोण कोण हे विचार सुद्धा बुजून निदान स्पृश्य हिंदु तेवढा तरी अेकत्र जेवतो नि बहुधा अस्पृश्यही ! आणि मिश्रविवाह सरसकट चालू असल्याने बेटीबंदी तुटून जातीचे नावच राहिले नाही ! आपलेच कुटुंब पाहा. आपण महाराष्ट्रीय ब्राह्मण, पत्नी रजपूत क्षत्रिय, मुलाचे लग्न झाले बंगाली कायस्थ कन्येशी! आता ह्या तुमच्या नातवंडाची जात हिंदु अेवढीच काय ती ! बरं, ह्या संमिश्र रक्तबीजाची ती नातवंडे तरी कशी ? तर ही मोहन नि अुषा ! किती चलाख-देखणी, सुशील ! पुणे, मुंबअी, कलकत्त्यामधील कोणत्याही शाळेतील मुलात नेअून सोडली तर पहिल्या पाचातच चमकणार ! जातीपाती तोडून संमिश्र विवाह केल्यास संतति निकृष्टच होणार ही भीति खोटी आहे, हे अंदमानच्या हिंदु जानपदाने सप्रयोग सिद्ध करून दिले आहे '

'भाषेच्याही दृष्टीने अंदमानाने आणखी अेक अभिनंदनीय असा यशस्वी प्रयोग करून दाखवला आहे ! येथील सर्व हिंदु जानपदाची भाषा अेक — हिंदी ! तरुण पिढीची मातृभाषाच हिंदी ! '

' पण अप्पाजी, सरकारी धोरणाची अेक फार मोठी चूक होत आहे ती ही की, हिंदु मुलामुलींनाही सारे शिक्षण अुर्दू लिपीतच बळे बळे देण्यात येते, त्या विषयी फार चळवळ करून नागरी हीच अंदमानाची, निदान हिंदु जानपदाची तरी

अेकमेव लिपी ठरवली पाहिजे. सरकारी शिक्षण नि शाळांमधून हिंदूंतच चालवा-यचा सरकारी धोरणाचा हट्ट निंद्य आहे. अंदमानामध्ये अशा अनेक सुधारणा करणे नि नव्या स्वतंत्र पिढीला आपल्या गुणांचा विकास करण्यास अनुकूल परिस्थिति लाभू देणे, ही दोन कार्ये साधण्यासाठी काही त्यागी पुरुषांनी ह्याच वसाहतींच्या अुरापोंच्या प्रश्नाला धाहून घेणे अवश्य आहे.'

' हां, भटकरावबापू, अितेच आपल्या ह्या चर्चेचा धागा आपल्या ह्या संभाष-णाच्या आरंभीच्या माझ्या विधेयाशी गुंतलेला आहे. जर तुम्हाला हे मान्य आहे की, ह्या अंदमानच्या वसाहतीत निर्माण झालेले जे हे अेक नव जानपद, ते आपल्या हिंदूंच्या सांस्कृतिक साम्राज्यात अेक नवा प्रांत जिंकून जोडावा इतके महत्त्वाचे आहे, तर नव्या वसाहतींना आर्थिक, सामाजिक, राजकीय नि सांस्कृतिक अुत्कर्ष करण्याचेच कार्य आपल्या जीवनाचे ध्येय ठरवणे हा काय राष्ट्रसेवा नाही ? अेका तुमच्यामाझ्यासारख्या बंदिवासग्रस्त आयुष्याची महत्त्वाकांक्षा व्हायला ते ध्येय काय पुरेसे महनीय नाही ? मग आपण त्यालाच आपल्या जीवनाचे अितिकर्तव्य का समजत नाही ? भटकराव, तुम्ही पाचअेक वर्षांनी 'दाखला' मिळवून थोडेसे स्वतंत्र व्हाल, तिथेच अेक करून बसाल. ह्या वसाहतीला शाळा, देवालये, संस्था संघटना ह्यांनी अुणीव ती भरून काढा. आमच्या ह्या विश्वनाथचे अुदाहरण पाहा तेही जन्मठेपीवर अिकडे आले हातापायांत बेड्या पडून ! पण 'दाखला' मिळवून नारळाच्या मोठाल्या बागा करून, नेहाची लागवड वाढवून लक्षाधीश झाले आणि माझ्या विचाराने त्यांनी सहस्रावधि रुपये ह्या अंदमानात जन्मलेल्या स्वतंत्र हिंदु तरुणांना पोटापाण्याला लावण्यात, शाळा बांधून देण्यात, अजिंक्य हिंदूंचे अेक देवालय स्थापण्यात, शिष्यवृत्त्या देण्यात, धर्मार्थ औषधालय चालवण्यात दान दिले. पंडित, पुराणिक, चिकित्सक, पुढारी ह्यांची अिथे मोठी अुणीव, ती तुम्ही भरून काढा. ही वसाहत हिंदुस्थानचा, हिंदु साम्राज्याचा अेक बलिष्ठ असा सामुद्रिक दुर्ग जन्मठेपी असे तुम्ही सारेजण मिळून करून सोडा. ह्या कार्यी सहस्रावधि जीवन झिजली तर व्यर्थ गेली असे म्हणता येणार नाही.'

खरेच अप्पाजी ! सामुद्रिक दुर्गाविषयीचे म्हणाल तर मी अंदमानात, अुतरताच ह्या बेटाचे ते सामुद्रिक महत्त्व माझ्या ध्यानात आले होते बरं का. तट-बंद, शस्त्रास्त्रसंभाराने सुसज्ज अेखाद्या पाणीदार कवचासारखा दुर्भेद्य असा जर ह्या अंदमान बेटाचाच अेक प्रचंड जलदुर्ग करून सोडला तर हिंदुस्थानच्या पूर्व-समुद्रात शत्रूच्या नाविक दलाच्या वाटेत तो अेक जावघेता सुरुंगच होअून बसेल. ही सशस्त्र नि तटबंद बेटे म्हणजे आमच्या पूर्वसमुद्रात पहाऱ्यावर चढविलेली अेक महाकाली तोफ आहे.

' आणि सध्या आपण युरोपच्या बातम्या अैकतो, त्यावरून ज्या अर्थी मनु-ष्याला विमानाची विद्या हस्तगत झालीच असे दिसून येते, आज जरी त्याअू

विमान तुरळक, तरी पांचपंचवीस वर्षांत मोठमोठी लढाऊ नि वहाऊ विमानांची पथकच्या पथक आकाशात विहरूं लागतील ह्यांत ज्या अर्थी शंका वाटत नाही, त्या अर्थी पुढेमागे हे अंदमान म्हणजे हिंदुस्थानच्या पूर्वसमुद्रावर पहारा करणारा अेक लढाऊ असा वैमानिक तळही झाल्यावाचून राहणार नाही। मग सांस्कृतिक, सामुद्रिक नि वैमानिक दृष्टीने अशा बहुपरी महत्त्वाची असलेली ही वसाहत निर्मिण्याच्या, टिकविण्याच्या नि वाढविण्याच्या कार्यी ज्या सहस्रावधि दुर्दैवी हिंदी बंदिवानांच्या यातना, कष्ट, रक्त नि जिणें आज पन्नास वर्षे अिथे खर्ची पडलें, तें राष्ट्रकारणी लागलें, पाप्याचें रक्तही पुण्यकार्यी सांडलें, असेंच म्हटलें पाहिजे ह्यापुढेही ज्यांना अिथेंच जगणें अवश्य, त्या जन्मठेप्यांनी आपलेंही जीवन ह्याच कार्यी वेचावें हाच त्यांचा अपरिहार्य धर्म '

'अितकें मलाही मान्य ! अपरिहार्य तर, दुसरा मार्ग अशक्य तर, जन्मठेप्यांनी जीवनाचें सार्थक ह्या वसाहतीच्या लोकसेवेतच मानावें पण माझ्यापुरता तरी दुसरा मार्ग शक्य आहे मी तरी काळ्या पाण्यावरून पळून जाण्यांत यश संपादणार, असें मला निश्चितपणे वाटतें माझी कारण मी तुम्हाला मागच्या भेटीत कळविलीच होती त्यांत ही माझी वहीण कटकी ही तर आणखी पांच वर्षे तर सोडाच, पण पांच महिनेही बंदिवासात जिवंत राहू अिच्छीत नाही भेडांच्या म्हणा, पण तिला ह्या आत्मघाती लहरीने पछाडलें आहे खरें वरं, जर मला यश आलें, जर मी स्वदेशी ह्या वर्षाच्या आंत पोचलो नि जर मला तिकडे आपलें आयुष्य येयाल ह्या ध्येयाहूनही महनीय अशा ध्येयाला वाहता आलें माझ्या गुणांचा, शक्तींचा नि जीवनाचा अिथे कधीही होअू शकणार नाही अितका विकास नि सद्व्यय होअू शकला, तर मग तरी माझें हें साहस चुकीचें ठरणार नाही ना ? '

नाही ! फार काय, तुम्हाला यश येवो, अशी मी प्रभूची प्रार्थनाही करीन पण तुमचा तो ' जर 'च महा दुर्घट ! असो तुम्ही केलेली योजना अपुरी होती नक्की संधि केव्हा, कशी साधणार, तें काही ठरवलें काय ? '

' नाही ! पण अनसूयाबाअींनी कटकाला मी म्हटलें त्या ठिकाणी काम लावून दिलें आहे स्त्रीबंदिगृहाबाहेर विवाहेच्छु स्त्रीपुरुष बंदिवानांना परस्पर परिचय करून घेण्यासाठी जे त्यांतल्या त्यांत मोकळें स्थळ आहे त्यांत पाअीलट मरणाच्या कामी तिला लावण्यात कटकी ठराविक वेळी बंदिगृहाबाहेर पडून तिथे येते जाते तिथें माझी तिची दृष्टादृष्टही चालते बहुधा भेटही होअील मग काय तें नक्की करीन म्हणतो तरी सुद्धा योग्य संधि साधून यशीता मी भलतीच घाअी करणार नाही वरं आज अनसूयाबाअी शेजारच्या गावी गेल्याचें कळलें मोहनकडून, तेव्हा त्यांची भेट

' आता राहा होणार नाही खरीच ! अुद्या येअील तो तुमची जायची वेळही झाली, नाही का ? मला तुमच्या ह्या धाडसी कटाविषयी पुष्कळ विचारावया

वाटत, पण वेळ नाही असली चर्चा सुरक्षितही नसते तुमच जिथे येणही आता तुम्हाला नि आम्हाला दावयाचच '

' होय अप्पा ! ' वटकने त्याना सबोधिले पण जो विचार ता सागणार होता त्यानेच त्याच हृदय भरून आले तो अडखळला पुन्हा म्हणाला,

' अप्पा, ह्या दुखण्यापायी आपण नि ह्या साहसापायी मी मृत्यूच्या जबड्यात केव्हा सापडू, ह्याचा आता क्षणाचाही भरवसा नाही पण अप्पा, जर काळ्या पाण्याच्या भुयारातून मी बाहेर पडू शकलो, जीवनाचा निर्मुक्त वायु पुन्हा श्वासोच्छवासू शकला तर मी – स्वदेशात निर्भयपणे नादता आल तर स्वदेशी न आल तर युरोप-अमेरिकेमारख्या कोणत्या तरी विदेशी – जिथे कुठे असेन तिथून ह्या तुमच्या नातवंडाची चिता माझ्या पोटच्या लेकरासारखीच वाहीन ! अनसूयाताशी माझ्या बंदिवासातील माझी बहीण माझ्या दुर्दैवाच्या, सकटाच्या, दारिद्र्याच्या भाऊबिजेला जिने मला ओवाळल, तिला माझ्या वाट्याला जर कधी सख्ख्या वहिणी-हूनही सुदैवाची भाऊबीज आलीच, तर माझ्या प्रेमाची नि साहाय्याची अधिक ओवाळणी घातल्यावाचून मी कधीही राहणार नाही ! जाना आता, गेलच पाहिजे आता मला ! '

वटक अुठला, अप्पाना त्यान अुभ्या अुभ्या नमस्कार केला तसाच त्याच्याकडे थोडा वेळ पाहात राहिला, थोडा जाण्यासाठी वळलाही पण पुन्हा परतून म्हणाला ' अप्पा जरा ह्या लोडाशी थोडस सावरून बसाल का ? पाय असे थोडे हळूहळू पसरा – नाही, पसरलेच पाहिजेत '

रुग्णशय्येवर जर्जर होअून पडलेल्या त्या वृद्ध वीराला तम बसवून वटकने त्याचे पाय आपल्या हातानेच तसे व्यवस्थित पाघरणाबाहेर ठेवले आणि त्याच्या-वर आपला माथा टेकून त्याना साष्टाग दडवत घातला

अप्पाजी मघा ह्या अदमानची वसाहत हिंदुराष्ट्राला किती महत्त्वाची आहे त आपण सागत होतात नाही का ? ह्या बेटाच सामुद्रिक नि वैमानिक तळ ह्या दृष्टीने फारच महत्त्व आहे जिथे अेक नव हिंदु जानपद निर्मिले जात आहे माठमाठ्या नारळाच्या बागा चहाचे मळे रबराची लागवड, प्रचड वृक्षांच्या विस्तीर्ण रानातील नाना प्रकारच्या बांधकामी लाकडाच अगणित अुत्पन्न ही सारी राष्ट्रीय सपदा महत्त्वाची आहे तथापि ह्या प्रकारची सपदा अितर वसाहतीतही आपल्या हिंदुराष्ट्राला लाभू शकेल पण जी सपदा अितर कोणत्याही वसाहतीला हस्तगत नाही अशी जी अेक सपदा ह्या अदमानातच काय ती साठवली गेली आहे आणि ह्या भूमीतच ठेवलेल्या ज्या अमूल्य ठेवीमुळे अितर कोणत्याही वसाहतीपेक्षा ही अदमानची भूमि आपल्या हिंदुराष्ट्राला अधिक अभिलषणीय वाटणारी आहे, अेक क्षेत्र भासणारी आहे ती ह्या भूमीतील आमची राष्ट्रीय सपदा, ह्या भूमीतील ती आमची अनर्घ्य ठेव म्हणजे तुम्हा सत्तावन सालच्या सहस्रावधि राष्ट्रवीराची

ह्या भूमीत विखुरलेली राख होच होय ! हिंदुस्थानाला अंदमान म्हणताच प्रथम होओील ती आठवण ! '

'पण—पण असं म्हणणारा तूच पहिला हिंदु मला गेल्या पन्नास वर्षांत आढळलास ! ' अुदास निःश्वास सोडीत अप्पाजी म्हणाले, 'कसली आठवण घेअून बसला आहेस? अरे, हिंदुपदपादशाहीच्या संताजी, धनाजी, बाजी, चिमाजी, भाअू, विश्वास, मल्हार, महादजी, प्रभृति शतावधि विजयी सेनापतींचं भाग्य जरी नसलं, तरी निराशेत नि अपजयातच खर कसोटीला लागणार जे रणचापल्य, निकाटी, शौर्य, धैर्य, तितिक्षा, कारस्थान नि राष्ट्रभक्ति ह्या गुणांनी अिंग्रजासारख्या शत्रूलाही नाकी नअू आणणारा त्या आपल्या हिंदुपदपादशाहीचा शेवटच्यातील शेवटचा रणधुरंधर सेनापति जो तात्या टोपे — ते जिथे स्वराज्यासाठी नि स्वधर्मासाठी फासावर चढले, त्या स्थली त्यांच्या आठवणीची मुद्रा अेक शिलाही ज्या ह्या कृतघ्न पिढीने अद्याप अुभारली नाही, तिला अंदमानात धिक्कृत होअून राख झालेल्या आम्हा सैनिकांची कसली आठवण होणार ! कटक, ज्या दिवशी सत्तावनची असिलता तुटली, त्याच दिवशी हिंदुस्थानची आशा सुटली ! '

नाही ! अप्पा, नाही ! आज हिंदु जाति अचेतन पडली आहे खरी; पण ती मूर्च्छा आहे — मृत्यु नव्हे ! अितिहास तरी शपथेवर सांगत आहे की, अशा कित्येक मूर्च्छांतून पुन्हा जागून अुठावी अशी अुज्जीवक शक्ति ह्या हिंदु जातीत निवसत आहे, हे नक्की ! दशमुखी रावण गेले, शतमुखी गेले। अप्पा, हेही दिवस जाणारच नाहीत म्हणून कशावरून ? नवे नवे विक्रमादित्य अवतरणार नाहीतच म्हणून कशावरून ? विठ्ठुगा ही तुमची राखच त्याच्या सभवाचं खत आहे — हमी आहे.'

'तथास्तु ! जेव्हा आणि जर तसा भाग्याचा दिवस पुन्हा कधी खरोखरच

आकाशाच्या ऊर्मी येखाद्या बादळासारख्या माझ्या रक्तारक्तातून अुसळून यताहेत ! कटक, मला सहन होत नाही ह्या अनुकूल भावनांचाही हा हल्कल्लोळ, ही हृदयाची तीव्र गति '

तोच चौकी बंद होण्याची घंटा दुरून घणघणत असलेली अैकू आली ! 'घंटा !–' वृद्ध वीर चमकला, 'जा, कटक जा, नाही तर पकडला जाशील !', लगबगाने कटक अुठला आणि लपत छपत त्या टेकडीवर भराभर चढत चालला

आणि दोनतीन दिवसाच्या आतच, सत्तावनच्या क्रांतियुद्धापायी काळ्या पाण्यावर गेलेल्या त्या सहस्रावधि हिंदु सैनिकांतील त्या शेवटच्या वीर वृद्धाचाही अंत झाला !

त्या दिवशी त्याच्या त्या ओस झोपडीत त्याची अशी आठवण देणारी दोन फुले काय ती मागे अुरली होती – मोहन आणि जुपा !

* * *

## १६. अंदमानच्या दाट जंगलात

अंदमानमधील वनात घरबांधणीच्या कामी अुपयोगी पडणारं लाकूड जितके चांगले, भक्कम आणि सुबक प्रकारचे सापडते की, युरोपच्या पेठातूनही त्याला भरपूर मागणी येते

आज कटक ज्या रानतोडणीच्या विभागात काम करीत असे, त्या तुकडीला अरण्याधिकाऱ्याची विशेष आज्ञा सुटली होती की, लाकडाची युरोपातून आलेली नवी मागणी पुरविण्यासाठी आजवर तोडीत असलेल्या अरण्याच्या भागापलीकडच्या नव्या रानात शिरून तोडाअीचे काम चालू करायचे त्या आजवर प्रवेशही न केलेल्या घनदाट रानात प्रथम चालचलाअू वाट पाडायची, नंतर मोठमोठ्या वृक्षांच्या भोवतालच्या दाट जाळ्या आणि झुडपं काढून छाटून बांधकामी त्या त्या वृक्षांवर खाणाखुणा टाकायचे आणि मग मोठमोठ्या करवती कुऱ्हाडी आणि अितर हत्यारं घेतलेल्या दोनदोनशे बंदिवानांच्या टोळ्यांकरवी त्या प्रचंड वृक्षांना कापून तोडून तासून त्यांच्या सोटाच्या राशींच्या राशी रचण्याचे अतिशय सक्त आणि कठीण श्रम करून घ्यावयाचे

ह्या निकडीच्या आज्ञेप्रमाणे कटकच्या हाताखालील तुकडीही गर्क करण्यात घोंगडून गेली त्या अरण्याच्या आजवर न तोडलेल्या आणि अगदी सुंदर

अशा विभागात पाय टाकणें हें अंदमानात धाडसाचें काम समजलें जाअी. अिंग्रजांचा प्रवेश जसजसा त्या घनदाट रानाच्या अंतरंगात होत जाअी, तसतसे तेथील मूळच्या रानटी आणि कडव्या टोळ्यांचें शत्रुत्व वाढत जाअी. कारण, त्यांना त्या त्या मानानें मागें हटावें लागे, त्यांचें ते रानटी राज्य संपुष्टात येअी. त्यामुळें अिंग्रज असा घनदाट अरण्यात आणखी अेक पाअूल पुढें टाकू लागला की जरा त्या भागात, त्या रानटी आणि कडव्या टोळ्यांपैकी अेखादी टोळी वसत असली तर ती अिंग्रजांच्या, रानतोडा-अीच्या बंदिवान टोळ्यांवर केव्हां तुटून पडेल आणि त्यांचे मुडदे पाडील, ह्याचा काही नियम नसे. ह्या रानटी नि कडवट टोळ्यांत जरी अनेक पोटजाती आणि पोटनावें असत तरी त्यांच्यात जी अत्यंत रानटी आणि अत्यंत कडवी जात आहे, तिचें नाव जावरा हें असल्यानें बंदिवानलोकांच्या बोलण्यात त्या सर्वच रानटी टोळ्यांना ते जावरा हेंच नाव लावण्यात येअी. अशा नव्या घनदाट रानात प्रथमच घुसतांना ते जावरा रान अडवायला नेहमीच येत असें नव्हते, पण केव्हां येतील ह्याचा नेम नसे. त्यामुळें कटाक्षानें आपल्या टोळीतही नेहमीचे अळवतें गळवतें बंदिवान न घेता धीट, काटक आणि रानतोडाअीत कसलेले असेच बंदिवान निवडले. त्यामध्ये रफिअुद्दिनही होताच. तो रू लागला म्हणजे असे कावाडकष्ट करी आणि रानतोडाअीच्या कामात तर तो पूर्वी काळ्या पाण्यावर होता तेव्हांपासून अितका पटाअीत झालेला होता की, तो पळून गेलेला बंदिवान असताही रानातील लाकूड तोडण्याचें अुत्पन्न वाढविण्याच्या कार्यासाठी, त्याच्या बंदोबस्ताची हमी आपल्यावर घेअून त्या टोळीवरील मुख्य जमादारानें त्याला मुद्दाम मागून घेतलें होतें.

तो मुख्य जमादार रफिअुद्दिनला मनुष्य म्हणतच नसे. रफिअुद्दिनचें नाव त्यानें ठेवलें होतें 'रानतोडाअीचें यंत्र!' आजकाल आपला स्वतःचाच डाव साधण्यासाठी रफिअुद्दिनही त्याच्यावरील अधिकाऱ्यांची कृपा संपादण्यात दक्ष झालेला असे. त्या दिवशीच्या त्या धाडसाच्या कामी पुढें जाण्यास तोही अेका पायावर सिद्ध झाला

कावडा आणण्याच्या आधीच टोळीची घटा झाली. अर्ध्या तासाच्या आत तेदोनशे बंदिवान पटांगणात ओळीने ठाकले. प्रत्येकाच्या ऐकेका पायात साखळ-बेडी कमरेपासून घोट्यापर्यंत जखडलेली, ऐक पाय मोकळा. 'ऐक-दोन-तीन-' अशी गणती होऊन दोनशेंची टोळी बाजूला काढली गेली.

ती त्यातल्या त्यात निवडक टोळी होती आणि आज लाकडाची मागणी पुरविण्याची निकड असल्यामुळे त्या टोळीवर जे विशेष जमादार नेमण्यात आले होते तेही होते ऐकजात 'दंडावाले'! कष्टाळू आणि अगचोर, नरम आणि घुमट अशा दोन्ही प्रकारच्या बंदिवानांकडून जो जमादार काम जुगते पिळून काढू शकता, सर्वांकडूनच काम अक्षरशः 'चोपून' घेता, त्या जातीच्या जमादाराला बंदिवान 'दंडा-वाला' म्हणतात. 'आगे काम पीछे राम!' हें त्या जातीच्या जमादाराचे ब्रीद असतें. म्हणजे काम 'चोपून' घेण्यात दयामायेचा धार्मिक प्रश्नच त्याच्यापुढे नसतो. सगळा रोख 'ठोक' आणि व्यवहार! अट्टल आणि निर्ढावलेले दंडिनही अशा जमादारा-पुढे गोगलगाय होतात. ह्या 'दंडेवाल्या' जातीचे जमादार हे स्वतःच कोणीतरी अट्टल दरोडेखोर किंवा अट्टल बगातील पूर्वाश्रमीचे बंदिवान असून आता बंदि-वानावर बढती मिळून दुय्यम अधिकारी झालेले असतात.

ऐकेका पायात कमरेपासून घोट्यापर्यंत आलेल्या साखळदंडाशी जखडलेले असे ते दोनशे बंदिवान त्या पहाटेस त्या पटांगणात तरी 'गिनती' होऊन उभे राहिले. दंडेवाले जमादार येताच 'बैठो' म्हणून आज्ञा सुटली. साखळदंडाची ऐकदम खळखळ होऊन ते बंदिवान ओळीने मटकन खाली बसले. त्यांच्या कटोऱ्यात लपसीची कांजी वाढण्यात आली. ठराविक वेळ जाताच 'उठो' ची गर्जना झाली. कांजी कोणी खाल्ली वा कोणाचं खाणे होत आहे हें विचारात न घेता सगळ्यांना ऐकदम उठणेच भाग! लगोलग ती दोनशे बंदींची टोळी दुहेरी ओळीने रानाच्या वाटेला लागली. हाती वेताच्या छड्या परजणारे वॉर्डर आणि दंडे परज-णारे हवालदार, जमादार त्या ओळीच्या दोन्ही बाजूंनी दहा-दहा बंदिवानांच्या अंतराअंतरावर चालत होते. जंगलातील लाकूडतोडीचे काम सगळ्या कामांत धोक्याचं. ऐखादा वेळी ऐखादा साहसी बंदिवान जंगलात नाहीसा होऊन पळून जाण्याला सोडीत नाही. ह्यासाठी ऐखादा बंदूकवाला शिपाई ह्या टोळ्यांसह नेहमीच दिलेला असे, की कोणी पळूच लागला तर बेधडक गोळी घालावी. त्यातही आज तर जंगलाच्या अगदीच निबिड आणि हिंस्र जनावरांचे भय पदोपदी असलेल्या भागात घुसायचं होतं. ह्यासाठी तीन बंदूकवाले सैनिकही त्या साऱ्यांमागून त्यांची पाठ राखीत आणि मधून मधून त्या साऱ्यांना 'चलो! जल्दी चलो और जल्दी!' असं ओरडून हुसकीत येत होते.

पाऊस मी म्हणत होता! जंगलीभागामध्ये वर्षातील दहा महिने तरी अद-मानात पाऊस सारखा पडत असतो. बंदिवान लोकांपाशी कपड्याची ऐकेकच जाडी

असते – चड्डी आणि कुडता ती तरी परत चाळीत आल्यावर कोरडी घालायला मिळावी म्हणून ते तीही चाळीतच ठेवून रानतोडाअीला जात. अेक लंगोटी तेवढी अंगावर अंगे दिवसभर भिजून चिंब !

रान येताच त्या टोळीच्या ठराविक तुकड्या पाडून लाकूड तोडाअी-फोडाअी-तासाअीला आरंभ झाला अर्धा मैल लांबीच्या अरण्याच्या टापूत जिकडे तिकडे आरोळ्यांचा आणि कामाचा नुसता धुमधडाका अुडाला. काल करवतीने कापीत आणलेल्या अजस्र फाद्यावर करवतीने शेवटचा कापणे चालून त्या, कडकडकड करीत खाली कोसळत असता 'भागो, बचाओ !' म्हणून ओरड अुठू लागली. मोठमोठे सोट दहापाच जणांच्या डोक्यावर चढवून वखारींकडे साठवायला नेण्यात येअू लागले मधूनच कोणी झाडावरून पडत होते. कोणाला विषारी जंतु चावून अेकच शोष अुठत होती वॉर्डर बंदिवानांना आणि जमादार हवालदार वॉर्डरांना शिव्या हासडीत होते जरा कोणी पडला, थकला, थांबला की वेताची छडी त्याच्या अंगावर सपासप अुडत होती मध्येच अेखादा अुमट वा अंगचुकारू दंडित बिथरल्या वा नेहमीच्या सवयीने काम नाकारून शिरजोरपणा करू लागला, तर तीनचार वॉर्डरांना त्याच्यावर घालून दंडुक्याखाली तो दणादण पिटविला जात होता कारण आज नेहमीच्या चालचलाअू जमादाराचे राज्य नसून, 'भय्या आज तो 'दंडेवाले जमादारका राज है !'

दुपारी बारा वाजेतो त्या बंदिवानांची हाडे कुऱ्हाडी आणि करवती चालविता चालविता खिळखिळी झाली बारा वाजले हे देखील घंटा झाली म्हणूनच समजले. कारण सकाळी जसा तसाच मध्यान्हीही ह्या रानाच्या दाट झाडीत आणि सदा आभाळलेल्या आणि गळणाऱ्या वातावरणात स्वच्छ अुजेड असा पडलेलाच नसे. घंटा होताच साऱ्या तुकड्या धावत पळत वखारीपुढे आल्या पुन्हा 'अेक दोन-तीन' दोनशे बंदिवानांची गिणती करून घेतली त्यांची संख्या सकाळच्या वेळी होती तितकीच भरली – पण स्थिति किती पालटली होती ! कोणी पायात विषारी काटे खोल रुतल्याने लंगडत होते, कोणी लाकडाखाली सापडल्याने वा वॉर्डर जमादाराच्या माराने रक्तात भिजेतो घायाळ झाले होते, बहुतेकांनी दलदलीतला चिखल आपल्या साऱ्या अंगभर थापलेला होता – तो पावसाने धुतला की पुन्हा अंगाला लडबडून घ्यावा कारण की, ह्या रानात साचलेल्या पालापाचोळ्याच्या ढिगात ज्या जळवाच जळवा असत, त्या खालून अंगावर चढत आणि वरून लक्षावधि डास, गांधिलमाशा प्रभृति विषारी प्राणी अंगाला नुसती आग लावून देत चिखलाची पुटेची पुटे त्या बंदिवानांनी अंगाला फासली होती, तरी देखील जळवा जेथे बिलगल्या तेथून अुठता अुठता पुरे व्हावे आणि कातड्याच्या त्या त्या दंशातून रक्ताच्या बारीक धारा त्यांच्या चिखलाने माखलेल्या अंगावर लाल आणि लाल फेसासारख्या

जेथे तेथे दिसाव्या ! खाजव सारखी लागे, पण खाजवायला सवड नाही ! आग सारखी होअी, पण फुंकर घालायला फुरसत नाही ! ततावून, दमून, थकून गेलेले ते चिखलात आणि रक्तात लडबडलेले बंदिवान त्या वेळी स्वतःला किती दयार्ह आणि अन्यायाने गांजलेले समजत होते ! त्यांना सक्तकष्टाच्या चरकात असे पिळून काढणाऱ्या दंडपद्धतीला आणि त्या दंडेवाल्या जमादाराला किती दुष्ट समजत होते, किती शाप देत होते ! पण ह्या दंडाला ते वेळी का पडले, त्यांनी दुसऱ्याच्या केलेल्या कोणकोणत्या छळाचे प्रायश्चित्त ते भोगीत होते, त्याचा पश्चात्ताप म्हणाल, तर शेकडा अेखाद्याच्याच मनाला झाला असेल ! अिनकेच नाही पण त्यांच्यापैकी बहुतेक जण ती दंडेवाली जमादारी जर त्यांना मिळती, तर ती नाकारणार नव्हते — कित्येक तर सवाअी दंडेवालेही झाले असते !

बाराची घंटा होताच जेवण यायचे. भुकेने व्याकुळलेले ते सारे दंडित झाडा-झुडपाआड त्यातल्या त्यात बसता येअील तसे बसले. जाड्याभरड्या चपात्यांची रास बघताच मी ती अेकटाच खाअून टाकू की काय, असे ज्याला त्याला होअून गेले. दोन-दोन चपात्या आणि पालेभाजीचा अेकेक लगदा त्याच्या हातावर टाकण्यात आला. सरकारअीच्या टाळताना अशा घातलेल्या दिवशी थाळी देखील घेण्याची सोय नसते. अेका हाताची थाळी करून त्यावर चपात्या आणि भाजीचा लगदा घ्यावा, दुसऱ्या हाताने खावे ! वरून पाणी ! खाताखाता चपात्यांची मळू कणीक व्हावी, भाजी वाहू लागावी !

नवशिके नव्हते त्या पुढच्या जंगलात घुसून घाट पाडण्यासाठी जी पुरस्सराची (Pioneer) टोळी कटकच्या हाताखाली गेली तीतच रफिअुद्दिनही होता कुऱ्हाडी घेतल्या पिळदार आडव्यातिडव्या फांद्या खुडुप काटेरी जाळ्या तोडून अजस्र दगडधोंडे अुचलून वा खड्यात भर घालून भक्कम अशा मैलाची चालचलाअू वाट त्यांना त्या दोन-तीन तासात मोकळी केली होती कवळ्यात मावणार नाही असा अेक नाडा अजगर स्वतः रफिअुद्दिनने कुऱ्हाडीने डोके तोडून पाडला होता त्या अजस्र प्राण्याचे ते भयप्रद धूड खांद्यावर टाकून आणि अगामावता गुंडाळून तो जमादारा-पुढे नाचत होता तीन दिवसाचे काम तीन तासात करवून घेतल्यामुळे जमादारा सुद्धा सारे अधिकारी कटकवरही प्रसन्न झाले कटक नरा बाबू होता तरी होता मूळचा बंदीच त्यामुळे त्या घोर आणि घनदाट रानात सकाळीच जव्हा तो पाच सहा निवडक बंदी घेअून गेला तेव्हा त्याच्यासह आणि विशेषतः त्याचे सोबती रफिअुद्दिनसारखा पूर्वी पळालेला बंदी असल्यामुळे त्या सर्वावर पहारा देण्यासाठी अेक बंदूकवाला सैनिकही दिलेलाच होता त्यातही त्या रानाच्या अेका नव्या तुकड्यात प्रथमच सरकारी रिघाव होणारा असल्याने जावयाच्या अुपद्रवाचाही भीति होतीच परंतु आता अशा मैलभरात रिघाव होअून त्या रानात चलाअू वाटही निर्विरोध पाडली गेल्यामुळे जावयाच्या अुपद्रवाची ती भीति खोटी ठरली होती आणि राखण्याचा जोर त्या प्रमाणात कमी पडला होता

जेवणाचा सुटी संपल्यावर आता पूर्वीच्या बेताप्रमाणे कटकचे काम या दिवसापुरते म्हणजे अितकेच अुरले होते की घाट पाडलेल्या अशा मैलाच्या त्या टप्प्यात दुतर्फा त्या वाटेच्या बाजूचे जे जे अुपयुक्त वृक्ष येतील त्यावर साधतील तसे डावरीने खुणा घालायचे आणि संध्याकाळी पाचाच्या आत परतायचे त्यासाठी रफिअुद्दिनसह चारपाच बंदी सोबती घेअून कटकबाबू परत त्या जंगलात त्या पाडलेल्या वाटेने घुसला त्याच्या आगंभाग पहारा देण्यासाठी आणि रक्षणासाठी तो बंदूकवाला सशस्त्र सैनिकही गेला वाटेच्या दोन्ही बंदिवान लाकड तोडण्या फोडण्याचे काम सकाळच्या त्या स्थळी करू लागले अुरलेले बंदूकवाले सैनिक त्यांच्या

असा अंधेर आणि पाऊस पाहून पांच वाजेतों न थांबता 'चारलाच परतावें' असें कंटक सैनिक पहारेवाल्याला म्हणाला. तो तर अेका पायावर सिद्धच होता. बंदूक सारखी खांद्यावर ठेवण्याच्या कष्टानें, जगलतोडाअीच्या कष्टाने ते बंदिवान नसतील अितका तो त्रासून गेला होता. ह्या वेळीं सोबतच्या दोघातिघा बंदिवानांना खुणा केलेल्या झाडांवर क्रमांक घालण्याचें काम सोपवून कंटक आणि सैनिक त्या नव्या वाटेच्या पलीकडच्या टोकापर्यंत जंगलात घुसले होते. रफिअुद्दिन त्याच्याहीं पुढे काही अंतरावर असलेल्या खाडीच्या अेका फाट्याशीं पोचला होता. समुद्र पुष्कळ दूर होता, त्याची खाडीही झाडांच्या आड लपलेली होती. परंतु तिचा अेक अरुंद पण खोल फाटा लांबवर जंगलात घुसून तेथे संपला होता. त्या फाट्यामुळे तेथे थोडें मोकळें स्थळ सापडलें होते. कंटक त्या सैनिकाशी परतण्याचा बेत करीत असताच पुढे त्या फाट्याशीं पोचलेल्या रफिअुद्दिनने कंटकबाबूला दबती हाक मारली. कंटक झपाझप पुढे येअू लागला, तोंच त्याचा हात धरून त्यासह अेका भिंताडासारख्या झाडाच्या बुंध्याआड अुभे राहून रफिअुद्दिन सभयी स्वरात म्हणाला,

'बाबूजी, वो देखो!— ती गिधाडं, घारी नि ते कावळे ह्या खाडीच्या फाट्याच्या काठानें मरून पडले आहेत ते! हें चिन्ह ठीक नाही!'

'का रे बाबा? मघा त्या जिवंत नि अजस्र अजगराला भ्याला नाहींस नि ह्या मेलेल्या पांखरांना पाहून पांढरा फिकट पडतोस!' तेथे तितक्यात तो बंदूकवाला सैनिकहीं आला होता, त्याच्याकडे पाहून कंटक हसला.

'देखो, मरे चिडियाको रफिअुद्दिन डरते है! भुतंखेतं ज्या पक्ष्यांची रूपं घेअून भटकतात असं जंगली लोक समजतात, तेच हे पक्षी आहेत असं ह्याला वाटत असावसं दिसतं!'

'नहीं बाबूजी, नहीं! यह चेष्टा की बात नहीं! देखो, ह्या रानटी लोकात मी, पूर्वी पळून गेलो त्याच वेळी फार घाबरलेलो आहे. ह्यांना जर कुणावर गुप्त छापा घालून मारायचं असलं, तर हे लोक त्या आजूबाजूचे घारी, गिधाडं, कावळे मारून टाकतात. कारण त्यांची अशी समज असते की, पक्षी हे त्याच्या हालचालीची बातमी अुडत अुडत जाअून शत्रूंना कळवतात! ज्या अर्थी हे नेहमीचे खाद्य नसणारे पक्षी इथे आजच मारल्यामारखे पडलेले दिसताहेत त्या अर्थी —'

त्यासरशी सगळ्यात कोणी घाबरला असेल तर तो त्याच्या रक्षणाला आलेला गुरेखरी – तो बंदूकवाला सैनिक !

'अरे बापरे ! मग आता आम्ही काय करावं ? सांग बाबा अेकदाच ! ल, बंदूक झाडू का ही मी पण ?'

'नको, नको ! ' कटकने त्याला रोखलं, 'नुसत्या झाडपाल्यात बार काय ामाचा ? अुलट आपण अिथं आहोत हे माहीत नसल्यास तं कळून जावरे ह्या ाडात घुसून आम्हालाही गाठतील ! मला वाटतं आपण आता धीर न सोडता ासच ह्या वाटेनं परतून मुख्य टोळीला जाअून मिळावं '

सनिकाला तेंच हवं होतं त्यानं मनात म्हटलं,

'कुणी जावरे चालून आलेच तर ह्या दलदलीच्या बाजूनेच येणार परततांना ापली पाठ अिकडेच असणार तेव्हा ह्या वर्दीच्या पुढं आपण चलावं म्हणजे ातल्या त्यात आपल्या जिवाला धोका थोडा जावऱ्यांचे दलदलीकडून येणारे ाण प्रथम ह्यांच्याच कुणाच्या तरी पाठीत रुतून पडतील आपण पुढच्या पुढं नसटून ठोंबाबा सुवालया !' मनात अशा धास्ती खाअून पण वरवर अुलटा धैर्याचा ाव आणून सैनिक म्हणाला,

'हं ! चला सगळे ! भिता रे काय असं ? हा मी तुमच्या पुढे चार पावलं चालतो बघा ! जावरे तं काय ! त्यांनी ही पाखरं जशी पटापट पाडली, तशी ही माझी बंदूक त्यांना टपटप खाली पाडील चलाव !

सैनिक पुढे वाट चालू लागला सुद्धा, कटक आणि रफिअुद्दिन त्याच्यामागून पण त्या सैनिकाने घतलेल्या त्या पुढाकारा तील बिंग रफिअुद्दिनच्या आणि कटकच्याही ध्यानात असल्यामुळे कटकनं त्या सनिकाच्या त्या अुसन्या अवसानाची वाटणारी गमत नुसते डोळे मिचकावून रफिअुद्दिनला व्यक्तविली, पण रफिअुद्दिनला त्या धाक्याच्या आणि धादलीच्या वेळीही चप्टेवाचून चैन पडलं नाही तो त्या ओबडधोबड आणि काटेरी वाटेनं थपझप चालतां चालतांच कुचष्टेनं बोलला,

'कितीदा ? ते शेवटपर्यंत कधीच येत नाहीत ! आहेतच मुळी मूठभर विचारे ! त्यांचे येणे म्हणजे पाचपन्नास धनुर्धर ! झाडीतून दबून, पाचपन्नास विषारी बाण अकस्मात् हाणून, दहा वीस मुडदे पाडून पळून जाणे, ही त्यांची लढाई ! झाडी घनदाट, अंधारी, बेवाट ! बंदूकवाल्यांचे सैन्य देखील कुचकामाचे ठरते त्यांचा पाठलाग करायला त्या गोष्टीमुळेच ते अद्याप ह्या रानचे राजे आहेत इंग्रजांना त्यांचा पिच्छा पुरवायचा तर पुरवता येईल , पण इतकी प्राणहानि आणि व्यय करण्यासारखे ह्या कदाचित् एका अरण्यमय वसाहतीत युद्ध पुकारून मिळणार आहे काय इंग्रजाला ! म्हणून आडवे येतील तेव्हा नि तितकेच कापीत इंग्रज चालढकलीवारी नेतो ह आता ही विमान का कायसे जे निघत आहे म्हणतात ना, तसे साधन निघाले तर मात्र आकाशातून टेहळणी करून जावऱ्यांची ठाणी अचूकपणे शोधून काढायला नि नेमक्या त्यांचेवर भयंकर स्फोटगोळे वरून फेकून जावऱ्यांचा सत्यानाश करायला इंग्रजाला एक आठवडाही लागणार नाही ! पण ती पुढची गोष्ट आज तरी जावर आलेच असतील छापा घालायला तर मागे इंग्रजांशी माझ्यासमक्ष झालेल्या अशाच एका झटापटीप्रमाणे ते पन्नासाच्या आत-बाहेर असतील नसतील टाळीवर बाणांचा मारा करून ते निसटून गेले असतील दुसऱ्या रानात ! '

'तसेच संभव असेल, तर मग इथे कुठे उंदरासारखे बिळात बसलो आहोत आपण ? चल, बाहेर पडू अजून पाऊलवाट दिसत आहे जवळ बंदूक आहे, टाळीकडे चल टोळीतील आपले लोक इकडेच येत असतील तर गाठ जवळच पडेल ते पण काय संकटात आहेत आहेत की गेले, गेले असले तरी जवळपासच गाठता येईल अजून सहा वाजले नाहीत घटीच्या वेळी चाळीत

ते दोघे हत्यारबंद होऊन हळूच झाडीबाहेर पडले टेहळीत वाटेच्या आरंभापर्यंत आले पाहतात तो सारा शुकशुकाट !

कारण चारपाच बाजण्याच्या मध्यंतरी जेव्हा त्या टोळीतील बंदिवानावर दाट झाडीतून द्रहापधरा जावयांनी निरनिराळ्या तीनचार ठिकाणावरून विषारी, बाणाचा अकस्मात् मारा केला, तेव्हा त्या बंदिवानापैकी दहाबारा बंदिवान घायाळ होऊन पडलेले पाहताच त्या टोळीत एकच धावपळ झालेली होती बंदूकवाले दोघेजण जे होते त्यानी बंदुका झाडल्या पण त्या गोळ्या आणि छरे त्या दाट झाडीच्या पाल्यापाचोळ्यात कोठ तरी गडप झाले ! अशा पराम बंदुकाचा मारा केला, तरी अरण्यात दबा धरून शरसंधान करणाऱ्याचा केसही वाकडा होणारा नव्हता- संध्याकाळची वेळ ती, अंधेरात आणि पावसात त्या पुढे रानी घुसून पाठलाग करण्याची त्या वाजारखुणग्यात कोणाची माय व्याली होती ? आणि त्या बंदिवान लोकांचे अडले तरी काय हात नसता जीव धोक्यात घालायचे ? मरो तो इंग्रज आणि ते जावरे ! जमादारासुद्धा जो तो जीव घेऊन तेथून शक्य तितके लवकर निसटायच बसे, ह्या मार्गाला लागून वटवसह गेलेल्या आणि वाटेच्या अर्ध्यामुर्ध्या भागात झाडावर क्रमाक घालीत असलेल्या चारपाच बंदिवानानी टोळीत हाहाकाराची अठलेली आरोळी ऐकताच धूम ठोकून परत पावली तळ गाठला होता कटकविटक जे कोणी वाटेच्या पलीकडच्या टोकाला अडकले होते, ते जिवंत की मेले, त्याची विचारपूस सुद्धा करण्याचे भान कोणाला उरले नाही बंदूकवाले सैनिक काय जमादार काय, पाय पुढे न टाकता सकटघटा घणाणवून जमले ते बंदिवान धरून घायाळाना ह्याच्या त्याच्या खांद्यावर चढवून माघारे चाळीकडे निघाले जावयांनी त्याच्या पळत्या पाठीवरही आणखी चारपाच बाण फेकताच

अेकदम थांबून, बंदूक भुंईवर टेकून हवाल्दारजींनी काडतुसाची पटा-काटली ते थांबताच रफिअुद्दिन आणि कटकही थोडा थबकला त्यांना दटाअून हवालदारजी आज्ञापित झाले,

'क्या गवार हो! चालू लागा की भपाभप! बंदुकीत काडतुस भरून पट्टा बांधून हा आलोच मी! भिता काय अेकटे चालायला अस?'

ती वेळ खरोखरीच अेक पळभरही रेंगाळण्याची नव्हती हे कटक जाणून होता चेष्टेवारी जिवावर बेतायची, तेव्हा नुसत अुपहसण्यानं जितकी गमत अुप-भोगता यअील तितकीच अुपभोगून कटक पुढे निघाला त्याच्याच सांगाता रफिअुद्दिन थोड्या अंतरावर ते पुढे गेलेसे पाहून काडतुस भरलेली आपली बंदूक पुन्हा खांद्या वर टाकीत हवाल्दारजीही आता त्यांच्यामागे चालू लागले जावरे वाटेत आलेच तर पुढून येणार त्यांच्या तीरांपुढे ह्या बंदिवानांच्या छातीची ढाल, तीमागे आपण, त्यातल्या त्यात जीव वचावण्याचा असा शक्य तो व्यूह रचला गेलेला पाहून हवाल दारानाही बरेच हायसे वाटले

दोन अडीचशे यार्ड त्या दुर्गम पाअूलवाटेने त्या निबिड अंधेऱ्या आणि पाअूस टपकत्या अरण्यातून ते तिघे त्या मुख्य टोळीकडे जाण्यासाठी परतले असतील नसतील, तोच

दलदलीच्या काठच्या निबिड झाडीमधल्या अेका अुंच झाडावरून ती सारी हालचाल मघापासून टेहळीत असणारे दोन रानटी जावरे खाली अुतरले झाडातून सापागारखे सळसळत त्यांच्या पाठीमागून आले आणि तीर अचूक मारण्याअितके अुरात आणि सोय सापडताच त्यांनी आपल्या धनुष्यांच्या ताणून दहापाच बाण त्या माग असणाऱ्या बंदूकवाल्या हवाल्दाराच्या पाठीवरच सणसणत सोडले!

बापरे! मेलो! जावरे! मेला! असे अकस्मात् किंचाळून तो सैनिक बंदुकासुद्धा ताडावरचा ताडावर पडला पाठीमागे वळून बघायला सुद्धा त्याला अवकाश मिळाला नाही अचानक त्याच्या पाठीत दोन विषारी बाण जे घुसले ते कण्याच्या बाजूने थेट पोटात जाअून रुतले त्याच्या पाठीवर रुतून राहिलेल्या त्या बाणाच्या टोकावरील पिसे अुडत्या पाखरांगारखी थरथर करीत होती अितका आवेग आणि त्वेष त्यात भरला होता

द्रच आले नाहीत. उभे आत घुमणेही दुरापास्त, तेथे सापासारखे त्या भिजट खलातून जवळजवळ सरपटत जावेल तितके झाडीच्या आत शिरत चालले. च्या हातातल्या कुऱ्हाडी मात्र त्यांनी सोडल्या नाहीत. पाचअेक मिनिटें त्याच्या नात आणि हृदयात चिंता आणि धडधड ह्यावाचून दुसरी कशाची जाणीवच व्हती. मग कटकला अेकदम सुचले की, सैनिक जो पडला त्याच्या हाती भरलेली दूक आणि कटीला काडतुसे तशीच आहेत. जर जावयाच्या हाती तीं पडतील र मोठाच अनर्थ कोसळेल.

' जावऱ्याना बंदुकीची तितकीशी हौस नसते,' रफिअुद्दिन म्हणाला, ' आणि ाता झाडीबाहेर पडण्यात जिवावरच बेतायचा संभव ! '

' पण बंदूक तशीच सोडून देण्यात तर तो संभव अधिकच भयंकर ! न जाणो ा नेतीलही ती ! त्यातल्या त्यात बंदूक आपल्या हाती असण्यातच, अधिक बळकटी, ुरक्षितता ! ' असा आग्रहाने कटक छपत, दपत पुन्हा झाडीच्या तोंडाशी आला. ेकडे तिकडे मागमूस पाहून झपकन् पुढे झाला. बंदूक, काडतुसें, शिकारी चाकू, ंजीर काढून घेतले सैनिकाच्या तोंडातून रक्ताच्या गुळण्या चाललेल्या होत्या, या रक्तात त्याचे प्रेत लडबडून गेले होते.

' गेला बिचारा ! ' असे नि:श्वसून कटक त्या झुडपामागे पुन्हा घालीत

'कितीसे ? ते शेकड्याने कधीच येत नाहीत ! आहेतच मुळी मूठभर बिचारे ! त्याच येणं म्हणजे पाचपन्नास धनुर्धर ! झाडीतून दबून, पाचपन्नास विषारी बाण अकस्मात् हाणून, दहा वीस मुडदे पाडून पळून जाणं, ही त्यांची लढाई ! झाडी घनदाट, अंधारी, बेवाट ! बंदूकवाल्यांच सैन्य देखील कुचकामाच ठरत त्यांचा पाठलाग करायला त्या सोयीमुळेच ते अद्याप ह्या रानचे राजे आहेत अिंग्रजांना त्यांचा पिच्छाच पुरवायचा तर पुरवता येअील , पण अितकी प्राणहानि, त्रास नि व्यय करण्यासारख ह्या यःकश्चित् अेका अरण्यमय वसाहतीत युद्ध पुकारून मिळणार आहे काय अिंग्रजाला ! म्हणून आडवे येतील तेव्हा नि तितकेच कापीत अिंग्रज चालढकलीवारी नेतो हं, आता हीं विमान का कायस जें निघत आहे म्हणतात ना, तस साधन निघाल तर मात्र आकाशातून टेहळणी करून जावऱ्यांचीं ठाणी अचूकपणे शोधून काढायला नि नेऽसव्वाशे मयवर स्फोटगोळे वरून फेकून जावऱ्यांचा सत्यानाश करायला अिंग्रजाला अेक आठवडाही लागणार नाही ! पण ती पुढची गोष्ट आज तरी जावरे आलेच असतील छापा घालायला, तर मागे अिंग्रजाशी माझ्यासमक्ष झालेल्या अशाच अेका झटापटीप्रमाणे ते पन्नासाच्या आत-बाहेर असतील नसतील टोळीवर बाणांचा मारा करून ते निसटून गेले असतील दुसऱ्या रानात ! '

'तसाच संभव असल, तर मग अिथे कुठे अुंदरासारखे बिळात बसलो आहोत आपण ? चल, बाहेर पडू अजून पाअूलवाट दिसत आहे, जवळ बंदूक आहे, टोळीकडे चल टोळींतील आपले लोक अिकडच येत असतील तर गाठ जवळच पडेल त पण काय संकटात आहेत, आहेत की गेले गेले असले तरी जवळपासच गाठता यअील अजून सहा वाजले नाहीत घटीच्या वळी चाळीस '

ते दोघे हत्यारबंद होऊन हळूच झाडीबाहेर पडले. टेहळीत वाटेच्या आरंभा-पर्यंत आले. पाहतात तों सारा शुकशुकाट !

कारण चारपांच वाजण्याच्या मध्यंतरी जेव्हा त्या टोळीतील बंदिवानावर दाट झाडीतून दहापंधरा जावऱ्यांनी निरनिराळ्या तीनचार ठिकाणांवरून विषारी, बाणांचा अकस्मात् मारा केला, तेव्हा त्या बंदिवानांपैकी दहाबारा बंदिवान घायाळ होऊन पडलेले पाहताच त्या टोळीत अेकच धावपळ झालेली होती. बंदूकवाले दोघे-जण जे होते त्यांनी बंदुका झाडल्या, पण त्या गोळ्या आणि छरे त्या दाट झाडीच्या पाल्यापाचोळ्यात कोठें तरी गडप झाले ! अशा पन्नास बंदुकांचा मारा केला, तरी अरण्यात दबा धरून शरसंधान करणाऱ्यांचा केसही वाकडा होणारा नव्हता-सध्याकाळची वेळ ती, अंधेरात आणि पावसात त्या पुढे रानी घुसून चाल कर-ण्याची त्या बाजारबुणग्यात कोणाची माय व्याली होती ? आणि त्या बंदिवान लोकांचे अडले तरी काय होतें नसता जीव धोक्यात घालायचे ? मरो तो अिंग्रज आणि ते जावरे ! जमादारासुद्धा जो तो जीव घेऊन तेथून शक्य तितके लवकर निसटायचें कसें, ह्या मार्गाला लागला. कंटकसह गेलेल्या आणि वाटेच्या अर्ध्या-मुर्ध्या भागात झाडावर क्रमाक घालीत असलेल्या चारपांच बंदिवानांनी टोळीत हाहाकाराची अुठलेली आरोळी अैकताच धूम ठोकून परत पावली तळ गाठला होता. कंटकांविटक जे कोणी वाटेच्या पलीकडच्या टोकाला अडकले होते, ते जिवंत की मेले, त्याची विचारपूस सुद्धा करण्याचें भान कोणाला अुरले नाही. बंदूकवाले

चोरटा प्रवेश केल्याविषयी त्यांनी अिंग्रजांच्या लोकांपैकी पाचपन्नासांत जणांना घायाळ करून जरी सूड अुगवला होता, तरी जावरेही जाणून होते की, अिंग्रजही परत सुडासाठी दोनतीन दिवसांच्या आत सशस्त्र सैन्याची तुकडी घेअून त्या रानात घुसल्यावाचून राहणार नाही ! क्वचित् ते अुद्याच्या अुद्याही यतील ! कारण अिंग्रजांचा अेक बंदुकवाला सैनिक त्यांनी ठारच केला होता त्याच्या आणि तशा चुकलेल्या बंदिवानांच्या शोधार्थ अिंग्रजांचे लोक जर अुद्याच्या अुद्या आले तर ? ठाणे मांडून ठराविक रणांवर सामना असा जावरे तो काय देणार ? तो त्यांचा रणसंप्रदायच नव्हे भुतासारखा त्यांचा संचार, अदृश्यता त्यांचे अस्त्र आणि बळ अिंग्रज त्यांना शोधील तेथे ते हटकून सापडणार नाहीत, न शोधील तेथूनच ते हटकून छापा घालणार ! म्हणूनच त्यांनी त्या रानाकडे पुन्हा ढुंकूनही बघायचे नाही, असे ठरवून दुसऱ्याच अरण्यातून अिंग्रजांच्या लोकांवर म्हणजेच सक्त कामगिरी वा स्वतंत्र गावकरी बंदिवानांवर पुढचा छापा घालायाचा बेत ठरवूनही टाकलेला होता

अशा दोनतीन बंदिवानांच्या टोळींपैकी किंवा जावऱ्यांपैकी कोणीही त्या वाटच्या पुढील वा मागील रानात कुठले नसल्यामुळे बटक आणि रफिअुद्दिन हे दोघे तेथे येताच त्यांना सबंध शुकशुकाट दिसला

तशा शुकशुकाटात, तशा जिवावरच्या बनलेल्या प्रसंगात आणि त्या घोर अरण्याच्या काळोखाकभिन होत चाललेल्या जबड्यात स्वतःला सापडलेले पाहताच कोण्या दिङ्मूढ भीतीने त्या दोघांचेही मन चरकले आणि दोघांच्याही मनांना आता नवनव्या भीषण संकटात न पडता सरळपणे सरकारी चाळींकडे जाअून आपल्या बंदिवान बंधूंना आणि अधिकाऱ्यांना भेटण्याकडे होअू लागली

• पण दोघांच्याही मनात पळून जाण्याची शिणक, पोटात कळ अुठावी तशी, सारखी अुठत होती—चैन पडू देईना

रफिअुद्दिनने मधा कटकला जेव्हा स्पष्टपणे सुचवले की, 'काळ्या पाण्याच्या बंदिगृहाला फाडून पळायचे तर त्याची हीच संधि खरी !' तेव्हा त्याच्याही आधी कटकच्या मनात तीच धाडसी कल्पना आली होती ! पण त्या कल्पनेच्या मागोमाग त्याला आठवले की

अरे पळायचे खरे पण मला अेकट्याला नव्हे ! तर माझ्या मालतीला सोडवून तिच्यासुद्धा निसटायचे आहे जर आता असा अेकटा ह्या अरण्यात, घुसलो तर पुन्हा मालतीला बंदिवान वसाहतीतून सोडवून आणण्याचा मागचा पूलच अुडवून दिल्यासारखे होणार ! अेकदा अरण्यात घुसलो की मग पुन्हा वसाहतीकडे फिरकणेच अशक्य असा अनर्कितपणे आजच संधि येईल ह्याचे स्वप्न सुद्धा पडले नव्हते नाही तर निरा हरप्रयत्नाने सोडवायची काही तरी योजना आधीच ठरवून मग आजची संधि साधली असती !'

लेली असता मी त्यातून सुटून जिवंत झालो तरी मेल्यासारखाच आहे ! ही माझी आजची पळायच्या वाटेतील मुख्य अडचण ! एकदा आता पळालो की पुन्हा तिला सोडवायाचा कट रचणे काय, तिच्याकडे परत भेटायला जायची देखील गोष्ट अशक्य ! ती घाबरेल, माझा बेपत्ता– 'भगोडा' होण्याचीच, ती जीव सुद्धा देईल काळजीने खचून ! '

'याचा हीच अडचण ? तर मी तुम्हाला प्रतिज्ञेवर सांगतो की, तुमच्या बहिणीला बंदिगृहातून सोडवायची गोष्ट आपण स्वतः च बंदिवान होतो, पळालो नव्हतो, त्यापेक्षा पळून गेल्यानंतर, स्वतंत्रपणे बाहेर लागल्यानंतरच अधिक सुसाध्य होणारी आहे आज आम्ही अरण्यातून पळून गेलो म्हणजे पुन्हा ह्या बंदिवान वसाहतीत येताच येणार नाही ही भीति चुकीची मी मागे पळालो ना तेव्हा तीन-चार महिने रात्री उघडपणे राहिलो ह्या जावऱ्यात नि दिवसा गुप्तपणे भटके ह्या वसाहतीत. रफिउद्दिन, हें काम माझं मी तुमची बहीण बंदिगृहातून अलगत उचलून, अरण्यात तुम्ही असाल तिथे तुमच्यापुढे उभी करतो पाहा नर खरी माझी कर्तब गारी ! थोडा मोकळा सुटू द्या जंगलाचा चारा नि वारा ह्या वाघाने एकदा पुन्हा खाल्ला की आलीच ह्याच्या ह्या सध्या गंजलेल्या नखांना पुन्हा ती पूर्वीची वाघेरी धार ! रफिउद्दिनबाबू, तुम्हाला माझा पूर्वीचा पराक्रम माहीत नाही तुमची आमची ओळख म्हणजे माझ्या हाती बेड्या पडल्यानंतर काळ्या पाण्यावर येताना 'महाराजा' बोटीवर झाली तीच ! पण त्या दिवशी जी आशीर्वादाची शपथ आपण घेतली, ती तुम्ही पाळून ह्या कठोर बंदिवासात माझ्यावर अनेक उपकार जे केलेत, ते मी जन्मोजन्मी विसरणार नाही त्याच बोटीवर काळ्या पाण्यावर येताना मी काळ्या पाण्याच्या बेड्या तोडायचं तुम्हाला वचन दिलं होतं आज तें वचन खरं केलं आहे उद्यापरवा पूर्णपणे खरं करून देईन रफिउद्दिनबाबू, बेड्या पडून पिंजऱ्यात कोंडला गेलेला रफिउद्दिनच तेवढा तुम्ही पाहिला आहात, म्हणून तुम्हाला माझी बोलणी बढाईसारखी वाटतील पण जर का पिंजऱ्यात पडायच्या आधीचा माळ्यात असलेला वाघ तुम्ही पाहिला असतात ना बरं, माझ्या कर्तबगारीबरं मी

ेक पटाअीत दरवेशी ! हा बिघडला तर ह्याच बदुकीने अुडवून देअीन ह्याला ाहता पाहता !'

'मग काय ? कटकबाबू, बोला जायच ना पळून ? जन्मठेपेची बेडी तोडून ाकायचीना ह्याच क्षणी ?'

'तोडून टाकायची ना काय विचारतोस ? तोडून टाकलीच आहे की ती आता ! पळून जायची गोष्ट कशाला ? हे पळून आलोच आहोत की जिथे ! ! आता पुढच पाअूल कुठे टाकायच ते बाल'

'भले वीर ! पुढच पाअूल—हिंदुस्थानात ! स्वदेशी !'

कटक हसला

'पण अंधकाराचा नि संकटाचा अेक समुद्रचा समुद्र — हा काळया पाण्याचा समुद्र — आडवा पसरला आहे ह्या पावलाच्या नि स्वदेशाच्या मध्यंतरी ! तो ? '

'तो अुल्लघून !' पोहण्याच्या पवित्र्याचे दोन हात त्या अंधळया वातावरणात आवेशाने मारून रफिअुद्दिन अुत्तरला, 'तो काळया पाण्याचा संकटसमुद्र अुल्लघून स्वदेशी जायच हा निर्धार ! जाअूच जाअू ही निश्चिति !'

✦ ✦ ✦

त्याचा थरकाप होत होता. आपण कोलमडून खाली पडतो की काय, असा धाक वाटत होता. पण झाडाला अधिकच बळकटपणे बिलगून गप्प बसणें हा अेकच मार्ग काय तो त्यांना अुरला होता — मरण ओढवून घेण्याचा आणि मरण टाळण्याचाही!

जसजसे ते पोलिसी कंदिलाचे किरण वरवर होत त्यांच्या जवळ येअू लागले, तसतसा कंटकचा आणि अुद्दिनचा जीव त्यांना सोडून दूर जाअू लागला.

तोंच शेजारच्या दहापांच नारळांच्या शेंड्यांवर फडफडाट झाला. पोलिस चमकून तिकडे धावले आणि अेकाने झटकन् बंदूक झाडली. त्यासरशी घू घू घू करीत काही घुबडे वर अुडून गेलीं आणि अेक घुबड टपकन् खाली पडलें. पोलिस खो खो करून हसले.

अेकाने तें घुबड दुसऱ्याला दाखविलें,

'हा पाहिलात तुमचा चोर! घुबडें फडफडत होती. तुम्हीं हट्ट धरलात, चोर नारळ तोडताहेत! परता आता, चला!'

तो घोळका पुढे जात चालला तसतसा कंटकच्या आणि अुद्दिनच्या जिवात जीव येत चालला. अुद्दिन मनाशीच हसला, जिवावर आल होतं तें घुबडावर गेलं!'

पण पुन्हा जिवावर आणायचें नसेल, तर ते पोलिस आपल्या झोपडींत कंदील मालवून जाअू लागेतों त्या झाडाच्या शेंड्यावरच तटकळत बसणें भाग होतें. तसे ते दोघेही बसले. पण त्या दिवसाचा पूर्वीचा अगाध थकवा आणि आताची निश्चिंतता ह्यांनी त्या दोघानाही गुंगी येअू लागली. शेंड्याला घट्ट कवळून ते डुलक्या घेअू लागले. अर्धाअेक तास झाला तरी पोलिस कंदिलाभोवती विड्या फुंकीत बसलेलेच! कंटक आणि अुद्दिन पुन्हा तिकडे पाहात, पुन्हा डुलक्या घेत, केव्हा काय की गाढ झोपेत सुप्त होअून गेले.

चटका होता, तो समजला त्याने अुलट हळूच अेक टाळी दिली 'तू अुतरलास ? ठीक मी पण हळूच अुतरतो, थाव ! ' अितका सगळा अर्थ त्या टाळीत होता

कटक खाली यताच दोघेही थोडा वेळ दवा धरून गप्प बसले अुत्तररात्र झाली असावी, असं तर्कून मग त्यानी ती बदूक, कुऱ्हाड अित्यादि वस्तु लपविलेल्या ठिकाणातून पुन्हा काढल्या पहाटेच्या आधी परतून कोण्यातरी घोर कान्तारात त्याना गडप झालेच पाहिजे होते ह्यास्तव ते तेथून सडकेकडे निघाले निघताना अुद्दिन पाचोळ्यातून काही अुचलीत आहे असे पाहून कटक कुजबुजला,

'काय रे खटपटतो आहेस अुगीच ? '

'अुगीच ? मघा तोडून पाडलेले ते दोन तीन नारळ काय टाकून द्यायचे अिथे ? '

'किती भुक्कड आहेस ! कुठले दीडदमडीचे नारळ ते ! सोड ! '

दीड दमडीचे ? ह्याच दीड दमडीच्या नारळापायी दोन सबध डोकी छाटली जात होती की मघा आमची ! '

रफिअुद्दिनने अेक-दोन नारळ सापडले ते खाकेत मारले त्या सडकेने आले होत तसच त माघारे त्या नव्या रानवाटेपाशी आले फटफटण्याच्या सधीला ते त्याच वाटेने रानात घुसले वाटेत तो पोलिस जमादार काल जेथे जारव्याच्या तीराने ठार होअून पडलला होता, त्याचे पोलिसी १ कपडे आणि अगावरील आग-पेटचा विड्या सुद्धा सारे पदार्थ त्यानी काढून घेतले जारव्याचा तो तीर तेवढा त्याला तसाच खुपसून राहू दिला नतर त्यानी ती वाट तेथेच सोडली

मग त्या रानाच्या त्या बाजूपासून लाब अशा अेका घनदाट भागाच्या आत घुसण्याचा त्यानी शक्य तितका यत्न केला वाटत अेक रुद आणि खोल खाडी आली तिथ वाळवट ह्या वेळी अुघड सुकलेले आणि पाढरे फटक पाल होत अदमानच्या सिधुतटावर मधून मधून पडणारे कडक अून त्या वेळी पडल होते आणि त्यामळे ते वाळवट त्यावरील रगीबेरगी शिपा आणि पाऱ्री स्वच्छ रेती

सुचवलास, तो मला तेव्हा कितीही भयंकर वाटलेला असो, तो आता तसा वाटत नाही खरा. कारण आता बेत असा अेकच काय तो हाताशी आहे. संपीव ती कारस्थाने उध्यापुरती. मला आता जर खरोखरी काही भयंकर भासत असेल, तर तो तुझा कटाचा बेत नव्हे, पण ही मला लागलेली असह्य भूक ! '

'माझ्याही पोटात भुकेची नुसती आग अुठली आहे ! पण आता अुद्या पहाट अुजाडेतो तरी ती विझवायला अुपाय अुरला नाही !. हां, अेक अुपाय तेवढा आहे हा पोटाची आग शमवायचा ! ' रफिअुद्दिन अंधेरातच हसरे तोंड करून म्हणाला.

'कोणचा तो ? सांग तरी ! ' कटकने विचारलें.

'दुसरा कोणता ! तुम्ही रुचकर पदार्थांची नांव घेत चला. सर्मग पुलाव, पुऱ्या, भजी, गागुती, भाजीचा मसालेदार रस्सा, रसरसलेली जिलबी, त्यांच्या नांवासरशी नि नाव घेताच येणाऱ्या समंग वासासरशी माझ्या तोंडाला जें हें पाणीच पाणी सुटत आहे त्याच्या मान्याने ती पोटातली भुकेची आग काय विझेल ती विझेल ! ' खाअून नाही तर हसून तरी पोटभर घेतलें अुद्दिनने.

'ठीक ! तुझ्यापुरता पोट भरायचा तो अुपाय तू करतो आहेस तोवर माझ्यापुरता दुसरा काही तरी अुपाय मलाही योजला पाहिजे. दिवसभर पावसात भिजून भिजून थिजून गेलो बुवा ! ' असें शारीरिकपणे अुद्गारत कटक अुठला आणि बंदूक घेअून अिकडे तिकडे दोन-तीन येऱ्याझाऱ्या घालीत, हात चोळीत, पाय आपटीत अंगात अूब आणू लागला. तोंच त्याला शेजारी अर्ध्याअेक मैलावर असलेल्या त्या रानाकडेलगतच्या सरकारी नारळबागेची आठवण झाली. तो धरकन् रफिअुद्दिनकडे वळला,

'अूठ ! सैपाक सिद्ध आहे सारा. अमृत प्यायला, मेवामिठाअी खायला चल ! पलीकडच्या नारळबागेत जायचं.

'आणि ? नारळ म्हणजे काही झाड हालवताच तळाशी पडणाऱ्या लिंबोण्यांचा सडा नव्हे ! आणि हाताने नारळ तोडावे अितका, काही मी अूंच नाही ! ' रफिअुद्दिन हसला

त्यासरशी बागेच्या पलीकडच्या बाजूला असलेल्या रखवालदाराच्या झोपडीकडून सूसणण करीत गोफणीच्या दगडाचा मारा होऊं लागला.

दोघांच्याही पोटात धस्स झालं. कटकनें नारळावर चढण्याच्या आधी बंदूक आणि कुऱ्हाड नारळाच्या झावळयांच्या आणि पाचोळयाच्या ढिगाऱ्यात भुईवरच लपवून ठेवली होती. अितकं बरं केलें होतें. पण जर ती हत्यारं आता कोणी दिवे घेऊन शोधायला आले आणि त्यांना सापडली, तर? कटकच्या अेकदा मनात आलं की साहस करून खाली अुतरावें आणि बंदूक झाडावी. पण तशा बारानें सारं रान जागून अुठणार! तेंही मूर्खपणाच! वरच बसावें तर अेखादा दगड सणसणत कानशिलात बसला का सारेंच प्रकरण निकालात निघणार!

अशा दुहेरी भीतीनें ते ठिकच्या ठिकाणीच चूप बसले. पण भूक चूपही बसू देईना. भीतीपेक्षा भुकेनेंच ते कासावीस झाले होते. सरतेशेवटी झाडावर चिकटून बसल्याबसल्याच त्यांनी कोवळे नारळ कापले. सुरीनें सोलले. वरचं जाड झिलक तेथल्या थुक्यातच अडकवलें आणि त्या नहाळयातलं पाणी ते प्याले. मलअीमारखें मधु खावर खालेलें ते ह्या वेळी किती मधुर लागलं म्हणून सांगावं! सोनेरी कळसाच्या राजवाड्याच्या गच्चीवर बसून सोन्याच्या पेल्यातून मद्य पिणाऱ्या राजासारख्या त्यांनीं मिटक्या मारल्या. गोफणीचे दगड मधून मधून सणसणत त्यांच्या बाजूबाजूंना जातच होते. आणि तरीही आणखी अेकेक शहाळं सोलून ते.त

म्हणजे चिखलमातीचा लेप, तो त्यांनी अंगभर लावला, अुन्हात सुकवला आणि मग दगडमातीच्याच साबणाने अंगे घासून घासून त्या खाडीत ते यथेच्छ डुबत राहिले

नंतर त्यांना जी खमंग भूक लागली ती तशा जिवावरच्या श्रमानंतर तसे स्नान केलेल्या बळकट प्रकृतीच्या माणसांनाच कळू शकेल पण तेथे अन्न म्हणजे मृगयेचेच काय ते मिळणार त्यातही वदून अुडवून रान जागे करणे त्यांना अजूनही धोक्याचे वाटत होते पण त्या रानी मिळत काय ती अुदंड रानडुक्कर! आणि अुद्दिन हा त्या रानात मागे पळाला होता तेव्हापासून तो जावन्यासारखाच सर्व प्रकारच्या शिकारी करण्यात पटाअीत झाला होता अर्धअेक तास पळीतून लपतछपत गेल्यावर त्याला अेक शिकार सापडली व हातातील कुऱ्हाडीच्या अेका घावासरशी त्याने तिला जमिनीवर लोळविले नंतर वाळलेल्या वाळवटावरील लाकूडफाटा जमवून जावन्याच्या सूपशास्त्रानुसार ते मांस विधिपूर्वक भाजले आणि अेकौ पानावर ते वाढून घेअून त्यांनी जेवावयाला प्रारंभ केला

आणि तरी देखील ते पक्वान्न अुभ्या जन्मात प्रथमच खाताना कटकला वेडी-वाकडी तोंडे करून बसवस गिळावे लागले सोबतच्या नारळाच्या तुकड्याचे ताडी-लावण होते म्हणूनच अुलटीपर्यंत पाळी आली नाही, तरीही जिभेला ते जितके जड गेले तितके पोटाला मुळीच गेले नाही सारे चट्टामट्टा करण्यानंतर कटकला पोटभर समाधानाची अशी अेक ढेकर आली आणि अशी तरतरी वाटली की बस! ते पाहून अुद्दिन हसला

'बाबूजी दोन-तीन दिवसांच्या आत हा 'जावरी' खुराक तुम्हास अितका मानवणारसे दिसते की माझ्या वाट्याला काही अुरेल का नाही ह्याची मलाच भीति वाटते बी!'

त्यांचे जेवण असे हसतखेळत चालले आहे तो आकाश अंधारल्यासारखे झाले

शिलांचा संघच्या संघ पसरला होता जणू काय हत्तींचा थवाचा थवा सिंधुपुलिना-वर अुतरला आहे !

त्या गुहा दाखवून अुद्दिन म्हणाला,

'देखिये बाबूजी ! बंगल्याशेजारी बंगला कसा लागून गेला आहे ! जैसी की घबअीकी मलबार हिल् ! पाहा आता भाड दिड कोणत्या बंगल्यांत स्वस्त पडत तो !'

त्यांनी गुहांची पाहणी चालविली. पाहता पाहता दोन धिप्पाड शिळा अेक-मेकींना टोकाशी टेकून तंबूसारख्या अुभ्या असलेल्या आणि दोघा मस्त हत्तींनी झुंज खेळताना मदोन्मत्त मस्तकाशी मस्तक रेटून टाकावे तशा पवित्र्यात शोभत असलेल्या, त्यांना आढळल्या. त्या शिळांच्या त्या तंबूसारख्या दर्शनी ठेवणीच्या आत लांबवर तंबूसारखीच अैसपैस पोकळी होती. तिच्यात पुन्हा लहान लहान दोन-तीन गुहा खोल्यांसारख्या भिंतींच्या दोन बाजूंनी पाडलेल्या दिसत होत्या. ते पाहताच अुद्दिनला तेंच स्थान वननिवासास छान वाटले. तो लगेच आत जाअून मधल्या भागात मांडी ठोवून बसला. पण बसला न बसला तोच अेकदम 'घात ! घात !' असे घोगऱ्या आवाजात ओरडून धावत्या धावत्या बाहेर आला.

'काय रे काय झालं काय ?' बंदूक सावरीत बटक जिज्ञासला.

'माणूस म्हणा, भूत म्हणा, पण बटक, अेक हिंडिस प्राणी त्या आतल्या कोपऱ्यातल्या गुहेत दबून बसलेला आहे ! त्याचे डोळे त्याच्या तांडाच्या काळोखात पणतीसारखे मिणमिणत आहेत !' अुद्दिनने भीतिदेखील त्याच्या सवयीप्रमाणे हसून

'आलो, आलो — असे बेंफिकिरपणे उत्तर त्या बिळातून एकाएकी आले. हळू-हळू प्रथम डोके बाहेर काढून नि मग ढुंगणावर घसरत घसरत अेक दुबळा कष्टी जावरा त्या बिळाच्या बाहेर पडला. बाहेर पडताच त्याने अेक पाय पसरून त्याच्या पोटरीकडे बोट दाखवले नि डोळ्यात पाणी आणून तो कण्हू लागला.

पटेल नि अुद्दिन त्या पाथराकडे पहातात तो तेथे कांहीतरी रक्ताळ दुखापत झालेली दिसली. कांही खुणांनी, कांही शब्दांनी अुद्दिनच्या जितके नमके समज ण्यात आले की, काल जावऱ्यांनी जो अिंग्रजी बंदिवानाच्या तुकडीवर छापा घातला त्या वेळी अिंग्रजी दांडग्यांनी केलेल्या अुलट गोळीबारात ही अेक गोळी ह्या जावऱ्याच्या पायाला लागली, व त्याचे सोबतदार जीव घेऊन पळत असता ह्याला पळणे अशक्य झाल्याने हा तथेच टाकला गेला.

रफिअुद्दिन तो वस्तुस्थिति ध्यानात येताच होता अेखादे घबाड अकस्मात् सापडावे तसा आनंदला. पटकन् थोडे बाजूला नेअून तो म्हणाला,

'टाळी द्या बाबूजी आधी! जावऱ्याच्या वस्तीचा आपल्याला आसरा घ्यायचा होता. पण सध्या ते अिंग्रजावर बिघडलेले! आपण अिंग्रजी बंदिवानातले लोक शरण म्हणून गेलो तरी दुरून पाहताच संशयाने जावरे तीरांचा मारा करतील. ही जी मोठी अडचण आपल्या वाटेत होती, ती ह्या जावऱ्याच्या मैत्रीने निभावून नेण्याची संधि आपल्याला मिळेलसे वाटते. जावऱ्याच्या राज्यात बेधडक जायला हा जावरा म्हणजे अेक जिवंत चालत-बोलत प्रमाणपत्रच (परवानाच) मिळाले म्हणायचे आम्हाला! तेंव्हा ह्याची शुश्रूषा आपण चांगली करू या.'

कादरच्याही तो बेत मनाला आला. अंदमानच्या बंदिकारागारात असता प्रथमोपचाराचे नि औषधाचे काम त्याने पुष्कळच केलेले होते. ते वैद्यकीय चाल-चलाअू ज्ञान त्याला आता अुपयोगी पडले.

त्या जावऱ्याला त्यांनी धीर दिला. त्याच्या पोटरीचा सुरीनेच चरचरा तसा फाड करून गोळी काढून टाकली. दुखापतीला धुअून-पुसून कांही वनस्पति लावून पट्टी बांधली. गोळी निघताच असह्य वेदना अुणावून त्या जावऱ्याला जे हायसे वाटू लागले त्याचे अुपकार तो नाना प्रकारच्या खुणांनी आणि शब्दांनी व्यक्तवू लागला.

त्याच स्थली ते तिघही दोन-तीन दिवस तसेच लपून राहिले. रानातील पशु पक्ष्यांची जी काय मृगया बारचार न वाढता करता येअील ती त्यांनी केली. त्या जावऱ्यापासून त्याच्या वस्तीची माहितीही त्यांनी काढली. आपण काळ्या पाण्या वरून कसे पळालो, अिंग्रजांचे आपणही कसे शत्रु झालेलो आहोत आणि जावऱ्याच्या वस्तीलाच कसे शरण जाणार आहोत, हेही त्याला त्यांनी सांगितले. त्या जावऱ्या नही अगदी मनापासून त्यांना आश्वासिले की, त्याला त्यांनी दिलेल्या जीवदानाच्या अुपकाराची फेड करण्यासाठी शक्य ते साहाय्य त्यांना केल्यावाचून जावरे राहणार

नाहीत. कारण जावऱ्यांच्या ज्या जातीतला तो घटक होता, त्या जातीच्या नायका-चाच तो मेहुणा होता आणि अेक विश्वासू नि शूर पाअीकही !

तो जावरा जरा होअीतों तेथेच चोरून लपून राहण्यात त्यांचे जे तीन-चार दिवस गेले, त्या काळात रफिअुद्दिन अगदी निश्चित आनंदात होता, पण कंटक मनातल्या मनात अगदी सचित. रफिअुद्दिनला वाटलें होतें त्यापेक्षाही अगदी सुलभपणे त्याचा पळून जाण्याचा बेत ह्या टप्प्यापर्यंत पार पडला होता. अपेक्षित नव्हत्या अशा कित्येक अनुकूल संधि त्यांच्यापुढे चालून आल्या. तो स्वतः तर असेंच समजे की, आपण काळ्या पाण्यावरून पळालोसुद्धा ! पण कंटकच्या मनाला चिंता सारखी जाळीत होती. त्याच्यापुढे त्याच्याच सुटकेचा प्रश्न नव्हता, तर होता मालतीच्याही सुटकेचा !

तिला कशी सोडवावी ? सोडवली तर तिला येथे ह्या रानात, ह्या गुहेत, ह्या भयाण पेचात किंवा जावऱ्यांच्या वस्तीत ठेवावी कशी, संभाळावी कशी ? रफिअुद्दिनवांचून तर पाअूलही पुढे टाकणे दुर्घट. तो सध्या जरी अत्यंत अेकनिष्ठ दिसत असला, तरी होता मूळचा अेक जातिवंत हिंस्र पशु ! तेव्हा त्यावर किती विश्वासावें ? पुन्हा जरी त्याला कंटक हा किशन आहे ह्याची आता शंकासुद्धा येणे शक्य नव्हतें आणि म्हणूनच कंटकशी मालतीपणाच्या कोणत्याही स्मृतीचा धागादोरा त्याच्या मनात गुंतलेला असणे असंभव होतें आणि जरी कंटकीही वयानें, रूपाने नि काबाडकष्टांमुळे आलेल्या क्षीणतेने हीच मालती असें सांगितलें तरी पाहताच ओळखता येणे कठीण होतें, तरीही न जाणो तिला पाहताच ह्या अुद्दिनने ती मालतीच आहे असे ओळखलें तर? अेखादा भयंकर प्रसंग गुदरणारच नाही कशावरून ! ती तरी ह्याला ओळखणारच ! तेव्हा ह्याची पूर्वीची नीचता किंवा तिचा पूर्वक्रोध भडकून त्या आगीत सर्वांचीच राखरांगोळी होअून जाअील ! ह्या असल्या घनदाट कान्तारातील अेकान्तात ती, मी, आणि हा ! ह्याच्या साहाय्याने मी तिची मुक्तता करणे म्हणजे रावणाचें साहाय्य घेअून रामाने सीतेला सोडविणें होय ! पण ... अुपाय दुसरा असा कोणता ?

अुद्दिनच्या मनात मात्र त्या वेळी प्रतारणेचा भाव लवलेशाही नव्हता त्याची अडचण असली तर ती अेकच होती—पैसा ! जावऱ्याच्या वस्तीत लोकप्रिय व्हाव-याचें तर मद्य हवें आणि पुढे काळ्या पाण्याला रामराम ठोकण्यासाठी नारवे, कपडे, हत्यारे, खाद्य अित्यादि साधने जुळविण्यास पैसा हवा त्याला मार्ग दोनच होते. अेक तर बंदियानाच्या वस्तीत रात्री-बेरात्री पुन्हा शिरून दरोडे घालणे किंवा कंटकवाचूची जी हजार दीडहजाराची ठेव ते देणार होते ती मिळविणे. पूर्वीच त्याचा बेत असा ठरे की, रक्कम कंटकने सागाती घेअूनच बंदिवानांच्या चाळीतून पळावयाचें, पण मध्यंतरी ती जावऱ्यांच्या छाप्याची अनपेक्षित संधि मिळाल्यामुळे ते अचानक रानात घुसले. त्यायोगे अितर सारी संकटें टळली, पण पैसा तेवढा

सांगाती येण्याचे ठुकले तेवढी अडचण ती कटकपुढे मांडी आणि विचारी, ' काय करावं, बोला ! दरोडा घालावा वा तुम्ही ती ठेव काही युक्तीने अजूनही परत मिळवू शकता ? '

कटकने म्हणावें, ' नको नको, दरोडा नको ! आपण होऊन मृत्यूला आव्हानू नये शक्यता ! मी माझी ठेव ह्या ना त्या युक्तीने परत मिळवीन अजून आशा आहे मला दगडाखाली गुतलेला हात अलगत शक्य तो काढण बरं ! नाही तर दाडगाओीन हातच तुटायचा ! '

दोन तीन दिवस असे लोटताच काही अशी राहवेना म्हणून, काही अशी निरुपाय म्हणून कटकने अुद्दिनपाशी आपली बहीण सोडविण्याच्या बेताचा विषय काढला अुलट-सुलट अनेक बेत त्या दोघानी योजून पाहिले नक्की असे काही न ठरताच ते निजावयाला गेले

पण अुद्दिनच्या मनात त्या दिवसभर कटकीला सोडविण्याच्या कल्पना सारख्या चालत असल्यामुळे तिच्यासंबंधीच्या अितर जिज्ञासाही साहजिकपणेच डवचल्या जाअू लागल्या अंथरुणावर पडता-पडताच तो चितू लागला, ' ती कशी दिसत असेल ? सोडवून आणलीच तर तिच्या सगतीत आपलाही वेळ गमतीत जाओील ! कसा असेल तिचा स्वभाव ? आणि जर ती चांगली दिसत असली नि स्वभावाने प्रेमळ असली, तर — ? ' अकस्मात् त्याची लालसा जागून अुठली आणि म्हणाली, ' तर तिला तू नि तुला ती हवीशी वाटणार नाही कशावरून ? बर, कटक तर तिचा सख्खा भाअूच तव्हा तिच्या कामुक अभिलाषात तरी तो प्रतिस्पर्धी होण संभवच नाही फार तर त्याला तिचा माझा प्रेमसंबंध भाअू नि पालक ह्या नात्यान आवडणार नाही, अितकीच भीति पण, पण, पण '

अुद्दिनला अर्वाचिन अेक अुपाय सुचला, ' कटकबाबूचे अुपकार जे आपल्यावर झाले ते फेडण्यासाठी आपण त्याच्या जिवाला जीव देअून त्याना नि त्याच्या ह्या बहिणीला काळ्या पाण्यावरून सोडवून सुरक्षितपणे परतीराला पोहोचविण्यात सेवेची नि प्रामाणिकपणाची अितकी पराकाष्ठा करू या की, त्याच्या बहिणाने आपण होअूनच मला मागणी घालावी नि कटकबाबून ती आमदान पुरवावी ! ' ल्हाडी आशाला असंभव काय वाटणार ?

छाप्यासरशी रान सोडून नि जीव घेऊन सरकारी बंदिवानाची टोळी चाळीत परत गेल्यानंतर दुसऱ्या दिवशी अेक सशस्त्र सैनिकांची तुकडी त्या रानात धाडण्यात आली त्यांना त्या वाटेवर जावऱ्यांच्या तीराने मारलेल्या त्या जमादाराचे प्रेत सापडले तीरही सापडल्यामुळे त्याला जावऱ्यांनीच मारिले हे अुघड होते त्यावरूनच त्याच्या सांगाती असलेले जे दोन बंदिवान, कटव नि अुद्दिन, त्यांनाही अेकटे गाठून जावऱ्यांनी कोठे तरी त्या रानात ठार मारिले असावे, असाच तर्क सरकारी अधिकाऱ्यांनी केला आणि तो खोटा पाडण्यासारखा सबळ पुरावा मिळेतो त्या बंदिवानांचं नाव 'भगोडे' म्हणून घोषिण्याचेही स्थगित करू ह्यामुळे त्या दृष्टीने त्यांचा पाठलाग वा टेहळणी कित्येक दिवस सरकारकडून कोठेही झाली नाही हे कटव्च्या नि अुद्दिनच्या चांगलेच पथ्यावर पडल दरम्यानपर्यंत त्या रानाचा तो नवा भाग मात्र अिंग्रजाने नित्याच्याच वसाहतीत सामावला त्यावर सक्त पाहरा बसविला आणि जावऱ्यांनीही आपले बळावळ ओळखून नहमीप्रमाणे त्या भागातली ये जा बंद केली आणखी अेक पाय मागे घेतला आणि प्रकरण विनबोलता मिट-वून टाकल

चार-पाच दिवसानंतर त्या जावऱ्याचा पाय थोडा बरा झाला आहेसे पाह ताच त्याला पुढे घालून त्याच्याच वशिल्याने त्याच्या जातीच्या जावऱ्यांकडे आसरा घेण्यासाठी कटव नि अुद्दिन त्या घनदाट अरण्यातील त्या जावऱ्यांच्या पूर्ण मरा-वाच्या असलेल्या चोरवाटांनी जावऱ्यांच्या त्या रानवट 'राजधानी' कडे चालू लागल

पण जाता जाता त्या जावऱ्याच्या पोटात सारखी धडकी भरली होती की, जावरे त्याच स्वागत झाडावरून अकस्मात सणसणत येणाऱ्या विषारी शराच्या मान्याने तर करणार नाहीत ना ? कारण जावरे केव्हा-केव्हा 'भगोड्या'ना शरण येताच आसरा देतात हे जरी खरे असल आणि त्यांच्या स्वत च्या जातीत कित्येक वर्षे आसरा दिलेला अेक 'भगोडा' जरी त्याच वेळी नांदत होता तरीही ती त्यांची लहर ह्या प्रकरणी तशीच लागेल की नाही ह्याची त्या जावऱ्यालाही शंका होती कारण सध्या ते अिंग्रजावर म्हणजेच अिंग्रजी बंदिवानांवरही अुलट-लेले होते काही बंदिवानांना भगोड्याच्या मिषाने त्यांच्या वसतीत पक्क

खणखणत सुटलो आहे की गाय अिथून — की अिथून — वा अिथून! ती राजधानी दोन-तीन मैलांवर आली, तेव्हा रात्र पडलीसे पाहून ते तिघेजण तेथेच थबकले ती रात्र त्याच झाडीत त्यांनी काढली

* * *

## १८. जावन्याचे जीवन

ही पाहा जावन्याची अेक अनादि राजधानी! अेक राजधानी म्हणण्याचे कारण असे की, अंदमानातील आदिम मानवाच्या ज्या रानटी टोळ्या आहेत त्या तेथील विस्तीर्ण आणि घनदाट कान्तारामध्ये मोठमोठ्या टेकड्यांतून निरनिराळ्या स्थानी वसल्या तशाच पृथक्पणे वसलेल्या आहेत त्यांचे सगळ्यांचे मिळून काही राज्य नाही, संघ नाही जी टोळी जेथे राहते त्याची तेवढीच राजधानी, ती अेक जातच निराळी होअून पडलेली तशा निरनिराळ्या जातींपैकी ज्या जातीने अिमजावर त्या दिवशी छापा घातला ती टोळी येथ राहते, तिची ही राजधानी

घनदाट झाडाझुडपांनी वेष्टिलेल्या ह्या टेकडीच्या मध्यावर पठारासारखे अेक मोकळे स्थळ होते त्याच्या बाजूला त्या टेकडीवरील खडकात, लेण्यांच्या भागात असतात तशी मोठमोठी चार पाच फूट अुंचीची आत खोलवर गेलेली आणि सलग लांब असलेली पाच-सहा भगदाडे होती हेंच त्या राजधानीचे तटबंद दगडी भक्कम गावठाण होय त्या भगदाडांतून सारे नागरिक धर्मशाळेच्या सलग सोप्यात प्रवासी खेचाखेचीनं जेवतात, निजतात, बसतात, तसे समाजीक कुटुंबाप्रमाणे पिढ्यान् पिढ्या वसत आलेले आहेत ह्या विस्तीर्ण राजधानीतील प्रजाजनाची लोकसंख्या म्हणजे स्त्री पुरुष-बाल-बालिकासुद्धा दीडशेच्यावर नसली तरी अुणी तर नव्हतीच नव्हती

त्या खबदाडांतून भिंती नव्हत्या तट्ट्या नव्हत्या पोटभाग नव्हते सारी राजधानी मिळून ते अेकच घर होतें आणि घरही खोली, माडी, मधले घर, स्वैंपाकघर प्रभृति कोणताही विभाग असा पाडलेला नव्हे, तर अेक सलग सोपा

त्या खबदाडापुढील मोकळ्या पटांगणाला त्या खबदाडातील मुख्य राजधानीचे अुपनगर म्हणण्याला काहीच प्रत्यवाय नव्हता त्या अुपनगरात अुघाडीच्या दिवसात अुन्हामध्ये किंवा रात्री चांदण्यामध्ये विलसण्यासाठी काही विश्राममंदिरेंही प्रमुख घराण्यांनी बांधलेली होतीं ज्यांना आपण घरे म्हणतो तीं ती नव्हतीच, पण ज्यांना आपण झोपड्या म्हणतो तशीही ती नव्हतीं बांबूच्या अुभ्या आडव्या

चिरफळ्या बांधून केलेली अेक लांब ताटी दोन-तीन झाडांना बांधून टाकली की ते विलासमंदिराचे बांधकाम अुभारले गेलेच म्हणून समजावे. त्याच्यावर छप्पर देखील असण्याचे जावन्याच्या शिल्पशास्त्राप्रमाण वैध नव्हते, मग खिडक्या नि दारे ह्याच्या अडगळीचे नावच नको. अुंच खड्याच्या टोकावर खाली पाय सोडून मंडळी बसली असता मागे टेकण्यास हवे, तेवढ्यापुरती ती बांबूची ताटी बांधून टाकलेली असली की झाले ते विलासमंदिर.

त्या टोळीचा राजा जो नानकोबी त्यानेही स्वतःच्या राणीकरिता असे अेक विलासमंदिर त्या राजधानीपुढील त्या अुपनगरात बांधलेले होते. तेथील खड्याच्या लांब नि सलग पलंगावर आपल्या राणीसह आणि मुलांसह बसून त्या बांबूच्या ताटीला टेकीत नि खाली खोलगटात पाय सोडून झुलवीत राजा नानकोबी हा दुपारी अून खात असता किंवा रात्री चांदण्यामध्ये त्याच मंचकावर सुखशय्येचे विलास अुपभोगीत असता अुघडीच्या वेळी आढळे. पण पाअूस नेहमीचाच, ह्यास्तव त्याचा बहुतेक काळ त्या खवदाडातील मुख्य राजधानीत अितर प्रजाजनासह ममाअिकपणे नि सलगपणे जेवण्या बसण्या-अुठण्या-निजण्यात जाअी.

दिवसभर ते राष्ट्रचे राष्ट्र जंगलात मृगयेसाठी निघून जात असल्यामुळे सगळी राजधानी बहुतांशी ओसाडच असे. रात्री सगळेचे सगळे नाच असला तर त्या पटांगणात नाचत, नाही तर त्या दोन-तीन खवदाडातून सारे पुरुष, बायका, मुले अेकदडाळी कोणत्याही अंथरुण-पांघरुणावाचून अगदी अुल्लंग अवस्थेत हसत खेळत झोप आली की झोपी जात, विवाहित स्त्री पुरुष जोडप्यांनी आणि अविवाहित स्त्री-पुरुष ते सारे सरमिसळ!

त्यांचा तोच धर्म होता, नव्हे सनातन धर्म होता. धर्माधर्मात वडिलकीचा मान आजच्या आमच्या कोणत्याही धर्मांना लाभणार नाही. जावन्यांचेच नव्हेत तर आपल्या मनुष्यजातीचेही 'तानि धर्माणि प्रथमान्यासन्.'

त्या धर्माप्रमाणेच त्यांची दिनचर्याही जवळजवळ सनातनच होती. ती राजधानीच पाहा. ती तेथे केव्हा वसली हे सांगणे अितिहासाला वा स्मृतीलाही शक्य नव्हते. तरीसुद्धा तिच्या वयाची काही गणति करण्यासारखे अेक कालमापक यंत्र तिला जोडलेले होते. ते यंत्र म्हणजे त्या टेकडीच्या त्या पटांगणाच्या बाजूला असलेला अेक सडक सुटून खोलवर गेलेला हा नैसर्गिक खड्डा. ह्या वसतींतील जावन्यांच्या पिढ्यामागून पिढ्या समुद्रावरील शिंपल्यातले प्राणी धरून आणीत आल्या. आपण जसे शेंगा सोलून दाणे ताडात घालतो नि फोलपटे खाली टाकतो, तसे ते त्या शिंपातील प्राणी ताडात टाकून त्या शिंपल्या त्या खड्ड्यात पिढ्यान् पिढ्या फेकीत आले. त्या शतावधि वर्षे थरावर थर चढत शिलास्थि होअून गेलेल्या (Fossilized झालेल्या) शिंपल्यांच्या अगडबंब ढिगावरून कालगणना जर केले, तर युगोयुगे ही वस्ती तशीच तेथे नांदत आलेली असली पाहिजे, ते जावरे म्हणही

दुपारी समुद्रशिंपल्यातील प्राणी शेंगाच्या दाण्यासारखे सोलून खात नि शिंपले त्याच खड्डयात टाकीत त्याच्या त्याच सैंपाकघराशी तसेच मिटक्या मारीत बसत आले असले पाहिजेत

त्या राजधानीतले सारेचे सारे नागरिक त्यांच्या नेहमीच्या समुद्रनृत्याला आज पुन्हा जाणार होते पुन्हा म्हणण्याचे कारण असे की अिंग्रजांशी मध्यंतरी तें 'युद्ध' चालू झाल्याने दहा-पंधरा दिवस त्या गडबडीतच गेले होते आणि नेहमीचा नाच बीच झालेला नव्हता त्यातही आजचा नाच त्यांच्या राष्ट्रीय विजयाचा होता त्यांच्या मताप्रमाणे अिंग्रजांशी झालेल्या युद्धात जावरेच जय पावले होते त्या दिवशीच्या छाप्यात त्यांच्या मूठभर लोकांपुढे अिंग्लिशांचे त सहाशे-सातशे लोकांचे सैन्य पण अुधळून जाअून जीव घेअून पळून गेले अितकेच नव्हे, तर अिंग्रजी सैन्यातला अेक मोठा अधिकारी (म्हणजे तो सशस्त्र पोलिस) जावऱ्याच्या अेका वीराने नेमका बाण मारून ठार केला होता ! तो वनाचा भाग जरी अिंग्रजांनी घतला तो घतलाच, तरी त्याची काय सिसगणती ! वाटेल तितकी रानडुकरं, दोन पायांनी जाता जाववत नाही अितके विस्तीर्ण घनदाट कान्तार आणि ज्याच्या टोकाला दृष्टि पोहोचत नाही अितका अेकान्त सिंधुतट नि वाळवटे जावर निर्वेधपणे आपल्याला मोकळी आहेत तोवर अरण्याचा अिंग्रजांच्या हाती पडलेला तो नवा तुकडा म्हणजे लक्षाधीशाच्या खिशातून सांडलेली अेक कवडी ! युद्धाचा हेतु त अरण्य हा तितका नव्हता की जितका होता जावऱ्याचा अपमान ! त्याचा सूड त्यांनी अुगवला होता

आणि सूड हाच जावऱ्याचा जय असतो त्याचा क्रोध जितक्या लवकर भडकून अुठतो तितक्याच लवकर शमतो त्याच्या वैयक्तिक शत्रूचासुद्धा तेथल्या तेथेच तो आहे तोवर सूड अुगविण्याम ते सोडणार नाहीत पण जर तो काही वर्षे बेपत्ता झाला, तर त्याचे त्यांना अितके विस्मरण होते की, तो पुन्हा त्यांच्यात परतला तरी त्याचा राग त्यांना आठवत नाही, तो मिसळून जाअू शकतो त्याच्यात अिंग्रजांनी केलेल्या आगळिकेचाही त्या छाप्यात त्यांनी जो सूड अुगविला, तेवढा त्यांचे समाधान करण्यास पुरेसा झाला त्या त्यांनी मिळविलेल्या जयाच्या अुत्साहात त्यांना अद्याप आठवावे असे शल्य अितकेच होते की राजा नानकोबोचा मुलगा तेवढा पायात गोळी लागून घायाळ झाल्यामुळे तिकडेच कोठे दडलेला होता पण तो सुखरूप परत यणार ह्याविषयी त्यांना शंकाच नव्हती कारण तो काही अिंग्रजाच्या हातात पडलेला नव्हता, तर होता हातात पडलेला त्या दुष्ट अरण्यभताच्या

लावून त्या ज्वाळांत काहीशी आकृति बघत ती बराच वेळ गुंगल्यासारखी थमली. मग आवेगाने अेकदम अुठून तिने त्याच्या गळ्यांतली प्रेताच्या हाडकांची माळ घेतली आणि ती त्या आगीभोवती किंचाळत नाचू लागली. 'हां हां ! समजलें. हा पाहा तो 'अेरेमचौग' ! बोल ! काय खाष्टपणा केलास, बोल !' असें आव्हानून वाऱ्यातून कोणी बोलावें नि आपण अैकावें तसें अैकू लागली आणि मग म्हणाली,

'अस्सं ! अस्सं ! अैकलंस राजा नानकोबी ? आपल्या जावऱ्यांचा शत्रू जो हा अेरेमचौग, हें अरण्याच खाष्ट भूत, त्यानेच तुझ्या मेहुण्याचा विश्वासघात केला बघ ! तो वीर दाट झाडीत छपून अिंग्रजांवर बाण मारतो आहे, पण अिंग्रजांना तो दिसत नाही; अितक्यात ह्या खाष्ट अरण्याच्या भुताने त्या साऱ्या फांद्या बाजूला वाकविल्या बघ! त्यासरशी तो वीर अुघडा पडला, अिंग्रजाने पाहिलं, नेम धरला, जावरा वीराच्या पायाला गोळी लागली ! नाही तर अिंग्रजांची काय बिशाद होती की, जावऱ्याला तो पाहू शकता ! रे दुष्टा अेरेमचौगा, आता झालं तें झालें, आता तुझ्याच अरण्यात तू अडकवून ठेवलेला आमचा तो वीर दोन-तीन दिवसांच्या आत आमच्याकडे सुरक्षितपणे आणून पोचीव, नाही तर ह्या रानात जिकडे-तिकडे मोठमोठ्या आगीच आगी पेटवून देअीन नि ह्या चिंधीसारखा तुला त्या आगीन जाळून टाकीन !'

असें बोलत आपल्या कटीभोवती बांधलेली अेक लाल कापडाची बोटभर रुंदीची चिंधी ती सोडू लागली. पायापासून माथ्यापर्यंत तिच्या अंगावर जाव ऱ्यांच्या कोणत्याही स्त्रीप्रमाणें वस्त्र असें नव्हतेंच आणि ती लाल चिंधी तिने जी कटीला बांधली होती ती देखील अेक मंत्र-तंत्रातला करगोटा म्हणून ! करगोट्या सारखीच ती चिंधी बारीक होती. तिच्यायोगे कोणताही अवयव झाकण्याचें दुष्कर्म घडणें मुळीच शक्य नव्हतें.

तें अरण्यातलें भूत, तो अेरेमचौगा, आगीला भयंकर भितो. ती चिंधी त्या पचाक्षरिणीने आगीत टाकताच जशी भुर्रकन् जळून गेली, तशी आपलीही गत होअील, अशी धास्ती लागून त्या अरण्यभुताने तिला वचन दिलें की, दोन-तीन दिवसात त्याने अरण्यात अडकविलेल्या जावऱ्याला राजा नानकोबीकडे सुखरूपपणे परत धाडण्यात येअील !

ह्या आश्वासनामुळें अर्थातच जावऱ्याची त्या युद्धातली होती नव्हती ती हानिही भरून निघणार असें पाहून सर्वांनाच मोठा आनंद झाला होता, आणि म्हणूनच आजचें ते होणारें त्याचें सिंधुपुलिनावरील विजयनृत्य मोठ्या थाटामाटाने पार पाडण्यास जो तो जावरा अुत्सुकला होता.

पहाटेसच ते राष्ट्रचें राष्ट्र नित्यक्रमाप्रमाणे मृगयेला निघाले. बायका, पुरुष मुलें, सारेचे सारे ! ज्याचे-त्याचे धनुष्य-बाण लहान-मोठ्यांसुद्धा ज्याच्या-त्याच्य हातीं. राजधानीत घर असें नव्हतेंच, तेव्हा मागे दारे लावण्याचेंही कारण नव्हतें

दारच नसल्याने कडी कुलपाचे तर नावच नको आणि कडी-कुलूपाला नावच नाही मुळी जावऱ्याच्या भाषेत! मागे सामान असेही काही राहणार नव्हते ज्यांचा त्याचा सामार म्हणजे जो-ता आणि त्याच्या हातातील तिरकमठा गळ्यातील कवड्याची व मण्याची माळ! काही हत्याराबाचून अडगळ अशी नाही त्याच्या घरात वस्त्राच तर नावच नव्हते अन्नाविषयी तर धान्याचा साठा वळदं, पातो, पेवे, डवे, मिळून साठवण अशी म्हटली म्हणजे ते अरण्य नि तो समुद्र! कालच्या सध्याकाळच राणे कालच चट्टामट्टा करून टाकलेले आजचे आता जे मृगयेत मिळेल तें 'Enough unto the day the evils thereof Let tomorrow take care of its own!' सहस्रावधि वर्षापूर्वीपासूनच ते जावरे ख्रिस्टच हें धमसून प्रत्यही आचरीत आलेले आहेत

राजधानी अेखाद्या वाटवरील धर्मशाळेसारखी ओस पाडून जावऱ्याचे ते राष्ट्रचे राष्ट्र त्याच्या प्रत्यहीच्या दिनचर्येप्रमाणे सकाळीच अस रानावनात मृगयेला निघून गेल्यानंतर थोड्याच वेळात त्याच्यातील मंडळी ज्याच्या-त्याच्या लहरी-प्रमाणे नि सोयीप्रमाणे वेगवेगळ्या मृगयेच्या माग लागत रानभर पांगून गेली काही बायका मुले धनुष्य-बाण वा दगड धोंड घेअून पक्षी मारीत चालली काही स्त्री पुरुष मोठमोठ्या रानडुकराच्या मागे लागले काही समुद्राकडे वळून खडका खडकावर मोठमोठे मासे वर अुफाळतात केव्हा नि त्याना बाणानी विंधतो केव्हा, अस अुतावळे होत्साते बगळ्यासारखे टपून राहिले

राजा नानकाबी नि त्याची राणी 'फुली' हीं जरी राजा राणी असली तरी अितर कोणत्याही प्रजाजनाप्रमाणे त्याची मृगया त्यानाच करावी लागे, नाही तर अुपाशी राहाव लागे! जावऱ्यात राजाला कोणीही कर देत नसतो राजापाशी राजा म्हणून अेवढी पोलिस वा चाकर वा चाकराणी नसते संधि विग्रह संकट-विकट अशा प्रसंगी तो त्याचा पुढारी असतो त्याच्या विचाराचे विशेष महत्त्व असते, अितकेच त्याचे राजेपण त्याच्याकडे जाती-जातीतील भांडणाविषयीच, न्याया-न्यायाचे कामदेखील निर्बंधदृष्टीने नसते कारण जावऱ्यात जो ज्याच्याशी भांडेल, त्याने त्याच जमेल ते नि जमेल तसे पारिपत्य करावे वा करू नये जातीय न्याया-लयाचा तो प्रश्नच नसतो व्यक्तीच्या शत्रूला व्यक्तीने ठार मारावे वा मारू नये तो व्यक्तीचा प्रश्न, जातीचा नव्हे न खटला न चौकशी, न दंड, न कारागार, न न पोलिस न पाटील, अशी आहे त्याची राज्यघटना आणि असा मुकुट तर काय, पण लंगोटीसुद्धा न धारण करणारा राजा नि कटीखाली अितभर लटकावलेल्या अेखाद्या झाडाच्या सुरेख करतरपानावाचून पैठणी अशी जिला ठाअूकच नाही अशी असते त्याची राणी!

त्या दिवशी सगळ्यामागेहच मृगयेला निघताना राणी फुलीने तिच्या अेक वर्षाच्या मुलालाही आपल्या पाठीवर अुभे बसून नेले होते आपल्या अिकडे

कातवरी प्रभृति बाया मुलाला पाठीशी अेखाद्या झोळींत ठेवून नेतात किंवा मूल आअीच्या पाठीमागून गळ्याला हाताची नि पोटाला पायाची मिठी मारून पाठगुळी बसते, पण अंदमानी स्त्रिया अेक पट्टी डावयाच्या टाळूवरून अडकविलेली पाठीवर सोडतात, मूल पाठीशी घेतले की त्या पट्टीवर टेकते किंवा आअीच्या कुणावर घडवंचीवर टेकावे तसे पाय टेकून पट्टीला धरून अुभे राहते त्या पट्टीच्या रहमीच्या बोजामुळे त्या स्त्रियाच्या टाळूवरच हाड अगदी स्पष्ट दिसावे अितके रुतून त्याला नित्याचीच अेक खळगी पडते, त्यात ती पट्टी पक्की बसते आणि तवडील प्रौट स्त्रियांच्या कटीचे हाड नि ढुगण मूळचेच अितके प्रशस्तपणे वर आलेले आणि रुंदावलेले असते की मूल त्या ढुगणावर अगदी सहज पाय टेकून अुभे राहू शकते ह्यामुळे आपल्या अिकडील स्त्रियाच्या पाठगुळी मूल बसते असे जसे म्हणावयाचे, तसे तिकडच्या स्त्रियाच्या पाठीशी मूल 'अुभे राहते' असेच म्हणावे लागते

राजा नानकोवीच्या त्या मुलाचे नाव, राणी फुली गर्भवती झाली तेव्हा 'कोरी' असे ठेविले होते कारण जावऱ्याच्या स्मृतिशास्त्राप्रमाणे स्त्रिया गर्भवती झाल्या की त्या मुलाचा नामकरणसंस्कार तत्काळ करावा लागतो अर्थातच मुलामुलींच्या पहिल्या नावात भिन्नता नसते त्यायोगे त्या मुलाच्या 'कोरी' नावावरूनच ते जावऱ्याचा युवराज वा राजकन्या होती, हें वाचकाना कळण्यासारखे नसल्यामुळे मुलगा होता, युवराज होता, हे स्वतंत्रपणे सागणे भाग आहे मुलगी असती तर तिचे हे पहिले गर्भारपणातील सामान्यलिंगी नाव ती वयात येताच पालटून त्या तिच्या पहिल्या ऋतूत जी फुले फुलली असतील त्यातील अेक नाव तिला देण्यात आले असते नामकरणाची ही पद्धत हा त्याच्या सनातन धर्माचाच जेन जातीय संस्कार आहे प्रत्येक मुलीचे हे नाव पालटत, तसेच राणीचेही तिच्या जन्मपूर्वीचे, तिच्या आअीला तिचा गर्भ राहिला तेव्हाचे जे सामान्यलिंगी नाव होते, ते पालटून ती राणी ऋतुमती झाली तेव्हा जिकडे तिकडे फुलच फुले फुलली असल्यामुळे तिचे दुसरे नाव हे 'फुली' असेच ठेवण्यात आले

त्या जावऱ्यापैकी, जे लोक समुद्रावर मासे मारण्यास गेले होते तिकडेच राजा नानकोवी नि त्या मुलाला पाठगुळी अुभे केलेली राणी फुली ही पण गेलेली होती अुंच खडकाच्या मुळाशी मुळ्यावर धनुकलीना बाण जोडून जावरे अुभे होते खाली समुद्राच्या लाटावर लाटा त्या खडकाच्या भितीशी टक्कर घेत धडाधड फुटत होत्या मधूनच अेखादा मासा वा माशाचा थवा त्या लाटावर अुसळून येत होता पाढरे शुभ्र असे गिधाडासारखे पक्षी आकाशातून समुद्रावर अुंच निच असे सारखे घिरट्या घालीत होते त्याच्या पडछाया ह्या लाटात अुमटत, तेव्हा वाटे की, ते पक्षीच लाटावर पोहत आहेत पण केव्हा केव्हा जेव्हा काणी पाणजीव

जावयाच्या भाषेत शब्द असे आधीच मोजके त्यातही त्यांना शब्दापेक्षा डोळे नि हातवारे ह्यांनीच शक्य तितके बोलण्याची आवड, शब्दाचा कंटाळा. ह्यामुळे सबंध वाक्य बोलायचे, तर अेका शब्दात बोलतील आणि त्याचा अुरला अर्थ हावभावानी पुरा करतील राजा नानकोबीने जेव्हा नुसता 'डोलकाठी' अितकाच शब्द अुच्चारला, तेव्हा त्यानेही त्या वाक्याचा अुरला भाग हाताने नि डोळ्यांनी भरून काढला होता ते सारे शब्द नि हावभाव मिळून मराठीत तेच वाक्य लिहिले तर त्या अेका शब्दाचा सारा अर्थ असा होअील —

'काय, तो आपला 'डोलकाठी' कुठे गेला आहे? बरेच दिवस येत नाही आताशी अिकडे? का बर? तो असता तर ते 'विलायती पाणी'—ती दारू यथेच्छ पाजता! तिची सेवढी अुणीव आहे आता'

त्याला अेका जावऱ्याने दोन शब्द नि दहा हातवारे नि दृष्टिविभ्रम करून जे अुत्तर दिले त्याचा भावार्थ अेवढा होता—'तो डोलकाठी' जावऱ्याच्या जातीची जी अेक दुसरी 'टटोबी' नावाची टोळी त्या अरण्याच्या अेका दुसऱ्या विभागात वसत असे, त्याच्यातही त्याची ओळख असल्यामुळे तिकडे गेलेला आहे आणि थोड्याच दिवसात परतणार आहे'

पण त्याच्यासाठी आजचे विजयनृत्य थोडेच थांबावयाचे होते! मृगया नि नाच हा तर जावयाच्या जीवनाचा श्वासोच्छ्वास! त्यातही त्या अिंग्रजाशी झालेल्या लढाअीच्या गडबडीत नाच असा झालेलाच नव्हता त्या हौशीच्या अुपासमारीचे आज केवळ पारणेच होते! असे नाचासाठी अुसुकलेले ते जावरे पुरुष, स्त्रिया, मुले, सारे त्या प्रशस्त वाळवंटातील नृत्यांगणात घो घो जमले कोणी मोठमोठ्याने दंड थोपटू लागले, कोणी अुगाच अेकेकटे अुड्या नि कोलांट्या मारू लागले, कोणी गर्जू लागले, कोणी तीन-चार शब्दांचेच गाणे कसल्या तरी अेकस्वरी सुरावर सारखे म्हणत घुमू लागले बहुतेक स्त्री-पुरुष अगदी नागवे, काही नटवे स्त्री पुरुष अेखाद-दुसरे छानदार पान कटीपुढे पण ओटीपोटाच्या खाली फारसे लोंबणार नाही अशा बेताने लटकविलेले—तेही शृंगार म्हणून, आच्छादन म्हणून नव्हे!

दाला सीमाच राहिली नाही. भरभर नि गरगर फिरणाऱ्या त्या नाचत्या वर्तुळावर डोळा ठरेनासा झाला !

आजच्या युरोपमधल्या कोणत्याही नग्न-संघाचे सभासद जर त्या वेळी तेथे असते, तर त्या जावऱ्यांच्या त्या सरमिसळ स्त्री-पुरुषांना, त्या अुल्लिंग नृत्यात तसें देहभान विसरून गेलेले पाहताना तोंडात बोटें घालून म्हणू लागते, 'वा रे वा ! नंगा नाच असावा तर असा असावा !' मार्क्सच्या शतावधि वर्षांपूर्वीपासून जावरे जसे समाजसत्ताक होते, तसेच आजच्या युरोपियन नग्नसंघाच्या अत्युच्च महत्त्वाकांक्षा शतावधि वर्षांपूर्वीच त्यानी व्यवहारून टाकिलेल्या आहेत.

तो नाच संपतो न संपतो तोंच अेक जावरा मोठ्याने टाळी वाजवून बोट दाखवीत ओरडला, 'डोलकाठी ! डोलकाठी !' पाहतात तो 'डोलकाठी' खरोखरीच येत आहे आणि त्याच्या खाकेत नि हातातही 'विलायती पाण्या'च्या बाटल्या आहेत ! जावऱ्यांच्या आनंदाला पारावार नाहीसा झाला !

जावऱ्यांना तंबाखू प्रथमपासूनच फार आवडते नि गेल्या चाळीस-पन्नास वर्षांपासून त्याच्यात विलायती मद्याचाही शिरकाव थोडा-बहुत झालेला आहे. तें जरी दारूच्या व्यसनाच्या पूर्ण आहारी अद्याप गेले नसले, तर तें त्यांना अतिशय आवडत नाही म्हणून नव्हे, तर मिळत नाही म्हणून. हा 'डोलकाठी' जो त्यांच्यात आजकाल अितका आवडता झाला आहे, तो त्याच्या मनमिळाअू स्वभावाअितकाच किंवा त्यापेक्षाही अधिक अशी त्याच्या ह्या मद्यमिळाअू नि तंबाखुपुरवाअू गुणामुळेच होय.

ज्या मनुष्याचें नांव जावऱ्यांनी असे 'डोलकाठी' ह्या अर्थाच्या जावरी शब्दात ठेविले होतें, तो अेक मूळचा 'भगोडा'च होता. अिंग्रजांच्या काळ्या पाण्यावरील जन्मठेप बंदिवानांपैकीच तो अेक असून बऱ्याच वर्षांपूर्वी तो बंदिवासातून पळून गेला होता. पण हिंदुस्थानात परतण्याचा त्याचा बेत अेकदा फसल्यामुळे आणि त्या साहसात काही जावऱ्यांची नि त्याची रानामध्ये ह्या विलायती पाण्याच्या वशिल्यानेच दाट ओळख झाल्यामुळे ह्या जावऱ्यांच्या टोळीत त्याला गेली तीन-चार वर्षें आसरा मिळाला होता. तो चोरून-मारून अंदमानच्या अिंग्रजी वसाहतीत जाअी, जावऱ्यांनी दिलेले अनेक सुंदर नि मोठमोठे शंख आणि दोन-दोन फुटांचे वेळण्या-लाटण्यासारखे रुंद नि गुलाबी शिंपले त्या बंदिवान वसाहतीतील व्यापाऱ्यांना चोरून-मारून विकी, बहुतेक पैसे गाठीला घाली आणि अुरलेल्या पैकी थोडेसे विलायती मद्य नि पुष्कळशी तंबाखू गुप्तपणे जावऱ्यांना आणून देअी. त्यांच्यात तो अगदी त्यांच्या जातीचाच अेक आप्त असावा तसा मिसळून गेला होता. तो त्यांची बोली बोले, खाणें खाअी, नागवा राही, रंगी मातीचे पट्टे अंगावर काढी, त्यांच्या सुख-दुःखात समवेदक होअी, त्यांच्या स्त्री-पुरुषांत ते जसे सरमिसळ नाचत निजत, तसाच तोही मिसळून नाचे, निजे.

ते जावरे त्याला आवडीने 'डोलकाठी' ह्या अर्थाच्या नांवाने जें संबोधीत, तेंही त्याला अगदी शोभेसेंच होतें. कारण त्याच्या कटीपर्यंतच लागणाऱ्या त्या ठेंगू आणि बूटपॉलिशासारख्या काळ्या कुळकुळीत जावऱ्यांच्यामध्ये तो निमगोरा नि सहा-अेक फूट अुंचीचा हिंदु भगोडा अुभा राहिला की दिसेच मुळी डांवर फासलेल्या तारवांच्या मधोमध अुभारलेल्या अेखाद्या 'डोलकाठी' सारखा! ह्या साम्यावरूनच जावरे विनोदात त्या नांवाने त्याला संबोधू लागले.

ज्यांनी त्याला त्या पाळीला शस्त्र नि शिपले दिले होते, त्यांना-त्यांना त्याने चार-चार घोट मद्य पाजलें, अितरांना यथेच्छ तबाखूचे चौकणे भरविले आणि राजा-राणीला तर मद्याचे दोन सबंध पेले काठोकाठ भरून अर्पण केले. त्या रंगात राजा नानकोंबो नि राणी फुली ह्यानी 'डोलकाठी'चा अेकेक हात धरून आणि त्याला मध्ये घेअून त्याच्या सन्मानार्थ आपल्या शिपांचा अेक स्वतंत्रच नंगा नाच चालू केला.

जावऱ्यांच्या त्या विजयनृत्याचे तावूत शेवटी सिंधुतटावर 'विलायती पाण्या'त असे थंड होत असता तिकडे मागच्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणे त्या घायाळ जावऱ्यासह कटक नि रफिअुद्दिन त्या राजधानीपासून दोन-तीन मैलांच्या अंतरावर येअून थबकले होते. त्या घायाळ जावऱ्याने त्यांना 'डोलकाठी' नावाच्या भगोड्यास जावऱ्यानी गेली दोन वर्षे कसें सभाळले आहे आणि जर कटक नि रफि-अुद्दिन त्यांना तसेच अुपयोगी पडतील, मद्य नि तबाखू पुरवितील, तर त्यांनाही जावऱ्यांचा सर्वतोपरी पाठिंबा नि प्रीति कशी मिळू शकेल तें सांगितले होतें. पण पहिली अडचण होती ती ही की, ते हिंदी बंदीवान अिंग्रजाचे लोक! आणि जावरे त्या वेळी अिंग्रजावर बिघडलेले! त्यामुळे जर त्यानी त्या घायाळ जावऱ्याला त्यांच्या मागातीच येताना पाहिलें, तर ते जावरे क्वचित् अकस्मात् त्या जावऱ्याचीही शंका घेतील. चिडून अुठतील, विषारी बाणांचा पाअूस पाडतील! ती आपत्ति टाळण्यासाठी शेवटी असे ठरलें की, कटक नि रफिअुद्दिन ह्या दोघांनी ती रात्र त्या अरण्यातच छपून काढावी; त्या घायाळ जावऱ्याने अेकटेच पुढे जाअून आपल्या टोळीला मिळावें; म्हणजे त्याचे स्वागत शेकडा नव्याण्णव अशी बिनधोक केलें जाअील. मग त्याने जावऱ्यांना कटक-अुद्दिनच्या जोडीनेच त्यास कसे वाचविलें, ती जोडी अिंग्रजाचे लोक नसून त्याचे मध्या कसे कट्टर शत्रु आहेत, 'भगोडे' आहेत आणि जावऱ्यांना नाना प्रकारच्या मद्य, तंबाखू, काचमणी, रंगी रेशमी वस्त्राच्या पट्टया प्रभृति वस्तूंचा सदैव पुरवठा करणार आहेत, ते युक्ती-युक्तीने सांगावे आणि मग त्या घायाळ जावऱ्याचा जीव वाचविण्याच्या अुपकारासाठी त्या नव्या भगोड्याना आश्रय देण्यास टोळीचे आणि राजा-राणीचे मन वळवावें. तितके काम साधताच त्या जावऱ्याने ह्या अरण्यात परत येअून कटक-अुद्दिनला सांगाती घेअून जावे, असा बेत ठरला.

सौंदर्य आतील नानाविध जीव मेंगाऱ्या दाण्यामागे तोडात आणि त्या शिपल्या टेकडीसालच्या या पुरातन गड्डयात टाकीन तों सारीजणे गप्पा छाटीन बसलीं

तोंच, 'आला ! आला ! अू ऽऽ अू ऽऽ' असें अकस्मात् किंचाळून नानकोबीची बहीण जवळ-जवळ नाचतच अुठली दूरच्या झाडीकडे बोट दाखवून तिने साऱ्यांचें लक्ष जिकडे वेधून घेतले होते, तिकडे नानकोबी जों पाहतो, तों त्याला त्याचा हरवलेला तो घायाळ जावरा, त्याच्या त्या बहिणीचा नवरा, थोडा लंगडत पण अेकदरीत अगदी निर्भय, निर्विघ्नपणे आपल्या राजधानीकडे येत आहे असें आढळलें त्यासरशी आनंदानें टाळी पिटून ती मगळी अुभी राहिली आणि नाना प्रकारचे हातवारे करीत आणि विविधपणे किंचाळून, चल चल, लवकर ये ! तुझे स्वागत असो !' असा भाव व्यक्तवू लागली

आपल्याविषयी आपल्या ज्ञातभार्यांच्या मनात कोणतेंही विल्मिप आलेले नाही, हें पाहून हर्षलेला तो जावराही आनंदाने नि अुत्सुकतेने धावतच पुढे आला. पण त्या आपल्या भाअूबंदाच्या सन्मुख येताच अेकदम थबकला नानकोबी, मुली नि त्या जावऱ्याची वायकों अशी सारी न हसता, न बोलता ताठ अुभी राहून त्याच्याकडे पाहू लागली हळूहळू त्यांनी त्याच्यावर डोळे वटारले, तोही ताठ अुभा राहिला आणि रागाने बघावे तसे त्याच्याकडे डोळे वटारून पाहू लागला

मग ते दोन्ही पक्ष अेकामागून अेक खाकरू-खोकरू लागले पाच-सहा वेळ असें खाकरणें झाल्यावर ते पुन्हा निश्चलपणे अेकमेकावर डोळे वटारून अुभे राहिले

कारण जावऱ्यातील शिष्टाचाराचा तोच नमस्कार चमत्कार असतो. कोणतीही व्यक्ति, मग ते पोटचे अपत्य का असेना, चार दिवस दूर राहून परतले की, त्याला भेटण्याच्या आधी हा असा नमस्कार-चमत्कार करावा लागतो

ह्या रूढीचे मूळ जावऱ्याच्या स्मृतिक्षीणतेत असावे त्याना आठवण अशी फार राहत नाही त्यामुळे मनुष्य थोडे दिवस नाहीसा होअून परतला की त्याची ओळख पुन्हा पटेतो त्याला नीट निरखून-पारखून घ्यावे लागते खाकरून-खोकरून तो शत्रु वा मित्र हें विचारपूर्वक ठरवून टोळीत पुनरपि घुसू देणे सावधपणाचे अेक कर्तव्य असते ह्या मूळच्या आवश्यकतेचीच पुढे शिष्टाचारी रूढि झाली आणि ओळख पटलेली असली तरी पाहुण्याशी तसा नमस्कार चमत्कार केल्यावाचून न बोलण्याचीही पद्धतच पडली असावी

तो शिष्टाचार होताच त्याच वटारलेल्या डोळ्यातून आनंदाची आसवे घळघळ वाहू लागलीं आणि आपल्या त्या हरवलेल्या वीरबंधूच्या गळयात त्याच्या बाधवाची नि पतीच्या गळयात पत्नीची प्रेमळ मिठी पडली

त्याच्या सुटकेचा अद्‌भुत वृत्तान्त सागताना त्या पुनरागत जावऱ्याने कटकच्या नि रफिअुद्दिनच्या त्याच्यावर झालेल्या अुपकाराना अितके वारवार अुल्लेखिले होते की, जेव्हा त्याने शेवटी त्या दोघा 'भगोड्या'ना जावऱ्यानी आश्रय द्यावा आणि

त्यानी त्यास दिलेल्या जीवदानाचे अुतराअी व्हावे, अशी कळकळीची विनंती तीवर तेथे जमलेल्या त्या टाळीतील अनेक जणाना अुद्देशून केली आणि त्या भगोड्याकडून यथेच्छ तबाखू नि दारू मिळण्याचे आमिषही दाखविले, तेव्हा तिला मान न डोल-विणारा असा जावरा कोणीही आढळला नाही तरीही किंचित् विचार करणारी, पुढाऱ्याला शोभेशी मुद्रा करून नानकोनी थोडा वेळ चूप बसला आणि मग हात-वाऱ्यानी वाक्याचा बहुतेक भाग व्यक्तवीत शब्द असा अेवढाच अुच्चारता झाला 'डोलकाठी !'

त्यात अितका अर्थ भरलेला होता की, 'अशा भगोड्याची खरी परीक्षा डोलकाठीलाच आहे ! त्यास्तव आमच्या वतीने तिकडे धाडा जर कटक नि रफिअुद्दिन ह्याना डोलकाठीने आश्रयार्ह ठरवल, तरच आश्रय दअू !'

त्यांची ती भेट तिकडे त्या मध्यान्हाळी होत असता, अिकडे कटक नि रफि-अुद्दिन हे दोघही सूर्य अस्तास जाण्याच्या आधी काही पारध करून त मास आगीने नुसते भाजून खाअून, रात्र पडताच त्या भयानक जंगलात आपापली अंथरुणे घालण्यासाठी त्या दलदली नि चिखली रानात पलग पाहू लागले तेथला पलग म्हणजे पलगाची मूळ प्रकृति ज झाड, तेच होय झाडाची पाहणी करताकरता दोन रुंद नि मोठमोठ्या फांद्या अुचावर जेथ अेकमेकीस चिकटून गेलेल्या आढळल्या तेथे त्या तशा निरनिराळ्या झाडावर ते चढले व त्या झाडाच्या फांद्यानी झालेल्या माळ्यावर निजले गाढ झोपेत गडगडून खाली कोसळण्याचे भय कारणे अुरू नये म्हणून त्यानी स्वत ला रानवेलीच्या दोरखडासारख्या चिवट सोलानी त्या फांद्याच्या पलगाशी स्वत ला बांधून घेतले होते पावसाची बराच वेळ अुघाडी होती, तरी पाणी झाडातून ठिबकतच होते मधून सरही येतच होती पण तरीही ते लवकरच गाढ झोपी गेले खरे पण ती गाढ झोपच होती या ग्लानीची शुद्धि हानी त त्याचे त्याच्याही ध्यानात आले नाही

पहाटेच अुद्दिन अुठला त्याला त्या गाढ झोपेनतर अितक बर वाटले होत की, तो आपल्या डोक्यावर जिवावरच्या संकटाची तरवार लटकते आहे हे सुद्धा थोडा वेळ विसरला जवळच दुसऱ्या झाडावर कटक निजला होता तिकडे त्यान पाहिल तो कटक अर्धपिळ्या देत जागा होतच होता थोडी थट्टा करण्याची लहर येअून अुद्दिनने कटकला पुरतेपणी अुठविण्यासाठी अुच आणि सुरेल आवाजात भूपाळी छेडली—

> घनश्याम सुंदरा, श्रीधरा अरुणोदय झाला ।
> अुठो कटकबाबूजी । अुदयाचली सूर्य आला ।।

कटकला हसू आल तोही अुठून फांद्यावरच किंचित काळ बसला वाघाच्या पाळतीवर माचा बांधून मृगयू जसे बसतात, तसा कटक दिसत आहेसे पाहून अुद्दिनने चेष्टा केली,

ह्या बेतामुळे जावरा बराचसा निर्भय झाला आणि त्वरेने जावऱ्याच्या राजधानीकडे निघाला. कटक नि रफिअुद्दिन हे त्या रानातच थबकले. त्यांच्या पोटात मात्र जावरे काय करतील नि काय नाही, अशी धडकी भरलेलीच होती. त्यातही रफिअुद्दिनच्या मूळ आततायी वृत्तीविषयी कटक नेहमीच मनातल्या मनात साशंक नि सावध असल्यामुळे आणि आपण आता घडवून आणू अिच्छितो त्या मालतीच्या मुक्ततेनंतर हा राक्षस पूर्ववैर अुघडें होअून आपल्यावरही ह्या अेकांतात अुलटेल की काय, अशी धास्ती त्याच्या मनात सारखी डोकावत असल्यामुळे, कटक ती बंदूक नि तो दारूगोळा अगदी न विसरता पण वरकरणी सहजपणे आपल्याच हाती राखून ठेवू लागला होता. त्यातही त्या दोघांच्या पुढे आता अेक नवीनच प्रश्न अुभा ठाकला — हा 'डोल्काठी' कोण? जावऱ्यावर अितकी बघानुवर्षे छाप पाडणारा हा हिंदी 'भगोडा' कोणी तरी कर्ता माणूस असला पाहिजे! तो त्या जावऱ्यात तेथेच असा का राहिला आहे? ताही समुद्र अुल्लघून पळण्याची संधि पाहत आहे का काय! साधन जुळवीत आहे की काय? कोणी तरी कर्ता माणूस आहे त्या अर्थीच तो चाल्यास अुपयोगी मित्र नाही तर अुपद्रवी शत्रु! कोण ठरेल तो?

आणि सगळ्यात मोठी नि निकडीची विवंचना म्हणजे ह्या मायाळू जावऱ्याला भेटताच राजा नानकावी काय म्हणतो, काय करतो?





## १९ रफिअुद्दिनचा सूड घेतला

जावऱ्याचे जयनृत्य संपल्यावर सूर्य तिकडे अस्ताचलाकडे जात असता ते अिकडे आपल्या राजधानीकडे परतू लागले.

पावसाची त्या वेळी उघाड होती. सध्याकाळच्या उन्हाची रंगी-बेरंगी कोंवळीं किरणें हलत्या-डुलत्या झाडीतून जिकडे-तिकडे वागडत होती. प्रणयाच्या लडिवाळ हावभावांना करीत राणी फुली, अेका हाताने अेक काचेचा धार लाविलेला तुकडा पुढे करून आणि दुसऱ्या हाताने अेखाद्या प्रशाखितके नि प्रशासारखे केस वाढलेल्या आपल्या मस्तकास दाखवून आर्जविती झाली, 'तास नं!'

त्या तिच्या अभिनयाचा नि शब्दाचा मिळून अेकत्र अर्थ असा होता की, 'केस किंचित् वाढल्यामुळे विशोभित झालेल्या माझ्या ह्या मस्तकाची ह्या काचेच्या तुकड्याच्या वस्तऱ्याने गुळगुळीत श्मश्रू कर नं! डोअी कर नं प्रियकरा, माझी, अगदी तुझ्या स्वत:च्या हाताने!'

आपल्या अिकडे प्रिय पत्नीच्या केशकलापाची कोण्या विलासी पतीने स्वहस्ते वेणी घालणें हा जसा प्रणयाचा लाडिकपणा आहे, बैल आपल्या शिंगाने गायीला खाजवितांना किंवा चाटतांना जसा प्रेमात आलेला असतो, तसे प्रेमात आलें असतां आपल्या प्रियकरणीच्या मस्तकावरील वाढू लागलेले केस अगदी हलक्या हाताने 'तासून' तिची गुळगुळीत डोअी करणें ही जावऱ्यांतील लडिवाळ प्रेमिकाची अेक ऱ्हौस असते. त्यांच्या रतिविलासातील तो अेक शृंगार आहे. विधवेचें केशवपन हें आपल्या धर्मशास्त्राप्रमाणे जितके अनिंद्य—नव्हे जसा अेक अनुलंघ्य धर्मसंस्कार, तसेंच सधवेचें केशवपन हें जावऱ्यांच्या धर्मशास्त्राप्रमाणेही अेक सौभाग्यलक्षण नि अेक धर्मसंस्कार समजला जातो!

आपल्या प्रिय पत्नीची ती हौस पुरवण्यासाठी नानकोवीने लगेच तिला जवळ घेतले, शिलाशेजेवर तिला निजवून, तिचें डोकें आपल्या मांडीवर घेअून त्या काचेच्या धारदार तुकड्याने तो लडिवाळपणे आणि हळुवार हस्ते तिची डोअी करू लागला. डोअी झाल्यावर ती जेव्हा अुठून बसली तेव्हा तिच्या गुळगुळीत मस्तकाने अधिकच शोभणारी ती विकेशा राणी फुली त्याला अितकी आकर्षक भासू लागली की, त्याने आवडीने तिचें अेक चुंबन तेथल्या तेथेच घेतले आणि आपण जशी शृंगाराची तिची हौस पुरविली तशी तिनेही आपली पुरवावी, अशी विनवणी जावऱ्याच्या रीतीप्रमाणे अभिनयाच्या भाषेत करीत तो काचेचा तुकडा अेका हाते पुढे करून दुसऱ्या हाताने आपलें डोकें दाखवून नानकोवी आपल्या प्रियकरणीला आत

' क्यों बाबूजी कितने बाघ मारे ?'

कटक अुत्तरला

'भैया, जो सचमुच बाघ, वो तो अभी आनेवाला है!' ते जावरे काल ठरल्याप्रमाणे आताच परत येतील. तेव्हा अेक तर ते माणसाळलेले दिसतील नाहीतर वाघाळतील ! वाघाच्या नखांनी फाडफाडून खातील तुम्हा मला ! '

कटक अितके बोलतो आहे ताच समोरची झाडी सळसळू लागली अगदा शंभर पावलांच्या आत येताच जावऱ्याने आपल्या रानटी भाषेतील 'अू ऽ ऽ अू ऽ ऽ' अशी अुच हाका मारण्यास आरंभिले. त्या जावऱ्याला ओळखताच कटक झट्दिशी झाडाखाली अुतरला. रफिअुद्दिन मात्र आपल्या झाडावरच रेंगाळत राहिला. काही असा त्याने स्वतःला बांधून घेतलेल्या वलीच्या जाड सोपटांना ती झटपट अुलगडू शकला नाही म्हणून. परंतु काही अंशी तो जो तसा रेंगाळला तो त्याच्या अंगच्या मुरलेल्या लुच्चेगिरीमुळेही होय! त्या जावऱ्यासह तो अपरिचित ' डोल्काठी ' ही आलेला होता. त्या दोघांचा बेत कटकला आणि अुद्दिनला आश्रय देण्याचा ठरला होता किंवा जावऱ्यांच्या टोळीकडून पकडविण्याचा ठरला होता हे नक्की कळावयाचे होते. तेव्हा अशा शंकाकुल स्थितीत आपण पुढे न होता कटकलाच पुढे तोंडाशी द्यावा. अनुकूल फासा पडतोसा दिसला तर आपणही तिथे जावे प्रतिकूल दिसला तर मागच्या मागे निसटून जाता यावे असा कपटभावही रफिअुद्दिनच्या त्या मागच्या मागे राहण्यात नव्हताच असे नाही.

कटकला पुढे आलेला पाहताच त्या जावऱ्याने आनंदाच्या विकाळचा भरीत त्याला मिठी मारली. ' हाच कटकबाबू ! ' असा त्याचा परिचय ' डोल्काठी ' ला त्याने करून दिला. लगेच डोलकाठीही पुढे होअून कटकला म्हणाला,

' कटकबाबू, मला वाटलेच होते तुम्हीच ते असाल म्हणून ! मी जरी गेली दोन-तीन वर्षे ह्या जावऱ्यात असा नागडा होअून अेक जावराच बनलो असलो तरी बंधातराने काळ्या पाण्याच्या वसाहतीत पारखा हिंडत असता मी तुम्हाला अनेकवार पाहिले आहे. तुमची अधिकाऱ्यातील पत अधिकार नि पळून जाण्याचा बेतही मला ठाअूक आहे. सत्तावनच्या स्वातंत्र्यवीर अप्पाचा मीही अेक विश्वास-नाय मित्र होतो. तुम्हाला साहाय्य द्यायला त्यांनी मरताना मला सांगितले होते ना गुप्तमंत्र मनुष्य ! त्यांनी माझी माहिती तुम्हाला दिली नव्हती. कारण तुमची त्यांची ओळख नवखी. माझी जुनी. मला काळ्या पाण्यावरून पळून जायला हवा तसा सवंगडी म्हणजे तुम्हीच ! कटकबाबू, तुमची बहीण कटकी सोडवून आणण्यात मी बोलता-बोलता यशस्वी होअीन ! दचकू नका ! मला सर्व काही माहीत आहे. कसे ते प्रसंगी सांगेन. तुम्हाला जावऱ्याकडून मी आश्रय देवविला आहे. पण तुमचा तो दुसरा साथीदार भगोडा जो आहे त्याला पाहिल्यावाचून त्याविषयी मी काही वचन देअू अिच्छीत नाही. कारण कारण कारण–त्याचे जे नाव ह्या

जावन्याच्या मोडक्या-तोडक्या .अुच्चारात मला जुळवता आलं, तें रफिअुद्दिन असं काहीसं वनतं आणि कंटकबावू, मला त्या नांवाचा तीव्र तिटकारा आहे. पण तो मनुष्य पाहिल्यानंतर त्या नांवाअितकाच जर तो अधमाधम नसेल, तर मी त्यालाही आसरा देववीन. नोट नांव काय त्याचं ?'

चपापत कंटक म्हणाला,

' रफिअुद्दिन हॅंच ! पण तो मनुष्य अियवर पळून येण्यात मुख्य साहाय्यक झालेला; त्याला माझ्यासाठी तरी आसरा ...'

कंटकला अडवून मध्येच डोलकाठी म्हणाला, 'तो तो मनुष्य पाहिल्यावरचा प्रश्न ! .कुठे आहे तो !'

हें त्यांचें बोलणें चाललें आहे तों रफिअुद्दिन आपल्या अंगाभोवतालचीं बंधनें सोडवून त्या दूरच्या झाडाखाली अुतरून पुढे येतच होता. कारण त्या जावन्याने कंटकला मारिलेली ती हसतमिठी, ते आनंदचीत्कार, डोलकाठीने कंटकशी केलेलें तें हंसतमुख हस्तांदोलन, ह्या सर्व लक्षणांवरून जावन्यानी आपल्याशी स्नेहसंबंधच जोडलेला आहे, ह्याविषयी त्याला शंका अुरली नव्हती. पुढे जाणें आता सुरक्षित असें त्याला ठाम वाटलें होतें. अितक्यात कंटकने हाकच मारिली मोठ्याने, ' रफि-अुद्दिन, आगे आव ! जावरे आपले मित्र झाले.'

रफिअुद्दिन मनमोकळेपणी हसत पुढे आला. डोलकाठी त्याच्याकडे निरखून पाहत होता. पण रफिअुद्दिन जवळ येताच ह्या रफिअुद्दिनहूनही अुंच, धिप्पाड नि काटक असणाऱ्या नागड्या डोलकाठीच्या भुंवया सत्रस्तपणे आकुंचित होअू लागल्या. तो वारंवार मोडीत असताही त्याच्या कपाळावर क्रोधाच्या आठ्या पुन:पुन्हा पडू लागल्या. अुमळलेल्या मद्याच्या बाटलीचें बूच ताटकन् अुडू पाहावें तशा त्वेषाने त्याचा देह अुनळून जातो की काय असें त्याला झालें आणि तें त्या बाटलीचें अुगळतें बूच आपण घट्टपणे धरून जसें दाबून धरतो, तसें तो भूमीला आपले पाय घट्टपणे दाबून धरू लागला. अितक्यात त्याच्या मनात जी कोणती शंका क्षोमली होती, तिची मागणी विशेषपणे पुरविणारी अेक कल्पना त्याला सुचली. त्याने तोंडावर वळे-वळे अेक हास आणिलें आणि रफिअुद्दिनशी प्रेमाने हस्तांदोलन करण्यासाठी

त्या भयंकर अवसानाचा नि आरोपाचा अर्थ कंटकला तर काय, पण स्वतः त्या रफिअुद्दिनलाही कळण्याच्या आत डोलकाठीने त्याच्या हातात गवसलेला अुद्दिनचा हात खाडकन् हिसडला, बाहेरीचा पेच मारून पाठीकडून पोटात घेतला, त्याच्या कटीला डाव्या हाताचा घट्ट विळखा घालून, अुजवा हात दोन्ही टांगातून खुपसून त्याला वर अुचलला आणि पछाडून धाडदिशी भुअीवर आपटला. लगोलग त्याच्या छातीवर बसून आपल्या दोन्ही हस्तांनी डोलकाठीने अुद्दिनचा कंठ करकचून आवळला. आता अुद्दिनच्याही ध्यानात आलें की, हा त्याचा अेक पुरातन शत्रु त्याच्या छातीवर चढला आहे. अुद्दिनने त्याला ओळखलें, पण त्याच्या तावडीत तो पुरता सापडल्यानंतर !

'हां ! हा ! सोड सोड !' असें म्हणत कंटक धावन्या-धावन्या मध्ये पडत आहे, तोंच अत्यंत निर्वाणीच्या निश्चित आणि निष्ठुर स्वरात डोलकाठी ओरडला,

'बाबूजी, तुम्ही थोडे चूप राहा. हा माणूस नाही. सैतान आहे ! तुमच्या हितासाठीसुद्धा त्याचा काटा अुपटलाच पाहिजे. माझा तर हा केवळ हाडवैरी ! ते सारं मग सांगेन ! बोल, रफिअुद्दिन, तूच ना माझा त्या वेळी जीव घेतलास ? तुझ्यापरी तू मला ठार केलं होतंस, नाही ? हा माझा पुनर्जन्म. आता माझ्यापरी दुष्टा, मी तुला ठार करतो '

दात-ओठ खाअून विकाळ क्रोधाने डोलकाठी आपल्या वज्रमुष्टीचे प्रहारामागून प्रहार अुद्दिनच्या डोळ्यावर, नाकावर, छातीवर हाणू लागला. अुद्दिनच्या डोळ्यातून नाकातून, तोंडातून रक्ताच्या धारा अुसळल्या. तो लोळागोळा होअून बेशुद्ध पडला.

अितक्यात डोलकाठीचा शत्रु तोच आपला अेवढेंच काय ते कारण पाळीव नि प्रामाणिक कुत्र्याला पुरतें तसे जाव-याचेंही वैर जागृत होण्यास पुरेसे होअून-त्या जावन्याने आपली धनुकली अुद्दिनवर ताणली आणि त्याचा सणसणता विषारी बाण खिळा ठोकावा तसा तेथल्या तेथेच अुद्दिनच्या छातीत ठोकून दिला. रफि, अुद्दिन ठिकच्या ठिकाणी ठार होअून पडला.

लगेच तो डोलकाठी त्या अघोर समाधानाच्या आवेशात कंटककडे वळून म्हणाला,

'कंटकबाबू, अैका मी ह्या अुद्दिनला असा ढेकडासारखा चुरडून कां मारला ते ! तुम्हाला वाटत असेल की, मीच आततायी, पण ह्या अुद्दिनला तुम्ही ओळखता त्याच्या आधीपासून मी ओळखीत आहे ह्याने असाच गळा दाबून कितीकांचे जीव घेतले आहेत हा पूर्वी अेकदा काळ्या पाण्यावर जन्मठेप बंदिवान् होता, तेव्हा मीही

'वारा अनुकूल सुटून आम्ही 'भगोडे' समुद्रात चांगले वाटेला लागलो. अशा प्रसंगी ह्याने माझ्याजवळची रक्कम लाटण्याच्या दुष्ट हेतूने, मी ह्याचा दुसरा कोणताही अपराध केला नसता, माझा घात करण्याचा बेत केला नि मी अेका फळीवर तारवाच्या काठी उभा राहून पाठमोरा झालो असता ह्याने ती फळी अकस्मात् अुलटून माझ्यासुद्धा त्या भर समुद्रात लवडली. मी लगोलग पुन्हा तारवाला जो धरू जातो, तो ह्याने वल्ह्याची दांडी माझ्या डोक्यात घातली. मी चक्कर येअून पाण्यात गटगळ्या खाअू लागलो, बुडालो! तारू झपाझप पुढे गेलं, मी बुडालो.

'पण अद्‌भुत योगायोगाने मी जो अुमळून पुन्हा पाण्यावर येतो, तो तीच फळी लाटेच्या फटकाऱ्यासरशी माझ्या हाती आली. तिला धरून मी जीव वाचविण्याची पराकाष्ठा करीत आहे, तोंच जावऱ्यांची अेक थोरली 'डुंगी' पुढे घुसून माझ्याजवळ आली नि त्या जावऱ्यांनी त्या त्यांच्या नौकेत, त्या डुंगीत घालून मला वाचवलं. पण ह्याच्या मते मी मेलोच होतो! आणि ह्याचं पुढे काय झालं ते मला ह्या क्षणापर्यंत माहीत नव्हतं. आणि आता तरी ह्याचं नांव अैकताच नि ह्याला प्रत्यक्ष असा अिथे पाहताच हाच तो दुष्ट अितकं मी ओळखलं आणि ह्याने माझ्यावर नि अितर अनेक जणांवर केलेल्या अत्याचाराचा हा असा वचपा काढला! आता तुम्ही मला 'ठीक केलंत' म्हणा व म्हणू नका!'

'ठीक केलंत असंच म्हणणार मी! तुम्ही या नीचाला आता अेकदा मारलंत तसं तीनदा मारलंत ना, तरीही मी तें ठीकच केलंत असं म्हटलं असतं अितके त्याचे अघोर अपराध मलाही ठाअूक आहेत! जें मीच करायला हवं होतं, पण परिस्थितीच्या पेचात असल्याने जें करू शकलो नाही तेंच तुम्ही केलंत? माझ्या पायात रुतलेला जो काटा मला काढवला नाही तो तुम्ही काढलात! त्यापायी माझ्या पुढील बेतात न येत्या त्या अडचणी जरी आल्या, तरी त्याची मला चिंता नाही!'

'नव्हे, नव्हे, हा असता तर ज्या अडचणी तुमच्या पुढील बेतात नक्की येत्या, बहुधा माझ्यासारखाच हा तुमचाही घात करण्यास जो चुकता ना, ते संकट हा अधम साप आता ठेचला गेल्याने अुलट नाहीसं झालं आहे. तुमचा पुढील बेत अधिक निर्विघ्न झाला आहे, असंच तुमच्या प्रत्ययाला मी लवकरच आणून देतो. मी कोण ....'

'होय, तेंच थोडंसं कळायचं मला अुत्कंठा नि आवश्यकताही आहे.'

'पण माझ्या मते तेंच विचारू नये. मी सांगू नये कारण तुम्ही अविश्वासू आहात म्हणून नव्हे. स्वर्गवासी अप्पाजींनी तुमच्या चारित्र्याविषयी मला जें प्रशस्तिपत्र दिलं आहे, तेंच त्या शंकेचं निर्विवाद निराकरण आहे. पण अंदमानातील अघोरी अपराध्यांच्या जगतात त्याच अपराध्यांच्या महकाऱ्याने काळ्या पाण्यावरून पळून जाण्यासारख्या जिवावरच्या कटात पडायचं, त्याने दोन गोष्टी सोडल्याच

पाहिजेत अेक गोष्ट म्हणजे कामाला अपरिहार्य त्याहून अधिक अशी स्वतःची पूर्व-पीठिका दुसऱ्याला सागण नि दुसरी गोष्ट म्हणजे जिवाची आशा! ह्या दोन गोष्टी सोडण अवश्य, हें मी अनुभवाने ठाम ठरवून टाकल आहे तुमची पूर्वपीठिका अवश्य तीं मला माहीत आहे मी हा डोलकाठी, अितकी माझी पूर्वपीठिका तुम्हाला ह्या कामी सध्या पुरे आहे प्रसगी लागेल तशी हप्त्याहप्त्याने मी होअूनच ती आणखी कळवीन आता प्रथम जावऱ्याकडे चला राजा नानकावी हा माझ्या अनुकूल अभिप्रायामुळे स्वत तुमच्या भेटीला अुत्सुकला आहे हो, पण तुमच्यापाशी अेक बदूक काही दारुगोळा नि पोलिसी कपडेही होते ना? हा जावरा सागत होता त!

'आहे तर! पण मी त लपवून ठेवीत आलो अेका कारणासाठी जावऱ्यानी आमच्या हाती तशी हत्यार पाहून बिचकू नये, आणि त्या वस्तु गाड्याच हाती ठेवीत आलो ह्या अधम अुद्दिनवरील माझ्या अत स्थ अविश्वासाने!'

'पण प्रर म्हणाल, तर आपल्यापाशी त्या पळून जाण्याच्या साहसाला अत्यत अवश्य नि माझ्यापाशी ज्याची अुणीव अशा वस्तु आहेत, ह अैकल्यानेच मला आपल्या सहकार्याची अितकी निकडीची आढ लागली चला आणा त्या वस्तु अिकडे आधी'

पाल्या पाचोळ्यात दडविलेल्या त्या साऱ्या वस्तु कटकने तेथे आणताच डोल काठीने प्रथम त्या बदुकीवर बुभुक्षिताने पक्वान्नावर घालावी तशी अगदी झडपच घातली आणि मोठ्या अैटीने ती बदूक त्या नागड्या वीराने खाद्यावर टाकून पुढे होअून कटकला अगदी सैनिक तोऱ्याची आज्ञा सोडली

'चला आव मरे पीछे पीछे!'

'वा!' कटक हसला 'बदुकीच्या स्पर्शासरशी तुमची पावलसुद्धा अेखाद्या सैनिकासारखी टपटप पडू लागली बुवा! अगात कोण्या सैनिकाचा सचारच झाला जणू!'

'कोण्या सैनिकाचा कशाला? मी स्वत अेक सैनिकच होतो की पूर्वी अेकदा! मी लढाअी पाहिलेली आहे बाबूजी, लढलोही आहे प्रत्यक्ष रणात!'

पण तोडातून पटकन निघून गेलेली स्वत च्या पूर्ववृत्तान्ताची अितकी माहितीच अधिक झाली असे वाटून की काय डोलकाठी अेकदम चूप झाला आणि तो कटक नि तो जावरा ह्या दोघांच्या सैन्याच म्होरकेपण घेअून त्या रानात अेखाद्या सेनानीसारखा त्या नानकावीच्या रानवट राजधानीकडे चाल करून जाअू लागला

* * *

## २०. तुरुंगातून मालती पसार

स्त्रियांच्या बंदिगृहातील रांपाकाच्या छपरीमध्ये अेका मोठ्या भाजीपाल्याच्या लोखंडी 'डेगी' खाली जाळ सारीत कटकी अुभी होती. बंदिवान स्त्रियांच्या वेषाप्रमाणे अेक गुडघाभर जाडें-भरडें लुगडें, वेणी-फणी तेलावांचूनच आठवडा आठवडा कराची लागत असल्यामुळे आणि अगदी ओंगळ व नीच अशा अनेक बंदिवान स्त्रियांमध्ये रात्रंदिवस सरमिसळ राहावे लागत असल्यामुळे विस्कटलेले नि अुवांनी बुजबुजाट झालेले केस, रखरखलेल्या मोठमोठ्या चुल्यांच्या अुन्हापात सतत राबता राबता धुरकटलेलें नि घामाघूम झालेलें अंग, पण तशा परिस्थितीतही मुळचीच सुभग असलेली ती युवती, ती कटकी, मालती त्या आगीने भडकलेल्या मोठमोठ्या चुल्यांच्या मध्ये पंचाग्निसाधनात तपस्या शोभावी, तशी शोभत होती.

. निदान तिच्यापुढे त्या वेळी अुभ्या असलेल्या आणि तिला नकळत तिच्याकडे सहृदय कौतुकाने निरखून पाहणाऱ्या अनसूया जमादारिणीला तरी ती कटकी तशी शोभत आहे अशी भासली.

तेथे काम करीत असलेली दुसरी अेक बंदिवान स्त्री जी होती, ती पिठाची पोती आणण्याच्या कामावर निघून जाताच तेथे अेकट्या अुरलेल्या कटकीला सावध करण्यासाठी अनसूया जमादारिणीने चुटकी वाजवली. कटकीने वर पाहिले, थोडी पुढे झाली, आजूबाजूस न्याहाळलें आणि अनसूयेच्या हातची अेक चिठ्ठी चटकन् घेअून बाजूला लाकडाच्या ढिगाआड जाअून लपली. अनसूया जमादारीण कोणी आत येअू नये म्हणून दारातच अुभी राहिली. अेक-दोन मिनिटांतच कटकीने ती चिठ्ठी वाचून जाळात फेकली न फेकली. तोंच अनसूयेने 'काम झालं ना?' असें

टाकीत होती आणि तरीही लवलेश जरी काही कोठें चुकलें, तिच्या वा अितरांच्या हालचालींत लवलेशही फरक जरी पडला, तरी ती होती त्या संकटाहून कितीतरी भयंकर अशा दुसऱ्या संकटात ती पडेल ह्या जाणिवेने मधूनच थरथर कापत होती. पण जर तो सारा कट संतोतंत जुळून आला तर ?...अेका चोवीस तासाच्या आत मुक्ताच्या स्वर्गात पाअूल आणि किसनच्या गळ्यात मिठी !

तिच्या मनात हें वादळ चालू होतें; पण तिचें वर्तन ह्या बंदिगृहातील घड्याळाप्रमाणे, बंदिगृहाने आखून दिलेल्या शिस्तीप्रमाणे संतोतंत चाललें होतें. साऱ्या बंदिवानांचीं जेवणें होअून दुपारच्या वेळी गैपाकविभागातील बंदिस्त्रियांना जी थोडी सुटी मिळते, तीत कटकी नित्याप्रमाणे वरवर थोडी स्वस्थ पडली. पण तिचें मन असह्य अस्वस्थतेने आणि साशंक अपेक्षेने काय होअील, कसें होअील, अशा चिंतेत वरखाली होत होतें. ती वरचेवर अनसूया जमादारिणीच्या वाटेकडे डोळे लावून बसे. तीनचे ठोके घड्याळात पडताच तिला वाटलें, चारचेच पडले. तिची बाहेरच्या कामावर जाण्याची वेळ अेकदाची आली; पण तीनच वाजले, हें कळताच ती ओशाळलीशी होअून पुन्हा खालीं बसली. अितक्यात खरोखरीच चार वाजले, अनसूया जमादारिणीने बंदिपालाच्या सांगण्यावरून नेहमीप्रमाणे 'कंटकी!' अशी हाक मारिली. सर्वासमक्ष कंटकीला तिच्या संध्याकाळच्या कामावर बाहेर जाण्याची आज्ञा मिळाली.

हें बाहेरचें काम म्हणजे त्या बंदिवानांसाठी काढलेल्या बंदिगृहाबाहेरील प्रेमोद्यानात जाअून झाड-लोट करण्याचें आणि व्यवस्था ठेवण्याचे होतें. कंटकीची चोख चाल-रीत पाहून बंदिपालाने तें तिच्याकडेच दिलेले होतें. ती प्रत्यही त्या प्रेमोद्यानात जाण्यासाठी अशीच बंदिगृहाच्या दाराबाहेर पडे, संध्याकाळी झाडलोट व्यवस्था सपून प्रेमोद्यान बंद झालें की पुन्हा त्या दाराच्या आत येअून बंदिगृहात

हसऱ्या ढिलाईने ती त्या बंदिगृहाच्या दाराबाहेर पडली. अनसूया त्या वेळी तेथे ढुंकून पाहण्यासही आली नव्हती. आपल्या गावीसुद्धा ते प्रकरण नव्हते असे पुढे सांगता यावे, ह्या हेतूने अनसूयेने बंदिगृहातील दुसऱ्याच एका कामामध्ये गढून गेल्याचा बहाणा करण्याचा चाणाक्षपणा दाखवून बंदिगृहामधल्या अगदी मधल्या चौकात ती केव्हाच निघून गेली होती.

बंदिवानांतील चांगल्या चालीच्या स्त्री-पुरुषांना विवाहाची अनुज्ञा मिळाल्यानंतर ते काळ्या पाण्यावरील बंदिवान आपल्याला आवडेल असा जोड निवडण्यासाठी त्या बागेत येत. ते नेहमीच्या रीतीप्रमाणे तेथे त्या दिवशीही गोळा होऊं लागले, परस्परांच्या सांगातीं बोलण्या-बसण्यांत गुंग झाले. झाडलोट करून कटकीही त्यांच्या अधून-मधून फिरूं लागली, पण तिचें चित्त सगळें त्या बागेपुढून जाणाऱ्या सडकेकडे होतें. पांचचे ठोके पडले, पण अजून तिला हवा असलेला मनुष्य त्या सडकेवर दिसेना. ती अस्वस्थ झाली, दृष्टि ताण-ताणून पाहूं लागली, पांचानंतरचें प्रत्येक मिनिट तिला तासासारखें दीर्घ वाटूं लागलें. सव्वापांच झाले !

त्या पोलिसांची ती कडक भाषा आणि निर्भीड भेट पाहून तो पहारेक[illegible] वरमला. नाही म्हणावें तर कमिशनरच अंदमानचे मुख्य सरकार ! हे त्या पोलिस ! ह्याच्याशी 'हो-नाही' करीत तेरी-मेरीवर येण्याने वेळी आपणच गोत्या येभू, अशा शंकेने तो पहारेकरी गोंधळात पडला आहे, तोंच त्या पोलिसांनी कं[illegible] कीला पुढे घालून 'चलो !' असें आज्ञापिलें. त्या आज्ञेची वाटसुद्धा न पाह[illegible] कंटकीही आधीच वाट चालू लागली होती. पाच मिनिटांच्या आत ती तिथे अेक वळणाने दुसऱ्याच वाटेला निघूनही गेली !

तो पहारेकरी ती दिसेनाशी होअीतों त्या वाटेकडेच पाहत राहिला. म[illegible] अध्र्यापाअूण तासाने ती बाग वेळच्या वेळी बंद करून तो बंदिगृहात गेला. संध्या काळी गणती करताना अेक स्त्री बंदिवान अुणा भरला आणि ती कंटकीच होय असे कळताच बंदिपालाने त्या पहारेकऱ्याला दटावले त्याने ताठ अुत्तर केलें,

'चीफ कमिशनरसावको पूछिये मेरा क्या कसूर ? पोलीस हुपसरने कंटकी को पकडकर अुसके साथ चल दिया !'

'चीफ कमिशनरच्या बंगल्यावर बंदिवानाना अचानकपणे अनेकवार बोलावण्यात येतें. हिंदुस्थानचें नवें वॉरंट किंवा अितर काही सुटका, बंदीची सूट अित्यादि कामकाजात असें नेहमी घडतें, पण बंदिपालाला न विचारता परस्परे हत्यारबंद पोलीस धाडून अेका तरुण स्त्रीबंदीला पकडून नेणे हें पद्धतीच्या तरी सोडूनच ! ह्यास्तव बंदिपालाने कमिशनरच्या बंगल्यावर तत्काळ दूताना धाडलें. नावेंतून त्या बंगल्यावर जावें लागे. तितके लांबून जाअून दूत रात्री परत येताच त्यानी कमिशनरचा निरोप आणिला की, 'अिकडून कंटकी नांवाच्या कोणत्याही स्त्री-बद्याला बोलावणं गेलेलं नाही !'

अर्थात्, कोणा तरी दोघा पोलिसांनी त्या तरुण स्त्रीबंदीला पळविलें असलें पाहिजे ! हें स्पष्ट होताच बंदिपाल गडबडला. बंदिगृहाच्या 'संकट-घंटा' अेकदम ठणठणठण करीत मोठमोठ्याने वाजू लागल्या. जिकडे-तिकडे शिपायांची धाव-पळ नि शोध नि नाकेबंदी होअू लागली विशेषतः पोलिसाच्या चाळीतून ते दोघे पोलिस कोण, ह्याचा काढावयाचा शोध चालला कारण त्या मुलीला धरून नेणारे कोणी तरी दोघे पोलिस शिपाअीच होते, असा पुरावा जिकडून-तिकडून मिळत चालला. वाटेने जाता-येता दोघे हत्यारबंद शिपाअी अेका मुलीला घेअून जाताना आपण पाहिले, पण पोलिसच असल्याने सरकारी काम समजून आपण विशेष चित्त घातले नाही, असे पुष्कळ वाटसरूनीही सांगितलें. रात्रभर शोध चालला, पण ते पोलिस कोण हे अुमगेना, त्या मुलीला घेअून ते गेले कोठे तें कळेना !

अशा रीतीने बंदिगृहात कमिशनरकडचा अुलगडा घेअून दूत रात्री परत येअीतों कंटकी पळविली हें नक्की ठरविता आलें नव्हतें. त्यामुळे कंटक आणि डोल्याही ह्याना चार पांच तास निर्वेध मिळाले तोंवर त्याचा पाठलाग अशा

आरंभिलातुद्धा गेला नव्हता. पोलिसांचा वेष करण्यात त्यांनी दाखविलेला चाणाक्ष-पणा त्यांच्या चांगलाच अुपयोगी पडला. कारण सरकारला शंका भलत्याच बाजूची आली, शोध नको त्याच दिशेला चालला. त्याचा कटकने पुरा-पुरा लाभ घेतला. मागे जावऱ्यांनी अिंग्रजी बंदिवानांवर छापा घातला तेव्हा जो अिंग्रजी पोलिस जमादार मारला गेला आणि ज्याची बंदूक नि कपडे-पट्टे कटकने काढून नेले होते, ते आणि डोलकाठीपाशी असाच अेक अुपटून आणिलेला त्याचा स्वतःचा बंदूक-पट्टा आणि पोलिसी कपड्याचा असलेला अेक संच; अशा त्या पोलिसांच्या दोन बंदुकांच्या आणि वेषांच्या अुपयोगाने त्यांच्या कटाचा तो साहसी प्रारंभ तरी निर्विघ्न पार पडला.

त्याच्याजवळ पोलिसी वेषातच असलेला 'डोलकाठी' हा गेली कित्येक वर्षे 'भगोडा' म्हणून पकडावा असा हुकूम सुटलेला असताही काळ्या पाण्यावरील सरकारी वसाहतीत छद्मवेषाने हिंडण्यात आणि लगोलग अरण्यातील त्या जाव-ऱ्यांच्या राजधानीत जाअून लपण्यात अगदी पटाअीत झालेला होता. सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धातील वृद्ध वीर जे अप्पाजी त्यांच्याकडेही तो ह्याच छद्मवेषाने नित्य जाअी-येअी. कटकला जावऱ्यांनी आश्रय दिल्यानंतर डोलकाठीने ह्या विद्येत कटकलाही पटाअीत करून सोडले. कटकच्या बहिणीला – कटकीला – बंदिगृहातून सोडविण्याचा हा धाडसी कट डोलकाठीनेच रचिला. त्यानेच कटकसह ह्या छद्मवेषात अनसूयेची भेट तिच्या घरी घेतली; कटकने तिच्याकडे ठेव म्हणून ठेविलेली हजार दीडहजारांची रक्कम कटकच्या सांगण्याप्रमाणे तिच्याकडून परत घेतली आणि कटकीला बंदिगृहात देण्यासाठी ती कटाविषयीची गुप्त चिठ्ठी अनसूयेच्या हाती धाडली होती. त्या चिठ्ठीप्रमाणे कटकीने ठराविक वेळीं धीटपणे त्या बारी-तून निसटून ह्या पोलिसी छद्मवेषात आलेल्या आपल्या मवगड्यासह जन्मठेप बंदि-वासाच्या वेड्या अेका क्षणात तोडून टाकण्याचे हे जिवावरचे धाडस केलें होते.

लोकांनी ती डुंगी त्या तरुणीला घेऊन दूरवर जाताना पाहिली त्यांनाही तो देखावा चरासमा चमत्कारिक वाटला असताही हुकूमचंद असे दोन पोलिस शिपाईच तिच्यात आहेत, असें पाहून काही गवगवा करण्याची बुद्धि वा छाती झाली नाही. थोड्याच वेळाने डुंगी काळ्या पाण्याच्या ओसाडातील ओसाड आणि निबिड, निर्जन अरण्याच्या काठाशी असलेल्या समुद्राच्या भागात शिरली.

कंटकच्या अंगाशी अगदी टेकून कंटकी बसली होती. ती त्याची सख्खी 'बहीण' च आहे, असें मानणाऱ्या डोलकाठीला त्यात काहीच विशेष वाटलें नाही- परंतु तिची ती मनोहर तनुलतिका आणि तें मनमिळाऊ हसणें, बोलणें, वागणें पाहून-पाहून त्या डोलकाठीला वरचेवर असें मात्र वाटल्यावांचून राहिले नाही की, जर ही युवती आपल्याही अंगाशी अगदी अशीच टेकून बसली तर किती गोड वाटेल !

ती डुंगी निर्जन आणि निर्विघ्न समुद्रभागात शिरताच जलौघावर जशजशी सलीलपणे डुलू लागली, तसेंच कंटकीचें हृदयही आनंदौघावर सलीलपणे डोलू लागलें. पिंजऱ्यातून सुटलेल्या पाखराला निस्सीम आनंद होतोच, पण त्या बंदीतून निसटलेल्या मालतीचा आनंद त्याहूनही निस्सीम होता. कारण पिंजऱ्यातून सुटलेलें पाखरू दिसेल त्या झाडावर जाऊन बसतें खरें, पण त्याचे आप्तेष्टमित्र असलेले अितर पक्षी त्याला हुसकू लागतात. त्याला निर्भय असें घरटेंच लगोलग सापडणारें नसतें. पण जन्मठेपीच्या बंदीतून निसटलेलें हें जें पाखरू ह्या डुंगीत हसत-खिदळत आहे, त्याला त्याच्या येकुलत्या अेका मित्राने, अिष्टाने, लगोलग आपणावलेलें आहे; किशनच्या प्रणयप्रिय लोभात ह्या पाखराला स्नेहमय संगतीची आवडती ऊब देणारें अेक गोड घरटें लगोलग सापडलेलें होतें ! तें पाखरू, ती मालती त्या सुटकेच्या अुल्हासात आणि किशनच्या संगतीत अेकदम अितकी रंगून गेली की, तिला जन्मठेपेची भयंकर शिक्षा आपणाला कधी काळी झालेली आहे, आता सुद्धा त्या शिक्षेची कृत्या आपल्याभोवती फिरत्या घालीत आहे, ह्याची त्या क्षणापुरती तरी विस्मृतीच पडल्यासारखी झाली. सध्या आपण कटकी आहोत, मालती नव्हे, हें सुद्धा ती विसरली. तिच्यात खग्रास ग्रहण लागलेली शशिकला जशी आकाशात, तशी 'मालती' जी अदृश्यच झालेली होती, ती 'कटकी'च्या जाणिवेचे तें ग्रहण सुटताच पुन्हा पहिल्या अितकीच सुंदर, सुभग आणि सुखद अशा स्वरूपात प्रकटली. त्या आनंदाच्या भरात मालती मालतीसारखीच पुन्हा अेकदा हसू, रसू, डोलू, बोलू लागली. किशन पण तिला पुन्हा किशनसारखाच भासू लागला. ती 'डुंगी' त्या समुद्राच्या सलील लाटांवर अुच-नखल हालताना थोडी जरी कलती झाली तरी त्या निमित्ते सगळाच तोल सुटल्याचा लडिवाळ बहाणा करून मालती किशनच्या वक्षःस्थलावर झोक टाकून पडे, किशन तिला आपल्या बाहूत सावरून धरताना आलिंगून धरी. असें स्वच्छंद सुख आस्वादिता आस्वादिता त्याची निशाच चढून तीत

तिच्याभोवती अद्यापिहि असलेल्या छद्मतेच्या आवरणाला मालतीने पटकन् दूर सारले आणि असावधपणे बोलून गेली,

' किशन, बघ, बघ, त्या लहानशा लाटेत ती सूर्याची साजकिरण घुसताच रंगीबेरंगी गुलाबफुलाच्या हारासारखीच ती लाट कशी शोभू लागली बघ ! समुद्रातील रंगी-बेरंगी गुलाबाचा हार कसा असतो ते दाखविण्यासाठीच ही लहानशी फुललेली लाट अशीची अशीच अुचलून अंदमानचे अेक आश्चर्य म्हणून आठवणीसाठी आअीला नेअून दाखवावी, असं मला वाटत ! अे किशन '

ती पुढे काही बोलणार ताच किशनने तिची करंगुळी सावधपणाच्या सूचनेसाठी दाबली तीही चपापली कारण दोनदा तिने किशनला ' किशन ' म्हणून हाक मारिल्यामुळे डोलकाठीला साहजिक जिज्ञासा होअून तो विचारता झाला,

' काय ? ' किशन '! ' म्हणजे कटकबाबूच घरच खर नाव किशन होत की काय ? आणि तुमची आअी आहे अजून ? कुठे असतात त्या ? कटकबाबूच खर नाव जस किशन तस तुझही खर नाव कटकी नसून दुसर काही आहे की काय ? खरच तुझ्यासारख्या फुलपाखराला अेखाद फुलाच नाव वा पाखराच सुरेख नाव असायला पाहिजे ! '

डोल्काठी आपल्या धटिंगण स्वभावानुसार वाटले ते अुद्दडपणे बोलून गेला. किशन मनात चपापला आपल अज्ञातवासातले छद्म स्वरूप झुगारून देण्याइतके काही संकटाच्या कैचीतून आपण मुळीच सुटलेला नाही ह तो जाणून होता विनोदाचा रुपलेला काटा विनोदाच्याच कारधाने काढून टाकण्यासाठी किशन हसला

' नावापुरतच बोलायच तर तुम्हालाही 'डोल्काठी ' हे नाव काही पाळण्यातच ठेवल गेलेल नसाव आणि मी तुम्हाला तुमच खर नाव वा वृत्त विचारल, तेव्हा तुम्हीच मला काय सूत्र शिकवलत ? ' काळ्या पाण्यावरून ज्याना यशस्वीपणे पळून जायच, त्यानी आपल पूर्ववृत्त दुसऱ्याला अुगीच सागण नि जिवाची भीति ह्या दोन गोष्टी वर्ज्याव्यात ! ठीक तर मग त्याच अुपदेशाप्रमाणे आम्हा बहीणभावडाचा खरी नाव आम्ही तुम्हाला तावर मागत नाही की, जोवर तुम्ही तुमच डोल्काठी ह खोट नाव सोडीत नाही '

' म्हणजे तुमची खरी नाव कटक-कटकी ही सोडून दुसरी कोणती तरी आहेतच तर ! हे तरी बोलून गेलातच की स्वत ! आणि तुमच तर नाव किशन' हेच '

हा सगळा गोंधळ झटकन् सपवावा म्हणून मालती मध्येच म्हणाली

' नाही हो मी किनी ह्या सुटकेच्या आनदाने झपाटल्यामुळे वेडी पिशीच झाले आहे माझ्या लहानपणच्या अेका नातलगाच नाव ताडी असलेल, तच पटकन् तोडी आल माझ्या कटकभाअूला हाक मारताना ! '

परंतु ह्या चुकीच्या जाणिवेसरशी आपल्याला झालेला ह्या सुटकेचा जितका आनंदही चुकीचाच, ही सुटका म्हणजे सुटकेच्या प्रयत्नाचा फलोन्मुख आरंभ होय, अंतिम सफलता नव्हे, हें तिच्या चडवटपणे लक्षात आले. ती किंचित् शी विमनस्क होऊन बसली.

मघा त्या सखोल समुद्रावर पाखरासारखी उडत, बसत चालणारी ती डुगी, त्या जलवीचि, ती रंगी-बेरंगी किरणे आणि बंदिवासातून आपण सुटलो ही उन्मादक जाणीव ह्यांच्यातच ती मग्न होती, पण आता ती आनंदाची नौका ज्यावर तरंगत चालली होती तो समुद्र किती खोल आहे, तिकडेही तिचे लक्ष गेले

*'किती खोल आहे रे हा समुद्र, नि किती लहान आहे ही आपली डुगी !'* समुद्राच्या भीषण खोलीत डोकावत विमनस्क मालती किशनला म्हणाली

'हो पण अशा लहान नौका अशा सखोल समुद्रांना तरून परतीरालाही जाऊं शकतात की नितीतरी !' किशनने तिच्या मनाला त्या वेळी हवे तेच उत्तेजक उत्तर केले.

'किती गोड बोलतोस रे तू !' लडिवाळपणाने किशनच्या पाठीवर हळूच अेक थाप मारीत मालती मराठीत म्हणाली. तिला वाटले, डोलकाठीला मराठी येत नसावे कारण जितका वेळ अंदमानात सर्व जण नेहमी बोलतात त्या हिंदीनच तीं सगळी बोलत होती

'पण माझ्या पाठीवर तुम्ही तसच लडिवाळपणे थोपटून विचाराल न, तर मी पण तसच गोड बोलेन की !' डोलकाठी त्याच्या सैनिक बाण्याच्या धसमुसळ्या विनोदाने मराठीतच मध्येच म्हणाला इतकेच नव्हे, तर निष्कपट मनाने मालतीच्या पाठीवर आपण होऊन त्याने तशीच अेक हलकी थाप मारली

मालती चमकून म्हणाली, ' म्हणजे ? तुम्हालाही मराठी येत वाटत ? महा-

जावरे लोक अेक मोठी आगोटी पेटवून त्या वेळी तिच्याभोवती बसलेले होते. त्या आगोटीवर रानडुकराचे अेक धूडचे धूड अुलटे टांगलेले होते त्याची समाअीक पारध असली, म्हणजे तो प्राणी अशा आगोटीवर ते टांगून ठेवतात आणि तो तसा खूप धुमसला, भाजला म्हणजे मग त्याला काढून त्याच्या त्या अर्ध्याकच्च्या मांसाचे तुकडे सगळ्यांना वाटून देण्यात येतात ती जेवणावळ अुरकली की त्या आगोटी-भोवती ते सारे स्त्री-पुरुष सरमिसळ नि अुर्लिंग अवस्थेत आपला नंगा नाच चालू करतात अशा आगोट्या वेळी प्रसंगी तीन-चारही असतात आणि त्याभोवती जेवणावळीच्या आणि नाचाच्याही निरनिराळ्या तीन चार पंक्ति झडतात त्या ठराविक कार्यक्रमात हे तिघे पाहुणे त्या जिवावरच्या साहसातून असे यशस्वी होअून परत येताच आता अेक निराळाच रंग भरला ते सारे त्या तिघांभोवती घो घो जमा झाले

*त्यातही ज्याचे त्याचे लक्ष कटकीकडे* राजा नानकोवोला ह्या साहसी कटाची माहिती होतीच त्याच्या विचारेच कटक आणि डोलकाठी कटकीला सोडवून आणण्याच्या कामगिरीवर गेले होते, कटकीला अिंग्रजाच्या थेट जन्मठेपीच्या बंदि-गृहातून असी छिनावून आणण्यात अिंग्रजाच्या कडेकोट बंदोबस्ताच्या बढाअी-चाच पाणअुतारा केला आणि तोही आपल्या जावऱ्याच्या साहाय्याने, जावऱ्याच्या आधिपत्याखाली !—असा राजा नानकावोला स्वत चाच गौरव वाटला त्या विजयाची पताकाच असलेली ती कटकी तिला पाहता पाहता त्याला्ही पुरेसेच होअीना पण त्या सगळ्यात जावऱ्याच्या बायका-मुलींची लगबग तर विचारूच नका ! आगटीच्या भडक अुजेडात तिच्याकडे त्या आपुलकीने पाहात, हसत, खुणावीत घोळ घालून अुभ्या राहिल्या पण तिच्यापेक्षाही जर त्यांना कशाकडे विशेष निरखावेसे वाटत असले, तर ते तिच्या त्या साडीकडे !

मारतीला त्या जावऱ्याच्या विवस्त्र स्त्रिया सारख्या खुणावू लागल्या, 'हे काय ? त्या स्त्रीने शरीराभोवती हे काय अभद्र गुंडाळले आहे ? तशी ती दिसते आहे किती तरी सुरेख ! मग कपड्यात कशाला झाकते आहे स्वत ला अशी लाजून? काय नेसली आहे हा ते ?' असे नाना प्रश्न त्या आपसात विचारीत हास्या

तशाच वावरताना पाहून मालतीलाही पराकाष्ठेची लाज वाटली तिने अेकदा दोनदा तर डोळेच झाकून घेतले मग खालीच पाहात अुभी राहिली

राजा नानवोबीला सुद्धा जरा पेचच पडला त्याच्या राणीने, त्या फुलीने सुद्धा हट्ट धरला की, 'कटकीने आपल्या अिथे असेतो तरी लुगड बिगड नेसू नये तिच हें अुदाहरण पाहून आपल्या मुली-बाळींनाही असच अश्लील वळण लागायच!'

कटकीची त्याना दया यत होती तिच्या यातना अैकून आणि तिच्याकडे पाहून सर्व स्त्रियाना आपुलकीही वाटत होती, पण वस्त्र नमण्याच्या ह्या तिच्या अश्लीलतेची तेवढी त्याना किळस यअी नेवटी राणी फुलीने कटकीच्या साडीच्या पदराला थोडासा हिसका देअून ममतेन खुणावल, 'सोडून टाक हे लुगड नि स्त्रीला शोभा देणाऱ्या विवस्त्रपणे वागण्याचा शिष्टाचार पाळ!' पण त्या हिसक्याने अुतरलेला पदर सावरून मालतीने तो अधिकच घट्ट धरला

आता प्रकरण विकोपाला जात की काय अशा भयाने डोल्काठीने मध्ये पडून, सारे हसण्यावारी नेअून हमी घेतली की, 'कटकीची वस्त्र नसायची ही जन्माची खोड! अेकदम ती कशी सुधारणार? दोन चार दिवसात सभ्य स्त्रिया प्रमाणे विवस्त्र राहण्याची सवय तिलाही होअीलच होअील, तोवर शिष्टाचाराची तिच्यावर सक्ती नसावी नेसण्याच्याच नव्हे, पण खाण्याच्या, गाण्याच्या, नाचण्याच्या प्रकरणीसुद्धा!'

✦ ✦ ✦

## २१ किशन आणि मालती

सोड सोड सोड बाण! निसटला बघ तो वराह त्या झुडपातून!'

किशनच्या ह्या शब्दासरशी झाडावर दडून बसलेल्या मालतीच्या धनुवलीवरून सणसणसण करीत बाणामागून बाण सुटू लागले तो रानडुकर ज्या झुडपात दबून बसला होता त्याच्यामागून अेका लाब भाल्याने किशन त्याला किती वळ तरी डुकून-डुलवण्याम चटत होता त्या त्रासान वैतागून शेवटी तो वराह झुडपातून किशन होता त्याच्या अुलट दिशेन बाहर पडला आणि सुसाटाने भरधाव पुढे धुमला त्याची तेथच वाट पाहात मालती अेका झाडावर धनुबाण सज्ज धरून बसलेली होती जावऱ्याच्या रानात राहू लागल्यापासून जावऱ्याच्या स्त्रिया जशा त्यांच्या पुरुषासह मृगयेला स्वत जात असत, तशी तीही किशनसह प्रत्यही जाअू लागली होती आणि त्या रानातील निवासाच्या गेल्या तीन चार महिन्यांत

धनुष्य-बाणाच्या अुपयोगात आणि मृगयेच्या धाडसात जावऱ्याच्या स्त्रियाप्रमाणेच तीही आता पटाअीत होत चालली होती. आज वराहाची मृगयासुद्धा स्वत करण्याचा आग्रह तिने धरिल्यामुळे त्याचा पहिला धडा किशन तिला देत होता. वराहाला हुडकीत-हुसकीत बाणाच्या चांगल्या टप्प्यात, सुरक्षिततेकरिता मालती ज्या झाडा-वर पाळत राखून बसली होती त्या बाजूला त्याला आणून सोडण्याचे किशनकडे असलेले काम त्याने चोख बजावले आणि त्या झुडपातून तो वराह भरधाव बाहेर पडताच मालतीने त्याच्यावर बाणाचा मारा केला.

तिचे पहिले दोन बाण जे त्या बलिष्ठ रानडुकराला लागले ते जशी कुसळेच बोचावी तसे दुर्लक्षून तो पशु तसाच धावत राहिला अितक्यात तिने होते नव्हते ते सारे बळ खर्चून मारिलेला तिचा शेवटचा बाण त्याच्या थेट कुशीतच घुसला. थोडासा धडपडत तसाच पुढे जातो, तो तो वराह धाड्दिशी भूमीवर कोसळला.

ते पाहताच मालती झाडावरून खाली अुतरली दुरून धावतच येणाऱ्या किशनला तिने मध्येच हटकले आणि आपल्या शौर्याची वाखाणणी त्याच्याकडून, प्रजेकडून कर अुकळावा तशा अधिकाराने, अुकळण्यासाठी त्याला म्हणाली,

'काय ? केली की नाही मी जिवावरची मृगया आज ? '

'झाडावरची म्हण ! जिवावरची नव्हे ! ' किशन हसला ' ज्याने पायदळी पाठलागून त्या हिंस्र प्राण्याला तुझ्यापुढे आयत आणून सोडल, त्याने जिवावरच काम केल ! सुरक्षितपणे झाडावर बसायच काम तेवढ तू केलस '

'प्रत्येक राणी, जी मृगया करते तिच्या हाताखाली हाकेवे ठेवलेलेच असतात! तू चांगला हाक्या आहेस अितकच काय ते म्हण हव तर ! पण ज्याचा बाण, त्याची मृगया ! ह्या वराहाच्या कुशीत घुसलेला हा बाण आहे माझा, अर्थात् मृगयाही माझीच ! '

'चालेल ! तो सगळाचा सगळा रानडुकर तू अेकटीच खा, मग तर झाल! नाही तरी मी आता शाकाहारीच होणार आहे, ज्याला रानडुकराचे गुण हवेत त्याने रानडुकर खाव, मी केळी, बटाटे ,

'अगदी योग्य ! ज्याला आपल्या डोक्यात बटाटेच भरायला हवेत, त्याने तेच खावेत ! ' मालतीने त्याला मध्येच अडविले

अितक्यात 'अू ऽऽ अू ऽऽऽ' अशी जावऱ्याची हाव मारणारी अुच किंकाळी आली. वळून पाहतो, तो किशनच्या हाताखाली आताशी काम करीत असलेला अेक जावरा त्याच्याकडे धावत-धावत येत असलेला आढळला. तो येताच त्याने रडण्याचा अेक हेल काढून, डोळे चोळून आणि अेक-दोन शब्द बोलून त्या हाव-भावांनी आणि शब्दांनी मिळून जो निरोप दिला, त्याचे सगळे वाक्य असे झाले असते.

'बापूजी ! चला चला, तुम्हाला राजा नानकोबी रडायला बोलावतो आहे !'

तो त्याचा आशय समजून किशनने माल्तीला शब्दांत सांगितला, 'अंकल? राजा नानकोबी मला रडायला बोलावतो आहे !'

'अिश्श ! म्हणजे रे काय ? तुला रडायला बोलावणे म्हणजे काय ? त्याला रडायचे तर रडो बापडा !'

'अग पण तो अेकला रडून कसे भागेल ? त्याच्या नातलगांतला अेक जावरा जो काल पेचक्याच्या आजारी होता ना, तो मेला आहे. त्याच्यासाठी त्याच्यामागे राहिलेले लोक जितके अधिक जमून जितके मोठमोठ्याने रडतील तितका त्या मृताचा आत्मा — त्याचे भूत संतुष्ट होओील, नाही तर ते जिवंत आप्तेष्टांना सतावीत राहील, अशी त्यांची समजूत असते म्हणून कोणी मेले की ते सर्वांना 'रडायला या' असे आमंत्रितात. हसतेस काय ? आपल्यातही पूर्वी अशीच समजूत असे; आजही आपल्यातील अनेक जातींत मोलकरी आणून रडायला बसवतानाच 'मोल घातले रडाया । नाही आसू आणि माया ।।' ख्रिश्चन-मुसलमानांतही प्रेत पुरून ते पुढे अुठणार आहेत म्हणून जतन करून ठेवावे, अशी जी धर्मसमजूत आहे ती जावऱ्यांच्या ह्या परलोकविद्येचाच धडा गिरवीत आलेली आहे, नाही का ? जावरे तर मेलेल्यासाठी जिवंतांनी नुसते रडले की पुरे अेवढेच मानतात, पण पूर्वी मिसर ते जपानपर्यंत अनेक राष्ट्रे मेलेल्याच्या सांगतीसाठी जिवंत आप्तेष्टांनी स्वतःलाही पुरून घ्यावे नि परलोकी जावे असे मानीत ! मेलेल्याच्या जिवंत बायका, चाकर, दास-दासी ह्यांनाही त्याच्या थडग्यात पुरीत असत ! बर ...' त्या जावऱ्याकडे वळून किशन त्यास म्हणाला, 'जा नि आम्ही रडायला लवकरच येतो असे नानकोबीला सांग जा. पण थांब, हे बघ, हा वराह पण पाठीवर टाकून घेऊन जा नि आमच्या वतीने राजा नानकोबीला ही भेट दिली आहे म्हणून सांग, जा !'

त्या जावऱ्याने त्या वराहाला त्याच्या विशिष्ट पद्धतीने बांधून ते धूड पाठीवर टाकले आणि तो निघून गेला.

'किती ग दमली आहेस !' किशनने माल्तीला प्रेमळ दृष्टीने निरखीत आणि तिचा अेक हात आपल्या हातात घेत संबोधिले. 'माल्ती, मृगयेच्या नादात सावजापाठोमागे सकाळपासून धावपळ करीत तू किती घामाघूम झाली आहेस नि थकलेली दिसत आहेस ! आणि त्यामुळेच किती सुंदर ! हे बघ घामाचे स्वच्छ नि शुभ्र बिंदु मोत्याच्या बिंदीसारखे तुझ्या निटिलाला नि हा गुलाबी रक्तिमा तुझ्या गालांना कसा खुलवीत आहे ! ये, बैस थोडी अशी माझ्याजवळ. विसावा घे थोडासा नि मग जाऊ आपण जावऱ्याकडे.' तिला गजारीत किशन तेथील अेका खुर्चीसारख्या शिलातलावर खाली पाय सोडून बसला आणि तिच्या त्याने हातात घेतलेल्या डाव्या हाताला अेक प्रेमळ हिसका देऊन आपल्याकडे ओढले.

हवे तेच गोड निमित्त मिळाल्यामुळे प्रसन्नलेली मालती अल्गत जाअून किशनच्या मांडीवर बसली आपला अुजवा हात त्याच्या मानेभोवती टाकीत, पाय त्याच्या पायावर लावते रुळवीत, आपल मुखमंडळ तिने त्याच्या प्रशस्त वक्ष स्थला-वर टेवल, लोचन मिटून मंद मंद श्वासोच्छवासीत ती विसावा घेअू लागली

तिच्या भालावर भुरभुर अुडणारे कुंतल मधून मधून सावरीत, मधून मधून तिच्या गालावर अल्गत थापटीत, आता तिच्याकडे प्रेमळपणे पाहात तर मग तिच्या मस्तकावर आपले आनत मस्तक टेकून आपण डोळे मिटीत किशनही त्याच्या त्या प्रियकरणीच्या गाढ आलिंगनाचे सुख आस्वादण्यात मग्न झाला

तशा गुंगीत काही क्षण गेल्यानंतर मालतीने आपले लोचन अुघडले आणि त्याच्या वक्ष स्थलावर तशी पडल्या पडल्याच आपल सुंदर मुखमंडळ तिने किशनच्या मुखाशी अुचलून धरिल

तिची मूक विनंती तीच त्याची अभ्यर्थना होती त्याने तिच्या त्या वर केलेल्या सुंदर मुखाचे चुंबन घेतल तिने पुन्हा आपली मान त्याच्या वक्ष स्थलावर टेकून नेत्र मिटले

तिला लागलेली गोड गुंगी काहीशी पुरी होताच ती त्याच्या मांडीवरच पण अुठून ताठ बसली आणि तिच्या गुंगीतच जो विषय तिच्या मनात चर्चिला जात होता तो जसा काही किशनलाही अैकू जात होता, अशा सततपणे तिने तोच चालू ठेवून त्याला लडिवाळपणे विचारिल,

'खर नाही का रे हे? तुला पण नाही का असच वाटत?'

'कस? गोड न? वाटत तर! तुझ्या अशा प्रेमळ आलिंगनात जर कवळत येअील, तर मालती मरणसुद्धा गोड वाटेल! मग जीवनाच काय विचारतेस!'

'मग सांगू का तुला मी विचारीत होत त? साऱ्या आयुष्यभर, स्वत च कोणताही आततायी अपराध घडला नसता, अेकसारख्या अपेष्टाच अपेष्टा सोशीत आलेल्या मला दैववशात लाभलेल ह तुझ्या प्रणयप्रेमळ संगतीच अमूल्य सुख अधिक सुखाच्या लालसेपायी पुन्हा धोक्यात ढकलण्यास साहस आता करवत नाही! खरच किशन, मी म्हणते आता अिथून पुन्हा पळून देशात जाण्यासाठी जीव धोक्यात का बर घालावा? भर समुद्राला टाकाअू तारवाने ओलांडण प्रबळ शत्रूचे सरकारी पाहारे समुद्रावर नि भूमीवर सारख टपलेले त टाळून देशी जाण्याची आशा धरण, ह अगदी वेडेपणाच नाही का आता ठरत? दुसरा अुपायच नव्हता माणुसकीने जिवंत राहण्यास तव्हा वाटेल त साहस करण भागच होत पण आता अिथे तुझ्या संगतीत स्वच्छंदपण अस जीवन जर नेता येत आहे तर अिथेच ह्या जंगल्याच्या आश्रमाला, ह्या अरण्यात, असच आनंदात का राहू नये जन्मभर?

'ज्या गुहेत आपण दोघ आताशी राहतो ना, ती गुहा मुग्राच प्रत्यक्ष गोकूळ वाटस मला ! कोणतीही राणी निच्या हिऱ्यामाणकानी नि गाद्या-गिरद्यानी सजा-वटलेल्या रतिमंदिरात अधिक सुखी नसेल ! किशन, राजवाड्यातही राजे-राण्या आत्महत्या करतातच, नाही का ? माझी आजी किनी नेहमी म्हणत असे की, (आवश्यकतेपलीकडे जो पसारा, तो अगला नसला सारखाच. सुख सुसल्या पसाऱ्यात नसत. समाधानात असत- ती म्हणे, पन्नास वाडे जरी असले तरी देहाच्या लाबी-रुंदीअितक्याच स्थलावर निजाव लागणार ! हाड पुष्कळ म्हणून काही देह वाढवता येत नाही तसेच जिल्ब्यांचे ढीग पडलेले असले तरी वीतभर पोटात मावेल तेव-ढीच खाता येणार !) म्हणून म्हणते, आता जास्त सुख देशात जाअून तरी कोणत अस मिळणार आहे, की ज्याच्यासाठी अक्षरश: सकटाच्या समुद्रात अशी अुडी आम्ही पुन्हा घ्यावी ? मला मनी अिथे काही कमी वाटत नाही. किशन, ही जी अशी मी तुला आलिगून आहे, ती कुठेही गेले तरी अशा आलिंगनाच सुख अितकच असणार ! स्वच्छ पाणी पोटभर अिथे ह्या वनात प्याल म्हणजे तहान शमताच जे गोड वाटत, ते अगदी सिंधुनदीवर गेले, तरी तहान शमण्याच सुख तसच नि तितकच असणार !

'सकाळीच अशी मृगया खेळत समुद्रकाठी वा राना-वनातून स्वेच्छ संचाराव, दमून-भागून मग तुझ्या वक्ष स्थलावर असा विसावा घ्यावा, अस कुरवाळून घ्याव, मग गुहेकडे जाअून खमग भुकेल्या तोंडी मास, मत्स्य, फळ, कद यथारुचि खावे, दुपारी समुद्राच्या वाळवटावर जावन्याच्या स्त्रियाचे खेळ खेळत, गाणीं गात नाना रगारूपाच्या शख-शिप-गारा वेचीत वनश्रीचे नि जलश्रीचे चमत्कार पाहावेत नि दिवसभर अितस्तत स्वच्छद अुडून-अुडून थकलेली पाखराची जोडपी घरट्याला जाअू लागली की तसच तुझ्या हाती हात घालून आपल्या त्या गुहेच्या गोकुळात परत जाव नि बिलगून निजाव ! मनाच्या मापानेच जे मोजल जाणार ते प्रिय-सगतीच सुख ह्या गुहेतील आपल्या रतिशेजेवर जे समाधान देत, ते गोकुळात गेल तरी तितकच असणार ! मग आता अिथूनही पुढे पळून जाण्याच्या प्रयत्नात जिवावरच्या नव्या सकटाना का वर स्वत वर बळ-बळ ओढून घेतोस ! अिथे असच जन्मभर राहू ये आपण. माझ्या सुखा-समाधानाच्या पलगाला ती गुहा अगदी पुरेशी आहे '

' पण, ती गुहा पलगाला पुरेशी असली तरी पाळण्याला पुरेल का ? अुद्या पाळणा बाधायची वेळ आली म्हणजे ?' किशनने तिला गुदगुली केली.

' चूप ! वाह्यळ कुठला !' मालतीने अेक हळुवार चापटी किशनच्या गाला-वर रागावल्यासारखी मारली आणि लोभावल्यासारखी खुदकन् हसली. ' चेष्टेबारी नकोस न नेअू मी काय म्हणते ते !'

'नाही सखे, ह्येष्टेवारी नाही नेत पण पुन्हा समुद्रपार पळून जाण्याचं जिवा-वरचं संकट या ओढून घ्यावं हे विचारताना तू हे विसरलीस की, जुनी जिवावरचीं संकटं आपल्याभोवती अजून घिरट्या घालीत आहेत! मी पळूनच गेलो हे जरी काळ्या पाण्याच्या सरकारी अधिकाऱ्यांना अजून नक्की पटलं नाही, मी जावयाच्या चकमकीत मारलाही गेलो असेन असं जरी त्यांना अद्याप वाटत आहे, तथापि तू भर दिवसा बंदिगृहातून पळवली गेलीस ह्यात तरी त्यांना काहीच शंका नाही. तुला नि तुला पळविणाऱ्यांना पकडून देणारास हजार-हजाराची पारितोषिकं देण्यात येतील, अशी सरकारी प्रसिद्धकं—जाहिराती—सर्वत्र फडकत आहेत! कसून शोध चालला आहे. त्याच्या हेरांना नि लोकांना जर आपला थिथला सुगावा लागला तर? किंवा ह्या शेकडो जावयातलाच अेखादा मनुष्य अग्रजाला फोडता आला तर? अशी अुदाहरणं क्वचित्-क्वचित् घडतातही! असा प्रसंग गुदरला, तर आपल्या हाताने आपला जीव घेणं हेच त्या बंदिवासाच्या भयंकर यातनांत पुन्हा जाअून पडण्यापेक्षा बरं वाटणार नाही का?

'त्या संकटापेक्षा समुद्रपार होण्यांत साहस केव्हाही कमी धोक्याचं आहे. पुन्हा (अिथे पशु-पक्ष्यांच्या जोडप्यांसारखं जरी जगलो, तरी पशु पक्ष्यांसारखंच जगू, मनुष्यांसारखं नाही. स्वदेशाची, स्वराष्ट्राची, मानुषकाची काही सेवा, काही देव-कार्य जर हातून घडत नसेल, तर मनुष्याच्या जीवनात माणुसकी ती काय अुरली?) आणि सखे, तुझ्या कुसव्यास यथाकाली धन्यविणाऱ्या त्रिमुवल्या देवदूताला ह्या जावयाच्या नि रानडुकरांच्या संस्कृतीची दीक्षा का द्यायची आहे? नेव्हा देशाला हे गेलंच पाहिजे, समुद्र हा अुल्लंघिलाच पाहिजे. त्यातही आपल्याला काळ्या पाण्याच्या बंदिगृहातून पळून आल्यापासून तरी गेल्या तीनचार महिन्यांत दैवही अनुकूल होत चाललं आहे. त्या नराधम रफिअुद्दिनचा ह्या डोलकाठीच्या पराक्रमाने अनायासच सूड अुगविला जाअून तुझ्या मार्गांत जिथेसुद्धा आडवी येणारी धोंड दूर झाली.

'तो प्रच्छन्न शत्रु रफिअुद्दिन ज्या साहाय्यासाठी जवळ ठेवावा लागला, ते समुद्रतरणाचं साहाय्य देणारा असा अेक जिवाचा मित्रही त्या डोलकाठीतच आपणाला मिळाला. नाविकविद्येत तो तज्ज्ञ, धाडसी, गेल्या तीन-चार महिन्यांत जिवाला जीव देणाऱ्या त्याच्या स्नेहाची कसोटी पुरती अुतरलेली! त्याने अेक पक्कड तारू किती परिश्रमाने बांधून नि साहित्य जमवून सज्ज ठेवलं आहे. बघ! आता अनुकल वाऱ्याची तेवढी वाट पाहात तो थांबला आहे. ते वारे सुटले की आपण तिघं समुद्रात ते तारू सोडून स्वदेशाकडे निघणारच निघणार.'

'पण त्या डोलकाठीच्याही मनात माझ्याविषयी अेक दुराशा जी अुत्पन्न झाली आहे, मी त्याची पत्नी व्हावं असा जो अभिलाष संचरला आहे, त्याचा दुष्परिणाम आज ना अुद्या वैरातच होणार, नव्हे का!'

'सहसा तसं होणार नाही. कारण त्याला तुझी अभिलाषा असली, तरी ती नराधम रफिउद्दिनसारखी राक्षसी अभिलाषा नाही. आज तरी तो सात्त्विक अभिलाष आहे. तू माझी सख्खी बहीण कंटकी आहेस हें आपण दाखवीत असलेलं नातंच तो खरं मानीत आहे नि ह्यासाठी सहजीच त्याला तुझ्यासारख्या कुमारिकेची मागणी घालावीशी वाटली. तो तुला कुमारिका समजत आहे. त्याला जेव्हा आपलं खरं नातं सांगून टाकायची वेळ येईल ...'

'मग सांगूनच कां टाकीत नाहीस तें? खरंच किशन, मला किनई आता तुला वरवरसुद्धा 'भाऊ' म्हणायची लाज वाटते गडे!'

'तो का?' किशन तिला डिवचून हसला.

'अश्श! कां म्हणून काय विचारतोस आणखी! प्रियकराला भाऊ म्हणतात वाटतं कुणी? जावर्‍यांनसुद्धा भावा-बहिणींची लग्नं माणुसकीची रीत समजत नाहीत!'

'जावर्‍यांत नसतील, पण माणुसकीच्या कक्षेत बहीण-भावंडांची लग्नं अगदी कधी झालीच नाहीत, असं मात्र समजू नकोस. मनुष्यसमाजाने सर्व प्रकारच्या विवाहप्रकारांनाच नव्हे, तर स्वच्छंद संभोगानाही ज्या ज्या परिस्थितीत ते इष्ट वा अपरिहार्य वाटतील, त्या त्या परिस्थितीत धर्म्य मानलेले आहेत. प्रत्यक्ष गौतम बुद्धांचा जन्म ज्या कुलात झाला त्याच कुलानी कथा ग्रंथान्तरी अशी सांगितली आहे की, सूर्यवंशाच्या एका राजपुत्राला नि त्याच्या बहिणीला संकटपरत्वे एका निर्जन अरण्यात जन्म काढावा लागला. तेव्हा त्या बहीण-भावंडांनी आपसात विवाह केला नि त्याच्या संततीच्या पोटीच पुढे काही पिढ्यांनी बुद्धासारखा महात्मा निपजला!

'राजकुलाच रक्तबीज दैवी! त्याचा मनुष्यांशी संबंध घडू नये, तें अशुद्ध होऊ नये, असा आनुवंशाचा अतिरेकी सोवळेपणा राखण्यासाठी ब्रह्मदेशाच्या, मेक्सिकोच्या नि अितरही काही ठिकाणच्या प्रख्यात 'दैवी' राजवंशामध्ये राजपुत्राचं लग्न त्याच्या सख्ख्या बहिणीशीच झालं पाहिजे, अशी 'धर्माज्ञा' च होती, शिष्टमान्य रूढीही होती. ज्या समाजाना त्या धर्माचे दुष्परिणाम होतातसं वाटलं, त्यानी त्यालाच अधर्म म्हणून ठरवलं. आजही हिंदु-मुसलमान-ख्रिश्चनादिक कुठे मामेबहीण तर कुठे मावसबहीण, प्रत्यक्ष सख्ख्या चुलतबहिणीशीसुद्धा लग्न लावणं अधर्म समजत नाहीतच. मग आपण तर जिवावरचं संकट टाळण्यासाठी हा नुसता भाऊ-बहिणीच्या नात्याचा बहाणा करीत आहो.'

'खरंच, काल काय रे तो म्हणत होता तुला, माझ्याकडे अितकं हसत-हसत बोट दाखवून?'

'अग, तो डोलकाठी खरोखरीच अेक सैनिक बाण्याचा मोकळा मनुष्य आहे. छक्के-पंजे त्याला माहीत नाहीतच. जस काल ते तारू अवक झाल, तेव्हा मोठ्या आनंदाने त्याने मला ते दाखवल नि विचारल,

'ह्या तारवाने तुला नि तुझ्या त्या गोमट्या बहिणीला जर देशात सुखरूप नेअून पोहोचवल, तर ह्या नावाड्याला ह्या तरीच भाड तू काय देशील ?'

'मी म्हटल, 'काय हव तुला ?'

'तेव्हा तो तुझ्याकडे बोट दाखवून म्हणाला, 'ती सोन्याची पुतळी तेवढी हवी !'

'मी हसलो, 'माझी मुळीच हरकत नाही. जर तिच मन तुला वश करता आल तर पैलतीरावर पोहोचताच तुमचा विवाह अुरकून टाकीन'

'तेव्हा अेकदम छातीवर हात मारून तो डोलकाठी हसला, 'ते काम माझ! मी शीळ घातल्यावर ते पाखरू माझ्या हातावर येअून बसल नाही, तर माझ नाव बदलून देईन !'

'लगोलग त्यान माझ वचन घेतल की, जर कटकी अनुकूल झाली, 'तर मी तिला डोलकाठीला आनंदाने देअीन.'

'वा रे तू, नि वा रे तुझ वचन ! विशन !' त्याच्याकडे रागाने टक्कारीत मालती म्हणाली, 'विशन, सगळा वाअीटपणा नि दायित्व माझ्याकडे देअून आपण नामानिराळा झालास ! पण काय रे, जर तो आता माझ्याशी लाडी-गोडी करू लागला नि मी त्याला खरोखरीच अनुकूल झाले तर ?'

'तर काय ? तुझ्या जिच्छेस पुरवून तुला आनंदविण्यासाठी मी स्वत:ला त्यानतर खरोखरीच तुझा भल्ता भाअू समजू लागून त्याच्याशी तुझा विवाह आपल्या हाताने लावून देअीन !'

फणकाऱ्याने त्याच्या माडीवरून अुठू पाहणाऱ्या मालतीला हात धरून तसेच बसवीत विशन गोंजारू लागला.

'रागावतेस काय अशी ? प्रश्न विचारलास तेव्हा मन तुला बर वाटल ? मग द्याव तस घ्याव ! पण मालती, खरोखरच सांगतो तुला की, तुझ्यासारख्या सुंदर नि गोमट्या तरुणीला माझ्यासारखा काळा-सावळा, कुरूप नि कोणतीही विशेषता नसलेला प्रियकर अनुरूप नाही, हे मी मनातून प्रथमपासून जाणून आहे. मला तुमचा तुझा स्नेह जरी लाभला, तुझ्या सगतीत सेवक म्हणून जरी मी राहू शकलो, तरी माझ्या योग्यतेप्रमाणे मला जे मिळण अिष्ट ते सर्व मिळेल, अस मी मानीत आलो आहे. माझ्याहून जो तुला अधिक अनुरूप तो प्रियकर निवडायला तू सर्वतोपरी स्वतंत्र आहेस.'

'होय ना? मग मी स्वतंत्र आहे म्हणूनच तुझ्या नेत्राने या मापनाने निवड न करता मी माझ्या मापनाने ह्याच प्रियकराची निवड केली आहे! किशन समजया!'

मालतीने सद्‌गद होऊन किशनला मिठी मारिली आणि त्याच्या वक्षःस्थलावर आपलें मस्तक ठेवून ती क्षणभर नि:स्तब्धपणे प्रेमाश्रु ढाळीत राहिली. मग पुन्हा मान वर अुचलून सोचक दृष्टीने किशनला निरखीत म्हणली.

'किशन, तुम्हां पुरुषांना रूप-रंगाची जाणीव अधिक. कारण तुमची प्रीति तुमच्या डोळ्यांत असते. पण आम्हां ललनांची प्रीति आमच्या हृदयात असते. ललनांची प्रीति आमच्या हृदयाच्या नयनातून पाहते आणि म्हणूनच तिला रूप नि रंग हे दिसतात; पण शील, स्वभाव नि सद्‌गुण हे दिमोहवितात, पराक्रम नि पौरुष ह्यांचं सौंदर्य रूपाहून वा रंगाहून किती आकर्षक असतं, हें घनश्यामल रामाला वरणाऱ्या सुवर्णगौरी सीतेला विचार, सावळ्या श्रीकृष्णाला वरणाऱ्या नि शिशुपालादिक गोऱ्या-गोमट्या नि नवरदेवकरट्या लंपटांना झिडकारणाऱ्या स्वरूपशालिनी रुक्मिणीला विचार! ह्यामुळेच ललनाचा लोभ हा रूप-रंगांच्या दोन दिवसांत सुकणाऱ्या गवताप्रमाणे चंचल नसतो, तर शीलाच्या आम्रतरू-प्रमाणेच सरस, सुस्थिर नि सफल असतो!'

'निदान असावयास पाहिजे होता खराच!' किशन तिला डिवचून म्हणाला, 'पण स्त्रियांच्या अर्ध्या हृदयांत त्याची प्रीति निवसते हे तुझं म्हणणं जर रुक्मिणीच्या अुदाहरणाने खरं मानायचं, तर स्त्रियांच्या अुरलेल्या अर्ध्या हृदयांत कपट निवसतं हें माझं म्हणणंही त्याच अुदाहरणावरून तुलाही मानल पाहिजे. कारण रुक्मिणीचे चोरटे पत्रव्यवहारही प्रसिद्धच आहेत! तेव्हा तू माझ्यासाठी तरी ढोलकाठीला अेकदम निराश करू नकोस. देशी गेल्यावर तुझ्या प्रेमयाचनेला स्वीकारीन अशी आशा त्याच्यापुढे सतत धर. तो सज्जन आहे हें निश्चित, पण अेक निष्कपटी घटिंगणही आहे तो थोडासा. तेव्हा तो जी लाडी-गोडी लावीत आहे, तिला अेकदम धिक्कारू नकोस. कारण देशात गेल्यावर तुझ्या प्राप्तीची त्याची आशा सुटली, तर न जाणो तो आपल्या समुद्रलंघनाच्या कामी देत असलेल्या धाडसी नि तत्पर साहाय्यात ढिलाओ करू लागेल. बरं, तुझं-माझं खरं नातं नि पूर्ववृत्त सागावं, तर आपल्या प्रेमाचा मत्सरही त्याच्या मनात घर करून बसणारच नाही कशावरून?

'आणि आपण ज्या हत्येच्या अपराधासाठी शिक्षा पावलो, त्याविषयीच्या खटल्याच्या वेळी ज्या संकटाकरिता आपली कंटक-कंटकी ही बनावट नावं नि वहीणभावडाचं बनावट नातं आपण प्रसिद्धिलं, तीं संकट हीं खोटी नांवं नि नातं अुघडकीस येताच आपणावर पुन्हा कोसळण्याचाही संभव अजून आहेच. तेव्हा देशी पोहोचेतो सध्याची नाटकी भूमिका अशीच ठेवणं भाग. देशी पोहोचल्यावर

डोळ्काठीच्या प्रेमाला तू सुखेनैव अव्हेर. तो सज्जन आहे तुझ्या अिच्छेविरुद्ध तुझ्यावर बळाने प्रेम लादणारा तो दुर्जन नाही, पण क्वचित् तसा विघडला नि वैर घरू लागला तर तिकडे त्याला तोंड देणं किंवा गुगारा देणं आपणास शतपटीने अधिक सोपं जाअील आज आपण सर्वस्वी नडलेली, त्याच्या साहाय्यावाचून समुद्र अुल्लंघिण आपणाला बहुधा दुर्घट ! ज्या अुद्दंड नि अुच्छृंखल माणसात अनवस्था हीच समाजव्यवस्था होअून बसते, त्याच्या संगतीत ज्याला जगायचं त्याला आपद्धर्म हेच सद्धर्म मानले पाहिजेत !'

अितक्यात पुन्हा 'अू ऽऽऽ ! काटकनाव ऽऽ' अशा विकाळच्या अैकू आल्या

'अूठ अूठ ते बघ जावरे पुन्हा बोलवायला आले गेलच पाहिजे आता त्याच्यासह समारंभपूर्वक रडायला !'

कटक आणि कटकी जावऱ्याच्या त्या पहाडावरील खबदाडाकडे जो येतात, तो त्या जावरा मृताचा प्रेतसंस्कार अगदी भरात आला होता तो मृत जावरा राजा नानकोजीचा अेक विशेष स्नेही आणि जावऱ्यातील अेक 'दादा' असल्याने त्याच्या प्रेतसंस्कारार्थ ते सारे जावरे आले होते त्या प्रेताला मध्ये ठेवून बायका, मुले, माणसे, सारी अगदी अुल्लिंग, नागडी, अुघडी सरमिसळपणे त्या प्रेताभोवती अेका वर्तुळात बसली त्या मृताच्या पत्नी नि मुलांना स्वाभाविकच दुःखाने आधीच विव्हळ केले होते परंतु प्रेतसंस्कारार्थ सर्व जात जेव्हा अशी सार्वजनिक शोक करण्यास त्या प्रेताभोवती जमली, तेव्हा त्या देखाव्यासरशी त्या मृताच्या पत्नीने, शोकाचा आवेग अधिक आला म्हणूनच नव्हे तर त्या प्रेतसंस्कारातील कर्तव्याची जाणीवही असल्यामुळ स्फुदता-स्फुदता मध्येच गळा काढला. त्यासरशी अेका विशिष्ट सुरावर निठेक्यातच ते सारे जावरेही रडू लागले प्रथम प्रथम प्रेतसंस्कारातील अेक कर्तव्य म्हणून जरी ते रडू लागले, तरीही सामाजिक भावना ह्याही रोगाप्रमाणे अेक सामाजिक साथच असल्याने, कर्तव्य म्हणूनच रडता रडता ते शेवटी खरोखरीच रडू लागले साऱ्यांचे डोळे पाण्याने डबरून आले

तो सार्वजनिक नि संगीत आक्रंद आवरता आवरेनासा झाला मध्यंतरी त्यांच्यातील वृद्धांनी त्या प्रेताची एक मोट* बांधली आणि ती घेअून ते सगळे जण छाती ठोकधा-ठोक्याने पिटीत नि अेकाच सुरावर गळे काढून रडत अेका प्रचंड वृक्षाकडे गेले त्या वृक्षाला अुंच भागी अेक ढोली होती, तिच्यात ती प्रेताची मोट अशा रीतीने बसविली की जणू काही तो मनुष्य मांडी घालून ताड वर करून सर्वांकडे जिवंत मनुष्यासारखाच बघत आहे जावऱ्याच्या खुजा जातीला ते अितके अुंच वाटले की, त्यांच्यातील कोणालाही ते प्रेत त्या ढोलीपर्यंत अुचावणें दुर्घट व्हावे म्हणून डोलकाठीने ती मोट त्या ढोलीत स्वतः बसविली जावऱ्याच्या प्रेतसंस्कारातील हा विधि होत असता सर्वांनी तालबद्ध आक्रोशाची परमावधि केली.

नंतर त्या सर्व जावऱ्यांनी आपल्या अंगावरील रंगी-बेरंगी शृंगारिक मातीचे पट्टे पुसून टाकले. मुळगुळीत डोओी केलेल्या सर्व सुवासिनींनी नि पुरुषांनी सुतकाचें चिन्ह म्हणून नुसती भुऱ्या रंगाची माती आणिली आणि ती सर्व स्त्री-पुरुषांनी आपल्या अंगांना नि 'तासलेल्या' विकेश डोक्यावर फासली. नंतर मृताचें शेवटचें दर्शन घेण्यास ते सर्व जावरे अुभे राहिले. त्यांच्यात धार्मिक पुरोहित असा कोणीही नसतोच. त्या त्या वेळी जो कोणी पुढारीपणा पावलेला वृद्ध असेल, तोच रुढी-प्रमाणे सर्व संस्कार करवितो.

तसा त्या वेळचा अेक वृद्ध पुढारी मग पुढे आला आणि तुटक अशा ठरा-विक चार-पाच शब्दांत अुदंड हावभावांची भर घालून आपला जो भाव व्यक्तविता झाला तो नुसत्या शब्दातच सांगावयाचा तर असा सांगता येओील—

'*आता त्या आपल्या मृत आप्ताच्या प्रेताकडे तीन महिनेपर्यंत कोणीही* ढुंकून बघता कामा नये. त्याचा अेकान्त भंगला, तर त्याचं भूत रागावेल. आपण त्याला विसरतो की काय, त्याच्या प्रीतीशी कृतघ्न होतो कीं काय, हें त्याचं तें भूत ह्या अुंच ढोलीत बसून सारखं निरखीत राहील. त्यासाठी हे तीन महिने कुणीही शृंगारसाज वा आमोद-प्रमोद (ख्याली-खुशाली) करता कामा नये. नाचरंग सारं *तीन महिने बंद ! रंगीत मातीचा नखरा बंद! भुरी माती तेवढी अंगाला फासावी.*' (कारण विषारी डास-बीस जे रानात नागड्या जावऱ्यांना डसतात, त्यांच्यापासून देह रक्षण्यास कोणत्या तरी मातीचा लेप अवश्यच असतो.)

अेका विशिष्ट आवाजाने सर्व जावऱ्यांनी त्या आदेशास होकार दिला आणि ते सारे आपल्या खबदाडाकडे परतले.

*किशन नि मालती पण आपल्या स्वतंत्र गुहेकडे निघालीं. निघताना त्यांनी* मोठ्या आर्जवाने ढोलकाठीला पण सागातीं यावयाला विनविलें.

ढोल्काठीला त्या वेळीं तत्त्वज्ञानाचा चक्कर आला होता. आपल्या विद्-त्तेचीही छाप मालतीवर पाडण्यासाठी तो किशनशी जावऱ्यांच्या प्रेतसंस्काराविषयीच धाटेने बोलत चालला

'*बघ, मृताविषयी प्रीति नि भीति ह्या दोन भावनांवरच सारे प्रेतसंस्कार* कर्मे अुभारलेले आहेत ते! ह्या धर्मशून्य नि वन्य जावऱ्यांच्या रानटी प्रेतसंस्कारां-वांच आमचे वैदिक प्रेतसंस्कार, और्ध्वदेहिक नि सुनकश्राद्ध हीं धार्मिक संस्करणं आहेत. हिंदु, ख्रिश्चन, मुस्लिम, सर्वांचे सारे प्रेतसंस्कार तेथले अशून-वियून मृताविषयींची प्रीति नि भीति ह्यावरच अुभारलेले आहेत. मग ते पाहा. ह्या *जावऱ्यांच्या प्रेतसंस्कारानाच मधून-मधून हसत होतीस नाही, मालती ? पण त्यांच्या* ह्या तुला रानटी आणि वेडगळ वाटणाऱ्या प्रेतविषयक प्रत्येक चालीचा प्रतिध्वनि *आपल्या सुधारलेल्या वैदिक-ख्रिस्ती-मुस्लिम प्रभृति अीश्वरोक्त धर्म म्हणून म्लाम* माजविलेल्या प्रेतसंस्कारात अुमटतो आहे असं जर मी दाखवून दिलं तर तू मला

काय देशील ? आदिम मानव प्रेतांच भूत होऊन उठू नये म्हणून त्यावर दगडाची राशी रचतो, त्याच्याच पोटीं ही ख्रिस्ती-मुस्लिमांची कबरस्थानं, भव्य कबरी नि पिरॅमिड्स जन्मले ! मृताची नौका वैतरणी तरण्यास समर्थ व्हावी म्हणून . .'

'पुरे रे बाबा, तुझं तें तत्त्वज्ञान !' किसनने तत्त्वज्ञानाच्या धारेत हा आता भरमसाट वाहवत जाणार असे पाहून डोलकाठीला मध्येच हटकलें, 'मृतांना वैतरणीपार नेणाऱ्या नौकांची माहिती देण्यापेक्षा तू प्रथम जित्यांना तारणाऱ्या अेखाद्या नौकेची माहिती देशील तर अधिक अुपकार होतील ! वैतरणीचा मृतसमुद्र तरण्यासाठी अेखादी नौका मेल्यावर आमच्या प्रेतांना कुठेही मिळेल ! न मिळाली तरी त्या वेळी त्या वेळच पाहून घेअू. पण आज आता काळ्या पाण्याचा समुद्र जिवतपणी तरून जाण्यासाठी अुपयोगी पडेल अशी नौका जी तू बांधीत होतास, तिच्याविषयी काय तें आधी बोल. जें तारू तू मला परवा दाखवलस, तें समुद्रात आता ढकलायचं तरी कधी ? परवा म्हणालास, आता पूर्वसिद्धता जय्यत झाली अ ! पण पुन्हा आपला दिवसगत लावतोसच आहेस ! आता जिवाची होडी त्या संकटसमुद्रात कधी ढकलतोस तं बोल ! अगदी नक्की दिवस बोल. मग देव तारो वा बुडवो ! पण आता अेक दिवसही केवळ भयासाठी म्हणून अिथे रेंगाळायचं नाही ! चाल, दिवस बोल !'

'अगदी नेमका दिवस सांगतो. तीन महिने नि तीन दिवस संपताच जो अुगवेल त्या दिवशी समुद्रात तारू ढकलणार !'

'बाप रे ! का ? आता अेवढ्या लांबची दिरंगाई का ? परवा जय्यत पूर्वसिद्धता झाली म्हणालास, मग आता तीन महिने तीन दिवस असं अगदी ज्योतिषी थाटात का बोलतोस ! मुहूर्ता-बिहूर्ताची लहर आली की काय ?'

'छट्, ज्या दिवशी सिद्धता पुरी, त्याच दिवशी डोलकाठीचा मुहूर्त असतो. पण मुहूर्ताची लहर सोडली तरी आपल्याला दोन लहरी तरी सभाळल्याच पाहिजेत. अेक लहर समुद्राची, दुसरी नानकोबीची ! राजा नानकोबीने आताच मला बजाविलं की, ह्या आज मेलेल्या जावयाचं सुतक संपेता तारू वल्हविणं नाही. तें हें जावयाचं सुतक तीन महिन्यांनी संपणार ! त्यानंतर ते आपणासाठी दोनतीन दिवसांनी त्याच्या दुर्गा साहाय्यास देअून त्या समुद्राच्या तीरापासच्या आडवळणातून थाट काढीत काढीत भर समुद्रात आपलं तारू त्याच्या पाहाऱ्यात काढून देणार आहेत ... आणि अनुकूल वारे नि समुद्रही त्याच सुमीस साहाय्यक होअू शकणार ह्यासाठी थांबणं भाग पडतं आहे रे बाबा ! अरे, देशी जायची घाअी तुला आहे त्याहून मला कमी असेल असं तुला वाटतं तरी कसं ! तुला असेल नुसती घाअी, पण मला तर आहे लगिनघाअी ! काय कटकी, खरं की नाही ? कटकीने मला नाव परतीरास पोहोचविण्याच्या कामासाठी जो दाम द्यायचा ठरविला आहे त्याची हुंडी पटणार आहे तुझ्या प्रेमाच्या पेढीवर, बर का ?' धीटपणे डोलकाठीने हसत-हसत कटकीच्या गालावर अेक लडिवाळ टिचकी मारिली.

'पण, काम झाल्यानंतर दामाचा प्रश्न!' कटकने दिलेली हुंडी पेटीवर 'पटायची तर त्या दिवशी पटेल, हें नावाडयाने पण विसरू नये!' माशाला आमिष तेवढे दिसेल, अशा चलाखीने मालतीनें जाळे फेकले

✦ ✦ ✦

## २२. बहीणभावांची भेट

'किशन, अे किशन!' आपल्या गुहेच्या दाराशी हिरमुसलेले तोंड करून अुभ्या असलेल्या मालतीने मनाशीच तीन-तीनदा हाक मारिली मग मनाशीच पुटपुटली, 'कुठे गेला काय की बोलता बोलता! पहाटचा गेला तो आता घटकाभर दिवस आला तरी तिकडेच गुतला आहे कुठे त्या जावऱ्याच्या नादात!—अं? पण हा कोण त्या बाबूळ्या बेटातून येतो आहे, त्या बाबूसारखाच अुंच? डोल्काठी! दुसरा कोण? माझी मनधरणी करण्यासाठी किती झटत असतो बिचारा! अितका प्रेमळ नि प्रामाणिक माणूस आहे हा की, मला खरोखरीच दया येते त्याची पण काय करावं? त्याचं प्रेम मला स्वीकारताही येत नाही नि नाकारताही येत नाही आज महिनोगणती सकाळ झाली का ह्या रानचीं ताजीं फुल नि ताजा ताजा मध घेअून ती भेट मला द्यायला हा अेकदा देखील चुकला नाही मी ह्याला पति मानावं असा त्याला जो अनावर मोह झाला आहे, तो सोडून जर तो मला म्हणेल ना की, 'तू मला भाअू मान' तर मी आत्ता त्याला मनापासून माझा भाअू मानीन कारण अेकदरीत तो मला आवडू लागला आहे खराच'

मालती मनाशी अितके बोलते आहे ताच डोल्काठी गुहेपाशी येअून पोहोचला त्याच्या अेका हातात तिकडची सिंधपुलिनें ज्यासाठी प्रसिद्ध आहेत, त्या जातीचा गुलाबी छटाचा तासून घासून वर वेल्बुट्टी काढून शोभिवंत केलेला अेक सुरेख शंख होता आणि दुसऱ्या हातात अेका हिरव्यागार पानाच्या द्रोणात ताजीं फुलं होतीं तिकडे रानात मधाची मोठमोठी मोहोळी विपुल जावरे लोक त्या मोहोळांना पाडून बोलता-बोलता वाटेल तितक्या ताज्या मधाला पुरविण्यात पटाअीत तसा ताजा पुष्कळसा मध त्या शंखाच्या कुप्यात भरून डोल्काठीने जो आणला होता तो त्याने कटकीला दिला तिने तो गुहेत ठेविला मग त्याने ती फुलं तिला दिलीं आणि काही तिच्या केसात स्वत खोवावीं म्हणून हात पुढे केला हो ना करीत तिने त्याला ती खोवू दिलीं, अुरलेल्या फुलांचा द्रोण दोन्ही हातांनी वर धरून त्यांना हुंगत नि त्यांचे रंग रंग पाहात प्रसन्नलेली कटकी म्हणाली,

'किती सुरेख फुल आहेत हां. हीं! आभार आहेत बर तुमचे!'

'पण कटकी, या सगळ्या फुलांहून सुरेख असं आणखी अेक फूल आहे ह्या रानात, पण तें काही अजून माझ्या हाती आलं नाही !'

'कसलं हो तें अितकं सुरेख फूल ?'

'तुझ्या सौंदर्याचं ! कटकी ' डोल्काठीने दडमपणे आपला दणकट हात तिच्या कोवळ्या हनुवटीला लावण्यासाठी पुढे केला

'अिश्श ! ' हनुवटी चुकवून, मागे सरून, पण न रागावता कटकी प्रत्युत्तरली, 'अं हं ! तें फूल असलं जरी समुद्राच्या ह्या अदमानी तटावरील रानातलं तरी हातीं यायचं तर येअू शकतं समुद्राच्या त्या पलमाडच्या भारतीय तटावरील रानात

'त्याच आशेवर तर मी जगून आहे नि मी बांधलेलं तारूही जर तरणार असेल तर त्याच आशेवर तरेल ! झालं आता अवघे तीन दिवस अुरले आजच जावयाचं तें तीन महिन्यांचं मुदत संपत आपणाला आता तिकडेच जायचं आहे तें संपलं की तेरधा आपण आपल्या साहसाचं तारू समुद्रात ढकललंच म्हणून समज देशाला नेणारे वारे पण अगदी अनुकूल सुटले आहेत मग अेवढ्यावर काय देव करील ते खरं !'

'अगदी चांगलं तेच करील हो देव आज मला असा अेक शुभशकून झाला की मला आता त्यात शंकाच राहिली नाही मी वटकदादाला सकाळीच सांगितलं तो '

त्याची अशीच ताटातूट झालेली आहे! त्याना मी कधी भेटेन, असं मला पण झालेलं आहे!' इतकं बोलता-बोलता डोल्काठींचा पण कंठ दाटून आला आणि त्याच्या डोळ्यातून अश्रूंच्या धारा वाहू लागल्या.

धिप्पाड, रुंद आणि आडदांड दिसणाऱ्या त्या डोल्काठीला असा गहिवर-लेला पाहून ऐनादा अंजन आणि राकट गडय पाझरताना दिसताच जसं आपल्याला कौतुक वाटते, तसं कौतुक कटकीला वाटल्यावाचून राहिले नाही. त्याच्याकडे क्षणैक तसेच निरखीत राहून मग तिने विचारिले,

'तुमची ती ल्हान बहीण आता मोठ्ठी झाली असेल?'

'कसली मोठी! असेल विशीच्या आत. तिची खोडी काढायची म्हणजे मी तिला अशी दोन हातावर पाळण्यातल्यासारखी घेऊन ती ओरडू लागतो गरगर फिरवावी. आतासुद्धा मी जेव्हा तिला भेटेन न, तेव्हा पहिल्या धडाक्याला तशीच हातावर घेऊन तिला भोवळ येईतो नि आणी रागावून ओरडेना तोवर गरगर फिरवणार आहे. ती विशीची झाली तरी माझ्या भावनार जाजळीनच! तुझ्या भावाने तुला कधी तरी इंग्लंड वेस्ट वा अशा जन्मात?'

'खर सांगू का...' मालती भावनेच्या भरात चटकन् बोलून गेली, 'मला पण जेकुलता जेक असा प्रेमळ भाऊ होता—'

'म्हणजे?' डोल्काठीने खाडकन हटकले, 'होता म्हणजे? मग कटक आहे हा कोण तुझा?'

त्या प्रश्नासरशी मालती इतकी गांधळली की, तिची मुद्रा गोरी-मोरीच झाली. पण इतक्यात कटकच निवडून यताना दिसल्यामुळे तो विषय सहजी बंद पाडता आला तिला.

'तो बघ कटक! नाव निघताच आला ग बाई! शंभर वर्षं आयुष्य आहे हो तुला!' हसत-हसत तिने धावत जाऊन कटकला मिठी मारिली.

'या डोल्काठी या! गृहस्था, तुला कटकीला लवकरच घेऊन यण्यासाठी मी इकडे धाडला तो तू आपला इकडेच गप्पा छाटीत रमलास! सुतक फेडण्याच्या संस्कारासाठी त सारे जावरे निघाले की तिकडे! राजा नानकोवा आपली वाट पाहात आहे सारखा. चला चला लवकर!'

छट् कटकबाबू, मी आणलेला ताजा मध आपण सांळ्यानी खाल्ल्यावाचून पाऊल पुढे टाकायचं नाही इथून! कटका, आण तो मध इकडे!'

डोल्काठीच्या आग्रहाला मान तुकवून मालतीने मध आणिला, हिरव्यागार पानावर त्या सुरेख शहाच्या धारेने तो वाढला आणि ती गोड वन्य न्याहारी उरकताच ती तिघे जावऱ्याच्या त्या खवदाडाकडे लगबगीने निघून गेली.

जावऱ्याच्या पद्धतीप्रमाणे तीन महिन्यांचं सुतक आज संपणार होतं त्याच्या त्या मृताच्या औध्वदेहिकाचा शेवटचा संस्कार करण्यासाठी ते सारे स्त्री पुरुष-

अंगाला नि डोक्याला भुरी माती फासून मोठमोठ्याने अेका सुरावर नि तालावर रडत ज्या झाडाच्या ढोलीत तीन महिन्यापूर्वी तें प्रेत मोट बांधून बसविलें होतें, त्या झाडाकडे जमावाने चालले तें अवाढव्य झाड येताच ते थांबले मग डोलकाठीने त्या अुच ढोलीतून ती मोट खाली आणिली पाअूस, वारा, अून आणि गिधाडें ह्यांच्या अेकत्रित कामगिरीने त्या मोट बांधलेल्या प्रेतातील मास मास तेवढे गेल्या तीन महिन्यात नाहीसेच झालेलें होतें हाडांचा सापळा काय तो अुरलेला होता त्याला मध्य ठेवून जावयांच्या अेका पुढाऱ्याने त्याची मान कडकड मोडून काढली मग कवटीसुद्धा तो शिराचा सापळा त्याने हातात अुचलून वर धरिला त्या मृताची विधवा पुढे आली, तिने पसरलेल्या हातात तें तिच्या नवऱ्याचे मुडकें टाकीत पुढारी म्हणाला, 'हा वाटा तुझा !'

त्या विधवेने तें मुडकें धुवून पुसून घासून, त्याला भोक पाडली, त्यात दोरी ओविली आणि तो शिराचा हाडकी सापळा तिने सर्वांसमक्ष गळ्यात बांधून आपल्या पाठीशी टाकला आपल्याकडे काही जातीत विधवेचे चिन्ह म्हणजे जसे केशवपन नि काषायवस्त्र, किंवा अिंग्रजात वैधव्याचं चिन्ह म्हणजे विधवा जसे अेक काळें प्रावरण पदरासारखें डोक्यावरून पाठीवर सोडते, तसेच ह्या जावयांतील विधवा, त्या जोवर विधवा राहतात तोवर, आपल्या मृत पतीचे मुडकें तिच्या गळ्यात बांधून पाठीवर वागवितात त्यांनी जर पुनर्विवाह केला, तर तो दुसरा नवरा काय तो तें मुडकें तिच्या गळ्यातून सोडून काढू शकतो

त्या विधवेला तो शिराचा सापळा दिल्यानंतर मृताच्या धडाचे सांधेन सांधे ठेचून ठोकून कडाकड मोडण्यात आले हाडूकन् हाडूक वेगळे वेगळे केले गेले. त्यातून काही हाडकं मृताच्या मुलांना 'हा मुलाचा वाटा' म्हणून दिली गेली काही विशिष्ट आप्तांना 'हा आप्तां'चा वाटा म्हणून मिळाली अुरली ती सारी त्या जावयांतील चेटकीने आपल्यापुढे रचून निवडीत चिवडीत शेवटी त्याचे तीन भाग केले अेक अरण्याच्या भुतावर अुतारा, अेक आगीच्या, व अेक समुद्राच्या ज्याला ज्या भुतावरचा तोडगा हवा, त्याने तो तो हाडकाचा तुकडा घेतला मृताच्या ह्या हाडाच्या तुकड्यांचे निरनिराळे दागिने, माळा तायीत करून जावरे स्त्रीपुरुष गळ्यात वा अंगावर घालतात आणि त्यायोगे रोगापासून आणि त्या त्या भुतापासून

त्या चेटकीने निवडली होती त्यातील अेक चांगलेसे नि चिमुकलेसे हाड अुचलून राजा नानकोबीने डोलकाठीला मानाची भेट म्हणून दिले आणि हातवारे नि शब्द मिळून आश्वसिले की, 'आता तुम्हाला समुद्राची भीति नाही ! तुमच्या देशी तो तुम्हाला सुरक्षितपणे तारून नेईल '

डोलकाठीच्या मनावर पण त्या भयाण प्रेताचे मस्तक, धड, हाडे सांधे कडा-कड मोडण्याच्या नि फोडण्याच्या त्या अेकंदर संस्काराचा कोणता तरी अेक गंभीर परिणाम होत आला होताच त्यातही ती चेटकी त्याला जावरा भाषच्या तुटक शब्दांनी खुणविती झाली,

'अिकडे ! जुरविन ! हाडूक, मंत्र !' म्हणजे अिकडे ये 'जुरविन' ह्या समुद्राच्या भूतावरील हा मंत्र सांगते तो म्हणून मग ते हाडूक गळ्यात बांधलं पाहिजे

डोलकाठीच्या कंबरेपर्यंतच त्या बहुतेक जावरा स्त्रिया त्यांच्या बुटबेपणामुळे पोहोंचू शकत अर्थातच त्या चेटकीच्या तोंडाशी तो गुप्त मंत्र अैकण्यासाठी कान न्यायला डोलकाठीला खालीच बसावं लागले मग तिने अेक विचित्र मुद्रा आणि अंगात यावे तसे हातवारे करून त्याच्या कानात फुंकर घातली आणि आपल्याकडे मांत्रिक जसं -हीम, -हुम्, -होम असं अर्थशून्य अेकाक्षर अुच्चारतात, अगदी तसेंच अेक निरर्थक अक्षर मंत्र म्हणून त्याच्या कानात अनेकवार अुच्चारते जावऱ्याच्या वातावरणात वावरता वावरता जावराच होत आलेल्या डोलकाठीच्या भाबड्या

• येतोच आम्ही नाचायला थोड्या वेळाने ' असं राजा नानवोवीस सांगून कटक-कटकी आपल्या गुहेकडे डोल्काठीसह जावयास निघाली

गुहेपाशी जाऊन तेथील शिलातलावर ती तिघे बसली मग कटकीने कित्येक फळे, शहाळी, मध आणि भाजलेले मांस आणिले गुहेच्या ताडी ते वन्य भोजन मिटक्या मारमारून सगळ्यांनी सेविले

' झालं ह्या रानची ही मेवा मिठाई आता आणखी दोन दिवस काय ती उरली ! परवा वनभोजन संपून समुद्रभोजनास आरंभ ! ' डोल्काठी कटकच्या पाठीवर थाप मारून त्याला आश्वासिता झाला

' आणि देवाची कृपा तेवढी असली, तर पुढच्या महिन्याच्या ह्या मितीस आपलं आपल्या घरी, आपल्या देशी आपल्या प्रियजनांमध्ये हसत खेळत प्रियभोजन चाललेलं असलं ! ' कटकने कटकीच्या पाठीवर आश्वासक प्रेमळपणे थापटले

' देवाची कृपा असली तर ' असं का म्हणतोस आता ? ' डोल्काठीने अत्यंत उल्हसित वृत्तीनं कटकला हटकलं, ' देवाची कृपासुद्धा झालीच आहे की आज ! कटकबाबू, मी तारू उत्तम बांधलं, पोलिसी वस्त्र, बंदुका, दारुगोळा जय्यत ठेविला जावऱ्याच्या पटाईत नाविकाच्या डुगी दूरवर सोबतीस येणार तारवात मांस, मध, फळं मद्य, भरपूर अन्न पाणी साठवून ठेवलं मासे धरायला जाळी घेतली देशी उतरताच लागेल द्रव्य हवं ती मोठी रक्कम तुझ्या माझ्या पातीनं जुळवली लाडके कटकी, मनुष्ययत्न तो सायसंगीत जुळवला, पण अशा ह्या खटनट समुद्रात, ज्याला काळं पाणी उगीच म्हणत नाहीत, त्या ह्या काळाच्या तोंडात साध वाऱ्या-वरच तारू दवलून जायचं त्यात यश शेवटी दैवाधीनच असणार, देवाचीच कृपा हवी, ह्या जाणिवेने माझ्या मनात नेहमी धुगधुग वाटे पण आज समुद्राच्या त्या ' जुरविन ' भुतावरचं वशकं असलेला अेक मंत्र नि हा तोडगा त्या जावरा चेटकीने जेव्हा मला दिला तेव्हा मग खरखर हायसं वाटलं ! दैवी कृपेची ही बघ ती लेखी वचन चिठ्ठी ! ' असं बोलत डोल्काठीने त्या जावरा भुताचे न चेटकाने

त्यांना कळते, तितकी देखील तुला कळत नाही. बांध तो ताअीत तूंच कंटकीच्या गळ्यात. मी तिचा वडील भाअू. माझा काही अधिकार नको का तिने मानायला! त्यासाठी ही चाणाक्ष मुलगी मी– तिचा वडील भाअू– सांगें तों वरवर तुला नकार देती झाली. हं, ताअी, बांधू दे डोलकाठीला तो ताअीत तुझ्या गळ्यात हो!'

'रागावला अेवढ्यानेच? हा रे वेड्या!' कंटकीने प्रसंगावधान राखून वेळ मारून नेण्यापुरतें अेक असें आकर्षक स्मित करून डोलकाठीची करंगळी हळूच ओढली की, त्या हलक्या ओढीने हत्तीने ओढावें तसें अवश होअून तो विचारा डोलकाठी झट्‌कन् तिच्याजवळ पुन्हा आला आणि प्रसन्नपणे विनवू लागला.

'तूच सार तो पदर खाली; हं, पुरे तेवढा. गळ्यात बांधता तर आला पाहिजे न ताअीत? पण तुझ्या कानात मला आधी मंत्र सांगायचा आहे, सांगू नं? आणू नं तोंड तुझ्या अगदी कानाजवळ? हो, नाही तर पुन्हा अमर्यादा व्हायची तुझी नि फणकारायचीस तू!' डोलकाठी अगदी प्रेमात आला. थेट कानाशी तोंड नेअून, अेक हात तिच्या गळ्याभोवती अुलट्या खांद्यावर टाकून त्याने तिला जवळ घेतले आणि त्या चेटकीचा तो निरर्थक अक्षरांचा मंत्र तीनदा तिच्या कानात अुच्चारला.

तो मंत्र शंभरदासुद्धा अुच्चारीत डोलकाठी तसाच अुभा राहिला असता, अितकें तें कंटकीला लगटून अुभें राहणें त्याला गोड वाटत होतें. पण कंटकी पुन्हा केव्हा बिघडेल ह्याची धागधूग त्याला लागलेली असल्याने त्याने पडलें तेंच सुख पदरात पाडून घेअून अगदी लघळपणाच दिसू नये म्हणून मंत्राची दीक्षा अवश्य ते तीन अुच्चार होताच संपविली आणि डोलकाठी हातातला ताअीत नीट करीत दूर सरला.

'लवकरच संपवलंस?' कंटकी खोचकपणे हसली. पण खाचा-खोचीचे गुलाबी काटे बोचविण्याअितकें भान डोलकाठीच्या त्या आनंदात नाहावलेल्या प्रांजल मनाला कोठले असणार? तो आपला सरळपणे अुत्तरला.

'वा! संपवल कसलं? आता हा ताअीत बांधायचा आहे की तुझ्या गळ्यात. अस्सा! ह, सन्मुख हो अशी, गळा नीट वर कर, करू दे ग तो पदर खाली! पुन पुन्हा हात काय मध्ये घालतेस तो सावरायला? हं, अशी ताठ अुभी राहा अ!'

तिच्यासमोर अगदी जवळ अुभें राहून तो ताअीत तिच्या वक्षःस्थलावर नीट ढळेल अशा बेताने डोलकाठी बांधू लागला.

अितक्यात तिच्या वक्षःस्थलाच्या नि गळ्याच्या मध्यंतरी काही रक्ताळल्या-सारख्या खुणा आहेत असे त्याला दिसलें.

'हें काय? ओरखडे कसले हे रक्ताळलेले तुझ्या गळ्याखाली? मृगया करताना काट्यात तर नव्हती पडलीस?' असें तिला तो विचारीत आहे. तोंच

तें ओरखडे नसून लाल रंगांत वेलपत्तींत गोंदलेलीं अक्षरें आहेत असें त्याला दिसलें. क्षणार्धांत त्यानें तीं वाचलीं — मालाती '

' काय ? मा ला ती ! — मालती ? '

हें मोठ्यानें वाचताच नि तो शब्द जुळताच डोल्काठीची मुद्राची मुद्रा पालटून गेली त्याच्या अंगावर रोमांच उठले

गाढ बेशुद्धींतून हळूहळू शुद्धीवर येणाऱ्या माणसासारखा तो कटकीला अनिमिष दृष्टीनें न्याहाळूं लागला क्षणार्धांत त्यानें अत्यंत स्निग्ध पण अत्यंत विस्मयपूर्ण स्वरांत कटकीला विचारलें,

' खरं सांग, शपथ आहे तुला तुझ्या लाडक्या आजीच्याच गळ्याची, हेंच तुझं खरं नांव न ? तू मालतीच न ? कुणी गोंदलं हें नांव तुझ्या वक्षःस्थलावर अिथे ?

आपलें खरें नांव डोल्काठीच्या असें अकस्मात् लक्षांत आलेलें दिसताच कटकी जरी थोडीशी दचकली, तरी त्यांत कांहीं विशेष हानि आहे असें वाटण्याचें कोणतेंही कारण न दिसल्यामुळें डोल्काठीनें तिला तिच्या लाडक्या आजीच्या गळ्याची शपथ तशा कळवळ्यानें घालताच त्या तिच्या आजीच्या स्मृतीनं गहिंवरलेसें होऊन ती सभाळून बोलूं जातांही खरं तेंच बोलून गेली,

' तं कुणी माझ्या लहानपणच अेक टोपण नांव होतं, माझ्या वडील भावानें लाडिकपणें नं असं लाल रंगांत माझ्या अंगावर गोंदलं होतं अेकदा पण माझं मूळचं नांव कटकीच '

नाहीं मालती, तू मालतीच आहेस ही पाहा त्या नांवाभोंवतालची वेलपत्ती, ती पाहा तं नांव गोंदतां गोंदतां माझ्या हातून झालेल्या चुकीमुळें ' ल 'ला अधिक पडलेला कांना तं चुकलेलं रूप ' मालाती ! ' — छट हं सगळं अशक्य पण तं बघा ना ! ' गद्गद् स्वरानें डोल्काठी मालतीला नखशिखान्त न्याहाळीत म्हणाला, ' ही पाहा तुझी प्रत्यक्ष मूर्ति हे केस, ही कपाळापासून पावलापर्यंतची ठेवण माझ्या बेशुद्धीच्या धुक्यांत झांवळलेली तुझी आकृति, मी शुद्धीवर येताच तें धुकं ओसरताच, कशी नखशिखान्त माझ्या मालतीच्याच स्वरूपांत प्रकटली आहे कटकबाबू, तुम्हीं कुणीही असा पण ही तुमची मानलेली बहीण कटकी माझी सख्खी बहीण मालती आहे ! खरं सांगा आतां काय तें मी तुमचा आहे मला भिऊं नका '

ह्या डोल्काठीच्या अत्यंत अनपेक्षित वाक्यासरशी कटकला धक्काच बसला फार वर्षांपूर्वी मालतीचा वडील भ्रातृ शिक्षा होऊन काळ्या पाण्यावर गला होता, हें त्याला झटकन् आठवलें परंतु जर डोल्काठी हा मालतीचा सख्खा भाऊच ठरला, तर कटकच्या मार्गांत डोल्काठीच्या मालतीविषयीच्या वैषयिक अभिलाषेमुळें जें वैर आडवें येण्याचें भय होतं, तें संकट अचानक नाहींसें होऊन पडल्यास सगळाच डाव अनुकूल पडण्याचाच संभव आहे हेंही सत्युत्पन्नपणें लगेच त्याच्या ध्यानांत आलें आणि तो डोल्काठीला म्हणाला,

करण्यासाठी जिवंताच्या अस्थि कबरीत पुरण्याची पाळी येअीतोंसुद्धा दगेधोपे करायला ते कचरत नाहीत. मृतांच्या अस्थींचा बडेजाव नि त्यात धार्मिक वा मांत्रिक वा दैविक गुण निवसतात, ही भावना जावन्यांतच नसून जगभर आहे बरं का! जावन्यांना तेवढे रानटी कां म्हणतोस ? म्हणायचं तर सगळ्यांना म्हण ! निदान माझा तरी ह्या मंत्रित अस्थींवर पूर्ण विश्वास बसला आहे खरा. ज्याच्या गळ्यात हा ताअीत मला त्या चेटकीने दिलेल्या मंत्रासह बांधला जाअील, त्याला 'जुहविन 'चं —त्या समुद्राच्या भुताचं — भय नाही; तो समुद्रात कधीही बुडणार नाही. समुद्रप्रवासी सुरक्षित पैलतीराला जाणारच जाणार, हें त्या चेटकीचं आश्वासन खोटंच आहे असं तरी तू त्याचा प्रयोग करून पाहण्याच्या आधी कशावरून म्हणणार ? अनुभवाच्याही आधी खोटंच म्हणणं, हाही अेक भाबडेपणाच नाही का तुझ्या मनाचा, तें खरंच म्हणणाऱ्या भाबडेपणासारखाच टाकाअू ?'

'बरं बुवा, तस का होअीना ! बांध त्या हाडकाचा ताअीत तू समंत्रक, आपल्या गळ्यात ! तारवाने नाही तर त्या ताअिताने, कशाने तरी पण समुद्र तरून देशी सुखरूपपणे पोचविलें गेलो म्हणजे झालं! '

'छे छे, माझ्या जीवनासाठी माझ्या गळ्यात नाही. माझं जीवन म्हणजेच ही माझी लाडकी कंटकी, ही तुझी वहीण नि माझी प्रियतमा ! ती सुखी, ती सुरक्षित, तर आपण सुखी, सुरक्षित. ह्यासाठी मी हा ताअीत कंटकीच्या गळ्यात बांधणार नि मला दीक्षा देताना त्या चेटकीने मला दिला तोच गुप्त मंत्र तिच्या कानात मी यथाविधि अुपदेशिणार. हा ताअीत तुझ्या गळ्यात जोवर राहील ना, तोवर लाडके, तुझ्या जिवाला भर समुद्रात भय नाही. तुला आमचं तारूं फुटलं तरी नुसत्या आपल्या लाटांवर वाहून स्वतः समुद्रदेवच परतीरास सुखरूप पोचवील ! चल ये अशी, सार तो पदर थोडा खाली ! '

डोलकाठी अगदी नि:संकोच प्रेमळपणाने कंटकीच्या खांद्यावर हात ठेवून तिच्या अपुऱ्या वस्त्राच्या पण अंटीने कसलेल्या पदराला ढिले करून खाद्याखाली सारू लागला.

त्याने तिच्या पाठीवर थोपटून खांद्यावर जो हात ठेविला, तो कामुक प्रणया-पेक्षा वत्सल लाडाचाच होता हे तिला कळले असूनही आणि त्याचे ते तसे अगलट येणे कोण्या मायाळू वडील भावाने अगलट यावे तसे तिला आवडले असूनही ह्या वरील घावामुळेच तिने डोलकाठीचा हात काहीसा झिडकारून दूर सारला आणि ती पदर कबरेला पुन्हा खोवीत फणकारली

'ताअीतच बांधायचा ना, तर माझा कटवदारा बांधील तुम्हीच नको काही नसती अगलट करायला!'

कटकीच्या त्या झिडकारण्याने डोलकाठीच्या प्रेमळ मनाचा अकस्मात् अितका विरस झाला की, त्याच्या डोळ्यातून अश्रूच टपकले आणि शब्दातून राग पण! तो कटकीपासून दूर जाअून अुभा राहिला, तो अपमान पदरावारी नेण्याचे सोडून तो कटकीला कळवळून बोलला,

'कटकी माझ्याशी अजून अितका परकेपणा ठेवीत आहेस का तू? तुझ्या स्वयंवराचा तो पण म्हणूनच ना मी पण ह्या भर समुद्रात हे तुटपुंजे तारू नि तुम्हाला काळ्या पाण्याच्या पार पळवून देशाला न्यायचे हे जिवावरचे साहस करीत आहे? पण जर तुझ्या मनात अितका परकेपणा अजूनही असेल, तर बळे बळें तुझ्यापुढे नाचत नि तुला त्रास देत स्वतःचा पाणअुतारा करून घेणारा मनुष्य हा डोलकाठी नव्हे! तू मला आजवर माझ्याशी पुढे विवाह करायच्या थापावर भुलवीतच आलेली असशील तर ते तुला मात्र शोभत नाही!' त्याचा

'मित्रा, खरं तेंच मीही तुला सांगेन, पण — पण — थांब, ह्या माझ्या मालतीचा तें नाव गोंदणारा जो वडील भाऊ होता, तो पुढे अेका ल्ढाअीवर गेला आणि तिथे त्याला डोक्यावर अेक घाव लागला होता त्या घावाची अेक नित्याची खूण त्याच्या डोक्यावर आहे असं आम्हाला अगदी नक्की कळलेलं होतं तशी अेखादी खूण तुझ्या डोक्यावर ’

कटक आपले वाक्य पुरे करतो न करतो तोंच डोल्कांठेनें आपल्या कपाळा-वर झुडपासारखे पसरलेले शिज्याचे जजाळ मागे सारीत नि फाकून घरीत आपलें मस्तक कटकच्या पुढे केलं ल्ढाअीत झालेल्या दोन-दोन अंगुलांच्या दुखापतींचा अेक मोठा वण तेथे ढळढळीतपणे आढळत होता कटकला खूण तर पटली

कटकने आपली कहाणी जशी घडली तशी सांगण्यास आरंभ केला त्याचं नांव किशन आणि तिचं नांव मालती असतां कोणत्या संकटांत सापडून त्यांना तीं नांवें पालटावीं लागलीं आणि कटक-चटकी अशीं टोपण नांवें घ्यावीं लागलीं आणि अितर सारा वृत्तांत निवेदिला

'कटक म्हणाला, 'तुमच्या मुलाला ल्ढाअीत अेक घाव डोक्यावर लागलेला असला पाहिजे असं ज्योतिर्ज्ञानानें दिसतं,' म्हणून त्या अधम कितवानं, त्या रफि-अुद्दिनने, साधूच्या वेषांत जेव्हा सांगितलं, तेव्हांच मालतीच्या आआची त्याच्यावर श्रद्धा बसली 'ह्या संकटांत सापडण्याला अेका अर्थी जो असा कारणीभूत झाला, तोच हा तुझ्या घावाचा वण आज तुम्हा बहीण भावंडाच्या ताटातुटीचा अंत करून तुमची ओळख पटविणारी साक्ष झाला, मालतीला संकटांतून सोडवणारं साधन झाला तसाच त्या अधम कितवाला (ल्फंग्याला), त्या रफिअुद्दिनला, तुझ्याच हस्तें प्राणदंड भोगावा लागून तुझ्या ह्या भगिनीचा सूड न कळत पण तिच्याच भावानं अुगवावा हाही योगायोग जितका आल्हादक, तितकाच आश्चर्यक !'

'छे रे — तो तापट डोल्कांठी ताठ अुभा राहून आणि आपला दणकट बाहु वातावरणांत फेकून दांत-ओठ आवळीत पुटपुटला, 'त्या अुद्दिनला मी माझा सूड म्हणून मारलं माझ्या बहिणीचा सूड म्हणून त्याचा गळा पुन्हा अेकदा असा करकचीत त्याला पुन्हा अेकदा असं ठार मेलं पाहिजे !' रागाच्या आवेशांत दांत

आहे वर ! जर मनाजोगं असं अजून काही राहिलच असेल, तर तें म्हणजे आपल्या आओीची काय ती भेट. दादा, घे मला अशी पोटाशी अेकदा ! '

' माले ! ताओ ! ' आपल्या गळयात पडलेल्या त्या त्याच्या बहिणीला आओीने लेकराला कुरवाळावें तसें केसावरून नि पाठीवरून कुरवाळीत तो त्या भेटीच्या गोड गुंगीत मधून मधून उगीच हाक मारीत होता, ' माले !' 'ताओ ?' आणि ती लाडिकपणे हळूच होकारत होती--' अं !' ' ओ ! ' ' दादा ! '

क्षणभराने मालतीची मिठी सोडून तो तिचा भाअू त्या किशनकडे वळला.

' किशन, माझी बहीण अनेक संकटांतून तू म्हणूनच वाचविलीस. तुझे माझ्या-वर अनंत अुपकार आहेत. पण हें बघ, माझेही तुझ्यावर काही कमी अुपकार नाहीत अं ! तू माझी बहीण मला परत दिलीस; मी पण, ही घे, तुझी प्रियकरीण तुला परत देतो. माझ्या आशीर्वादाच्या हुंड्यासह ह्या माझ्या भगिनीचं मी तुला यथा-शास्त्र कन्यादान करीत आहे ! '

' लग्नानंतर न ? किशन हसला !

मग त्या ठरलेल्या दिवशी त्या बिचाऱ्या आतिथ्यशील जावऱ्यांनी मोठ्या थाटामाटाने त्या तिघाना निरोप दिला ज्या वेळी किशन, मालती आणि तिचा दादा (डोलकाठीला आता सगळेच दादा म्हणू लागले) हे त्या तारवात बसून चांदण्या रात्री अगदी गुपचूपपणे त्या काळ्या पाण्याचा तट सोडते झाले. त्या वेळी समुद्राच्या भुताला, त्या ' जुरविन 'ला प्रसादविण्यासाठी जावऱ्यांनी त्याना माहीत होतीं नव्हती तितकी चेटकें केलीं; आणि दोनतीन ' डुंगी'सह त्या जावऱ्यातील पटाअीत ते-ते नाविक त्या किशनच्या तारवाला तटालगतच्या खाड्या-खाड्यांतील आडवळणांतून अिंग्रजांचे ठराविक ठिकाणचे पहारे चुकवीत, काळ्या पाण्याच्या

यऱ्हो मनात दाबून ठेविलेल्या भयाची काळछाया अेकदम अुठून पसरे. पुन्हा तिला दाबून दडपून ते अेकमेकांना धीर देत, हसत, गातसुद्धा वल्हविताना.

*अनुकूल वारा त्यांच्या तारवाच्या शिडात भरलेला होता. पण तेवढ्यावरच काही तें तारू बेधडक चाललेलें नव्हतें. जन्मठेपीच्या बेड्या तोडून आपण काळ्या पाण्यावरून पळून जात आहोत, ह्या कल्पनेच्या आनंदाचें वारें त्यांच्या हृदयाच्या शिडांतून जें भरलेलें होतें, मुख्यतः त्यावरच तें तारू असें बेछूट चाललेलें होतें.*

(मनुष्याच्या आशा-निराशा, पाप-पुण्य, न्याय-अन्याय, साध्य-असाध्य ह्यांच्या कसोटीवर जगाची अुलाढाल काही पारखून घेता येत नाही. त्याच्या खिसगणतींत-सुद्धा तो विचार नसतो. आपल्याला संभवनीय वाटतें तें अकस्मात् असंभव होतें. असंभव वाटतें तेंच कधी-कधी अकस्मात् घडून येतें. ह्यालाच आपण योगायोग म्हणतो. म्हणजेच त्या अुलाढालींचा आमच्या अिच्छेच्या वा तर्कांच्या अनुरोधें काहीच अुलगडा होत नाही, अशी आपण मान्यता देतो.)

अगदीं राजवाड्यात शेकडो दास-दासी लालन-पालन करीत असता किंवा प्रत्यक्ष राजा-राणी आपल्या कडेवर घेअून खेळवीत असता नवसा-सायासाने लाभलेलें राजबिंडें लेकरूं अुंच प्रासादावरून राणीच्या वा राजाच्या कडेवरून निसटून खाली फरशीवर पडतें आणि चक्काचूर होअून जातें! श्रीमंत रघुनाथराव पेशवे ह्यांचें अेक अपत्य, त्याला लाडाने श्रीमंत हाती अुचलून खेळवीत असता खाली पडून चिरडून गेलें असें सांगतात. अुलटपक्षी क्वेट्टा किंवा बिहार येथे झालेल्या भीषण भूकंपाच्या धक्क्यासरशी जेव्हा नगरेंची नगरे कोसळून भुअींत गडप झालीं, तेव्हा चार-चार मजली चिरेबंदी वाडे वरून धाड्धाड् कोसळून खाली फाटलेल्या भुअींच्या खड्ड्यात ढीग होअून पडले. माणसें, आअी-बाप, लेकरें ठेचून लगदा होअून दगडाच्या राशीत चुन्या-चिखलासारखी चिणून गेलीं आणि त्यातच क्षणतासभरा त्या ठेचून गेलेल्या कोणा आअीच्या कुशीत निजलेलें अेखादें मूल दोन दगडांच्या तंबूत सुरक्षित असलेलें सापडलें! *हाच योगायोग!* दैव! (*ज्याच्या* कार्यकारणाची गुतागुत आम्हाला सोडविता येत नाही किंवा आमच्या अिच्छेप्रमाणे सुटत नाही, त्यालाच आम्ही दैव म्हणतो. दैव, योगायोग म्हणजेच आमचें अज्ञान, आमची निराशा!)

काळ्या पाण्याच्या भर समुद्रात वाऱ्यावर सुटलेल्या ह्या लहान तारवातील प्रतिक्षणी मृत्यूच्या खडकावर आपटू पाहणाऱ्या त्या तीन जीवांच्या दैवी त्या अुलट सुलट योगायोगांपैकी कोणता योगायोग येणार आहे?

*ह्यांचें काय होअील? कसें होअील?*

आज आठवा दिवस तर अेकदाचा अुगवला! संकटाशी झगडता-झगडत त्यांचें भय पण किंचित् अुणावलें. अन्नाचा नि पाण्याचा पुरवठा पण संपत आले अितकेंच वाअीट; पण प्रवासही अर्धा-अधिक संपला. मासेही मधून-मधून ते धरीत

आणि खात, त्यावर निभाव लागे. क्षीणता मात्र वाढली. त्यातही मालती अधिक थकली पण अर्धा-अधिक प्रवास संपल्याचें तिला तिचा दादा सांगे आणि म्हणे,

' आततायी, पापी — त्या रफिउद्दिनसारखे कितव जर ह्या काळ्या पाण्यावरून तरून कधी-कधी देशाला पोहोचलेले आपण पाहतो, तर तुझ्यासारख्या निरागस, निरपराध नि सुशील अबलेला हात दिल्यावांचून तो दयाळू देव कसा राहील ? तुझ्या पुण्याशीनें आम्ही सगळे तरू. देशी पोहोचू. पुन्हा तो तावीत, तीं चेटकं, ते शुभ-शकून—ते काय लटके आहेत थोडेच ?'

असा धीर तिला त्याने दिला म्हणजे तिच्या शरीराचा नसला तरी मनाचा थकवा निघून जाअी. रात्र पडताच किशनच्या मांडीवर जेव्हा ती डोकें टेकून निजे आणि तो तिला थोपटी तेव्हा तिला चिंता शिवतसुद्धा नसे. अितकी अटकन् नि अितकी गाढ झोप लागे की, ती सकाळीच काय ती जागी होअी आणि अगदी टवटवीत होअून अुठे.

आठवा दिवसही निर्विघ्नपणे पार पडला. त्या संध्याकाळच्या सूर्यास्ताची शोभा आणि त्या शांत समुद्राचें आश्वासक वर्तन ह्यामुळे त्या तिघांनाही विपुल अुल्हास वाटू लागला. वारा तेवढा किंचित् मंदावला होता. ह्यासाठी त्यांनी आपलीं वल्ही अधिक नेटानें मारावयाला आरंभ केला. पण प्रत्येक वल्हयाच्या फटकाऱ्यासरसा स्वदेशाचें तीर भराभर सन्निधच येत चाललें आहे, ह्या जाणिवेनें त्या श्रमाचा शीण असा त्यांना काहीच वाटेना. अुलट अुल्हासाच्या भरात किशनला कोणतेंसे चुकत-माकत जें अेक नावाड्यानें गाणें येत होतें, तें तो गाअू लागला, मधूनच मालतीकडे पाहून चेष्टेनें हसू लागला. तिचा दादा पण त्याच गाण्याची साथ

# मला काय त्याचें ?

### अर्थात्

# मोपल्यांचें बंड

## १. कुट्टम गांवचे लोक

भारतवर्षातील सुरम्य व पवित्र प्रदेशात मलबारची गणना केली जाते. हिरवीगार व दाट अरण्ये, नाना फुलानी व फळानी डवडवलेले टुमदार पर्वत, पाण्याचे मंजूळ झरे, गोड व शांत स्वभावी नद्या, विपुल धान्यानी डुलणारी शेते, अुंच व छत्राप्रमाणे हारोहारीने लागलेल्या नारळी, पोफळी व ताड अित्यादि वृक्षाच्या पंक्ति ह्या प्रवाशाच्या नेत्रास व मनास पदोपदी आल्हादवीत असतात

अशा ह्या रम्य प्रदेशात नाना फुलानी व फळानी डवडवलेल्या अशा या वरील टुमदार पर्वतापैकी अेका पर्वताचे माथ्यावर अेक कुट्टम् नावाची लहानशी वाडी वसत होती तीत नारळीपोफळीच्या दाट वनामध्ये पाचसहा 'नंबुद्री ब्राह्मणाची घरे होती त्यापासून बऱ्याच अंतरावर पंचवीस अेक नायराची घरे व त्याना लागून अितर 'स्पृश्य' जातीची थोडीशी वस्ती होती त्या वस्तीपासून अर्ध्या मैलावर दहाबारा 'थिय्या' जातीच्या झोपड्या अुभ्या असून त्या मुख्य वाडी-पासून अर्ध्या मैलावर जरी अुभ्या होत्या तरी त्या वाडीच्याच सीमेत समजल्या

वारा पुन्हा अनुकूल त्याच दिशेने चांगला सुटला. शीड भरून गेलें, वल्हवणें मंदावलें, मध्यरात्र झाली, चंद्र अुगवला. अितक्यात तारवापासून थोड्याशा अंतरावर सळ-सळ-सळ असा मोठा आवाज होअून अेक अुंचच अुंच असा पाण्याचा भला मोठा लोंढा वर अुफाळला !

दादाने निरखून पाहिलें; तो अेक प्रचंड मासा अर्धा-अधिक अुभा राहावा तसा तळपू लागला. समुद्रात अनेकवार वावरलेल्या त्या डोलकाठीने तत्काळ ओळखलें की, हा मासा माशांतील भयंकर जातीचें अेक धूड आहे. त्यासरशी त्याने बंदुक अुचलली तोंच पुन्हा पाण्याच्या लोंढ्याचा अेक मोठा खळखळाट होअून मासा पाण्यात बुडी मारून नाहीसा झाला. संकट टळलें म्हणून डोलकाठीचा व किशनचा जीव खाली पडला.

त्या भयंकर माशावरून तशा माशांच्याच गोष्टी निघाल्या, डोलकाठी सांगू लागला, 'मोठमोठ्या आगनावांना आपल्या वीज असलेल्या प्रचंड शेपटीच्या फटकाऱ्याने अुलथच्या पालथं घालणाऱ्या दुष्ट मत्स्यांची महासागरातून कधी-कधी गाठ पडते, असं सिंधुप्रवासी सांगतात, लहान वारावाहू तारवांचा तर कित्येक मासे आडवळणातून पिच्छाच पुरवतात. त्यात कित्येक माणूसखाअू जातीही आहेत !'

किशनच्या अंगावर काटाच अुभा राहिला. 'नरभक्षक ! खरंच की काय ?'

पण किशनच्या ह्या प्रश्नाला अुत्तर देण्याचें डोलकाठीला कारणच पडलें

आणि मालती! ती बुडाली हे सुद्धा तिला मुळी कळलेच नाही ती गाढ झोपेत होती तिला त्या झुलत्या तारवामुळे मुखस्वप्न पडत होते की, तिच्या लहानपणच्या त्या झोपाळ्यावरच ती बसली आहे, तिची आजी तिला त्याच प्रेमळ ओव्या म्हणते आहे, झोपाळा अुचच अुच जाअून अेकदम खाली सरकताना तिला किती तरी गोड वाटत आहे!

त्या गोड स्वप्नात ती त्या तारवात जशी निजलेली होती तशीची तशीच, ते साग्र पालथे होताच, समुद्राच्या लाटेवर निजवली गेली! जाग अशी तिला पुन्हा कधी आलीच नाही!

ते सुखस्वप्न हीच तिची शेवटची जाग होती, तिची शेवटची जाणीव होती, म्हणजेच तिच्यापुरती ती मुखरूपपणे घरी जाअून आजीला भेटलीच! तिच्यापुरती तिच्या जाणिवेची शेवटची ओळ होती — सुखान्तच!

दुष्कर्मे केलीस' ह्या प्रश्नानेच तो त्याची परीक्षा करील पुनरुत्थानाच्या कल्पनेचे नावही ज्यांना माहीत नव्हते परंतु ज्यांनी जगात भूतमात्रावर दया केली, सत्य, समत्व, परहिततत्परता यातच जीवित घालविले त्यांच्यावर परमेश्वर सदोदित संतुष्टच राहील. आम्हा हिंदूत असे अनेक साधु झाले की, जे मुसलमानी कुराणाचे पानही न उलटता केवळ आपल्या पवित्र आचरणाने व भक्तीने मुक्त झाले!'

'मुक्त झाले!' मौलवी म्हणाला 'मूर्खा, ते सर्व नरकाग्नीत पडले!' परमेश्वरावर व पैगंबरावर जो विश्वास धरील तोच मुक्त होतो.'

'काय? आम्हा हिंदूंनी परमेश्वरावर विश्वास ठेवला, व त्याची भक्ति आम्ही मनोभावाने केली परंतु महंमद पैगंबरावर मात्र तुम्ही म्हणता त्या अर्थी विश्वास ठेवू शकलो नाही किंवा पुनरुत्थानाच्या आपत्तीचे तथ्य मानू शकलो नाही तर आम्हास मुक्तिच नाही?'

'अल्बत्–अर्थात् नाही!'

तर मग परमेश्वराच्या भक्तीइतकीच पैगंबराची भक्ति महत्त्वाची आहे म्हणावयाची! आणि पैगंबराच्या पूर्वीच्या मनुष्यजातीच्या लाखो पिढ्या निदान त्याच्या नंतरच्या तरी अर्ध्या जगताच्या सर्व पिढ्या नरकातच गेल्या ना? आमचे हिंदुजातीतील साधुसंतही नरकातच पडले ना?'

'अर्थात्! परमेश्वरी पुस्तकात ते स्पष्टच आहे.'

'तर मग!' कम्बू उठत उठत म्हणाला, 'मौलवीजी' ज्या नरकात असले साधुसंत राहतात, ज्यात माझ्या पूर्वजांच्या पिढ्या निपचित आहेत, तोच माझा स्वर्ग! मी हिंदूच राहणार त्यास सोडून मी स्वर्गात येऊ इच्छीत नाही. धर्मराजाची कथा माझी आजी मला अजून शिकविते, की स्वर्गाचे दार उघडे असून देखील तो आपल्या पाची भावास सोडून स्वर्गात जाण्यापेक्षा आपल्या ज्ञातिबांधवासह नरकातच राहून त्यांची आपल्या धर्मबळाने सुटका करण्यास झटला.

कोणीतरी धावत जाअून त्याला आणल्याविना पोर जगत नाही ' हे अेकताच कम्बू व त्याचे बरोबरीचा अठरा वर्षांचा मुलगा दामू हे अेकदम तीरासारखे धावत निघाले मौलवी त्या पारावरूनच त्यास पाहात त्याचे पुढे येअून त्या तलावाचे जवळ अुभा राहिला होता ते दोघे कम्बू व दामू विव्हल हृदयाने धापा टाकीत त्या तलावापासून काही शभर दीडशे फुटावर येतात तोच 'थिय्या ! थिय्या ! अिर ! अिर ! ' म्हणून तलावावर पाणी भरणाऱ्या व अितर अुभ्या असलेल्या पुरुष स्त्रियातून अेकच ओरड अुठली !

मलबारमध्ये अस्पृश्याना शभर दीडशे फुटाचे आत स्पृश्य जाती येअू देत नाहीत तलावाच्या जवळ शभर फुटावरून जाणाऱ्या मार्गावर अस्पृश्य पाय टाकताच तो तलावचा तलाव बाटून जातो असे स्पृश्य समजतात ते दोन थिय्ये अितके भरधाव येताना पाहताच तलावावर झालेला हा गलबला अैकून मौलवी मनातल्या मनात आनंदी झाला आणि तसाच अुभा राहून तो गम्मत पाहू लागला

'महाराज ! ' दुरूनच ते थिय्य ओरडले आमचा अेक मुलगा भयंकर घाव होअून मरणासन्न पडला आहे कृष्णा नायर वैद्य याचे घरून औषध आणावयास आम्ही चाललो आहे दुसरा मार्ग दोन तीन मैल अंतराचा असल्याने अिकडून धावत आहो दया करा व आम्हाला जाअू द्या '

'चाडाळा ! मरो तुझा मुलगा ! अेक नायर हात अुगारीत धावत आला 'बघत नाहीस का की हा तुझा मार्ग शभर फुटाहून दूर नाही पाहिजे तर मोजून पहा '

'महाराज ! तलावापासून हा मार्ग जितका जवळ आहे त्याहूनही माझे मूल मृत्यूच्या मार्गापासून जवळ आहे तरी कृपा करून औषध आणण्यास मला जाअू द्या '

'तर मग कोणतीही गोष्ट केवळ अेकाद्याने वारंवार ठासून सांगितली म्हणजे ती खरी ठरते का ? तर मग मी तुला दोन व तीन मिळून सात होतात हे ज्ञान मला परमेश्वराने प्रकट केले आहे असं शंभर वेळा ठासून सांगतो ! तू मानशील ?'

'छे, छे ते मुळी माझ्या प्रत्यक्ष ज्ञानाच्या व अनुभवाच्या विरुद्धच आहे ते बुद्धीला पटत नाही '

'तर मग दामू कुराण अीश्वरप्रणीत आहे अितकेच नव्हे तर तेच काय ते अीश्वरप्रणीत आहे हें बुद्धीला पटेल असं काही गमक तू सांग आणखी असं पहा की, ज्यांना कुराण अीश्वरप्रणीत वाटते त्यांनी खुशाल त्यास तसं मानावे पण आम्हास जर त्यातील प्रमेय समाजनाशक, निष्ठुर किंवा अविश्वसनीय वाटली तर ती तलवारीच्या टोकानं नरकाग्नीच्या ज्वालांत तापवून आमच्या हृदयावर डाग देऊन बळात्कारानं कोरून टाकण्याचा का प्रयत्न केला जावा ?'

'दादा आपणा अस्पृश्यांवर जो हिंदु धर्म अितका अन्याय करतो की त्यास त्याच्या धर्माचा अुपमर्द करणारा व त्यास काफर म्हणून समजणारा मुसलमान आम्हाहून अधिक पवित्र वाटतो तो गाअीचा वध करणारा व देवमूर्तींस दगड समजणारा मुसलमान त्यांच्या तळ्यावर जाअू शकतो पण रामकृष्णाची पूजा करणारे आम्ही आम्हां त्यांचेच हिंदु बांधव मात्र त्याहूनही पापयोनि ठरून त्यांना स्पर्श करू शकत नाही — ज्या हिंदुधर्मात हा भयंकर अन्याय पुण्य गणला जातो त्या हिंदुधर्मापेक्षा अस्पृश्य जाती मुळीच न मानणारा व सर्व मनुष्यांस समान समजणारा मुसल्मानी धर्म श्रेष्ठ नाही का ?'

त्या पापप्रक्षालनाचा मार्ग म्हणजे मुसलमान होणें हें तुला पटलें तरी कसें ? अेक वेळ नव्हे, हजार वेळही केवळ शिवाशिवीच्या प्रश्नापुरती हिंदूंतील अस्पृश्यता पुरवली पण ती जीस मुसलमान परमेश्वरी आज्ञा समजतात ती भयंकर अस्पृश्यता नको! कारण मुसलमानी वीस कोटी लोक सोडून बाकी जे शेकडो कोटी लोक पृथ्वीवर आहेत ते मुसलमानांच्या मते अस्पृश्याहून अस्पृश्यच नव्हेत काय ? त्यांस तारण नाही, त्यांस मुक्ति नाही, त्यांचे हजारो पूर्वज, साधु, संत, सर्व नरकात गेले व जातील! पैगंबराचे पुस्तकावर विश्वास न ठेवणाऱ्या नास्तिकास औश्वरही स्पर्श करणार नाही म्हणून कुराणाची वाक्यें सांगतात! म्हणजे औश्वर देखील त्यांच्या मते स्पृश्यास्पृश्य विचार धरतो! आम्हां हिंदु अस्पृश्यांस पुण्याचरणानें निदान पुनर्जन्मी तरी स्पृश्य होण्याची आशा आहे पण मुसलमानांच्या मते जे 'अस्पृश्य आहेत आणि ज्याची संख्या शेकडो कोटी होते त्यांस पुनर्जन्मच नाही, ते नरकातच कुजणार, सडणार; त्यांचिकडे अिश्वरही बघणार नाही, केवळ मुसलमान तेवढे स्वर्गात; बाकी सारें जग — तुझ्या रामचंद्र, श्रीकृष्ण, पांडुरंग भक्त पुंडलिकासुद्धा नरकात पिचणार! अस्पृश्यता वाअीटच. पण ह्या मुसलमानी भयंकर अस्पृश्यतेपुढे ती हिंदु अस्पृश्यता म्हणजे अेक वरदानच नव्हे काय ? आणखी हे पाहा की अस्पृश्यता वाअीट आहे म्हणून आपण सर्व हिंदु मिळून तेवढी रूढी मोडून टाकू. त्यासाठी हिंदुधर्मच बदलण्याची निंद्य कल्पना आम्हास सुचावी तरी का ? अस्पृश्यता म्हणजे काही सांगोपांग हिंदुधर्म नव्हे. घरात अेक घुशीचें बीळ आहे — सापाचें म्हणा पाहिजे तर — तर आपण त्यास बुजवू. पण त्या अेका बिळाकरिता आपल्या थिय्या जातीच्या अनेक पूर्वजांच्या पूर्वजांना पवित्र व प्रिय झालेलें हें हिंदुधर्माचें मंदिरच सोडून रानोरान भटकत फिरण्याचें काही कारण नाही.'

थिय्या लोक अितराच्या दृष्टीने जरी अंत्यज असले तरी त्यांना स्वतःचे जातीचा, चालीरीतीचा व धर्माचा फार अभिमान असतो. आपल्या पूर्वजास कोणी निंद्य म्हणावें हें त्यांस खपत नाही. त्याच्या या प्रखर पूर्वजाभिमानाने व जाति-प्रेमानेच ते अजूनपर्यंत खिस्ताच्या किंवा मुसलमानांच्या जाळ्यात पूर्णपणे अडकून गेले नाहीत. त्यांच्यात अनेक साधुसंत पूर्वी होअून गेले आहेत. आजही कित्येक बॅरिस्टर, वकील, डॉक्टर व पत्रकर्ते त्याच्यात निघत आहेत तथापि त्यांच्यातील अनेक अनावळचा तरुणास आपल्या हिंदुसमाजातील अस्पृश्यतेची अन्याय्य व घातकी रूढी आपल्या धर्मातून जबळ जबळ बलात्काराने परधर्मात ढकलून देत आहे. थिय्या जातीतून परधर्मात जाणाऱ्या तरुणास अुन्मार्गापासून परावृत्त करण्यासाठी त्यांच्या ज्या पुढाऱ्यांनी प्रयत्न चालले होते त्यात कम्बू हा अग्रगण्य होता. अशा या हिंदुधर्मा-भिमानी महारवधूचा तलावावर स्पृश्य लोकांकडून अितका अपमान झाला असताही त्याची ही हिंदुजातीवरील निष्ठा पाहून त्या तरुणाला गहिंवरून आलें व तो कम्बूच्या पायांवर डोकें ठेवून म्हणाला, 'मी यापुढे हिंदु जातीतील अस्पृश्यतेसारख्या नीच

हीं अितकी भांडाभांडी होअीतों ते दोन थिय्या, जे पूर्वी शंभर सव्वाशे फुटांवर थबकले होते ते सरकत सरकत अगदी त्या तलावाचे कोपऱ्यावरून जाणाऱ्या मार्गावर येअून पोहोचले होते. मुलाच्या डोक्यातून भळभळ वाहणारे रक्त त्या बापाच्या डोळ्यापुढे पुन्हा पुन्हा अुभें राहून अेकेक क्षण त्यास मृत्यूचें जवळ पडणारें अेकेक पाअूल वाटू लागले, तलावाच्या अगदी सन्निध — म्हणजे तीस फुटांवर मार्गानें जें वळण होतें तेथे जेव्हा ते अस्पृश्य आले तेव्हा त्या तलावांवरील स्पृश्यांचा कोप अनावर होअून दोघे नायर अेकदोन ब्राह्मण व काही सुतार असे त्यांच्या अंगावर दगड फेकीत धावले. अितक्यात अेक शांतपणे पुरपसूक्त म्हणत असलेला ब्राह्मण पुढे सरला व त्याने त्यांस होकारून म्हटले, 'हां ! हां ! अशी निरर्थक मारामारी तुम्हांला शोभत नाही. हे पाहा कम्बू मी तुझ्या त्या वैद्याकडे जातो व तुझें तें औषध तुला आणून देतो — मी जरी तुझ्या मुलाचा संबंधी नसलो तरी प्रत्यक्ष तुझ्या पायास जितकी शीघ्रता व हृदयास चिंता करता येणार नाही तितकी करून मी तुझें औषध आणतो. तू येथेच अुभा राहा, म्हणजे कोणाच्याही समजुतीस धक्का न पोहोचता तुझें कार्यही होअील.' तो ब्राह्मण अितकं बोलतो तोंच तो मौलवी पुढे झाला व म्हणाला, 'माफ कराना ! मी मोठ्या आनंदानें कम्बूचं औषध घेअून येतो, आपण आपली संध्या पुरी करावी. मला या मार्गानें तलावाचे जवळून जाण्यास काही हरकत नाही ना ?' तेव्हा दारूच्या मक्त्याचें दुकान चालविणारा मुकुंद म्हणाला, 'पण तुझी जात कोण ? थिय्या लोक अस्पृश्य असून अगदी घाणेरडे धंदे करतात.' मौलवी म्हणाला, 'मी थिय्या हिंदु नसून मुसलमान आहे !' 'तर मग खान-साहेब ! आपणांस कोण हरकत घेतो ! आपण या मार्गाने वाटेल तेव्हा यावे, जावें. हे थिय्या लोक पापयोनी असल्याने यांना तलावापासून शंभर फुटांच्या आत येअू दिल्याने तलाव बाटेल !' चोरी करून दोनदा तुरुंगात गेलेला तो क्षत्रिय कुलावतंस रामनायर म्हणाला. तो मौलवी अिकडे हें बोलत आहे अितक्यात तो पुरपसूक्त म्हणणारा ब्राह्मण तसाच ओलेता धावत निघूनही गेला होता. तेव्हा कम्बूच्या

मुसलमान या सर्व काफरांच्या स्त्रियांचेही पाणिग्रहण करणार आहेत समजलास ! चल तर तू मुसलमान होण्याचा संकल्प कर बेटा ! म्हण की मी हें आयत–कुराणाचा मंत्र म्हणतो म्हणजे तें तुझं मूल तत्काळ बरं होईल व या निर्दय ब्राह्मणाचा व स्पृश्यांचा सूडही अुगवला जाअील !" हें त्याचें भाषण पुरें अैकण्यास आपल्या चिंतेत मग्न झालेल्या त्या थिय्यास अगदी असह्य होअून तो संतापाने म्हणाला "तें मूल बरं न झालं — तें मूल मेलं तरी मी मुसलमान होणार नाही ! ब्राह्मणादि हिंदूंची ही निर्दयता व तिचा सूड कसा घ्यावयाचा हा माझा प्रश्न आहे तुमचा नव्हे आणि जो सदय मनुष्य मजसाठी प्रार्थना करता करता औषधाच वैद्याकडे धावत गेला आहे तोही ब्राह्मणच आहे !" आता मात्र निराशेच्या रागानें मौलवी लाल होअून म्हणाला "चांडाळा ! काफर ! 'सूरतुल बकरन' या अध्यायात परमेश्वराने मूर्ति-पूजकांस फर्माविलेली भयंकर नरकाग्नीची शिक्षा तुजवर कोसळो ! तुझा मुलगा तू म्हणतोस तसाच मरो नव्हे नव्हे तुम्हा काफरांस हें अीश्वरी प्रकटीकरण — हें कुराण खरें वाटणारच नाही तोवर का जोवर तुमच्या मानेवर तलवार बसून पडणार नाही ! त्याला काही दिवस दूर नाही" हाताच्या मुठी वळून त्याचे तोंडावर त्या अंधारीत तो मौलवी हा शाप देअून निघून गेला

अितक्यात तो औषध आणावयास गेलेला ब्राह्मणही तें औषध घेअून परत आला त्याचे बरोबर तो नायर वैद्यही आला होता कण्णू थिय्या हा जरी अस्पृश्य जातीत अुत्पन्न झालेला होता तरी तो चांगला सुशिक्षित असून कालिकतमध्ये अेक मल्याळम भाषेतील साप्ताहिक पत्र चालवीत असे त्याने हिंदुधर्माचे मल्याळम भाषेमधून व अिंग्रजी ग्रंथावरून बरेच अध्ययन केलेले होते अितकेच नव्हे तर तो संस्कृतही अस्खलित रीतीने वाचू व बहुतेक समजू शके भगवद्गीतेस तो तोंडपाठ म्हणे मलबारमध्ये आजही संस्कृत भाषा मातृभाषेप्रमाणे बोलणारी ब्राह्मण कुटुंबें तर आहेतच पण निवडक संस्कृत शंभर दोनशे श्लोक मुखोद्गत असणारे थिय्या आदिकरून अस्पृश्यही आढळण्यात येतात अितकेच नाही पण संस्कृतचे श्लोक तेथे सर्वसाधारण जनतेस अितके परिचित की भर्तृहरीच्या नीतिशतकातील बरेच श्लोक अशिक्षित मुसलमानांचे तोंडूनही लेखकाने अैकलेले आहेत कण्णू थिय्याच्या विद्वत्तेन

सांगितलेल्या कथा पटत नव्हत्या त्यास त्या पटविण्यासाठी प्रयत्न करताना सर्वज्ञ वेदामध्येही हरिहरशास्त्री यास आगगाडीचा व तारायनाचा सनातन धुल्लेख आढळू शकला. हरिहरशास्त्री याची विद्वत्ता दांडगी होती. आणि तिला मद्रासपर्यंतच्या प्रवासाची धारही लावली गेल्याने सद्य स्थितीतील सामाजिक व राष्ट्रीय कल्पनांची काही कोडी अुलगडण्यास नसली तरी कापून काढण्यात ती समर्थ झालेली होती. त्यांच्या घरी नोकरापर्यंत संस्कृत भाषा थोडी बहुत समजत असे ते आपल्या घराच्या ओसरीवरून बागेत फुले तोडीत असलेल्या आपल्या दोन मुलांच्या लीला पहात अुभे होते अितक्यात तिकडे कुमारिकेवर भेंडी लागल्याने ती आपल्या भावास खेळकर रागाने म्हणाली, 'भाऊ! अशाने मी खेळणार नाही अं! हा श्लोक तू आपल्या नियमाबाहेर म्हटलास. पंचमहाकाव्यातील हा श्लोक नाही व पंचमहाकाव्यातीलच श्लोक म्हणावयाचे म्हणून आपली प्रतिज्ञा आहे'

'पण सुमति! हा श्लोक रघुवंशातीलच आहे'

'मुळीच नाही—' 'आहे ग! पैज तुझी माझी!' 'हो हो पैज चल बाबांना विचारू!' 'का हो बाबा' तिचा भाऊ म्हणाला 'बाबा!' 'सीते दुस्सहन वन!' हा श्लोक कालिदासाचा नाही का हो?' 'नाही बाळ,' शास्त्री म्हणाले 'पण तो कुठला हे सुमतीने स्वत सांगितले तर तिने जिंकले असे मी समजेन!' 'हा हा रामायणातील आहे' चटकन् सुमति म्हणाली शास्त्री हसून म्हणाले 'खरोखरच' तथापि रामायणातील काही अनुष्टुपे ही कालिदासाच्या अनुष्टुपांशी अितकी तंतोतंत मिळतात की जितकी गीतेतील अुपनिषदांशी, म्हणूनच बाळ चुकला ता काही सुमतीने धरण्यासारखा दोष नाही 'सोडण्याअितका/का होअीना!' सुमति खाचून म्हणाली ताच तिच्या पायाभोवती वळसे काढीत पण किंचित् अंतरावरून अेक सतेज सर्प फिरताना दिसू लागला शास्त्री लवमात्र न चमकता म्हणाले, सुमते! बघ तो माझा फणींद्र तुझ्या पायाची काही विनती करीत आहे, तू आज सकाळचे फुले तोडण्याचे ते गाणे म्हटलं नाहीस म्हणून तो आला असावा अेकीव त्याला ते गाणे!'

त्या सापाला पाहताच 'फणींद्र', 'फणींद्र' करून ती दोघे त्याच्याशी खेळू लागली केव्हा चुटक्या वाजवून तर केव्हा शीळ घालून ते त्यास पुढे मागे वळवीत त्यांच्यांनी खेळता खेळता आणखी दोन तीन नाग बिळातून बाहेर आले व त्या खेळात भाग घेअू लागले आपल्या अिकडे जशी मांजर किंवा कुत्री आपण पाळतो त्याचप्रमाणे मलबारमध्ये सापाच्या सव जातीस लोक घरात, अंगणात यमू देतात कुत्रे पिसाळेल व मग ते प्राणघातक होअील ही कल्पना जशी आपण सहसा मनात आणीत नाही, तशीच त लोक सर्प क्वचित चावेल ही भीति मनात आणीत नाहीत पण कळत न कळत चवताळून सर्प चावत नाहीत असं मात्र नाही, तथापि सर्पास मारणे हे साधारणत अधर्म समजले जात असल्याने अनेक ठिकाणी

पाळीव पशूप्रमाणे सर्पही अंगणातून ओटीवर व ओटीवरून अंगणात हिंडताना दिसतात. हरिहरशास्त्री यांच्या फुलबागेतील सर्पांचा त्यांच्या प्रेमावर नुसत्या धार्मिक दयेचाच वा सामाजिक रूढीचाच हक्क नव्हता. त्या सर्पाविषयी त्यांना जवळ जवळ वत्सलता वाटत असे, कारण जो नाग त्या मुलीच्या पायाभोवती लडिवाळपणे वर्तुळे घालीत होता तो हरिहरशास्त्री यांच्या वृद्ध पित्यांनी मरताना आपल्या नातवाप्रमाणे याला़ही सांभाळ म्हणून त्यांच्या पदरात घातलेला होता. तो वृद्ध अेके दिवशी पाऊस मी म्हणत असता अेका वनातून येत होता. डोक्यावर जुन्या काळची ताडपत्री छत्री होती, त्या वनात पाऊस अेवसारखा पडत असल्याने सर्व जीवजंतु थंडीने जवळ जवळ थिजून गेलेले होते. अशा वेळी अेका नाग चाफ्याच्या झाडाखालून जात असता त्या वृद्ध ब्राह्मणाच्या छत्रीवर वरून अेक नागाचे पिल्लू पडले. पडताच छत्रीच्या वरच्या दांड्यास विळखा घालून ते तेथे राहिले. घरी येताच त्या वृद्धास दया येऊन त्याने त्या पिल्लास अुबदार कपड्यात घालून ठेवले. हळवे हळवे त्या फुलबागेत त्याचेसाठी अेक ल्हान सुंदर वारूळही बांधले, तेथे ते नागाचे पिल्लू वाढत वाढत अेक अितरांस भयंकर वाटणारा परंतु त्या वृद्धाच्या खांद्यावर व हातावर अेखाद्या मुलाप्रमाणे वागणारा नाग झाला, त्या फुलबागेतील अितर नागस्त्रियांशी त्याची सोयरीक जमून यथाकाली त्याची संततिही वाढू लागली, हे सर्व सर्प त्या बागेभोवती नेहमी फिरत व तेथून जवळच असणाऱ्या धान्याच्या कोठारावर रात्री पहारा देत. अेकदा काही चोर रात्री शास्त्री यांच्या घरात शिरून धान्य व धन घेऊन जात असता द्वाराशी येताच या प्रचंड नागाने अडवून धरले. फूत्कार करीत व भयंकर फणा अुगारीत तो समोर अुभा राहिला. त्यास पाहताच किंचित् दचकलेले ते चोर जो शस्त्र अुपसून धावतात तोच ते अितर सर्व मागून व बाजूने सरसावून त्या चोरांस घातक दंश कडकडून करते झाले व अंधारात निसटून गेले. ते चोर दरवाजातून तीसचाळीस फूटावरही जाऊ शकले

प्रेम असल्याने काही कुमारींचे जीवन धोक्यात पडते अशा अद्भुत गोष्टी कधी कधी घडतात पण ह्या नागाचे त्या कुमारिकेवरील प्रेम तिच्या जिवास धोक्यात घालण्याअितके अुद्दाम नव्हते तो अगदी अेखाद्या चतुर प्रियकरासारखा तिच्या अर्ध्या वचनात असे तिच्याभोवती फिरणे, तिच्या हातून दूध पिणे, तिचे गाणे अेकणे व दिवसातून अेकदा तरी तिचा हात आपल्या अंगावरून फिरवून घेणे यात तो नाग आपला सर्व दिवस स्वर्गीय आनंदात नेत असे केव्हा केव्हा मान तिच्या अंगास वेढून तिच्या मुखाकडे टक लावून बसावे अशी अुत्कट अिच्छा त्यास होअी, व ती पूर्ण न झाली तर तो दूधच पीत नसे जेव्हा सुमति निदान आपला हात तरी पुढे करून त्या नागास, त्या सुकुमार व त्याच्या अंगाहूनही कांतिमान व मृदुमांसल असल्याने अेखाद्या नागिणीसारख्या शोभणाऱ्या आपल्या हातास विळखे घालून कवळू देअी व त्याच्या नयनास आपल्या वदनचंद्रिकेस पिअू देअी तेव्हाच तो नाग दूध पिअी हरिहरशास्त्री हा त्याचा सव छळा पुरवीत सुमतीस व त्या सर्व कुटुंबास तो व त्याची सर्व संतति घरची माणसच वाटत

त्या सापाशी खेळता खेळता सुमतीची दृष्टि सहज वर गेली तो दूरवर कोणी तरी अुभे राहून हाताने आपणास तिकडे बोलावीत आहे असे तिच्या पहाण्यात आले 'बाबा ! ते पाहा कोण ते ! आपल्या अिकडेच येत आहेत वाटते पण ते तिथेच का अुभे ? ' हरिहरशास्त्री यानी वर पहाताच म्हटले की तो शिष्याचा पुढारी कम्बू असावा ' कम्बूविषयी हरिहरशास्त्री यानी प्रशंसा केलेली सुमतीने अेकलेली होती तेव्हा ती म्हणाली 'बाबा असा विद्वान् मनुष्यास अिकडेच का बोलावीत नाही?' शास्त्री म्हणाले, 'बा ! शिष्याना येथे बोलावले तर अुद्या हे सर्व ब्राह्मण मला येथून हुसकून देतील मीच तिकडे, जातो ' सुमति चटकन हसून म्हणाली, ' खरच का बाबा ! ब्राह्मणाच्या वठारात (वस्तीत) वावरणाऱ्या या कुत्र्यापेक्षा गदळ व या सर्पापेक्षा भयंकर असेच का हे शिष्य लोक खरोखरीच असतात ? ' असा छद्मी प्रश्न करीत, पण अगदी सहज खेळकर स्वभावाने करीत कुमारिका घरात निघून गेली व शास्त्री आपल्या त्या तरुण मुलाबरोबर त्या शिष्याकडे चालले सुमति मागचे बाजूने त्याचे अेक घर होते तेथे जाअून त्या शिष्याशी आपल्या बापाचे संभाषण काय होते ते अेकू जरी येणार नव्हते तरीबस होते ते पाहता येअील म्हणून अुभी राहिली

हरिहरशास्त्री त्या अेखाद्या तपोवनाप्रमाणे शांत व निर्भय भासणाऱ्या ब्राह्मणागारातून चालू लागले मधून कोकिळा अुच्च किलबिल करी मधून गाअी हंबरत मधून वेदाची सथा चाललेली अेकू येअी अेका ठिकाणी दोन तीन शास्त्री अत्यंत गंभीरतेने प्रदक्षिणेच्या वेळी प्रत्येक दोन पावलात किती अंतर असावे याविषयी स्मृतीमध्ये काही स्पष्ट व्यवस्था दिलेली आहे की नाही व नसल्यास ती कशी लावावी या अत्यंत महत्त्वाच्या विषयावर वाद करीत असलेले दिसले लव-

त्याच्या प्रतिकारासाठी आपण धावून जावयास नको काय ? त्याच्या बहिणी त्या आपल्याच बहिणी नव्हत काय ? त्याची देवाऱ्यें तीं आपल्याच देवाची नव्हत का ? मग त्याचा नाश तो आपला नाश. जेथे सर्व हिंदु जातीच्या सुखदुःखाचा प्रश्न आहे तेथे पेशावरच्या महारवाड्यातील हिंदु झोपडी ही रामेश्वरच्या नगरसीमेतच समजली पाहिजे. आज अरनाडवर प्रसंग आहे म्हणून कुटुंमला लाज वाटावयास नको का ? अरनाडला आज या मुसल्मानांनी तुमच्या हिंदूंच्या मुली पळवून बायका केल्या व तुमच्या मूर्ति भ्रष्ट केल्या हें येथील मुसल्मान सांगताना आमचीं तोंडें लज्जेने काळीं ठिक्कर पडत नाहीत काय ? निदान पडलीं पाहिजेत. पण ते सर्व सोडा. मला क्षमा करा. पण मी तुम्हास स्पष्ट सांगतो की—मला हें निष्ठुर कर्तव्य म्हणून सांगण्याचे धैर्य करतो की—आता अशाच वाचनलतेसारखी मोहक व प्राणासारखी प्रिय असी जी आपली कन्यका आताच फुलबागेतून तुमच्या घरात गेली, महाराज ! तिच्या पवित्र सन्मानाची व जीवनाचा हानी होऊ नये अशी जर तुमची इच्छा असल तर—वेळीच सावध व्हा !'

हरिहर शास्त्रीबुवाच्या पायात धस्स झालें परंतु (मनुष्यस्वभाव चमत्कारिक आहे की अपमान आपल्यावर कोसळला तरी चालतें पण त्याचें नाव घेऊन तो कोसळणार आहे असे सांगितलेलें सोसवत नाही) आपल्या प्रिय, सुंदर व सुशिक्षित कन्येचें नाव या विश्वानें व अशा भयंकर भविष्यवाणीत घ्यावें याचाच त्यांना अधिक विषाद वाटला. व त्या भावी भयानं धस्स होत असताही त्यांच्या तोंडावर असंतोषाची छाया येऊन गेली. पण लवकरच विवेकानं सावरून ते म्हणाले, कम्बू ! तर मग या अनर्थाचा प्रतिकार करण्यास उपाय काय ? जाणखी कायरे—आजकाल तर हिंदु मुसल्मानाचें ऐक्य स्थापित झालें आहे ना ? खिलाफतीस स्वधर्माच्या प्रश्नाप्रमाणे हिंदूंनी आपलासा केला व म्हणून मुसलमान त्याच्या शब्दाबाहेर पाऊल टाकीत नाहींसे झाले आहेत ना ! मग तू हें वंड होणार म्हणतोस हें हिंदूंच्या विरुद्ध कसं असेल ?'

'महाराज ! या भावी अनर्थाचा प्रतिकार कसा करावा म्हणून जे विचारलेत त्याचा हाच पहिला उपाय—प्रथम ही समजूत की, हिंदु-मुसल्मानांचे चाललेलें ऐक्य हें हिंदूंच्या सुरक्षिततेला पोषक आहे ही समजूत दूर केली पाहिजे. तुम्ही म्हणता त्या वाक्याचा पूर्वार्ध खरा आहे का हिंदूंनी खिलाफतीच्या प्रश्नास स्वधर्माच्या प्रश्नाप्रमाणे समजून आपलासा केला आहे. पण त्याचा उत्तरार्ध मात्र अवास्तव आहे. कारण हिंदूंनी खिलाफतीस आपलेसे केलं म्हणून मुसल्मान हिंदूंच्या शब्दाबाहेर आपण पाय टाकू नये असं मानीत नसून हिंदूंनी आपल्या शब्दाबाहेर पाय टाकू नये असं म्हणत आहेत. ही सत्यस्थिति हिंदूंचे दृष्टीस आणून या बंडास असावधपणे कोणतेंही साह्य न देता त्याची कबर अव्हेरापासूनच व उघड प्रतिरोध करून मोडून टाकावी हें हिंदूंस समजावून देणे हाच अनर्थाच्या प्रतिकाराचा पहिला

अुपाय पहिला पण अेवढाच नव्हे, कारण हिंदूच्या आधारावर हे बंड मुसलमान करीत नाहीत हिंदूना ते मिळोत वा न मिळोत बाटवून टाकावयाचेच हे तर या बंडातील अेक महत्त्वाचे ब्रीदवाक्य व युद्धगर्जना व्हावयाची आहे तेव्हा दुसरा अुपाय म्हणजे त्वरित आपणा हिंदूची स्वसंरक्षणार्थ पथके निर्माण करणे हे होय हे काम आताच आरंभिले पाहिजे, तो मौलवी जो सटून गेला तो अरनाड येथे त्याच्या मुख्य सभेत बहुधा दोन तीन दिवसात जाअून प्रतिवेदन करील की कुट्टम येथील थिय्या लोक स्वेच्छेने मुसलमान होत नाहीत, अितर जातींची तर गोष्ट बोलावयाला नको! बहुधा कुट्टम देशाचे नाव त्या टिपणीत दाखल केले जाअील की जीत ज्या हिंदूच्या गावास बलात्काराने मुसलमानी धर्म स्वीकारावयास लावून त्याची अवघी मत्ता काफिराची म्हणून जप्त व्हावयाची आणि या मत्तेने हिंदु स्त्रिया ही धर्मवीराची न्यायसिद्ध लूट म्हणून हरण करावयाच्या आहेत त्या गावची नोंद आहे! व हही निश्चितच आहे की या लुटीत या पवित्र, निरपराध व लावण्य-वती कन्येचा वाटा त्या नीच मौल्वीचा म्हणून ठरणार! महाराज, राग करू नका! माझा करू नका जो राग करावयाचा तो ह्या पापाचरणास प्रवृत्त झालेल्या नीचाचा! मी अेक दुष्ट बातमी वेळेवर पोहोचवून तिच्या परिणामापासून तुमचे संरक्षण करण्यास आलेले पत्र आहे! मला फाडून तोडून टाकू नका तर त्यातील बातमीचा नीट विचार करून त्या संकटावर व दुष्टावर आपला सूड अुगवा!'

'तू म्हणतोस तसेच! कम्बू! चल! कसा आरंभ करावा सांग!'

'ठीक आहे महाराज, पहिली गोष्ट म्हणजे अरनाड येथे जाअून तेथील मुसलमानांच्या मुख्य केंद्रातील मंडळींनी तेथील ज्या हिंदु पुढाऱ्यास भूलथापा देअून 'स्वराज्या'च्या व 'अैक्या'च्या साखरेत गुंगीच्या विषाच्या गोळ्या चारल्या आहेत त्या हिंदूस शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न मी करतो ते वेळेवर शुद्धीवर आले तर ठीकच, नाही तर निदान आपण कुट्टमच्या तरुण हिंदूस तरी धर्मरक्षणार्थ सज्ज करून ठेवू. थिय्यामधील तरुण या कार्यास सिद्ध आहेत'

मध्येच तो कम्बूबरोबर आलेला थिय्या तरुण म्हणाला, 'हो! हो! हिंदु धर्मसंरक्षणार्थ आम्ही मरावयास देखील सिद्ध आहोत'

'आपण सवडे या ब्राह्मणागारात, पांडवांच्या शिबिरात ज्याप्रमाणे द्रौपदेयादि होते त्याप्रमाणे, स्वस्थ घोरत पडलेल्या आपल्या बंधूस सावध करून ठेवा मी अरनाडहून येताच आपणास भेटतो'

हा संवाद अिकडे चालला असताना प्रथम आपल्या घरामागे काही वेळ अुभी राहिल्यानंतर हळू हळू पुढे सरकत सरकत आम्याच्या दृष्टीस न पडेल परंतु त्या सर्वांचे संभाषण स्पष्ट नसले तरी अस्पष्टपणे अैकू येअून व त्या थिय्यास स्पष्टपणे बघता येअील अशा अंतरावर अेका नारळीचे आड येअून सुमति गुपचीप अुभी राहिली होती तिला सरकताना त्या थिय्या तरुणाने पाहिलीही होती तिनेही

वरून तो बम्बू अुभा होता तेथे ते आले व यथाचित अंतरापेक्षा बरेच पुढे होअून अेकान्तात त्याच्याशी बोलू लागले काही अगदी हळू व काही जरा अुंच असा त्याचा संवाद चालता चालता बम्बू म्हणाला, 'त्याची अगदी शंका नको महाराज ! ज्या घराखाली सुरुंग लावलेला असतो ते घर केवळ तो सुरुंग खाली लावला जाताच हलू वा अस्वस्थ होअू लागत नाही परंतु त्या वेळच्या त्या घराच्या स्थिरतेने व घरच्या माणसांच्या शांत निर्भयतेने जर कोणी म्हणेल की त्या घराखाली सुरुंग लावलेला आहे ही बातमीच खोटी आहे तर त्याची समजूत कोणी घालावी ? सुरंगात ठिणगी पडताच जो भयंकर धक्का बसेल ताच अेक कोटिक्रम त्याची ही समजूत चुकीची ठरवू शकेल ! आज तुमच्या या ब्राह्मण वठारांची स्थिति अगदी तशीच आहे तो मौलवी दोनदा मला म्हणाला की जर तू मुसलमान होशील तर अेक महिन्याच्या आत तुला—महाराज हे वाक्य अुच्चारू नये पण न अुघडणाऱ्या आर्यांच्या डोळ्यास अुघडविण्यास समर्थ असणार अन्य अंजन म्हणून अुच्चारतो—तो म्हणाला तुला व तुझ्या या स्त्रियांना जे आज कुत्री फिरतात त्या मार्गावरनही विटाळ होअील म्हणून जाअू देत नाहीत त्याच या ब्राह्मणमराठ्यांच्या मुलींच्या मंचकावर तुम्हास नेअून न बसवीन तर मी मौलवीच नाही ! जो जो स्त्रिया आज मुसलमान होअून या लवकरच होणाऱ्या बंडात भाग घेअील त्या प्रत्येकास तो निवडील ती ब्राह्मणाची मुलगी अेका महिन्याचे आत अर्पण केली जाअील ! महाराज, रागावू नका ! मलबारमध्ये आज काहीअेक गडबड दिसत नाही, या तुमच्या शांत तपोवनात कोकिळांचा किलकिलाट जो काय शांति भंगितील ती भंगिताल अशी आज जरी स्थिति असली तरी आत्ता या घडीस—या तपोवनाखाली मोपल्या मुसलमानांच्या राक्षसी धर्मवेडाचा भयंकर सुरुंग लाविला जात आहे '

त्या मौलवीसारख्या दहापाच धर्मोन्मत्तांच्या आरडाओरडीने डळमळून जाअील अितके का ब्रिटिश राज्य दुबळ आहे ?' त्या स्त्रियांच्या बातमीचा जरा परिणाम होअू लागल्यामुळे थोड्याशा चिंतायुक्त ध्वनीने शास्त्रीबुवांनी विचारले,

'दहापाच धर्मोन्मत्त मौलवी नव्हेत ! तर अेकूण अेक मोपला या बंडात शस्त्र घेअून खिलाफतासाठी अुठणार आहेत त्या शिरहित त्या मौलवीने मला हेही सांगितले आहे की अरबस्थानातून दारुगोळा समुद्रमार्गे त्यास पोहोचविला जाणार असून अफगाणिस्थानचा अमीर हा त्याच वेळेस पन्नास साठ हजार फौज घेअून हिंदुस्थानवर स्वारी करणार आहे आमच्या अुठावणीचाच काय तो विलंब आहे आम्ही बंड करून अुठताच तीन महिन्यांचे आत तुर्कस्थानचा झेंडा झुलवीत अनवर बेग आम्हास येअून मिळणार आहे ' असे तो मौलवी वारंवार म्हणत होता

'हा अनवर बेग कोण ?

तो तुर्क आहे व त्याला हिंदुस्थानातील मुसलमान सर्व जगातील मुसलमानांना स्वतंत्र करण्यासाठी धाडलेला अीश्वरी वीर समजतात

त्याच्या प्रतिकारासाठी आपण धावून जावयास नको काय? त्यांच्या बहिणी त्या आपल्याच बहिणी नव्हत काय? त्यांची देवालयें तीं आपल्याच देवांचीं नव्हत का? मग त्यांचा नाश तो आपला नाश. जेथे सर्व हिंदु जातीच्या सुखदुःखाचा प्रश्न आहे तेथे पेशावरच्या महारवाड्यातील हिंदु झोपडी ही रामेश्वरच्या नगरसीमेतच समजली पाहिजे. आज अरनाडवर प्रसंग आहे म्हणून कुट्टमला लाज वाटावयास नको का? अरनाडला आज या मुसलमानानी तुमच्या हिंदूंच्या मुली पळवून बायका केल्या व तुमच्या मूर्ति भ्रष्ट केल्या हे येथील मुसलमान सांगताना आमचीं तोंडें लज्जेने काळीं ठिक्कर पडत नाहीत काय? निदान पडलीं पाहिजेत; पण तें सर्व सोडा. मला क्षमा करा. पण मी तुम्हांस स्पष्ट सागतो की—माझें हें निष्ठुर कर्तव्य म्हणून सांगण्याचें क्रौर्य करतो की—आता अशाच कांचनलतेसारखी मोहक व प्राणासारखी प्रिय अशी जी आपली कन्यका आताच फुलबागेतून तुमच्या घरात गेली, महाराज! तिच्या पवित्र सन्मानाची व जीवनाची होळी होऊं नये अशी जर तुमची अिच्छा असेल तर—वेळीच सावध व्हा!'

हरिहर शास्त्रीबुवाच्या पोटात धस्स झालें. परंतु (मनुष्यस्वभाव चमत्कारिक आहे की अपमान आपल्यावर कोसळला तरी चालतें. पण त्याचें नाव घेऊन तो कोसळणार आहे असें सांगितलेलें सोसवत नाही.) आपल्या प्रिय, सुंदर व सुशिक्षित कन्यकेचें नांव या थिय्याने व अशा भयंकर भविष्यवाणीत घ्यावें याचाच त्यांना अधिक विषाद वाटला. व त्या भावी भयाने धस्स होत असताही त्यांच्या तोंडावर असंतोषाची छाया येऊन गेली. पण लवकरच विवेकाने सावरून ते म्हणाले, कम्बू! तर मग या अनर्थाचा प्रतिकार करण्यास अुपाय काय? आणखी कायरे—आजकाल तर हिंदु-मुसलमानाचें अैक्य स्थापित झालें आहे ना? खिलाफतीस स्वधर्माच्या प्रश्नाप्रमाणे हिंदूंनी आपलासा केला व म्हणून मुसलमान त्यांच्या शब्दाबाहेर पाअूल टाकीत नाहीसे झाले आहेत ना! मग तूं हें बंड होणार म्हणतोस हे हिंदूंच्या विरुद्ध कसें असेल?'

'महाराज! या भावी अनर्थाचा प्रतिकार कसा करावा म्हणून जें विचारलेत त्याचा हाच पहिला अुपाय—प्रथम ही समजूत की, हिंदु-मुसलमानाचें झालेलें अैक्य हे हिंदूंच्या सुरक्षिततेला पोषक आहे ही समजूत ठार केली पाहिजे. तुम्ही म्हणता त्या वाक्याचा पूर्वार्ध खरा आहे की हिंदूंनी खिलाफतीच्या प्रश्नास स्वधर्माच्या प्रश्नाप्रमाणे समजून आपलासा केला आहे. पण त्याचा अुत्तरार्ध मात्र अवास्तव आहे. कारण हिंदूंनी खिलाफतीस आपलेसें केले म्हणून मुसलमान हिंदूंच्या शब्दाबाहेर आपण पाय टाकू नये असें मानीत नसून हिंदूंनी आपल्या शब्दाबाहेर पाय टाकू नये असें म्हणत आहेत. ही सत्यस्थिति हिंदूंचे दृष्टीस आणून या बंडास असावधपणे कोणतेंही साह्य न देता त्याची कंबर अेव्हापासूनच व अुघड प्रतिरोध करून मोडून टाकावी हें हिंदूंस समजावून देणें हाच अनर्थाच्या प्रतिकाराचा पहिला

अुपाय पहिला पण अेवढाच नव्हे कारण हिंदूच्या आधारावर हे बड मुसलमान करीत नाहीत हिंदूना ते मिळोत वा न मिळोत बाटवून टाकावयाचच हे तर या चळवळीतील अेक महत्त्वाचे ब्रीदवाक्य व युद्धगर्जना व्हावयाची आहे तेव्हा दुसरा अुपाय म्हणजे त्वरित आपणा हिंदूंनी स्वसंरक्षणार्थ पथक निर्माण करणे हे होय हे काम आताच आरंभिले पाहिजे तो मौलवी जो तिथून गेला तो अरनाड मधे त्याच्या मुख्य सभेत बहुधा दोन तीन दिवसात जाअून प्रतिवेदन करील की कुट्टम येथील थिय्या लोक स्वेच्छेने मुसलमान होत नाहीत अितर जातींची तर गोष्ट बोलावयाला नको ! बहुधा कुट्टम देशाचे नाव या टिपणीत दाखल केले जाअील की जीत ज्या हिंदूंच्या गावास बलात्काराने मुसलमानी धर्म स्वीकारावयास लावून त्याची अवघी मत्ता काफिराची म्हणून जप्त व्हावयाची आणि या मत्तेत हिंदु स्त्रिया ही धर्मवीराची न्यायसिद्ध लूट म्हणून हरण करावयाच्या आहेत त्या गावची नोंद आहे ! व हेही निश्चितच आहे की या लुटीत या पवित्र निरपराध व लावण्यवती कन्येचा वाटा त्या नीच मौलवीचा म्हणून ठरणार ! महाराज राग करू नका ! माझा करू नका जो राग करावयाचा तो ह्या पापाचरणास प्रवृत्त झालेल्या नीचांचा ! मी अेक दुष्ट बातमी वेळेवर पोहोचवून तिच्या परिणामापासून तुमचे संरक्षण करण्यास आलेले पत्र आहे ! मग फोडून तोडून टाकू नका तर त्यातील बातमीचा नीट विचार करून त्या संकटावर व दुष्टांवर आपला सूड अुगवा !

तू म्हणतोस तसेच ! कम्मू ! चल ! कसा आरंभ करावा सांग !

'ठीक आहे महाराज पहिली गोष्ट म्हणजे अरनाड येथे जाअून तेथील मुसलमानांच्या मुख्य पत्रातील मंडळींना तयार ज्या हिंदु पुढाऱ्यास भूलथापा देअून 'स्वराज्याच्या व अैक्याच्या साखरेत गुंगीच्या विषाच्या गोळ्या चारल्या आहेत त्या हिंदूंस शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न मी करतो ते वेळेवर शुद्धीवर आले तर ठीकच नाही तर निदान आपण कुट्टमच्या तरुण हिंदूंस तरी धर्मरक्षणार्थ सज्ज करून ठेवू थिय्यामधील तरुण या कार्यास सिद्ध आहेत

मध्येच तो कम्मूबरोबर आलेला थिय्या तरुण म्हणाला हो ! हो ! हिंदु धर्मसंरक्षणार्थ आम्ही मरावयास देखील सिद्ध आहोत

आपण सवडे या ब्राह्मणागारात पांडवांच्या शिबिरात ज्याप्रमाणे द्रौपदेयादि होते त्याप्रमाणे स्वस्थ भारत पडलेल्या आपल्या वधूस सावध करून ठेवा मी अरनाडहून परतात आपणास भेटतो

हा संवाद अिकडे चालला असताना प्रथम आपल्या घरामागे काही वेळ अुभी राहिल्यानंतर हळू हळू पुढे सरकत सरकत नारायणाच्या दृष्टीस न पडेल परंतु त्या सर्वांचे संभाषण स्पष्ट नसले तरी अस्पष्टपणे अैकून घेअून व त्या थिय्यास स्पष्टपणे बघता यावे अशा अंतरावर अेका मारळीचे आड यअून सुमति गुपचीप अुभी राहिली होती तिला सरकताना त्या थिय्या तरुणाने पाहिलाही होता तिनेही

त्याला आपणांस पाहताना पाहिलें होतें. थिय्याचे शब्द तिने बहुधा अितके स्पष्ट अैकले असावे. त्या थिय्या तरुणाच्या अैटदार अंगलटीस तर तिला निरखून पाहावें असें देखील वाटलें. दोनदा तिच्या सुशिक्षित मनात असा विचार येअून गेला, की शरीररचना पाहिली असता हा थिय्या तरुण ब्राह्मण तरुणात सोडून दिला तर पुन्हा निवडणेंही कठीण व्हावें अितका मिसळून जाअील ! मग याम असें अस्पृश्य कां बरें लेखिलें ? रक्त, जाति, रूप अितकें अभिन्न ! मग सापमुद्रा जे ब्राह्मण, क्षत्रिय पाळतात ते यांस अितके निष्ठुरपणे कां बरें हिडीस फिडीस करतात ? हां सहानुभूतीचा विचार तिच्या हृदयात अुद्‌भवत असताच आकस्मिकपणे त्या थिय्या तरुणाच्या वरचेवर पण सावधपणे तिच्याकडे पाहणाऱ्या दृष्टीस तिची दृष्टि भिडली. तिला वाटलें, त्याच्याशी बोलावें. तिच्या दृष्टीत ती सहानुभूतीची लकेर पुन्हा पाहण्यासाठी कोण्या महत्कार्यात आपले प्राणही अर्पण करावे.

अितक्यात कम्बूचा व शास्त्रीबुवाचा तो संवाद संपून कम्बूने निरोप घेताना साष्टांग दंडवत घातला. कम्बू परतला. त्या थिय्या तरुणाने निघता निघता मागे पाहिलें – तो त्या ब्राह्मण कन्यकेची सहानुभूतीची दृष्टि पुन्हा त्याच्या दृष्टीस पडली. ती तिथेच आडोशास अुभी होती. त्याच्या अिच्छेच्या अितकी संनिध ! त्याच्या आशेच्या अितकी सुंदर !

हरिहरशास्त्री जड पावलांनी आपल्या घराकडे चालले. आपल्या आजीची झालेली भयंकर स्थिति व त्याच राक्षसांच्या तमल्याच कोर्यासि आपली स्वतःची ही अल्लड प्रियतम कन्या आता बळी पडणार की काय ! छे: तो सर्व विचार स्वत:च्या मनात देखील जुळवून घेण्याचें त्यांस धैर्य होअीना. त्या वनातून परत जाताना पुन्हा त्या घरावरून ते गेले की जेथे प्रदक्षिणेच्या दोन पावलांत किती अंतर असावें या विषयाचा स्मृतिशास्त्राधारे गंभीर वाद करीत शास्त्री मंडळी बसलेली होती. तो वाद आता अगदी भरात आला होता ! परंतु शास्त्रीबुवास आता त्यांचा तो वाद बकंभ लागू लागला व कशाने कोण जाणे – तो वाद अैकताच त्यांची भीति जणू द्विगुणित होअून कम्बूची बातमी खरी असावी असें त्यांस वाटू लागलें.

* * *

काय केले पाहिजे या विषयावर अल्लाबक्ष याचे फार परिणामकारक व्याख्यान झाले. अितके परिणामकारक की परत मिरवणुकीचे वेळी खानसाहेबाच्या गाडीचे घोडे सोडून हिंदु लोकानी ती स्वतः ओढीत नेली ! मिरवणुकीत अेकदा कोणी अेक 'वंदेमातरम्' म्हणून ओरडला; परंतु त्यास साथ देण्याअितका मूर्ख व अनुदार हिंदु कोणी मिळाला नाही ! मुसलमानानी मात्र तो शब्द अुच्चारला गेला असता शानवृत्ति ठेवून दगाधोपा केला नाही. हिंदु पुढार्‍यानी लगेच आज्ञा फर्माविली की, सर्वांनी 'अल्ला हो अक्बर' असा अेकच जयघोष करून हिंदु-मुसलमानाची अेकी दृढ होत चाललेली आहे हें जगाच्या प्रत्ययास आणून द्यावें !

मिरवणूक सपताच रामनारायण नंबुद्री, माधव नायर, सिताराम चेट्टी अित्यादी हिंदु पुढारी अल्लाबक्ष याराह त्या बगल्यात गोळा झाले. कालिकतच्या खिलाफत चळवळीचे प्रमुख पुरस्कर्ते महानदी अय्यर हेही तेथेच अुपस्थित असल्याने सभेचे अध्यक्षस्थानी त्याचीच योजना झाली. ते म्हणाले, 'आजच्या व्याख्यानाने कालिकत नगरातील लोकावर जो परिणाम झाला आहे त्याचा त्वरित लाभ घेअून खिलाफतीच्या चळवळीसाठी हिंदूनी काय करावयाचे ते प्रत्यक्ष करण्यास आताच आरंभ व्हावा म्हणून ही सभा भरली आहे.'

माधव नायर म्हणाले,' स्वराज्य खिलाफतीच्या चळवळीसाठी 'असा प्रयोग ठरावात असावा.

तेव्हा या सहेतुक अुद्दामपणाने चिडून मौलाना अैटखान म्हणाले, ' स्वराज्य खिलाफतीच्या बोकाडी ! हिंदु-मुसलमानाच्या बोकाडी ! असे असेल तर मी ह्या सभेतून अुठून जातो.'

ओशाळे झाल्यासारखे होअून माधव नायर म्हणाले, 'क्षमा करा मौलवीजी ! माझा तसा मुळीच अुद्देश नव्हता. आपल्या धार्मिक भावना दुखत असल्या तर ठरावात खिलाफत-स्वराज्याची चळवळ असा आपण अुल्लेख करू' मौलवी अैटखान म्हणाले, 'मुळीच नाही ! हे स्वराज्याचे खूळ तुम्ही आमच्या खिलाफतीवर तुमचा विश्वास नाही म्हणून मध्येच आणता. हा मुसलमानी धर्माचा व जातीचा अुपमर्द आहे.'

अितक्यात अेका कोपर्‍यातून धीटपणाने अुठून अेक तेजस्वी पुरुष म्हणाला, पण मौलानासाहेब ! खिलाफत ही संस्था व चळवळ मुसलमानी असताही हिंदु लोक जर तिला पाठिंबा देतात तर हिंदूच्या स्वराज्याच्या चळवळीस मुसलमानांनी अितके अुपमर्दकारक का मानावे ?'

'तू मूर्ख आहेस !' अैटखान अुसळून म्हणाले, 'खिलाफत हा आमचा धर्मच आहे. अुमरचे पूर्वी, अब्बासचे पूर्वी प्रत्यक्ष पैगंबराबरोबरच खिलाफतचा जन्म झालेला आहे पण ही तुमची हिंदूची स्वराज्याची चळवळ आजची आहे, नवीन आहे. म्हणूनच ती अुपमर्दकारक आहे.'

'स्वराज्याची चळवळ नवीन नाही–' तो पुरुष म्हणाला, 'महमदपैगंबराच्या पूर्वी ती विक्रमाने केली होती, कृष्णाने केली, रामचंद्रा–'

'बस्स! बस्स! त्या काफराचे नाव काढू नकोस पैगंबर व कृष्ण! निरवाशात दोन्ही नावे! पैगंबराचा हा अपमान आहे! चूप! नाही तर जीभ अुपटून काढील!' असे म्हणत मौलाना अैटखान त्या हिंदुवर चालून गेले

'हा हा' असे म्हणत मंडळी मध्ये पडली अध्यक्ष महानदी अुठून म्हणाले, शांत व्हा, मौलानाजी मी आम्हा सर्व हिंदूच्या वतीने त्या मनुष्याच्या अुद्दामपणाविषयी आपली क्षमा मागतो हे अुद्दाम मनुष्या! ही सभा अनत्याचारी असहकारवादी लोकांची आहे हे तू कसा विसरतोस! येथे तू आपल्या मुसल्मानबंधूशी असले अत्याचाराचे वर्तन केल्स हे हिंदुधर्माला लाछनास्पद आहे ठरावामध्ये 'खिलाफतीची चळवळ' असेच शब्द असावे असे मी ठरवितो' 'ठीक! हातात माळ घेअून शांतपणाने बसलेला अेक मुसल्मान मौल्वी म्हणाला, 'हेच ठीक आमचे प्रिय हिंदुबंधूंसाठी आम्ही प्राण देखील देअू दोघाचे रहस्य अेकाच शब्दात व्यक्त झाले म्हणजे–आपल्या अैक्याला शोभा येते पुन्हा खिलाफतीत स्वराज्य आहे, पण स्वराज्यात खिलाफत असेलच असे नाही तेव्हा महानदींनी योग्य निकाल दिला. महानदी खराखरीच महापुरुष आहेत'

'ते खरखुरे हिंदु आहेत!' सभेतून अेकचाळ्यता अुदगारली

'तुमचे आशीर्वाद नको आहेत, खिलाफतीसाठी हिंदु लोक काय काय प्रत्यक्ष साहाय्य देतात त्यावरूनच त्याची ही भेटीची भाषा किती खरी आहे हे मुसल्मान पारखतील' मौलाना अैटखान रागाने फुरफुरलेली दाढी हाताने थोपटीत म्हणाले, 'आम्ही खिलाफतीचेसाठी मोपल्या लोकांची स्वयसैनिकांची पथक अुभारणार आहोत परतु मोपले लोक निधन असल्याने व त्याचे धन हिंदु भूम्यानी (जमिनदारांनी) हरण केल असल्याने माझी अशी सूचना आहे की, स्वयसैनिकाच्या खर्चाचा सर्व भार हिंदूनी सोसावा'

'अुचितच आहे' महानदी म्हणाले

'माझी अशी सूचना आहे की त्या स्वयसैनिकाच्या अधिकाऱ्यात काही हिंदु गृहस्थ असावेत' माधव नायर म्हणाले

'काय! मुसल्मानावर अविश्वास! मुसल्मानावर हिंदु अधिकारी? हा मुसल्मानी धर्माचा अुपमर्द आहे! मुसल्मान गुलाम होण्यास जन्मलेले नाहीत! ते राज्य करावयास जन्मले आहेत!'

क्षमा करा! मौलानासाहेब! माझा तसा अुद्देश नव्हता' ओशाळे झाल्यासारखे होअून माधव नायर म्हणाले 'आपल्या धार्मिक भावना दुखत असतील तर मी असे सुचवितो की त्या स्वयसैनिकात मुसल्मानी अधिकाऱ्याच्या हाताखाली हिंदु स्वयसैनिक असावे'

बेटखान म्हणाले, ' मुळीच नाही; खिलाफतीचे रक्षणाकरिता मुसलमानी स्वयंसैनिक होणें हा आमचा धर्मच आहे. अुमरचे पूर्वी, अब्बासचे पूर्वी, पैगंबराचे वेळेपासून मुसलमानी खिलाफत रक्षणाचें काम मुसलमानांनीच केलें पाहिजे असा हुकूम आहे. काफरांनी केवळ जिझिया द्यावा. पण प्रत्यक्ष स्वयंसैनिक त्याना कधीच होता येणे नाही.'

'' पण ! ' माधव नायर जरा आग्रहाने मध्येच म्हणतात, तोंच, ' चूप. तू मूर्ख आहेस. अंटखान पुन्हा अुसळून म्हणाले, ' स्वयंसैनिक खिलाफतीचे रक्षणाकरिता मुसलमान असावेत हा आमचा धर्म आहे सांगितलेंना ! तुझी सूचना नवीन आहे म्हणून तो आमचा अुपमर्द आहे ! आमचे धर्माविरुद्ध कोणी बोलेल तर मी जीभ अुपटून टाकीन ! ' असें म्हणत मौलाना चालून जाअू लागले. ' हां हां ' असे म्हणत मंडळी मध्ये पडली. अध्यक्ष महानदी अुठून म्हणाले, ' शांत व्हा मौलवीजी ! माधव नायरांची सूचना नि:संशय आमच्या मुसलमान बंधूवर हिंदूंचा विश्वास नाही असे दर्शविणारी होती. मुसलमान गुलाम होण्यास जन्मलेले नाहीत. हा मुसलमानाचा बाणा नि:संशय अभिनंदनीय आहे. माधव नायर ! आपण अिथे सर्व अनत्याचारी असहकारितावादी जमलेले असताना मौलवीस शब्दाने तुम्ही दुखविलेत हे आपणांस शोभले तरी कसे ? मी असा निर्णय देतो की आमच्या मुसलमान बंधूस खिलाफतीचे रक्षणार्थ स्वयंसैनिकांची पथकें अभारण्याचा पूर्ण

'ए काफर ! पकडो सालेको ! गिरा दो ' असे म्हणत मौलवी अेटखान आपल्या साथीदारांसह पिसाळलेल्या वाघासारखा तुटून पडत म्हणाला. महानदी देखील चिडून गेल्यासारखे दिसले व मोठमोठ्याने हे वाक्य बोलून असणाऱ्या त्या तेजस्वी पुरुषास, ' ही असत्याचारी लोकांची सभा आहे ! लूटमारीचे नाव देखील येथे काढू नकोस ! आमचा मुसलमान वधूवर विश्वास आहे. ते करतील तें अुत्तमच करतील !' अित्यादि वाक्ये ओरडत होते त्या गर्दीत मुळीच न डगमगता तो पुरुष म्हणाला, ' अहो, जो लूटमारीचा अुल्लेख करतो तो अत्याचारी का जो लूटमार करतो तो ?' या वाक्याने तो शांतपणे बसलेला मौलवी देखील खवळला. सिताराम चेट्टी तर त्या मौलवीच्याही पुढे घुसून त्या पुरुषास म्हणाला ' नीचा, हिंदुमुसलमानांचे अैक्य बिघडविणारा ! लूटमारीचे नाव या सभेत !' असे म्हणून व त्या पुरुषास जोराचा अेक झोका लगावून म्हणाला, ' माहीत नाही तुला की आम्ही अनत्याचारी असहकारितावादी आहोत ते !'

नारायण नंबुद्रीने त्यासरशी त्या पुरुषास लाथ मारून विचारले, ' माहीत नाही तुला की सिताराम चेट्टी अनत्याचारी आहेत ते !'

तो मौलाना अेटखानही तेथे पोहोचून व त्या पुरुषाची मानगुटी घट्ट धरून ओरडले, ' काफर ! माहीत नाही तुला की, नारायण नंबुद्री अनत्याचारी असहकारवादी आहेत ते ?'

आता मात्र त्या पुरुषाची सहनशीलता सपली. त्याने गुदमरून जाअू पाहाणारी आपली मान कशीबशी त्या मौलानाचे पकडीतून सोडविली व त्याची रागाने फुरफुरलेली दाढी अेका हातात गुंडाळून धरून दुसऱ्या हाताने त्याचे श्रीमुखात साडकन् भडकविली ! हे पाहताच त्याचे मागे अुभा असलेला अेक तरुण पुढे सरसावला व त्याने त्या मौलानास मारून अुचलून धाडकन भूमीवर आपटले. त्यासरशी त्या सभेतील अनेक हिंदु त्या दोघाजणांवर तुटून पडून काठ्यावर काठ्या घालू लागले ते दोघे रक्तबंबाळ झाले, पण त्यांनी त्या मौलानास तसेच तिबवीत ठेवले होते थोड्या वेळाने ते दोघे व इतर यांच्यामध्ये स्वत महानदी अुभे राहिल्याने सभागृह थोडे शांत झाले महानदीने आज्ञा केली की, त्या दोघास अत्याचारी वर्तनाबद्दल बाहेर घालवून द्यावे

माधव नायर कचरत म्हणाले, ' पण वास्तविक पाहता त्यांच्या अंगावर मौलानाच पहिल्याने चाल करून गेले होते '

' चूप रहो !' मौलाना अुसळून म्हणाले, 'कोणाही नास्तिकावर व मूर्तिपूजकावर आघात करणे हा आमचा धर्मच आहे. अुमरच्या पूर्वी, अब्बासच्या पूर्वी, प्रत्यक्ष पैगंबराने कुराणात हुकूम आणला आहे की पैगंबरावर विश्वास न ठेवणाऱ्या मूर्तिपूजकावर कधी प्रीति करू नका आघात करणे हा मुसलमानाचा बाणाच आहे. पण प्रत्याघात करणे ही जी हिंदूंनी नवीन रूढी काढली आहे ती मुसलमानी

धर्माचा अुपमर्द आहे ! ही सभा काफराची आहे. मी ही सोडून जातो ! कारण तुम्ही सर्व त्या मनुष्याचे धर्माचे आहा ! त्यास ठार का नाही मारीत !'

' थांबा मौलानाजी ! आम्ही त्यास ठार मारतो.' रामचंद्र चेट्टी म्हणाले, ' पाजी कुठला! हिंदु-मुसलमानाचें अैक्य बिघडवितो ! आम्हा अनत्याचारी असहकाऱ्यांना कलंक लावतो !'

परंतु मौलानांना अितका चोप मिळालेला होता की आता त्या दोघांच्याकडे पुन्हा धीटपणे पाहण्याची त्याची छाती नव्हती. म्हणून पायावर पाय ठेवून ते ओरडत अुभेठून निघून गेले. त्याचे मागोमाग तो माळ घेतलेला मौलवी देखील चालला. पण त्या पुरुषाने त्या मौलवीस दारात अडवून व आपले लावलेले कल्ले अुपटून विचारलें ' मला ओळखलेंस ?' मौलवी चकित होअून म्हणाला, '. काय ? तू कम्दू ?' कम्दू म्हणाला, 'होय! आणि तू तो मौलवी जो आम्हा थिय्यांस मुसलमान झालो तर त्याच ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्यांच्या मुली वाटून देणार होतास.'

\+ +

## ४. खिलाफत ती ही !

तिरुरंगाडी नावाच्या गावात मुख्य मशिदीत अली मुसेलियर बसला होता. त्याचे आजूबाजूस शेकडो मोपल्याचा समूह हातात भाले, तरवारी व काही बंदुका घेअून जमला होता. दूरवर मोपल्यांच्या स्त्रिया, मुलें, माणसें ह्यांची एकच दाटी झालेली असून ते सर्व लोक मोठमोठ्याने ' अल्लाहो अकबर !' म्हणून ओरडत होते. त्यांच्यापैकी काहींच्या अंगावर घाव लागून त्यातून भळभळ रक्त वाहत होतें तर, काही विव्हळत पडलेले होते. अली मुसेलियरच्यापुढे तीन प्रेते छिन्नभिन्न होअून आपल्याच रक्तात भिजत पडलेली होती. अताअवळेपणाने अली मुसेलियरने

त्या मोलवीने अली मुसेलियरच्या पायासमोर पडलेल्या शिपायाच्या त्या तीन मुडद्यातून अेकाचे शिर छाटून त्याची शेंडी धरून लटकावीत विचारले– 'हें पहा अिंग्रजांचे शिपायी कोण असतात ते ! ही या काफराने बायकांप्रमाणे राखलेली वेणी पाहा ! हा दुसरा शिपायी ! ही पाहा शेंडी ! हा तिसरा काफर पहा ! ही पहा शेंडी !' पण त्याचे शिर कापून शेंडीने धरू पाहातो तों ती त्या डोक्यास मुळीच दिसेना कारण तो तिसरा शिपायी मुसलमान होता मौल्वी दडपून तरीही म्हणाला, हाही हिंदूच ! हे हिंदु लोक अिंग्रजांसारखेच आमचे शत्रू आहेत हे अिंग्रजांचे आहेत, हे मोपल्यास अिंग्रजांनी सांगितल्याबरोबर गोळ्या घालतात. कुणीही मुसलमान अिंग्रजांचे देवाने सांगितलें तरी मुसलमानांच्या विरुद्ध लढेल काय ? ' सभेतून अेकच कल्लोळ अुठला, ' कधी नाही ! मुसलमान तितका एक आहे ! मुसलमान मुसलमानांविरुद्ध कधी लढला नाही, लढत नाही, लढणार नाही.'

सभेतील या कल्लोळास अुत्तेजवीत मोलवी म्हणाला, 'कधी नाही ! खलिफा जर्मनीचे बाजूस असल्यामुळे सगळा मुसलमान अिंग्रजांवर अुठला आहे इंग्रजास अेकही मुसलमान शिपायी तुर्कांविरुद्ध लढण्यास मिळेना.'

'अेकही मिळेना' सभा गर्जली

'अिंग्रजांनी ज्या हजारो पठाण–हिंदुस्थानी मुसलमानास लढाअीवर पाठविले त्या सर्वांनी लढणे नाकारले !'

'सर्वांनी' सभा गर्जली

'जे मुसलमान तुर्कांविरुद्ध लढत राहिले त्यातील सर्व, वेळ सापडताच तुर्कांकडे पळून गेले'

'सर्व पळून गेले' सभा गर्जली.

'शेवटी अिंग्रजांच्या शिबिरात अेकही मुसलमान औषधाला सुद्धा अुरला नाही ! अखेर अिंग्रजांचा पराजय झाला, खलिफा अिंग्लंडवर चालून गेला !'

'लंडनवर' सभा गर्जली

वाटेत जर्मन तुर्कांचा दोस्त होता, पण तो ख्रिस्ती होता यास अनवरपाशा म्हणाला, 'आजवर तुझे साहाय्य केले–पण आता तू मुसलमान होशील तर दोस्ती, नाही तर अर्ध्या मिनिटात बर्लिन नगर धुळीस मिळवून देअीन,' तेव्हा कैसर म्हणाला, 'तू म्हणतोस ती गोष्ट खरी आहे परमेश्वरानेच आज्ञा दिली आहे की, मुसलमान सर्व अमुसलमानांवर बलवत्तर होतील ! सुरतुल –मुजादिक या अध्यायात कुराणाने हे सांगितले आहे तू बर्लिनचा नाश करू नकोस मी मुसलमान होतो !' असे म्हणून कैसर मुसलमान झाला

'कैसर मुसलमान झाला !' सभा गर्जली

'आणि कैसरचे अुदाहरण पाहून अमेरिकेचा झारही मुसलमान झाला !'

'अमेरिकेचा झार मुसलमान झाला !' सभा गर्जली.

' आणि अमेरिकेचा झार व कैसर यास अुजवे व डावे हाताशी देअून अनवरपाशा फ्रान्सचे मशिदीत निमाज पढला '

' अनवरपाशा निमाज पडला ! अनवरपाशा मोठा धार्मिक मुसलमान आहे तो दारू रोज पीत असला तरी चिंता नाही ' सभा गर्जली

' तेव्हा आता टोपीवाला तितका मुसलमान झाला आता या जगतावर केवळ हा अिंग्रज व हा अिंग्रजाचे अन्न खाअून त्याचे सैन्यात आम्हाशी लढणारा हिंदु तेवढा काफीरपणा सोडीत नाही '

' त्यानी काफीरपणा सोडला पाहिजे अमेरिकेच्या झारपेक्षा काही ते मोठे नाहीत दात पाडून टाकू ! सभा गर्जली

' म्हणून आता मलबारमधून अिंग्रजाचे राज्य अुलथून पाडणाऱ्या वीरानो ! हे कार्य हाती घ्या '

या वाक्यासरशी ' अल्ला हो अकबर ! पकडो हिंदूको ! मारो हिंदूको ! मुसलमान बनाओ काफरको ! ' असा एकच तुमुल शब्द अुठला त्याच वेळेस कासम अली मुसेलियरास म्हणाला, ' हुजूर ! ते पाहा ते काफर धरून आणले जात आहेत ! ' अली मुसेलियर अुतावळेपणाने म्हणाला, ' अिकडे आणा त्याना ' लगेच सहा सशस्त्र मोपल्याच्या पहाऱ्यात चार हिंदु गृहस्थ अली मुसेलियरचे समोर, आणून अुभे करण्यात आले ते कोण होते ?

पहिला गृहस्थ महानदी होता दुसरा माधव नायर तिसरा राम चेट्टी व चवथा नंदी दत्त. कालिकतच्या खिलाफत सभेत ठरल्याप्रमाणे हे चारही हिंदु पुढारी खिलापतीच्या चळवळीसाठी हिंदूपासून वगणी जमविण्यासाठी अरनाड तालुक्यात हिंडत होते तोच तिरूरगाडी येथे दंगाम सुरवात होअून अली मुसेलियर यास

थरथर कापत महानदी गुपचोप उभा राहिला पण माधव नायर म्हणाला "खानसाहेब !'– तोंच त्यास एक जोराचा बुक्का डोक्यावर मारून पहारेकरी म्हणाला, ' काफर ! सरकार म्हणा–' तेव्हा माधव नायर म्हणाला, सरकार ! मी प्रथमत तुमचे या विजयाविषयी मनापासून अभिनंदन करतो हिंदुस्थानात अेका वर्षात स्वराज्य ! म्हणून हजारो लाक्षिकांनी प्रतिज्ञा केल्या सभा भरविल्या मेलेल्या निर्जीव कपड्यास जाळले पण अुभ्या हिंदुस्थानात अेका वर्षात नव्हे तर काणी स्वराज्य खरोखरीच प्रस्थापित केले असेल तर ते आपल्यानीच होय आज या दोन तीन तालुक्यात खरोखरच अिंग्रजी सत्ता नष्ट झालेली आहे आता हें मिळविलेलें हिंदु मुसलमानांच्या अेकीच्या विस्तृत व दृढ पायावर सबळपणे कसे स्थापिता येईल हा प्रश्न आपण प्रथम सोडविला पाहिजे

तो प्रश्न सोडविण्याची काळजी तुला नको आहे मौलवी मध्येच म्हणाला ' छे ! छे ! असे कसे म्हणता ? आपल्या हिंदु बांधवास अनुकूल करून घेतल्या विना आपणास यश येणार नाही स्वराज्यात हिंदूंचा भाग आहेच आहे खिलाफत चळवळीत हिंदूंनी साहाय्य दिले हा त्यांचा खरोखरच अुदारपणा होय ते जरी काफर आहेत तरी त्यांच्याशी आपण मुसलमानांनी न्यायाने वागलेच पाहिजे स्वत पैगंबरांनी मूर्तिपूजकांशी स्नेहाचा केलेला करार पाळला नव्हता का ?' असे गंभीरपणे विचारीत त्या सभेतून अेक सुशिक्षित दिसणारा मुसलमान पुढे म्हणाला आणि अहो मुसलमान हो ! हिंदूंवर सक्ती करून त्यांचे वैर तुम्ही संपादन कराल तर तुम्हास अिंग्रजांवर जय कधीही मिळविता येणार नाही हें ध्यानात धरा आपण आहेत किती ? मूठभर !'

ती त्या सुशिक्षित मुसलमानावर खवळून मौलवी म्हणाला पण हीं पाहा आपल्यापाशी असलेली पत्रें ! अफगाणिस्थानचा अमीर साठ हजार सैन्य घेवून पेशावरला काल्च पोहोचला आहे आज सुद्धा तो लाहोराला येईल

अल्ला हो अकबर ! अमिरानं दिल्ली घेतली ! सभेतून ती बातमी कुणी व फैलावत जयघोष सुरू झाला

मौलवी पुढे म्हणाला पैगंबराविषयी म्हणशील तर मी तुला विचारतो का सुरतु तौबा या अध्यायाच्या ७३ व्या अयतामध्ये काय सांगितले आहे ? त्यात असे 'परमेश्वरी वचन नाही काय की हे मुसलमानांनो तुम्ही नास्तिकांशी मूर्तिपूजकांशी व दांभिकांशी जिहाद करा व त्यांवर सक्ती करा कारण ते नरकास पात्र आहेत ! दांभिकांपैकीच तू आहेस म्हणून तू असे म्हणतोस तू मुसलमानच नाहीस अशी याला शंकी धरील नाही !"

याला दाढी दमील नाही ! हा मुसलमानच नाही हा हिंदु आहे धरा त्याला ? मारा त्याला !–आणि त्या हिंदूंना !' असे अतिशय क्षुब्धामय उद्गार काढीत गर्दीतील लोक पुढे घुसू लागले

माधव नायर पुन्हा अेकदा साहस करून म्हणाला, ' स्वराज्य व हिंदुमुसलमानांची अेकी याविषयी आपण सर्व अनेक वेळा शपथबद्ध झालेलो असताना व हिंदूंनी संपूर्णपणे मुसलमानांवर विश्वास टाकून वर्गणी जमविणे चालविले असताना देखील हिंदूंवरच या बंडातील अनेक पुढारी अत्याचार करण्याचे वेट अुभारीत आहेत—बंडापूर्वीपासून हिंदूंस मुसलमान करावे म्हणून गुप्त योजना होत आहेत ! हे सर्व माहीत असताना हिंदु लोक बंडास साहाय्य देण्यास कचरतात यात आश्चर्य नाही. तथापि आम्ही दहा हजार रुपये खिलाफतीकरता दिले आहेत व आणखीही जमवितो पण स्वराज्य व हिंदुमुसल्मानांची अेकी—'

' बस्स कर ! काफर ! ' अली मुसलियर अुतावीळपणे म्हणाला, ' ह्या हिंदूंचे हे ' पण ' व ' परंतु ' आमरण संपावयाचे नाहीत. ही व्याख्यानाची सभा नव्हे. जिथे मरण मारणाचा बाजार आहे. अेका शब्दात निकाल, अेका घावात आज्ञा बजावणी ! ' व ती सर्व सभेस अेकदा न्याहाळून ओरडला, अेका सर्व मुसल्मानहो, अेका शब्दात बंडाचे स्वरूप कसे असावे ते अेका ! हे हिंदु लोक स्वराज्य, अेकी म्हणून ओरडत आहेत. मी सर्व जगास सांगतो की स्वराज्य म्हणजे खिलाफत राज्य व हिंदु मुसल्मानांची अेकी म्हणजे सर्व हिंदूंनी मुसलमान होअून जाणे ! बस्स. वादविवादाचा अेक शब्द यावर कोणी काढील तर मान अुडविली जाअील '

' स्वराज्य म्हणजे खिलाफत राज्य ! अेकी म्हणजे सर्वांचा अेक मुसल्मान जात करणे ! —अली मुसेलियर की जय ! —अली मुसेलियर गाजी आहे ! ' सभेत

अली मुसेलियर म्हणाला हे अल्ला ! तू दिलेल्या विजयासाठी काफराच्या रक्ताचे हें पहिले बलिदान मानून घे !

पहिले नाही ! पहिले नाही ! म्हणून ओरडत अेक दहा मोपल्यांची टोळी अितक्यात तेथ आली व म्हणाली 'आम्ही मल्लापूरचे लोक आम्ही आमचे गावच्या सर्व हिंदूस बाटवून टाकले व जे बाटले नाहीत त्यांना मारून टाकले तुम्ही युद्ध पुकारण्याच्या आधीच आम्ही गुप्त कट करून ठेविला होता

अल्ला हो अकबर ! मल्लापूर गावचे गाव मुसलमान झाले सभा गर्जली 'आणि मल्लपुरास काफराचे बीज म्हणून उरले नाही ! आणि येगरा अैमग मध्ये ! आणि कना अैमममध्ये अेकामागून अेक टोळ्या तेथे येत आपापले पराक्रमाची घोषणा करीत होत्या व सभा त्याचे प्रतिध्वनि घुमवीत होती

बस ! मौलवी म्हणाला बस ! आता राजसभा विसर्जन होत आहे बाकी बातम्या व कामे उद्या विचारात घेण्यात येतील तोवर हे अिमानदार हो ! जा – दशदिशांस जा ! गाव गाव मोजून जितका हिंदु सापडेल तितका मुसल्मान करा न होअील त्यास आमच्याकडे घेऊन या न आल्यास तुम्हीच त्यास तेथेच ठार मारून टाका ! आजपासून या आपल्या मलबारच्या खिलाफती राज्यात अन्यायाचे वा अधर्माचे कृत्य कोणीही करू नये अशी मी सक्त आज्ञा सोडतो मूर्तिपूजा कुराणास न मानणे व मोपल्यांनी जे हे धर्मयुद्ध पुकारले आहे त्यास आपले सर्वस्व न देणे ही तीन महापापे जे जे करतील त्या सर्वांस या लोकी या क्षणी वध व परलोकी नरकाग्नि ठेवलेला आहे मलबारमध्ये मुसलमानी राज्य स्थापित झालेले आहे या राज्यात केवळ पापभीरु लोकच वसू शकतात ! तर जा, काफरास धरधरून मुसल्मान करा नाहीतर मारा त्यांची संपत्ति तुमची आहे त्यांच्या स्त्रिया तुमच्या आहेत स्वेच्छेने देतील तर घ्या। नाही तर लुटा करा

## ५. हरिहरशास्त्री यांनी तरवार घेतली

आता रात्री सरासरी बारा वाजले असतील नसतील. कुट्टम गावच्या नारळी पोफळींचे सुंदर बनांत सर्वत्र शांतता नांदत होती. त्या शांततेच्या पाळण्यात अेखादें अल्लड मूल निजावें तशी सुमति गाढ झोपी गेली होती. तिचे केसांची अेखादी बट केव्हा केव्हा वाऱ्याचे झुळकेने कपाळावर खेळत राही, केव्हा केव्हा थांबून श्वास सोडताना तिचा पदर तिच्या तारुण्यमतंगजाच्या गंडस्थलाप्रमाणे शोभणाऱ्या त्या वक्षःस्थलावर थोडासा हलत होता. नुकत्याच अुदय पावलेल्या चंद्राचा अेक चटोर किरण बकुल वृक्षाच्या सावलीतून चोरून तिच्या त्या मिटलेल्या कमलाच्या फुला-प्रमाणे सुंदर दिसणाऱ्या निद्रित मुखास पाहत होता.

श्रीरंगाच्या देवळातही सर्वत्र सामसूम होती. अेक समओ काय ती तेवत होती. बारा वाजले म्हणून अर्ध्या झोपेतच झोकांड्या देत पहारेकऱ्याने देवळातील तासाचे घड्याळ वाजविलें व तो पुन्हा निजला.

आणखी अेक अर्धा तास लोटला असेल नसेल तोंच त्या देवळाच्या पायऱ्या-पासून सुमारे शंभर फुटावर अेक तरुण मनुष्य येअून तिथल्या अेका विस्तीर्ण वडाचे खाली निजलेल्या मंडळींपैकी अेकास हलवून म्हणाला, 'कम्बू ! ते आले. अुठा !' ताड्कन् अुठून पण लगेच सावरून कम्बू म्हणाला, 'कुठवर आले? किती आहेत? हत्यारे कोणती आहेत, दामू !'

'शंभर तरी लोक असावेत, हत्यारे दिसू शकलीं नाहीत. ते नीट ब्राह्मण-बनाकडे जात आहेत.' 'चला तर ! श्रीरंग आम्हा हिंदूंचे रक्षण करो !' असें म्हणून कम्बूने त्याचे वीसअेक साथीदार जे तेथे निजले होते त्यास अुठविलें व ते आपल्या काठ्या, भाले, तलवारी परजून ब्राह्मणबनाकडे चालले. ब्राह्मण बना-

'आणि मी'—दामोदर—तो तरुण चिथ्या म्हणाला. साच त्या वनाच्या त्याच बाजूने ती मोपल्याची टोळी दबत दबत जवळच आली. तीस थोडा वेळ थांबवून मौल्वीने बजाविले—'मुसल्मानहो! आज तीन दिवसपर्यंत जवळ जवळ दहा गावे आपण निर्वीर केली असतील, जिथे जिथे गेलो तिथे तिथे अशा 'अल्ला हो अकबर?' या आरोळ्यांसरशी काफराची गाळण उडवून दिली. कारण ते सर्व यसपटित होते. ईश्वराने तुम्हाला तुमची सर्व पापे क्षमा केली आहेत. कारण तुम्ही महान् पुण्यकर्मे गेल्या तीन दिवसात आचरलीत, मशीत कमी सहाशे घरास आग लावून दिलीत, शेकडो काफर मुसल्मान केलेत, दगडाच्या मूर्तीस पालथ्या घालून त्यावर लघुशंका केल्यात—थुंकलेत. ईश्वराने तुम्हास या हातीचे पारितोषकही दिले. स्वर्गात काळ्याभोर नेत्राच्या अप्सरा मिळतील—कुराण शरीफ असे सांगते—त्या निराळ्याच! पण ह्या लोकी आज तीन दिवस आमची भागावयाची शक्ति थोडी पडावी इतक्या सुंदर काळ्या नेत्राच्या स्त्रिया आम्हास उपभोगावयास मिळाल्या. धन तर पाठीवर नेववत नाही इतके प्रत्येक धर्मयोद्ध्याच्या वाट्यास आले. पण आता त्या सर्व सुखासाठी ईश्वराशी आम्ही खरोखरच कृतज्ञ आहोत की नाही, हे पाहण्याची, खऱ्या परीक्षेची वेळ आली आहे. या गावात त्या मागच्या सर्व गावाहून तुम्हास जास्त मुजाव लागेल. कारण सैतान स्वतः येथील एका कम्बू चिथ्या नावाच्या मनुष्याच्या अंगात शिरला आहे. मी स्वतः सैतानास त्याचे अंगात शिरताना पाहिले. हे अल्ला! तू मी म्हणतो हे जाणतोस! अल्ला समर्थ आहे! म्हणून या गावी आपण गुपचूप छापा घालूनच काय केले पाहिजे हे धर्मवीरहो! ध्यानात धरा की या ब्राह्मणाच्या वनात प्रत्येक घरी उम्या मलबारमध्ये असतील अशा सुंदर मुली दहा दहा पाच पाच भरलेल्या आहेत. त्यातही मी येथे मोपल्याची जी चार घरे आहेत त्यासही आपणाकडे वळवून घेतले आहे. हे बहुतेक येथेच कोठेतरी येऊन मिळतील. कम्बूच्या टोळीस फसविण्याची मी अशी युक्ति केली आहे की आपण ब्राह्मण बनून आलो व जर

ओरड झाली. कम्बूस बातमी मिळाली होती त्यापेक्षा मोपल्यांची संख्या किती तरी मोठी होती. ते निदान दोनशेपर्यंत असावेत. पण कबूने पहिल्या धडाडीसरसा त्यास अितका धाक बसविला, की मौलवीच्या मंडळीत पळापळ होअून तो मागे हटला. परंतु पूर्वसंकेताप्रमाणे मौलवीच्या लोकांनी महारवाड्यास त्याच वेळेस आग लावून दिली. तेव्हा तो भयंकर डोंब व त्या बिचाऱ्या निद्रिस्त महाराच्या घरातील मंडळींची अेकाअेकी झालेली बोंब अैकून थिय्याची काही मंडळी आपआपल्या घरांचे रक्षण करण्यासाठी कम्बूचे न अैकता धावून गेली. मौलवीने त्याच वेळेस अेकाअेकी आपला ब्राह्मणांच्या घरावर रोख नसून श्रीरंगाचे मंदिरावर आहे असें भासविलें व मुसलमानाची मोठी टोळी त्या देवळावर तुटून पडली. हें पाहताच आपल्या घरादाराचें रक्षणापेक्षा आपल्या देवळाचें रक्षण करणें हेंच श्रेयस्कर आहे असे कंठरवाने सांगितलें असताही जे थिय्या लोक त्यांस सोडून गेले त्यांची पर्वा न करता कम्बू आपल्या जवळ असलेल्या दहा पंधरा लोकांनिशी श्रीरंगाच्या दारात जाअून अुभा राहिला. पण त्याचेबरोबर तो त्याचा विश्वासू तरुण —दामोदर हा मात्र नव्हता. त्यास त्याने त्या निष्पाप व अव्याज मनोहर कुमारिकेचें रक्षणास धाडून दिले होतें.

हा हा म्हणता कुट्टम गावात अेकदम प्रलय झाला. त्या गावातील राहणाऱ्या त्या चार पांच मोपल्यांच्या घरातून छपवून ठेवलेलीं शस्त्रास्त्रे तेथील मोपला स्त्रिया मुसलमानास वाटताना दिसत होत्या. अेक म्हातारी मोपलाबाअी हातात जळती चूड व रॉकेलचा डबा घेअून हिंदूंचे घरांस आग लावीत धावत होती. हिंदु लोकांतून कोणी भाजले गेले, कोणी मारले गेले; कम्बू मात्र आपल्या थोड्या लोकांनिशी श्रीरंगाचे द्वारात झुजत होता. जिकडे तिकडे आग, आरोळ्या व असावधपणात मकट गुदरलें असता जी जनतेची भयंकर स्थिति होते ती झालेली दिसत होती. मुसलमानांनी आता देवळावर निकराचा हल्ला चढविला. पण त्यात मौलवी दिसत नव्हता.

कारण तो निवडक माणसे बरोबर घेअून त्या श्रीरंगाच्या मूर्तीहूनही त्याच्या नेत्रांस अत्यंत रमणीय दिसणारी व हृदयास लुब्ध करणारी ती दुसरी देवमूर्ति भग्न करण्यासाठी तिकडे त्या ब्राह्मणागारात—त्या कुमारिकेच्या शय्यागृहाकडे चालला होता

त्याचे आधीच दामोदर थिय्या ब्राह्मणवनात आलेला होता. त्या वनाचे जवळ जी हिंदु-मुसलमानाची पहिली चकमक झाली व जीत मुसलमानांना माघार घ्यावी लागली तिच्या गलबल्याने ब्राह्मण-वनातील कित्येक लोक दचकून अुठलेले होते. या सर्वांस अेकत्र करून व मुसलमानाची ती पिछेहाट झाल्याने ते अितरत्र गेले असता जो वेळ मिळाला त्या वेळेचा लाभ घेअून त्या वनाचे संरक्षणाचा काही संघटित प्रयत्न करावा म्हणून हरिहरशास्त्री व दामू त्यांस घाअीघाअीने अुत्तेजन

देऊ लागले रामशास्त्री, चिंतामणि व अितर ब्राह्मण आपल्या घरातून मिळाली ती हत्यारं घेअून बाहेर पडले त्याना बहुतेकाना आपण कम्बूने सांगितले तेव्हाच सावध झाला नाही याविषयी फार वाअीट वाटले

पण स्थूलेश्वरशास्त्री मात्र अजून शंकित होते — नव्हे त्यास अेक भयंकर संशयही आला हा कम्बू — हा धिय्या — कोण जाणे हाच या मुसलमानास मिळालेला नसेल कशावरून! त्यानी तसं बोलून दाखविले तेव्हा बहुतकजण चिडून म्हणाले ‘ असले असं गृहीत धरा हे मोपले लोक छापा घालीत आहेत! ही तुमची देवळे— ह्या तुमच्या स्त्रिया — हा तुमचा धर्म — कोणाकडूनही असो — ती भ्रष्ट होताहेत त्याचे संरक्षण करा बस्स!’

‘संरक्षण!’ चिडून स्थूलेश्वरशास्त्री म्हणाले, ‘ महाराना ब्राह्मणाचे गल्लीत आणले, त्याची छाया तुम्ही घेतलीत, त्याच्या खांद्याशी खांदा लावलात! आता तुमचा धर्म राहिला काठ तर त्याचं मी संरक्षण करू? पण हं कोण? अरे हं त्या महाराचे पोर! दाम्या, तू येथे माझ्या अंगणात! ठार झाला धर्म! याचपेक्षा मुसल्मान आले असते तर अधिक भ्रष्टाकार तो कोणता होता?’

‘शांत व्हा! स्थूलेश्वर!’ चिंतामणि म्हणाले स्मृतीमध्ये आपत्प्रसंगी स्पृष्टास्पृष्टी मानू नये म्हणून लिहिले आहे पुन्हा हा शूर धिय्या तरुण केवळ हिंदुत्वाचे अभिमानाने येथे लढत आहे

‘पण ते आपत्प्रसंग पुराणही राहू द्या!’ हरिहरशास्त्री रागाने म्हणाले ‘तो हिंदु आहे व म्हणून तो माझे घरात आला पाहिजे ता धर्मवीरासारखा मघा लढला म्हणूनच मी त्याचे चरणी वंदन करतो त्याचं येणं आणि मुसल्मानाचे ब्राह्मणवनात येणं सारखेच भ्रष्टाकारी आहे काय? हाय, हाय, याड्याच वळात तं सिद्ध होअील! तो धिय्या महार वा मांग येथ हातात तलवार घेऊन हिंदुधर्माचं रक्षणासाठी आला आहे तो तुमच्या अंगणात अुभा आहे तरीही देव देव्हाऱ्यात आहेत अग्नि-अग्निकुंडात आहे जानवी गळ्यात आहेत जीव देहात आहेत थोडं थांबा संघटना-शिवाय असेच थांबा — आणि ते आले मुसलमान बघा बघा, ते देव अग्नि

सुमतीस हरिहरशास्त्री यांनी कम्बूच्या बातमीची फारशी चाहूल लागू दिली नव्हती ती रोजच्याप्रमाणेच आपण मघा पाहिली तशीच गाढ झोपेत निजलेली होती. तो चंद्रकिरण तिच्या वदनास निर्भयपणे पाहता आले म्हणून धिटावून खाली सरकून आता तिच्या शंखासारख्या सुरेख कंठात कंठ्याप्रमाणे शोभू लागला. त्याचे हे धाडस वाढून तो चंद्रहारासारखे मनोहर दिसावे म्हणून तिच्या वक्षःस्थलावरही अुतरेल की काय या भयाने मधून मधून वाऱ्याच्या झुळकेच्या विमानात बसून तिचा तो किंचित् हलणारा पदर त्या चंद्रकिरणावर चाल करून जात होता सुमति गाढ झोपेत तशीच होती. तोंवर तो ब्राह्मणवनाच्या दूरच्या टोकास पहिली चकमक अुडाली नव्हती. त्या चकमकीतील दूरच्या कोलाहलाने तिची निद्रा किंचित् ढळली. स्वप्नात तिला वाटले की संस्कृत श्लोकाच्या भेंड्या लावता लावता कालिदासाचा श्लोक म्हणून तिच्या भावाने पुन्हा अुपनिषदातला अेक श्लोक म्हटला तो अुलटा तिच्याशी भांडू लागला. ती पुन्हा किंचित् निजली. काही वेळाने पुन्हा मोठा गलबला होअून ती चांगली दचकून अुठली. डोळे अुघडते तो समोर तो धिप्पाड तरुण अुभा. क्षणभर तिला वाटले की मी स्वप्नात आहे, व त्या दिवशी बागेत फुले तोडीत होते त्या वेळचे स्वप्नच अजून पाहत आहे, परंतु क्षणात तिला त्या दृश्याची भयंकर वास्तविकता कळली. तिचा पिता अत्यंत अस्वस्थ मुद्रेने म्हणाला, 'बाळ सुमति, जागी हो, घाबरू नकोस. हे पहा आपल्या ह्या ब्राह्मणवनावर क्रूर लुटारूंची मोठी धाड आलेली आहे' हे अर्धवट वाक्य अैकताच तिचे वदन अेकदम खिन्न झाले. तिला धाका आली की हा लुटारू त्या टोळीतीलच आहे ती या तरुण धिप्पाडाकडे दयार्द्र दोघ्याकडे पाहावे तसे पाहू लागली तिचा पिता पुढे म्हणाला, 'अशा स्थितीत तुझे रक्षण करण्याचा अेकच अुपाय मला हा दिसतो की तू आताचे आता येथून निघून कोणत्या तरी मार्गाने तुझ्या मामाच्या गावी निघून जावे तुझ्या रक्षणासाठी तुझा भाअू व हा माझा विश्वासाचा तरुण धिप्पाड दामोदर येत आहे' हे अैकताच तशा संकटमय स्थितीतही तिचे वदनावर अेक समाधानाची लकेर दिसून गेली कारण अशा सुरेख आकृतीच्या हातून दुष्ट कृत्ये घडणार नाहीत हा स्वभावसहज असणारा वेडा तर्क तरुण दामोदर चोर नसून तिचा रक्षक होण्याअितका विश्वासू आहे हे कळल्याने पुन्हा अेकदा खरा ठरला अेकाअेकी अैकलेला तो भयंकर वृत्तान्त तिच्या चांगला ध्यानात अुतरण्याचे आधीच तिचा बाप म्हणाला, 'हं अूठ, बाळे, अूठ! वेडी ती पोर! तिला अजून कळले नाही काय ते'

तो तिकडे ढोलाचे, आगीचे, हाणामारीचे कोलाहल अधिकच जवळ, अगदी जवळ अैकू येअू लागले धाअीधाअीने सुमतीस शास्त्रींनी ओटावी तशी ओढून तिच्या बापाने, भावाने व त्या धिप्पाड तरुणाने मागचे दाराने अेक पुरुषाचा पायघोळ अंगरखा व टोपी तिच्या अंगावर घालून रानात पळवीत नेली. हरिहरशास्त्री पुढील दाराशी येतात तो मौलवीचे-लोक दहा पुढावर येअून ठेपलेले होते शास्त्री यांचे

घर पाहताच मौल्वी ओरडला, 'यही, यही वे काफर है पकडो, मारो मत–पकडो ' मोपले वदुकाचे बार काढीत शास्त्री याचे घरावर चालून आले वदुकाचे बार ऐकताच आजूबाजूच्या घरातील नि शस्त्र अमल्यान पायाळ झालेली माणसे घरात जाऊन दपू लागली हरिहरशास्त्री यानीही दार बंद करून आतून विचारिले, 'मौलवी, तुम्हास काय पाहिजे आहे ? आम्हा निरपराध ब्राह्मणाच्या घरावर आपण चालून का आलात ? मोपले अिंग्रजाच्या विरुद्ध बड करून अुठले असता त नाहक आम्हावरच का शस्त्रे अुगारतात ?' मौल्वी म्हणाला, 'तू जर तुझेपाशी असलेले सव द्रव्य आम्हास देशील, व तुझे घरातील सव मडळीसह मुसलमान होशील तर आम्ही तुला आपलेच समजू अितकच नाही तर तुझ्या त्या सुदर मुलीशी मी स्वत लग्न लावून तुला या खिलाफत राज्यात मोठा मानकरी करीन ' त्याचे हे अुद्दाम शब्द हालाहलाप्रमाणे घसघसे गिळून टाकीत शास्त्री म्हणाला, 'हा दिवस तुम्ही आम्हास या गोष्टीचा विचार करण्यास द्याल तर अुद्या आम्ही तुमची गोष्ट मानू माझी मुलगी आजारी आहे ती तुमच्या दाडगाअीने घाबरून जाअील तर तिचा आजार असह्य होअील,' मौल्वी म्हणाला 'मी ऐकटा आत येतो, दार अुघड ' 'पण तुम्ही मला फसवणार नाही म्हणून कशावरून ?' 'आमच्या वचनावरून ! तू दार न अुघडलस तर ते फोडून आम्ही आत येअू शकू परतु ऐकदा जे मुसलमान होतील त्यास त्रास होअू नये हा आमचा धर्म असल्याने जर तू तुझी कन्या आम्हास देशील तर आम्ही तुला फसविणार तरी कशासाठी ?' 'पण आज मला जर सोडून जाल तर अुद्या मी सव ब्राह्मणास मुसलमान होण्याचे साग्रह विनवीन व ते होतील म्हणून आजच्या दिवस परत जा ' छे ! छे ! तसे होणे नाही सुखासमाधानाने दार अुघडतोस की घरास आग लावू ? हे विचारण्याची सवलतही बोकडा ! तुझ्यासाठी मिळालेली नाही तर त्या तुझ्या कामरू अप्सरेसाठी होय !' 'आणि अप्सरेसारख्या माझ्या ह्या मुलीचे रक्षणासाठी माझे प्राण आहेत तोवर मी झुजल्याविना राहणार नाही ! सुमति, दार अुघडू का ? नको ना ! बस तर अुघडीत नाही जा !' हरिहरशास्त्री अुगाच सुमतीस मोठ्याने हाक मारल्यासारखे करून ही वाक्ये अुच्चारीत होते हे वाचकास कळलेच असेल त्या त्याच्या बतावणीचा अिष्ट तो परिणामही झाला मौल्वीस सुमति आत आहे तेव्हा आग न लावता काम करून घेतले पाहिजे असे वाटून त्याने दरवाजे फोडण्याची आज्ञा दिली क्षणाधात कोणी खिडक्यावर कोणी कौलावर चढून तर कोणी दारावर कुऱ्हाडीचे आघात करीत धावले सुमतीस पळण्यासाठी वेळ देता यावा म्हणून शक्य ते कालहरण करून आता अगदी निरुपाय झाला तेव्हा हरिहरशास्त्री आपल्या अग्न्यागाराचे पुढचे दाराशी तल्वार घेअून व दार बद करून बसला त्या दारावरही कुऱ्हाडी पडल्या जो मुसलमान पहिल्याने आत शिरला त्यास त्या शूर ब्राह्मणाने तलवारीने छाटून टाकले दुसरा मोपला गर्दीत तसाच आत घुसताच त्यालाही छाटून काढले

तेव्हा मोठी ओरड होऊन मोपले मागे सरले. ती म्हातारी मात्र पुढे सरसावून म्हणाली, 'मी आग लावून देते ह्या खोलीला ! आत्ता मेला तडफडून बाहेर येईल.' पण तिला विनवीत मौलवी म्हणाला, 'नहीं बुढी, ऐसा नहीं, या हिंदु लोकांत केव्हा केव्हा वाघासारखें शौर्य संचारत असतें. बहुधा हा ब्राह्मण आपल्या मुलीस बरोबर घेऊन या घरात लढत असावा. आग लावलीस तर ते जिवंत जळतील पण आपल्या हातो सापडणार नाहीत. घर फोडलें पाहिजे.'

या वेळेस त्या ब्राह्मणाच्या घरात मोपले सर्वत्र पसरले होते. मशाली घेऊन लूटमार करीत ते सुमतीस हुडकीत होते. केवळ तें अग्न्यागार काय ते अजून पूर्णपणे पडलें नव्हतें. इतक्यात तेही पडलें. कौलारावरून मोपले आत उतरले. अंधेरात त्यांपैकी दोन माणसास ठार करून मागचे दाराने हरिहरशास्त्री निसटणार तों स्वतः मौलवीच दुर्दैवाने तिथे उभा दिसला. उतावीळपणे मौलवी धावून तलवार उगारून गर्जला, 'मुलगी कुठे आहे ?'

'ही बघ माझी मुलगी ! ' म्हणून त्या शूर ब्राह्मणाने आपली तलवार अशा सफाईने चालवून असा जोराचा वार केला की मौलवीच्या खांद्यावरून तो खाली उतरला व ची ची करीत तो मागे हटला. तो ब्राह्मण आपल्या गृहाचें, आपल्या मंत्राग्नीचें व आपल्या यानाचे शक्य तितके संरक्षण करून जे ब्राह्मणाचे घर समोरच दिसलें त्या घराचे रक्षणार्थ धावला पण तोंडानें 'सुमति ! शीर त्या घरात, येतोच मी ! ' असें ओरडत चालला.

त्या घरात जी भयंकर दुर्घटना चालली होती तिच्यापुढे हरिहरशास्त्रीबुवा यांचे घरची घटना काहीच नव्हे. तीन किंवा चार मोपले त्या घरात घुसलेले होते. त्यांच्याबरोबर ती म्हातारीही मशाली पेटवून उभी होती. पहिल्या घडाक्यासच त्या मोपल्यांनी एक वारासरशी त्या घरचा धनी घायाळ करून खाली पाडला. तो प्रकार पाहताच एकच रडारड करीत व त्या दुष्टांची करुणा भाकीत दोन म्हाताऱ्या, त्या धन्याची बायको व दोन मुली पुढे घुसून त्या घायाळ गृहपतीस आपल्या अंगाखाली झाकून आकान्त करीत पडल्या. तोंवर घरभर सोने नाणे काय होतें तें लुटीत फिरून ते मोपले त्या आकान्त करणाऱ्या निराधार, विव्हळ, भयभीत व निस्त्राण स्त्रियास म्हणाले, 'बायांनो, तो काफर अजून मेला नाही. तो बरा होईल. शोक करू नको. आम्ही त्याची सर्व व्यवस्था ठेवितो, केवळ ए प्यारी ! तू मला आपला म्हण' 'नी तू मला.' असें म्हणत त्यांपैकी त्या दोघांनी त्या तरुण मुलीस व त्या तिसऱ्याने या मध्यम वयाच्या आईस कवटाळलें. त्या शोकाकुल व भयभीत स्त्रियांपैकी दोघी तर ओरडूसुद्धा शकल्या नाहीत. त्यातील धाकटी मुलगी मात्र ओढाताण करू लागली. ती आपल्या सासरहून बाळंत व्हावयासाठी पहिली खेप म्हणून आपल्या आईचे घरी आली होती. तिला धडपड करताना पाहून मोपले रागावले. त्यांनी त्या तिघीस धरून त्यांचीं वस्त्रें सोडून दूर फेकून दिलीं.

ऐका त्या धाकट्या मुलीने ह्या दुष्ट पशूंच्या हातून जीव व मान रक्षण करा' म्हणून मोठमोठ्याने हाका मारल्या धडाधड डोकें भिंतीवर वा भूमीवर सापडेल तसें आदळलें, पण त्या हाका मनुष्य व देवाच्या कानांवर ऐकू गेल्या नाहीत तें डोकें त्या भूमीने वा भिंतीने कांहींच फोडून टाकलें नाही तेव्हा शेवटचा उपाय म्हणून ती कोमल सुंदरी त्या कठोर थेरडीच्या पायावर—मरीआईच्या पायावर कमल पडावें अशी—पडली व म्हणाली, '*तू मुसलमान आहेस—पण स्त्री आहेस!* स्त्रियांच्या भावना तुला कळत असतील हा माझा बाप हे त्याचे हत्यारी! —त्याचे डोळ्यांदेखत हे कृत्य मा करूं दे सासू!' ती थेरडी विकट हास्य करून म्हणाली, 'पोरी एक दिवस मीही असेच म्हणाले होते पण तें कोणी ऐकलें नाही तें कोणी *ऐकतं तर कदाचित् आज मी तुझें ऐकते पण आता जितक्या माझ्यासारख्या हातील* तितक्या मला पाहिजे आहेत चल पड ' तिच्या त्या दुष्ट अपशब्दाने जळत त्या तरुणीने धाडदिशी पुन्हा आपले कपाळ भूमीवर आपटलें तें फुटलें—रक्त भळभळ वाहूं लागलें ती थेरडी जास्तच चिडली! 'कल्याणो, नपुंसक आहात की काय?' तों ते कामोन्मत्त पशु त्या तिघी स्त्रियांशी झगटले दोन्ही चूप राहिल्या ती रक्तार्त गरोदर सुंदरी धडपड करीतच होती इतक्यात आणखी एक-दोन मोपले आत घुसले, 'अच्छा, ती का धडपडते माहीत आहे काय?' त्यांतील एक हुसेन नावाचा मनुष्य म्हणाला 'कळलें, कळलं,' हसून—तशाही स्थितीत हसून, हसन म्हणाला, 'तिचा काम अजूनपर्यंत थांबला नाही!' तो दुसरा तिच्याशी बिलगला ती त्यास एखाद्या पाय बांधून टाकलेल्या सिंहिणीसारखी कडकडून डसली, हसन 'मारो सालीको' म्हणत सुरी उपसून धावला हुसेन म्हणाला, 'अरे मूर्खा! वास घेतल्याविनाच फूल चुरगळून टाकावयाचें काय! अरसिक आहेस!' तिच्या तोंडात बोळा घातला गेला, व पहिला मोपला दूर होताच हुसेनाने व हुसेन दूर होताच हसनने त्या घायाळ गरोदर सुंदर तरुणीवर राक्षसाहूनही क्रूर बलात्कार केले अशा भयंकर बलात्काराची प्रीति बहुधा तें पापकृत्य संपताच भयंकर द्वेषाचें स्वरूप धारण करते याप्रमाणेच हसन उठताच ज्यास ती कडकडून चावली होती त्या हुसनने सुरी उपसून ती त्या सुंदर व अत्यंत निरपराधी कन्येच्या पोटांत खुपसली तिचे

त्याच्या या ओरडण्याने सुमति त्याचेपुढे कुठेतरी त्या घरातच घुसली असावी असे समजून मौलवीचे लोकही मागामाग धावत येत होते परंतु त्याचे काही लोक त्या अग्न्यागारात त्याचे काही तरी धन असावे म्हणून मशालीने शोधीत होते तो त्यास अेक खळगा आढळला, 'सापडले रे सापडले !' म्हणून अिब्राहिमने जो त्या खळग्यात हात खुपसला तो तो मोठमोठ्याने बोंबलतच बाहेर काढला हवनार्थ राखेखाली झाकून ठेवलेल्या ज्वलंत निखार्याने तो वाघासारखा भाजून काढला ! त्याच्या अग्निनीनेही पेट घेतला त्यास अर्धे अधिक भाजून काढीतो आग विझली नाही ब्राह्मणाच्या यज्ञाग्नीने अेकदा तरी यज्ञध्वंसकास चटका दिला भवतार्ची सर्व दैवते अितकी जरी जाज्वल्य असती ! तरी —

हरिहरशास्त्री देखील त्या त्याच्या हवनाग्नीसारखाच पेटत जो त्या दुसर्या घरातून निरपराध ब्राह्मण मन्यकावर बलात्कार करून बाहेर पडणार्या मोपल्यात मिसळला तो हसनला व हुसेनला तलवारीने छाटून वाट काढीत आत घुसला पहातो तो त ब्राह्मणाचे कुटुंब त्या अत्यंत विपन्न करुणास्पद व बीभत्स भयंकर स्थितीत पडलेले ! 'हाय हाय ! स्थूलेश्वरशास्त्री !' हरिहर त्या घायाळ गृहपतीस म्हणाला — कारण तो गृहपति दुसरा कोणी नसून महारापेक्षा मुसलमान घरात येण्यात कमी भ्रष्टाकार होतो असे आग्रहाने प्रतिपादणारा स्थूलेश्वरशास्त्रीच होता — काय ही दशा ! अीश्वराचा हा केवढा कोप !' स्थूलेश्वरशास्त्री कळवळून म्हणाला 'आणि अेक प्रकारे आपल्या हिंदुजातीच्या दुष्ट आळशतेच्या पापाचं केवढे भयंकर फळ ! असो अजूनतरी बोला मी त्या अुरलेल्या तुमच्या मुलीस व पत्नीस माझे आज्ञेत जे दोन शिपाई तरुण अुरलेले आहेत त्याच्या हातून पळवून दुसरीकडे सुरक्षितपणे धाडण्याचा प्रयत्न करतो ' स्थूलेश्वरशास्त्री हू म्हणेना ! प्रामाणिकपणे त्यास शिप्याच्या हाती मुलीस — मुसलमानानी भ्रष्ट केलेल्या मुलीस यापुढे तरी त्याची विटंबना टळ वी म्हणून देखील देणे म्हणजे महत्पाप होय असे वाटत होते ! अशी रूढीची बेडी अेकदा हृदयात रुतून गेली म्हणजे त हृदय फोडून तोडून टाकल्याविना निघणे कठीण होते

हरिहरशास्त्री यानी अेक क्षण त्या सर्व देखाव्यास अेका दृष्टीने पाहिले. 'गेल्या सध्याकाळी शातपणे निजावयास हे सर्व कुटुंब गेले होत ह्या मोपल्याचे काही अेक दिले घेतल नव्हत हे मोपले आडरानचे स्थूलेश्वरशास्त्री यानी व त्याच्या मडळीने हे ब्राह्मणवन आज दोन पिढ्यात ओलांडले देखील नाही शुचिर्भूतपणे श्रुतिस्मृतीचा अभ्यास करून सतापात दिवस कठणार ह कुंटुब — सध्याकाळी प्रेमाने अेकमेकाशी हसतखेळत झोपी गेले — आणि अजून सकाळ झाली नाही तो त्याचेवर हा कोण प्रसग ! घर, दार, मुली — पोटातला गर्भदेखील मुसलमानी तलवारीस व आगीस बळी पडलेला ! का ? केवळ ह 'हिंदूचे कुटुंब म्हणून ! म्हणजे हिंदुसमाज बलहीन व असघटितपणे राहतो म्हणून ! दुर्भोजाचे

शक्तिसंपाचा, बऱ्यावाईट स्थितीचा परिणाम व्यक्तींनी ते बंधन नको म्हटले तरी त्यातल्या निर्घृण अुलटते भोगावा लागतो ! व्यक्तींच्या व समाजाच्या जीवनाचे धागेदोरे अितके गुंतागुंतीने विणलेले असतात झाडाच्या फांद्याप्रमाणे वर फारसे अैकात्मत्व दिसत नसले तरी भूमीत मुळपाशी व्यक्तिजीवन व समाजजीवन अितके निगडित झालेले असते तू काही अपराध कर वा करू नकोस, तू हिंदुसमाजात आहेस म्हणून त्या समाजावर शत्रूचा आघात पडेल तेव्हा तो तुझे शिर–तू यिप्या अंस वा मवुद्री अंस,–वा महार अंस, तुझे डोके दुभंग केल्याविना राहणार नाही तुझे सामाजिक जीवन संकटात पडले आता तुझे जीवन हेच मुळी केवळ वैयक्तिक–सामाजिक असे दोहोंचे मिश्रण आहे ! '

हे विचार हरिहरशास्त्री यांच्या मनात मनाच्या वेगाने झटकन् येअून गेले स्थूलेश्वराच्या मूर्ख हटवादीपणाने आली अनर्थी संकटे येत आहेत, आणि त्याचे अनुमोदन असो वा नसो त्या स्त्रियांचे रक्षण करावयाचे असा निर्धार त्वरित करून हरिहराने त्या दोघी स्त्रियांस मागचे दारातून आत बोलावून आणलेल्या दोघा शिष्यांचे हाती सोपवून दिल्या व आपण तेथून निसटून मौलवी जिकडे दिसला तिकडे धाव मारीत गेला

हरिहरशास्त्री यांचे मागोमाग मौलवी स्थूलेश्वरशास्त्री यांचे घराकडे सुमतीसाठी येत असता मध्येच त्याच्या अेका मोपल्याने, 'सुमति ! सुमति ! सांली मिळ गयी ! सापडली' म्हणून पुकार केला मौलवी लगेच हरिहरास सोडून तिकडे धावला अेका घराचे मागील दारी गवताचे गंजीत घुसून चिंतामणशास्त्री यांची मुलगी लक्ष्मी ही त्यांचे घरावर दोन दोन करून मोपले तुटून पडताच पळत पळत येअून लपून बसलेली होती ती सुमतीचेच वयाची असून काहीशी तशीच दिसत होती तरी मौलवीने प्रथम तिला पाहताच अत्यंत हर्षभराने तिला त्या सव गर्दीतही आपल्या छातीशी कवटाळली मौलवीच्या माथ्यावर हरिहरशास्त्री यांच्या लागलेल्या वारातून रक्त वाहणे जरी बंद झाले तरी त्याच्या वेदना कमी झालेल्या नव्हत्या पण त्या वेदना त्याला सुमति म्हणून लक्ष्मीला कवटाळण्यास मिळताच बंद झाल्यासारख्या झाल्या ज्यासाठी आपण अेवढा खटाटोप केला ते काय झाले

बनवावयाची होती, म्हणून, ती मोपल्यांच्या खिलाफत सरकारच्या आगलाव्या विभागाचे (खात्याचे) अध्यक्ष असणाऱ्या त्या थेरडीच्या मनालीतून वाचली.

आपले लोकास बोलावीत व अेकत्र करीत मौलवी अेका दगडावर किंचित् बसला त्याचा खादा दुखतच होता. 'देखो, मी बोललो तसें झाले पाहिलेना? दहा गावे आपण अुद्ध्वस्त करीत आलो पण ह्या य कश्चित् ब्राह्मण वनातील चार घरें घेण्यासाठी आपणास फार धर्मवीराचे बळी द्यावे लागले तिकडे देवळाकडे मारामारी चाललीच आहे हे कुट्टम गाव घेण्यास जितका त्रास पडला तितका अरनाड तालुका घेण्यासही पडला नसेल. हे सारे या कम्बूचे व हरिहरचे काम. दोन काफर अेकत्र झाले तर अशी सैतानीयत माजवितात. पण फळ आले, केलेल्या श्रमाचे चीज झाले ' मौलवी म्हणाला

'वा खानसाहेब ! सुमति मिळाली म्हणून तुमच्या श्रमाचे चीज झाले हे अुघडच आहे पण आमच्या ? आम्हा अेक दोघाच्या वाट्यास अजून काहीच नाही. हें पहा, आम्हास मिळाले पाहिजे, नाहीतर कोणासच पचणार नाही अ!' अबदुल्ला तिरोला जरा तिरसटपणे म्हणाला

अबदुल्ला ! दम धर भाअी सकाळ होअू दे—अल्ला अिमान[illegible]म बरकत देणारा समर्थ आहे दोघास अेक नाही—अेकेकास दोघी दोघी तरी वाटून देअीन. पाव पण ते काफर जे धरलेत व कैदी केलेत त्याना समोरच्या घरात नीट कोंडून टाका ! अरे पण तो हरिहर कोणास सापडला का ? नाहीतर सारेच

'ती पळून गेला म्हणून? नव्हे नव्हे खानसाहेब! ऐका तरी पुढे –' धावरत महमद वेडा म्हणाला, 'हा काफर त्या पोरीस पाठीवर टाकून तो पुढे व मी मागे असे आम्ही धावत सुटलो. चंद्राच्या उजेडात हा येताच मी तलवारीनेच तीन चार घाव कुऱ्हाडीच्या घावासारखे ह्या त्याच्या ऐका पायावर मारून ह्यास खाली पाडले, पण मुलगी दिसना! तेव्हा याच्या पाठीची मी कसून झडती घेतली पण मुलगी पाठीवर कुठेच आढळेना!'

'रे सैतान! आजूबाजूस लपलेली असेल तेथे का नाही पाहिलास!'

'पाहिली तर काय महाराज! माझ्या उजव्या बगलेत पाहिली डाव्या बगलेत पाहिली दूरवर पण जाऊन पाहिली, पण ह्यास कोण सांभाळता? हा दोन पायाने कसा धावत होता आपण पाहिलेच आहात त्याच्या अर्धा तरी ऐका पायाने सहज धावता व तुम्हास माझा पराक्रम – हा व याचा हा पाय न सापडता – तर खरा देखील वाटला नसता.' असे म्हणत महमद वेड्याने स्वतःचे खांद्यावर आणलेला रक्त घोळत असलेला तो ब्राह्मणवाराचा कापलेला पाय, अखाद्या हत्तीच्या कापलेल्या सोंडेसारखा, धाडकन भूमीवर आपटला.



या तरुणीस अितकें पावरल्यासारखें होअी की त्या निर्जन रानासेंधा भयंकर संकटात सापडलेलें का होअीना परंतु कुटुंमच बरें असें तिला वाटावें ! सापाची व अंधेराची भीति तिला अेकसारखी भिववीत होती. कसें तरी माणसात जावें असें तिला वाटे. त्या रानात तिच्या कुंजापाशी तसें म्हटलें तर कोणीही भयप्रद जीवजंतु आलेले नव्हते. मोपल्यांकडून भयप्रद जीवजंतु-येणेंही शक्य नव्हतें. पण तें कोणीही जीवजंतूचें जवळ नसणेंच—तें निर्जीवन — निर्जनपणच आजन्म प्रियजनांच्या अंगाखांद्यावर वाढलेल्या त्या लक्ष्मीला अत्यंत भयप्रद व दुर्धर वाटलें. तथापि ती धीर धरून रात्रभर तेथेच राहिली. पहाटेच्या सुमारास जरा बरें वाटून तिने पुढे पळावयाचा निश्चयही केला. मैल दोन मैल जाताच तिला तिच्या सारख्याच दबत चाललेल्या आणखी दोन स्त्रिया दूर दिसल्या. ह्या क्वचित् मुसल्मानाच्या पक्षाच्याही असतील अशी शंका आली असतानाही निर्जनपणास अगदी कंटाळलेली ती तरुणी हो ना करता, कूरता त्या स्त्रियांपाशी गेलीच. तुम्ही कोण म्हणून विचारताच त्या स्त्रियांनी लक्ष्मीला ओळखलें व अेकदम कंठ दाटून येअून त्या म्हणाल्या, 'बाया ! तू अिकडे कुठे ! तुम्ही ब्राह्मणाच्या, तुमचें नख आम्हांस दिसणार नाही. देवाने हा कोण कोप केला ! कालच्या त्या मेल्या मुसंड्यांच्या दंग्यातूनच तुम्ही निसटल्या

लक्ष्मी कळवळून म्हणाली, 'तुम्ही बायांनो, तुमचे स्वतःचे दुःख विसरून माझी चिंता करता ना? देवाने तुम्हास जितके उदार हृदय दिले आहे तुम्ही मसकुर्नी मानणाऱ्या ब्राह्मणांपेक्षा कितीतरी उच्च जातीच्या हिंदु आहात. नको नका, बाई असा मागे येऊ नकोस. हे बघ मला किती वेळा तरी कोणाच्या तरी गळ्यात पडून पोटभर रडावेसे वाटत आहे. तू संकोच करू नकोस. मला छातीशी घे—क्षणभर तू माझी आई हो!' असे म्हणत लक्ष्मी त्या मसकुर्नी स्त्रीच्या गळ्यात पडली. ती मसकुर्नी तशा स्थितीतही, 'बामणीस' आम्ही शिवलो म्हणून स्वतःस मातल्या मनात दोष लावीत होती. पण ती मसकुर्नी स्त्री मात्र लक्ष्मीस छातीशी धरून न थकताच तिचे सांत्वन करीत होती. थोड्याच वेळात त्या स्त्रियांचाही दुःखी प्रेमाचा पहिला उमाळा ओसरला व पुन्हा भीतीने त्या पुढे तरी जावे म्हणून लपत छपत चालल्या. थोड्याच वेळात त्यास आणखी एक त्यांच्याच गावचा मनुष्य—विष्णु नायर दुरून जाताना दिसला. तेव्हा देवानेच लगेच आपल्या साहाय्यास धाडले असे त्या भयभीत स्त्रियांस होऊन त्या अतिशय आनंदाने त्याचेकडे गेल्या. त्यास पहाताच विष्णु नायराने कपाळास आठ्याच घातल्या. मी स्वतःच जीव घेऊन कसाबसा पळत असता हे लचांड कुठे गळ्यात पडू पाहते असे होऊन तो त्यास दमदमून अगोदरच येऊन म्हणाला, 'मजकडे काय आहे? इकडे कशाला येता?' 'महाराज!' ती मसकुर्नी वृद्ध स्त्री हात जोडून म्हणाली, 'महाराज, आपण नायर लोक क्षत्रिय म्हणविता. अवघ्या आम्ही, आम्हास दुसरे काही नको. या बामणीनीच्या मावशीचे गाव येथून दोन कोसावर आहे. तेथपर्यंत तिला पोचवून द्यावे. मोपल्यांनी माग रोखले आहेत म्हणून आम्हास भीति वाटते.' 'पण तुझी जात कोण?' नायर म्हणाला. 'दास बाबा!' मसकुर्नी उत्तरली. 'आणि तू माझ्याजवळ दोनशे फुटांच्या आत येऊन बोलतेस! राक्षसिणी, माझा धर्म बुडवितेस! माहीत नाही आम्ही क्षत्रिय धर्मासाठी प्राणाचीही पर्वा करीत नाही ते!' असे म्हणत तो त्या स्त्रीची छाया पडल्याचा खरोखरीच राग येऊन त्या क्षत्रियाने त्या अस्पृश्य वृद्धेच्या ताडकन तोंडात मारली! तिची मुलगी एकदम रडू लागली. तेव्हा लक्ष्मी रागाने व कंपित होऊन म्हणाली, 'अरे विष्णु, ह्या बिचाऱ्या अस्पृश्यापुढे जो तू पराक्रम दाखवितोस तो ते तुझे बाप—ते मुसलमान मोपले तुझ्या घरातील स्त्रियांवर व देवळातील देवांवर अत्याचार करीत आहेत त्यांस का दाखवीत नाहीस? त्यांच्या भयाने एखाद्या नपुंसकासारखा जीव घेऊन का पळत आहेस? त्या कृत्याने तुझा क्षत्रिय धर्म भ्रष्टला नाही पण ह्या बिचाऱ्या अस्पृश्य म्हाताऱ्याच्या सावलीने तो भ्रष्टला ना? मुसलमान त्यास हिंदु म्हणून ठार मारीत आहेत—हिंदु त्यास मसकुर्नी अस्पृश्य—म्हणून मारीत आहेत, हुसकून देत आहेत. त्यांनी आता जावे कुठे!' 'लक्ष्मी!' तो नायर जरा ओशाळून म्हणाला, 'तू पाहिजे तर चल मजबरोबर. जरी या प्रसंगात तुझ्यासारखी सुंदर तरुण मुलगी बरोबर घेणे म्हणजे मोपल्यांचे संकट बोलावून

आणणें होय, तरीही—माझे गावच्या ब्राह्मणाची तू, चल. तुला पोचवितो. पण या मसकुनी स्त्रिया माझेबरोबर घेईन तर मला क्षत्रिय जातीबाहेर काढतील ! '

'का नाही काढणार !' लक्ष्मी तिरस्काराने म्हणाली, 'अबलाचे परधर्मीयापासून रक्षण केले तर मग क्षत्रियत्व तें कुठे राहिलें ? पण तू तसे काही एक पाप केले नाहीस. हिंदुधर्मावर व हिंदुजातीवर भयंकर अत्याचार चालले असता त्या अत्याचार करणाऱ्या विधर्मीयाशी तू सन्मुख लढत नाहीस. जीव घेऊन पळत आहेस मुसलमानांनी तुमच्या बायकापोरे काल वाटविली असता तुझा धर्म बुडला असे तुला वाटत नाही. पण हिंदु अस्पृश्याची नुसती छाया पडली तर तुझा धर्म बाटतो तेव्हा तू खराखुरा धमत्राता क्षत्रिय आहेस यात काही संशय नाही ! मी तुझ्याबरोबर येत नाही या माझ्या मसकुनी बहिणीबरोबरच मी राहणार. डावाच्या स्त्रियाचे जे सुखदु:ख, तेच आपलेही सुखदु:ख, हिंदुत्वावर संकट आले असता डोंब, महार, मांग, ब्राह्मण हे डोंब, महार, मांग नसून केवळ हिंदूच आहेत असे मानणारे व आचरणारे आरमें ब्राह्मणात निघतात हे सिद्ध करण्यास मी या मसकुनी बरोबरच रहाणार तू जा ?'

लक्ष्मी हे म्हणत होती तोंच नायर क्षत्रिय निघूनही गेला होता थोडा वेळ त्या स्त्रिया आणखी पुढे गेल्या त्यास दुरून काही ओरड ऐकू आल्यासारखी झाली. त्या तिघींही भ्याल्या आश्रयार्थ एका वडाच्या झाडाखाली करवदीच्या जाळ्या होत्या त्याच्यामागे काही वेळ छपून काढावा म्हणून तिथे गेल्या तो त्यास सुमति व स्थूलेश्वर शास्त्री याच्या दोन स्त्रिया दडलेल्या भेटल्या ! कोण तो दु:खावेग ! कोण ती भीति ! मागे काय झाले ते सागण्याची कोण ती आतुरता ! त्या सर्व मनोविकाराच्या वेंचीतून अखेर एकच प्रश्न सुमतीच्या मुखातून निसटू शकला, 'तुला माझे बाबा मागे भेटले का ?' एकच अुत्तर लक्ष्मी दबू शकली, 'त्यांनीच माझा जीव व धर्म वाचविला. पण त्या युद्धात शत्रूने त्याचा पायचा पाय कुऱ्हाडीने तोडून काढला व त्याम बंदिवान करून नेले '

'अगबाई !' म्हणून अेकदम अुच किंकाळी सुमतीने फोडली 'हे मुली अुगी अुगी आता कोणी कोणासाठी रडावे !' म्हणून स्थूलेश्वराची पत्नी तिचे सांत्वन करू लागली. पण भीतीने तिचे रडणे आधीच बंद केले होते कारण ते तीन चार धिप्पे व तिचा भाऊ ओरड बसली तो अैकावयास दूर जाताना त्या स्त्रिया त्या झाडीमागे अगदी हू का चू न करता बसा म्हणून सागून गेले होते. ते आपल्या किंकाळीने संकटात पडतील की काय या भीतीने सुमति चूप बसली

आता सकाळचे दहा वाजले असावे रात्रभर वाट चालत, भीत, पळत दु:खाच्या वणव्यात जळत त्या सर्व स्त्रिया व पुरुषाचे जीव सुकून गेले होते, पाणी तोंडात एक थेंब देखील पडले नव्हते काल दहा वाजता याच वेळेस शांत व रमणीय कुटुंब गावात हरिहर अग्नीस आहुति देऊन अुठत होते. सुमति तोडलेल्या

फुलांची माळ करीत असता तिच्या भावाने येऊन तिचे डोळे गुपचूप झाकून धरले होते, लक्ष्मी तुळशीस प्रदक्षिणा घालीत होती, व मधून मधून पारिजातकावर बुलबुल बसत, त्यास हातच्या माळेने विनोदात उडवीत होती ते पुन्हा बसत होते ती मसकुनी तरुण कन्यका आपल्या ल्हान बहिणीस गाणे म्हणत होती, 'फणी घे फणी घे, वेणी घाल, वेणी घाल मालतीचे फूल घालीत सासऱ्यास चाल' आणि ती स्थूलेश्वर शास्त्री यांची मुलगी आपल्या माहेरी पहिल्या खेपेस आलेल्या प्रिय वहिणीच्या डोहाळे जेवणास 'काय करू ग काय करू ग, ताई ?' म्हणून तिला प्रेमाने चिडवीत होती! ती वृद्ध ममकुनी तिच्या लहानशा अंगणात भाजीपाल्यातून काही निवडीत मनात म्हणत होती 'ही भाजी माझ्या मुलीला आवडते, नाही! ती उद्या माहेरास येईल, ही उद्याच तोडीन!'

चाळीस तास झाले असतील नसतील — तो आज दहा वाजता त्या आज काय करीत आहेत! हे भयंकर — कल्पित नव्हे अद्भुत स्थित्यंतर! हे जाचे, हे अत्याचार व पीडा त्यास सहन कराव्या लागाव्या असे त्यांनी काय पाप, कोणाचा अपराध केला होता?

अेवढाच की ते हिंदुसमाजात जन्मास आले होते! व ते हिंदुच राहू अिच्छीत होते! व्यक्तिशः अितकाच, अेवढाच!

पण सामाजिकत केवढा! केवढा अपराध की स्वतःच हिंदुसमाज त्यांनी अितका असंघटित, असहयुक्त — वाळूच्या कणासारखा ठेवावा वाळूच्या कणासारखा नुसता अेक ढीग, अेक राशी, समाज नव्हे! केवळ पूर्वजांच्या पुण्याईच्या अवशिष्ट अंगाने कायता तगलेला! — परंतु अवशिष्ट पापाने प्रतिक्षणी भग्न पाहणारा — छिन्नभिन्न होअू पाहणारा!

आरड कसली आहे ते पाहण्यास गेलेले ते पुरुष परत आले ओरड शत्रूंचीच होती, कारण त्याच मार्गाने मोपल्यांची दुसरी अेक मोठी टोळी हिंदूंची मृगया करीत येत होती त्या संकटात ते पुरुष देखील आता काय होईल या भीतीने कापू लागले होते एका भयंकर संकटाशी तोंड देअून त्याचा पाडाव करण्यात त्यांची सर्व शक्ति खर्च झालेली होती त्यांची तोंडे पाण्याविना सुकलेली, स्नायू विश्रामाविना निथिल पडलेले मन अुत्साहाविना म्लान व धैर्य आशेविना गलित झाले होते तरीही तो ब्राह्मणकुमार व ते स्त्रिया जर अजून पायावर अुभे व हातात शस्त्र धरून असतील तर ते असे दामूच्या अदम्य प्रेरणेने व निश्चयाने होय 'शेवटपर्यंत लढावयाचे, धर्मासाठी मरावयाचे म्हणजे हिंदू म्हणवतात — निदान आपण तरी आपले कर्तव्य केले असे!' — असे काही अितरांस, काही स्वतःस ते तुटके बोलत्या सुमति आवेशाने पुढे झाली म्हणाली 'मला अेक सुरी द्या मी अेक तरी हिंदुद्वेषी मारून मरेन' दामूने अेक सुरी तिला दिली, व म्हटले, 'देवी! मी जिवंत आहे तावर आपल्या हातातील सुरी मी आहे मी पडल्यावर — पडल्यानंतर — ही!' ते तरुण तरुणीचे अपूर्व

साहस व अुत्साह पाहून ती मसकुनी जातीची अस्पृश्य पारगी मालती आवेशात येअून म्हणाली, 'मला पण अेक सुरी द्यावी हिंदुधर्मासाठी मी पण लढून मरेन ' दामूने दुसरी अेक सुरी तिला दिली—पण ती त्या सुरीला त्याचे हातून घेअीना ' खाली ठेवा मी अुचलून घेते मी मसकुनी जातीची आहे तुम्ही थिय्या मी तुम्हास गावात नेहमी पहात तुम्हास आवडेल न आवडेल आपणास माझा विटाळ होअील ! ' दामू हसला ' ब्राह्मणाशी बरोबरी करू अिच्छिणे असेल व ब्राह्मणानी आम्हास शिवावे म्हणून म्हणण्याचा अधिकार पाहिजे असेल तर महारानी प्रथमत डावास तो अधिकार दिला पाहिजे तू मसकुनी अस तू हिंदु आहेस मी हिंदु आहे माझ्या हातूनच ही सुरी घे मुसल्मानाचा विटाळ जर मला चालतो तर तुझा हिंदूचा चालणार नाही ? हिंदुधर्मासाठी मरण्याचा आवेश तुझ्यात अुत्पन्न झालेला—आता तू ब्राह्मणानाही पूज्य आहेस ! घे सुरी व जो पहिला धर्मशत्रु दिसल त्यावर — जर ती आततायी असल तर — कर हिचा वार ! ' मालतीने ती सुरी दामूचे हातातून घेतली दैवाची काय अिच्छा ती पाहात ते सव त्या झाडीचे आड लपले

थोड्याच वेळात मोठमोठ्याने ' दीन दीन ' ' अल्ला हो अक्बर ' अशा क्रूर आरोळ्या मारीत मुसल्मानाची दीडशे लोकाची टोळी अगदी जवळ आली त्या बडात भाजूबाजूच्या दहाबारा गावातील मोपले अेकत्र होअून अेक हिरव्या फडक्याची ध्वजा तुर्कीचा ध्वज म्हणून अुभारीत व हिंदूची लूटमार करीत चालू लागत जो मुसल्मान जितका निरुद्योगी वा बदमाष असेल तो तितका प्रखरतर धर्मवीर बने कारण धर्मयुद्धासारखा धदा दुसरा कोठेही मिळणे त्यास शक्य नव्हत ते राक्षस ओरडत ओरडत वाजून फिरत शोधीत जात कारण हिंदूच्या पळापळीत लोक जीव घेअून आजूबाजूस लपलेले अधिक सापडत ते आले दुर्दैवाने त्या जाळीकडे त्याच्यातील काहीचा रोख गेला ' काफर ' ' काफर ' म्हणून अेकच ध्वनि झाला जे पहिले दहापाच मोपले आले ते त्या तरुण थिय्याच्या व त्याच्या साहाय्यकाचे तरवारीने ठार झाले पण ती सगळ्या टोळीची धाड तिकडे वळली दामूपाशी सुऱ्या देखील अधिक नव्हत्या, नाही तर तो त्या स्त्रियानाही प्रत्येकीस अेकेक दता निराशा मूर्तिमत त्याच्यापुढे अुभी होती ती धाड त्यावर आली बायकात तरवारी पाहून अेकच किंकाळी अुठली कचाकच तरवारी चालू लागल्या तीन चार मुसलमान ठार होअून पडले अितक्यात हरिहराचा मुलगा जो शूरपणाने शत्रूस आपल्या हिंदु स्त्रियापासून दूर राखीत होता त्यावर तीन-चार तरवारी अेकदम पडून तुकडे तुकडे होअून त्याचा देह खर्ची पडला अेका काठीचा आघात बसून त्या म्हाताऱ्या मसकुनीचे डोके नारळासारखे ताडकन्

किरणानेही न पाहिलेली तिची प्रत्यंगे त्याला दिसू लागली अुत्कट कामाने तो अधीर होअून त्यास स्पर्श करू लागला

तोच 'तोबा! तोबा!' म्हणून त्याने किंकाळी फोडली पण अेकांतात ती कोणी अैकली नाही तो दिवा अुचलू लागला तो तो कोलमडून खाली पडला .

रात्र संपली सकाळ झाली गावात दुसरी अेक मोपल्याची टोळी येअून दंगा करू लागली अेटखानाच्या लोकांनी धावरून अेटखानास ही चिंताकारक वार्ता कळविण्यासाठी दार ठोठावले फोडले-तों पाहतात काय ?

अेटखान मेलेला पडला आहे व अेक भयंकर नाग आपली फणा सुमतीचे डोक्यावर छत्राप्रमाणे धरून डुलत आहे अेटखानाचे अंगावर सर्पाचे भयंकर दंश अितके झालेले आहेत की त्याचे रध्रारध्रातून विषाने दूषित झालेले रक्त स्रवत आहे

'नाग,!' 'नाग'! म्हणून जिकडे तिकडे बोंब झाली सुमति त्या दार ठोठावण्यापासूनच आपल्या कालनिद्रेतून थोडी थोडी दचकत होती, ती आता चांगली जागी झाली पाहते तो नाग तिच्या पायाला चुटुचुटू चाटीत आहे 'फणींद्र, माझा फणींद्र' म्हणून सुमतीने त्याचे अंगावरून हात फिरविला व तिचे ते गाणे, जे त्या नागास आवडत असे ते, अेकदम म्हणू लागली तिला प्रगाट झोपेतून अुठल्याने वाटले की आपण आपल्या फुलबागेतच नेहमीप्रमाणे सकाळी फणींद्राशी खेळत आहोत !

अितक्यात अेटखानास आणि त्याच्यापाशी पडलेल्या त्याच्या सुरीस पाहून आता तिची परिस्थिति तिला पूर्ण आठवल्यामुळे सुमतीने आपल्या रक्षणासाठी हा फणींद्र — हा साप — प्यायलेल्या दुधाचे अुपकार स्मरून पाळत ठेवीत माझ्यामागे आला व अतो जेव्हा मी अगदी निराधार स्थितीत होते तेंव्हा या दुष्ट अेटखानाच्या स्पर्शाने माझे कौमार्य भंग होण्याचे आधीच सूड घेअून अेटखानास त्याने दंश करून ठार मारले, खरोखर सर्पाचे रूपाने परमेश्वर माझा त्राता झाला द्रौपदीची लाज ज्याने राखली त्याने माझीही राखली, तो सर्वदा भक्ताची लाज अशीच राखतो, असा विचार विजेसारखा एकदम तिच्या मनात चमकून गेला !

'पण वेडे पोरी जरा थांब!' आपल्या न्यायाच्या कल्पनेला जुळतील तेव-ढ्याच घटना स्मरणात ठेवून परमेश्वर हा नेहमी न्यायाचा वाली असतो, अन्याय आणि अपाय यांचे रक्षण व लज्जारापन तो सर्वदा करताच करतो, या मानवी खुळचा पण सोयीस्कर समजुतीस अितक्यातच बळी पडू नकोस अशी परमेश्वर लज्जारक्षण करील न करील, या समजुतीपेक्षा त्या दुष्ट्या कमरेला राखलेल्या सुरीवर तू अधिक अवलंबून राहा वेळेवर ती तुझ्या समजुतीपेक्षा क्वचित् अधिक अुपयोगी पडेल ! कारण अेटखान मला — पण मोपले अजून जिवंत आहेत !

सुमतीचे मनात वरील विचार विजेसारखा येअून गेला नाही तोंच मोपले खोलीत घुसले होते तो नाग अेखाद्या बेफाम वीरासारखा त्यावर तुटून पडला.

दोन तीन मिनिटांत दोन तीन मोपल्यांस कडकडून चावून दोन तीन तलवारीचे आघाताने तो तुकडे तुकडे होऊन पडला. मोपले सुमतीस बिलगले. तिने सुरी अुपसली व अेका कोपऱ्याचा आश्रय घेऊन तिने या गडबडीत दोघा तिघा मोपल्यांची पोटें चिरून त्यांस भूमीवर ठार करून पाडिलें. आणि स्वतःचे पोटात ती सुरी खुपसावी म्हणून तिने हात पुढे केलाही — तो धरला गेला. तिने निराश धडपड केली की कसें तरी स्वतःस मारून घ्यावें; पण तिला मरू कोण देतो ? केवळ तेवढ्या-तल्या तेवढ्यात तिने अेका बिलगलेल्या मोपल्याच्या तलवारीवर डोके मारून घेतलें होते तेव्हा कपाळावर घाव लागून तें थोडें चिरले होते. त्या रक्ताचे ओघळ तिच्या तोंडावर वाहत होते. त्या ठार झालेल्या मोपल्याच्या पोटातील रक्ताचा चिखल त्या खोलीत झाला होता. त्यातच त्या सर्पाचे तुकडे तळपत होते. किंचित् वळवळत होते. जे पाच सहा मोपले आत घुसून सुमतीस धरून अुभे होते त्यांनी फुलासारखी तिला अुचलून, कवळून, तिची सुरी हातातून काढून घेऊन तिला त्या तशा परिस्थितीत, त्या रक्ताच्या चिखलातच खाली निजवली !

' फजल ? देखता क्या !' अेक मोपला सुमतीचे हात ताणून धरून पायाशी अुभे असणाऱ्या आपल्या जोडीदारास म्हणाला. ' अरे काल त्या झाडीतच हें पाखरूं आपल्या हाती पडावयाचें; पण अंटखानाने मध्येच घात केला. आता पाहतोस काय ? नाही तर त्या मौलवीच्या टोळीचे लोक अेकदा का अिथे आले की ह्या छबेलीचे हे पेढ्याहून गोड मुके मौलवीच्या ताटात जाअून पडतील, व आपण पुन्हा मिटक्या मारीत बसू !' असें म्हणत रक्ताचे ओघळ ज्यावरून वाहत आहेत अशा त्या सुमतीच्या गालाचे तो उन्मत्त मुके घेअू लागला. ' अरे यार मेरे वास्ते तो रख !' ' माझ्यासाठी ठेव.' असा अुच्छृंखल विनोद करीत ते पांच सहा पशु अत्यंत कामोद्दीप्त होअून त्या घायाळ कन्येला बिलगले.

(समाजाच्या सुव्यवस्थित अवस्थेत त्यांचे मनोविकार मर्यादित दाबात ठेवलेले असतात, म्हणूनच ते बहुधा असंतुष्ट असतात. ज्या राक्षसी प्रवृत्तीच्या माणसात हे मनोविकार अत्यंत असतात त्यांची असंतुष्टताही अुत्कटच असते. अशा मानवी मनुष्यास समाजावर जेव्हा अेखादा भयंकर विप्लव गुजरतो तेव्हा माजणाऱ्या अव्यवस्थेत आपले ते दुष्ट तामसी मनोविकार तृप्त करणें सहज सुलभ होतें व

घेतली ते तिच्याशी लडिवाळपणा करू लागतात अितक्यात 'हा! दूर व्हा!' म्हणून अधिकारी आज्ञा झाल्या तव्हा ते मोपले हिरमुसल्यासारखे होअून माग झाले व त्या टोळीचा मुख्य पुढारी म्हणाला, 'या छोकरीला अगदी त्रास न देता पण हिचे हात बांधून गजवरोवर घेऊन चला,' टोळे मिचकावीत ते मोपले सुमतीस बांधून पुढे घेअून चालले मार्गाला लागेपर्यंत सुमति साधारणत शुद्धीवरच नव्हती तिथे तिच्यापासून पुढेच तो दिव्या तरुण घावानी विव्हळ व विकल झालेला पाहून ज्याने बांधून चालविलेला होता तो मरावुनी मारलेली, रक्मी व स्पृहेश्वरशास्त्री यांच्या बायका वगैरे मोपल्यांना अुडविल्या त्रिया त्या गर्दीत ठार झाल्या हें तिला नाहीच कळेना थोडे पुढे जाताच अेक गाडी दिसली का त्या टोळीचा मुख्य म्हणाला, 'य छोकरीला या गाडीत बसवा ' सुमति त्या गाडीत अुचलून ठेवला गेली, तो मुख्यही त्या गाडीत बसला, आणि ती गाडी दामू विध्यास नेत जात होते त्याच्या अुलट दिशेने निघाली आता मात्र कठिणात कठीण, भयंकरात भयंकर म्हणून जे गणता येते निच्यावर गुजरण्यासारखे होते ते सुमतीवर गुजरले! आता मात्र ती अतरली! आता मात्र ती अेकटीच अुरली

तिचा धैर्यमद ढळला, ती धायधाय रडू लागली! 'दामू! दामू!' म्हणून तिने आजपर्यंत कोणासही चळवळून मारल्या नसतील अशा विव्हल पण वढ्या हाका मोठमोठ्याने मारल्या. पण गाडी वेगाने धावत चालली दामू दिसनासा झाला! त्या निराधार स्थितीत त्या पोरीच्या मनाम त्या वियोगाच्या होणाऱ्या दशाच्या वेदनाचे वर्णन काय करावे! खरोखर ती पाण्यातून काढलेल्या माशासारखी तळमळू, तडफडू लागली

आणि दामू? गेल दोन दिवस त्याच्या सर्व भावना, त्याचे विचार त्याचे विकार त्याच्या रक्तबिंदूतील प्रत्येक स्पंदन सुमतीविषयक होते आणि अतो तिच्या रक्षणास आपण अपूर्ण पडला आणि जिवंत अुरला! आणि ती आता दिसेनाशी झाली दामू — तो अठरा वर्षांचा कोवळा तरुण — तरुण पोर — तोही त्या पोरीसाठी धायधाय रडू लागला

सुमतीस त्या मुख्याने जरा दटावून, जरा दया दाखवून, विचारले, 'छोकरी रडशील ओरडशील तर आहेस त्याहूनही अधिक कष्टात पडशील कोणा माझ्या हुजऱ्याच्या पदरात टाकली जाशील पण तू अशी वेडी नाहीस मला माहीत आहे हें बघ, मी या टोळीचा मुख्य आहे या तालुक्याचा कलेक्टर आहे माझे नाव तू अैकले असशील' या खिलाफती राज्यात अली मुसेलियरच्या जोडीने माना अधिकार चालता खलिफाने मला कलेक्टरी दिल्याने कुट्टमचा मौलवीदेखील माझ्या हाताखाली आला आहे व तुझ्यावर माझे प्रेम व विश्वास बसला आहे म्हणून सांगतो माझे नाव खरच का नाही माहीत तुला? माझे नाव अैटखान आहे '

आपणच प्रश्न विचारीत व आपणच उत्तर देत तो मोपला अैटखान, ज्यास आपण त्या सभेत कालिकतला पाहिला होता, सुमतीचे मनोरंजन करीत होता ! पाण्यातून काढलेल्या त्या जाळ्यात तडफडणाऱ्या माशाचे, चांगला मासा हाती लागला म्हणून आनंदाने गाइले जाणारे कोळ्याचे गाणे जितके मनोरंजन करते तितके त्या मोपल्याचे बोलणेही सुमतीचे मनोरंजन करीत होते

गोपूर गाव लवकरच आले सुमतीस त्या अैटखानाने अेका सरजी ओयर-ऐल्या, माताच्या मारबलेल्या भिंतीच्या खालीत नअून व तिचेपुढे काही अन्न ठेवून, पण तिच्यावर सक्त पहारा बसवून म्हटले, 'मंत्रिणी ! तू शांत होईतो-पर्यंत माझ्या बाल्यात राहा शांत हो, तुला माझ्या गळ्याची शपथ आहे मी अुद्या यथीत्र ब्राह्मणास ठार मारून त्याच्या बगल्यातच ठाणे देणार आहे आजचा दिवस येथे काढ मी संध्याकाळी येईन' असे म्हणून तो मोपला निघून गेला सुमति अर्थातच तडफडत होती अन्न दूरच — पाण्याचा घोटसुद्धा तिने घेतला नाही 'बाबा ! दामू ! भाऊ !' असे म्हणत, आता पुढे काय करावे त्याच्या अशक्य योजना करीत व त्या अशक्य आहेत असे ध्यानात येताच ग्लान होत ती संध्या-काळपर्यंत चरफडत बसली

पण मनाच्या दुःखास दैवाने नैसर्गिक मर्यादा घालून दिलेली आहे आज दोन दिवसाच्या असह्य घटनांच्या माराने बधिर झालेले तिचे शरीर व मन जितके बधिर होत आले की अेकेक मज्जापिंड व अेकअेक रक्तपिंड निश्चेतन होत चालला अशी झोप म्हणा वा मूर्च्छा म्हणा — तिला आली व ती निश्चल होअून निर्वेदन होअून पडली

रात्री तो अैटखान पुन्हा वर आला तिला गाढ झोप लागली हे पाहून त्याला अेक प्रकारचा आनंद झाला कारण तिचे रडणे ओरडणे अैकून त्याचा रसभंग होणे असे तो आता होणार नव्हता त्याने तिला पोटभरून पाहून घेतले ती ब्राह्मण कुलातील, शुचिर्भूत सुंदर—माझ्यासारख्याच्या पिढ्यानपिढ्या पुण्य फळले तरी पदरी न पडणारी कनकलतिका आज माझ्या अगदी हातात आहे ! कितीतरी तिचा ओठ गोड असेल !' असे भावीत तो लपला त्याने तिचे मनसोक्त मुके घेतले 'बरे झाले अशी गाढ झोपत आहे तेच ! नाहीतर कोण त्यावेळी धरती !' असे हसून त्याने तिच्या शेजारी आपला देह पसरला तिला अुराशी घट्ट घेतले या अल्ला ! तू माझ्या धर्मवीरत्वाचे श्रेय दिलेस ! अल्ला ही परी मला दिलीस निःसंशय कुराण ईश्वरप्रणीत आहे त्यातील वचने सत्य आहेत अिमानदारास परी मिळेल हे वचन अल्ला ! तू सत्य केलेस ! किती मृदुल देह !' असे तो अिमानदार मोपला भावीत भावीत कामोन्मत्त झाला त्याने सुमतीला पुन्हा अितके छातीशी रगडून धरले की चिखलात रुतलेल्या कमलिनीसारखी ती दिसेनाशी झाली रात्रभर अशी रहा—गोड पोरी जागी होअूच नकोस! असे म्हणून तो तिच्या पदरास सारू लागला सूर्याच्या

हिंदूसच नव्हे तर सर्व शिया मुसल्मानांना काफर व दांभिक म्हणून नामशेष करून ऐक सुन्नी मुसल्मान तेवढा अस्तित्वात ठेवणे अशी नवीन व्याख्या केली. कुट्टम गावाचा अधिकार त्या रात्री त्याचे हाती येताच त्याला सुमति गापूर गावचे मार्गाने पळाल्याची बातमी लागली. तव्हा अैटखानाविषयी त्याच्या मनात धुमसत असलेल्या द्वेषाग्नीत निमरी व अत्यंत ज्वालाग्राही अशा मत्सराच्या दारूची आहुति पडून त्याने अैटखानाचा सत्यानाश करण्याची सिद्धता केली. त्याच्या अधिकाराशी स्पर्धा करणारा, शिया असून खिलाफत राज्यात अधिकारी होऊ अिच्छिणाऱ्या काफरास शिया पक्षाचे मुसलमान बलात्काराने करून खिलाफतीचे शत्रु वाढविणारा, व सर्वांत अक्षम्य अपराध म्हणजे सुमतीस आपल्या तावडीतून निसटून जात असता स्वतःच मध्ये गडप करण्याचा घाट करण्यास न चुकणारा हा अैटखान व त्याचे अनुयायी याचा नाश करण्यास कुट्टम गावाहून निघून मौलवींची टोळी गापूरपर्यंत ऐकाअेकी येअून आदळली. अैटखानास त्या सुमतीच्या प्रामाणिक गपांनी ठार करून टाकल्याने मौलवीला फारसा अडथळा न होता तो मारीत कापीत वाट काढीत मुख्य ठाण्यात म्हणजे अैटखानाने सुमतीस ज्या खोलीत ठेवले होते तिथे येअून पोचला. तो आल्याची बातमी येताच त अैटखानाच्या टोळीतील पाजी व अितर नराधम सुमतीच्या प्रेतास त्या अधम भित्रेपणाने तसेच टाकून पळून गेले, देवपूजेच्या फुलमाळेसारख्या पवित्र, सुकुमार व दवाह् अशा त्या सुंदर कन्येचा तो देह त्या बीभत्स व अनिवार अत्याचारास बळी पडलेला पाहून मौलवीसही त्या पापी मोपल्याचा तिटकारा आला! मानवी स्वभावाचे निरीक्षण करणारास ही गोष्ट माहीत आहे की, मनुष्य स्वतः अनेक वेळा जे पाप सहज करतो ते दुसऱ्याने केलेले पाहिले किंवा अैकिले म्हणजे तो त्या कृत्याचा मनापासून घोर निषेध करण्यास सहजच प्रवृत्त होतो! त्यातही फजल अित्यादि मोपल्यांच्या त्या बलात्कारास अितर सर्व बलात्काराहून घोरतम ठरणारी जी मुख्य गोष्ट होती, ती ही की तो बलात्कार

रात्र झाली अंधेर पडला. ज्या विहिरीत शेकडो हिंदूस थगल व मौलवी यांनी कत्तल करून फरफटत फेकलेले होते ती विहीर त्या अंधाराच्या वासलेल्या तोंडासारखी आ करून आकाशाकडे बघत होती अंधार वाढत गेला मध्यरात्र झाली तोंड वासून कोणी कोणी झोपी जातात तसा त्या विहिरीचा जबडा अुघडून-अंधकार गाढ झोपी गेल्यासारखा घोरू लागला त्याच्या पोटातील भयंकर पचन क्रिया चालूच होती त्या विहिरीतील अर्धजीवित वा आसन्नमरण हिंदूंचे कण्हणे व किंकाळ्या मधून मधून, अंधाराच्या पोटातील गुरगुरण्यासारख्या अंकू येत होत्या

ती विहीर, तीत ढकललेल्या प्रेतांनी, धडांनी, धडविरहित शिरांनी, तुटलेल्या हाताच्या तुकड्यांनी, मासाच्या कातडे सोलून कापलेल्या गोळ्यांनी काठोकाठ भरलेली होती काही झाडे त्या जुनाट विहिरीचे भिंतीतूनच फुटलेली होती—तीही तिच्यामध्ये या वरतून फेकल्या जाणाऱ्या हिंदूंच्या रक्त, मांस, नसा, देह यांच्या ढिगाचे ढिगाच्या भाराखाली बहुतेक दडपून मोडून गेली होती जी काही दडपली नव्हती त्याच्यातील अेका झुडपाची अेक खादी तिरपी होअून अुभी होती तिच्या आधारावर अेक घायाळ हिंदु विहिरीत ढकलला गेला असता अध्यांच खोलीत टांगून पडला होता त्याच्या खालीच अेक आसन्नमृत्यु हिंदु वायु होअून वरळत होता त्याला वाटले की श्रीरंगाचे मंदिर कोसळून त्याचा दगड त्याचे अुरावर पडला आहे. तो विव्हळत होता, 'अरे हा दगड अुचला माझी छाती दडपून गेली हा दगड अुचला!' थोड्याच वेळात त्या दगडाचे भाराखाली त्याची कल्पना, घुस्न मरून गेली ताही निश्चेष्ट होअून गतप्राण झाला दुसऱ्या कुठून तरी त्या ढिगाचे आतून 'भाअू! तू काठे आहेस! हात दे! मला भय वाटते' म्हणून अेक कोमल आवाज येत होता, त्या अटकलेल्या अर्धशुद्ध घायाळास अितके देखील वाटले की, तो कोण्या तरी बहिणीचा स्वर असावा मरताना तिला तिच्या भावाचे काय झाले असावे अशी चिंता अुत्पन्न होअून ती विव्हळत असावी—किंवा जेव्हा ती हिंदुधर्म सोडीत नाही म्हणून मोपल्यांनी कापाकाप चालविली तेव्हा तिच्याचबरोबर तिचा भाअूही त्याच कापाकापीत कापला जाअून त्या विहिरीत टोकटी जेव्हा सगळ्याजणास

स्थितीत असल्याने त्याम या वेदनाचे फारसे भान नव्हते, पण त्या आहताच्या व प्रेताच्या ढिगातून प्राण जाताना कोणीसे अेकदम पाय अितके जोराने झाडले की त्याचे अंगावर पडलेले मास, प्रेत, नसा, याचे थर भेदून जाअून त्याच्या त्या लाथा ताडताड त्या घायाळ तरुणाच्या नाकावर बसल्याने तो अेकदम तडफडून शुद्धीवर आला ती भयकर शुद्धि ! मृत्यूच्या बेशुद्धीहूनही अधिक भयकर ! अंधारात, मध्यरात्री, त्या जुनाट विहिरीचे पोटात अध्र्याचि खोलीवर, प्रेते, मास, नसा, रक्त, वण्हा, किवाळच्या, भीषणस्मृति, भीषणविस्मृति यानी लडबडलेला तो तरुण शुद्धीवर आला व त्याच्या अंगावर व डोक्यावर लागलेल्या घावाच्या असह्य तिडिका अुठल्याने मोठ्याने आरडला त्याच्या त्या ओरडण्याने भेदरून आणखी कोणी अर्धमृत किंकाळू-धडपडू लागला

मलबारमध्ये ह्या विहिरीसारखी त्या रात्री ही अेकच विहीर अशी आ करून वण्हत नव्हती मलबारमधल्या मध्यान्ह रात्रीचा तो अंधार हे या विहिरीचे अेकच भयानक भेवाड वासून झोपी गेलेला नव्हता, तर अशी दहा रौद्र विहिरीची दहा बीभत्स भयकर भेवाडे वासून अेखाद्या रावणासारखा घोरत पडलेला होता.

त्याच वेळेस, त्याच रात्री कानपूरचे जवळ अेका भव्य बंगल्यात 'प्रेमवर्धक महामंडळाची ' सभा भरली होती खुदाबक्ष, वडकखान अित्यादि प्रख्यात मुसलमान पुढारी व भाळवद, गयाळशेट, पीटगव्या अित्यादि हिंदु पुढारी त्या महासभेचे महत्त्वाचे कार्याकरिता भरविलेल्या या विशिष्ट अधिवेशनास आलेले होते वडकखान यानी अुठून सांगितले की आपल्या प्रेमवर्धक महामंडळाच्या अथक श्रमाने अुत्पन्न केलेली हिंदुमुसलमानामधील अेकी ज्या देशशत्रूस पाहावत नाही त्यानी मलबारच्या—हिंदुमुसलमानामध्ये दंगे झाल्याच्या खोट्या बातम्या छापण्याचा सपाटा चालविला आहे, त्याचा ही सभा निषेध करीत आहे सभेने स्वत ह्या प्रकरणाची चौकशी करण्याकरिता खुदाबक्ष यास मलबारात धाडले होते त्यानी प्रत्यक्ष सर्व स्थिति पाहून जे प्रतिवेदन (रिपोर्ट) केले आहे, त्यावरून ही सभा सर्व हिंदुस्थानचे वतीने असा ठराव करीत आहे, की मलबारमध्ये हिंदु-मुसल-

तेव्हा अध्यक्ष माळचंद उठून म्हणाले, ' क्षमा करावी ! बडकखान त्या तुमच्या त्या शूर बधूचे–त्या मापल्या वीराचे – व त्याच्या धैर्याचे ही सभा अभिनंदन करीत आहे मापले आम्हा हिंदूचे भाऊ आहेत '

' हिंदु मुसल्मान भाऊ आहेत ' सर्व सभा गर्जली

' हिंदु मुसल्मानच आहेत ' मुंडागा, बावळेशास्त्री उत्साहाने ओरडू लागले

' आणि हिंदु जरी मुसल्मान नसतील तरी मोपले त्याना मुसल्मानच कर-तील, जिवंतपणी करितील, ठार मारीत करितील, ठार मेल्यावर करितील' तुमड्या आवाजात अेक गृहस्थ उठून म्हणाला तव्हा बावळे, गबाळे, मोळचंद अित्यादि हिंदु पुढारी ओरडून अेकच गडबड करीत म्हणाले, ' खाली बाल्तोस ! खाली बैस ! तू कोण ! पुरावा काय ! देशभक्त आहेस तू ?'

' हा देशशत्रू आहे हिंदु मुसल्मानाची अेकी हा विघटविती ' सर्व सभा ओरडली पण त्यास न भिता तो गृहस्थ म्हणाला, ' शांत व्हा, मी म्हणतो ते अक्षरश खर आहे मी अेक हिंदु होतो माझा पुरावा प्रत्यक्ष ! प्रत्यक्ष मला मोपल्यानी भयंकर छळ करून व बलात्कारान मुता करन मुसल्मान केल आहे आणि माझ्याहून स्पष्ट अधिक भयंकर बलात्कार कितीकावर गुजरले आहेत '

' पण तू आता मुसल्मान आहेस ना ? मग तू मुसल्मानाचे विरुद्ध कस बाल्तोस ? मौल्वी करिमुद्दीन विचारते झाले

' मी हिंदु होतो ! मोपल्यानी बलात्काराने मला मुसल्मान केले पण मला माझ्या अिच्छेनुरूप आर्यसमाजाने संस्काराने शुद्ध करून घेतले मी हिंदूचा हिंदुच आहे '

' या अल्ला ! तर मग हा काफर मरणास योग्य आहे ' चिडून जाऊन भयं-कर गर्जना करीत बडकखान म्हणाला, ' मुसल्मानाच्या शरियतप्रमाणे जो मनुष्य मुसल्मानानी त्याला मुसल्मान म्हटल्यानतर पुन हिंदु होअील तो मरणाच्या दडास पात्र होतो हा काफर आहे याला ठार मारल पाहिजे ' अस म्हणत बडक-खान त्या गृहस्थावर तुटून पडले

तेव्हा अध्यक्ष माळचंद मध्ये पडून म्हणाले, ' खानसाहेब ! खानसाहेब, क्षमा करावी अपराध या गृहस्थाचा आहे ज्या अर्थी हा त्या भाडखोर आर्यसमा-जाचा अनुयायी आहे त्याअर्थी त्याच बोलण अग्राह्य व बातमी अविश्वासार्ह आहे हें उघड आहे '

' आर्यसमाज मोठी भाडखोर संस्था आहे हा आर्यसमाजी आहे म्हणून याची साक्ष विचारात घेता येत नाही ' सभा अेकमुखाने गर्जली

' परंतु मल्बारमधील हिंदूचा भयंकर छळ चालतेला आहे व त्याच्या कत्तली उडत आहेत हे मी आर्यसमाजीय म्हणत नसून श्रीयुत देवधर देखील तसच म्हणत आहेत हें पहा त्याचं पत्र !'

' श्रीयुत देवधर मवाळ आहेत ' सभा गर्जली

' श्रीयुत देवधर मवाळ आहेत म्हणून आम्हा असहकारी देशभक्तास त्याचे म्हणणे अग्राह्य वाटत आहे ' भोळचदानी निर्णय दिला

' तथापिही मलबारमधील मापल्यानी केलेल्या हिंदूच्या छळाची कहाणी तुम्हास सत्यच वाटली पाहिजे ! कारण देवधरच नव्हे तर डॉ मुजेही ती सत्य आहे म्हणून साक्ष देण्यास सिद्ध आहेत '

' डॉ मुजे जहाल आहेत म्हणून त्याची साक्ष अग्राह्य आहे ! ' सभा गर्जली

' डॉ मुजे जहाल आहेत म्हणून आम्हा अनत्याचारी देशभक्तापुढे त्याचा साक्षीपुरावा होऊ शकत नाही ' अध्यक्ष भोळचद यानी निर्णय केला

' परतु ज्या ज्या हिंदूवर हे भयकर प्रसग कोसळले त्याच्या स्वत च्या हस्ताक्षरात त्यानी ती कहाणी लिहून माझ्या मित्राच्या स्वाधीन केल्याची तारही आताच माझे हाती पडली आहे कुट्टम येथे कालपरवाच भयकर दगा होऊन मुसलमानानी हिंदूची मृगया चालविली आहे, म्हणून आताच आलेली ही दुसरी तार तरी थोडीशी वाचून पाहवी '

' अरे तारा काय ? काल्पनिक दग्याच्या अशा तारा मजकडे रोज शेकडो येताहेत पण मलबारच्या हिंदूच्या ह्या तारा मी सर्व ह्या वर्ष आपल्या सुर्चावर रचून त्याची अेक मऊ गादी करून तीवर बसलो आहे त्यातून आलेली तार खरी कशी असेल ? ' भोळचद शातपणे पण निर्धाराने म्हणाले, ' तारावर मी विश्वसत नाही '

' आताच मला कोचीनच्या खिलाफतमडळाच्या अध्यक्षाची ही तार आलेली आहे ' खुदाबक्ष तडजोडीच्या स्वरात म्हणाले, ' या तारेने सव प्रश्नाचा निकाल लागतो खिलाफत सेक्रेटरी, कोचीन लिहितात की, ' मलबारमध्ये मुसलमानानी हिंदूवर बलात्कार केल्याच्या व हिंदूस मुसलमानी धर्माची दीक्षा बळान दिल्याच्या ज्या बातम्या प्रसिद्ध होत आहेत त्या अगदी निराधार आहेत प्रत्यक्ष चौकशी करून पाहता असे कळते की, अेक किंवा फार तर दीड हिंदु कुठेसा बलात्काराने मुसलमान

तेव्हा मूळ ठरावात मोपल्याच्या शौर्याचे अभिनंदन करावे म्हणून खुदाबक्ष यांनी उपसूचना आणिली. उपसूचनेविषयी बोलताना मोपले हे किती दयाळू, सहनशील व दीन लोक आहेत व त्यांचा हिंदुबंधूवर अत्याचार होणे कसे स्वभावतः अशक्य आहे याचे रसभरित वर्णन जेव्हा ते करीत होते—

त्यावेळेस तिकडे—

त्या भयंकर अंधारात आपला भीषण जबडा वासून निजलेल्या त्या विहिरीचे पोटात हाडे, रक्त, मांस, प्रेते, कापलेले अवयव, छाटलेली शिरं, तांगलेले पाय, कण्हे हे सब अन्न पचविले जात होते व त्या अन्नाच्या चावलेल्या, पिसाळलेल्या, दळलेल्या लगद्यात अेखाद्या रत्नासारखा तो हिंदु तरुण—तो लटकलेला घायाळ होऊन पडलेला होता. त्याच्या खालच्या मरणाऱ्याच्या लाथा लागून व पोळण फुटून तो शुद्धीवर आल्यानंतर अेकदम ज्या वेळेस तो बेशुद्ध झाला त्या वेळची शेवटची स्मृति पहिली आठवण म्हणून त्याचे डक्यात उभी राहिली. त्यास वाटले, 'हिंदु धर्म सोडतोस की नाही? मुसलमान होतोस की मरतोस?' असे मोपले त्यास मारमारीत विचारीत आहेत त्या भासासरशी, 'होत नाही जा, सोडत नाही जा! हिंदु मी हिंदु! मारा किती मारता ते' असे झटपट तो ओरडून गेला. पण थोड्याच वेळात तो कुठे आहे हे त्यास कळू लागले, त्याबरोबर त्याचे निसर्गदत्त धैर्य परत उदय पावू लागले. त्याचेवर कमरेपासून कापलेला जो कोणा हिंदूचा पाय लटकत होता व ज्याचे रक्ताची धार त्याचे तोंडावर गळत होती तो हिसडून खाली टाकला. पण तो ओढताना मी कोणातरी हिंदु हुतात्म्याच्या देहाची विटंबना तर करीत नाही म्हणून सकाच त्यास टोचीतच होता. तो सकाच तसाच दाबून त्याने त्या वरच्या गुडघास हात घालून विहिरीवर येण्याचा प्रयत्न केला पण ते झुडूप तुटले. तो धाडकन खाली कोसळला. त्यासरशी विहिरीच्या दुसऱ्या बाजूस तिरपा चढलेला

त्या शिर छाटलेल्या हिंदु हुतात्म्याच्या कमरेवर व खाद्यावर पाय ठेवून तू शिर असलेला मनुष्य वाचण्यासाठी अेवढी धडपड जी करितो आहेस त्याची तुला लाज नाही वाटत ?

पण शिर छाटलेल्या हुतात्म्याच्या खांद्यावर चढवूनच शिर असलेले राष्ट्र खोल गर्तेतून वर येत असते! शिर असलेल्यांनी खोल गर्तेतून, मरणाच्या अंधकारातून पुनरुज्जीवनाच्या अुदयाचलावर चढावे म्हणूनच शिर छाटलेले हौतात्म्य आपल्या प्रेताचे ढीग रचीत असते.

म्हणून लाजू नकोस ! हे हुतात्मा हिंदु तरुणा ! लाजू नकोस, चढ त्या ढिगावर, धर त्या झुडपाला, अुचल ते तुझे हात आणि त्या विहिरीच्या काठास धरून अेका अुमळीसरशी ये त्या मृत्युमुखातून बाहेर. त्या मरणाच्या पोटासारख्या भयंकर विहिरीतही तू पचला नाहीस, मळमळून मरणाने तुला ओकून टाकिले. पायाखाली केवळ हिंदु म्हणून मारल्या गेलेल्या वीराचे मांस, रक्त, नसा, कण्ह, केस मज्जा व जीव याच्या लगद्याच्या ढिगावर तो हिंदु तरुण चढून त्या मृत्यूच्या पोटा-बाहेर येण्याची धडपड करीत असता—

तिकडे त्या सभेत खुदाबक्ष मोपल्याच्या दीन व सुशील स्वभावाचे वर्णन करून म्हणत होते की, 'असे लोक हिंदूवर भयंकर अत्याचार व धार्मिक बलात्कार करतील हे हिंदुबंधूस शक्य तरी कसे वाटते. हिंदुबंधूंनी ध्यानात धरावे की मोपले मुसलमान आहेत. बस. त्या अेकाच शब्दाने या सगळ्या आक्षेपाचे निरसन होत आहे. मुसलमान धर्मबळाने दुसऱ्याच्या धर्मास हानि पोचविण्याच्या अगदी विरुद्ध आहेत '

पडली ती पुनः हलेना, दामूने त्या कन्यकेस घट्ट घेतले, गुरखे आल्याचे वृत्त तेवढ तिच्या तोंडून तुटक ऐकले 'भिऊ नका ! लक्ष्मीबाई ! आता हिंदूंचा दिवस उगवत आहे, भिऊ नका ! ' असे तो तिला कुरवाळीत म्हणाला. कुरवाळणे ! संकटाच्या आघाताने पिचलेल्या तिच्या हृदयास इतक्या भयंकर संकटानंतर कुरवाळणाऱ्या ममत्वाचा तो स्पर्श — ते प्रेमळ कुरवाळणे सहन झाले नाही. वेडी ती स्त्रियांची जात ! तिने आपले तोंड वर केले ' दामू ! माझ्या दामू माझा —' ती लाजली. पण शब्द सोडलेली वाक्ये जाणण्याचा प्रेमाचा पुरातन अभ्यास आहे. दामूने तिची हनुवटी वर केली 'लक्ष्मीबाई भिऊ नका, मी तुमचाच आहे.' असे म्हणत त्या हिंदु वीर युवकाने त्या हिंदु कन्यकेचा मुका घेतला.

— आणि त्या मुक्याबरोबरच तिचे जीवनही चोखून टाकिले ! दुःखाच्या भयंकर आघाताखाली तुटत आलेली पण न तुटलेली जीवनाची फादी त्या सुखाच्या आघाताने तुटली व लक्ष्मी तीवरून कोसळली. त्या वीर युवकाच्या प्रेमळ व परम विश्वस्त हृदयावर निर्भयपणे लक्ष्मी निजली — ती पुनः काही जागी झाली नाही.

तिने प्रेमभराने होऊन दिलेला तो पहिलाच प्रीतीचा मुका — हाय हाय ! त्या सुंदर कन्येचा शेवटचाच मुका झाला ! त्या मुक्याच्या सुखाची वीज थरथर तिच्या हृदयात शिरली व तेथील रक्तात विझून गेली.

तरीही ती तशीच निजलेली होती. तो अत्यंत थकलेला, घायाळ थिय्या कुठे मला निर्भयतेने हिंदु जगू शकावा अशी व्यवस्था गुरख्यांचे सेनेने केली आहे ऐकल्याने, व त्या निजलेल्या मुलीस निजलेलीच समजून तिची झोपमोड होऊ नये म्हणून तसाच झाडास टेकून बसल्याने, थोड्याच काळात डोहात पाय निसटून

'हे हरामी! अे काफर!' असे म्हणत मुसलमानी सभासदांनी त्या हिं गृहस्थाचे डोक्यात काठ्या घातल्या अध्यक्ष भोळचंद भिअून गेले सभा मोडेल व कार्य या भयाने त्यांनी त्या आर्यसमाजिस्टास सभेतून धक्के मारून बाहेर घाल म्हणून सांगितले. तेव्हा धक्के मारून बाहेर घालविला जात असता तो आर्यसमाज मागे वळून म्हणाला, 'हे हिंदूनो! तुम्ही तरी मला धक्के मारू नका तुम्हं अनत्याचारवादी आहात ना?'

'चूप बैस! गाटव कुठला!' श्रीयुत झन्मार घोप संतापून म्हणाले. "आमं अनत्याचारित्व केवळ परकीयाविषयी आहे स्वकीयाविरुद्धही आम्ही बळाचा अुपयोग करणार नाही, असा का अनत्याचारवादाचा अर्थ होता? गाटव कुठला!'

तो आर्यसमाजी बाहेर घालविला जाताच सभेत शांतता स्थापित झाली स्वत भोळचंदांनी ठराव मांडून अेकमताने मान्य करून घेतला की, मुसलमानी धर्माचा प्रसार हा बलात्काराने कधीच झालेला नाही त्यातही मलबारमध्ये तर नाहीच नाही मोपले हे शूर वीर व आमचे हिंदूचे सख्खे भाअू आहेत, त्यांनी हिंदु लोकांवर कोणत्याही प्रकारचा धार्मिक छळ केला नाही, अुलट अनेक हिंदूस मोपल्यांनी आश्रय देअून अुम्या हिंदु जनतेस अुपकृत केले आहे. ज्या लोकांनी धार्मिक बलात्कार हिंदूवर झाले म्हणून वावड्या अुठविल्या ते सर्व देशशत्रु आहेत अेक किंवा फार तर दोन हिंदु फक्त बळाने मुसलमान करण्यात आला म्हणून समज

ओीश्वरी पुस्तकें?" संन्यासी म्हणाला 'जातीवर गुदरलेल्या भयंकर संकटां तील अर्धी अधिक संकटं या ओीश्वरी पुस्तकांवरील मनुष्यांना येलेल्या संतानी टीका-पायी गुदरलेल्या आहेत. जर मनुष्य मनुष्यजातीस जें जें प्रत्यक्ष अुपकारक आहे असेंच तेंच आचरण करील व जें जें राक्षसी व अहितकारक प्रत्यक्ष दिसत आहे तें तें केवळ अमक्या पुस्तकांत तें सांगितलें आहे म्हणूनच करीत असल्याचें सोडून देओील तर मनुष्य मनुष्यावर केवढा अुपकार करील? ओीश्वरी पुस्तकांचे नावानें जितके अनर्थ कोसळले आहेत की त्यापेक्षां मनुष्यकृत पुस्तकेंच अधिक आदरणीय व नैतिक होत असें स्पष्ट म्हणण्याची पाळी आहे! परंतु ही स्थिति केव्हा येओील तेव्हां येवो! तोपर्यंत अत्याचार व बलात्कार यांचीं नांगीं जें ठेचीत करतात तें धर्मवीरत्व मनुष्यमात्रास सर्वोदितच वंदनीय असणार! ही विहीर पहा. लहान लहान मुली, कोवळे तरुण अेकामागून अेक मारेकऱ्यापुढे आणण्यांत आले. त्यांस विचारलें गेलें, 'मुसलमान होतोस की मरतोस?' मुलींनी आपली आओी आपला बाप पाहात बसेल म्हणून चिंता केला नाही. आओीनी आपल्या तान्हुल्याला संध्याकाळीं कोण पाजील म्हणून खेद केला नाही. कोवळ्या तरुणांनी काल्च जिनें हसत त्यांस भेटावयास बोलाविलें त्या प्रिय पोरीस अेकही आलिंगन देतां यणार नाही म्हणून तळमळ लागू दिली नाही. तिथल्यातिथें हजार आत्मांनी विणलेला आयुष्याचा पडदा ताडकन फाडून अेकदम त्यांनी मृत्यूस ताड दिलें व मरणाऱ्यांच्या रांगेत पाय टाकिला. अुभे राहिले व कचाकच तरवारी पडून त्यांचे तुकडे अुडाले! हा हुतात्मता हें धर्मवीरत्व धन्य आहे! अत्याचाराची धारही ज्या ढालीवर बोथट होते अशी ढाल—अशी ही हुतात्मतेची ढाल हे हिंदु जाति तुझ्या हातीं अजूनही आहे. तूं भिऊं नकोस.

अेक बाबा बंदा बहादूर मारिला गेला अेक संभाजी मारिला गेला ते थोर म्हणून त्यांच्या बलिदानास आम्ही त्यांचें नांव घेऊन वंदन करितो. परंतु हुतात्म-तेच्या पावित्र्यांत त्यांच्याहून कणभरही न्यून नसलेल्या—परंतु ज्यांचीं नांवें माहीत असणें अशक्य आहे अशा या शेकडो आबालवृद्ध आबालबालिका अब्राह्मण चांडाल हिंदु धर्मवीरांच्या अपूर्व बलिदानास आम्ही नुसती ही विहीर या नांवानेंच संबोधितो. हिंदुजातीच्या अवनत स्थितींतहि प्रकाशमान होणाऱ्या तिच्या दिव्य बलिदानशक्तीचें नांवही विहीर! ह्याच दिव्य बलिदानाचे शक्तीचे बळावर ही हिंदुजाति पुनरपि समर्थ सुंदर व सर्वप्रिय होओील अशी जी आशा मा हृदयात स्पंदन पावत आहे त्या आशेचें नांव ही विहीर.

संन्याशानें भक्तिरसानें त्या विहिरीस तीन प्रदक्षिणा घातल्या. त्याचे मागो-माग दामू व ते मुसलमानी वृद्धही तितक्याच भक्तीनें चालत होते. नंतर त्या तिघांनी त्या विहिरीस साष्टांग दंडवत घातले. बाहू अुभारून तो संन्यासी म्हणाला 'दामू, मी मेला तरी तूं तो भाग्याचा दिवस पाहावयास जिवंत राहशील तर तूं

'ओीश्वरी पुस्तकें?' संन्यासी म्हणाला, 'जातीवर गुदरलेल्या भयंकर संकटा-तील अर्धी अधिक संकटें या ओीश्वरी पुस्तकांवरील मनुष्यांनी केलेल्या सैतानी टीकां-पायीं गुदरलेली आहेत. जर मनुष्य मनुष्यजातीस जें जें प्रत्यक्ष अुपकारक आहे असें तेंच तेंच आचरण करील व जें जें राक्षसी व अहितकारक प्रत्यक्ष दिसत आहे तें ते केवळ अमक्या पुस्तकांत तें सांगितलें आहे म्हणूनच करीत असल्याचें सोडून देओील तर मनुष्य मनुष्यावर केवढा अुपकार करील ? ओीश्वरी पुस्तकांचे नांवाने जितके अनर्थ कोसळले आहेत की त्यापेक्षा मनुष्यकृत पुस्तकेंच अधिक आदरणीय व नैतिक होत असें स्पष्ट म्हणण्याची पाळी आहे ! परंतु ही स्थिति केव्हा येओील तेव्हा येवो ! तोंपर्यंत अत्याचार व बलात्कार यांची नांगी जे ढिली करते ते धर्मवीरत्व मनुष्यमात्रास सदोदितच वंदनीय असणार ! ही विहीर पहा, लहान लहान मुलीं, कोवळे तरुण अेकामागून अेक मारेकऱ्यांपुढे आणण्यात आले. त्यांस विचारलें गेलें, 'मुसलमान होतोस की मरतोस ?' मुलींनी आपली आअी आपली वाट पाहात बसेल. म्हणून चिंता केली नाही. आओींनी आपल्या तान्हुल्याला संध्याकाळी कोण पाजील म्हणून खेद केला नाही, कोवळ्या तरुणांनी कालच जिने हसत त्यास भेटावयास बोलाविलें त्या प्रिय पोरीस अेकही आलिंगन देता येणार नाही म्हणून तळमळ लागू दिली नाही. तियल्यातिये हजार आशांनी विणलेला आयुष्याचा पडदा ताडकन फाडून अेकदम त्यांनी मृत्यूस तोंड दिले व मरणाऱ्यांच्या रांगेत पाय टाकिला, अुभे राहिले व कचाकच तरवारी पडून त्यांचे तुकडे अुडाले ! ही हुतात्मता, हे धर्मवीरत्व धन्य आहे ! अत्याचाराची धारही ज्या ढालीवर बोथट होते अशी ढाल—अशी ही हुतात्मतेची ढाल, हे हिंदुजाति, तुझ्या हातीं अजूनही आहे. तू भिअू नकोस.'

हा माझा निरोप त्या दिवसाला दे की जेव्हा केव्हा हिंदुजाति पुन होती तशी व त्याहून आपल्या स्वातंत्र्याने, आपल्या सामर्थ्याने व आपल्या सौंदर्याने देवांना प्रिय अशी होईल तेव्हा या विहीरीस तिने विसरू नये. केव्हेळ चंद्रगुप्ताने वा शिवाजीने वा गोविंदाने वा भाऊने जिंकलेल्या रणांगणावर विजयस्तंभ अुभारण्याची विस्मृ झाली तरी क्षणभर चालेल, पण या विहिरीच्या रक्तांगणावर जयस्तंभ नसला त यशस्तंभ अुभारण्यास विसरता कामा नये. जातीच्या जीवनाचा आधार जयस्तंभापेक्ष तिच्या यशस्तंभाच्या दृढतेवरच अधिक अवलंबून असतो !'

'पण महाराज ? तो दिवस पाहण्याचे भाग्य ज्याच्या दैवी असेल ते त दिवस पाहोत, मी या विहिरीत पुन अुतरणार. माझ्या बरोबर जे धर्मयुद्धा झुजले व मारले गेले त्यांना सोडून, त्यांच्याच प्रेतावर अक्षरश पाय देऊन य विहिरीचेवर आपला जीव वचावण्यासाठी चढताना मजवर वीज कोसळून त्य माझ्या कृतघ्न स्वार्थासह मला भस्म का करून टाकली गेली नाही ! ज्या मार्गाने त्या भयंकर पापाचे शिखरावर चढविले त्याच मार्गाने अुतरून या विहिरीत मी होतो तिथे पुन जाअून पडणार व मरणाने माझ्यावर मिळविलेला विजय मी त्याचे

## ९. सर्वांना परत हिंदु केलें

ते गेले संन्यासी व दामोदर ह्यांनी गावागावातून व झोपडीझोपडीतून हिंडून मोपल्याच्या अत्याचाराने बाटलेल्या हिंदूस शुद्ध करून घेण्याचा धडाका चालविला. मोपल्याचे बंड जरी आता पार पाडून टाकले गेले होते, व त्याचे पुढारी ठार झाले होते, व त्याचे लोक दाती तृण धरून शरण आलेले होते, तरी त्यांनी बाटविलेल्या हिंदूस शुद्ध करण्यासाठी संन्यासी व दामोदर हे प्रयत्न करीत आहेत असे पाहून कित्येक वेळा मोपल्यातील काही व्यक्तींनी त्याची हत्या करण्याचा यत्न करण्यास कमी केले नाही.

अेक दिवस तिसरे प्रहरचे सुमारास अेका झोपडीचे दारापुढे झाडीत असता अेक तरुण कन्यका कोणचेसे गाणे सुस्वरात गुणगुणत होती. तो स्वर अैकताच त्या मार्गाने जाणारा अेक संन्यासी थबकला. त्या गाण्याच्या पालुपदात त्याला गोविंदाचे नाव अस्पष्ट अैकू आल्याने तो त्या मार्गास सोडून त्या झोपडीकडे हळू हळू सरकत जाअून अेका झाडाशी अुभा राहिला. ती तरुण पोर आपल्याच नादात पुन पुन्हा घोळीत अेक चरण म्हणत होती व झाडोत होती. होता होता तिचा स्वर अुंच होत असे मजूळ शब्द त्या संन्याशास स्पष्टपणे अैकू येअू लागले—गोविंदा। मुकुंदा। मन्मन घे तव छंदा॥

संन्यासी पुढे झाला. त्याला पाहताच ती पोर चपापली. संन्याशाने विचारले, 'मुली ! ही झोपडी कोणाची ?' 'अेका मोपल्याची आहे' 'आणि तू येथे कुठे आलीस ?' परंतु ह्या प्रश्नाबरोबर त्या मुलीचा चेहरा गोरामोरा होअून तिच्या डोळ्यातून टपटप आसवे पडू लागली. तथापि आशेची अुत्कंठाही तिच्या मुद्रेवर चमकू लागली.

मुसलमानी जाकीट चढलें; मनावर नाही. क्षमा करा. मी असें ऐकिलें आहे प
बाटलेले हिंदु पुन्हा शुद्ध होऊन हिंदुधर्मात-च समाजात परत येऊ शकतात म्हणू
-तें खरें का?'

संन्यासी म्हणाला, 'अगदी खरें! बलात्काराने वा मूर्खपणानें असो जो हि
बाटला जातो तो सर्व प्रायश्चित घेऊन परत हिंदु होऊ शकतो.'

'महाराज, पण मी अेक मसकुनी जातीची नीच योनीतील कन्या आहे
त्यातही बलात्काराने अेका मुसलमानाने मला येथे आपली बायको करून ठेवलेल
आहे. आणि मी अजून जिवंत आहे. अशा मलाही प्रायश्चित्त आहे?'

'अर्थात् आहे! तुझें चित्त ज्या क्षणी शुद्ध झालें त्याच क्षणी तें प्रायश्चित
घेतले गेले. तू जिवंत आहेस हें मी भाग्य समजतो. जो अुठेल तो जीव देअील तर
आपली हिंदुजाति आपण होऊनच नामशेष होअील. मोपल्यास बाटविण्याचीही
तसदी घ्यावी लागणार नाही. धर्मावरील आंतरिक भक्ति जर चलित झाली नसेल
तर सर्व क्षम्य आहे — नव्हे त्याची अपराधात गणनाच होत नाही. [ध्येयाच्या बंदरास
जाण्यासाठी जर वाऱ्यास पाठ द्यावी लागत असेल तर अशा स्थळी नावाड्याचें
कर्तव्य वाऱ्यास तोंड देणे नसून पाठ देणेंच होय.] तू हो म्हण की तू पुन्हा हिंदु

हिंदु जातीत तिच्या माहेरास परत जाण्याच्या वाटेवर ते अेक मापला जाकिटाचे फाटकच काय ते आडवे अुरलेले होत त्याच्या गुड्याच्या कड्या, ती बापरीं बोटे लवकर अुघडू शकेनात

पण तितका अुशीर देखील तिला सोसवेना तिने ज्या गुड्या निघेनात त्या ताड्ताड् तोडून टाकल्या — त जाकीट फेकून दिले, व पिजऱ्यातून सुटून भुर्रकन अुडून वृक्षाचा आश्रय करणाऱ्या पक्ष्याप्रमाणे ती कन्यका झटकन निसटन त्या सन्याशाच्या दीर्घ व दृढ बाहुपाशाचा आश्रय करती झाली •

सन्यासी मार्गास लागला त्या कन्यकेसह थोडे दूर जाताच त्याचे सवगडी त्यास येअून मिळाले

'हे काय ? मालती !' दामोदर आश्चर्यचकित होअून म्हणाला, 'तर मग भगवन् ! मला माहीत असलेले जितके हिंदु दुष्टानी भ्रष्ट केलेले होते तितके सर्व आज परत आपल्या हिंदुजातीस लाभले ही केवढी आनदाची गोष्ट !'

सन्यासी म्हणाला, 'आणि माझ्या माहितीतलेही ' सहा महिने झाले नसतील तो मोलवी कुर मला अुभा राहून गर्वगर्जना करीत म्हणाला होता की, 'आज हिंदु-धर्म ठार झाला या खिलाफती राज्यात हिंदु तितुका बाटवून मुसलमान केलेला आहे ' आज आम्हीही असे म्हणू शकतो की, 'मलबारात त्या तुझ्या खिलाफती राज्याचा मागमूसही अुरला नाही बाटविलेला सर्व हिंदु शुद्ध होअून पुन्हा परत आलेला आहे तुझे प्रयत्न विफल झाले '

'स्वामिन् ! शकाच्या व हूणाच्या तरवारीने आघात झाले ते जसे झालेच नाहीत असे भरून आले तसाच हाही आघात आपल्या कृपेने भरून आला !'

'हे ठीक झाले !' सन्यासी गंभीरपणे म्हणाला, 'झालेले आघात भरून येणे हे हिंदु जातीच्या जीवनशक्तीचा अभिनंदनीय विजय होय ह्यात शका नाही, पण आता आघात मुळी होअू देअू नयेत अशी क्रियाशक्ति त्या जीवनशक्तीतून अुत्पन्न झाली पाहिजे घाव भरून काढण्यापेक्षा यापुढे आपल्या हिंदुराष्ट्रावर व जातीवर घाव घालण्याची कोणाची छातीच होअू नये, कोणास संधि मिळू नये — असे सामर्थ्य, असे चैतन्य अुत्पन्न केले पाहिजे तो विजय या विजयाहून अधिक अभिनंदनीय होअील औरगजेबाचा पराभव करून मोगल पादशाही धुळीस मिळविली हा तर विजय आहेच, पण बाबराला किंवा महमद गझनवीला किंवा कासमला सिंधनदी

## अरबी संस्कृतीची पूर्वकालीन अुपयुक्तता

आजच्या प्रगमनशील परिस्थितीत अरब संस्कृति कितीही मागासलेली दिसली तरी हे विसरता कामा नये की, यापूर्वी अेकदा जगाच्या फार मोठ्या भागातील मरणासन्न समाजांत त्या संस्कृतीने नवचैतन्याचे वारे संचारविले होते. मानवी प्रगतीत अेका काळी नवतत्त्वे, नवधर्म, नवशिल्प यांची बहुमोल भर तिनेही टाकली होती. तिचा अुगम महमद पैगंबरांनी मुस्लिम धर्माची मुहूर्तमेढ हजार-बाराशे वर्षांपूर्वी जेव्हा रोविली तेव्हा झाला. ज्या दिवशी महमद पैगंबरांनी कुराण शरिफाचे पहिले 'आयत'–पहिला मंत्र–अुच्चारला आणि तरवार अगदी पहिल्यानेच अुपसली त्या दिवसापासून अेका शंभर-दीडशे वर्षांचे आत तिकडे स्पेन तो अिकडे सिंधूपर्यंत ज्या संस्कृतीतील अंतर्गूढ आत्मदान व शक्तीने अर्ध्या जगताचे रूप बदलून टाकले, जिच्या विजयाच्या अप्रतिहत वेगास स्पेनची सामुद्रधुनी, अिराणचा अग्नि, सिंधूची अटक, चीनची भिंत वा हिमालयाची शिखरे ही अडवू शकली नाहीत, जिने आपल्या धर्माची, भाषेची, लिपीची, शिल्पाची, शास्त्राची राजमुद्रा ठोकून खंडेच्या खंडे अंकित करून टाकली, त्या अरब संस्कृतीत तिच्याशी टक्कर देअू आलेल्या त्या काळच्या अनेक जीर्णशीर्ण संस्कृतींपेक्षा जे अेकंदरीत ह्या काळच्या जगतात नुसते जगण्यासच नव्हे तर ह्या जगास जिंकण्यासही समर्थतर आणि योग्यतर ठरेल असे काही तरी असामान्य श्रेष्ठत्व, काही तरी नवे जीवन-तत्त्व, होतेच होते हे निर्विवाद आहे.

अभ्युदयासरशी वाप्पविद्युत्रेडियोंना आपल्या लगामी आणून अुंच आकाशात चंद्रावर विमानाची स्वारी करू पहाणारी आणि सखोल महासागराच्या तळाशी वसलेल्या अरण्याचे अक्षालेख घेणारी, काळच्या हातात हात घालून धावणारी गतिशील संस्कृति ! त्याची टक्कर जुपताच ती अरबी — ती मुस्लिम संस्कृति — त्या युरोपियन संस्कृतीसमोर तशीच हतबुद्ध व हतवीर्य होअून गेली की, जशा अरबी संस्कृतीच्या पहिल्या आवेशासमोर, तिच्याहून टाकाअू असलेल्या त्या दहा पंधराशे वर्षांपूर्वीच्या जीर्णशीर्ण संस्कृति आणि सत्ता हतप्रभ व हतवीर्य होअून गेल्या !

## तरुण तुर्कांचे बंड

ही स्थिति पाहताच साऱ्या मुसलमानी राष्ट्रात जर कोणी पहिल्याने अपरिवर्तनीय मुस्लिम संस्कृतीच्या शृंखला तोडून युरोपियन राष्ट्राच्या वैज्ञानिक संस्कृतीचा अवलंब करण्याचे साहस केले असेल तर ते 'तरुण तुर्क' नावाच्या या शतकाचे आरंभी अुदय पावलेल्या संस्थेनेच होय अनवरपाशा, केमालपाशाप्रभृति या तरुण तुर्क संस्थेच्या पुढाऱ्याचे शिक्षण जर्मनी, फ्रान्स, अिंग्लंड अित्यादि देशांतच झालेले असल्यामुळे युरोपातील राष्ट्रवाद, राज्यघटना, शास्त्रे, शासन, यांत्रिक सैनिक सामाजिक क्रांति यांचा अवलंब केल्यावाचून आणि त्यांचे मार्गात आड येणाऱ्या जुन्यापुराण्या मावळेपणास सोडल्यावाचून तुर्कस्थानास स्वतंत्र आणि समर्थ राष्ट्र म्हणून जगणे अशक्य आहे ही गोष्ट त्यांच्या मनात पक्की ठिवली आणि तुर्कस्थानात आज अरबी संस्कृतीचे अुच्चाटण करण्याचा जो भगीरथ प्रयत्न चाललेला आहे तो त्याच तरुण तुर्कांच्या ह्या प्रगमनशील ब्रीदाचा आणि प्रतिज्ञेचा परिणाम आहे तुर्क राष्ट्राच्या अुत्कर्षास जी जी ज्या ज्या परिस्थितीत अवश्य असेल ती ती सुधारणा तत्काळ घडवून आणावयाची, मग तिला, अपरिवर्तनीय धर्मग्रंथात आधार सापडो वा न सापडो हा तरुण तुर्कांचा जो बाणा होता तो आज साऱ्या तुर्कस्थानचाच बाणा झाला आहे

तरीही हे ध्यानात ठेविले पाहिजे की आजच्या परिस्थितीशी टक्कर देण्यास अरबी संस्कृति असमर्थ आहे म्हणूनच काही तुर्क तिच्याविरुद्ध अितके खवळलेले नाहीत, तर त्या राष्ट्रात चाललेल्या या सामाजिक क्रांतीच्या मुळाशी दुसरेही अेक अैतिहासिक कारण आहे अरब संस्कृतीविरुद्ध अुभारलेल्या या तुर्की बंडास अरब संस्कृति ही माझी संस्कृति नव्हे असा तुर्कस्थानच्या राष्ट्रवादी पक्षात संचरलेला जात्यभिमानी आवेशही प्रोत्साहीत आहे केमालपाशा हा हजारो हिंदी मुसलमानास अजूनही 'धर्मद्रोही' 'गाझी' वाटतो ज्या तुर्कांचा खलिफा आणि सुल्तान म्हणजेच मुस्लिम धर्माचा आणि सत्तेचा जगद्गुरु आणि जगत्सम्राट् म्हणून शेकडा वर्षे ते अैकत आले आणि त्यास संरक्षिण्याची देवापाशी प्रार्थना करीत आले, त्या हिंदी मुसलमानास तेच तुर्क लोक त्याच मुस्लिम संस्कृतीस 'अरबी' म्हणून परकी

# केमालपाशाने केलेलें तुर्कस्थानातून अरबी संस्कृतीचें उच्चाटन

## (१)

१९१४ च्या जर्मन महायुद्धानंतर युरोपात आणि पूर्व आशियात जी अनेक नवीन राष्ट्रें अुदय पावली किंवा जी नावाने जुनीच राहिली तरी कात टाकलेल्या नागाप्रमाणे आपले जीर्ण वार्धक्य टाकून नवीन जीवनाने मुसमुसूं लागली त्यामध्ये पूर्व तुर्कस्थानचे राष्ट्र हेंही अेक गणले गेले पाहिजे. त्या राष्ट्राच्या अुदयाचा अितिहास अभ्यसनीय आहेच, पण त्यातही आपल्या हिंदुस्थानच्या संक्रमणावस्थेत, तरुण तुर्कांच्या नेतृत्वाखाली आणि कर्तृत्वाखाली पूर्व तुर्कस्थानात तुर्कांचे हे जे प्रबळ राष्ट्र प्रगतीच्या घोडदौडीत आज अकस्मात् पुढे सरसावले आहे त्याचा अितिहास आज हिंदी लोकांस विशेषच बोधप्रद होणारा आहे. त्यातल्या त्यात विशेषतः हिंदी मुसलमानांना तर या विषयाचे अत्यंत महत्त्व वाटले पाहिजे. कारण हिंदी मुसलमानांचा फार मोठा भाग अजूनही अरबी संस्कृति हाच स्वतःचा अपरिवर्तनीय धर्म म्हणून समजतो, अितकेच नव्हे तर ती हिंदु समाजावर लादून तिच्या भाषा, लिपि, निर्बंध (कायदा) अित्यादींच्या साच्यात अुभ्या भारतीय राष्ट्राचीच घडण बनविण्याचा अनावर मोह त्यास अजूनही होत आहे. अशा स्थितीत ही जीर्ण संस्कृति स्वतःच्या प्रगतीच्या मार्गात अेक धोंड होअून राहिली आहे असे म्हणणाऱ्या तुर्कांच्या मतात आणि अनुभवात जर तथ्य असेल आणि ते समजावून न घेता जर हिंदी मुसलमान तीसच यापुढे चिकटून राहण्याचा दुराग्रह धरतील तर त्यांचे आणि त्यांच्याबरोबरीने त्यांच्यामुळे साऱ्या भारतीय राष्ट्राचे अहित झाल्यावाचून राहणार नाही. बरें, हे मत आणि हा अनुभव कोणी हिंदु वा गैर-मुस्लिम समाज पुरस्कारीत नसून हिंदी मुसलमानांतील बहुजनसमाज अजूनही ज्या तुर्कस्थानास अरबी संस्कृतीचा—म्हणजेच मुसलमानी संस्कृतीचा—पुरोध्वज, आधारस्तंभ, सरधार आणि सम्राट् समजतात तो तुर्कस्थानच ते मत पुरस्कारीत आहे! तुर्कस्थानाने महायुद्धानंतर खिलाफतीचे अुच्चाटन केल्यानंतरही, हिंदी मुसलमानांतील बहुजनसमाजाची तुर्कस्थान हा मुस्लिम समाजाचा कट्टर अभिमानी आहे ही जुनी समजूत जशीची तशीच राहिलेली आहे, म्हणून त्यांनी तुर्कस्थानात अलीकडे होत असलेल्या चळवळीकडे लक्ष पोहोचविल्यास आजच्या जगताच्या प्रगतीच्या स्पर्धेत अरबी संस्कृति किती टिकाव धरू शकेल याचा फेरविचार करण्याची आवश्यकता त्यांनाही भासू लागेल.

—'केसरी' २ मार्च १९३४

समजू लागले आहेत, ही गोष्ट अैकून मोठें आश्चर्य वाटतें. तें कोडें त्यांस अुलगडत नाहीं. आजच्या अरबी संस्कृतीविरुद्ध तुर्कांनी असें चिडून कां जावें याचा वाचकांस अुलगडा होण्यासाठी त्या बंडाच्या मुळाशी असलेल्या ह्या दुसऱ्या कारणावर प्रकाश पाडण्यापुरता तुर्कांचा आणि अरबांचा पूर्वापार संबंध कसा आला आणि कसा वाढला याच्या वृत्तान्ताची किंचित् रूपरेषा येथे देणें भाग आहे.

## अरबी साम्राज्यात तुर्कांचा प्रवेश

महमंद पैगंबर यानी अरबांमध्ये मुसलमानी धर्म आणि मुसलमानी राज्य स्थापिल्यामुळे त्यांच्या हातीं धर्मदंडाची आणि राजदंडाची दुहेरी सत्ता अेकत्रित झाली. मुसलमानी जगाचे तेच खलिफा आणि तेच सुलतान, तेच जगद्‌गुरु आणि जगत्सम्राट् होते. त्यांच्यामागे अबुबेकर, अुमर अुस्मान आणि अल्ली ह्या पहिल्या चार सत्ताधाऱ्यांच्या हाती ती दुहेरी सत्ता तशीच चालत राहिली. पुढे ओमियेड आणि फातिमाअिड वंशांच्या हक्कांची भाडणे लागून सुन्नी आणि शिया अशी मुस्लिम जातींची दोन शकलें झालीं. प्रथम ओमियेड व नंतर अबास, मनसूर, महादी आणि हरुन रशीद हे मोठे बलाढ्य खलिफा होअून गेले. अरेबियन नाअिट्सचे हेच नायक होते; पण पुढे सुन्नीशियांत आणि सुन्नींसुन्नींत राजसत्तेविषयी अितकी भयंकर यादवी माजली की, त्या अरबी खलिफास स्वतःचे अरब सैन्य ह्या धार्मिक आणि वांशिक पक्षभेदाच्या वादळात सापडून केव्हा कोण कोणाचा पक्ष घेअील याचा विश्वास वाटेनासा झाला. त्यामुळे ज्यांना वेतनाच्या रक्कमेवांचून दुसऱ्या कसल्याही मुसलमानी धर्मवशपंथ याची लवलेश चाड नसे असे गैरमुस्लिम सैनिकच नोकरीस ठेवणें अरब खलिफांस बरें वाटू लागलें. त्या संधीसच मुस्लिम सत्तेची लाट मध्य आशियातील तुर्कस्थानच्या सीमेस भिडली होती. तेव्हा त्या तुर्क-तार्तरांची कडवी लढवय्यी वृत्ति पाहून बगदादच्या खलिफानी त्यांचीच भरती आपल्या सैन्यात करण्याचा सपाटा चालविला. धार्मिक बखेडे माजवून बंडें कर-

अि स ८६९ मध्ये तर तुर्कांनी बगदादचा अरबी खलिफा मुतादि यास वेतन थकले म्हणून गादीवरून ओढून फरफटत आणून रस्त्यात फेकून दिले, तुरुगात कोंबले नि शेवटी हालहाल करून ठार मारिले ! तेव्हापासून खलिफाचे देहरक्षकच नव्हेत तर चालक नि पालकही तुर्कच झाले ते वाटेल त्यास खलिफा करीत, वाटेल त्यास काढून टाकीत बगदादच्या सुन्नी अब्बासी वशाचीच ही स्थिति झाली नाही तर तिकडे अिजिप्तमध्ये असलेल्या शियाच्या फातिमाअिद खलिफाचीहि तुर्कांनी तीच गत करून सोडली त्या अिजिप्तच्या अरब राज्यातील तलाअी नावाच्या बलाढ्य तुर्क सरदाराने तर स्वत स 'खलिफाचा कर्ता' म्हणवून घेअून त्याचे पालकत्व नेहमी आपल्या पक्षाच हाती असाव म्हणून खलिफा अल्पवयी असला पाहिजे हा अलिखित दडकच जणू घालून दिला मोठ्या वयाचा औरस पुत्रही बाजूस सारून त्या वशातील कोणाचा तरी दूरचा अल्पवयी मुलगा आणून त्यास तो खलिफा करी अरबी साम्राज्यात तुर्क आतून अस पोखरीत असताना बाहेरून त्याजवर जगज्जेत्या चेगीझखानाची स्वारी येअून वज्रपातासारखी आदळली ! चेगीझखान हाही मुसलमान नव्हता आपल्या अिकडे हिंदूस कोणाला 'खान' म्हणताच आणि मुसलमानास कोणाला 'जगज्जेता' म्हणताच तो मुसलमान असलाच पाहिजे असे वाटते. आम्ही असे अनेक अनाडी मुसलमान पाहिले आहेत की 'शिकदरखान' (अलेक्झाडर) हा मुसलमान नव्हता म्हटल की ते चिडून जात ! 'मुसलमान नसता तर खुदा त्याला फत्ते कशी देता ?' हा त्याचा कोटिक्रम ! तोच अरब लोकाचाही कोटिक्रम असे ! आणि मुसलमानाच्या अशाच वढायानी चिडून जाअून मुस्लिम नसलेल्या चगिझखानाने मुसलमानाचा नुसता फडशा पाडला त्याने बगदाद धुळीस मिळविल दमास्कसचा दम अुखडून टाकला, मशिदीची मैदाने केली, लक्षावधि मुसलमानाची कत्तल करून त्याच्या कापलेल्या डोक्याचे ढीग रचून त्याच्यावर आरुढ होअून चेगिझखानाचे डाक चादण्यात विचार करीत असे ! मुसलमान नसलेल्यासही देव फत्ते देतो अशी अरबाची निश्चिति पटावी अितका त्या चेगिझने त्याचा भयकर फडशा पाडला मुसलमान तवारिखकार त्यास अजूनहि 'देवाचा शाप !,' 'देवाचा प्रकोप !' म्हणून सबोधतात खर पहाता अरब साम्राज्याचा अियेच अत झाला

## तुर्की सुलतानाचा अुदय

चेगिझखानाची ही जग हादरून सोडणारी प्रलयकर वावटळ शमून मध्य आशिया खड पुन दिसू लागले तेव्हा पाहतात तो खलिफाचा वश म्हणून सापडेना ! शेवटी अिजिप्तच्या प्रबळतर तुर्क सनानीने कोठून तरी त्या वशातला अेक पुरुष शोधून आणला आणि त्यास धर्मदडाच्या अधिकारापुरता खलिफा करून राज दड अुघडपणे स्वत चे हातात घेतला त्या वेळेपासून तुर्क सुलतान झाले, सम्राट्

झाले आणि अरबांच्या हाती निर्माल्यवत् झालेली खिलाफती (धर्मगुरुपण) तेवढी राहिली; परंतु जो स्वतंत्र आणि सत्ताधीश तोच खलिफा होऊ शकतो असा मुसलमानी धर्मशास्त्राचा दंडक असल्याने शेवटी मुसलमानी जगत् तुर्की सुलतानाने खलिफाही व्हावें या गोष्टीस अनुकूल होत चालले आणि अंती तुर्कस्थानचा पराक्रमी सुलतान सेलीम ह्याने अरबांचे हातून तो धर्मदंडही काढून आपल्या हाती घेतला. तेव्हांपासून तुर्कच सुलतान नि खलिफाही झाले. अरबांची प्रख्यात क्षेत्रें मक्का आणि मदिना तुर्कांनी घेतली. आपली सत्ता चालविण्यास मुसल्मानी धर्म आणि संस्कृति उपयोगी पडत होती म्हणून तुर्की सुलतानांनी मुस्लिम धर्म नि अरबी संस्कृति स्वीकारली; पण ह्या लेखातून पूर्वी सांगितल्याप्रमाणे अर्वाचीन युरोपशी टक्कर देण्यास ती अपुरी पडते असें पहाताच त्यांनी तिला झुगारून देण्यासही कंबर कसली. कारण तिचें खरें महत्व असें त्यास केव्हांच वाटत नव्हतें.

आज तुर्कस्थानात अरब संस्कृतीचे उच्चाटण करण्याची केमालपाशाच्या नेतृत्वाखाली जी प्रबळ उठावणी झाली आहे तिची दोन मुख्य कारणें आणि ऐतिहासिक पूर्वपीठिका ह्या लेखात अशी रूपरेखिल्यावर आता पुढील लेखात धर्मभाषालिपिनिर्बंधजनरीतिनीतिप्रभृति प्रकरणी तुर्कांनी गेल्या दहा वर्षांत कशी क्रांति घडवून आणली आहे त्याची उद्‌बोधक अशी प्रकरणवार माहिती देण्याचा विचार आहे.

आपल्या खड्गाच्या सुईने त्यात पराक्रमाची संजीवनी संचरविली देखत देखत कॉन्स्टॅन्टिनोपलपासून स्मर्नापर्यंतच्या विस्तीर्ण रणांगणात ग्रीकांची रग जिरविली आणि नवचैतन्याने मुसमुसलेले तुर्कांचे स्वतंत्र राष्ट्र पुन आपल्या पायावर उभे राहून, अढळ ठाण मांडून, तुझ्या व्हर्सेलच्या संधीस मी भीक घालीत नाही जा म्हणून युरोपास आव्हानू लागले या लेखाचा हेतु तुर्कस्थानातील या राज्यक्रांतीचे विवरण देण्याचा नसल्यामुळे ज्या सांस्कृतिक क्रांतीचे वर्णन या लेखात द्यावयाचे आहे ती या राज्यक्रांतीमुळे शक्य झाली आणि ती या राज्यक्रांतीचाच पहिला अपरिहार्य परिणाम होता हा कार्यकारणभाव दाखविण्यापुरताच तिला असे नुसते निर्देशून ते पुनरुज्जीवित तुर्की राष्ट्र चिरस्थायी करण्यास्तव केमालपाशाने पहिल्या घडाक्यासच तुर्कस्थानातून खिलाफतीची हकालपट्टी का व कशी केली ते पाहू।

## अरबी खिलाफतीचे अुच्चाटन

जर्मन महायुद्धाच्या प्राणसंकटात तुर्क सापडले असता त्यांच्या साम्राज्यातून फुटून अरबांनी गैरमुस्लिम ख्रिश्चन राष्ट्रांचे बाजूने बंड केले होते या अरबांच्या विश्वासघाताने तुर्क चवताळून गेले तरुण तुर्कांच्या अुदयानंतरही महायुद्धापावतो त्यांनी ह्या खिलाफत संस्थेचा हत्ती जो पोसला होता तो त्या खलिफापदाचे त्यास धार्मिक ममत्व वाटत होते म्हणून नसून अरबप्रभृति मुसलमानांना ह्या धार्मिक पीठाचे अधिकारी म्हणून तुर्की साम्राज्याचे ममत्व वाटेल व त्याचे पाठबळ तुर्क राष्ट्रास मिळत राहील या राष्ट्रीय लाभासाठीच होय, परंतु अरबांनीच त्याच्या या खलिफास ठोकरून दिल्यामुळे आणि मिसर, अिराण, अफगाणिस्थानप्रभृति कोणत्याही मुसलमानी राष्ट्रांनी तुर्क आपला खलिफा, त्याने जिहाद–धर्मयुद्ध पुकारले, आपणास त्याच्या झेंड्याखाली जाअून त्याच्या शत्रूशी लढलेच पाहिजे अशा धार्मिक भावनेने तुर्कांस म्हणण्यासारखे कोणतेही रणसाहाय्य दिले नसल्याने खिलाफतीची संस्था ठेवली असता मुसलमानांच्या शक्तीचे केंद्रीकरण आपल्या तुर्की राष्ट्रध्वजाखाली करता येअील ही अपेक्षा फोल ठरली ह्याला न सांगितला तरी चालेल असा अेकच अपवाद काय तो आढळला तो म्हणजे ज्यांना स्वत चे राष्ट्रच नव्हते अशा हिंदी मुसलमानांचा आणि गांधीवादी हिंदूंचा। ह्या सज्जनांना तुर्की खिलाफतीची चिंता तुर्कांपेक्षाही अधिक ममत्वाने विव्हळवू लागली, हिंदी खिलाफत मंडळाने ती कोलमडणारी तुर्की खिलाफत सावरून धरण्यासाठी आपल्या गवताच्या काडीची कुबडीदेखील केमालपाशाच्या हातात दिली, पण तिचा टेकू घेअून हिंदी मुसलमान नादत होते तशा सुस्थितीत नादण्याचे केमालपाशाच्या दैवी नसल्याने त्या कुबडीच्या साहाय्याची दखील वास्तपुस्त करण्याची दुर्बुद्धि त्याला आठवली नाही त्यास कोणाचा काय अुपाय? त्याचा ठाम सिद्धान्त ठरला की, ह्या पॅनअिस्लामिझमच्या खुळाने तुर्की राष्ट्राचा यापुढे लवलेश लाभ होण्याचा संभव राहिला नाही।

उलट ती पॅनअिस्लामिझम् तुर्कांच्या प्रगतीचे मार्गांत दुर्लंघ्य विघ्ने मा आणण्यास कारणीभूत होत राहणारी आहे अशी केमालपाशाने उघडउघड घोषणा केली कारण तुर्कस्थानचा सुलतान हाच जोवर मुसलमानी धर्माचा खलिफाही म्हणवून घेअील तावर मुसलमानाच्या धर्मशास्त्रातील नीतिनिर्बंध हेही त्यास पाळावेच लागणार हजार-दीड हजार वर्षांपूर्वी अरबस्थानच्या विशिष्ट परिस्थितीत जे लागू पडले ते लग्न, वारसा, स्त्रीदाससततिविषयक अधिकार, दंडविधान, राजनीति, तत्त्वज्ञान प्रभृति व्यक्तिजीवनातील आणि राष्ट्रीय जीवनातील झाडून साऱ्या प्रकरणाचे कुराणात मागितलेले निर्बंध आणि नियम आजच्या मनूतही ततोतंत लागू केलेच पाहिजेत, नव्हे ते त्रिकालीही बदलता कामा नयेत, हे तत्त्व स्वीकारणे म्हणजे खिलाफत चालू ठेवणे होते !

अितकच नव्हे तर तुर्की जातीवर अरब जातीहून नीचतर असण्याचा छाप त्या खिलाफतीच्या धमदडाने नित्याचा मारलेला असावा याचेही तरुण तुर्कांस मोठे वैषम्य वाटत होत कारण अिस्लामी धर्मशास्त्राप्रमाणे पैगंबराच्या अगदी कुळातील नसले तरी त्याचा जन्म ज्या पोटजातीत झाला त्या कोरेश वर्गातील रक्तबीज ज्यात असेल तोच खलिफा होअू शके ती पैगंबराच्या जन्माने धन्य झालेली जात भक्तिमान् अनुयायास साहजिकच अुच्चतम आणि धर्मगुरुत्वधारणाची अनन्य अधिकारी अशी वाटे त्या धार्मिक समजुतीस मान तुकवित्यामुळे तुर्कांचे पहिले प्रबळतम सुल्तानही खलिफापदास तोवर योग्य समजले गेले नव्हते की, जोवर त्यांच्या रक्तात, निदान मातेच्या बाजूने तरी, अरबी खलिफाच्या श्रेष्ठ रक्ताचा अंश अुतरलेला नव्हता यामुळे तुर्की सुलतानानी स्वत च पदच्युत केलेल्या दुबळ खलिफाचीही मनधरणी करून त्याच्या कन्यकाशी विवाह करण्याची तुर्की सुलतानाना वरचेवर घडपड करावी लागे तुर्की सुलतानाच्या अंगातील तुर्की रक्ताच्या पराक्रमी तेजामुळे ते खलिफापदाच पावित्र्य पावत नसून त्याच्यातील जन्मजात अुच्चतर व शुद्धतर अरबी रक्तच काय ते त्या गौरवाचे अधिकारी होते

फुरफुरणाऱ्या आपल्या घोड्यास टाच देत व हातात रिव्हॉल्व्हर रोखीत केमाल-पाशा जो निघाला तो थेट खलिफाच्या त्या दुबळ्या राजसभेत जाऊन थडकला सोंगट्याचा पट उधळावा तशी त्याने ती राजसभा उधळून दिली, खलिफास गादीवरून खाली आणले आणि तुर्कस्थानातून खिलाफतीस आमूलाग्र उच्चाटून, पदभ्रष्ट खलिफास राष्ट्रातून हाकून दिले !

जो खलिफा तोच सुलतान त्या खलिफास पदभ्रष्ट करण्यातच केमालने त्या सुलतानाशाही पदच्युत केले खलिफाशाही आणि सुलतानशाही दोनही जीर्ण-शीर्ण संस्था एका घावासरशी गतप्राण झाल्या धर्मसत्तेच राजसत्तेचा अंत होऊन, Theocracy संपून, तुर्कस्थानात बुद्धिनिष्ठ लोकसत्तेची स्थापना झाली, आणि तीच अपरिवर्तनीय जरा अरबी धर्मसंस्कृतीच्या अंतिमाची अंत्ययात्राही होती !

## अरबी धर्मनिबंधाचे उच्चाटन

महायुद्धात तुर्कस्थानच्या शत्रूचे हातात हात घालून तुर्की सत्तेस अरबांनी झुगारले होतेच त्यांनी तुर्कांची राजकीय सत्ता झुगारली तर तुर्कांनी त्यांची धर्मसत्ता झुगारून दिली त्याच्यात आता काणा काणाचा राहिला नव्हता खलि-फाचे उच्चाटन करताक्षणीच धर्माची राजकारणातून साफ उचलबांगडी झाली तोवर तुर्कांचे सारे व्यवहार कुराणातील पुरातन अरबी साच्यात ढाळलेल्या आणि अपरिवर्तनीय मानलेल्या धर्मनिबंधानुरूप होत आले होते, पण तरुण तुर्कांनी पहिल्या घडाक्यासरशी धर्मनिबंध हा समास सोडविण्याचे भरीस न पडता तो मुळी तोडूनच टाकला धर्म निराळा, निबंध (कायदा) निराळा एक शब्दनिष्ठ श्रद्धेचा प्रांत, एक प्रत्यक्षनिष्ठ प्रयोगाचा त्याचा विषय परलोक व याचा इहलोक 'अत प्रत्यक्षमार्गेण व्यवहारविधि नयेत' ह्या तत्त्वाची घोषणा करून तरुण तुर्कांनी लोकसभेच्या पहिल्यावहिल्या बैठकीतच व्यवहारविषयक ते ते सारे धर्मनिबंध रद्द करून टाकले स्विट्झर्लंडमधील मोठेमोठे निबंधपंडित (कायदेपंडित) आणून त्यो देशाचे पौरविधान (Civil Law) तुर्क राष्ट्रास लागू केले एकाही मुल्लास वा मौलवीस धर्मशास्त्र या सुधारणेस अनुकूल की प्रतिकूल ते विचारण्यात आले नाही एका दिवसात लोकसभेत हे पौरविधान संमत झाले छेदकवार चर्चा तर दूरच, पण प्रथवार चर्चेतदेखील कोणी वेळ गमावला नाही महिनोगणती चर्चा होऊन आधीच ठरलेल्या विवाहाच्या औपचारिक वाङ्निश्चयाचे नाटक जसे घटकेत पडून येते तसे त्याच एका दिवसात एक युग उलटून गेले त्याच्या दुसऱ्याच दिवशी ते नव पौरविधान वर्तव्यातही आल्याची द्वाही फिरली इस्लामी लग्नप्रथा रद्द, इस्लामी वारसाप्रथा रद्द इस्लामी वस्पनोत्व रद्द, धार्मिक न्यायशासन रद्द, पौरविधान स्विट्झर्लंडमधील लागू केले तर दंडविधान (Criminal Law) इटलीतील निबंधपंडित आणून त्यांच्याकडून बनवून घेतले चोरी, दरवडे, हत्या

अशी नड अुरलीच नाही. धर्म ज्याच्या त्याच्या वैयक्तिक मतापुरता राहिला. त्यासरशी तुर्कस्थानात धर्म-स्वातंत्र्याची घोषणा करण्यात आली. फार काय हिंदुस्थानात जे वाचणे अनेक अिस्लामी धर्मवीरांस केवळ नरकाचे साधन वाटते ते हिंदूंचे वेद तुर्की विद्यापीठातून परमादराने, पण अैतिहासिक दृष्ट्या आज अभ्यासिले जात आहेत. काही प्रमाणात त्यांचा अभ्यास आवश्यक समजला जातो.

## अरबी लिपीचे अुच्चाटन

अरबी लिपि ही कुराणामुळे तुर्कस्थानात धर्मलिपीचे पावित्र्य पावलेली, अितकेच नव्हे तर तीच अेक अनन्य लिपि त्या देशात पूर्वापार चालत आलेली. पण ती अतिशय बोजड. मुद्रणार्थी शिक्षणार्थी पराकाष्ठेची अडाणी. तुर्कीत शेकडा ९० अशिक्षित लोक. पण त्यास युरोपच्या शेकडा ९० शिक्षितांच्या मांडीस मांडी लावून बसावयाचे तर ती अरबी लिपीची धोंड वाटेतून काढणेच भाग! मुद्रणावर रुळलेली युरोपची रोमन लिपि समोर होताच केमालपाशाने तत्काळ तिलाच अुचलली. साधारणतः अेक वर्षाची अवधि ठरवून सारे सरकारी काम त्या अवधीनंतर रोमन लिपीत चालणार म्हणून आज्ञा सुटली. शाळांतून तर त्याच दिवसापासून रोमन लिपि चालू! हा लिपिशुद्धीचा चळवळ त्यांनी अितक्या नेटाने रेटला की स्वतः केमालपाशा शाळांतून ती शिकवू लागले. केवळ दहा अक्षरे बदलताच रोमन लिपीच्याही तोंडात मारू शकेल अितकी मुद्रण आणि शिक्षणसुलभ होणारी आमची देवनागरी लिपि जर केमालपाशाचे हाताशी असती तर त्याने अरबी लिपी बदलण्यास अेक वर्षाची अवधिसुद्धा राष्ट्रास दिला नसता! कारण दहा अक्षरे देखील बदलण्यास पन्नास वर्षे रखडत राहण्यास केमालपाशा कोणी क्षयरोगी थोडाच होता! ठरलेल्या दिवशी त्याचे सरकारी काम, सारी वृत्तपत्रे साऱ्या राष्ट्रभर अगदी नवीन शैली रोमन लिपीत चालू झाली!

## अरबी भाषेचे अुच्चाटन

तुर्कांस स्वतःची लिपीच नव्हती. पण भाषा होती. तथापि जेते तुर्क राजे असता राजभाषेचा मान होता जितांच्या अरबीस! त्या सावटाखाली तुर्की भाषा पार खचटून गेली. सारे साहित्य अरबीत. तुर्की घरादारांत अरबी शब्दांचा बाजार? स्वाभिमान जागृत झाल्यामुळे तरुण तुर्कांस हे कसे खपणार? शिवाजी महाराजांनी मराठीस ह्याच अरबीप्रभृति परकीय शब्दांच्या धुडगुसापासून मुक्त करण्यासाठी राजाज्ञा काढली होती. पण महाराजांअितके त्याच राष्ट्र करारी चिकाटीच नसल्यामुळे आजही मराठीत कबूल, हल्ली, शिवाय, तहाह यांत प्रभृति शेकडो परकीय शब्द आपल्या स्वकीय शब्दांच्या थडग्यांवर भरभराट केलेले आढळत आहेत! केमालच्या नवतुर्कांचे राष्ट्र सुदैवाने त्याच्याअितकेच करारी

पडले त्यांना स्वभाषेतील थोडेसे परकीय शब्दच काढून टाकावयाचे नव्हते, तर जवळजवळ मेलेली भाषाची भाषा जिवंत करावयाची होती ! पण त्यांनी तेंही केले. मध्यआशियातील तुर्कांच्या मूळस्थानात संशोधनमंडळे गेली आणि तिकडून पूर्वीचे शब्द शक्य तितके गोळा केले ! पंधरा हजार शिक्षकांना तुर्की शब्द पुनरुज्जीविण्याचे किंवा नवीन निर्मिण्याचे कामावर नेमण्यात आले ! तुर्कीत वाङ्मय नसल्यामुळे सारे साहित्यिक शब्द नवे पाडले ! कोणी वीस हजार तुर्की शब्द जमवून दिले ! स्वतःचे बोलण्यात बिनतुर्की—विशेषतः अरबी शब्द सापडणे ही गोष्ट शिष्टाचारविरुद्ध समजली जाऊं लागली ! मन्त्रिमंडळातील मोठमोठे 'पाशा' प्रधान अेका तासात कोण परकी शब्द कमीत कमी वापरतो याच्या चढाओढी लावू लागले आणि सरकारी राजपत्रात (गॅझेटात) प्रत्यही पाच नवे तुर्की शब्द राष्ट्रभर वापरण्यासाठी प्रसिद्ध होअू लागले

तुर्की राष्ट्रातही या भाषाशुद्धीच्या चावटळीस पालापाचोळ्याचा थोडा विरोध झाला. कित्येक म्हणाले, परकीय शब्दांनी भाषासंपत्ति वाढते. केमालपाशा म्हणाला, स्वकीय शब्द नाहीतच त्या अर्थाचे परशब्द घेईन, त्याने भाषासंपत्ति वाढते, पण स्वकीय शब्द मारून जे परशब्द जिवंत राहू पाहतात त्याने संपत्ति वाढते असे म्हणणे म्हणजे औरस पुत्र मारून दत्तक घेतल्याने संतति वाढते असे म्हणण्यासारखेच आहे ! स्वधर्मातील माणसे राखून बाटलेल्यांना पुन्हा स्वधर्मात आणणे ही खरी शुद्धि होय, पण जितके परधर्मीय शुद्ध करून घेणे तितकेच स्वधर्मीय ठार मारून टाकणे ही शुद्धि नसून वेशुद्धि आहे ! ! तुर्की भाषेसारखी आसन्नमरण आणि मूळचीच साधी भाषा, पण तिचा हा केवढा अभिमान ! मग जर या कुबेरासारखा संपन्नतम मन्दनागर घेअून त्याच्या पाठीशी, आमच्या पाठीशी आमची संस्कृताची देववाणी आहे तशी, अेखादी भाषाची राणी अुभी असती तर त्याने देवाच्या राष्ट्रावर सुद्धा ती स्वभाषा लादण्याची आकांक्षा धरली असती !

'कायदा' सारख्या शब्दासाठी देखील आमच्यासारख्या करटचा शालीनतेने तो

तीही तुर्की भाषेतच भाषांतरली जाऊन निमाज तुर्कीतच पढले जाऊं लागले. कारण देवास तुर्कीही समजत असलेंच पाहिजे! देव काही जन्मजात अरब नाही! पैगंबराच्या काळापासून स्त्रियांनी बुरखा वापरणें हाच अरबी धर्म. तुर्की तरुण स्त्रियांनी बुरखा झुगारून दिला. अरबी बुरख्यांतून—कित्येक शतकांच्या बंदीतून—तुर्की स्त्री बाहेर आली! स्वेच्छेनेच नव्हे, कारण बुरखा हाच जिला धर्म वाटत होता अशी हजार हजार तुर्क स्त्रीच या सुधारणेचा विरोध करीत राहिली—पण तरुण तुर्कांनी जो सुटेना तो बुरखा फाडून टाकला. विद्यापीठे स्त्रीपुरुषांस संमिश्र वर्गांतच शिकवूं लागलीं. बुरख्यास मज्जाव झाला. हीनतेची खूण म्हणून फेज टोपी घालणे निर्बंधविरुद्ध कृत्य ठरलें!

तुर्कांनी चौफेर हल्ल्यावर हल्ले चढविले! तुर्कस्थान स्वतंत्र करणारा केमालपाशा स्वदेशात मोठा लोकप्रिय असला पाहिजे असे बाहेर सहजच वाटते, पण सुधारक म्हटला की तो स्वातंत्र्यवीर असला तरी, बहुधा बहुजनांत अप्रियच असणार. कारण सुधारणा म्हणजेच अल्पमत व बहुमत तीच रूढि! रशियांत तीनचतुर्थांश लोक लेनिनवर तुटून पडले. मुसोलिनीवर अजूनही वर्षाकाठी दोनचार अिटालियन मारेकरी घाला घालतातच. डी व्हॅलेराविरुद्ध आयर्लंडात केवढा मोठा पक्ष जळफळत आहे! त्यातही धार्मिक वा सामाजिक सुधारणेत लोकप्रियतेचे नावही घेण्यास नको. 'वर जनहित ध्येय केवळ न जनस्तुति' हा बाणा ज्यास धरवेल, ती धमक अंगी असेल, त्यानेच ते पाअूल टाकावे. तसाच निडरपणे केमालपाशाने ते पाअूल टाकले. अकस्मात् सुधारणांचा धडाका अुडाला आणि लोकसभेच्या दाराशी राजकीय केंद्रावर तोफांच्या रांगा रोखून, जुन्या पक्षाशी युक्तिवाद करण्याचे काम प्रथम त्या तोफांच्या तोंडाकडेच सोपवून, रेगाल्ने जो अपरिवर्तनीय म्हणून पूज्य झाला तो धर्मग्रंथच्या ग्रंथ अपरिवर्तनीय म्हणूनच रद्द करून टाकण्याचे मुख्य काम तडकाफडकी पार पाडले. नंतर मतपरिवर्तनार्थ त्याने सारे मुद्रण, सारे वाक्पीठ, सामोपचारांच्या साऱ्या कला कामास लावल्या, पण असंतोषाची आग विझेना. फेज टोपी रद्द केली म्हणून अशिक्षितांनी दंगे केले, कुराणातील पवित्र अरबी मंत्र रद्द करून ते तुर्की भाषेत चालू केले म्हणून अरब मुल्लामौलवींच्या अनुयायांनी आग पाखडली. केमालवर मारेकऱ्यांचे घाले पडले. शेवटी कुठे कुठे पलटणी देखील फितल्या आणि सशस्त्र बंड अुठले! तुर्कांच्या बाहेरच्या शत्रूंनीही या यादवीत थोडे फार तेल ओतले, पण ते तरुण तुर्क अल्पसंख्य असताही अल्पबळ नव्हते. त्यांच्या शिस्तीने, शौर्याने युरोपच्या तोंडात मारली होती. त्यांनीही उग्ररूप धारण करतांच दंगेखोरांची धुळधाण अुडाली. बंडाचे कंबरडे मोडले. स्थलाभावामुळे ती सुरस अुल्लेखनीय असताही

ताडदेखल्या गोष्टींनी आता भागत नाही हें दिसताच त्यांनी वेयानेटावीच गाठ घातली. पन्नाससाठ मुल्लामौलवी पाडाव केले, हाती आले ते फाशी गेले. प्रकरण पडावले. सरकारी निर्बंधाचा (कायद्याचा) वचक दूरवर पक्का बसला. याचप्रमाणे अेका मोठ्या कटात मोठमोठे सरदार धरले जाऊन चौकशीअंती केमालने त्यांना फाशावर टांगून दिले. त्यांत त्याचा बालमित्र अरीफशहीं होता. ते तिकडे ज्या वेळी फाशावर लटकत होते त्या वेळी केमालपाशा अिकडे अनेक नृत्यालयातील स्त्री-पुरुषांच्या अेका मोठ्या समिश्र नाचात स्वतः नाचत होते! विरोधाचा शतमुखी रावण जेव्हां जेव्हां सशस्त्र सामनवाद करू आला तेव्हां केमाललाही कृपाणाच्या अशा कठोर कोटिक्रमांच त्याची समज पाडता आली!

## कालचा पाखंड! आजचा पुण्यश्लोक

पण ह्या पहिल्या धडाक्याच्या तीनचार वर्षांत जे काय झाले ते झाले. आज तुर्कस्थानच्या प्रजासत्ताक राज्यस्थापनेला दहा वर्षें झाली. नुकताच तुर्कस्थानभर तो दशम वार्षिक वाढदिवस अख्ख्या राष्ट्राने गाजविला! अपरिवर्तनीय अरब संस्कृतीशी जखडून टाकल्यामुळे तुर्कस्थान युरोपपुढे हतवीर्य व हतप्रभ होऊन गेला होता, पण ती Theocracy, ते धर्मसत्ताक राज्य, ती खिलाफत अुखडून टाकून वैज्ञानिक संस्कृतीस आणि प्रजासत्ताक राज्यास जीवदान दिल्याविषयी तें सारे राष्ट्र केमालपाशाचे चरणी त्या दिवशी आपली कृतज्ञ पुष्पांजलि अर्पित झाले! कालचा पाखंड केमालपाशा आजचा पुण्यश्लोक झाला!

# शिवछत्रपतींचा जयजयकार!

रथस्यैकं चक्रं भुजगयमिताः सप्त तुरगाः ।
निरालंबो मार्गश्चरणरहितः सारथिरपि ॥
रविर्यात्येवान्तं प्रतिदिनमपारस्य नभसः ।
क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे ॥

आणि त्याचे महत्त्व पाहावयास प्रथम हिंदु जातीने आणि हिंदुस्थानने त्याच्यावर झालेल्या परकीय आक्रमणाला विरोध करण्याचा प्रयत्न थेट दाहिर–पृथ्वीराजापासून जो केला व पृथ्वीराजाच्या पतनानंतर ठायी ठायी हिंदुत्व रक्षण करण्याकरिता जे अनंत झगडे सुरु झाले त्याचाही अितिहास लक्षात घेतला पाहिजे. सातव्या-आठव्या शतकात सिंध देशावर मुसलमानाचे पहिले आक्रमण झाले तेव्हापासून बाराव्या शतकाच्या अखेरपर्यंत म्हणजे जवळजवळ सहाशे वर्षे मध्यआशियातील व अिराण-अफगाणिस्तानातील काही धर्मवेडाने काही राज्यलोभाने, काही पोट भरण्याकरिता काही लूट मारण्याकरिता ज्या मुसलमानाच्या स्वाऱ्या चालल्या होत्या व ज्यांचे अंतिम ध्येय हिंदुस्थानची हिंदु सत्ता नामशेष करून यवनांचा चांद सबंध हिंदुस्थानभर फडकविण्याचा होता त्या स्वाऱ्याशी सतत सहाशे वर्षे हिंदु जातीने टक्कर दिली आणि ह्या सहाशे वर्षाच्या स्वरक्षक युद्धाचा अखेर परिणाम असा झाला की ११९३ मध्ये हिंदुस्थानची सार्वभौम मानली गेलेली दिल्लीची सत्ता ही नामशेष झाली. हजारो हजार वर्षापासून अखंड स्वातंत्र्य, अखंड स्वराज्य, अखंड सुख भोगीत असलेल्या आणि त्याच्याच अतिरेकाने विसघटित, आळशी व सुखलोलुप झालेल्या हिंदु जातीला यवनाचे झालेले हे आक्रमण केवळ प्राणसंकटच वाटले. ११९३ साली पृथ्वीराजा पडला व त्यानंतर केवळ १०० वर्षाच्या आतच सबंध अुत्तर हिंदुस्थान यवनमय होअून प्रत्यक्ष काळालाही काळ भासणारे राजपुतान्यातील सर्व रजपूत काही चिरकाळ अपवादान घस्याच्या वगल्याप्रमाणे पटापट यवनी सत्तेपुढे विरघळत गेले आणि बरोबर शंभर वर्षांनी विंध्य पर्वताच्या अलीकडे दक्षिण हिंदुस्थानात यादवांचे प्रबळ राज्य जणू क्षणार्धात रसातळाला गेले नंतर काही थोड्याच वर्षांच्या अवधीत अिस्लामचा घोडा अप्रतिहत वेगाने रामेश्वरचे पाणी प्याला. अेखाद्या पुराण जातीची आणि संस्कृतीची जशी मरणाची वेळ यावी तद्वतच प्रत्यक्ष मरणाचीच वेळ हिंदु संस्कृतीस व हिंदु जातीस त्या वेळी आलेली होती. अशाच तऱ्हेची विगलित अवस्था अेका काळी बलाढ्य रोमला प्राप्त झाली आणि त्याच्या सर्व वैभवासह ते रोम आणि अिराही तसलीच वैभवसंपन्न राष्ट्रे पृथ्वीतलावरून पुसटून जाअून काळाच्या मध्यस्थानी पडली. तीच अवस्था बाराव्या शतकापासून हिंदु जातीची होअू लागली होती. अुतरणीला लागलेला गाडा जसा शतगुणित वेगाने खाली खाली घसरत जातो, त्याचप्रमाणे हिंदु जातिही वैभवशिखरावरून खाली खाली घसरत थेट

नदीपासून तो ब्रह्मपुत्रेपर्यंत सर्व हिंदुस्थानभर पारतंत्र्याचा, निराशेचा, हतबलत्वाचा गडद अंधार पडला आणि सबंध हिंदुस्थान हे अेखाद्या नुकत्याच मरण पावून प्रेत बाहेर काढलेल्या धन्याच्या घराप्रमाणे मृत्यूच्या छायेने अुदास, भयाण, ओसाड भासू लागले. प्रत्यक्ष काशीचा विश्वेश्वर आणि अयोध्येचा राम हे स्थानभ्रष्ट होअून अवमानित झाले होते आणि तोडरमल्लासारखी राजकार्यधुरंधर बुद्धि, राजा मानसिंगासारखे दुर्दमनीय शौर्य, तानसेनासारखे स्वर्गीय गायन आणि पंडित जगन्नाथरायासारखी अलोट विद्वत्ता आणखी मनाला मोहून टाकणारी कविता ही सर्व हिंदूंतील सद्‌गुणमालिका परकीयांच्या पायापाशी दासीप्रमाणे राबत होती. य:कश्चित् मनुष्यासारखा मनुष्य, परंतु तो दिल्लीच्या मुसलमानी गादीवर आरूढ होअून 'दिल्लीश्वर' झाल्याकारणाने प्रत्यक्ष 'जगदीश्वर' वाटावयास लागला होता आणि त्या 'जगदीश्वरा'च्या पायापाशी आपली मान, आपला अभिमान, आपले चित्त, आपले वित्त, अिनकेच काय, परंतु आपले कलत्र देखील अर्पण करण्याअितकी हीन दास्याची वृत्ति त्या वेळच्या अुत्तम गणलेल्या हिंदु समाजातल्या मोठमोठ्या व्यक्तींनी निलज्जपणे अंगीकारिली होती. सारांश, सगळ्या हिंदु जातीवर मरणाची अवकळा आली होती, नावाशी सूत धरले होते.

अशा परिस्थितीमध्ये मतरायें दातकें शुजाडले आणि प्रभु शिवरायाचा जन्म झाला सामान्य तर काय, परंतु असामान्य दृष्टीलाही या वेळी स्वराज्याची, हिंदवी राज्याच्या स्थापनेची कल्पना मृगजळाप्रमाणे अशक्य वाटत होती. भोवतालची सर्व परिस्थिति अशी निराशाजनक असताही शिवरायाच्या मनामध्ये हिंदवी साम्राज्याचे जे गगनगामी गंभीर विचार अगदी कुमार अवस्थेपासून अुद्भूत झाले, यानच शिवाजीमहाराजाचा अद्भुतपणा ! वयाच्या केवळ तेराव्या वर्षी की, ज्या वेळी सामान्य बालकें अेकटी अंधारात जायला भितात आणि ज्ञानाचे श्रीगणेशाचे धडेही आकलन करण्यास असमर्थ असतात, त्या वेळेला शिवाजीमहाराजांनी देशातील पारतंत्र्याच्या गडद अंधकारात त्याचे अुच्चाटन करण्याकरिता अुडी घातली आणि स्वातंत्र्यसंपादनाचे दिव्य धडे त्यांनी आपल्या सवंगड्यांना देण्याला आरंभ केला ' प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववन्दिता । शाहसूनो शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ' असल्या भव्य महत्त्वाकांक्षेने ज्याच्या आयुष्याचे ध्येय वयाच्या केवळ तेराव्या वर्षीच निश्चित झाले होते ते शिवराय असामान्य, अलौकिक होते ह्यात काय संदेह आहे ?

तेव्हा शिवरायाच्या चरित्राची कामगिरी तोलताना केवळ शहाजी मालोजीपर्यंतचीच परंपरा पाहून किंवा भोसले कुळाचाच अितिहास लक्षात घेअून चालायचे नाही, तर त्याच्या पाठीमागे अनेक शतकांच्या परंपरेला व हिंदूंच्या अनंत कुळांच्या अितिहासाला यथावत जाणले पाहिजे म्हणजे शिवचरित्राचे खरे अद्भुतपण लक्षात येअील त्याचप्रमाणे अशी अेक भ्रांतिकारक कल्पना वर लिहिल्या गेलेल्या अितिहासातून पसरविली जाते की विजापूरकरांचे राज्य हे मोडकळीस आले होते आणि त्या मोडकळीस आलेल्या अव्यवस्थित राज्यामध्ये शिवाजीने आपली ' पुंडाअी ' चालू केली यात काय शौर्य आहे ? परंतु हे विधान सवथैव असत्य आहे त्या वेळी विजापूरची अदिलशाही ही मोडकळीस तर आली नव्हतीच, परंतु तिच्या काळातील तो अेक अुत्कृष्ट काळ होता नुकतेच बुडविलेले शेजारच्या मुस्लिमशाहींचे राज्य अर्धेअधिक घशात घालून व शहाजीमहाराजाच्या पराक्रमाने प्राप्त झालेला कर्नाटक आपल्या राज्याला जोडून विजापूरची अदिलशाही तिच्या अितिहासातील ' न भूतो न भविष्यति ' अशी विस्तार पावली होती अुत्तरेतल्या मोगल बादशहाच्या खालोखाल जर कोणती अेखादी मुसलमानी सत्ता त्या वेळी अस्तित्वात होती तर ती विजापूरची अदिलशाहीच होती कुबेराची संपत्ति विजापूरच्या कोशागारात अविरतपणाने वाहत होती कर्नाटकाच्या संपन्न प्रांतातून धनकनकाचा संग्रह होत होता विजापूरचे चतुरंग सैन्य रणदुल्लाखान मुरार जगदेव शहाजी राजे ह्या रणकुशल सेनापतींच्या आधिपत्याखाली दिग्विजय करीत होते दक्षिण हिंदुस्थानमध्ये अग्रपूजेचा मान विजापूरच्या सत्तेचाच होता आणि जर शिवाजी

अत्यंत धाडसी व पाश्चात्याच्याही नौकादलास आणि त्याच्या चाचेगिरीस धाक वाटावा असे अेक नौकादल — अेक सिंधु-सैन्य निर्माण केले

शिवरायांनी सर्व कोकणपट्टी निरीक्षून अत्यंत कुशलपणाने आणि जन्मजात दूरदृष्टीने मालवण, विजयदुर्गासारखे अभेद्य जलदुर्ग बांधून ठिकठिकाणी मोक्याच्या जागांवरून अेकीकडे समुद्र, दुसरीकडे भूमि रक्षित केली ह्याचकरिता शिवरायांना किल्ले जंजिरा नेहमी आपल्यास हवासा वाटे शिवाजीमहाराजांचे अेकावी नौका-दल अल्प अवधीमध्ये समुद्रयुद्धात अितके निष्णात झाले की, त्याने पोर्तुगीजांस धाक बसविला, सिद्दीला हैराण केले आणि प्रत्यक्ष अिंग्रजांना खांदेरी अुंदेरीला मुंबअीच्या छातीवर जणू पिस्तूल रोखून नरम आणले

आतापर्यंत आपण शिवरायांना केवळ वीर म्हणून, कल्पक आणि धाडसी सेनापति म्हणून निरीक्षिले, परंतु अेवढ्यानेच शिवरायांचे महत्त्वमापन सरले नाही हा केवळ अेक देश झाला वीरामध्ये क्वचित् सापडणारे राजनीतिनिपुणत्व शिवरायांमध्ये विपुलपणे भरलेले होते परराष्ट्राशी झगडा चाललेला असताना केव्हा पड खावी, केव्हा अुठाव करावा हे जाणण्यास व कमीत कमी हानीचा आणि जास्तीत जास्त लाभाचा मार्ग शोधून काढण्यास, त्याचप्रमाणे निष्कारण शौर्याचे प्रदर्शन न करता अवश्य तेव्हाच त्याचे आविष्करण करण्यास मुत्सद्देगिरी अंगी लागते कपटाने घात करणाऱ्या अफझुलखानाला आधीपासूनच सावधानता ठेवून त्याचे कपट अुघ-डकीस येताच धडकपणे आणि धैर्याचा परमावधि दाखवून पोट फाडून मारावे केव्हा आणि जयसिंगासारखा अुदारहृदय रजपूत राजा मुसलमानाच्या वतीने हिंदुस्थान साडण्यास आला असता त्याच्याशी मानपान गुंडाळून ठेवून आणि सुरक्षिततेचे अेकही साधन हाती न ठेवता पूर्ण विश्वासाने त्याच्या स्वाधीन व्हावे केव्हा, त्याच-प्रमाणे शहाजीराजे विजापूरकरांनी दगा करून भिंतीत चिणून मारण्याच्या धमकीने कैदेत घातले असता अत्यंत अल्पावधीत अगदी दीनवाणीने शहाजहानास आपल्या बाजूस वळवून घेऊन विजापूरकरांवर शहाजीला सोडण्याअितकी दहशत पाडण्या-करिता मोगलांचे मांडलिकत्व मान्य करावे केव्हा व प्रसंग येताच विजापूरकराशी संगनमत करून मोगलांना पिटाळून लावावे केव्हा हे सर्व कारस्थानी डावपेचही

झाला नसता, तर थोड्याच वर्षांत अखिल हिंदुस्थानच्या अग्रपूजेचा मान कोणाचा – अुत्तरेकडील मोगल बादशहाचा की दक्षिणेतील विजापूरच्या बादशहाचा, हा प्रश्न सोडविण्यास दोन्ही यवनी सत्तांमध्ये तुमुल युद्ध झाले असते.

या सिंहावलोकनावरून हे ध्यानात येअील की, विजापूरचे राज्य मोडकळीला आले होते म्हणून शिवाजीमहाराजाचा प्रयत्न यशस्वी झाला असे नव्हे तर शिवाजी-महाराजाचा प्रयत्न यशस्वी झाला म्हणून विजापूरची प्रबळ अदिलशाही मोडकळीस आली. शिवाजीने पोखरून ठेवलेल्या ह्या अदिलशाहीच्या आहुतींचा स्वाहाकार पुढे औरंगजेबाला लीलेने करता आला. अदिलशाही मोडकळीला आलेली असती तर मलिकंबरासारख्या, लखुजी जाधवासारख्या, शहाजीराजासारख्या, निजामशाहीतील प्रबल सरदाराच्या फटक्यासरशी ती गारद झाली असती व शहाजहानच्या पहिल्या स्वारीच्या तडाख्यालाच ती मोगल सत्तेला बळी पडली असती, परंतु जे कार्य निजामशाहीला करता आले नाही, बेदरच्या बरीदशाहीला करता आले नाही, अुत्तरेच्या शहाजहानला करता आले नाही ते अत्यंत अवघड कार्य शिवरायाने मोठ्या धाडसाने हातामध्ये घेतले आणि ते कोणाच्या भरवशावर? विजापूरच्या कुबेराच्या धनापुढे तोरणा किल्ल्यातील दगडमाती खणता खणता सापडलेल्या अेका क्षुद्र हंडाभर मोहराच्या! विजापूरच्या सुसज्ज चतुरंग सैन्याशी मरणमारणाची दंवचेव करण्याकरिता कृश देह धारण करणाऱ्या, वनवनातरी जीवित कंठणाऱ्या, भुकेने तडफडणाऱ्या काही मावळ्यांच्या पथकाच्या! रणदुल्लाखानासारख्या आणि मुरार जगदेवासारख्या वयेची वर्षे राजकारणात आणि मुत्सद्दीपणात घालविलेल्या राजकारणधुरंधरांशी दारस्थाने केली ती विशीच्या आतील असलेल्या अननुभवी तानाजी, मोरोपंत अित्यादि अल्लड तरुणांच्या संगनमताने! हे द्वंद्व असमान

१ पण केवळ अशा पराक्रमानेच शिवाजीमहाराज थोर म्हटले गेले काय? जर केवळ अेका पराक्रमानेच ते थोर असते तर त्याने आज अेवढे देव्हारे माजले नसते कारण केवळ पराक्रमीच असणारे अनेक हिंदु त्या वेळी यवनी 'सेवेत' रावत होते, परतु त्याचे देव्हारे कोणी माजविले नाहीत अेकटा पराक्रम काही मृत राष्ट्र जिवत करू शकत नाही, काही स्वातंत्र्य मिळवीत नाही, तर त्या पराक्रमाला कोणत्या तरी दिव्य ध्येयाचे आणि युद्धकौशल्याचेही साह्य हवे असते

शिवरायानेही मुसल्मानाशी लढण्याची आपल्याला अनुकूल अशी अेक नवीन पद्धत शोधून काढली मुसल्मान हे समोरासमोर तल्वारीचे युद्ध करण्यात मोठे निष्णात असत त्याचा धिप्पाड देह पुष्ट शरीर आणि अचाट शक्ति ह्यांच्या योगाने रजपुताविना अितर हिंदु जाति त्याच्यापुढे हीनबळ ठरल्या आणि मुसल्मानाची ल्यान तलवार समोरासमोर पडताच ती अधिक प्राणघातक होअू लागली प्रसग रजपूतही त्या तल्वारीच्या युद्धात फार फार तर बरोबरी करू लागले, पण बरोबरी केल्यानेच काही शत्रू मरत नाही ही गोष्ट ल्क्षात घेअून शिवरायाने मुसलमानाच्या प्रखर समशेरीच्या आणि प्रचड देहाच्या आटोक्याबाहेर राहून अमोघ प्रहार करणाऱ्या भाल्याच्या शस्त्रावर अधिक भर दिला त्यामुळे तल्वारीच्या लांबीबाहेर अुभे राहून आपल्या त्रिशूळासारख्या तीव्र भाल्याचा नेम अचूकपणा मारण्यात कुशल्या मावळ्याचे तरबेज हात्ते डोळे मोगल पठाणाच्या हृदयावर आघात करण्यास समर्थ झाले व यवनी सैन्य मराठ्यांशी अगल्ट करण्याच्या आधीच हतप्रभ होअू लागले ही 'मराठी भाल्याची फेक' केवळ सह्याद्रीच्या गिरिशिखरावरून पठारावरून आणि दऱ्याखोऱ्यामधून लंगोटघा मावळ्याच्या हातानीच यशस्वी झाला असे नव्हे तर ज्या वेळी लगोटघा मावळ्याच क्षुद्र पथक वाढतवाढत थोरल्या बाजीरावाच्या काळी गगच्या प्रचड ओघाप्रमाणे हिंदुपदपादशाहीच्या चतुरग दळाच्या योग्यतेला पोचले, अिकडे हिमालयाचा पायथा गाठला ति तिकडे अटकेला भिडले तेव्हा सिंधु नदीच्या वाळवटात भाल्याच्या राठीवरल

र कुणाला शिलेदारी देऊन ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे ज्याला त्याला जवळ- र धरले आणि लोहचुंबकाप्रमाणे सर्वांचे प्रेम आकर्षित करूनसुद्धा सर्वांवर आपला व ठेवला त्याच्या शिक्षणात सिद्ध झालेले जेवढे जेवढे लोक होते तेवढे तेवढे जाराम महाराजाच्या वेळी व तदनंतर झालेल्या २५ वर्षांच्या स्वातंत्र्यसमरातही मास आले

प्रो. यदुनाथ सरकार ह्यांनी ता १ मे १९२७ च्या ' क्रॉनिकल ' पत्राच्या शिवाजी-अंकामध्ये अेक लेख लिहिला आहे त्यामध्ये शिवाजीने राष्ट्र निर्माण केले काय ? असा अेक प्रश्न टाकून त्याचे अुत्तर नकारात्मक दिलेले आहे दीड शतका- नंतर शिवाजीने अुत्पन्न केलेले राज्य गेले आणि अठराशे-अठरा साली पेशव्याचा पराभव झाल्यावर घराकडे फिरणाऱ्या सैन्याला जनतेने संत्रस्त केले असे मनरो नावाच्या अितिहासकाराचे म्हणणे आहे आणि त्या अेका सद्गृहस्थाच्या म्हणण्या- वरून शिवाजीमहाराज हे राष्ट्रनिर्माते नव्हते असे प्रो सरकार सिद्ध करू पाहात आहेत वादविवादाकरिता वरील सत्र म्हणणे जरी खरे धरले तरी काय सिद्ध होते? केवळ स्थापन केलेले राज्य लवकर बुडाले म्हणून काय त्यांनी राष्ट्र निर्माण नाही केले ? मराठ्यांच्या पचवीस वर्षांच्या स्वातंत्र्ययुद्धात राजारामाचे वेळी जो चिकाटी, जे धाडस, जी अपूर्व राष्ट्रभक्ति दिसून आली ती काय शिवाजीने राष्ट्र निर्माण केले नसते तर दिसून आली असती ? आपल्या वतनावर पाणी सोडण्यात जर राष्ट्रीय दृष्टि नसती तर काय खंडो बल्लाळ सिद्ध झाले असते ? राष्ट्रीय दृष्टि नसती तर काय संताजी घोरपडे, धनाजी जाधव, परसोजी भोसले, पानसंबळ आणि अितर अनेक शत शत तरुण महाराष्ट्रवीर लोखंडाचे चणे खाता खाता रान सांडीत सांडीत स्वातंत्र्यसमर चालवू शकले असते ? अेक फितुरीचे कृत्य जरी केले असते, तरी मोगलांनी कोणत्याही क्षुद्र पाजिबाला नाअीक केले असते आणि नाअिकाला सरदार बनविले असते, परंतु या सर्व पारतंत्र्याच्या वैभवावर लाथ मारून सबंध जन्मभर रानावनातून वणवण करीत महाराष्ट्राचे दोन लाख वीर-सैन्य काय पचवीस वर्षेपर्यंत झगडत, मारीत, मरत हिंडले असते ? आपापसामध्ये चुरशीने लढणारे धनाजी-संताजी मुसलमानांच सैन्य यताच जर राष्ट्रीय वृत्ति नसती तर काय अैक्य होअून व वैर विसरून जाअून मुसलमानांशी लढले असते ? अितकेच कशाला, परंतु मनरोसाहेब ज्या शेवटच्या पेशव्याच्या दिवसाबद्दल गोष्ट बोलतो त्याच दहाबारा वर्षांच्या आगमागे भागानगरच्या निजा- माच्या दरबारात असलेल्या गोविंदपंत काळे या राष्ट्रभक्त वकिलाचे नाना-महाद- जींना समेट झाल्यावर नानांना आलेले अत्यंत मार्मिक आणि देशभक्तीने ओतप्रोत भरलेले पत्र मनरोसाहेबांनी वाचले का ? त्यांनी जरी वाचले नसले तरी श्री. यदुनाथ सरकारनी तरी ते वाचले असेल ना ? परिायन प्रयत्नाराबद्दल व मोगली

अुर्दू दप्तरांतील वाडातूनच काय तो ज्यांनी मराठ्यांच्या अितिहासाची भूमिक अभ्यासिली असे पूर्वग्रहदूषित अहंकारविमूढ नि मराठी अितिहासाचें हृद्गत समजणारे श्री. यदुनाथ या पत्राचा जरा शांतपणें विचार कसाला करतील ? मनच काय म्हणतो तेंच तेवढे त्याचें वेदवाक्य ! पुन्हा दीडशें वर्षेपर्यंत शिवाजीनें प्रचलि केलेल्या हिंदवी साम्राज्याच्या ध्येयानें महाराष्ट्रवीर जे लढले तो दीडशे वर्षांच काळ काय अगदी अत्यल्प झाला ? मग ह्याच विधानानुसार गेल्या महायुद्धात कंब मोडलेले जर्मनीचें राष्ट्र ज्याच्या प्रयत्नाने अेक संघटित साम्राज्य झालें होतें त्य प्रिन्स बिस्मार्कलाही केवळ दीडशे वर्षे तर राहो, पण शंभर वर्षे सुद्धा त्याचं संघटना टिकली नाही म्हणून राष्ट्रपित्याच्या टिपणीतून काढून टाकावें लागेल अजरामर राज्य असें कोणाचेच टिकलें नाही — म्हणून राष्ट्रनिर्माता असा जगात कोणीच झाला नाही म्हणावयाचा ? समर्थ आणि शिवाजी ह्यांनीच महाराष्ट्रास व्यक्तिमत्वाची जाणीव दिली. अेकजीव केलें. ' अेकराट ' केलें.

शिवरायाने केवळ राजकीय दृष्ट्याच आपल्या राष्ट्राचे पुनरुज्जीवन केले से नाही, तर सामाजिक अुदारता दाखवून बदलत्या काळाप्रमाणे रूढीला बदलून पली परपरा अविकृत ठेवण्याची जी तत्परता दाखविली ती पाहून आजच्या धारकाला सुद्धा खाली मान घालावी लागेल बजाजी निंबाळकरासारखा अभिजात रदार काही लालचीला, काही छळाला बळी पडून मुसलमान झाला असता हिंदु र्माच्या वर्धिष्णु, सर्वसंग्राहक व सर्वपाचक स्वरूपाकडे लक्ष देअून शिवाजीने आज जूनही ज्या नावाला काही अतिशहाणे दचकतात, ती शुद्धीची प्रथा सक्रिय सुरू ली बजाजी निंबाळकरास शुद्ध केले, अितकेच नव्हे तर त्या कुळात स्वतःच्या ळातील मुलगी देअून त्याला हिंदु समाजात पचवून टाकले त्याचप्रमाणे नेताजी ालकर ह्यालाही महाराजांनी शुद्ध करून पुनरपि हिंदु करून घेतले होते अशा ीतीने त्यांनी हिंदुसंघटन व शुद्धि ह्या दोन अमूल्य संजीवनी त्याही वेळेला प्रयोगात आणल्या होत्या

ज्याप्रमाणे राजकीय आणि सामाजिक अुत्थानाला शिवाजीने चैतन्य दिले होते, त्याचप्रमाणे राष्ट्राला प्राणाप्रमाणे असलेले वाङ्मयही त्यांना अुत्तेजित केले होत त्या वेळी अुर्दू भाषेने मराठी भाषेला जवळजवळ खग्रास ग्रहण लावीत आणले होते आणि जर शिवाजीने भाषाशुद्धीचा प्रयत्न करून मराठी भाषेला संस्कृतातून नवजीवन दिले नसते, तर आज मराठी भाषा कुठल्या कुठे विकृत झाली असती परंतु त्यांनी ' राज्यव्यवहारकोश ' करवून आणि अुर्दू शब्द काढून टाकण्याची प्रवृत्ति वाढवून मराठी भाषेची मोठी सेवा केली. कवींना, ग्रंथकारांना अुत्तेजन देणे ही राष्ट्रोद्धाराचीच कामे समजून शिवरायांनी तीही पार पाडली भूषण ह्या नावाचा अुत्तर हिंदुस्थानचा सुप्रसिद्ध राष्ट्रीय कवि शिवाजीने काही वर्षे आपल्या आश्रयास ठेवला होता व त्याच्याकडून स्वतःच्या चरित्रावर सुंदर ग्रंथ सिद्ध करविला होता त्याचप्रमाणे पंडित परमानंदाचे, गागाभट्टाचे आणि अनेक संस्कृत पंडिताचे स्वागत करून त्यांना यथान्याय व यथायोग्य आश्रय देअून गुणिजनांना आणि विद्वानांना आणि संस्कृत विद्येला त्याने अुत्तेजन दिले

मनुष्याचा अुत्सवप्रिय असलेला स्वभाव जाणून शिवरायाने गतस्वातंत्र्याचे पुनरुज्जीवन नि हिंदुपदपातशाहीचे पुण्याहवाचन रायगडच्या पुण्यभूमीवर सिंहासनारोहणाचा समारंभ घडवून आणून केले अनेक शतकेपर्यंत हिंदुस्थानच्या दैवी, शुभ्र असलेली हिंदु सिंहासने खचून गेलेली पाहण्याचा त्रास राजमुकुट हिंदूंच्या हातात येत होते, परंतु ते परक्याच्या मस्तकाला भूषित करण्याकरिता काय त ! छत्रचामरे ते पाहत होते, परंतु ती स्वतःच्या हातांनी परक्याच्या मस्तकावर ढाळावी लागत होती ! आणि हाय ! हे असे हृदयविदारक दृश्य अेक नव्हे, दोन न्हे, सतत पाचशे वर्षे हिंदु जातीच्या ललाटी लिहिले होते, परंतु शेवटी शिवाजीने मनु पालटविला त्याने हिंदु जातीच्या अितिहासातील आणखी अेक अद्भुत

दिवस असल्याने बादशहा औरंगजेब मशिदीत जावयाचा होता बादशहाची स्वारी सिद्ध झाली हजारो घोडा थयथयाटत स्वारीपुढे रांगांनी अुभा राहिला 'सहस्रो घोडेस्वार लखलखणाऱ्या तरवारी, भाले, बंदुका पेलीत त्या अश्वावर अैटीने स्वार झाले मध्ये प्रचंड हत्तीवरच्या अुंच अंबारीत औरंगजेब, बसून अेसाच्या दुष्प्राप्य दानवासारखा दिसू लागला ती स्वारी थोडी पुढे सरते तो त धरणे धरावयास आलेले सहस्रो हिंदु 'न्याय द्या! महाराज, न्याय द्या!' म्हणून ओरडत ओरडत स्वारीच्या मार्गावर आडवे झाले त्यास भालदार शिपाअी दूर करू लागले ते हटेनात हिंदूवर होत असलेले अत्याचार नि लादले जाणारे अन्याय्य कर दूर झाल्याविना आम्ही हलणार नाही अशी अेकच ओरड झाली औरंगजेब क्षणभर अुभा राहिला त्यास वाटले शेवटी शस्त्र प्रतिकाराने डाव जिंकला दगडासही पाझर फुटला दयेने अग्निही थंड झाला अितक्यात अेक मुल्ला म्हणाला, निमाजाची वेळ अगदी सन्निध आली आहे! अधिक थांबल्यास प्रार्थना अधर्म्य होअील औरंगजेब म्हणाला, 'चालवा हत्ती पुढे!' ते सहस्रो हिंदु म्हणाले, 'मायबाप! आमचे म्हणणे अैका, मग पुढे जावे' औरंगजेब म्हणाला, 'त्यास मार्ग सोडून अुभे करा'

महाराजांच्या चित्तात हा अुपदेश पूर्णपणे ठसला केवळ शौर्याने नव्हे नि केवळ कातर्याने नव्हे, केवळ दंडेलीने नव्हे नि केवळ नरमाअीने नव्हे, तर जिथे जसा प्रसंग पडेल तिथे तसे वागून आपले मुख्य ध्येय—आपले मुख्य अवतारकार्य—साधावयाचे, हा त्यानी निश्चय केला त्यानी निश्चय केला की—

> साप विखारी देशजननिचा ये घेअू चावा ।
> अवचित गाठुनि ठकवुनि भुलवुनि कसाहि ठेचावा ॥

महाराज ल्हानपणी शिकलेले त्याच्या राजनीतीचे हे मुख्य सूत्र प्रौढवयीही कधी विसरले नाहीत ते विजापुरास आपल्या पित्यासह गेले होते, तेव्हा त्या यवनी बादशहास पाहून दिपून जाण्याचे स्थली त्याचा सात्त्विक कोप भडकून अुठला त्याचे पाय अेखाद्या लोहस्तंभाप्रमाणे ताठ झाले ते कुर्निसात करण्यासाठी वाही केल्या लवेनात त्याचप्रमाणे विजापूरच्या दरबारात गाअीची होत असलेली हत्या पाहून त्यानी स्वत अेका मुसल्मानास छाटून काढले. त्यानी अफझुलखानाची मगरमिठी पडताच त्या प्रचंड दैत्यास अचाट साहस करून पोटात वाघनखें खुपसून खाली लोळविले ! भर मध्यरात्री शाहिस्तेखानाच्या प्रत्यक्ष राजवाड्यात शिरून त्याच्या सहस्रो सैनिकाचे भर गोटात त्यावर वार चढविला नि हा हा म्हणता पुन्हा जसेच्या तसे निसटून सिंहगड पाठीशी घातला असली अचाट कर्में करणारा शिवाजी भ्याड होता असे समजण्यास वा मानण्यास कोणाची छाती आहे? प्रत्यक्ष रामदासाना या त्याच्या अचाट साहसाची, कर्तीपणाची, जिवाविषयीच्या निष्काळजीपणाची भीति पडून 'मोहरा परला अभिमाना ॥ मग तो जीवाकडे पाहेना ॥' हे काही ठीक नाही असे शिवाजीस सांगावे लागले 'धुरेने युद्धास जाणे । अैसीं नव्हेत की राजकारणे । धुराच करून सोडणे । कित्येक लोक ॥' अशी चेतावणी द्यावी

रोमहर्षण प्रसंग गागाभट्टांच्या हस्तें स्वत चा विधियुक्त राज्याभिषेक करवून घेऊन घडवून आणला

धन्य तो दिवस, की ज्या दिवशी शिवनेरीच्या पडक्या दुर्गात जन्मास आलेलें, तोरणागडावर अडखळणारें, और य कंचित भोसले जाणार बुनाड पार अखिल हिंदु राज्याचे स्वामी झाले हिंदु जातीचे भाग्य पुनरपि उदयाला आलं हिंदु हें नाव जगात जिवंत उरलें

तो धन्य दिवस हाच! -हिंदुपदपादशाह शिवछत्रपतींना आज राज्याभिषेक आहे.! या ! पुण्यसरितांनो, आपल्या पवित्र जलानो आपली पात्रे भरभरून र गडच्या राजवाड्याकडे या ! आणि या हिंदु छत्रपतावर राज्याभिषेक कर पश्चिम समुद्र नि पूर्व समुद्र हे तुझे दोन्हा बाहू उभारून, ह हिंदुमहासागरा तु कोषागारातील अशेष रत्नामाल्याची उपायन ह्या हिंदुपदपादशहाच्या चरणों अर्पण कर !

ह्या अितिहास घडविणाऱ्या दिवसाला आज ठीक तानशे वर्षे झाला आ या तीनशे वर्षांच्या अवधीनंतर ह हिंदुस्थान ह्या राष्ट्रवीराला उचित अशा आप कृतज्ञतेचा करभार सादर करीत आहे त्या थारामोठ्याच्या करभारात हा मान्य कृतज्ञ पुरस्कार, शिवभूपते ! तू स्वीकार आणि अितकेच ' पसायदान ' दे न तुझी दिव्यस्फूर्ति आम्हा साप्रत हतवन बनलेल्या हिंदु जातीच्या अंगात संचा व्हावी आणि तू तीनशे वर्षांपूर्वी हिंदु राष्ट्राचे हिंदु धर्माचे आणि हिंदु नावाचे ज पुनरुज्जीवन केलेस तसेच आजही करावयासाठी तुझ्याप्रमाणे आम्हालाही सामर्थ्य यावे !!

# शिवरायांच्या यशस्वी राजनीतीचें अेक सूत्र

कातर्यं केवला नीति शौर्यं श्वापदचेष्टितम् ।
अत सिद्धिसमेताभ्यामुभाभ्यामन्वियेष स ॥

महाराज अगदी लहान होते आठ अेक वर्षांचे सुद्धा नसतील तेव्हापासून आपल्या धर्माची नि जातीची अवनति पाहून त्याचे हृदय तळमळत असाव तेव्हा-पासून या अवनतीच्या प्रतिकारार्थ मी काय करू शकेन याचे विचार त्याचे चित्तात घोळत असत तेव्हापासून माझ्या राष्ट्राच्या नि माझ्या धर्माच्या गौरवासाठी, स्वातंत्र्यासाठी सामर्थ्यासाठी मी आपले प्राणही देअीन ही प्रतिज्ञा ते करीत असावे त्याच्या त्या चिमुकल्या मस्तकात 'हिंदवी स्वराज्या'च्या प्रचंड कल्पना नि मनोहर स्वप्न अुदय पावत, विस्तार पावत प्रसार पावत, अेखाद्या विद्युत प्रवाहासारखी त्याच्या संगतीत राहणाऱ्या बालकांच्या, तरुणांच्या अितकेच नव्हे तर वृद्धांच्याही

रुमालाने हात बांधलेला, ' मला शस्त्राचे भय वाटते, कृपा करून आपण मला सडेच भेटावे ' म्हणून थरथरत कापत म्हणणारा, ठेंगणा, दचकत पाय टेकणारा, विजापूरच्या अपराधाची सेवकास क्षमा असावी अशी याचना करणारा नि मी माझे शिर कृतकर्मांची क्षमा मागून आपले पायी ठेवतो म्हणून अफझुल्खानापुढे गयावया करणारा अेक अगदी थिल्लरसा मनुष्य त्या मंडपात शिरला, तो शिवाजी होता त्याच्या त्या वेळच्या मुद्रेवरून, शब्दावरून नि वर्तनावरून पहाणारास असेच वाटले की, त्याहून भित्रा मनुष्य या जगात कोण आहे ?

तो अफझुल्खानासमोर आला, अफझुल्खाने त्यास सहज बगलेत दाबले — जसे आपण सहज अेखाद्या हरिणाची मान बगलेत दाबतो तो काय झाले ? तरवार चमकली पोटात वाघनखे घुसली तो धिप्पाड खान ची ची करीत अंकुशघाताने ची ची करणाऱ्या अेखाद्या हत्तीसारखा कोलमडू लागला पट्ट्यास पट्टा, खंजिरास खंजीर, तोफेस तोफ भिडली! खान ठार झाला ! खानाची फौज ठार झाली, अुधळली गेली शिर छाटून, पोट फोडून, गोट लुटून शिवाजी अेखाद्या सिंहासारखा गड चढू लागला! देवीचा सूड घेतला देवाचा सूड घेतला शत्रूचा बारा सहस्र घोडा पादाक्रांत करून बांधून टाकला अेवढ्या क्षणापूर्वी या जगातील अत्यंत भित्र्या मनुष्यासारख्या दिसणाऱ्या त्या शिवाजीहून आता या जगात अधिक शूर दीप्तिमान नि साहसी कोण ? त्या वेळी तो थिल्लर दिसला म्हणूनच या वेळेस त्याच्या मुद्रेवरील त्या दिग्जयी दीप्तीवर कोणाची दृष्टि ठरत नाही त्या मंडपात शिरतेवेळी तो मान अवनत करून शिरला म्हणूनच आता तो त्या मंडपातून विजयाचे पाठीवरील अुन्नत अंबारीत बसून मान ताठ करून बाहेर येत आहे!

'बादशाही क्षमा नि पजा यांनी अलंकृत झालेली आपली कृपापूर्ण आज्ञा येअून पावली. ह्यायोगें बादशहांनी मला जीवदान दिलें आहे. या पापी दासाचे अपराध क्षमेस पात्र नसताही बादशहांनी केवळ अुदार अंतःकरणानें कृपा केली हें त्यास मोठें भूषण आहे. मी आज्ञेप्रमाणे विजापूरकरांवरही चालून जाअून नि त्या युद्धात विशेष पराक्रम गाजवून पूर्वीचा कालिमा धुअून काढीन. आपल्या अनंत अुपकारांची फेड अशा तरी करीन.'

या 'मुसलमानी धर्मरक्षक' शिवाजीनें पुढें मुसलमानी धर्माचें 'गोब्राह्मण प्रतिपालक' छत्र अुभारून कितीं संरक्षण केलें नि 'तुमची नोकरी अिमानानें पाळीन' म्हणून वचन देणाऱ्या या अैंद्रजालिकानें त्या औरंगजेबाची चाकरी पुढें कशी बजाविली हें अितिहास-प्रसिद्धच आहे!

पण शिवरायाच्या कृत्याचा पुढचा अितिहास ज्याच्या अधळ्या डोळ्यांना दिसू शकला नाही किंवा त्या वीरसिंहाच्या मागच्या अनंत धाडसाची, अपूर्व साहसाची नि दीप्ततम तेजाची दीप्ति नि स्मृति ज्यांच्या थिल्लर नि कृतघ्न मनात राहू शकली नव्हती अशा तत्कालीन बाबाबापड्यांनी अेकच कोल्हेकुअी करण्यास आरंभ केला. अफझुलखानाकडे नुसत्या पाहण्यानेही ज्यांची गाळण अुडाली असती, आजन्म मुसलमानापुढें कुरनिसात करता करता ज्यांच्या गुडघ्यास घट्टे पडले होते नि विजापूरच्या नि दिल्लीच्या मार्गांतून गाअीच्या कसाअीखान्यासमोरून चालताना मुसलमान रागावतील या भयानें नाकास पदर लावून चालण्याचेही साहस ज्यांनीं केलें नाही असले भ्याड, देशशत्रूच्या नोकराणीचे नोकर तेही नाक मुरडून म्हणाले, की,' छी, भ्याला लेकाचा! अशी पत्रें धाडण्यापेक्षा शिवाजी मेला असता तर

नाही, शत्रूचे जे जन्माचे मिंधे, जे शत्रूवर धर्मयुद्धांत हात अुगारणें तर दूरच; पण दुसरें कोणी अुगारू लागताच, गर्जू लागणाऱ्या शत्रूच्या क्रोधाच्या डुरकाण्या अैकतानाही सकंप, दार लावून आंत चुलीपाशी जाअून बांगड्या भरून लपून बसतात नि जे तिथे मात्र शिवाजीच्या भित्रेपणाला हसतात अशा तुमच्यासारख्या लाख बायाबापड्या मेल्या तरी चिंता नाही असेंच अितिहास गर्जत राहणार!

अितक्यात 'मुसलमानी धर्मरक्षक' शिवाजीस बादशाहाने पत्र लिहिले.

'भेटीस या म्हणजे बादशाही कृपा संपादन कराल!' महाराजांनी युक्तीने मूग गिळून भेटीस जाण्याचे ठरविलें. तों औरंगजेबाने दरबारात पांच हजारी स्वारांत शिवाजीला अुभें केलें. पांच हजारी स्वारात शिवाजीला! — की, ज्याने अखिल भारताचे सिंहासनावर आपला अधिकार सांगितला — त्याला अुभें केलें. अंतर्गत तेज अुसळून बाहेर येअू लागलें, मुद्रा लाल झाली, रागाने पुटपुटत महाराज काही वाकडेतिकडे शब्दही पुटपुटत गेले; पण त्वरित त्या क्रोधाच्या तरवारीस तितिक्षेच्या कोशात तसेंच वळेच दाबून शिवाजीराजे नेमून दिलेल्या घरी गेले तों तें घर तुरुंग झाला नि औरंगजेबाचे सशस्त्र पहारे अुभे राहिले. त्या वेळेस आपल्या अंगीकृत कार्याकडे जावयास, हिंदुस्वातंत्र्यश्रीच्या भावी राजमंदिरात घुसावयास अेक लहानशी दिंडी काय ती अुघडी होती; पण तीतून मान अगदी खाली घालून, गर्वाचा ताठा अगदी नाहीसा करून, अपमानाच्या आकुंचनात् अंगें अगदी दडपून टाकून गेलें तरच क्वचित् त्या दिंडीतून निसटून पुढे जाण्याचा संभव होता. जर तिथे शिवाजी म्हणता, मी मान लववायचा नाही! मी हिंदु स्वातंत्र्याचा ध्वज! मी जीव गेला तरी लवणार नाही, तर तें कृत्य जरी निंदनीय झाले नसते तरी अभिनंदनीयही झालें नसते. तेव्हा ताठपणा नव्हे तर आकुंचनच अभिनंदनीय! पण निष्फळ नव्हे तर अभिनंदनीय असूनही सफळ होणारें होतें. म्हणून महाराजांनी त्या दिंडीतूनच हिंदु राज्यश्रीच्या मंदिराकडे जाण्याचा निश्चय केला. जो पहारेकरी येअील त्याची स्तुति केली. कोणास पेटाऱ्यातून मेवा धाडला.

थोडाच वेळ निघून गेला. महाराज सुरक्षित रायगडला आले आणि मग सिंहगर्जनेची खरी वेळ आली! दऱ्या-डोंगरातून तोफेने अशी गर्जना केली. तो महाराष्ट्राचा सिंहनाद अैकून पूर्वी ज्यास तुच्छतेने औरंगजेब 'अुंदीर' म्हणत होता त्यासच 'सैतान' असें त्रासाने म्हणू लागला.

थोडेच दिवसांत रायगडावर हिंदुपदपादशाहीची मुहूर्तमेढ रोवून, हिंदुश्रीचा स्वातंत्र्यध्वज अुभारून हिंदु सिंहासनावर गोब्राह्मणाचे पालनकर्ते श्रीशिवछत्रपति-महाराज औरंगजेबाचे छातीवर हिंदुसाम्राज्याची प्राणप्रतिष्ठा करते झाले! जय-सिंगाला ते शरणागतत्वाचे पत्र लिहिताना, मल्लयुद्ध पूर्ण भरांत असताना गलाम् पेच मारून अुलथून पाडण्यासाठीच पण त्याचे पुढे नम्र होअून त्याचे पायाला हात घालताना बायाबापड्या मूर्खपणाच्या ढोलाने नि तिरस्काराने शिवाजीवर ओरडल्या होत्या, 'थू: शरण गेला! शत्रूचे पाय धरले!' आता त्या पाय धरणाऱ्या हाताने तोच शत्रूचा पाय हिसडून टांग मारून त्याच पेचाने शत्रूस चीत करताच हरिद्वार-पासून कन्याकुमारीपर्यंत हिंदु जनता टाळी देअून गर्जली—गर्जत आहे—आणि गर्जत राहील की, 'भले वीर! खूप पेच मारला! शत्रूस चारी मुंड्या चीत केला!'

ही झाली शत्रूची गोष्ट. दुष्टाशी महाराज असे वागले. कपटनीतिपटूशी हें वर्तन झालें. पण सुष्टाशी? साधूशी? रामदास म्हणतात, 'आचारशील विचारशील। न्यायशील धर्मशील। सर्वज्ञ सुशील। जाणता राजा॥' की ज्याने अितक्या खटा-टोपाने संपादिलेले राज्य अेका कागदाच्या केवळ चिटोऱ्यावर केवळ अेका शब्दाने हें राज्य 'रामाचें' म्हणून निर्देश करून दासाचे झोळीत भिक्षा घातली आणि आपण 'हिंदुधर्मासाठी फकिरी घेतली!'

## आदानं हि विसर्गाय सतां वारिमुचामिव।

साध्य जर पवित्र आहे तर त्याचेसाठी गाजविलेलें शौर्य नि दाखविलेली नम्रता, केलेलें रण वा निघालेलें शरण, हीं दोन्हीही पवित्रच आहेत. जें जें साधन पवित्रतम साध्याचे सिद्धीस्तव अपरिहार्य नि अतो मनुष्यजातीस लाभकारक ठरते त्याचें त्याचें अवलंबन पवित्रच होय.

नाही, तसेच जे अभिमाने सिंधे, जे शत्रूवर धर्मयुद्धात हात अुगारणे तर दूरच, पण दुसरे कोणी अुगारू लागताच, गर्भ गळणाऱ्या शत्रूच्या क्रोधाच्या कुरकाण्या अैकतानाही सपप, दार लावून आत चुलीपाशी जाअुन वागड्या भरून लपून बसतात नि जे तिथे मात्र शिवाजीच्या भित्रेपणाला हसतात अशा सुमच्चामारल्या लाख बायाबापड्या मेल्या तरी चिंता नाही असेच अितिहास गर्जत रहाणार ! ।

अितक्यात 'मुसलमानी धर्मरक्षक' शिवाजीस बादशहाने पत्र लिहिले-

'भेटीस या म्हणजे बादशाही कृपा संपादन कराल !' महाराजांनी युक्तीने मूग गिळून भेटीस जाण्याचे ठरविले तो औरंगजेबाने दरबारात पाच हजारी स्वारात शिवाजीला अुभे केले पाच हजारी स्वारात शिवाजीला ! — की, ज्याने अखिल भारताने सिंहासनावर आपला अधिकार सांगितला—त्याला अुभे केले. अंतर्गत तेज अुसळून बाहेर येअू लागले, मुद्रा लाल झाली, रागाने पुटपुटत महाराज काही बादशहाकडे सन्दही पुटपुटत गेले, पण त्वरित त्या क्रोधाच्या तरवारीस निश्चिच्या कोशात लगेच वळेच दाबून शिवाजीराजे नेमून दिलेल्या घरी गेले तो ते घर तुरुंग झाला नि औरंगजेबाने सशस्त्र पहारे अुभे राहिले त्या वेळेस आपल्या अंगीहून कार्याकडे जावयास, हिंदुस्वातंत्र्याच्या भावी राजमंदिरात घुसावयास अेक लहानशी दिंडी मात्र तो अुघडी होती, पण तीतून मान अगदी खाली घालून, गर्वाचा ताठा अगदी नाहीसा करून, अपमानाच्या आकुंचनात अंगे अगदी दडपून दाबून गेले तरच क्वचित् त्या दिंडीतून निसटून पुढे जाण्याचा संभव होता जर तिथे शिवाजी म्हणता, मी मान लववायचा नाही ! मी हिंदुस्वातंत्र्याचा ध्वज ! मी जीव गेला तरी लवणार नाही, तर ते कृत्य जरी निंदनीय झाले नसत तरी अभिनंदनीयही झाले नसते तेव्हा ताठपणा नव्हे तर आकुंचनच अभिनंदनीय ! पण निष्फळ नव्हे तर अभिनंदनीय असूनही सफळ होणार होते-म्हणून महाराजांना त्या दिंडीतूनच हिंदु राज्यश्रीच्या मंदिराकडे जाण्याचा निश्चय केला जो पहारेकरी येअील त्याची स्तुति केली कोणास पेटाऱ्यातून मेवा धाडला. मी मुसलमानी धर्मरक्षक शिवाजी मी कधीही बादशहाशी वैर करणार नाही मी गरीब आहे मी अपराधी आहे !' अित्यादि निरोप त्यांनी मुसलमानी सरदारास धाडले नि अेक दिवस त्या पेटाऱ्यातील पेढे, मिठाअी नि अफू खाअून गुंग झालेल्या सरदाराचे हातावर तुरी देअून महाराज त्यांचे हातून निसटून गेले ! ज्या वेळेस ते अेका पेटाऱ्यात अंगे आवळून वर भूस खाली भूस, वर मिठाअी खाली मेवे असे अेखाद्या पिंजऱ्यात पडलेल्या अुंदरासारखे दमले होते, त्या वेळेस ते तसेच पहारेकऱ्यास सापडते तर औरंगजेब मोठ्याने हसून निश्चित म्हणाला असता, 'देखो यह बेशरम अेक पहाडका चुवा है ! कैसा चुवेके माफक छिपता है, देखो!' पण त्या वेळी अुंदरासारखे होणे हेच खर शौर्य होते त्या वेळेस सिंहासारखी गर्जना करणे ही शौर्याची केवळ विटंबना मात्र झाली असती !

थोडाच वेळ निघून गेला. महाराज सुरक्षित रायगडला आले आणि मग सिंहगर्जनेची खरी वेळ आली! दर्या-सागरातून तोफेने अशी गर्जना केली की महाराष्ट्राचा सिंहनाद अैकून पूर्वी ज्यास तुच्छतेने औरंगजेब 'अुंदीर' म्हणत होता त्यासच 'सैतान' असं त्रासानं म्हणू लागला.

थोडेच दिवसात रायगडावर हिंदुपदपादशाहीची मुहूर्तमेढ रोवून, हिंदुश्रीचा स्वातंत्र्यध्वज अुभारून हिंदु सिंहासनावर गोब्राह्मणाचे पालनकर्ते श्रीशिवछत्रपति-महाराज औरंगजेबाचे छातीवर हिंदुसाम्राज्याची प्राणप्रतिष्ठा करते झाले! जय-सिंगाला त शरणागतत्वाचं पत्र लिहिताना, मल्लयुद्ध पूर्ण भरात असताना शत्रूला पेच मारून अुलथून पाडण्यासाठीच पण त्याचं पुढे नम्र होअून त्याचे पायाला हात घालताना बघ्यांपैकच्या मूर्खपणाच्या ढोलानं नि तिरस्काराने शिवाजीवर ओरडल्या होत्या, 'थू! शरण गेला! शत्रूचे पाय धरले!' आता त्या पाय धरणाऱ्या हाताने तोच शत्रूचा पाय हिसडून टांग मारून त्याच पेचाने शत्रूस चीत करताच हरिद्वार-पासून कन्याकुमारीपर्यंत हिंदु जनता टाळी देअून गर्जली — गर्जत आहे — आणि गर्जत राहील की, 'भले वीर! खूप पेच मारला! शत्रूस चारी मुंड्या चीत केला!'

ही झाली शत्रूची गोष्ट. दुष्टाशी महाराज असे वागले. कपटनीतिपटूशी हे वर्तन झाले. पण सुष्टाशी? साधूशी? रामदास म्हणतात, 'आचारशील। विचारशील। न्यायशील। धर्मशील। सर्वज्ञ सुशील। जाणता राजा॥' की ज्याने अितक्या खटा-टोपाने संपादिलेले राज्य अेका कागदाच्या केवळ चिटोऱ्यावर केवळ अेका शब्दाने हें राज्य रामाचं म्हणून निर्देश करून दासाचे झोळीत भिक्षा घातली आणि आपण 'हिंदुधर्मासाठी फकिरी घेतली!'

## आदानं हि विसर्गाय सतां वारिमुचामिव।

साध्य जर पवित्र आहे तर त्याचेसाठी गाजविलेलं शौर्य नि दाखविलेली नम्रता, केलेलं रण वा निघालेले शरण हीं दोन्हीही पवित्रच आहेत. जें जें साधन पवित्रतम साध्याच सिद्धीस्तव अपरिहार्य नि अतो मनुष्यजातीस लाभकारक ठरत

जनतेच्या कल्याणासाठी मी केव्हा 'वळीस' अगदी दुर्बळ दिसणारी वामनमूर्ति धारण करीन, जरासंधाच्या नगराच्या महाद्वारातून विजयवाद्य वाजवीत शिरण्याचा मूर्खपणा करण्याचे स्थली छद्मवेषात आडमार्गाने दीनासारखा प्रवेशीन, कालयवनापुढे भरधाव पळ काढीन, मुचकुंदाच्या गुहेत लपेन, भीमासारखा सैंपाकी होअीन, पण संधि साधताच अेकाअेकी अुलटून रामासारखा रावणावर तुटून पडेन, नरसिंहासारखा घोर होअीन, अभिमन्यूसारखा विजय पाहण्याचीही आशा न धरता मारला जाअीन—पण——

व्यूही शिरेन सरसा मागे परतेन अेक पदही न ।

शिवरायाच्या राजनीतीचे हे मूळ होते, म्हणूनच औरंगजेबासारख्या कपटी, बापास बाप न म्हणणाऱ्या, मुसलमानी बादशहाच्या तोंडीस तोंड देअून त्यांना हिंदुपदपादशाही स्थापन करता आली

शिवरायाच्या यशस्वी राजनीतीचे हे मर्म होतें अेतदर्थच

कातर्यं केवला नीतिः शौर्यं श्वापदचेष्टितम् ।
अतः सिद्धिं समेताभ्यामुभाभ्यामन्वियेष सः ॥

या नीतिसूत्राचे आधाराने वागून शिवाजी स्वराज्य स्थापू शकले ! शिवाजी शिवाजी होअू शकले ! !

\+ + +

# अटकेवर हिंदु विजयाचा भगवा झेंडा

## (१)

हिंदूच्या अर्वाचीन अितिहासात, म्हणजे कमीत कमी गेल्या अेक हजार वर्षांत हिंदुमात्रास अत्यंत मंगलकारक, अत्यंत अभिमानार्ह आणि अत्यंत गौरवास्पद असा जर कोणता दिवस अुगवला असेल, तर तो तो होय की, ज्या दिवशी हिंदूच्या भगव्या झेंड्यास झुंजवीत नेअून, मुसलमानांच्या बादशाहीचे तुकड्यामागून तुकडे अुडवीत हिंदूच्या साम्राज्याचे प्रांतामागून प्रांत अिस्लामी राज्यसत्तेच्या गुर्मीच्या छाटून टाकलेल्या पंज्यातून विमुक्त करीत हिंदूच्या विजयी सैन्यांनी त्यास अि. स. १७५८ च्या अेप्रिल मेच्या संधीस अटकेवर रोविले!

अेकंदरीत पाहता दाहिर राजाच्या पराभवापासून म्हणजे आठव्या शतकापासून हिंदूच्या पडत्या काळास आरंभ झाला. अफगाणिस्थानापासून तो बंगालच्या शेवटच्या नगरापर्यंत आणि काश्मीरपासून तो रामेश्वरापर्यंत हिंदूची सारखी पिछेहाट होत होत सर्व हिंदूची राजसत्ता मुसलमानांच्या हाती गेली. जर या पराभवाचे अुट्टे हिंदूना केव्हाही काढता आले नसते तर हिंदु जातीस आणि हिंदु संस्कृतीस जगात तोंड काढण्यास जागा अुरली नसती. जेथे तेथे सारखी हिंदूचीच हार होत आली होती. त्यामुळे मुसलमानासच नव्हे तर अुभ्या जगास सहजच असे वाटू लागले असते की, हे हिंदु स्वभावतःच दुसऱ्याचे दास होअून राहण्यास योग्य आहेत. हिंदु संस्कृति ही मनुष्यमात्रास शेळपट, घरघालू, भित्रा आणि निर्जीव करणारी आहे. हिंदु हा जिवंत कलहात मुसलमान किंवा पोर्तुगीज किंवा अिंग्रज यांच्यापुढे टिकाव धरू शकण्यास कधीही समर्थ होणारा नसल्यामुळे सृष्टीच्या निर्दय पण कार्यक्षम नियमाप्रमाणे तो हिंदु राष्ट्र राष्ट्रांच्या झुंजीत मेलेच पाहिजे. मुसलमान तर अितकेच म्हणून थांबेनात. त्यांचे सहस्रावधि मुल्ला आणि मौल्वी मुसलमानांनी हिंदूवर मिळविलेल्या अखंड जयाकडे बोट दाखवून सर्व जगास सांगू लागले की, 'हे पहा! हे हिंदु मुसलमानांपुढे जे गोगलगाय होअून जातात ते काही त्यांच्यात जूट नाही म्हणून, मुसलमानांवर ते भोळसटपणे विश्वास टाकतात म्हणून, त्यांचे सैन्यसंघटन ढिले आहे म्हणून किंवा त्यांच्यात आत्मनाशक दुष्ट रूढी शिरल्या आहेत म्हणून नव्हे तर ह्या आनुषंगिक दोषांपेक्षा त्यांच्या प्रत्यक्ष मूळप्रकृतीतच अनुस्यूत असलेल्या न्यूनामुळेच होय. हिंदु सामरिक कूटनीतीत अक्षम, फूट पडलेला, असंघटित

'श्रद्धानंद' १० मे. १९२८

आहे, म्हणूनच तो मुसलमानांच्या पुढे गांगरगाय झाला असे नव्हे तर हिंदु हिंदु आहे म्हणूनच तो मुसलमानांपुढे हतबल ठरतो आणि हिंदु हिंदु आहे तोवर तो तसाच ठरणार! हिंदु मूर्तिपूजक आहे – मुसलमान मूर्तिभंजक आहे. हिंदु हरला, मुसलमान जिंकला. अर्थात् मूर्तिपूजक हा हरावयाचाच आणि मूर्तिभंजक हा जिंकावयाचाच! हिंदूंचा धर्म खोटा, हिंदूंचे तत्त्वज्ञान पोकळ, हिंदूंचे रक्त नि सत्त्व म्हणून हिंदूंकडे देवाने स्वतःच पाठ फिरविली आहे आणि त्यांना तो जय देत नाही. अहिंदूंना देव जय देतो, याअर्थीच अहिंदूंचा धर्म खरा, त्यांचे तत्त्वज्ञान सत्य, त्यांचे रक्त जिवंत नि जिवंत राहण्यास योग्य! असा कांटिश्रम मुल्ला आणि मौल्वी सरसकट बडबडू लागले होते. इतकेच नव्हे, तर त्यांच्या त्या पुष्पित वाग्विवादाचा पगडा पडून कित्येक हिंदूंचा देखील बुद्धिभ्रंश होत चालला. मुसलमानांच्या प्रत्येक समरविजयाबरोबर हिंदूंचा एकेक राजमुकुटच चूर्ण होत असे असे नव्हे तर त्यांच्या संस्कृतीच्या आत्मविश्वासाचा आणि हिंदुत्वाच्या जाणिवेचाही एकेक धागा तुटत जाई. जर हीच स्थिति तशीच राहती, जर रणक्षेत्रावर हिंदूंस पराजयामागून पराजयच येत राहते, तर अहिंदूंचे काय पण सृष्टि देखील तिच्या निर्घृण, निष्ठुर स्वभावानुरूप अशा अकर्मण्य आणि दुबळ्या राष्ट्राकडे पाठ फिरविती आणि त्याच्या भाळी 'जीवनकल-हात मरण्यासच योग्य' अशी मुद्रा ठोकून त्यास काळाचे जबड्यात ढकलून देती! आज हे जगत् हिंदुशून्य होऊन राहते. हा देश स्वतःस हिंदूंचे हिंदुस्थान न म्हणविता हिंदूंचे कबरस्थान म्हणविता! (कारण कुणी काहीही म्हटले तरी ज्यास झगड्यात झगडता येत नाही आणि जिंकता येत नाही त्यास जगात जगता येत नाही – येणार नाही! हा सृष्टीचा निष्ठुर नियम आहे. दुबळ्यांनी पशु अिच्छेच्या गुलाबाच्या फुलामध्ये 'झगड्यात जो जिंकेल तो जीवनात जगेल!' हा निष्ठुर नियम खोदलेली ती निसर्गाची तरवार कितीही झाकली तरी तिची जीवघेणी धार आणि त्या निसर्गाची ती 'red in tooth and claw' असणारी रक्ताळ वाघनखे ही काही

त्या ग्रहणाच्या मोक्षकालाचा पहिला विपल जन्मला. तो त्या वेळेस कोणास कळला नाही. केवळ अितिहासाच्या अुलट्या दुर्बिणीतून आज तो दिसू लागला आहे. शिवाजीने हिंदूंच्या स्वतंत्र साम्राज्याची संस्थापना केली. तो रणक्षेत्रात अुतरला तेव्हा 'न्यायाचा जय होअीलच!' ह्या दैववादाची माळ घेअून न अुतरता तो निसर्गाचीं निष्ठुर वाघनखे घेअून अुतरला. 'रणक्षेत्रात जिंकील तोच जीवनक्षेत्रात जगेल!' हा निसर्गनियम आहे ना? ठीक आहे, असेल! पण तो अमोघ आहे; तो अनुल्लंघ्य आहे. म्हणून त्याच्या त्या निष्ठुरतेस निष्ठुरतेनेच तोंड देअून त्या 'red in tooth and claw' असणाऱ्या जीवनकलहाच्या वाघनखानेच अहिंदु गर्वाच्या अफझुलखानास मी चिरीन, ही हिंदुपराक्रमाने प्रतिज्ञा केली आणि भगव्या झेंड्याच्या तळाखाली भयंकर संगर माजलें!

लढाअीमागून लढाअी झाली; पण पूर्वी हिंदूंना जितक्या निश्चिततेने अपजय येअी, तितक्याच निश्चिततेने त्या दिवसापासून अहिंदूंना अपजय येत गेला. जेथे जेथे मुसलमान भेटला, मग तो मोगल असो वा पठाण असो, सय्यद असो वा शेख असो—तेथे तेथे हिंदूंनी—मग तो रजपूत असो वा बुंदेला असो, मराठा असो वा शीख असो—त्यास पिटून काढले. केवळ मुसलमानासच नव्हे तर अिंग्रज, पोर्तुगीज, डच—जो जो अहिंदु दिसला त्यास हिंदूंनी होअून होअून टक्कर देअून रणक्षेत्रात चारी मुंड्या चीत केले. अशी चढती कला अटकेच्या विजयापर्यंत सारखी चालली. रणक्षेत्रात जो जिंकील तोच जीवनक्षेत्रात जगावयास योग्य! या शत्रूंच्या रानटी परंतु अखंडनीय कसोटीप्रमाणे विजेता हिंदु जगावयास योग्य ठरला आणि म्हणूनच आजही तो जगलेला आहे आणि भविष्यकालीही जगू म्हणून म्हणत आहे.

शिवाजीची जन्मघटी हा हिंदुपराक्रमाच्या सूर्याचें सातशे वर्षाचें खग्रास ग्रहण सुटण्याचा पहिला विपल होता. तेथून तें ग्रहण सुटत सुटत ज्या दिवशी हिंदुपदपादशाहीचा मराठी घोडा अब्दालीच्या सेनेस हाणीत, हटवीत, हुसकावीत अटकेस पोचला त्या दिवशी तें ग्रहण पूर्णपणें सुटून हिंदूचा प्रताप आपल्या सहस्ररश्मींनी

अितिहासाच्या अुलटया दुर्निणीने काय तो त्या दिवसाचे महत्त्व आज दिसू शकेल आणि आपण त्या जयंत्या पाळतो हें ठीकच आहे, परंतु ह्या सर्व जयंत्यास जे महावीर जन्मले त्याच्या पृथक पराक्रमाच सभूयफलित ज्या दिवशी दृग्गोचर झाले, त्याच्या अनक कष्टाच ज्या दिवशी सार्थक झाले ज्या दिवशी त्यानी हिंदुत्वाच्या गौरवार्थ आरंभिलेल्या शतकव्यापक महान् युद्धाचे साथक होअून रामेश्वरापासून अटकेपर्यंत हिंदुस्थानभर हिंदूच्या देशावर हिंदूची सत्ता गाजू लागली तो अटकेच्या विजयाचा दिवस हा अुगवला तेव्हा ह्या मित्राचेच नव्हेत तर शत्रूचेही डोळे दिपून जावत अशा महान तेजाने तळपत अुगवला ! ( प्रतिज्ञेहून पूर्ति ही जितकी अधिक आश्वासक आणि अभिमानार्ह असते, तितकीच जयंतीतिथीहूनही अटकेची ही विजयतातिथि अधिक अभिमानार्ह आहे बीजारोपणाच साफल्य जस फळाच्या घोसानी वाकलेल्या तरूत होते, पेरणीच्या दिवसाच साफल्य जस फलतूच्या दिवसात होते त्याचप्रमाणे वारजन्मतिथीस ह्या विजयतीतिथि सफल करतात ) अरावण मराम वा जगदचेति निश्चित ।। अशी घोर प्रतिज्ञा करून ठाणलेल्या झुजीत ज्या तिथीस रावणाची दाही शिर रामाने छाटली त्या विजयतिथीनेच ज्या रामाच्या जन्मतिथीस शोभा आली, किंबहुना या विजयतिथीनेच त्या जन्मतिथीस जयंती अस नाव साथपणे धारण करण शक्य केले त्याचप्रमाणे सात पिढयाच्या हिंदु पराजयाचा सूड घेणाऱ्या हिंदु वीराच्या अटकेच्या विजयाने त्या सात पिढयाच्या जन्मतिथींना जयंत्याचे वैभव अर्पण केल अेतदथ अर्वाचीन हिंदु अितिहासात जो दिवस व ज्या घटना गौरवपर आहत त्या सव दिवसात आणि घटनात अटक-विजयाचा दिवस आणि घटना अत्यंत गौरवास्पद आहे कारण त्या दिवशी सातशे वर्षांनंतर मुसलमानाच्या हातून अुभ हिंदुस्थान जारतीत जारती शत्रूंनी विमुक्त होअून हिंदुपदपादशाहीचा अुचाताल अुच कळस अुभारला गेला !

काबूल आणि दिल्ली या दोन्ही अिस्लामी सत्ताच्या मर्यादेस खिळखिळया करून आमच्या मराठ्यानी पंजाब प्रातासही अटकेपर्यंत मोकळा केल्यानंतर पुढे आमच्या हिंदु शिखानी पंजाबातून मुसलमानी राज्याच नित्याच अुच्चाटन करून अटकेच्याही पलीकडे अुतरून काबूल नदीवर हिंदूचे ध्वज रोवले हें खरे पण त्या वेळेस अिकडे दिल्लीच्या साऱ्या हिंदुस्थान असा नव्याच परकीय सत्तेचे—अिंग्रजचे—हाती पडला असल्याने हिंदुसत्तेच्या अधिकात अधिक विस्ताराच्या दृष्टीने हा

त्या दिवशी हिंदु शक्ति जितकी प्रखर तेजाने तळपली तशी आजपर्यंत पुनश्च कोणत्याही दिवशी तळपू शकली नाही. यद्यपि यापुढे मात्र ती त्या दिवसापेक्षाही अधिक तेजस्वी, ओजस्वी आणि यशस्वी होओ् अिच्छीत आहे.

तशी ती भविष्यकाली व्हावी म्हणून ह्या अत्यंत शक्तिहीन आणि स्फूर्तिहीन वर्तमानकालाच्या विषारी वातावरणातून अेक दिवसभर तरी निघून त्या भूत-कालाच्या अत्यंत स्फूर्तिदायक वातावरणात शक्तिसंचयार्थ श्वासोच्छ्वास करण्या-साठी आपण त्या अर्वाचीन हिंदु विजयाच्या स्मृतीच्या अत्यंत अुच्च, पूज्य आणि पवित्र शिखरावर आजचा आठवडा घालवू या!

\+ \+ \+

## (२)

ज्या दिवशी मराठ्यांच्या सेना, त्यांचे सेनापति रघुनाथराव पेशवे यांचे हाताखाली अटकेपर्यंत मुसलमानांस जिंकीत गेल्या, त्या अेप्रिल-मे सन १७५८ मधल्या दिवसांचा अभिमान प्रत्येक हिंदुमात्रास असला पाहिजे. कारण तो विजय हिंदुमात्राचा होता. आम्ही महाराष्ट्राच्या काय किंवा बुंदेल्यांच्या काय, रजपुतांच्या काय किंवा शिखांच्या काय—हिंदुस्थानात हिंदुजगत् आणि अहिंदुजगत् ह्यात झालेल्या अनेक शतकव्यापी महायुद्धास अेकाच संकलित हिंदु अितिहासाची केवळ पृष्ठें समजतो. ह्या अखिल हिंदु दृष्टीनेच आम्हांस ह्या अटक-विजयाचा अत्यंत अभिमान वाटतो. कारण त्या दिवशी हिंदुसत्ता प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे सर्व हिंदुस्थानभर पुनरपि स्थापित झाली होती!

दक्षिणेकडून आरंभ करून सरासरी सन १७६० च्या वर्षाचें निरीक्षण करू या. हें पहा त्रावणकोरचें राज्य; तें हिंदुच आहे. म्हैसूरचें अजून हिंदूंचेच हातात होतें. अर्काट-तंजावरपर्यंत लहान-मोठी राज्यें काही प्रत्यक्ष, काही अप्रत्यक्षपणे मराठ्यांचे कह्यात होतीं. त्यापुढे कोंकणपट्टीत पोर्तुगीजांवर मराठ्यांनी मोठा विजय मिळवून, त्यास गोव्यापर्यंत मागे रेटलें होतें आणि कोंकण बहुश: आपल्या हिंदु राज्यात समाविष्ट केलें होतें. महाराष्ट्र, अुभी गुजराथ, धार, अिंदूर, ग्वाल्हेर, बुंदेलखंड आणखी खालती नागपूर ते ओरिसापर्यंतच्या विस्तृत प्रदेशावर सलग आणि स्वतंत्र अशा मराठ्यांच्या हिंदुपदपादशाहीची प्रत्यक्ष सत्ता चालत होती. निजामाचें तेवढें अेक मुसलमानी राज्य दक्षिणेत होतें; पण त्यातही मराठ्यांच्या चौथाअीची व सरदेशमुखीची नखें खोल रुतलेली असून, ते वस्तुत: अेक मांडलिक राज्य झालेलें होतें. ओरिसाच्यापुढे बंगाल. त्या बंगालच्या नबाबाने महाराष्ट्रीय हुकुमतेस चौथाअीची लक्षावधि रुपये खंडणी देण्याचे मान्य करून त्याच वेळी

आपला जीव सोडवून घेतला होता अशा रीतीने राजपुतान्यापर्यंतचा प्रदेश प्रत्यक्ष मराठी हिंदूंचे राज्यात मोडला गेलेला राजपुताना पजाबपर्यंत रजपूत हिंदूंच्या हातात आटही हिंदुच दिल्ली मराठ्यांचे पक्षात पलीकडे नेपाळ हिंदुच अयोध्येचा वजीर तेवढा उरला तोही,मराठ्यांच्या चौथाईने निजामाप्रमाणेच नरम करून टाकलेला मुसलमानी सत्ता अशी रामरवर ते दिल्लीपर्यंत बहुधा नावाची देखील उरली नव्हती राहता राहिला पजाब

मराठी सेनपुढे भीत झालेल्या हिंदी मुसलमानानी माठा कट करून पजावातील राहिली-साहिली मुसलमानी सत्ता वाचविण्यास आणि हिंदूंच्या वाढत्या शक्तीस नाहीशी करण्यासाठी अबदालीला हिंदुस्थानात बोलाविले जि स. १७५६–५७ त त्याने पजाब आपल्या हातात घेतला, दिल्लीत प्रवेश केला मथुरेपर्यंत हिंदु तीर्थांचा आणि क्षेत्राचा विध्वस करीत तो खाली आला, परतु मराठ्याच्या मोठमोठ्या सेना दिल्लीकडे चालत येतातस पाहून तो परत फिरला त्याचे मनात त्याचा मुलगा तैमूरशहा यास दिल्लीच्या सिंहासनावर बसवावयाच होते, पण सध्या त्यास पजाबचा प्रात साभाळण्यास नेमून अबदाली परत गेला

अितक्यात मराठी सेना दिल्लीवर आल्या। मल्हाराव भगवत, गगाधर यशवत अित्यादि मराठी सेनानायकानी दुआबात प्रवेश केला आणि रोहिल्यास आणि पठाणास माडून काढले विठ्ठल शिवदेव दिल्लीवर चालून गले आणि अबदालीच्या पक्षास पिटून दिल्ली हिंदूंचे हातात घेतली हिंदूचा हाडवैरी नजीब अुद्दौला यास जिवत पकडला आणि पजाबवर स्वारी केली सरहिंदला अबदुल सय्यद दहा हजार पठाणानिशी अबदालीने ठेवला होता त्या दहा हजाराशी लढाअी देअून त्याच्या नायकाला मराठ्यानी पाडाव करून धरले ह्या मराठ्याच्या अप्रतिहाय बलापुढे टिकाव धरणे अशक्य पाहून हिंदुस्थानचा बादशहा होअू पाहणारा अबदालीचा पुत्र आणि प्रतिनिधि तैमूरशहा भिअून पळू लागला लाहोरात मराठ्यानी विजयाच्या दुदुभि वाजवीत प्रवेश केला तत्काळ ते पळत्या पठाणी सेनेवर चालून गेले तैमूरची युद्धसामग्री मराठ्याच्या हातात पडली त्याचे शेकडो लोक कापले गेले आणि प्रत्यक्ष शिबिर मराठ्यानी लुटून काढले। अुभ्या हिंदुस्थानचा बादशहा होणारा तैमूर आणि ते पठाण जीव हाती घेअून कसेबसे सिंधूपार झाले आणि हिंदूच्या विजयी घोड्यान सिंधुनदीपर्यंत चाल करून अटकेलाच काय ते आपले लगाम, आपले रश्मी ढिले केले अेव च मराठ्याच्या हातात पजाब आणि सिंध ह्या दोन अुरलेल्या मुसलमानी सुभ्याचीही सत्ता आली

चौथाओ देत होते आणि दिल्ली ते पंजाबपर्यंतचा प्रदेश महाराष्ट्रीय हिंदु सेनापतीच्या सैनिक शासनाखाली होता अर्थात् खि स ७३२पासून आज सन १९२८ पर्यंत हिंदूंच्या हातात हिंदुस्थानचा जितका विस्तृत प्रदेश कधीही आला नाही तितका अटक विजयाच्या आठवड्यात आलेला होता ! हे स्पष्ट होण्यासाठी त्या विजयी स्वारीतील हिंदु सेनापतींचीच अेक-दोन तत्कालीन पत्रे आम्ही आज प्रसिद्ध करीत आहात ती पत्रे अशी

## रघुनाथरावास अंताजी माणकेश्वराचें पत्र

(हिंदूंचे सेनापति श्रीमंत रघुनाथराव ह्यानी लाहोरवर आक्रमण करुन ते घेतल्याचे वृत्त कळल्यानंतर अंताजी माणकेश्वर ह्यानी जे त्या वेळी पत्र लिहिले आहे ते आम्ही खाली देत आहो ह्या पत्रावरुन पृथ्वीराजानंतर हिंदूंचा विजयी अश्व पुन्हा जेव्हा त्या पवित्र पंचनद्याच्या—पंजाबच्या प्रदेशात दौडत गेला, त्या वेळी प्रत्येक हिंदु अंत करणाला कोण अभिमान वाटला हे वाचकास दिसून हृदय गर्वाने अुत्तेजित होइल )

अंताजी माणकेश्वर म्हणतो —‘ सेवकास स्वामींनी कृपा करुन पत्र (१८ अेप्रिल १७५८ चे) पाठविले ते पावले वर्तमान लाहोरच्या फत्तेचे, शत्रूच्या पारिपत्याचे व तिकडील मुलूख काबीज केल्याचे लिहिले ते सविस्तर वाचून परम आनंद झाला, तो पत्री कोठवरी लिहावा ! हिंदुस्थानात कीर्त लौकिक मातबर जाली कुलराज अुमराव, सुभे यास दहशत पडली सारे हिंदुस्थानचा मुंडे अब्दालीपासून अेक स्वामींनी घेतला तेणेकरुन यशाचे पर्वत जाले स्वामी यशस्वीच आहेत याचा विचार सेवकास लेखन करावयास सामर्थ्य कैंचे वर्तमान वजिरानी अैकोन बहुतच हर्ष मानिला स्वामी अवतारी पुरुष आहेत त्याची स्तुति मनुष्यानी काय करावी जरी स्वामींची छावणी लाहोर प्रांती जाली तरी वजीर पानमहास घेअून छावणीस आपल्याजवळ घेअून येतो ’

## राघो भरान्याचें अटकेहून शनवारवाड्यास पत्र

(हिंदुपदपादशाहीची मर्यादा अटकेपार नेणारे हिंदूंचे सुप्रसिद्ध सेनानी श्रीमंत रघुनाथराव पेशवे ह्यानी खालील पत्र श्रीमंत नानासाहेब पेशव्यास पाठविले होते त्या वेळच्या मराठ्यांच्या मनगटात केवढे दुर्दात सामर्थ्य व हृदयात केवढी विश्वव्यापी महत्त्वाकांक्षा अुसळत होती हे हल्लीच्या कूपमंडूकवृत्तीच्या त्यांच्या वंशजानी नीट पारखून पाहावे ! )

दि ४ मे १७५८ या दिवशी रघुनाथराव पेशव्यास लिहितो — लाहोर, मुलतान काश्मीर वगैरे अटकेअलीकडील सुभ्याचा बंदोबस्त करुन अमल बसवावा त्यास काही जाला, काही होणे तोही लवकरच करितो त्यमुर, सुलतान व जहान,

खान याचा पाठलाग करून फौज लुटून घेतली थोडीशी झडत पडत अटकेपार पिशावरास ते पोचले अब्दाल्ली अिराणावर चालून गला, त्याची फौज अिराणच्या पातशहानें लुटून घेतली अब्दाली कदाहारास आला अिराण्याची फाज पाठलाग करीत आली आहे जबरदस्तखान व मुकरबखान या प्रांतीचे सरदार व जामानदार अब्दालीचे जबरदस्तामुळे त्यास रुजू हात तेही बदलोन हगामा करितात हल्ली रफीक होअून सेवा करून दाखवू अब्दालीस तबी करा असा त्याच्या अर्ज्या आल्या आहेत अब्दालाचा घर मुटला आहे साराा त्याचा जोर तिकडून होतो अैस नाही तिकडून अिराणचे शहाने जेरदस्त केल अिकडून जोरा पोचवून सरकारचा अमल अटकेपार करावा त्याचा पुतण्या व दौलतेचा वारस स्वामीपाशी देगास आला तो स्वामीना आम्हाकडे पाठविला होता त्यास अटकेपलीकडे थोडीशी जागा बसावयास देअून अटकपार काबुल पिशावरचा सुभा देअू अब्दालीच्या फौजेवर अब्दुल समदखान सरहिंदेत होता तो सरकारात पाडाव आहे तो व आणखी या प्रांताची फौज अिराणी मागत देअून मशारनिल्हची रवानगी करतो हे तिकडील पैरवी करितील स्वामीच पुण्यप्रताप अब्दालीस जोरा पोचवून तबी करिताल पारिपत्य अुत्तम प्रकार करून अटकपार अमल बसवितील लाहोर प्रांत रेणको अनाजा व रायाजी सखदेव असे ठेविले गोपाळराव गणेश याचाही पगाम आहे तेही राहतील अिराणच पातशहाचे स्वदस्तुरचे कागदही आम्हास व मल्हाररावास आले होते का लवकर कदाहारेस याव आणि याच पारिपत्य करून अटकेचा हद्द करावी परतु आम्हा तरा काबुलचा सुभा अब्दुल रहिमखान स्वामानी पाठविला त्यास दतो फौज वगैरे थाडेबहुत मानित्यही करितो काबुल व कदाहार हे अटकपारचे सुभे हिंदुस्थानकडे अकबरापासून अलमगीर पावेतो होते ते आम्ही विलायतत का द्यावे ? यास्तव तूत यथे सुभे दतो त्यासही (अिराणचे शहास) या सुभ्याचा दरकार नसेल तो अिराणचा अमल करील आम्ही कधार पावेतो अमल बसवून तूत त्यास गोडच जाब पाठविणार आहो जबु काश्मीर वगैरे तमाम वकील आले आहेत मामलत थोडीबहुत अटकेअलीकडील करीतो आहो पलीकडील तूत होत नाही खटपट मात्र होअील तूत तानडामुळे ज हाअील त करितो पुढाल स्वारीस जो कोणी सरदार मातबर यअील तो बदोबस्त करील मुलूख दाचो करोडाचा वसुली परतु जमीनदार भयास मोठमोठे आहत आम्ही नावास मात्र खडणी करिता जय पचवाम लक्षाचा मुलूख तेथे अेक दोन लक्ष यणेच कठीण आहत तूत माघार फिरायचा डौल स्वामीचे आज्ञेवरून धरिला आहे याजमळ जें होत तेच करितो सटा लावीत नाही तूत अदिनावेगावरच सारा यत्नविचार दिल्हा आहे त्यासच कमाविसीन लाहोर मुल्तान दिल्हे आह यदा तर सार शिबंदीखालाच जाअील शिबदी खरचाच कठीण पडेल दान-तीन वर्षानी काही खाअीस लागल स्वामास कळाव

हिंदूंच्या ह्या गौरवाच्या दिवसाची स्मृति सर्व हिंदुमात्राने आज अभिमानपूर्वक साजरी करावी. कारण, महाराष्ट्राच्या अेखाद्या प्रांतिक प्रश्नाकरिता नव्हे तर हिंदुपदपादशाहीच्या महान् ध्येयाकरिता महाराष्ट्रीय वीरांनी तें प्रचंड युद्ध लढविलें होतें. दुसरें असें की, हिंदूंतीलच काही राजांशी, किंवा लोकांशी मराठ्यांस लढावें लागलें. तरीही त्या आपसातील यादवीच्या प्रश्नाचा ह्या विजयाच्या राष्ट्रीय स्वरूपाशी काही संबंध पोचत नाही. महाराष्ट्राच्या काय किंवा बंगालच्या काय अेवढा हिंदु अितिहास आहे तेवढ्याचें सामष्टिक अवलोकन करूनच असल्या महान् हिंदु विजयाचें रहस्य जाणता येतें — महत्त्व मापता येतें. चंद्रगुप्त हा मगधाचा राजा. त्याचें साम्राज्य पंजाबपासून दक्षिणेपर्यंत त्याने स्थापिलें. अर्थात् आकुंचित प्रांतिक दृष्टीनेच पाहिलें, तर पंजाबचा तो शत्रू ठरेल. महाराष्ट्रास चंद्रगुप्ताच्या विजयाचें अभिनंदन करण्याचे ठायी त्याचा द्वेष करावा लागेल; पण अर्थात् ही भयंकर आणि राष्ट्रघातक चूक होअील. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या दृष्टीनेच चंद्रगुप्ताच्या दिग्विजयाकडे आणि अफगाणिस्थानापासून दक्षिणेपर्यंत अुभा हिंदुस्थान अेका प्रबळ संघटित करणाऱ्या त्याच्या राष्ट्रीय साम्राज्याकडे आपण पाहतो आणि त्याचा गौरव राष्ट्रीय गौरव मानतो. तीच स्थिति विक्रमाची किंवा श्रीहर्षाची. कनोजचा श्रीहर्ष आणि महाराष्ट्र-कर्नाटकचा पुळकेशी लढले; पण आपण आज राष्ट्रीय दृष्टीने अुभयतासही आपल्या हिंदु-वैभवाचे स्तंभ समजतो. आज महाराष्ट्रास श्रीहर्षाचा आणि कनोजच्या हिंदूस पुळकेशीचा अभिमान वाटत आहे. पृथ्वीराजाने अनेक रजपूत राजांवर स्वाऱ्या केल्या. गृहकलह झाले; पण तो घरगुती विचार. अखिल हिंदुदृष्टीने महंमद घोरीशी मरेपर्यंत जो पृथ्वीराज हिंदूंच्या साम्राज्याकरिता लढला, तो त्याने ज्यांच्याशी गृहकलह केले त्या हिंदूंनाही हिंदुवीर म्हणून पूज्य आहे—असला पाहिजे. तीच मराठ्यांची, शिखांची, रजपुतांची, हिंदूंतील प्रत्येक अुपजातीची, अखिल हिंदुदृष्टीने पाहिलें असता महाराष्ट्र जसा अशोक, चंद्रगुप्त, विक्रम, राणा प्रताप अित्यादि थोर हिंदु वीरास त्याच्या जयास आणि अपजयास आपले वीर, जय आणि अपजय मानतो, त्याचप्रमाणे महाराष्ट्राने हिंदुपदपादशाहीच्या प्रस्थापनेसाठी शिवाजीपासून अव्याहत जे परिश्रम केले आणि प्रचंड विजय मिळविले ते आपणां अखिल हिंदुस्थानातील हिंदुमात्रास अभिमानास्पद आणि ममत्वपूर्ण गौरवाचे वाटले पाहिजेत. हिंदूंतील कोणीही थोर झाला तर त्यातच प्रत्येक हिंदु अंशत थोर होतोच. हिंदूंत कोणीही स्वतंत्र झाला, तर त्यातच प्रत्येक हिंदु अंशत स्वतंत्र झालेलाच असतो.

आणि हिंदूच्या शत्रूनो ! तुम्ही कोणत्याही जातीच वा गोताचे वा देशाचे असा, तुम्ही जे कोणी हिंदूस तुच्छ लेखीत असाल त्या तुम्हीही ह्या अटकेच्या विजयतिथीकडे पाहून एकदा तुमचे मदांध हिंदुद्वेषी डोळे त्या तेजाने दिपू द्या ! हा जातिभेद, हा विटाळ, ही दुही, ही फूट, ही अस्पृश्यता, ही शिवाशीव, हा धर्मभोळेपणा ह्या सर्व लटांबराचा धोंडा गळ्यात अटकविला असताना देखील हा हिंदु पराक्रम तुमच्या बादशाहीस आणि शाहीस पायाखाली तुडवीत अटकेपर्यंत आपला विजयी घोडा फेकत गेला ! मग आज तर ह्या सर्व राष्ट्रघातक चालीचे लटांबर तो हिंदु पराक्रम दूर फेकीत आहे ! आज तो हातात घेतलेल्या एका शौर्याच्या तरवारीवाचून दुसरे काहीही ओझे जवळ न घेता सड्या स्वारीनिशी आपल्या न्याय्य अधिकारास जिंकावयास निघू पाहत आहे. ज्याला त्याच्या वाटेत आडवे यायचे असेल त्याने विचार करून यावे ! !

हिंदु भित्रा आहे ? तो पहा अटकेवरच्या शत्रूच्या गर्वाच्या प्रेतावर उभारलेला त्याचा भगवा झेंडा ! तो पहा वसईवर पोर्तुगीजांवर चालून जाणारा चिमाजी अप्पा ! जे पूर्वी बादशहा होते त्यांची हिंदूने दाढी खेचून दिल्लीच्या सिंहासनावर आपला पाय रोविला. वैदिक काळाच्या या गोष्टी नाहीत. अगदी कालची गोष्ट. आता तर सर्व पूर्व वैरी त्यांच्या दुष्कृत्यानीच हतबल आणि हीन झालेले आहेत. आता तुमच्या पोरास तो वीर कसला भितो ? पोरास न पाद्र्यास, न काळ्यास न गोऱ्यास, जो जो आड येईल त्यास परास्त केल्याविना आणि ह्या आपल्या हिंदुस्थानच्या अिंद्रप्रस्थी, पुनरपि अिंद्राचेच प्रस्थ स्थापिल्यावाचून तो राहत नाही !

हिंदुद्वेष्ट्याच्या हृदयात ही प्रबळ भीति ह्या अटकेच्या विजयदिनाची स्मृति उत्पन्न करो ! आणि हिंदु हृदयात त्या भीतीस साथ करील अशी कोण्या मोठ्या भीमपराक्रमाची जयिष्णु स्फूर्ति जागृत करो ! ! !

✦ ✦ ✦

# मुसलमानांच्या खिलाफतीचा उदय, ऱ्हास आणि विनाश

महमद पैगंबर उदयास येण्यापूर्वी साऱ्या अरबस्थानात मूर्तिपूजक (बहुधा शैव पंथानुयायी) धर्माचा प्रसार झालेला होता. महमदाचे वडील कुल ते त्याची कोरेश जातिही त्याच मूर्तिपूजक पंथाची अनुयायी होती, परंतु महमदानी जेव्हा त्याचा धर्मपंथ चालू केला तेव्हा त्या पंथात मूर्तिपूजा निषिद्ध ठरविली गेली. त्यामुळे त्याच्या कोरेश जातीतील आणि अितर अरब जातीतील मूर्तिपूजक धर्माच्या

अनुयायात फारच असंतोष माजला. महमद पैगंबर स्वतःस मूर्तिभंजक म्हणून म्हणवितात, अितकेच नव्हे तर आपल्या त्या वेळी अगदी थोडक्याशा असलेल्या अनुयायांच्या बळावर गुप्त छापे घालून कोरेश लोकांच्या मक्केतील काही मूर्तिही छिन्नभिन्न करण्याचा क्रम त्यांनी चालविला आहे असा जुन्या कोरेशप्रभृति लोकांनी त्यांच्यावर आरोप ठेविला, परंतु त्यास पकडण्यासाठी जेव्हा सत्ताधीश शिपाअी आले तेव्हा महमद पैगंबरांनी आपला आवडता तरुण शिष्य अली यास आपले अंथरुणावर आपले सोंग घेअून निजवून ठेवला आणि आपण स्वतः खिडकीतून अुडी टाकून बाहेर निसटून गेले.

## 'हिजरी' म्हणजे 'पलायन शका'चा आरंभ

ते अनेक यातना सोशीत लपत छपत मदिनेस आले. या त्यांच्या पलायनाच्या वर्षापासूनच महमदी हिजरी शक — म्हणजे 'पलायन शक' चालू झाला. कारण या वर्षी मदिनेस पोचताच त्यांनी प्रकटपणे आपल्या धर्मप्रचारास आरंभ केला. अितकेच नव्हे तर आपले मक्केतील थोडेसे अनुयायी आणि मदिनेतील त्यास साहाय्य देणारे लोक यांचा अेक निराळाच जथा बनवून त्याचे आधिपत्यही त्यांनी आपल्याकडे घेतले. या मक्केतील 'मोहजरीन' म्हणजे पलायित आणि मदिनेतील 'अनसार' म्हणजे मित्र साहाय्यक अशा लोकांच्या टोळीचे महमद हे पैगंबर आणि राजे झाले. त्या नवीन जथ्याची धर्मसत्ता आणि राजसत्ता ह्या दोन्हीही सत्ता अशा प्रकारे या अेकाच पुरुषाचे हाती क्रमप्राप्तपणेच अेकत्रित झाल्या. मदिनेत महमद पैगंबरांनी 'आपण अीशप्रेषित पैगंबर (दूत) आहोत' अशी घोषणा करून आपल्या अनुयायांचे अेक संघटित संस्थान स्थापले. जुन्या धर्मांच्या मूर्तिही फोडण्यात आल्या.[1]

हे कळताच त्यांच्यावर त्यांच्या जुन्या मताच्या कोरेश जातीचे लोकच नव्हत तर आजूबाजूच्या अनेक अरब जाती तुटून पडल्या. महमद पैगंबर आणि त्यांच्या अनुयायांच्या त्या जुन्या धर्ममताच्या अनुयायांशी लहान लहान लढाया सारख्या चालू लागल्या. त्यामुळे आपल्या अनुयायांचा धर्माधिपति किंवा राज्याधिपतिच न राहता महमद पैगंबर हे त्यांचे सरसेनाधिपतिही झाले. लवकरच मक्काही त्यांनी जिंकली आणि मग आजूबाजूच्या प्रदेशास 'माझा नवीन धर्म तरी माना, नाही तर युद्धास तरी सज्ज व्हा' असा संदेश धाडून त्यांनी चढाअीचे धोरण स्वीकारले.

---

1. The Right Honourable Justice Amir Ali, LL. D. says in his book The Spirit of Islam (p. p. 96) — The idols of the nation were unrelentingly struck down. Sorrowfully, the idolators stood down and watched the downfall of the images they worshipped. Mohammed destroyed the ancient idols and abolished every pagan rite.

अैसा साधारण सौदागराला असा अकस्मात् अेक विजिगीषु राज्यधुरंधर नेता झालेला पाहून प्रत्यक्ष महमद पैगंबराचे आयुष्यातच त्याच्या पैगंबरपणास खोटे पाडून ते ज्या शिडीने सा धाडसी संभवास चढले त्याच शिडीने आपणही तेच वैभव मिळविण्याची आकांक्षा धरणारे निदान दोन तरी साहसी पुरुष अरेबियात अुदय पावले. त्यांनीही हजरत महमदाप्रमाणेच 'देवाचा खरा दूत मी, पैगंबर मी' अशी घोषणा केली. त्यांनाही अनुयायी मिळाले. या अल अस्वाद, मोसिल्मा अित्यादि महमदाच्या समकालीन प्रतिस्पर्धी पैगंबरांपैकी खरा पैगंबर कोण, देवाचा खरा दूत कोण हे स्वतःच प्रत्यक्षपणे खाली येऊन सांगण्याचा त्रास क्वचित् कार्यबाहुल्याचे योगे देवाने न घेतल्यामुळे आणि असले प्रश्न सोडविण्यात प्रत्यक्ष प्रमाणांनी कधीच हात टेकले असल्यामुळे आपआपले पैगंबरत्व सिद्ध करण्याचे कामी तरवारीच्या कोटिक्रमावाचून दुसरा कोणताही कोटिक्रम या सर्व स्पर्धालू लोकांस सुचला नाही. त्या योगे त्यांची युद्धे होऊन त्यात पैगंबरपदावर अधिकार सांगणारे त्या काळचे अितर प्रतिस्पर्धी ठार झाले नि शेवटी महमदाच्या अनुयायांची तरवार विजयी होऊन 'ज्याची तरवार त्याचे सत्य' असा न्यायास मान तुकविणाऱ्या अरबांच्या झुंडीच्या झुंडी महमदास शरण येत चालल्या. जितक्यात महमद पैगंबर वारले. तेव्हा त्यांनी स्थापिलेल्या या राज्याच्या आणि धर्माच्या धुरंधरतेचा अधिकारी कोण हा प्रश्न दत्त म्हणून अेकाअेकी अुभा राहिला. महमदांनी अल्ली नावाच्या आपल्या अेका अत्यंत लाडक्या मुलास स्वतःचा दत्तक मुलगा म्हणून मानले होते. पुढे त्यांनी त्यासच आपली मुलगी देऊन जावअीही करून घेतले आणि केव्हा केव्हा त्या आपल्या जावयानेच — अल्लीनेच — आपल्या मागे आपले अुत्तराधिकारी व्हावे अशी वासनेही अुच्चारली होती. त्या अर्थी अल्लीनेच मुसलमानांचे धुरीणत्व स्वीकारावे असे अेक पक्ष म्हणाला, परंतु महमद पैगंबरांनी अबुबेकर या धीरोदात्त शिष्यास कित्येक वेळा प्रार्थना चालविण्याच्या प्रमुखतेचा आपला मान स्वतःच दिलेला होता. त्यावरून त्या अबुबेकरासच पैगंबराच्या अनुयायांचे धुरीणत्व द्यावे असे दुसरा पक्ष म्हणू लागला. पैगंबराच्या और्ध्वदेहिक क्रियेचे धांदलीत अल्लीप्रभृति त्यांचे कौटुंबिक मंडळ गुंतले असता या दुसऱ्या पक्षानेच घाअीघाअीने सभा भरवून अबुबकरला मुसलमानी धर्मपंथाचे पुढारीपण अर्पण केले. झाली गोष्ट आता मोडणे सोपे नव्हे, बरेही नव्हे असे समजून अल्लीनेही शेवटी त्यास मान तुकविली. अशा प्रकारे पैगंबराचा पहिला प्रतिनिधि अर्थात मुसलमानांचा पहिला खलिफा अबुबेकर हा झाला. खिलाफत संस्थेचाही हाच अुगम. या वेळेपासून अल्ला (अीश्वर) पैगंबर (अीशप्रेषित) आणि खलिफा (पैगंबराचा प्रतिनिधि) अशी मुसलमानी धर्माची अधिकारपरंपरा प्रस्थापिली गेली. अर्थातच महमद पैगंबरात अेकीकृत झालेली धर्माध्यक्षत्वाची, राज्याध्यक्षत्वाची आणि सेनाध्यक्षत्वाची तिहेरी सत्ता त्याचा प्रतिनिधि जो खलिफा त्याच्यातही

परंपरेने अुतरली ही तिहेरी सत्ता चालविण्याची योग्यता ज्यात आहे, ज्यास हे खलिफाचे अत्युच्च पद शोभते. अशाच प्रकारचा मुसलमानांचा पहिला खलिफा अबुबेकर हा अेक थोर पुरुष होअून गेला, पण तो लवकरच वारला. त्याने मरणाआधी आपल्या मागे अुमर यानेच खलिफा व्हावे असे सांगितल्यामुळे तो मरताच अि. स. ६३४ मध्ये दुसरा खलिफा अुमर हा झाला आणि अलीस पुन्हा मागे पडावे लागले. हा अुमर मोठा पराक्रमी पुरुष होअून गेला. त्याने मुसलमानी धर्माचा आणि राज्याचा झपाट्याने प्रसार केला, पण शेवटी तो अंतःस्थ कटात फसून सन ६४४ त मारेकऱ्याच्या हाती मारविला गेला. त्याने मरताना खलिफा नेमण्याचा अधिकार सहा जणांच्या अेका निर्वाचक मंडळास दिला होता, पण त्या मंडळाने अुस्मान नावाच्या अेका ओमियेड जातीच्या पुरुषासच निवडले. तेव्हा तिसरा खलिफा ओमियेड जातीचा अुस्मान हा झाला. त्यामुळे पैगंबराच्या त्या जावयाच्या, अलीच्या, कोरेश पक्षास फार वाअीट वाटले. अरेबियात अनेक जाती वंशपरंपरेने आपसात लढत झगडत आलेल्या होत्या. त्यात पैगंबराची आणि त्याची मुलगी फतिमा ज्यास दिली होती त्या ह्या अलीची जात कोरेश. तिला आपले खलिफापद ओमियेड जातीचे अुस्मानाचे हाती पडलेले सहन कसे व्हावे? नुसते खलिफापदच नव्हे तर अुस्मानाने मुसलमानी सत्तेखाली आलेल्या विस्तृत राज्यावरील झाडून साऱ्या अधिकारी स्थानांवर ओमियेड कुलातील लोकच नेमण्याचा सपाटा चालविला. त्या कामी मरवान आणि माअविया हे त्याचे दोन प्रबळ साहाय्यकारी होते. या त्रिकुटाच्या जातीय छळास कंटाळून शेवटी अलीच्या पक्षाने बंड केले. अुस्मान खलिफा अकस्मात् मारला गेला आणि अलीच्या कोरेश जातीच्या पक्षाने शेवटी अेकदाचे अलीस खलिफापदावर स्थापन केले. मुसलमानांचा चौथा खलिफा अली हा होय. अली हा खलिफा होताच ओमियेड लोकांचा प्रबळ पुढारी मोअविया ह्याने सिरियात बंड अुभारले. फार काय महमदाची लाडकी धाकटी बायको सुद्धा महमदाच्या या दत्तक मुलाच्या नि जावयाच्या म्हणजे अलीच्या विरुद्ध बंडात सामील झाली. मोअवियाच्या ओमियेड जातीच्या या बंडखोरांची सेना अलीवर चालून येताना मोअवियाने अशी युक्ति केली की आपल्या भाल्यास कुराण बांधून ते ध्वज सैन्यापुढे चालविले. त्यामुळे कुराण पाहताच अलीचे

मुसलमान एक होऊन निःपक्षपाते योग्य तो खलिफा निवडू शकतील अशा हेतूने त्यांनी मारेकरी घातले. पण त्या छाप्यात अल्ली हाच तेवढा मारला जाऊन मोआवियावरचा वार खाली गेला! अल्लीच्या हत्येने त्याचा कोरेश पक्ष चिडून गेला. अल्लीची मुले, अर्थातच पैगंबराची मुलगी फातिमा हिचे पुत्र दोन. एक हसन, दुसरा हुसेन. आपल्या इकडे ताबुतातून ज्यांच्या हत्येविषयी अजूनही लाखो मुसलमान प्रतिवर्षी शोक करतात ते हेच हसन व हुसेन होत. अल्लीच्या पक्षाने हसनला खलिफा केले. मोआवियाच्या पक्षाने ते जुमानले नाही. शेवटी मोठ्या वादळानंतर मोआवियाच्या प्रबळ शक्तीपुढे हसनने नमते घेतले, आपल्या खलिफापदाचे त्यागपत्र दिले आणि दोन्ही पक्षांची तडजोड होऊन असे ठरले की, मोआवियाने प्रथम खलिफा व्हावे, परंतु मोआवियानंतर हुसेनला खलिफापद द्यावे. अशा प्रकारे ओमियेड आणि कोरेश या जातींना अल्पकाळपावेतो का होईना पण संधि होऊन मुसलमानांचा पुन्हा एकदा अनन्य खलिफा नियुक्त झाला. तोच हा पाचवा खलिफा मोआविया, बगदादच्या ओमियेड खलिफांच्या घराण्याचा संस्थापक. त्यानेच बगदाद ही आपली राजधानी केली. हा ओमियेड खलिफांचा वंश पुढे फार प्रबळ आणि वैभवसंपन्न असा झाला, परंतु तो वंश असा स्थिर होण्याचे आधी आणि स्थिर होण्यासाठीच मोआवियाला अनेक क्रूर कर्मे करावी लागली. त्याने खिलाफत आपल्या वंशातच चालावी म्हणून संधि सापडताच पैगंबराचा वडील नातू जो वर उल्लेखिलेला हसन त्यालाही विषप्रयोग करविला आणि धाकटा नातू जो हुसेन त्यालाही बाजूस सारून करार मोडून आपला मुलगा येझिद यास आपल्या मागे खिलाफतीचा वारस ठरविला. त्याप्रमाणे मोआविया मरताच सन ६८० त येझिद खलिफा झाला.

## सहावा खलिफा येझिद

हा खलिफा जितका पराक्रमी होता तितकाच विलासी होता. त्याला प्रबळ प्रतिस्पर्धी असा कोणीच न उरल्याने तो 'मन पूतं समाचरेत्' अशी धार्मिक नि राजकीय सत्ता साऱ्या मुस्लिम जगावर गाजवू लागला. प्रति शुक्रवारी तो मुसलमानांचा धर्माध्यक्ष या नात्याने मशिदीत प्रार्थना चालवी, परंतु मुसलमानी धर्मात त्याज्य मानलेले अनेक भोगविलास तो उघड उघड भोगी. मद्यपानात तो धुंद असे. त्याच्या या धार्मिक स्वैराचाराविरुद्ध जाणाऱ्या मौलवींची कुचेष्टा करण्यासाठी तो एका माकडास मौलवीसारखा वेष देऊन आणि शोभिवंतपणे सजविलेल्या गाढवावर ['On a beautifully caparisoned donkey,' Amir Ali, page 83] बसवून त्यास उघडपणे मिरवीत नेई. त्याने करारभंग करून मागे सारलेल्या हुसेनशी येझिदला अर्थातच घोर संग्राम करावा लागला. शेवटी करबेलाच्या प्रसिद्ध लढाईत पैगंबराच्या त्या नातवाला त्याच्या अनुयायांसह अत्यंत क्रूरपणाने येझिदच्या मुसलमानी

सैन्याने ठार मारले. महंमद पैगंबराच्या या प्रत्यक्ष नातवाचे डोके कापून जेव्हा तें येझिडच्या 'ओबेदुल्ला' नावाच्या करबेलाकडे लढणाऱ्या सेनापतीसमोर आणलें गेलें तेव्हा त्या येझिडच्या सेनापतीने त्या त्याच्या मृतवदनाच्या ओठावर छडी घेऊन सपासप मारले (Amir Ali, p. p. 86) याच ओठाचे लहानपणी स्वतः पैगंबराने चुंबन घेतले होते! अशी आठवण काढून शियापंथी मुसलमानांना अनावर शोक झाला, परंतु येझिडचा क्रोधानल अेवढ्यानेच शांत झाला नाही. हुसेनचा पक्ष घेणाऱ्या मदिना नगरावर त्याने चाल केली आणि मुसलमानांच्या त्या खलिफाने मुसलमानांच्या त्या पवित्र महाक्षेत्राची, त्या मदिना क्षेत्राची धुळधाण करून टाकली. तेथील मशिदींच्या घोडशाळा बनवून टाकल्या! पण मनुष्याने तर नव्हेच पण देवानेमुद्धा येझिडचे काही वाकडे केले नाही. अुलट तो सर्वत्र विजय पावत गेला. आपल्या मागे आपल्या मुलास खलिफा नेमून तो अि. स. ६८३ त मरण पावला.

ह्या ओमेयिया खलिफांच्या अनुयायांस 'सुनी' म्हणत, परंतु त्यांना महंमद पैगंबराच्या फातिमा नावाच्या मुलीच्या त्या हसन-हुसेनचे अनुयायी 'खुनी' म्हणत. हुसेनच्या हत्येनंतर त्याच्या अनुयायांनी सुनी लोकांतून निराळेच फुटून सुनींच्या खलिफाप्रमाणेच त्यांचा प्रतिस्पर्धी असा अल्लीच्या वंशातील 'अिमाम' ते नेमू लागले. या वेळेपासूनच मुसल्मानांत दोन तट निराळे पडले. ते सुनी आणि हे शिया. त्यांचा मुख्य खलिफा, यांचा मुख्य अिमाम. साऱ्या जगातील मुसलमानांच्या अेककेंद्री खिलाफतीचे नि सत्तेचे येथून पुढे तुकडे तुकडे अुडत चालले.

## शिया पंथाचे अिमाम

हे अर्थातच महंमदाची मुलगी फातिमा हिचे वंशज. त्या शियांच्या अिमामांस म्हणूनच फातिमाअिड म्हणतात. हसन हुसेनचा हा वंश. त्या अिमामांत काही पुरुष खरोखरच फार विद्वान्, साधु नि देवभक्त निघाले, परंतु सुनींचे खलिफा अत्यंत प्रबळ असल्यामुळे त्यांच्याकडून पिढ्यान् पिढ्या या अिमामांना फारच छळ सोसावा लागला. ह्या शियांच्या अिमामांना खलिफाने अनुयायी केवळ तेतयेच नव्हत तर पापी मानीत. प्रत्यक्ष खलिफा प्रार्थनेच्या वेळी या अिमामांवर शापांचा वर्षाव करून त्यांचा नायनाट करण्याची देवास राष्ट्रीय विनंती करी आणि देवानेही ती अैकली की काय न कळे, पण काही पिढ्यांतच शियांच्या त्या अिमामांचा अगदी नायनाट झाला खरा. कारण काही कालाने सन ८७४ चे आगेमागे त्यांच्या शेवटच्या सत्ताधारी अिमामाला त्याच्या प्रतिस्पर्धी खलिफाने धरून नले आणि नाहीसा केल. त्याचे अेक पाच वर्षांचे अर्भक–मूल–तेवढे मागे अुरले होते. ते अर्भक–मूल–अजाणपणे जो मार्ग दिसला त्या मार्गाने बाबा! बाबा! म्हणून हाका मारीत चालले. पुढे त्याच मार्गाने अेक ताडा आला त्यात तें मिसळले आणि त्या ताड्याबरोबर आपल्या बापाला भेटण्यासाठी जे गेले ते गेलेच! त्या अर्भकाचे

अुत्पन्न नि प्रबळ होअून आणि मुसलमानांत अनेक पक्षांची वीण वाढत चालल्यामुळे त्यांना यादवीचा दुर्धर क्षयरोग लागून हा वंश अितका पतित झाला की, त्यांच्या अरब जातीतील कोणाही पक्षावर किंवा मनुष्यावर त्यांच्या खलिफांना आपल्या संरक्षणासाठी विश्वास ठेवता येअीना आपसातील जातिवैमनस्यामुळे कोणाचे अरबी सैन्य कोणाच्या अरबी सैन्यावर तुटून पडेल याचा काही नियम अुरला नाही त्यातून मार्ग काढण्यासाठी अेकच तोड अुरली होती ती म्हणजे जे अरबही नाहीत आणि मुसल्मानही नाहीत असले नुकतेच अुदय पावत असलेल्या परस्थ तुर्क लोकांचे सैन्य आपल्या संरक्षणासाठी चाकरीस ठेवणे हीच होय हे तुर्क सैन्य मुसल्मान नव्हते त्या वेळपर्यंत तुर्कांनी मुसल्मानी धर्म स्वीकारलेला नव्हता त्यामुळे खिलाफतीतील अरबी वंशांच्या भानगडींचे त्यांना काहीच सोयर सुतक नसे मुसल्मानांतील जो पक्ष त्यांना पैसे देअी त्यांचे वतीने ते वाटेल त्या अितर पक्षाशी लढत अशा तुर्की सरदारांचे हाती ह्या अरेबियन दुबळ्या खलिफांचे सर्व भाग्य जाताच खलिफा म्हणजे त्यांच्या हातातले अेक बाहुले होअून बसले खलिफा वासिक हा मरताना जेव्हा म्हणाला, 'माझे मागे माझा लहान पुत्र खलिफा व्हावा' तेव्हा ह्या अमुस्लिम तुर्क सरदारांनी त्याला झुगारून दिले कारण, ता रूक्ष तुर्क सरदार म्हणाला, '*खलिफाचा तो धाकटा मुलगा खलिफा होण्यास अेवढ्यासाठी अयोग्य* आहे की, महमद पैगंबरापासून त्यांचा जो राजदंड, मुकुट नि झगा प्रत्येक खलिफाला घालावा लागे तो झगा त्या मुलास फार मोठा होअील।' (Ameer Ali, P P. 289) त्या आडदांड तुर्कांचा हा नकळत विनोद किती मर्मज्ञ होता।

तथापि पुढे पुढे अनुभवाने तुर्कांचा कल या वरील आक्षेपाच्या अगदी अुलट होत चालला जणू काय तो पैगंबरापासून खलिफांच्या अंगावर अुतरत आलेला झगा लहान मुलासच बेताचा होतो असं त्या तुर्कांना आढळून आलं। कारण लहान मुलेच खलिफापदावर स्थापण्याचा तुर्क सरदारांनी पुढे पायंडाच पाडला खलिफाचे मोठ्या वयाचे वंशज जरी असले तरी त्या सर्वांना दूर सारून कुठल्या तरी नात्यातले लहान मूलच आणून तुर्क सरदार त्याला खलिफा करू लागले. कारण अुघडच होतं की, लहान खलिफाने संरक्षक म्हणून तुर्कांचे हाती आलेला अधिकार त्यांना वजावता यावा आणि सारी राज्यसत्ता त्यांच्या हाती परंपरेने चालावी शेवटी त्या तुर्कांची पीडा अितकी परमावधीला गेली की ८६९ सनात

कोणी काय केले असेल ते असो, पण ते पुन्हा काही कोणाचे दृष्टीस पडले नाही ही करुण कहाणी जेव्हा शिया लोकाम कळली तेव्हा त्याच्या दुःखास पारावार राहिला नाही त्या दुःखाचे सांत्वनाचा अेकच मार्ग काय तो त्यास अुरला होता तो अवलबून त्यानी असा विश्वास धरला की त्याचा तो बाल अिमाम सुनी लोकाच्या हातावर तुरी देअून अीश्वरानेच नेला आणि त्यास कुठे तरी अजून सुरक्षित ठेवलेला आहे! सधि साधताच तो शिया लोकाना मुक्त करण्यासाठी अजूनही परत येणार आहे! ही घटना अि स ७८४ चे जवळपास झाली पुढे शेकडो वर्षे अुलटून गेली तरी शियाचा तो प्रेमळ विश्वास डगमगला नाही मधून मधून कोणी भुमका अुठविली की, 'त मूल परत येत आह' की त्यासरशी हजारो शिया लाक लाववरून येअून त्या ताडयाच्या मूळच्या मार्गावर जमत नि सध्या-काळपर्यंत आपल्या त्या बाल अिमामाची परत यण्याची वाट पहात बसत सध्या-काळी त्याच्या त्या आतुरतेच्या दृष्टीस निराशेच्या रात्रीत काही दिसेनासे झाले म्हणजे शोक करीत ते परत जात! आजही लाखो शिया मुसलमानाचा हा विश्वास आहे की, आज नाही अुद्या तो बाल अिमाम परत येअील आणि पृथ्वीवर शियाचा धर्म नि राज्य स्थापील! यास्तवच ते त्यास 'मुतान्तार'(प्रतीक्षित) नि 'कातम' (मन)—'असलेला'—असे सबोधितात शियाच आपल्या अिमामावरील ह करुण-मनोहर प्रेम पाहून कोणालाही कौतुकच वाटेल मुसलमान लोक जर हिंदूतील अशाच अनक प्रेमळ समजुतीच्या आणि भक्तिमनोहर विश्वासाच्या गाभ्यात अंत-र्हित असलेल्या अुदात्त मनोवृत्तीस दुखवून त्याना मूख भावडेपणाचा दाष देण्याची आणि आपण मात्र त्यापासून अलिप्त असण्याचा दभ मिरविण्याची खाड सोडतील तर त्याच्या अशा निष्ठानाही दुसरे कोणी भावडेपणा म्हणून अुपहासणार नाहीत अुलट मनुष्यस्वभावाच्या ह्या कोमल वृत्तीतील वत्सल नि भक्तिरसाचा आस्वाद सद्गदित हृदयाने घेतच राहतील!

## अन्योन्य प्रतिस्पर्धी खलिफाचे पीक

शियाच्या 'अिमाम'शाहीची ही दुर्दशा अुडत असता तिकडे सुन्नींच्या खिलाफतीतही तारखो धुमश्चक्री चालू होती वर वर्णिलेली आमियड जातीच्या खलिफाची बगदाद येथ जी खिलाफत हाती तिला त्या ओमियेड जातीतीलच मरवान आणि त्याचा मुलगा अबदुल मलीक हे भयकर प्रतिस्पर्धी अुत्पन्न झाले तेही स्वतःस खलिफा म्हणवीत आणि दमास्कस येथे स्वतत्रपणे राज्य करीत त्या अबदुल मलिकने मक्केमध्ये तिसरा अेक खलिफा म्हणून जो गाजत होता त्या अबदुल्लावर चाल केली बगदादचा खलिफा येझिद याच्या मुसलमानी अनुयायानी मुसलमानी धर्मक्षेत्र जे मदिना हिची जशी मागे विटबना केली तशीच आता दमास्कसचा खलिफा अबदुल मलिकने मुसलमानाचे दुसरे धर्मक्षेत्र जे मक्का

त्याचीही विटंबना केली. मशिदींना घोडशाळा बनविल्या. साऱ्या नगराची लूट केली. शतावधि मुसलमानांना कापून काढले. जे खलिफा आपल्याच मुसलमानी धर्मक्षेत्राची अशी विटंबना करीत आणि राज्यलोभापायी किंवा धर्मवेडापायी पिसाळून जे मुसलमान मुसलमानांचीच अशी निर्घृण कापाकापी करीत तेच मुसलमान पारसिकांच्या किंवा हिंदूंच्या देवस्थानांची राक्षसी विटंबना करण्यास कचरले नाहीत यात काय आश्चर्य ! धर्मवेडाचे आणि असहिष्णु क्रूरतेचे हें बाळकडू त्यांच्या धर्माच्या आरंभापासूनच ते पीत आलेले होते !

## दमास्कसचे ओमियेड् खलिफा

वरील अबदुल मलिकनंतर वालिद हा दमास्कसचा खलिफा झाला. मुसलमान आपसांत कितीही भांडत असले तरी परधर्मीय लोकांवर स्वाऱ्यामागून स्वाऱ्या करून त्यांनी मुसलमानी धर्माचा आणि राज्याचा प्रसार चालविण्यात लवलेशही कसूर केलेली नव्हती. पारसिकांचे विस्तृत साम्राज्य नाशून, त्यास मुसलमान करून ते सिंधुनदी अिकडे ओलांडीत होते तर या दमास्कसचे वालिद खलिफाचे राजवटीत ते तिकडे अुभे आफ्रिका खंड पादाक्रांत करून अटलांटिक महासागरास जाअून भिडले होते. असे सांगतात की, आफ्रिका खंडाचा विजेता तारीक हा वादळासारखा पुढे घुसत घुसत जेव्हा शेवटी अटलांटिक महासागर त्यास अकस्मात् आडवा आला तेव्हा त्याचा घोडा थयथयाटत तसाच पुढे घुसू लागला. त्याचे गळ्यापावेतो पाण्याची लाट आली. तेव्हाच काय ते त्या सेनापति तारीकने त्यास मागे खेचले आणि तो दुःखित मनाने म्हणाला, 'अरेरे ! ह्या सागराने केवढा घात केला ! जर हा जलनिधि आडवा येता ना तर हा माझा विजयी अश्व समोरच्या त्या सूर्य मावळतो तिथपर्यंत जाअून पृथ्वीच्या त्या दुसऱ्या टोकावरच काय तो विश्राम पावता !' असे म्हणत त्याने पश्चिम दिशा सोडली आणि किंचित् अुत्तरेच्या रोखाने ससैन्य निघाला, तो स्पेनची सामुद्रधुनी अुतरून स्पेनवर जाअून आदळला. जिथे तो अरब विजेता तारीक स्पेनात अुतरला त्यास अजूनही जेबल अि तारीक (जिब्राल्टर) तारीकची टेकडी, असे म्हणतात.

आफ्रिका खंड पादाक्रांत करणारी मुसलमानी सैन्ये नुसता ते प्रदेशच मुसलमानी राज्यास जोडीत जात नसत तर त्या लक्षावधि लोकांसही स्वेच्छेने वा बळाने वा छळाने मुसलमानी धर्मात ओढीत जात. शत्रूंच्या पाडाव केलेल्या पुरुष-स्त्रिया मुसलमानी सैन्यातील सैनिकांत दासदासी म्हणून वाटून देण्याचा आपला हक्क पैगंबराने 'हजू' आहे असे ते मानीत आणि महमदापासून ते तसेच वागतही आले होते. आफ्रिकेत तर शाही राजापासून खंडणी जी घेत तीच मुळी अर्धे रुपये आणि अर्ध्या स्त्रिया अशा नाण्यात ठरत असे. ह्या हजारो स्त्रिया मुसलमानी सैन्यात लुटीचे धन म्हणून वाटल्या जात आणि त्यायोगे त्या देशातील नवी पिढीची पिढी

अुत्पन्न नि प्रबळ होअून आणि मुसलमानांत अनेक पंथांची वीण वाढत चालल्यामुळे त्यांना यादवीचा दुर्धर क्षयरोग लागून हा वंश अितका पतित झाला की, त्याच्या अरब जातीतील कोणाही पक्षावर किंवा मनुष्यावर त्यांच्या खलिफाना आपल्या संरक्षणासाठी विश्वास ठेवता येअीना. आपसातील जातिवैमनस्यामुळे कोणाचें अरबी सैन्य कोणाच्या अरबी सैन्यावर तुटून पडेल याचा काही नियम अुरला नाही. यातून मार्ग काढण्यासाठी अेकच तोड अुरली होती ती म्हणजे जे अरबही नाहीत आणि मुसलमानही नाहीत असलें नुकतेंच अुदय पावत असलेलें परस्य तुर्क लोकांचें सैन्य आपल्या संरक्षणासाठी चाकरीस ठेवणें ही होय. हें तुर्क सैन्य मुसलमान नव्हतें. त्या वेळपर्यंत तुर्कांनी मुसलमानी धर्म स्वीकारलेला नव्हता. त्यामुळे खिलाफतीतील अरबी वंशाच्या भानगडींचें त्याना काहींच सोयर सुतक नसे. मुसलमानातील जो पक्ष त्यांना पैसे देअी त्याचे वतीने ते वाटेल त्या अितर पक्षाशी लढत. अशा तुर्की सरदाराचे हाती ह्या अरेबियन दुबळ्या खलिफाचें सर्व भाग्य जाताच खलिफा म्हणजे त्यांच्या हातांतलें अेक बाहुलें होअून बसलें. खलिफा वासिक हा मरताना जेव्हा म्हणाला, 'माझे मागे माझा लहान पुत्र खलिफा व्हावा' तेव्हा ह्या अमुस्लिम तुर्क सरदारांनी त्याला झुगारून दिलें. कारण, तो दक्ष तुर्क सरदार

डॉ आंबेडकरांचे वरील आक्षेप हे सर्वथैव खोटे आहेत जर त्यात सत्य असते तर ते कितीही कटु असते तरी आम्ही त्याचा विषाद मानला नसता डॉ. महाशयांनी अस्पृश्यतेच्या आजच्या अत्यंत अन्यायी नि दुष्ट रूढीविषयी जी निर्भर्त्सना केली आहे किंवा जन्मजात जातिभेदाच्या घातक परिणामाविषयी जी जळजळीत टीका केली आहे तिच्या अितक्याच न्यायनिष्ठुरपणे आम्हीही त्या दुष्ट रूढींना निषेधीत आलेले आहो त्याच्या अुच्चाटनार्थ झटत आलेले आहो आमच्या हिंदुराष्ट्राच्या अंगी आज मुरलेल्या त्यासारख्या अितर अनंत दोषांनाही आम्ही फडतोडपणे राष्ट्रहिताथच आविष्कारण्यास कचरत नाही, हे आम्ही सांगितलेच पाहिजे असे नाही आपल्या राष्ट्रीय दोषांना धिक्कारण्याचे साहस आणि प्रति-कारण्याची शक्ति ज्या राष्ट्रात अुरलेली नसते ते राष्ट्र मृत्युपथास लागलेच म्हणून समजावे. परंतु तसे साहस नि ती शक्ति आमच्या हिंदुराष्ट्रात आजही आहे असा आम्हांस पूर्ण भरवसा असल्यामुळेच आम्ही आमचे दोष अुघडकीस आणण्यास भीत नाही तेव्हा आमच्या राष्ट्राचे असलेले दोष कोणी काढले तर तवढ्यासाठी केवळ भावना दुखते म्हणून आम्ही त्यास निषेधू लागतो असे आमच्याविषयी तरी कोणा-सही म्हणता येणार नाही अर्थात डॉ आंबेडकर जे वरील आक्षेपात म्हणतात की हिंदूचा अितिहास हा अखंड शरणागतीचाच अितिहास, हिंदूचे जीवन म्हणजे प्रथमपासून आजपावेतो दास्याचेच जीवन The Hindus' has been a life of continuous defeat—ते जर ऐतिहासिक सत्य असते तर तो लज्जास्पद आक्षेपही आम्ही नाकारला नसता.

पण तरीही खऱ्या मानधन पुरुषाचे कर्तव्य ह्या परिस्थितीतही काय ठरते? ज्या हिंदुराष्ट्रात, हिंदुवंशात, आपण जन्मलो नि वाढलो त्या आपल्या राष्ट्राचा मागचा अितिहास असा अखंड शरणागतीचा आहे आपल्या वाडवडिलांनी पराक्रम असा केलेलाच नाही मानधन पुरुष असा आपल्या वंशात कोणी आढळतच

उद्धारीन; माझ्या वंशात मागे कोणी पराक्रम केलेला नसेल नि त्याची लाज म वाटत असेल तर मीच त्या माझ्या वंशातील पहिला पराक्रमी पुरुष होऊन र माझ्या पुढल वंशावळीला जगातील अितिहासामध्ये सोनेरी अक्षरात ठळक छापविणे माझ्या कुळासूनाही माग पाडीन, माझ्या पूर्वजांनी कोणताही पराक्र केला नाही म्हणून हिणवणाऱ्याचे दात माझ्यासारख्या पराक्रमी पुरुषाला जन्म देण्याअितका त्याचा जो बीजभूत पराक्रम होता तो दाखवून त्याच्याच घशात घालीन; तितकेही न साधले तरी निदान माझ्या आअीला धगत चूल या पर्ती पेटविण्याअितकी देखील चेतना नसल्यामुळे अघोरच अघोर पसरलेला आहे ह्यासाठी तिला त्याच भुकेत नि अंधारात खितपत सोडून त्या तिच्या दुर्गतीच्या विटबनेनेच तिच्या शत्रूची हांजी हांजी करीत, त्याच्या परच्या तुकड्यावर पोट भरीत त्याच्या दिव्याच्या दिवट्या पाजळीत राहणारा त्या आअीच्या पोटी आलेला जंत न होता तिच्या त्या निराश नि निरभ्र दुर्दशेचा अंधकार घालविण्यासाठी आपल्या हृदयाचीच आगकाडी पेटवून निदान माझ्यापुरती तरी जी काही चेतना, प्रकाश नि अूब तिला देता येअील ती माझ्या आअीला देअीन, असाच निश्चय नि प्रयत्न स्वतंत्र मनुष्य म्हणविणाऱ्याने केला पाहिजे !

(आपल्या पूर्वजांच्या ममतेपायी त्यांची नुसती स्तुति करीत सुटणे हे मूर्खपणाचे असले तरी माणुसकीस काही अगदीच सोडून नसते, पण आपल्या पूर्वजांची नसती निंदा करणें किंवा ती कुणी कुत्सिततेने जाणूनबुजून ताडावर केली असता तिचा तीव्र प्रतिवाद न करता अैकून घेणे हे माणुसकीस लाछनास्पद आहे) हिंदुत्वाचा संबंध, हिंदुराष्ट्राचे नाते, डॉ आंबेडकरांनी तोडले असले तरीही केवळ न्यायाच्या अैतिहासिक सत्याच्या आणि निःपक्षपाताच्या दृष्टीने तरी हिंदुराष्ट्राविषयी त्यांनी असली आंधळी खोटी नि खोडसाळ विधाने वारंवार करीत राहावयास नको होतें. अशा भरमसाट निंदेने हिंदुराष्ट्राच्या सत्कीर्तीपक्षा निंदकांच्या सत्कीर्तीसच जास्त बट्टा लागतो हे डॉ आंबेडकरांनी विसरू नये तथापि ते विसरून जर कोणी अशी कुत्सित नि असत्य विधानं वारंवार करीत राहिला आणि जर त्याचा वेळोवेळी साधार प्रतिवाद करीत गेलं नाही तर अनवदा अैकता अैकता असे असत्यही सहस्रावधि सामान्य नि अतज्ञ लोकांना सत्यासारखें वाटू लागून राष्ट्राच्या आत्मविश्वासालाच धक्का पोचण्याचा अुत्कट संभव असतो, हेही काही खोटे नाही. यास्तव ह्या असत्य विधानाचा निषेध करणे आणि अैतिहासिक कसोटीस लावून त्याचा खोटेपणा अुघडकीस आणणे हे आम्ही आमचे कर्तव्य समजतो सत्य काय ते जाणण्यासाठी तरी डॉ आंबेडकरांनी ह्या अैतिहासिक कसोटीचा नीट विचार करावा

ह्या अैतिहासिक छाननीत कोणत्याही ल्हानसहान किंवा विवादास्पद घटनावर अवलंबून न राहता परकीय अितिहासकारांनाही नाकारताच येअू नये अशा ज्या अखंडनीय नि अगदी ठळक तवदघाच घटनांचा पुरावा आम्ही जमेस धरू

ज्या अर्थी डॉ आंबेडकरांनी त्याच्या वर अुल्लेखिलेल्या लेखात हिंदुराष्ट्राच्या कोणत्याही अेका जातीला, प्रांताला, वर्गाला किंवा कालखंडाला लावून आपली विधानें न करता ती अेकंदर हिंदुराष्ट्राला नि त्याच्या अेकंदर जीवनकालास स्पष्टपणे अुद्देशूनच केलेली आहेत, The Hindus' life has been a life of continuous defeat असेच ज्या अर्थी ते बेधडकपणे म्हणत आहेत त्या अर्थी त्यांचे खंडन करावयास ह्या विषयापुरते तरी हिंदुराष्ट्राच्या अेकंदर अितिहासाचेच विहंगावलोकन करणे अवश्य आहे

द्रष्ट्याची स्फूर्ति ते ज्या प्रज्वलित यज्ञाग्नीस आधारीत असत त्याच्या ज्वाला-सारखीच कशी देदीप्यमान नि दुर्धर्ष होती, त्याच्या काळातील त्याच्या शत्रूवर विजयामागून विजय मिळवीत त्याची सैन्ये, राज्ये नि संस्कृति, सरस्वतीपासून ब्रह्मावर्तास, ब्रह्मावर्तातून मगधास, प्रयागास व काशीस, मथुरेस, द्वारकेस—पूर्व समुद्रापासून तो पश्चिम समुद्रापर्यंत अप्रतिहपणे कशी विस्तारत गेली, विंध्य ओलांडून, सह्य ओलांडून अती दक्षिण समुद्र त्यांनी कसा गाठला, अनादि घनदाट महाअरण्ये कापून छाटून प्रदेशाचे प्रदेश त्यांनी कसे वसविले, नागरले, परले, महस्रावधि नगर आणि महानगरे कशी उभारली, वाटत भेटली ती ती विभिन्न जानपदं नि विपक्षीय संस्कृति काही सामावून घेतल्या, काही पचवून टाकल्या, काही कशा मातीस मिळविल्या, कित्येक रावणाची दाही दाही शिर कशी छाटून टाकली, कित्येक द्वेष्ट्याचे सहस्र सहस्र बाहू कसे तोडून टाकले, कित्येक बळी—महाबळींना कस पाताळी घातल, काव्यशास्त्र, व्याकरण, कृति, शिल्प, धर्मप्रयोग, तत्त्वज्ञान प्रभृति भौतिक नि आत्मिक प्रगतीतही केवढे महनीय स्थान त्यांनी पटकाविल त काही आता नव्याने सांगावयास हव किंवा पुराव्याने सिद्धावयास पाहिजे असं नाही' डा आंबेडकर स्वत च त्या निबंधात म्हणतात की, ' That the Hindu Rel

अिजिप्शिअन, बाबिलोनिअन, खाल्डिअन, असीरियन प्रभृति हिंदूंच्या त्या काळची समकालीन राष्ट्रें आपलें सारें जीवनकार्य नि जीवन संपवून, मरून, अस्थिशेष वा अिष्टिकाशेष वा नामशेषही होअून गेलीं !

## (२) अैतिहासिक काल : प्राचीन खंड

**ग्रीकांची स्वारी आणि शेवटी हिंदूंनी त्यांची अुडवलेली धुळधाण :—**अितिहास कालाचे प्रारंभीच शिकंदराने अि. स. पू. ३२६ वे वर्षी हिंदुस्थानवर स्वारी केली. वैदिक नि पौराणिक काळातील दैत्यदानव, असुरनाग, यक्षराक्षसादि परकीय शत्रूशी दोन हात करून हिंदूंनी त्यांचा धुव्वा अुडवून दिला आणि त्या कित्येकांच्या वारशाप्रमाणेच सर्वांच्या बाराव्यालाही जेवून ते मोकळे झाले ! त्यानंतरचा काळ तो अितिहासकाळ. त्याच्या आरंभीच सर्व पृथ्वी पादाक्रांत करू निघालेल्या ग्रीकांसारख्या बलाढ्य शत्रूशी सामना देण्याचा प्रसंग ह्या शिकंदराच्या स्वारीमुळे त्यांना आला.

पण ग्रीस देशातून निघाल्यानंतर सीरिया, अिराणप्रभृति देशविदेश पादाक्रांत करीत आलेल्या शिकंदराच्या दिग्विजयाची लाट ह्या हिंदुस्थानच्या हिमालयीन तटावर आदळताच फुटून गेली आणि भारतविजेता म्हणवून घेण्याची शिकंदराची खुमखुम तर पंचनद ओलांडतो तोंच जिरून गेली ! त्याने पोरसाचा पराभव केला, पण तो अितक्या निकराच्या लढाअीनंतरच की ग्रीक सैन्याचें त्यापुढच्या साम्राज्याशी गाठ घालण्याचे धैर्यच काही अंशी तरी खचून जावे ! व्यास नदी ओलांडून त्या मगध साम्राज्याशी गाठ घालण्याचें शिकंदराच्या सैन्याने साफ नाकारलें, बंड केलें आणि शिकंदराला परत फिरणें भाग पाडले. ह्या बंडाला अितरही काही कारणें असलीं तरी जर का मगध साम्राज्यामध्ये शिकंदरास अिराणप्रमाणेच मोकळें रान सापडण्याचा संभव असता नि चालता चालता जिंकता येण्याअितकें ते दुर्बल आहेसें त्या ग्रीक सैन्यास वाटले असते तर ते मगधाच्या राजवाड्यात दोन चार चमचमीत भोजनसमारंभ झुरकल्यावांचून थोडेच परत जाते ! आणि परत

## शिकंदर दिग्विजेता होताच होता; पण तो भारतविजेता नव्हताच नव्हता !

पंचनदाच्या पुढे तो पाऊल देखील टाकू शकला नाही. दक्षिण समुद्रापर्यंत पसरलेल्या हिंदुराष्ट्रसंघाचा केसदेखील तो वाकडा करू शकला नाही. दक्षिणेत तर तो आला ही बातमी सुद्धा पोचण्याचे आधी सिंधु ओलांडून तो आला तसा परत गेलाही होता ! अेक पंजाब तेवढा त्याने आपल्या साम्राज्यास जोडला (ख्रि. स. पू. ३२६), पण हिंदूंनी ग्रीकांच्या अधिकाऱ्यांना पिटाळून लावून तो लगोलग परत घेतला (ख्रि. स. पू. ३२२ चे आत) ! अवघ्या चार वर्षांचे आत जगतातील त्या काळच्या बलाढ्य शत्रूचा पाय हिंदूंनी हिंदुस्थानातून रोवला जाता जाताच असा अुखडून टाकला !

पण अितक्यावरच थांबले नाही. हिंदूंचा हा विजय अप्रत्यक्ष विरोधाचा, यावनी सैन्याशी समोरासमोर खड्गास खड्ग भिडवून काही हिंदूंनी त्यांना धूळ चारली नाही, असे कोणी वावदूक म्हणूच लागला तर त्याचेही तोंड बंद पाडणारी घटना ग्रीकांच्या ख्रि. स. पू. ३२२ तील वरील अुच्चाटनामागोमागच घडून आली. ग्रीकांसारख्या बलाढ्य शत्रूशी सामना देण्यास पालटलेल्या परिस्थितीत जे अवश्य ते ते जुने टाकून, चाणक्याच्या अलौकिक प्रतिभेने नि चंद्रगुप्त मौर्याच्या पराक्रमाने मगधात मोठी राज्यक्रांति घडवून आणली. हिंदुसाम्राज्याची सूत्रे त्याच्या हाती येताच ग्रीकांच्या हातातून हिंदूंनी पंजाब लगोलग हिसकून घेतला असे पाहताच शिकंदराचा प्रबळ सेनापति सेल्युकस हा यावनी सैन्यासह पंचनदावर ख्रि. स. पू. ३०५ च्या सुमारास पुन्हा चालून आला. तेव्हा सम्राट् चंद्रगुप्ताने त्याला रणांगणात गाठून अभिमुखसमरात ग्रीकांचा अितका पूर्ण पराभव केला की, पंचनदच नव्हे तर अफगाणिस्थान आणि बलुचिस्थान हे प्रांतही विजयी हिंदुराष्ट्रास देऊन वरती अहेर म्हणून ग्रीकसम्राट् सेल्युकसने आपली कन्याही हिंदुसम्राट् चंद्रगुप्ताला अर्पिली ! त्या काळच्या जगातील बलाढ्यांतील बलाढ्य अशा ग्रीकांवर हिंदूंनी असा निर्विवाद विजय मिळविला ! ख्रि. स. पू. ३०५ च्या आधी हिंदूंनी ग्रीक राष्ट्राचा

प्रबळ होतें की नाही त परस्पर चंद्रगुप्ताचे राजधानीत असलेला ग्रीकांचा राजदूत जो मेगॅस्थेनिस त्यालाच विचारा! त्या 'देवानाम् प्रिय' अशोकाच्या यश स्तंभांना विचारा! हा पुरावा समोर ठेवल असता हिंदूच जीवन सतत 'शरणागतीच' नि अखंड पराभवाचे' होतें अस कोणता पिशुन म्हणू धजेल!

**मीनांदराशी युद्ध** — सेल्यूकसला चंद्रगुप्तान पराभविल्यानंतर कोणाही अहिंदूस भारतवर्षाची सीमा अुल्लंघिण्याचे धाडस अव्याहत १०० वर्षेपर्यंत झाले नाही, पण मौर्यवंशाचे बौद्ध राजे पुढे दुबळे झालेले पाहताच आशियातील ग्रीक राजांनी हिंदुस्थानवर दुसर मोठ आक्रमण करण्याचा घाट घातला तेव्हा मागे नंदवंशीय सम्राट् असेच दुबळे झाल्यामुळे चाणक्य-चंद्रगुप्ताने त्या नंदवंशीय सम्राटास ठार करून हिंदुसाम्राज्याची सत्ता जशी आपल्या हाती घेतली होती तशीच वैदिक धर्माचा निस्सीम अभिमानी असलेल्या सेनापति पुष्यमित्रान त्या दुबळ्या बौद्ध बृहद्रथ राजास मारून या वेळीही साम्राज्यसत्ता आपल्या पराक्रमी हाती घेतली मगधात ही राज्यक्रांति होत आहे तोच ग्रीक राजा मीनांदर हा सिंधु ओलांडून पंचनदात ख्रि स पू १८० चे सुमारास घुसला ग्रीकांनी तडाख्यासरशी चाल करून साकेत घेतल आणि ते मथुरेपर्यंत चालून आल, तोच सम्राट पुष्यमित्रान तेथे त्यांना गाठल रणामागून रणामध्ये हिंदुसैन्याने ग्रीकांस चोप दिला आणि मागे रेटीत रेटीत शवटी पुष्यमित्राने मीनांदराचा अितका धुव्वा अुडविला की, त्यास धावपळ करीत सिंधूपार होता होताच नाकी नव आले हा विजयाची घोषणा करण्यासाठी हिंदुसम्राट पुष्यमित्र ह्यान मोठा अश्वमेध यज्ञ आरंभून आपला यज्ञीय विजयाश्व संचाराय सोडला त्यास काही ग्रीक राजांनी अडविताच पुष्यमित्राचा पुत्र जो युवराज अग्निमित्र ह्याने त्याचाही मोड केला हिंदूंच्या अप्रतिरथ पराक्रमाची द्वाही अशी देशोदेशी गाजवीत तो विजयाश्व परतल्यानंतर पुष्यमित्र सम्राटाने आपला अश्वमेधयज्ञ पुरा केला

"मीनांदरच्या ह्या स्वारीविषयी हे लक्षात ठेवले पाहिजे की, मथुरेपर्यंतचा अुत्तरपश्चिमचा जेथ प्रांत सोडला तर बाकीच्या साऱ्या दक्षिणोत्तर अशा विस्तृत भारतवर्षाला शिकंदराच्या स्वारीप्रमाणे ह्या स्वारीचाही लवलेश संबंध आला नाही आणि त्या परसनूना आत येता येताच हिंदूंनी अस लगाम पिटाळून लावल

**शक आणि यूची ह्यांशी महायुद्ध** — सम्राट पुष्यमित्राच्या वरील दिग्विजयानंतर हिंदुराष्ट्राला अहिंदु आक्रमणाशी तोंड देण्याचा म्हणण्यासारखा प्रसंग शंभर वर्षे तरी काही आला नाही त्यानंतर साऱ्या आशियाला हादरा टाकणाऱ्या शक आणि यूची यांच्या टोळधाडी जेव्हा अुठल्या तेव्हा अिसवी सनाच्या पहिल्या शतकात हिंदुराष्ट्रालाही त्यांचा प्रचंड धक्का बसून हिंदूंच्या प्राचीन अितिहासाला अेक तत्कालीन लांछन लागावे अितका आमचा पराभव झाला ग्रीकांच्या आक्रमक सैन्यांना हिंदुस्थानात घुसताच जस अेका दशकाचे आतच चंद्रगुप्ताने वा पुष्यमित्राने

पुन्हा सिंधूपार पिटाळून लावलें तसें या शक-यूचींचें पारिपत्य लगोलग कोणी करू शकला नाही; उलट काश्मीर, पंजाब, सिंध, काठेवाडप्रभृति प्रांतांत त्यांची राजसत्ता चिरस्थायीपणे स्थापिली जाऊन त्या अहिंदु राजवंशांनी उज्जयिनीप्रभृति दोन-तीन राजधान्यांतून दोन-अडीच शतके तरी राज्य करू शकावें, ही वस्तुस्थिति त्या कालखंडापुरती लज्जास्पदच समजली पाहिजे.

परंतु असा तात्कालिक पराभव होणें आणि दोनचार प्रांत शत्रूचे हातीं पडणें हें निराळें आणि तो अल्पांशी नि अल्पकालीन पराभव झाला म्हणून त्या यच्चयावत् राष्ट्राचें यच्चयावत् जीवनच 'सतत पराभवाचेंच काय तें होय' असें अप्रमाण नि आचरट विधान करणें हें निराळे !

विषप्रयोगाच्या संकटात बलिष्ठ भीमसेनही मूर्च्छित होऊन डोहात बुडाले, त्या वेळी कित्येक नागांनी त्यांना विळखून टाकलें, कित्येक बेडूक त्यांच्या डोक्यावर नाचले, पण त्या नागांच्या त्या विषासही पचवून त्या विषप्रयोगाच्या बेशुद्धीतूनही ते सावरले आणि त्या विषप्रयोगाचा सूड त्या दुःशासनाचा कंठनाळ फोडून घेते झाले हेंच भीमाचें भीमपण ! पण तें विसरून आणि त्या तात्कालिक बेशुद्धीसच भीमसेनाचें सबंध जीवन समजून 'भीमाचें जीवन म्हणजे एक अखंड बेशुद्धीच होती, जन्मभर त्या दुबळ्याचे डोक्यावर बेडकें नाचलीं' असें जर कोणी ट्रांवट्रांवू धजेल तर ते कोणी फुगीर बेडूकच काय ते !

शक-यूचींच्या भारतावर कोसळलेल्या या आपत्तीचीही गोष्ट तशीच आहे. गुजराथपर्यंत त्यांची सत्ता चालू होती. भारतीयांस त्यांचा यशस्वी प्रतिकार करवला नाही; पण त्या अवधीत आंध्रीय हिंदु सम्राटांनी आपली शक्ति एकवटून शक लोक नर्मदा उतरून येतात तोंच त्यांची गाठ घेतली. प्रथम त्यांना नर्मदेपार हुसकलें आणि मग आंध्रांचा प्रबळ हिंदु नृपति गौतमीपुत्र विलिवनकूर शालिवाहन ह्याने शकांच्या हातून उत्तरेकडील प्रांतामागून प्रांत परत घेत शेवटी शकांचा प्रत्यक्ष राजा नहपान क्षहराट यास तुमुल संग्रामात पराभवून ठार मारलें ! त्या हिंदु विजेत्याची आई जी गौतमी तिला आपल्या वीरपुत्राने अहिंदूंचा असा सूड उगविल्याची बातमी कळताच इतका परमहर्ष झाला की, त्याची स्मृति कार्लें येथील शिलालेखात नित्याची कोरून ठेवली जावी ! इ. स. १०६ ते १३० पर्यंत ह्या प्रतापी गौतमीपुत्राने राज्य केल्यानंतर त्याचा पुत्र राज्यावर बसला. तोच प्रख्यात शककर्ता पुलुमायी शालिवाहन हा होय ! त्याने उज्जयिनीचा दुसरा पराक्रमी राजा जो रुद्रदामन त्याचाही पराभव केला.

इ. स. ३२० चे सुमारास वैदिक धर्माभिमानी गुप्त वंशाच्या हातीं जेव्हा उत्तरेच्या हिंदु साम्राज्याची सूत्रें गेलीं तेव्हा त्याचा पराक्रमी संस्थापक सम्राट् चंद्रगुप्त याने उत्तरेच्या यूचींचा नि शकांचा उच्छेद मांडला. त्याचा पुत्र सम्राट् समुद्रगुप्त, ज्यास विदेशी इतिहासकारही भारतीय नेपोलियन म्हणतात, त्याने

पंचनदात घुसून शक-यूचींशी दोन-तीन पिढ्या चाललेल्या त्या महायुद्धात विजयामागून विजय मिळवीत त्या परकीयांची धुळधाण अुडविली ! त्याचा पुत्र सम्राट् चंद्रगुप्त (द्वितीय) होय. विक्रमादित्य तो हाच ! कनिष्कापासून बळावलेली शक-यूचींची सत्ता त्याने साफ लयाला नेली. त्याचा शेवटचा शत्रु जो रुद्रसिंह त्याचा हिंदुसैन्याने पुरता पराभव करून त्याची राजधानी जी अुज्जयिनी तीही घेतली. सिंधु नदीपासून पूर्व, पश्चिम, दक्षिण सिंधूपर्यंत जिकडे तिकडे हिंदुराष्ट्राचे विजय-दुंदुभि पुन्हा अप्रतिहतपणे दुमदुमू लागले.

जवळजवळ दोनशे वर्षे काश्मीर ते नर्मदेपर्यंतचा सिंधु-गंगेच्या मधील भारतीय प्रदेश शक-यूचीच्या परकीय सत्तेखाली होता. हिंदु वंशांनी रणामध्ये त्यांचा चक्काचूर अुडविला, हे तर झालेंच; पण त्या सामरिक विजयापेक्षाही अेक अत्यंत गौरवास्पद असणारा दुसरा जो विजय हिंदूंनी त्या लाखो शक-यूचींवर मिळविला तो होता सांस्कृतिक विजय ! वास्तविकपणे शक-यूची आत आले तेव्हाच काय ते खरे परकीय होते, खरे शक-यूची होते; पण जेव्हा खि. स. १३० च्या संधीस कनिष्काने बौद्धधर्म आणि अितरांनी वैदिक धर्म स्वीकारला तेव्हाच हिंदूंनी त्यांना खऱ्याखुऱ्या अर्थी पादाव करून टाकलें ! अेक शतकाचे आत हिंदुसंस्कृतीचा ध्वज त्या शक-यूचीच्या राजधान्यांवर नि राज्यांवर फडकू लागला ! त्यांच्यातील सहस्रावधि जनतेने नि शतावधि राजपुरुषांनी, मोठमोठ्या राजवंशांनी, वैदिक धर्म, भाषा-देश, वेष स्वीकारला—कित्येकांनी बौद्ध ! हिंदुराष्ट्राने त्यांचीं राज्येच काय तीं हिसकावून घेतलीं नाहीत तर त्यांचे स्वत्वसुद्धा सर्वस्वी हिसकावून, महासर्प जसा त्याच्या प्रचंड जबड्यात घुसणाऱ्या हरिणाला जिवतच्या जिवंत गिळून पचवितो तसे हिंदुसंस्कृतीने तिच्या जबड्यात घुसणाऱ्या त्या लाखो शक-यूचींना आपल्या प्रखर जठराग्नीत गिळून गाळून मुळतें पचवून टाकले. त्यांनाच हिंदु करून सोडलें! आपल्या ह्या खि. स. ३०० ते ४०० च्या पराक्रमी कालखंडास विदेशीय अिंग्रज अितिहासकारही (Golden Age) स्वर्णयुग म्हणून संबोधतात सुदैवाने त्याच वेळी चीन प्रवासी फाह्यिन हा भारतवर्षात आला होता. मेगॅस्थेनिसप्रमाणेच त्याने ह्या काळच्या हिंदु राष्ट्राच्या पराक्रमाचें, सुस्थितीचे नि वैभवाचे जें वर्णन लिहून ठेवले आहे तेंच कुणिमन निर्देस सांगेल की, त्या काळी देखील हिंदूंचें जीवन पराजयाचें वा शरणागतीचे नसून शत्रूंना दाती तृण धरविणाऱ्या पराक्रमाचें, राष्ट्र-स्वातंत्र्याचें नि त्यांच्या जगातील प्रबलतम साम्राज्याचें होतें !

**हूणांची स्वारी .—** ह्या अैतिहासिक काळातील प्राचीन खंडामध्ये हिंदु-राष्ट्राला ज्या शेवटच्या राक्षसी शत्रूस तोंड द्यावें लागलें त्या हूणांविषयी अितकेच सांगतो आणि अितकेच सांगणे पुरेसे आहे की, जी शक-यूचींची गोष्ट तीच हूणांची. या हूणांच्या प्रचंड प्रलयसमीराने युरोपातील रोमन साम्राज्याची कंबरच मोडली. रशिया ते चीनसुद्धा अुभें जग अुलथेच्या पालथें घातले. पण हिंदुस्थान ? हिंदुस्थानात

त्याचा पाय शकांइतकाही रोवला गेला नाही. त्यांनी केलेला हिंदुस्थानातील उत्पात जितका भयंकर होता तितकाच त्याचा उच्छेदही त्वरित झाला. पंजाबातून घुसून त्यांचा पुढारी तोरमाण याने ५०० सनाचे सुमारास माळव्यापर्यंत आक्रमण केले. ५०२ मध्ये त्याचा पुत्र मिहिरगुल गादीवर बसला. आणि लगोलग हिंदुराजांचा प्रबळ संघ उभवटून हिंदूंचा प्रतापी सेनापति जो यशोवर्धन त्याने हूणांना रणांगणात चोपून काढीत पंजाबापर्यंत रेटत आणि शेवटी अशा तुंबळ संग्रामात मुलतानजवळ कोरूर येथे त्यांचा पूर्ण पराजय करून रणाग्नीत त्यांची हिंदुस्थानातील राजसत्ता भस्म करून टाकली आणि जे सहस्रावधि हूण लोक मागे राहिले त्यांची बर्बरता ब्राह्मणांनी यज्ञाग्नीत भस्म केली ! — त्यांना हिंदु करून टाकले ! ! Can this be called a life of continuous surrender or submission ! No. It is a life of virile Triumph !

## हिंदूंचे जागतिक आणि सांस्कृतिक साम्राज्य

या कालापर्यंत हिंदुराष्ट्राने आपले स्वतःचे राजकीय स्वातंत्र्य नि राजकीय वर्चस्व आसिंधु सिंधु भरतखंडात भरभराटत ठेवले होते. इतकेच नव्हे तर मोठ-मोठी नौसैन्ये, नौसाधनें (आरमारें) उभारून हिंदुमहासागरापलीकडे असलेल्या देशांवरही आपल्या सांस्कृतिक साम्राज्याप्रमाणेच जे राजकीय साम्राज्य प्रस्थापिले होते तेही या इ. स. १००० पर्यंतच्या कालखंडापर्यंत अबाधित ठेवलेले होते. मिसर (इजिप्त) पासून मेक्सिकोपर्यंत बुद्धकालाच्याही अनेक शतकांचे आधी हिंदूंनी स्थापिलेल्या राजकीय साम्राज्याच्या आमच्या पौराणिक किंवा पाश्चिमात्यांनी लिहिलेल्या दंतकथात्मक ग्रंथातील अस्पष्ट उल्लेखांना आपण या लेखापुरतें सोडून देऊ. अगदी ताम्रपट, शिलालेख, उत्खनन इत्यादींच्या साहाय्याने परकीय फ्रेंच आणि डच संशोधकांनी निर्विवाद म्हणून लिहिलेल्या इतिहासाप्रमाणेच सिद्ध आहे की, इसवी सनाचे आरंभापासून तो सन १००० पर्यंत आज ज्याला सयाम, जावा, सुमात्रा, बाली, अनाम, हिंदुचीन (इंडोचायना) म्हणतात, त्या सर्व देशांत भारतीयांची राज्ये थाटलेली होती. तिकडे चीन सम्राटांच्या सैन्यावर अनेक वेळा भारतीय सैन्याने विजय मिळविले. तेथील नगरांची, देशांची, पर्वतांची, नद्यांची भारतीयांनी ठेवलेली संस्कृत नावे रूढ झालेली होती. ती आजही बहुतांशी तशीच टिकून राहिलेली आहेत. मलय (आजच्या 'मलाया') साम्राज्य हे तीन चार शतके अत्यंत प्रबळ म्हणून गाजत होते. 'अहो पण तीं भारतीय बुद्धधर्मीयांचीच राज्यें होतीं ! ' असा निरर्थक श्लेष मुद्दा काढण्यास कोण्या हिंदुद्वेष्ट्याचा वावदूकाला इथे अवकाश नाही ! कारण ती सारी राज्ये क्षत्रियादि वैदिक धर्माभिमानी राजांनीच स्थापलेली होती. बुद्धभिक्षूंप्रमाणेच शैव-वैष्णवादि पंडितही भारतीय धर्म नि संस्कृति यांचा प्रचार करीत होते. या आठ नऊ शतकें चाललेल्या हिंदूंच्या भिन्न भिन्न

राजवंशातील नावेंच पहा! चंपा (अनाम तें हिंदुचीन) त्या राज्यावर अि. स. ३८० मध्ये राजा भववर्मा हा बलाढ्य राजा राज्य करीत होता. त्याच्या राज्यातील विभागांची नावे अमरावती, विजय नि पांडुरंगपूर अशीं होतीं. वेदपारंगत म्हणून त्याची ख्याति होती. चीनच्या राजाने चंपावर केलेल्या अेका प्रबळ चढाअीत चंपा राज्य धुळीस मिळण्याचा प्रसंग आला असतां नवे भूदल नि सिंधुदल अुभारून चिनी सैन्याचा नि सत्तेचा ज्याने ५२६ मध्ये धुव्वा अुडविला त्या हिंदुराजाचें नाव रुद्रवर्मा होतें. अशींच अिंद्रवर्मा, पुरुषोत्तम, श्रीहरिवर्मा प्रभृति राजांचीं नावेंच सांगतात कीं ते वैदिक धर्माभिमानी क्षत्रिय राजे होते. कंबुज (cambodia) चें हिंदुराज्यही असेंच होतें. सयामच्या राजवंशांत राजा राम पहिला, राम दुसरा असे सहासात राजे राम या नावानेच होअून गेले. अलीकडेच राज्यत्याग केलेल्या राजाचेंही नांव 'राम' च हे वृत्तपत्राच्या चालचलाअू वाचकांनाही ठाअूक आहे. बुद्धाप्रमाणेंच शंकराचीं नि विष्णूचीं प्रचंड मंदिरें या सार्‍या देशांतून अुभारलेलीं होतीं. रामायण, महाभारत यांचीं पारायणें नि राममंदिरांतून त्याच्या कथांचीं लोकनाट्यें होत होतीं. बुद्ध भिक्षु नि वेदविद् ब्राह्मण यांचा सन्मान सारखाच होअी. राज्याभिषेक ब्राह्मणांच्या करवी वैदिक संस्कारांनीं होत. हिंदूंच्या त्या बृहत्तर भारतीय राजकीय दिग्विजयांत त्यांनी स्थापिलेलीं राज्यें न्यूनतम नअुशें वर्षें तरी भरभराटलेली होतीं. हीं बहुतेक राज्यें मलय, पांड्य, चेर, चोल, कलिंग नि आंध्र ह्या हिंदुराजवंशांनी आणि केव्हां केव्हां सर्वसाधारण हिंदु जनतेतच निर्माण झालेल्या पराक्रमी पुरुषांनी स्थापिलेलीं होतीं. अिकडील समुद्रांतून भारतीयांची शेवटची अुल्लेखनीय स्वारी म्हणजे पांड्य राजानें अेक बलाढ्य सिंधुदल घेअून ब्रह्मदेशावर केलेली स्वारी होय. ब्रह्मदेश जिंकून परत येतां येतां अंदमान द्वीपपुंजही त्याने हस्तगत केला नि नंतर त्या स्वारीच्या गौरवार्थ भारतांत आल्यावर अेक जयस्तंभ अुभारला ही घटना अकराव्या शतकांतीलच होय.

## पण परकीयांनी केव्हां केव्हां तरी हिंदूंचा पराभव केलाच ना ?

पण अितक्या परकीयांनी हिंदूंवर स्वार्‍या करून तात्कालिक विजय तरी मिळविलेच कीं नाही म्हणून विचाराल तर आम्ही विचारूं कीं, ग्रीस देशाच्या शौर्याची खरी कसोटी केव्हां लागली असे युरोपियन ग्रंथकार मानतात ? त्याच्यावर जेव्हां पर्शियनांसारखे परकीय प्रबळ लोक चालून आले, ग्रीस जवळजवळ त्यांनी गिळला आणि तरीही हतोत्साह न होतां ग्रीकांनी त्यांना शेवटी पिटाळून लावलें, तेव्हांच ना ? मग त्याच कसोटीनें ह्या लेखावर अुद्धृत केलेल्या टॉडच्या वाक्याप्रमाणे तशा थर्मापिली नि लिओनिडास ज्या भारतांत पावलोपावली आढळून आले त्या भारताच्या पराक्रमाचीही खरी कसोटी तीच कां समजूं नये ? ग्रीस, रोम, अिंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, अिटली, रशिया, चीन यांच्या जीवनकालांतही

परचक्राची दहा दहा आक्रमणे आणि पारतंत्र्याची शतके आढळत नाहीत का? एका टोचभर ब्रिटनचीच गोष्ट घ्या. रोमन्स, अँगल्स, सॅक्सन्स, डेन्स, नॉर्मन्स किती परकीयांनी कितीदा ते बेट जिंकून तिथे राज्ये चालविली!! मग तवढ्यासाठी त्या ब्रिटनचे किंवा त्या अितर राष्ट्रांचे जीवनही 'A life of continuous defeat' आहे, अखंड शरणागतीचेच आहे असे म्हणण्याची तुमची छाती आहे काय? त्यांच्याविषयी तसे जे तुम्ही म्हणू शकत नाही ते अेवढ्याचसाठी ना, की जरी परचक्रे त्यांच्यावर आली नि त्यांच्या राजधान्याही शत्रूंनी घेतल्या तरी शेवटी त्या त्या राष्ट्रांनी त्या शत्रूंना जिंकून स्वराष्ट्र राखले' शत्रूंच्या आहारी नित्याचे जाअू दिले नाही, तर मग त्या कसोटीसच ज्या ह्या हिंदुराष्ट्राचा प्राचीन अितिहासकाल शतपट अधिकपणे अुतरत आहे त्या हिंदुराष्ट्राविषयी 'The Hindus' life has ever been a life of continuous defeat' असे निर्लज्ज विधान करणे हा निव्वळ शिवराळपणाच ठरत नाही का?!

त्यातही हे ध्यानात ठेवले पाहिजे की, ग्रीक वा शक वा यूची वा हूण हे कोणीही आमच्या सीमा प्रांताबाहेर फारसे घुसू शकले नाहीत, गंगा अुतरू वा विंध्य ओलांडू फारसे शकलेच नाहीत!

हूणांना नामशेष करून टाकल्यानंतर काश्मीर ते नेपाळ, द्वारका ते कामरूप, हिमालयापासून लंकेपर्यंत हिंदूंचे साम्राज्यच पुन्हा भरभराटलेले होते. त्याची साक्ष श्रीहर्ष नि पुलकेशी ह्या अुत्तर-दक्षिण हिंदुस्थानातील दोघा दिग्गजांच्या रक्षणाखाली भारतवर्ष नांदत असता आलेला प्रख्यात चिनी प्रवासी जो युआनचंग (ह्यूअेनत्संग) त्याचे जगत्प्रसिद्ध प्रवासवृत्त देतच आहे! सम्राट् श्रीहर्ष अि. स. ६४६ चे सुमारास वारला. आमच्या अैतिहासिक काळाचा प्राचीन खंडही येथेच संपला!

निर्विवादपणे सिद्ध झालेलेच आहे म्हणूनच मुस्लिमांच्या भयंकर आक्रमणामुळे पहिल्या तीन चार शतकात हिंदूचे पराभवामागून पराभव होत गेले हे सत्य जसे घडले, तसेच पण ज्या प्रमाणात ते घडले त्याच प्रमाणात वाय ते स्पष्ट न सांगण्याचा भेकड यत्न आम्ही मुळीच करीत नाही ऐतिहासिक वर्णन हा ह्या लेखाचा विषयच नव्हे, तर त्या अितिहासाचे धावते समीक्षण हाच अेवढा या लेखाचा जो विषय आहे, त्यास अनुसरून आम्ही अेका वाक्यातच स्पष्टपणे सांगून टाकतो की, साधारण अि म १००० व्या वर्षापासून मुस्लिमाशी हिंदूचे जे महायुद्ध घडले गेले त्यात साधारणत सन १५०० पर्यंत हिंदुसैन्याच्या मुस्लिम सैन्याशी जिथे जिथे मोठमोठ्या लढाया झाल्या तिथ तिथे शेकडा नव्वद लढायात हिंदुपक्षाचा धुव्वा अुडाला हिंदु मुस्लिम महायुद्धाच्या पूर्वार्धातील हिंदुराष्ट्राच्या या सतत पराभवाने कोणाला आनंदाची अुकळी फुटत असेल तर त्याच्या त्या आनंदात तेवढ्या प्रकरणी विरजण घालण्याचा मोह आम्हास मुळीच होणार नाही, पण ज्याप्रमाणे मुसलमानांनी पूर्वार्धात अफगाणिस्थानापासून तो कन्याकुमारीपर्यंत हिंदूचा शेकडा नव्वद लढायामागून लढायात धुव्वा अुडवीत आणि हिंदूची राज्यामागून राज्ये घेत सर्व भरतखंडभर 'हिरवा चांद' फडकविला, त्याचप्रमाणे त्याना प्रत्येक पावली टक्कर देत देत, प्रतिकार करीत करीत त्या शतकव्यापी संघर्षात शेवटी जेव्हा हवी ती ठिणगी पडून सह्याद्रि पेटला, तेव्हा हिंदुविक्रमापुढे मुसलमानासही पळता भुअी थोडी झाली! तोडीस तोड अुडाली! साधारणत सन १६०० पासून तो १७९३ पर्यंत जेथे जेथे हिंदुसैन्याची मुसलमानी सैन्याशी लढाअी जुंपली तेथे तेथे शेकडा नव्वद लढायात हिंदूनी मुसलमानाचा धुव्वा अुडविला मुसलमानाच्या बादशाह्यामागून बादशाह्या नि नबाबामागून नबाब बुडवीत हिंदूच्या सेना मराठ्यांच्या सेनापत्याखाली प्रत्यक्ष अटकेपरील 'हिरव्या चादाला' धुळीत लोळवून तिथे भगवा ध्वजच अुभारल्या झाल्या!

भाअूसाहेब पेशव्यानी अकबर-औरंगजेबाचे बादशाही तख्त हिंदु घणाचा घाव घालून अक्षरश फोडून टाकले! भाट चारणाच्या जयघोषानी आकाश दुमदुमू लागले

> आज सात शतकाने पायी मिरवित सोनेरी तोडा।
> पुनरपि आजी हिंदुजयाचा पिअी सिंधुचे जल घोडा ॥ १
> हिंदू वीराचा की थोडा असे यशस्वी हट केला।
> आज हिंदवी जरिपटका की पुन्हा पोचला अटकेला ॥ २

त्यातही हे ध्यानात ठेवले पाहिजे की, मुसलमानाशी हें सप्तशतकव्यापी महायुद्ध लढवीत असतानाच 'फिरंगाण' (युरोप) मधील अिंग्रज, डच, पोर्तुगीज, फ्रेंच प्रभृति राष्ट्रांशीही हिंदूना टक्कर द्यावी लागत होती ह्या सर्व परकीयांशी

हिंदूंचें पुढारीपण घेऊन विशेषतः महाराष्ट्र हा भूमीवर नि समुद्रावर समकालीन नि सतत युद्ध झुंजवीत राहिला. भाट गातात:–

१ पठाण, मोगल, तुर्क, अिराणी, हबशी, शिद्दी परोपरी ।
पोर्तुगीज वलंदाज फिरंगी अिंग्रेजादिक गोर खली ।। १
अिराणपासुनी फिरंगाणपर्यंत शत्रूची अुठे फळी ।
सिंधुपासुनी सेतुबंधपर्यंत रणांगण भू झाली ।। २
तीन खंडिच्या पुंडांची तो परंतु सेना तुडवीली ।
सिंधुपासुनी सेतुबंधपर्यंत समर भू लढवीली ।। ३

ह्या कालखंडाचे शेवटी मुसलमानांच्या राजसत्तेचा चक्काचूर अुडवून हिंदुस्थानामध्ये पुनरपि हिंदुराज्य जिकडे तिकडे कसें प्रस्थापित केलें गेलें तें अुल्लेखिलेल्या ओळीतच निर्विवादपणे दिसून येअील. जवळजवळ काबूलनदीपासून काश्मीर, पंजाब, पतियाळापर्यंत शीख-रजपूत-जाटांचीं हिंदुराज्ये, नेपाळात गुरख्याचें हिंदुराज्य, दिल्लीपासून तंजावरपर्यंत आणि काठेवाडपासून ओरिसापर्यंत मराठ्यांचें हिंदुसाम्राज्य आणि खाली म्हैसूर, त्रावणकोरची हिंदु राज्यें ! ! सात शतकें लढत लढत सतराव्या शतकाच्या आरंभी आरंभी हिंदूंनी हिंदुस्थानातून मुसलमानी राजसत्तेचा असा पुरा पुरा नायनाट केला होता !

पण आज ? आज हिंदुस्थान अिंग्रजाचे हातात आहे तें ? त्यास अुत्तर अितकेच की, तो प्रश्न अजून अनिर्णीत आहे. त्या 'आज'चें अुत्तर अुद्या किंवा परवा देता येअील !

हिंदूंच्या अेकंदर जीवनाविषयीचा प्रश्न अिथे प्रस्तुत होता. त्यासाठी हिंदु अितिहासाचे गेल्या पाच सहस्र वर्षांचे धावतें समालोचन वर केलेलें आहे. हिंदुराष्ट्रावर अनेक आपत्ति अशा आल्या की, त्यांच्या फटकाऱ्यासरशी मोठमोठीं राष्ट्रें नामशेष होअून गेलीं; परंतु क्वचित् चीनचा अपवाद सोडता जगाच्या अितिहासात अशा अनेक आपत्तींशी झुंजून, अनेक बलाढ्य शत्रूंना पादाक्रान्त करून शतकव्यापी महायुद्धें लढवून जर कोणते राष्ट्र आज पांच सहस्र वर्षें आपलें अस्तित्व आपल्या पराक्रमाने टिकवून राहिलें असेल, आपलें स्वातंत्र्य पुन्हा पुन्हा प्रस्थापित करीत आलेलें असेल, आपल्या धर्माचा, आपल्या संस्कृतीचा, आपल्या अंतिम अजिंक्यतेचा प्रभाव गाजवीत आलेलें असेल तर तें हिंदुराष्ट्रच काय तें होय!

# हिंदुसंघटकांनी आपल्या राष्ट्राचा अितिहास कसा लिहावा नि वाचावा ?

अितिहास कसा लिहावा नि वाचावा ह्या सर्वसाधारण प्रश्नावरच अेक प्रबंध लिहावा असा विचार माझ्या मनात अनेक वर्षे घोळत आहे, पण नैमित्तिक राजकारण नि समाजकारण हेंच परिस्थिति प्राबल्यामुळे जीवनाचें मुख्य कर्तव्य होअून बसल आणि ते पार पाडता पाडताच जीवनाचा दिवस सरत आला. त्यायोगे जी अनेक साहित्याची नि विज्ञानाची आवडची कामें राहून गेलीं त्यातच हा प्रबंधही आजवर अिच्छेचे फाटकापाशी अडकून पडला आहे. परंतु सध्या आपल्या हिंदुराष्ट्राच्या अस्तित्वासाठीसुद्धा जी झुंज अनिवार्य झाली आहे ती लढण्यासाठी अितर साधनांप्रमाणेच प्रत्येक हिंदुसंघटकाला आपल्या हिंदुस्थानचा अितिहास कसा लिहावा नि वाचावा, हिंदुसंघटनाला वर्तमानकाळात अधिक बलशाली करण्यासाठी भूतकालाचा कुठवर नि कसा अुपयोग करून घ्यावा हें कळणें अगदी अवश्य आहे. नाहीं तर संघटनेच्या ठायीं विघटना होण्याचें भय आहे. आपल्या हिंदुत्ववादाच्या बौद्धिक मांडणीमध्ये हिंदुस्थानचा अितिहास हिंदुसंघटकांनी कसा लिहावा नि वाचावा हाही अेक अध्याय अवश्य हवा. त्याविषयीं या लेखात काही प्राथमिक विधेयें (Points) तेवढी अगदी संक्षेपत देत आहे.

प्रत्येक हिंदुसंघटकाने हिंदुस्थानच्या वैदिककालापासून तो आजपर्यंतच्या अितिहासाचा हिंदुत्वाच्या विशिष्ट दृष्टिकोनातून अभ्यास केलाच पाहिजे. आपल्यापैकी जे पुढारी, पत्रकार, अध्यापक, शिक्षक, बौद्धिक वर्गचालक बनतें असे असतील त्यांनी तर आपल्या अितिहासाचे विशेषज्ञ व्हावेच पाहिजे. देवदैत्य, देवदानव, सुरासुर, आर्यानार्य यांच्या द्वंद्वाचा अर्थ काय तो समजून घेतला पाहिजे. त्यांचा युद्ध नि संधि होता-होता अुत्तरापथाचा नि दक्षिणापथाचा संबंध कसा आला, तेथेही संघर्ष नि समन्वय चालू असता यक्ष, राक्षस, किन्नर, नाग, अहिप, भूत, तक्षक प्रभृति अुत्तरेतील नि दक्षिणेतील पौराणिक कालात अुल्लेखिलेल्या जाती अेका महान भारतीय राष्ट्रात कशा समाविष्ट झाल्या, मोठमोठ्या सम्राटांच्या कधी अुत्तरेकडून दक्षिणेकडे नि कधी दक्षिणेकडून अुत्तरेकडे निघालेल्या साम्राज्यामुळे ह्या राष्ट्राच्या संस्कृतीत अनेक अुपजातीय संस्कृति, चालीरीति, भाषा, विभाषा मिसळत जाअून त्या सर्वांची मिळून अेक महान भारतीय संस्कृति कशी अुत्पन्न झाली, मनुस्मृतीत विस्तराने वर्णिल्याप्रमाणे अनुलोम प्रतिलोमाच्या पद्धतीचे सहस्रावधि विवाह होअून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र ह्यांचें रक्तबीजही अेकमेकांत कसें मिसळलें, अितकेंच नव्हे तर नव्या धन्य वा अन्य जाती जसजशा ह्या भारतीय राष्ट्रात नि संस्कृतीत सामावू लागल्या तसतसे त्यांचे आपसांत रक्तसंबंध कसे जुळत गेले, क्षत्रिय भीमाचें हिडिंबा राक्षसीशा कोणाही न बहिष्कारलेलें लग्न किंवा अर्जुनाचें मणिपूरच्या नागराजाच्या

मिसळत मिसळत, आमच्या वैदिक पूर्वजांनी जे ध्येय आखले होते ते शेवटी गाठून आजच्या आमच्या ह्या 'हिंदु' राष्ट्रात अेकजीव झाले आहेत. आसिंधुसिंधु भारत-भूमिका हीच ज्याची पितृभू आणि पुण्यभूहि आहे तो तो हिंदु. पूर्वी आम्ही कोणी आर्य असू वा अनार्य, नाग असू वा भिल्ल, ब्राह्मण असू वा शूद्र, वैदिक असू वा अवैदिक, जैन असू वा बौद्ध, सारस्वत असू वा द्रविड, शैव असू वा वैष्णव, आज आम्ही सर्व राष्ट्रीय अर्थाने 'हिंदु' आहोत. हे आमचे अेकजीवन आज ज्या अेकाच शब्दात वरील व्याख्येप्रमाणे व्यक्तविता येते तो अनन्य शब्द आहे 'हिंदु !'

या शब्दाच्या 'हिंदु' या दोन अक्षरात अगस्तीच्या अंजलीत जसा महा-सागर तसे तीस कोटी लोकांचे राष्ट्रचे राष्ट्र सामावलेले आहे!

अितक्या दीर्घ कालावधीत परस्पराशी संबंध आलेल्या अनेक घटकातील राष्ट्र-भेद, जातिभेद, धर्मभेद, भाषाभेद, संस्कारभेद ह्यांना अेका हिंदुराष्ट्रात अेकजीव करण्याचे महत्कार्य आजच्या परिणतीपर्यंत तरी जे आपल्या पूर्वजांनी आणून ठेवले आहे ते शस्त्र नि शास्त्र या दोन्ही साधनांच्या साहाय्यानेच होय. केवळ विग्रहानेच, जित नि जेते म्हणून ते अेकरूप पावते ना. केवळ संधीनेच ते सांधले जाते ना. केवळ मन वळवून ते वळत ना किंवा केवळ परस्पराचा अुच्छेद करून सगळ्यांना विना-शून अेकच कोणी तरी अवशिष्ट अुरता ना. संधि, विग्रह, शस्त्र, शास्त्र, समर नि समन्वय अशा दुहेरी नीतीनेच लहान टोळ्यांच्या जातीची अुपराष्ट्रे आणि अुप-राष्ट्रांची महान राष्ट्रे बनतात. सगळ्यांच्या माहितीचे म्हणून ग्हानसे ब्रिटनचेच अुदाहरण घ्या. मूळचे ड्रूइडस्, ब्रिटन्स, एंजल्स, सॅक्सन्स, नार्मन्स, अेक ना दोन अनेक परस्थ वा अग्रस्थ जातीच्या स्वाऱ्या, कलह, संधि होता होता शेवटी तीन मोठे भाग अुरले ते स्कॉटलंड, अिंग्लंड नि वेल्स. हेही परस्पराशी आज विग्रह तर अुद्या संधि, काही धर्माच्या प्रेमबंधाने तर काही राजनीतीच्या वशिल्याने काही शरणागति, काही देवाण घेवाण अशा दीर्घकालीन प्रक्रियेतूनच शेवटी अेक सबळ राष्ट्र बनले. त्यातही धार्मिक, राजवंशीय पक्षविपक्षीय अशी कारणपरत्वे पुन्हा पुन्हा यादवी माजली. शेवटी आज बाह्य परिस्थितीचे दडपण, अंतर्गत अेकराष्ट्रीयत्वाच्या भावनेचा विकास, सर्वांचे राजकीय प्रभृति हितसंबंध नि प्रभाव आपल्या राष्ट्रैक्या-मुळेच काय तो टिकू शकत आहे ही अनुभवाने पटलेली निश्चिति ह्या नि अशा कारणांनी ब्रिटनचे राष्ट्र अेकजीव आणि अेकप्राण झाले आहे. यात आयर्लंड गोव-ण्याचा यत्न झाला. पण तो अजून तरी सफल झालेला नसल्यामुळे ब्रिटनचे ग्रेट ब्रिटन बनू शकले नाही. पण समन्वयाची ती प्रक्रिया अजूनही चालू आहे. ब्रिटनसारख्या केवळ चार पाच कोटींच्या राष्ट्राची जर मूळ कथा अशी आहे तर तीस कोटि लोकांच्या भरतखंडासारख्या विस्तीर्ण भूभागावर निवसणाऱ्या आमच्या आज एकजीवित्व पावलेल्या ह्या महान् 'हिंदुराष्ट्राची' मूलकथा त्या राष्ट्रनिर्मात्या प्रक्रियेपासून अलिप्त कशी असणार ?

हिंदुराष्ट्राचा अितिहास लिहितानाही हीच अडचण प्रत्येक हिंदुसंघटनाच्या अभिमानी असणाऱ्या लेखकासमोर दत्त म्हणून अुभी राहिल्यावाचून राहणार नाही, पण तरीही प्रत्येक अितिहासलेखकाचे आद्यकर्तव्य बजावण्यास त्याने मुळीच टाळाटाळ करू नये. अितिहास लिहावयाचा तर तो अगदी 'अिति-ह-आस' असाच लिहावा. त्याचे वर्तमानकालावर काय परिणाम होतील ह्याची तो अितिहास लिहिते वेळी, त्याने मुळीच चिंता बाळगू नये. अैतिहासिक संशोधनाने अद्ययावत् म्हणून ठरलेली त्या त्या कालखंडाची माहिती अगदी सत्य तशीच लिहावी. राष्ट्रैक्याची किमया साधीत असताना किंवा चालत असताना वर सांगितलेली जी अपरिहार्य प्रक्रिया आहे तीमधून अितर कोणत्याही राष्ट्राप्रमाणेच हिंदुराष्ट्रालाही जावे लागणे अपरिहार्यच होते. त्यामुळे आपल्याही राष्ट्रावर अनेक परचक्रे आली, त्याच्याशी शतकानुशतकी युद्धे झाली. केव्हा अंतर्गत यादवीही चालू राही. धार्मिक मतभेदांनीही केव्हा केव्हा अुग्र स्वरूप धारण केले, परंतु अवांछनीय घटनाही अितिहास-लेखकांनी तितक्याच सत्यतेने सांगावयास हव्यात की, जितक्या सत्यतेने आपल्या हिंदु-राष्ट्रातील मोठमोठ्या सम्राटांच्या वैभवशाली राजवटींना किंवा आपल्या सहस्रश गौरवान्वित घटनांना स्वराष्ट्राभिमानी अितिहासकार व्यवस्थितपणे वर्णितात. अुदाहरणार्थ, अितिहासकार जरी स्वत ला आर्यवंशीय समजत असला तरीही त्यानं पूर्वी अनार्यांशी झालेली युद्धे किंवा मोठमोठे अनार्य राजे, तत्त्वज्ञ, वीर होऊन गेले त्यांचे वर्णन यथावत् केलं पाहिजे. कारण आपण आज आर्यांचा वा अनार्यांचा पक्षपाती अितिहास लिहीत नसून 'हिंदु राष्ट्राचा' अितिहास लिहीत आहोत आणि या हिंदुत्वात पूर्वीचे आर्यानार्य.दि सार वंश आणि त्यांच्या कुलकथा समीलित आणि अेकजीव झालेल्या आहेत. कोणी अितिहासलेखक वैदिक धर्माचा अभिमानी असेल, पण म्हणून त्याने पूर्वीच्या अितिहासातील आपल्या अवैदिक बुद्ध वा जैनधर्मीयांशी वैदिक धर्मीयांच्या काही वेळा झालेल्या विग्रहाचे वर्णन केवळ वैदिकांचीच बाजू अुचलून धरण्यासाठी पक्षपाताने करू नये किंवा तसे विग्रह आपआपसात काही वेळा झाले हें लपवूही नये. काही प्रसंगी बौद्धांनी पर-राष्ट्रांना आपल्या भारतावर स्वाऱ्या करण्यासाठी बोलावून किंवा तशा स्वाऱ्या झाल्या असता त्यांना साहाय्य करून स्वदेशाचे स्वातंत्र्य घालविण्याचा राष्ट्रद्रोह

शस्त्रधारण हें पाप नव्हे, पुण्य होय, अशी अहिंसेची योग्य मर्यादा प्रतिपादिली आहे व आचरिली आहे वैदिक नि अवैदिक हे दोघेही अेकाच आर्यकुलातील, अेकाच रक्तबीजाचे अंकुर होते भगवान् बुद्ध आणि भगवान् महावीर हे दोघेही क्षत्रियकुलातच जन्मले होते वैदिक वैदिकात काही प्रसंगी विग्रह झाला, तर उलटपक्षी काही प्रसंगी अवैदिक वैदिकात आणि अवैदिक-अवैदिकातही अंतर्गत यादवी झाली, जैनाजैनात मतभेद होअून कलह होत शैव वैष्णव दोन्ही वैदिक, पण क्वचित् प्रसंगी आपसात हमरीतुमरीवर येत

ही च गोष्ट आपल्या अितिहासाच्या सामाजिक, राजकीय, साहित्यिक, आर्थिक अंगांना लागू आहे आपल्या गौरवाचा अितिहास स्वाभिमानी लेखक स्वाभाविक-पणेच अुत्साहाने यथावत् लिहितो, पण आपल्या अितिहासातील दोषास्पद किंवा यादवीचे किंवा पराजयाचे वृत्तान्त लिहिताना त्याला तितक्याच स्वाभाविक-पणे ते गाळण्याचा किंवा टाळण्याचा किंवा सत्यकथनास विटाळण्याचा मोह होतो, पण हिंदुसंघटक अितिहासकारांनी तो मोह आवरावा ज्या काळात जी वस्तुस्थिति असेल ती जशीच्या तशीच लिहावी अितिहासाचे सत्यस्वरूप लपविण्याच्या अेका हास्यास्पद प्रयत्नाचे अुदाहरण द्यावयाचेच म्हटले, तर काही काँग्रेसी मंडळींनी गांधीजींच्या विक्षिप्त दिग्दर्शनास अनुसरून आपल्या अितिहासावर लिहिलेली चोपडी पहावी त्यामध्ये औरंगजेब अल्लाअुद्दीन प्रभृति शेकडो मुसलमान सत्ता-धीशांना केलेल्या हिंदूंच्या छळाचा नि त्यांच्या धर्मांध क्रूरतेचा अुल्लेखसुद्धा नाही मुसलमानी धर्म, सत्ता, सभ्यता ही किती निष्कलंक, न्यायशील नि थोर होती नि हिंदूंना चांगल्या रीतीने वागविण्यासाठी मुसलमानी नबाब शहा नि बादशहा औरंगजेबसुद्धा किती अहमहमिकेने झटत ते दाखविण्याचा विक्षिप्त यत्न त्यात केलेला आहे हिंदु नि मुसलमान अशा दोन धर्मांच्या नि राष्ट्रांच्यामध्ये अेक घन-घोर प्राणांतिक नि शतकव्यापी असे भयंकर युद्ध चालू होते आणि त्यात हिंदूंनी शेवटी मुसलमानी साम्राज्याचे तुकडे तुकडे अुडविले याचा नामनिर्देशही नसतो!!

पण असा असत्य अितिहास लिहिण्याने कधी हिंदुमुसलमानातील तेढ मिटेल? जोवर त्या अितिहासाच्या हिंदु वाचकांना आजच ताजे वृत्तपत्र अुघडताच मलबा-रच्या दंग्याची किंवा पाकिस्तान परिषदेची वातमी वाचावी लागते सीमेवरच्या हिंदूंच्या गावींच त्यांच्यावर मुसलमान जमाती चालून येत आहेत यांची घरे जाळीत आहेत, तोवर बिहार शरीफामारख्या अनेक दंग्यातून मुसलमानांची आग ओक पडताच संघटनाची नवी स्फूर्ति प्यालेले हिंदु हे मुसलमानांना दे माय धरणी ठाय करून सोडणारच! भागानगरवर हिंदुत्वनिष्ठ दळ चढाओ करणारच! पाकिस्तानच कबरस्तान करण्याचा अुठाव हिंदूकडून होणारच! पण समजा, हिंदु समाजाच्या संघटित शक्तीमुळे म्हणा किंवा अितर परिस्थितीमुळे म्हणा, मुसल-मानांना आपण अल्पसंख्य म्हणूनच अशक्त, तेव्हा ह्या देशात आपल्या

आधीच अुदार असलेल्या हिंदु बाधवाशी शक्य तो गुण्यागोविंदाने नादावे' असे वाटले आणि हिंदु-मुसलमान तसे अुद्यापासून वागत राहिले तर केवळ मागे अितिहासात अेकदा खड्र्यांची लढाअी झाली होती म्हणूनच काय तो मराठ्याचा दलभार खड्र्याकडे वारावर वार करीत थोडाच चढाअी करणार आहे? सधि होताच अेका महिन्यात महायुद्धे सपून राष्ट्राराष्ट्रातील शातलेचे नागरिक व्यवहार सुरळीत चालू लागतात रशिया आज जर्मनीचा मित्र होतो, तर अुद्या शत्रु राष्ट्राराष्ट्रातील सधिविग्रह केवळ अितिहासाच्या आवृत्तीची हौस असते म्हणून होत नसतात. आजच्या परिस्थितीत अनुकूल काय, प्रतिकूल काय ते पाहूनच आजचे व्यवहार चालतात. आज स्कॉटलड-अिग्लड-वेल्स मिळून ब्रिटन हे अभग, अेकसध, अेकजीव राष्ट्र झाले, पण म्हणून तेथील कोणत्याही शाळातून वा ग्रथालयातून त्याची परस्परात झालेली तुवळ स्वातत्र्ययुद्धे, धर्मयुद्धे, वर्गयुद्धे ह्याचे सविस्तर अुल्लेख असलेल्या अितिहासाना काही बहिष्कारून वा जाळून टाकलेले नाही किंवा ते मागचे कलह वाचून विद्यालय सुटताच बाहेर पडणारे अिंग्लिश, स्कॉच, वेल्स विद्यार्थी अेकमेकाची डोकी फोडू लागत नाहीत कारण अितिहास शिकवितानाच त्याना तो वाचावा कसा, अुपयोजावा कसा आणि त्याचे आपल्या अुन्नतीसाठी कोणते तात्पर्य काढावे हेही शिकविले जाते म्हणूनच ते मागचे अतगत यादवीचे त्याने सत्यतेचे वृत्तान्त वाचलेले असताही ते आजचे अेकसध झालेले ब्रिटन अेकाच ब्रिटिश ध्वजाखाली अुभे राहून ' Rule Britania ! Britania Rules the waves ! Britains never shall be slaves ! ' असे आपले राष्ट्रगीत अेकस्वराने गात आहे !

'मागच्या पिढ्यातील वैराचे सत्य जर आम्हास कळले तर या पिढीतही मनुष्ये अेकमेकाचे वैर करू लागतील, म्हणून असे अितिहास लिहूच नयेत !' असे ज्याना वाटते त्याना कळत नाही की, कागदावर लिहिलेले अितिहास फाडले तरी ते दगडावर कोरलेले आहेत त्या दगडाचे चूर्ण केलेत तरी अितिहास मरतोच असे नाही भाषेत, वाक्प्रचारातून, चालीरीतीमध्ये, जातीय स्मृतीच्या रोमारोमात तो भिनलेला असतो मूर्तिभजकाचे दुर्बल हात महमा न पुरतील अितका वर आकाशात अुच अुच अशोकाच्या स्तूपावर तो विराजत असतो किंवा भूगर्भातील खोल खोल मोहोंजोदडोसारख्या पातालमदिरात त्याची ग्रथालये सहस्रावधि वर्षे

ग्रहणामधून सूर्य बाहेर पडतो तसे, बाहेर पडलो तेव्हा तेव्हा आपले हिंदुराष्ट्र पूर्वीपेक्षा सख्याबळाने आणि गुणबळाने, पराक्रमाने आणि सघीकतेने अधिकच विशाल, विस्तृत नि भास्वान् होअून बाहेर पडत गेले

ह्या अशा कुशलतेने पाडलेल्या कालखडाच्या समारोपात शेवटी त्या काळच्या अितर देशाचीही सत्य स्थिति नि आपल्या दिग्दर्शनास अवश्य ती माहिती द्यावी. म्हणजे तुलनात्मक दृष्टीनेही आपल्या सतत चढत्या वढत्या हिंदुराष्ट्राची सत्य असेल तितकी श्रेष्ठता अुठावदार दिसेल जसे हूणानी सारे युरोप पादाक्रात केले, रोमन साम्राज्य धुळीस मिळविले, पण त्याना शेवटी धूळ चारली हिंदुराष्ट्रानेच. नमदेखाली तर त्याना अुनल्मुद्धा दिले नाही! सारे भारतवर्ष असे त्याना बघतामुद्धा आले नाही तीच गोष्ट मुसलमानाची त्यानी अरब, गिरिया, अिराण, आफ्रिका, मोगल, तार्तार, तुर्क मुसल्मानमय करून टाकले, पण सात शतके झुजूनही हिंदुस्थान हिंदुस्थानच राहिले! त्याच्या विषारी आक्रमणाची लाट शेवटी थोपवून, फोडून, त्याचे राजस्व अुच्छेदून आपले स्वत्व राखले असे हिंदुराष्ट्रानेच काय ते? अितर प्राचीन राष्ट्रे पार पिचून मरून गेली, मुसल्मानमय झाली त्या त्या काळच्या खाल्डियन, वाबिलोन, ग्रीक, रोमनापासून तो मुसल्मानप्रभृति राष्ट्राच्या बाहेरच्या अितिहासाची सक्षेपत माहिती प्रथम देअून अशी तुलना ह्या प्रत्येक कालखडाच्या समारोपात द्यावी

आसिंधुसिंधु भरतखड व्यापल्यानतर आणि अत्जीव केल्यानतर किंवा करीत असताच आपल्या हिंदुराष्ट्राच्या वैदिक आणि अवैदिक अशा दोन्ही शाखानी धार्मिक दिग्विजय प्रचड प्रमाणावर केला सैबेरिया, चीन, सयाम ते मेक्सिकोपर्यंत बुद्ध, जैन, शैव, वैष्णव प्रभृति आपल्या हिंदु प्रचारकानी आपल्या हिंदुसस्कृतीचा ध्वज फडकावीत नेला धार्मिक दिग्विजयाप्रमाणेच हिंदुराष्ट्र हिंदुमहासागर ओलाडून जे राजकीय दिग्विजय करीत गेले तेही ज्या कालखडात ते वृत्त घडले त्या कालखडात सलग वर्णिले जावे कलिंग, आध्र, पाड्य प्रभृतीनी आपली हिंदुराज्ये सयाम ते अिडोचायना (हिंदुचीन) आणि फिलिपाअिन्सपर्यंत प्रस्थापिली काश्मीरच्या ललितादित्यप्रभृति राजानी अुत्तरेकडे तार्तारीना शिक्षा करण्यासाठी थेट तार्तारीवर केलेल्या स्वाऱ्या, रजपुतानी बल्खबुखारापर्यंत केलेल्या मढाया, नेपाळने तिबेटचे केलेले पारिपत्य अरब अिजिप्त यापासून तो केप ऑफ

कथा काही माहीत आहेत; पण ह्या सामान्य जगतास त्यातील ऐतिहासिक अर्थ विवेचिता येत नाही. ह्यास्तव ह्या बृहत्तर भारताच्या अितिहासाची निरनिराळीं लहान नि चटकदार पुस्तकें प्रचारकासाठी लिहिलीं जावीत. सयामातील हिंदुराज्य, चीन-जपानमध्ये बौद्धधर्माचा प्रसार अशा अनेक प्रकरणावरील पुस्तिका प्रत्येक हिंदु सज्जनास वाचावयास मिळाल्या पाहिजेत.

अितिहास वाचावा कसा ? — हिंदुराष्ट्राचा हिंदुसंघटनीय दृष्टीने लिहिलेला असा सत्य, असा यथावत् अितिहास लिहावा कसा हें सांगण्यापेक्षाही तो वाचावा कसा हे स्पष्टविणें आपल्या आजच्या परिस्थितीत अत्यंत अवश्य आहे. हिंदुराष्ट्राचा अितिहास अुघडताच प्रथमतः ही भावना मनात अुद्‌भवली पाहिजे की, हा माझ्या अखिल हिंदु जातीचा अितिहास आहे. तो केवळ ब्राह्मणाचा नव्हे, केवळ जैनांचा, लिंगायतांचा, आर्यांचा वा द्रविडांचा, बंगालचा वा गुजराथचा नसून मागे वर्णिल्या-प्रमाणे तो आज ह्या सर्वांचें व्यक्तित्व ज्यात विलीन झालेले आहे, हे सर्व प्राचीन-अर्वाचीन घटक मिळून जें समन्वित, संघटित, अेकजीव असें 'हिंदुराष्ट्र' बनलें आहे, त्या हिंदुराष्ट्राचा आहे, अखंडनीय हिंदुस्थानाचा आहे. यातील गुण, दोष, मान, अपमान हे आता आपणा हिंदुमात्राची सामाजिक मत्ता झालेली आहे. पूर्वी प्रांताप्रांतांचीं स्वतंत्र राज्यें असत; पण आता तीं सर्व मिळून अेक अखंड हिंदुस्थान हेंच काय तें सर्वांचें अेक नि अनन्य राष्ट्र, अेक नि अभंग देश, आमची सर्वांची पितृभू नि पुण्यभू झालेली आहे. शीखांचें अमृतसर, वैदिकांची काशी, बौद्धांची गया ही सारी आम्हा हिंदूंची समाअीक नि सारख्याच पूज्यतेची होत. आमच्या भूतकालीन निरनिराळ्या अुपराष्ट्रांची जात-गोत-पंथांची समाअीक अभिधा व्यक्तविण्यासाठी आसिंधुसिंधु अशी ज्याची विशाल व्याप्ति आहे तो 'हिंदु' शब्द प्रचलित झाला. आपल्या भूतकालीन सर्व लहानसहान अुपराष्ट्रांचे नि राज्यांचें अेकीकरणच नव्हे तर अेकजीवीकरण होअून हें 'हिंदुराष्ट्र' प्रकटलें आहे.

हिंदुराष्ट्राच्या अितिहासाचे खरें स्वरूप आकलण्यास्तव सामष्टिक भावनेच्या प्रकाशातच तो जसा वाचला पाहिजे तसेंच आपण जो वाचीत आहो तो अितिहास आहे ही जाणीव अेकसारखी जागृत ठेविली पाहिजे. जे मागे घडलें ते ह्यात यथावत् नि यथाप्रमाण लिहिलेले आहे. आज काय घडावयास पाहिजे तें भूतकाळ सांगणार नसून तो प्रश्न आपण सोडविला पाहिजे. वर्तमानकालाने भूतकाळात त्या त्या वेळच्या भिन्न भिन्न परिस्थितीप्रमाणे आपल्या तत्कालीन पूर्वजांना जे जें योग्य वाटलें तें तें त्यांनी केलें. आज जर परिस्थिति भिन्न असेल तर धार्मिक, सामाजिक वा राजकीय प्रकरणी आपण आपल्या हिंदुराष्ट्राच्या हिताला जें अनुकूल असेल तेच आचरिलें पाहिजे. त्या त्या जिगत कालखंडांत आमचे आपसात काही धर्मकलह झाले असतील, जैन बौद्धांशी भांडले असतील, ब्राह्मण-क्षत्रियांचे कलह क्वचित् झाले असतील, ब्राह्म-क्षात्र शक्ति अेकत्र होअून वैदिक अवैदिकांशी झगडले असतील, त्या वेळेस

अुत्तर सम्राट् श्रीहर्ष आणि दक्षिण सम्राट् श्रीपुलकेशी ह्यांच्या अेकमेकांवर स्वाऱ्या झाल्या असतील, पण भूतकालात हें घडले म्हणून आज ती जुनी वैर का काणी अुकरून काढणार आहे? त्या काळी काही परिस्थितीत आज अयोग्य वा अवास्तव ठरणाऱ्या रूढी किंवा जातिधर्म हे त्या त्या मागच्या कालखंडात क्वचित अत्यंत आवश्यक किंबहुना अपरिहार्य किंवा अुपकारकही ठरले असतील, पण तेवढ्या-साठीच काय त्या त्या रूढी किंवा ते ते जातिधर्म आजहि आपण पाळावयाचेच की काय? पूर्वीपासून हिंदुराष्ट्राच्या अेकीकरणाची, प्रबलीकरणाची जी महान् प्रक्रिया आश्चर्यकारक बुद्धिमत्तेने नि प्रबलतेने आपल्या पूर्वजांनी चालविली तिलाच अनुसरून हिंदुराष्ट्राच्या संघटनास आजच्या परिस्थितीत अस्पृश्यता, जन्माधिष्ठित जातिभेद अित्यादि अनेक चालीरीतींना नि जातिगत धर्मांधमानांना आम्ही ते आज विघटक होतात म्हणून, बदलले पाहिजे. बुद्धधर्माची नि वैदिकधर्माची ज्या काल-खंडात काही धार्मिक नि बहुनांशी राजकीय नि राष्ट्रीय कारणांनी लढाओ जुंपली-नि शेवटी बौद्धांचा पाडाव होअून त्यांच्यापासून त्या काळी कोसळू पाहणारे राष्ट्रीय संकट निवारले गेले, तेव्हा पुढच्या कालखंडात हिंदुराष्ट्राच्या समन्वयप्रक्रियेमध्ये त्याच भगवान् बुद्धांना दहावा अवतार म्हणून समावेशिले गेले! तव्हा हिंदु-राष्ट्राचा अितिहास वाचतांना हिंदुसंघटकांनी अशा समन्वयदृष्टीने वाचावा. भूत-कालातील कोणत्याही घटनेची चिकित्सा वर्तमानकाळाचे अुपनेत्र लावून करू नये. तर ज्या कालखंडात ती घटना घडली किंवा त्या विशिष्ट समाजरचना होत्या, त्या कालाच्या परिस्थितीच्या प्रकाशात त्या निरीक्षाव्यात. त्यांचे मूल्यमापन त्या चांगल्या होत्या की वाअीट की अपरिहार्य हे ठरविण्याचा खरा निकष, म्हणजे त्या काळची परिस्थिति, आजची नव्हे. अुलट पक्षी आज काय कार्य, अकार्य काय हे मुख्यत ठरविले पाहिजे आजच्या परिस्थितीप्रमाणे ही चेतावणी (Warning) प्रत्येक हिंदु-संघटक अितिहास लेखकानेच आपल्या ग्रंथाच्या समारोपात सयुक्तिकपणे देत जावी. कोण्या धर्मपंथात मागे कलह जसेच किंवा कोणत्या अुपजातीतील काही व्यक्तींनी वा गटांनी अेखादे वेळी त्या काळच्या परिस्थितीत निंद्य धोरण स्वीकारले असेल, पण म्हणून ती जातची जात किंवा पंथचा पंथ केवळ तेवढ्याचसाठी निंदनीय समजणे जाणे अगदी अश्लाघ्य आहे. आजच्या परिस्थितीत जे निंद्य किंवा देश-घातक तेवढेच आज त्याज्य जे आज देशहितकारक ते आज आचरणीय. मागच्या अितिहासातील घटनांना अुल्लेखितानासुद्धा ही काळजी अवश्य घ्यावी की, आमच्या

# भारतीय तेजस्वी तारे

## देशभक्त पं. शामजी कृष्णवर्मा

Resistance to aggression is not only justifiable but imperative Non-resistance hurts both altruism and egoism

—*Hurbert Spenser*

सुप्रसिद्ध देशभक्त, स्वातंत्र्यवादाच्या आद्य पुरस्कर्त्यांतील अेक अग्रगण्य पुढारी, नि शस्त्र प्रतिकाराचे प्रवर्तक आणि त्या नि शस्त्र प्रतिकाराचा स्वातंत्र्य-संपादनकार्यी त्यांच्या अनुभवास आलेला फोलपणा पाहताच सशस्त्र प्रतिकार-कांच्या अभिनव-भारत संस्थेशी संबद्ध झालेले अेक अत्यंत प्रमुख पुढारी, ज्यांचे नाव अिंग्लंडच्या डोळ्यात अेके काळी शल्यासारखे खुपत होते, ते विद्वान्, धनिक, समाज-सुधारक आणि तत्त्ववेत्ते श्रीमान् पंडित शामजी कृष्णवर्मा हे मार्च १९३० मध्ये स्वित्झर्लंड येथे आपल्या वयाच्या ८० व्या वर्षाच्या जवळपास मृत्युमुखी पडले, हे अैकून कोणाही सहृदय आणि कृतज्ञ भारतीय देशभक्तास वाअीट वाटल्यावाचून राहणार नाही

वाअीट वाटते ते ते मृत्युमुखी पडले याचे अितकेस नाही परंतु ज्या देशावर त्यांनी अपरंपार प्रेम केले, ज्याच्या स्वातंत्र्यासाठी स्वदेशशत्रूंनी सळो का पळो करून सोडल्यामुळे निर्भयपणे झोप घेता येअील अशी जागा या अुभ्या जगात ज्यांना सापडली नाही, आणि परदेशी, परद्वारी जन्मभर ज्या देशाच्या आणि स्वजनांच्या आठवणीने झुरत झुरत ते मरणी मरून गेले त्या देशास ते पुन डोळे भरून पाहू देखील शकले नाहीत ते मरण्याचे आधी तो देश स्वतंत्र झाल्याची वातमी देखील ते अैकू शकले नाहीत—अितकेच नव्हे—हाय ! हाय ! त्या देशास त्यांचा अितका विसर पडला की, त्यांच्या मृत्यूविषयी कृतज्ञतेचा अेक अश्रुबिंदुही गाळण्याची कोणास आठवण झाली नाही, आवश्यकता वाटली नाही याच वाअीट वाटते ! (दृष्टीआड त सृष्टीआड ही या जगाची रीतच आहे मंदिराच्या पायातील दगडाची कोणी विचारपूस करीत नाही—कळसाच्या दिखाअू दगडाचे दर्शन घ्यावयास हजारांची दाटी अुडते ! पण ज्ञाता असतो, कृतज्ञ असतो तो त्या कळसाची अुंची ज्यांनी आपल्या देहास भूगव्हराच्या भयंकर खोलीत पुरून घेत घेत शक्य केली, त्यांच्या अज्ञात त्यागाची आठवण अधिक कृतज्ञतेने काढतो शत्रूच्या तोफांवर प्रथम चाल

श्रद्धानंद २६ एप्रिल, १९३०

ध्येय म्हणजे देशाच्या राज्यकारभारात सुधारणा – आणि त्याही ब्रिटिश अुदारता आणि भूतदया जागृत करूनच साधावयाच्या – हे असे परंतु पंडितजींनी ‘ होमरूल ’ हेच हिंदुस्थानचे ध्येय असले पाहिजे अशी घोषणा सर्वांच्या आधी करून त्याचे, सिद्धयर्थ ‘ होमरूल सोसायटी ’ आणि ‘ अिंडियन सोशिऑलॉजिस्ट ’ नावाचे पत्र काढले अिंग्लंडमध्ये या पत्रातील अिंग्रजावरील अत्यंत कडक टीकेमुळे आणि हिंदुस्थानला Home Rule म्हणजे ब्रिटिशांच्या साम्राज्यातील वसाहतींचे स्वराज्य हवे ह्या त्या वेळेस जवळ जवळ वडलोरीप्रमाणे वाटणाऱ्या मागणीमुळे अिंग्रजास पं. शामजींची भीति आणि द्वेष राष्ट्रपितामह दादाभाअी नवरोजींहूनही अधिक वाटू लागला. टिळकांच्या चळवळीमुळे जसे गोखले बरे असे सरकारास वाटे तसेच शामजींच्या चळवळीमुळे दादाभाअी बरे वाटू लागले. शामजींनी याच वेळी ‘ अिंडिया हाअुस ’ नावाचे वसतिगृह काढून त्यात स्वदेशभक्तीचे शिक्षण घेणारे आणि सरकारी नोकरी न करण्याची प्रतिज्ञा करणारे अशा हिंदी तरुणांची राहण्या-जेवणाची स्वस्त सोय केली. त्याचप्रमाणे हजारो रुपये बाजूस ठेवून हिंदुस्थानातून तिथे येणाऱ्या विद्यार्थ्यांकरिता आणि गृहस्थांकरिता शिष्यवृत्त्याही ठेविल्या. याच शिष्यवृत्त्यांपैकी शिवाजी फेलोशिप श्री. विनायकराव सावरकर यास मिळाली आणि ते अिंग्लंडमध्ये जाअून पंडितजींच्या अिंडिया हाअुसमध्ये राहिले. पंडितजींस बंगाली व मराठी अुत्तम येअी. गोविंदाच्या आणि सावरकर यांच्या राष्ट्रीय कविता त्यास फार आवडत. ह्या वेळच्या अितर पुढाऱ्यांच्या मानाने पंडितजींची मतें किती पुढारलेली होती ह्याचे प्रत्यंतर देण्यास अेवढी गोष्ट सांगणे पुरे की, त्या वेळी अिंग्लंडमध्ये गांधीजी ‘ God Save the King ’ हे अिंग्रजाचे राष्ट्रगीत भक्तिभावे गात फिरत आणि ब्रिटिशांना गांधीजी भक्तिपूर्वक ‘ राजे ’ म्हणून म्हणताच शामजींच्या तळव्याची आग मस्तकाला जाअून ते सावरकरांच्या पोवाड्यातील चरण गजत. ‘ राजे ! घरात शिरला चोर तया मीं मानियला राजा ! ! ’

अगडबंब शब्दाची भेसळ होऊन आज त्यास Non Violent Non Cooperation अनत्याचारी असहयोग हे नाव पडले आहे. सरकारशी असहयोग करताना अिंग्रज हिंदुस्थान विनाशस्त्र प्रतिकाराने सोडतील! ह्या नि शस्त्रप्रतिकाराच्या कार्यक्रमालाही त्या वेळची राष्ट्रीयसभा अत्यंत भयंकर समजत होती. परंतु शेवटी दादाभाऊी नवरोजीनाच कलकत्त्यास वसाहती स्वराज्य (होमरूल—Home Rule) हेंच हिंदुस्थानचे ध्येय होय असे जेव्हा घोषित करावे लागले तेव्हा त्या ध्येयासरशी ती राष्ट्रीय सभा नवीन पक्षाचाच अंकित झाला. राष्ट्रपितामह दादाभाऊी ह्यांनी जे साहस केले आणि त्या वेळच्या नेमस्त पक्षाला तितके पुढे जाणे जे भाग पडले, ते हिंदुस्थानातील लाल बाल, पाल ह्या चळवळीचा जितका परिणाम होता तितकाच पंडित श्यामजींच्या अिंग्लंडमधील चळवळीचाही होता. वास्तविक पाहता लोकमान्य स्वत होमरूलचा अुच्चारही केसरीत करीत नसत. परंतु पंडित श्यामजींनी Home Rule संघ अिंग्लंडमध्ये स्थापन करताच त्या संधीचा लाभ घेअून हिंदुस्थानच्या चळवळीस तितके पुढे रेटण्यास लोकमान्यांनी क्षणाचाही विलंब होअू दिला नाही. केसरीत पंडितजींच्या नव्या चळवळीवर लेख लिहून त्यांनी तीस त्याच अुचलून धरले.

## अभिनव भारत

परंतु श्री सावरकर हे अिंडिया हाअुसमध्ये जाताच आणि ह्या अत्यंत पुरोगामी समजल्या जाणाऱ्या होमरूल संघासही मागे टाकणारी नि अगदी फिक्का पाडणारी क्रांतिकारक चळवळ चालू होताच पंडितजींच्या राजकीय मताचा विकास झपाट्याने होत गेला. सावरकरांच्या स्वातंत्र्य Absolute Political Independence चेच ते अभिमानी झाले. अर्थात ते होमरूल नाव देखील त्यांना वदवून टाकिले. तीच स्थिति साधनाच्या प्रश्नाविषयीही घाली. १८५७ चे बंड हे काही मूर्ख आणि धर्मभोळ्या शिपायांचे बंड होते. त्यात राष्ट्रभक्तीचा किंवा स्वातंत्र्याचा गंधही नव्हता हे पंडितजींचे—त्या काळच्या सर्वच लोकांप्रमाणे सरकारी अितिहासाने न कळत अंगात टोचलेले—मत असल्यामुळे सत्तावनच्या स्वातंत्र्यवीरांच्या स्मृतीचा प्रथमोत्सव प्रत्यक्ष अिंडिया हाअुसमध्येच सावरकरांच्या अनुयायांनी केला ह्याचा पंडितजीस मोठाच विषाद वाटला. पण ते अंक प्रामाणिक देशभक्त होते. सत्य कळल्यावरही 'तुमचा कार्यक्रम निरुत्तर करणारा आहे खरा, पण तरीही 'मला असेच वाटते' किंवा 'माझा अंतरात्मा मला असे सांगत नाही' असे काहीतरी बकणारे हट्टाग्रही नव्हते. किंवा अमक्याने म्हटले म्हणून जे मानले नाही ते जणू काय आपणच पहिल्याने म्हटले असे दाखवून मग मात्र तेच स्वत चे म्हणून आचरणारे मिथ्याचारी नव्हते. त्यास लवकर नि शस्त्र प्रतिकाराने स्वातंत्र्य मिळू शकणार नाही असे स्पष्ट दिसू लागले. अभिनव भारताच्या धाडसी अुठावणीमुळे

करून त्याची आग आपल्या जीवनाचे रक्त ओतून जे विझवून टाकतात ते रणात कामास आलेले सैनिक, रणांगणांतून जिवंत परत आलेल्या सैनिकांप्रमाणे, विजयोत्सवाच्या मिरवणुकीत मिरवत जाताना आढळत नाहीत. पण जे कृतज्ञ राष्ट्र आहे ते कोणाही जिवंत परत आलेल्या सैनिकाचा जुमारतें त्याहून अनंत पटींनी सन्मानपूर्वक पुतळा जो उभारतें तो त्या विजयाचें आधी आणि त्या विजयास्तव मरून गेलेल्या 'अज्ञात योद्ध्या'चाच होय,' The unknown dead!' चाच होय !)

पण ही गोष्ट कृतज्ञ राष्ट्राची, कृतज्ञ पिढीची आहे, आणि शामजी कृष्णवर्मा हे भारताच्या ह्या कृतघ्न पिढीत, ह्या दास्यहत, बुद्धिभ्रष्ट युगात जन्मले आणि मेले आहेत ! म्हणून ज्यांच्यासाठी ते झुरत, झिजत मेले त्यांना आज त्यांची आठवण देखील, आढळत दर्शील, उरलेली नाही ! भारतीय क्रांतिकारकांच्या पुढाऱ्याविषयी भारतीयांना पूर्ण विसर पडावा आणि साम्राज्यमत्त इंग्लंडच्या त्या कट्टर शत्रूस स्वजनांच्या महानुभूतीचा देखील ओलावा मिळू नये अशीच इंग्लंडची कुटिल राजनीति असून आणि हिंदुस्थानसारख्या ह्या आत्मविस्मराळू, दास्यहत लोकांत ती अशी सफलही होते.

नाही तर पंडित शामजी, श्रीमती कामाबाई, श्री वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय, लाला हरदयाळ इत्यादि स्वदेशार्थ जन्मभर झिजत राहिलेल्या भारतीय क्रांतिकारक देशभक्तांचीं नावें आज पथल्या एका दुगामी प्रचारकाच्या इतकी तरी घराघर स्मरली गेलीं असतीं. ती तशी स्मरली जात नाहीत म्हणून त्यांत त्या देशभक्तांस काही एक कमीपणा येत नाही — त्यांना त्याची खंत वाटण्याचें काही कारण नाही. पण त्या कृतघ्नतेची आम्हाला मात्र लाजच वाटली पाहिजे !

पंडित शामजी यांचा जन्म कच्छचे एका वैश्य कुटुंबात झाला. त्यांनी लहानपणी शिक्षणासाठी घर सोडलं आणि लोकांचे घरी अक्षरशः धोतरं बडवून, पाणक्याचे काम करून त्यावर जें मिळेल तें खाऊन विद्याभ्यास केला. त्यांच्या बुद्धिमत्तेमुळे त्यांची लवकरच आजूबाजूस एक अत्यंत होतकरू तरुण म्हणून ख्याति झाली. इतक्यात त्या वेळेस सर्व हिंदुस्थानभर वेदोक्त धर्माचा डंका पिटीत जाणाऱ्या श्रीमान स्वामी दयानंदाच्या भेटीचा योग शामजीस घडला. दयानंदासारख्या सूक्ष्मदृष्टि आचार्यांच्या दृष्टिपातातून असला कृतियुवक निसटून जाणें शक्यच नव्हतें. लवकरच पंडित शामजी हे आर्यसमाजातील स्वामी दयानंदाच्या अत्यंत विश्वासू आणि कर्त्या मंडळात गणले जाऊं लागले. पंडित शामजींचें संस्कृत भाषेवरील प्रभुत्वही याच वेळेला वाढलं. दयानंदजींच्या अनुरोधावरून पंडितजींनी अष्टाध्यायीचा अभ्यास केला. दयानंदजींचा या आपल्या कर्त्या शिष्यावर इतका विश्वास बसत गेला की, ते मरतेवेळी आर्यसमाजाचीं आणि स्वामीजींच्या इतर सर्व कार्यांची देखरेख करण्यासाठी त्यांनी जे विश्वस्त-मंडळ (Trustees) नेमले

त्यात प. शामजीचेही नाव होते. त्या वेळी मोनिअर विल्यम यानी ऑक्सफर्ड येथे अेक संस्कृतज्ञ पंडित हवा म्हणून दयानंदाकडे मागणी केली तेव्हा त्यानी शामजीसच तिकडे धाडले. पंडितजीनी अिंग्लंडमध्ये जाअून ऑक्सफर्डमध्ये बराच नावलौकिक मिळविला. तेथेच लेक्चरर या नात्याने अध्यापकत्वाचे काम केले. नंतर लेखनकला आणि लिपीही भारतीयांनी परकीयापासून स्वीकारली म्हणून मागे जो अेक युरोपियन विद्वानात वाद चालला होता, त्यात पंडितजीनी भारतीयांच्या पक्षीन भाग घेअून वेदातील आधारावरूनच वेदकाळी देखील भारतीयाना लेखनकला आणि लिपी याचे ज्ञान होते हे सिद्ध केले. त्यांच्या या निबंधाचे युरोपीय विद्वानात गौरवपूर्ण कौतुक होअून जर्मनीने त्यास 'पंडित' ही पदवी दिली, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीने त्यास 'M. A.' ची अुपाधि अर्पिली, निर्बंध विद्यापीठानेही त्यास 'बॅरिस्टर' ची वस्त्रे दिली.

अशा रीतीने आपल्या विद्वत्तेची कीर्ति विदेशातही पसरवून पं. पंडित शामजी हे हिंदुस्थानात परत आले. येताच अुदेपूरच्या महाराजानी त्यास आपले दिवाण नेमिले. त प्रधानपदाचे काम काही काळ केल्यानंतर त्यानी बॅरिस्टरीही केली. पुढे काठेवाडच्या संस्थानातही ते दिवाणपद चालवीत होते. त्यांची पत्नी ही मुंबअीच्या अेका धनिक घराण्यातील महिला असून फारच दयाळू, थोर मनाची आणि त्यांच्या अंगीकृत स्वदेशस्वातंत्र्याच्या कार्यी अेकनिष्ठपणे त्यास साहाय्य करणारी खरीखुरी सहधर्मचारिणी होती. पंडितजीवर सरस्वतीप्रमाणेच लक्ष्मीचाही वरदहस्त असे. लाखो रुपयाची त्यांची मत्ता होती. होती प्रधानपदाची सत्ता होती. पदरी कुठेही बृहस्पतीसारखा सन्मान पावावा अशी विद्वत्ता होती—पण पंडितजींच्या देशास स्वतंत्रता नव्हती. म्हणून ह्या सर्व वैयक्तिक अनुकूलतेतही पंडितजींच्या मनास असमाधान वाटू लागले. लोकमान्य टिळक यांच्यावर प्लेगचे गडबडीत १८९७ चे सुमारास जो खटला झाला त्यायोगे तर पंडितजींची आतल्या आत असलेली स्वदेशाविषयीची निष्क्रिय तळमळ त्याना अगदीच असह्य होअू लागली

अिंग्लंडभर जी प्रचंड खळबळ माजली, अभिनव भारताची दहावीस मुलें देखील सरकारास अितकीं सळो का पळो करून सोडतात हें पाहून पंडितजीस त्यांच्या मार्गाविषयी जो अनुभवजन्य विश्वास आणि परिणामकारकता पटू लागली, त्यायोगे ते दोन वर्षांचे आतच अभिनव भारतीय आंदोलनाचे कट्टे पुरस्कर्ते बनले. अिंग्रज लोक सावरकराच्या चळवळीशी पंडितजीचें महकार्य प्रकटपणे सुरू झाल्याचे पाहून अतिशय चिडले. पार्लमेंटमध्ये आणि वृत्तपत्रांतून धडाधड प्रश्न होअू लागले की, शामजी कृष्णवर्मास सरकार अशी भयंकर आणि अपराधी चळवळ करण्यास किती दिवस मोकळें सोडणार आहे ! पण त्या चाणाक्ष पंडिताने त्या प्रश्नाचे अुत्तर सरकारने देण्याचे आधीच देअून टाकलें. अेके रात्री कोणास काही पत्ता नसताना पंडित पॅरिसला निघून गेले. त्याचे पैसे त्यांच्या आधीच अिंग्लिश बँकांतून फ्रान्सातल्या बँकांत गेलेले होते. पंडितजीस प्रथम भारी विश्वास असे की, अिंग्रजांनी हिंदुस्थानात काय वाटेल ती दडपशाही केली तरी अिंग्लंडमध्ये ते अुदार मताचेच (Liberalism) पुरस्कर्ते राहणार आणि मॅझिनी आदि प्रकरणांप्रमाणे आपल्या देशभक्तींचें कौतुकच करून आपले व्यक्तिस्वातंत्र्य नुसत्या मतासाठी हिरावून घेणार नाहीत. पण ह्या अुलट आलेल्या स्वतःविषयींच्याच अनुभवावरून पंडितजींचा अिंग्रजांच्या चांगुलपणावरील विश्वास पार मावळला आणि अर्थातच त्या चांगुलपणावर अिंग्लिश माणुसकीवर अवलंबून असणारे नुसत्या असहयोगाचें अथवा नि:शस्त्र प्रतिकाराचे फोलपण पाहून ते सशस्त्र क्रांतिवादाचे पुरस्कर्ते बनले. ते पॅरिसला गेल्यावर तर अिंग्लंडमध्ये 'अभिनव भारताने' सावरकरांच्या नेतृत्वाखाली भयंकर धुमाकूळ मांडला. बॉम्बची विद्या ते तरुण शिकले. धिंग्राने सर कर्झन वायलीचा भर लंडनमध्ये वध केला, तेव्हा तर अिंग्लिशाची मानहानि आणि हिंदी देशवीराच्या धैर्याचा आणि प्राणासही कस्पटाप्रमाणे मानणाऱ्या हुतात्मतेचा गौरव अुभ्या युरोपभर गाजू लागला. पंडितजींनी या कार्यास गुप्तपणे अर्थसाहाय्य केले असल्याचा सर्वत्र बोभाटा होताच. त्यातही पंडितजींच्या पत्रातून धिंग्राचा गौरव केला गेला आणि त्यास अुघडअुघड हुतात्मा म्हणून गौरविण्यात आलें, तेव्हा अिंग्लंड चवताळून गेलें. पण करणार काय ? पक्षी पिंजऱ्यातून अुडून गेलेला ! अिंग्लंडला त्यांनी परत यावें म्हणून त्यास भुलविण्यात आले. भ्याड म्हणून चिडविण्यात आलें. याविषयी गोष्ट निघाली म्हणजे *आपल्या फ्रान्सच्या वाड्यात सुखरूपपणे बसत, आपली ती भव्य मान हलवीत आणि* तो डौलदार भरभक्कम देह झुलवीत झुलवीत हसून ते म्हणत, 'अिंग्रजांच्या हातावर तुरी देअून अेकदा पंडित शामजी जो निसटला तो आता पुन्हा असा का फसणार आहे ! आता ' न गगदत्तः पुनरेति कूपम् !'

८ पंडितजींनी आपल्या देशाच्या दास्यमोचनार्थ स्वतःचे हजारो रुपये व्यय केले. अिंडिया हाअुस, हजारो रुपयांच्या शिष्यवृत्त्या, क्रांतिकारक आंदोलनार्थ

दिलेले द्रव्यसाहाय्य, हें सर्व त्याच्या अुदारतेचे चिह्न आहे. त्याबाचून त्याना ज्याच्या तत्त्वपद्धतीचा अत्यंत अभिमान असे त्या स्पेन्सरच्या नावाने त्यानी ऑक्सफर्डमध्ये शिष्यवृत्त्या स्थापण्यारा आणि फ्रान्समध्ये सीन नदीच्या महापुरात नागावलेल्या फ्रेंच लोकास साहाय्य म्हणूनही हजारो रुपये दान दिले अशा दानी पुरुषासही कृपण म्हणण्याची जी अेक टूम निघाली होती, ती त्याच्या कृपणतेचे चिह्न नसून त्यास कृपण म्हणणाऱ्याच्या कृतघ्नपणाचे किंवा लहाडीपणाचेच ते द्योतक होतें. ज्याने हजारो रुपये देशकार्यार्थं दिले, त्यास त्याने लाखो दिले नाहीत म्हणून कृपण म्हणणे हें ज्याने लाखो रुपये दिले असतील किंवा देशसेवेत जे शामजीअितके कष्टले असतील त्यास अेक वेळ शोभेल पण स्वत ला हवी होती तितकी भीक शामजीनी त्याना घातली नाही म्हणूनच शामजीच्या नावाने बोटे मोडणारे जेव्हा शामजीस कृपण म्हणतात, तेव्हा ते स्वत च्याच भिकारड्या हीनतेचे आणि हलाश मत्सराचे प्रदर्शन करतात—पंडितजींच्या नव्हे त्यास पैसाच हवा असता तर अिंग्लंडमध्ये अिंग्रजाचे पोवाडे गाअून अेकाद्या राजाचें विलासी अैश्वर्य त्याना सहज भोगता येतें. पण प्रबळ देशशत्रूशी अुघड विरोध करून, आपला जीव धोक्यात घालून वृद्धावस्थेतही ज्याने विदशी दारोदार भटकत फिरत, केवळ आपल्या स्वदेश-स्वातंत्र्यार्थ, ह्या हालअपेष्टा भोगल्या त्याच्या मनाचा हा मोठेपणा, हें आत्म्याचे औदार्य हे काय कार्पण्याचे लक्षण आहे ? या औदार्याचे मूल्य पैशानी का मोजता येणारें आणि येत असेल तर त्या त्याच्या देशस्वातंत्र्यार्थ भोगलेल्या कष्टाचे आणि केलेल्या सेवेचे मूल्य लाखो रुपयाहून अधिकच नाही काय ? आणि म्हणूनच अशा देशनिर्वासितामधील थोरातील थोर पुरुषास कृपण म्हणणें म्हणजे कृतघ्नताच नाही काय ? )

रागारागाने अिंग्लंडने पंडितजींची बॅरिस्टरची पदवी काढून घेतली, अेम्. अे. ची पदवी छिनली, त्याचा जीव घेतला जाअील अशा निनावी धमक्या त्यास दिल्या गेल्या, आणि सगळ्यात भयंकर मूढ म्हणजे पंडितजीस निरंतरच्या देश-निर्वासाची अप्रत्यक्ष शिक्षा भोगावयास लावली ! महायुद्ध चालू झाल्यावर पंडितजीस फ्रान्समध्येही राहणे धोक्याचें होअून ते स्वित्झर्लंडला गेले आणि तिथेच या थोर पुरुषाचा अंत झाला

त्याच्या देशशत्रूने त्याना देशपारीची शिक्षा दिली आणि त्याच्या देशानेही त्याना स्मृतिपारीची शिक्षा दिली ! त्यानी केलेल्या सेवेची ह्या आम्ही, त्याच्या कृतघ्न देशबधूनी, आठवण देखील काढली नाही, त्याची अेका शब्दानेही विचारपूस केली नाही स्वदेशाच्या स्वातंत्र्यासाठी प्रथम झुजत आणि नतर झुरत, हा थोर भारतीय निर्वासित जेव्हा स्वित्झर्लंडमध्ये दुसऱ्याच्या दारीं ८० व्या वर्षी वारला, तेव्हा त्याच्या राष्ट्रीय मातृभाषेत त्याने ज्याचा निरोप घ्यावा असा स्वजन त्याच्याजवळ अेकही नव्हता !!

पंडित शामजींचा देश जर आज स्वतंत्र झाला असता, तर त्यांचे मरण देखील त्यास सुखावह झाले असते तरी देखील ह्या पंचवीस वर्षांपूर्वी ब्रिटिश साम्राज्याचा पंडितजी धिक्कार करीत असता जे लोक I proudly declare my *loyalty to British Empire* म्हणून वल्गना करीत, त्या ब्रिटिशांवरिता बोअर आणि झुलू यांच्याशी लढत, तेच आज पंडित शामजींच्या त्याच भाषेत ब्रिटिश साम्राज्याचा धिक्कार करीत आहेत, आणि पंडितजींच्या स्वातंत्र्याच्या ध्वजाखाली झुंजत आहेत ही भारताची मानसिक क्रांति तरी त्यांनी यशस्वी झालेली पाहिलीच आहे तीवरून तरी ती वास्तव क्रांतिही आज ना उद्या यशस्वी झाल्यावाचून राहणार नाही अशा आशेने त्यांच्या मृत्युसमयची उदासीनता थोडी तरी हलकी झाली असेल काय ?

+ + +

## बालमुकुंद आणि लज्जावती

महाराज पृथ्वीराजानंतर हिंदुसाम्राज्यभंगामुळे जणू संतप्त झालेल्या दिल्लीच्या सिंहासनाला रक्ताची तहान वारंवार लागत असते त्या सिंहासनाला जो जो कोणी पाय लावू पाहतो, त्याला त्याला रक्त सांडावे व सांडवावे लागत आहे बंगालच्या फाळणीनंतर राष्ट्रभक्तीच्या प्रचंड वावटळीत कलकत्त्याची राजधानी जेव्हा हेलकावे खाऊ लागली तेव्हा दिल्लीला राजधानी आणली गेली. लॉर्ड हार्डिंग्ज हे त्या वेळी गव्हर्नर जनरल होते राजप्रतिनिधि या नात्याने दिल्ली राजधानी करून दिल्लीच्या सिंहासनाकडे जाण्यासाठी त्यांनी मोठ्या थाटामाटात —मोठमोठ्या राजेमहाराजांना अथवा जगातील अवशिष्ट नराधिपतींनाही हेवा वाटावा अशा राजवैभवसंपन्न देखाव्यात — दिल्लीप्रवेशाचा समारंभ करविला दिल्लीच्या राजमार्गातून राजवैभवयुक्त थाटामाटाने परंतु अंतःकरणातील असुरक्षिततेच्या टोचणीमुळे आवश्यक झालेल्या सैनिक पोलिसांच्या संरक्षणात लॉर्ड हार्डिंग्ज दिल्लीत मिरवत होते सहस्रावधि गोरे नि काळे सैनिक आपापल्या तरवारी, रायफल्स नि बेयोनेटे वातावरणात चकाकवीत त्या मिरवणुकीत आंग्रजी साम्राज्याचे जयघोष करीत आणि त्याच्या दराऱ्याचे प्रदर्शन करीत चालले होते राजेरजवाड्यांच्या हत्तीवरील अंबाऱ्यांतून राजेमहाराजे व्हाइसरॉयच्या अंबारीमागे मिरवत होते

---

श्रद्धानन्द १८ मे १९२९

दिल्लीच्या राजमार्गातून राजसिंहासनाकडे अशी ती प्रचंड मिरवणूक जात असता अकस्मात् आकाशातून वज्र पडावे त्याप्रमाणे कडकडाट झाला नि अेक भयंकर बाँब अगदी टिपून, हत्तीवरील अंबारीत गर्वोन्मत्तपणे बसलेले गव्हर्नर जनरल व्हाइसराय लॉर्ड हार्डिंग्ज यांच्यावरच पडून फुटला! त्या धडाक्यासरशी लॉर्ड हार्डिंग्ज रक्ताच्या थारोळ्यात लोळू लागला माहूत ठार झाला. तक्षकाने अत्यंत सुरक्षित स्थळी बसलेल्या परीक्षितीला जसा अकस्मात् कडकडून दंश केला तसाच कोण्या तरी भारतीय क्रांतिकारकाने बाँब फेकून सूड घेतला! जिकडे तिकडे बाँब! बाँब म्हणून आरडाओरड चालली पळापळ झाली मिरवणूक अुधळली गेली! सिंहासनारोहणाचा समारंभ रहित झाला!!

हे भयंकर कृत्य कोणी केले असावे याविषयी चोहोकडे तर्कवितर्क सुरू झाले सरकारी गुप्तचर विभागाला अत्यंत महत्त्वाचे काम मिळाले व बाँब फेकणारा व त्याचे साथीदार यांचा शोध मोठ्या निकराने सुरू झाला

गुप्त आक्रमक कोणत्या तरी अेखाद्याच स्थली असतात अेखाद्या ठिकाणा तूनच दबा धरून ते आक्रमण करतात असले अेखाद रक्त माडवामाडवीचे भयंद कृत्य करण्याचे व दडी मारण्याचे कोठले तरी अेकच स्थान असूनही हे गुप्त क्रांति-कारक कोठे असतील व कोठे नसतील याविषयी मोह पडून परकीय अधिकाऱ्यांची मनं अत्यंत त्रस्त व भयग्रस्त होतात ते त्यांना दशदिशा शोधू लागतात साप साप म्हणून ते जिकडे तिकडे भुई धोपटू लागतात

तसेच या दिल्ली-बाँबप्रकरणीही झाले सरकारी अधिकाऱ्यांना अपराधी न सापडणे हे दुष्कांति करणारे व असुरक्षिततेचे कारण होअून बसत असते (खरा अपराधी असा संशयग्रस्त मनःस्थितीत सापडतोच असे नाही कधी कधी संश याच्या अतिरेकाने अनेक अनपराधी दखाल त्या संशयी शोधाला बळी पडतात) या बाँबच्या प्रकरणात अनेक तरुण पकडले गेले व शिक्षापात्र ठरले

आजच्या आपल्या कथेचा नायकही त्यापैकीच अेक होता या तरुणाचे नाव बालमुकुंद पंजाबचे प्रख्यात देशभक्त भाअी परमानंद यांचा हा चुलतभाअू भाअीजींचे घराणेच हुतात्म्यांचे घराणे झालेले आहे औरंगजेबाच्या क्रूर धर्मवेडाला बळी पडून भाअीजींचे पूर्वपुरुष महान हुतात्मा मतिदास हे करवतीने डोक्यापासून पायापर्यंत अेखाद्या लाकडाच्या ओंडक्याप्रमाणे प्रत्यक्ष कापले गेले या वाराम्याचा हा वंश भाअीजींनी अंदमान भोगले आहे हे सर्वश्रुत आहेच त्यांच्या या बाल-मुकुंद नामक चुलतभावाला वर वर्णन केलेल्या बाँबच्या फेकीच्या अपराधाचे सब धात फाशीची शिक्षा झाली! बाँब अगदी तरुण असलेल्या त्या क्रांतिकारकानेच फेकला होता

तो पकडला जाण्याच्या अेका वर्षापूर्वीच अेका अनुपम सुंदर कुमारीशी त्याचा विवाह झाला होता त्या कुमारीचे माहेरचे नाव रामरखी होते व विवाहानंतर

सासरी तिचे नाव लज्जावती ठेवले गेले तो पकडला गेल्यावर काय काय झाले यासंबंधीचे वर्णन देवी लज्जावतीने स्वत जितके सांगितलेले अुपलब्ध आहे तितके तिच्याच शब्दात देत आहोत लज्जावती म्हणते–

'अुन्हाळ्याचे दिवस होते ते बंदीत होते–मी घरी होते ६ महिनेपर्यंत मी अेका भाग्यदायी घटकेची वाट पाहत होते लोक मला सांगत 'तू घाबरी होअू नकोस, ते सुटतील व घरी येतील' मी म्हणत होते 'तो सुदिन केव्हा येणार? ही दुर्दैवाची रात्र केव्हा सपणार? माझा भाग्यरवि पुन अुदयाचलावर केव्हा येणार? ती शुभ वेळ केव्हा दिसेल?'

'मी दिल्ली कधी व कशाला पाहणार! परंतु त्याना दिल्लीस ठेवले होते. खटला तेथे चालला होता मी तेथे पोहाचले पाहिले, बंदीची कोठी फार भयानक आहे! त्या अगदी लहान व कुंद खोलीत त्याना (तिच्या त्या तरुण वीर पतीला) श्रावण भाद्रपदाच्या (आपल्या अिकडे ज्येष्ठात जसा अुन्हाळा असतो तसाच तिकडे श्रावण-भाद्रपदात असतो) अत्यंत अुष्णतेच्या काळात दिवस काढावे लागत मी विचारले 'काय निजायला चारपायी (खाट वा बाज) मिळते का?'

दोष लागलो मी म्हटल, 'कोणाचा काही दोष नाही माझे भाग्य फुटल आहे ते वदीत जसे निजतात काय त्याप्रमाणे मी नको निजू ?'

'मला पुन्हा त्याच्या भेटीची अनुमति मिळाली पुन्हा मी दिल्लीला गेले या वेळी मी विचारल तेव्हा ते म्हणाले 'मला थेकच वेळ खायला मिळत' मी विचारल 'रोटी कशी असते ?' त्यानी रोटीचा अेक तुकडा मला दिला मी तुकडा घेअून परत आले त्यात गहू होत, चणे होते, व आणखीही काही पदार्थ मिसळलेले होत मीही घरा तशाच प्रकारची भेसळ बनविली व ती दळून त्याची रोटी खाणे सुरू केल

असे कित्येक महिने गेले अती अेक दिवस मी आपल्या कोठीत बसले असता बाहेरून रडण्याचा ध्वनि अेकू आला माझ हृदय धडधडू लागले डोक्याला घाम आला, पण जाव मुठीत धरून बाहेर आले व पाहते तो त्याच नाव घेअून फाशीची शिक्षा फाशीची शिक्षा झाला !!' हे शब्द अेकू आले

त्याच अतिम दर्शन घेण्यासाठी मी पुन्हा दिल्लीला गेले ज्या वदीत तरुणाच तारुण्य नष्ट होत, सुकुमार व मृदु अत करण करपतली जातात त्या वदीत पाचल दर्शन घेतल अत करण सागत होत काही बोलून घ्याव ! ओठ सागत होत आम्हास अडवून धरण्याच सामर्थ्य नाही —अितक्यात त्याचे ओठ हलले

ते म्हणाले प्राणप्रिय ! जो प्राणी जन्माला आला त्याला अेकना अेक दिवस जावच लागणार ! कोणा कोणाला सोबत होअू शकत नाही ! तू आपल्यास भाग्यवती समज की मी देशहिताकरिता आपली स्वत ची आहुति देत आहे !!!'

'माझ्या कानात हे शब्द अेकू नाहीत तोच डोळे अश्रु ढाळू लागले डोळ्याचे अश्रु थाबनात त्या अश्रूमुळे त्याचे मनसोक्त मुखावलोकन देखील मला करता यअना ! पुष्कळ प्रयत्न केला परतु अश्रूनी यथेच्छ दर्शन करू दिले नाही !

दुसरे दिवशी हवनसामग्री अेकत्र केली गेली लोक बोलू लागले की त्याचा अत्येष्टिसस्कार आज होअील मी म्हटले फार सुदर सधि आली आता मी त्याना जाअून मिळेन परतु थोड्याच वेळात अेकले त्याच प्रेत अधिकारी देत नाही !

मग काय झाले मी पुढे सागू शकत नाही आज पधरा दिवस मी व्रतस्थ आहे आता घटिका भरत आली आता माझे मनोरथ पूर्ण होणार !

अितके म्हणून देवी लज्जावती चूप झाली देवीने अन्नाचा कण किंवा पाण्याचा थेंब तोडात घातला नाही याप्रमाणे अठरा दिवस गेले अेकच स्थलावर आसनस्थ होअून ज्या मूर्तीवर तिचे ध्यान आकर्षण झाले होते त्या ध्यानात निमग्न होअून स्थिर होती तिने तपस्या पूर्ण केली अतिम दिवशी सूर्यबिंब पूर्ण तेजाने प्रकाशत होते लोकाना आपापल्या कामाला आरभ केला देवी आपल्या आसनस्थ स्थानावरून अठली स्वत स्वच्छ पाणी आणल स्नान केले स्वच्छ वस्त्र परिधान

केले आणि ध्यानस्थानी अंग टाकले. म्हणाली, 'प्रिया ! फार दिवस आपण माझी परीक्षा पाहिलीत. आज तर आपला सापडता हात सोडणार नाही. आता विभक्त नाही राहू शकणार !' अितके म्हणून तिने आपले प्राण खेचून घेअून देहत्याग केला, अिच्छापूर्वक देह सोडला !!! साध्वी लज्जावतीने देशभक्त हुतात्मा पति बाल-मुकुंदाशी अेकरूप होण्यासाठी परलोकाचे दवद्वार स्वेच्छाबलाने अुघडून स्वर्गी प्रवेश केला ! याला म्हणतात सती जाणे !

*धन्य ती साध्वी, धन्य तो स्वार्थत्यागी हुतात्मा, आणि ती हिंदु जाति अेकवार धन्य की जी अशा दिव्य व अलौकिक मनुष्यरत्नांना जन्म देते !*

✦ ✦ ✦

# देशवीर शचीन्द्रनाथ संन्याल

## काकोरीचे क्रान्तिकारक

'तुम्हास स्वार्थाचा लवलेशाही शिवला नव्हता. तुम्ही जे जे केलेत ते ते स्वदेशासाठीच केलेत.'—न्यायाधीश

आज अुणीं पुरी दोन वर्षे होअून गेली. अुत्तर हिंदुस्थानात लखनौ नगरा-मध्ये काकोरीच्या राजकीय कटाचा खटला चाललेला आहे. वर्षोनवर्षे त्या खटल्या-तील अभियुक्तास कारागारातील कच्च्या कैदेत डांबून ठेवून रेंगाळत रेंगाळत शेवटी त्याचा निवाडाही झाला. त्या निवाड्यावर औधच्या हायकोर्टात अभि-युक्ताच्या वतीने व सरकारच्या वतीने अपील करण्यात आले असता काही आरोपींस सेशन्स कोर्टाने दिलेल्या शिक्षापेक्षाही भयंकर व अमानुष शिक्षा देण्यात आल्या आहेत. पकडल्यानंतर राजकीय कटाचे आरोप असलेल्या बहुतेक बंदिवानांस प्रथमतः कच्च्या कैदीतच वर्षवर्ष सडत पडावे लागते. पुढे ज्या दहा दहा वीस वीस वर्षांच्या भयंकर शिक्षा भोगाव्या लागतात त्या पुन्हा निराळ्याच. जरी अेखादा दुसरा राजकीय बंदिवान सुटला, तरी या कच्च्या कैदीतच त्याला जितके दिवस खडावे लागते आणि हाल सोसावे लागतात की, जितक्या दिवसात अेखाद्या चोरास दीड दोन वर्षांची आपली सगळी शिक्षा भरून सुटता येते. अेखाद्या चोरा-सारख्या अपराध्यास जी शिक्षा म्हणून भरावी लागते, ती अेखाद्या निरपराध नागरिकास, राजकीय कटाचा नुसता संशय त्याचेवर पडला म्हणून, भरावी लागते

त्यामुळे पुढे तो निर्दोषी म्हणून सुटला तरी त्यास या अन्य प्रकारें हा भुर्दंड विनाकारण सोसावा लागलेलाच असतो. अशा रीतीने, सरकारच ज्याला पुढे निरपराध म्हणून ठरविते, त्याला दीड दोन वर्षांची शिक्षा सरकारच भोगावयास लावतें. राजकीय कटाचें नांव काढताच त्याच्या वान्यासही न अुभ्या राहिलेल्या जनतेसही त्या विषयाचा दरारा वाटावा या अुद्देशाने ही रीत कुटाळ राजनीतीने पाडली असली तथापि ती निंदनीय आहे अितके स्पष्टपणे सांगून ठेवण्यास तरी कशाचीही हरकत नाही. हे कटाचे खटले असे रखडत जे ठेवावे लागतात, ते बहुधा निष्कारण आणि सहेतुक ढिलेपणानेच असतात, अशी शंका येण्यास प्रत्येक कटाचे खटल्यात अनेक प्रसंग आढळून आलेले आहेत.

तथापि काकोरीच्या खटल्यात अितर कटांचे खटल्याप्रमाणे आरोपींपासून कथनें आणि माहिती बलात्काराने काढण्यासाठी धाकदपटशाचा किंवा त्याहूनही निर्दय प्रकारचा मेंढानी जाच झाल्याअसल्याचा बोभाटा आरोपीच्या वर्तीनेही फारसा अैकू येत नाही हीं गोष्ट विशेष आहे. महाराष्ट्रात, बंगालात आणि पंजाबात आजवर जे मोठमोठे कटाचे खटले झाले, त्यातील बहुतेकांत आरोपींतील बहुतेक प्रामाणिक आणि सुशिक्षित गृहस्थांनी अशा प्रकारचे आरोप सरकारी अधिकाऱ्यांवर अुघड अुघड न्यायालयात केले होते. काकोरीच्या खटल्यात तसे आरोप सरकारच्या पोलीस अधिकाऱ्यावर झालेले आमच्या वाचनात आलेले नाहीत. ही आम्ही वाचलेल्या माहितीवरून आढळून आलेली गोष्ट जर खरी असेल तरती पोलिस अधिकाऱ्यांस भूषणावह आहे यात शंका नाही.

परन्तु त्या खटल्यांत जे आरोपी गसवले होते त्यांनी मात्र ती गोष्ट अशीच घडून येअील अशी आशा तिळमात्र ठेविलेली नव्हती. ज्या वेळेस आपल्या मातृभूमीच्या स्वातंत्र्यार्थ अितर मार्ग सुचेनासे झाल्यामुळे त्यांनी आपले शिर आपले हातावर घेअून मशस्त्र-क्रांतीच्या भयंकर दिव्यात प्रवेश केला, तेव्हाच त्या साहसी आणि शूर लोकांनी ही खुणगाठ बांधून ठेविली होती की, या मार्गात पुढे-मागे आपणांस न्यायाच्या आणि अन्यायाच्या अशा अुभयविध जाचास आणि छळास, देहदंडास आणि मृत्युदंडास तोंड द्यावेच लागणार! प्रथम प्रथम जेव्हा क्रांतिकारकांचे खटले सुरू झाले, तेव्हा अशा खटल्यात पोलिसांचा नैर्बंधिक आणि प्रसंगी अनैर्बंधिक छळही कसा सोसावा लागतो, याची त्यांच्यातील काही लोकांस कल्पना नव्हती आणि म्हणून ते क्रांतीसारख्या कार्यात फसले असे म्हणता येत असे. परन्तु काकोरीच्या कटाच्या खटल्यात तसा प्रकार झालेला दिसत नाही. त्यातील प्रमुख आरोपींत संन्याल बंधु आहेत या बंधूंपैकी ज्येष्ठ बंधु श्री. शचीन्द्रनाथ सन्याल हे तर यापूर्वीच क्रांतिकारक खटल्याचे भीषण भोग भोगून दंडितही झालेले होते. त्यांस त्या वेळी आजन्म काळेपाण्याची शिक्षा दिली गेली. ते अदमानात पाच वर्षे कुजत

रडगाण्याचे उसासे टाकीत बसण्याचे ठिकाणी रणगीतें गात अुफळत, अुसळत होते. 'मायेफिस'च ते! काही केल्या 'मायेधर' म्हणवणारा त्यास येईना!

शेवटी त्यास शिक्षा झाली. त्यातील बहुतेकास माहीत होते की, शिक्षा होणार आणि तीही अशी की, तुमची वर्तमानपत्रातून दुसऱ्यास मिळालेली वाचनाच मायेधर्म म्हणवणारास दरदरून घाम सुटावा! पण त्या मायेफिस्ट निचे नितके काही वाटेना. त्यांनी त्या दिवशी कारागारातून निघताना अेक सण पाळला. प्रार्थना केल्या. सर्वांनी स्वदेशी वेष परिधान केले, आणि कपाळी लाल गंधाचे टिळे लावले. न्यायालयात त्यांची वाट पाहात मोठमोठ्या लोकांची आणि अधिकाऱ्यांची दाटी झाली होती. ते न्यायालयाचे बाहेर गाडीतून अुतरताच 'वन्दे मातरम्'चा तुमुल ध्वनि घुमू लागला. नंतर शिस्तीने आपल्या पुढाऱ्यांच्या मागोमाग अेक अुत्तेजक राष्ट्रगीत सर्व मिळून अुच्च स्वराने गात त्यांनी न्यायालयात प्रवेश केला.

'आता बलिदानाची पर्वणी आलेली आहे. आमच्या मनात काय आहे ते सगळे आताच काय सांगावे! शत्रो, थांब. वेळ येऊ दे. म्हणजे सगळे गुप्त प्रकट होईल. हे मातृभूमि, आम्ही तुझ्यावरून जीव ओवाळून टाकू. आम्ही बघून घेऊ शत्रूचे बळ. बळ ते काय आहे? आता तुमची बकबक नाही — तर आता बलिदानाशी गाठ आहे.'

खटाटोपात स्वार्थाचा लवलेश तुम्हास शिवला नव्हता तुम्ही जे जे केलेत ते ते सर्व स्वदेशासाठीच केलेत '

फाशीच्या आणि जन्मठेपीच्या क्रूर शिक्षा देत असतानाच न्यायाधीशाच्या तोंडातूनही जेव्हा हे अुद्‌गार बाहेर पडले, तेव्हा सर्व श्रोत्यास अेकाअेकी गहिवर आल्यासारखे झाले जे पोलिस त्या देशवीरावर पहारा देत होते त्याचीही मुद्रा ती भयंकर आणि क्रूर शिक्षा अैकताच, बदललेली दिसू लागली. 'मतवाला' पत्र म्हणत, 'स्वदेशावरून प्राण ओवाळून टाकणाऱ्या त्या वीरात्म्याची काहीतरी सेवा घडावी म्हणून त्याच्या शक्तीत होत्या तेवढ्या अनेक थंड पाण्यासारख्या लहानसहान वस्तु पुढे करून पोलिसानी त्याची कृतज्ञताबुद्धि व्यक्त केली!'

फाशीच्या आणि जन्मठेपीच्या आणि दहादहा वर्षाच्या कठोर कारावासाच्या शिक्षा जशजशा सांगितल्या जात, तसतशी ते सर्व दंडित क्रांतिकारक सस्मित वदनाने त्या शिक्षाचे स्वागत करीत होते शिक्षा सागून झाल्या तरी हातावर माथा धरून चिंताग्रस्त बसणारा बाह्यणपणा त्याच्यात अुदय पावलेला दिसेना! त्याचा घट फुटला म्हणून ते रडत बसले नाहीत त्याच्यातील काही साथीदार सरकारचे साक्षी-दार होअून त्याचा विश्वासघात करिते झाले होते पण म्हणून ते हतवीर्य झाले नव्हते कारण त्याना जगाच्या आणि प्रत्यक्ष हिंदुस्थानच्या भूतकालीन क्रांतिकारक प्रयत्ना-वरून माहीत झाले होते की, (ज्याला क्रांतीच्या मार्गात पाअूल टाकणे, त्याने प्रथम आपले शिर आपल्या हातात घ्यावे, मग मनास म्हणावे, 'मना, ध्यानात ठेव की, या परतंत्र आणि दलित देशातल्या तीस कोटीपैकी अेकोणतीस कोटी विश्वासघातक निघणार, तुला शाप देणार, तुला शिव्या देणार, तुझा शिरच्छेद स्वत चे हातानीच करणारे असणार, तरीही तुला पुढे गेले पाहिजे सगळे जग काय वाटेल ते करो, तू अेकटा तर तुझ्या देशाकरिता झुजत मरण्यास सिद्ध आहेस ना? पुरे! क्रांतीची सामग्री तुझ्यापुरती तुझ्यापाशी जुळली तर मग! चल, अेकोणतीस कोटी सरकारी साक्षीदार होतील हे गृहीत धरून चल त्या अुरलेल्या अेक कोटीत कोणीतरी तुझ्या-

पडले होते आणि तेथील अनेक यातनास जेव्हा बाणेदारपणाने तोंड देत होते, तेव्हा त्यास कल्पनाही नव्हती की, त्यास त्याची प्रिय मातृभूमि पुन्हा कधी याच जन्मी दिसेल ! पण योगायोगाने ती त्यास पाचव्याच वर्षी पुन्हा दिसली. त्याच्या जन्मठेपीच्या शिक्षेची सूट मिळून ते पाचव्याच वर्षी १९२०।२१ चे सुमारास सुटले. त्याच्याचप्रमाणे त्या खटल्यातील अितर अनेक जणांना पूर्वीच्या क्रांतीच्या मार्गात पाऊल टाकले म्हणजे पाऊलच नव्हे पण हृदयही कसे रक्तबंबाळ होते हे अनुभविलेले होते. पोलिसांचे छळ, मारहाण, जाच, अुपास, अपमान, कारावास आणि मृत्युदंड, याच भयंकर अनुभव त्यास अशांत आलेले होते आणि ज्यास ते पूर्णत आलेले होते, त्यांचे सोडून आणि ऐकातून त्यांनी अनेकदा वेचिले आणि वाचले होते. तरीदेखील ज्यांअर्थी काकोरीच्या या आरोपींनी पुन्हा क्रांतिकारक कट केले, शस्त्रे जमविली, दहा-पंधराचे गोठमोठे राजकीय दरवडे घालून सरकारास हलवून सोडले आणि शेवटी शेवटी चालत्या आगगाड्यास थोपवून पिस्तुल आणि बंदुका झाडीत सरकारी कोश (खजिने) साफ लुटून नेले—त्या तर सशस्त्र क्रांतीवाचून आपल्या प्रिय मातृभूमीस स्वतंत्र करण्याचा दुसरा कोणताही अुपाय त्यास शक्य दिसेना. निःशस्त्र असहयोग, निःशस्त्र सहयोग, निःशस्त्र प्रतिसहयोग, सगळे तंत्र होत टेकताना त्यांनी पाहिले, तेव्हा या सगळ्या अुपायात सापेक्षत अधिक स्वस्त आणि सफल म्हणून त्यास जो वाटे, त्या क्रांतीचा नगारा त्यांनी पुन्हा पिटला.

सगळे शहाणे ज्या अुपायास अगदी अशक्य आणि अत्यंत महाग म्हणून समजतात, तोच या 'माथेफिरू'स सापेक्षत शक्यतर आणि सफलतर अुपाय वाटला. सगळ्या शहाण्यास जे खादी मंडळ, विधिमंडळ, गोरक्षण, अस्पृश्योद्धार, शिशुसप्ताह, अुपोषणे, हरताळ अित्यादि सभ्य अुपाय स्वातंत्र्यसंपादनाचे कार्यी सुलभतर आणि सफलतर वाटले, तेच या 'माथेफिरू'स सुलभ होते ते निष्फळ आणि सुलभ नव्हते ते क्रांतीपेक्षा जितके महाग तितकेच व्यर्थ वाटले ! भिन्नमतिर्हि लोक !

असा त्यांचा विश्वास असल्याने या क्रांतिकारक गृहस्थांनी—कारण त्यांच्यात केवळ मुलेच भरलेली नाहीत, शौर्याच्या आणि ध्येयनिष्ठेच्या कामात साठांनाही मान खाली घालावयास लावणारी (विशीच्या) आत-बाहेरील मुलेही त्यात जशी आहेत, तसेच मुलासारखा सरळपणा नि नवा तारुण्याचा अदम्य अुत्साह आणि धडाडी ज्यात भरलेली आहे अशी तिशीच्या वरची साठी माणसेही त्यात आहेत—त्या ह्या गृहस्थांनी शहाण्यास त्यांच्या शहाणपणाचे मार्ग मोकळे ठेवून, जे अितरास करवत होते तितके देशहित ते करीत असता त्यांचे हान न धरिता, जे कोणीही करू शकत नव्हते ते अुरलेले कार्य आपण स्वतः करण्याची प्रतिज्ञा केली आणि त्याप्रमाणे तो मार्ग किती भयंकर असतो हे स्वतःचे अनुभवाने आणि कटाचे भूतकालीन खटल्याचे माहितीने ज्ञात असताही जाणून बुजून त्या रक्तरंजित क्रांतीच्या ध्वजास त्यांनी अुभारिले. माथेफिराअूच ते !

अशा आगलावेपणाचें फळही त्यांस शीघ्रच मिळाले. काकोरीच्या आसपास चालल्या आगगाडीस रोखून, गाडी हाकणारास पिस्तुलें दाखवून, बद्ध करून त्यांनी गाडीवर सशस्त्र आक्रमण केले होतें. सर्व प्रवाशांस प्रथम कळविलें की, आम्ही सरकारी खजिना तेवढा लुटणार आहोत, आम्ही क्रांतिकारक तुमच्याच हितासाठी झटत आहोत, तुम्ही निर्भय असा! पण असें सांगूनही साहजिकच जे अेक दोन प्रवासी आरडाओरड करू लागले, त्यांस त्यांनी तत्काळ गोळ्या घातल्या. नंतर सरकारी खजिना फोडून तो सर्व वाहून नेला! गाडी पुढे गेली. हे मागून गेले. या अपराधासाठी धरपकड होता होता तो सर्व राजकीय कट उघडकीस आला आणि अेकाचे सूत्राने दुसरा, दुसऱ्याने तिसरा असें करीत हे बरेच क्रांतिकारक पकडले गेले.

पण पकडल्यानतरही 'फुटला कट! व्यर्थ मेलो!' म्हणून त्यांच्यातील बहुतेक जण रडत बसेनात! राजकीय कट म्हटला की, तो सद्यःपरिस्थितीतील स्वपक्षाच्या असंघटित आणि हताश स्थितीत आणि विपक्षाच्या संघटित प्राबल्यात फुटणारच! फुटत फुटतच ते घटत जाणार असा अुलटा युक्तिवाद करीत तें निढांवलेले आणि पूर्वीही अशाच कटाचे, फुटण्याचे, खटल्याचे आणि शिक्षांचे प्रसंग अनुभवून वमलेले क्रांतिकारक अुलट खो खो हसत बसले!

त्यांची पोलिस-चौकशी जवळजवळ वर्षभर चालली; पण त्या वर्षाच्या कारावासाने त्यांचें धैर्य खचले नाही. पुढे खटला सुरू झाला. त्या क्रांतिकारकांस न्यायालयात नेणारी जी बंदिशाळेतील गाडी असे ती सशस्त्र शिपायांचे पहाऱ्यात न्यायालयात प्रत्यही जाअू येअू लागली. हाती हातकड्या, पायबेड्या आणि दोर यांनी जखडलेले हे क्रांतिकारक प्रत्यहीं त्या गाडीतून जातायेता मोठमोठ्याने क्रांति-कारक गीतें म्हणत जात. त्यांच्यात काही कवि आणि काही चांगले गाणारे होते ते सांगत आणि सर्वजण तीं राष्ट्रगीतें गात. तीं अितकी हृदय हलवून सोडणारी असत की, बाजूबाजूस शेकडो लोकांचे थवे ती गीतें अैकण्यासाठी त्या मार्गावर प्रत्यही तिष्ठत बसत. त्यांचे ते तेज, ती देशभक्ति, ती निर्भीकता पाहून प्रत्यक्ष पोलिसांच्या डोळ्यांस पाणी येअी! अुभा मार्ग गर्जवीत जाणारी ती त्या देशभक्त वीरांकडून म्हटली जाणारी रणगीतें हिंदीतील आणि अुर्दूतील बहुतेक दैनिकांतून छापलीं गेली आहेत.

पुष्कळ शहाण्यांना आशा होती की, कत्तीमारखा अव्यापारेषु व्यापार करण्याचे भयंकर परिणाम जेव्हा या अुन्मत्त देशवेड्यास भोगावे लागतील, तेव्हा त्यांचे डोळे अुघडतील आणि बंदीच्या पिंजऱ्यात, बेड्यात जखडलेल्या हातात आपलें अवनत माथें धरून दूरदृष्टीच्या शहाणपणास शोभणारे असे पश्चात्तप्त निष्क्रियतेचे अुसासे टाकतील. पण तसें काहीअेक झालेले नाही. त्यांच्यात शहाण्या माणसास शोभणारा हा मायेफिरूपणा दिसून येअीना. ते शहाण्या निष्क्रियतेच्या गुंगीत माथें धरून

खटाटोपात स्वार्थाचा लवलेश तुम्हास शिवला नव्हता तुम्ही जे जे केलेत ते ते सर्व स्वदेशासाठीच केलेंत '

फाशीच्या आणि जन्मठेपीच्या क्रूर शिक्षा देत असतानाच न्यायाधीशाच्या तोंडातूनही जेव्हा हे अुद्गार बाहेर पडले, तेव्हा सर्व श्रोत्यास अेकाअेकी गहिवर आल्यासारखे झाले जे पोलिस त्या देशवीरावर पहारा देत होते त्याचीही मुद्रा ती भयकर आणि क्रूर शिक्षा अैकताच, बदललेली दिसू लागली. 'मतवाला' पत्र म्हणते, 'स्वदेशावरून प्राण ओवाळून टाकणाऱ्या त्या वीरात्म्याची काहीतरी सेवा घडावी म्हणून त्याच्या शक्तीत होत्या तेवढ्या अनेक थड पाण्यासारख्या लहानसहान वस्तु पुढे करून पोलिसानी त्याची कृतज्ञताबुद्धि व्यक्त केली !'

फाशीच्या आणि जन्मठेपीच्या आणि दहादहा वर्षांच्या कठोर कारावासाच्या शिक्षा जसजशा सागितल्या जात, तसतसे ते सर्व दडित क्रातिकारक सस्मित वदनाने त्या शिक्षाच स्वागत करीत होते शिक्षा सागून झाल्या तरी हातावर माथा धरून चिंताक्रात बसणारा शहाणपणा त्याच्यात अुदय पावलेला दिसेना ! त्याचा कट फुटला म्हणून ते रडत बसले नाहीत त्याच्यातील काही साथीदार सरकारचे साक्षीदार होअून त्याचा विश्वासघात करिते झाले होते पण म्हणून ते हतवीर्य झाले नव्हते कारण त्याना जगाच्या आणि प्रत्यक्ष हिंदुस्थानच्या भूतकालीन क्रातिकारक प्रयत्नावरून माहीत झाले होते की, (ज्याला क्रातीच्या मार्गात पाअूल टाकण, त्याने प्रथम आपले शिर आपल्या हातात घ्यावे, मग मनास म्हणावे, 'मना, ध्यानात ठेव की, या परतत्र आणि दलित देशातल्या तीस कोटीपैकी अेकाणतीस कोटी विश्वासघातक निघणार, तुला शाप देणार, तुला शिव्या देणार, तुझा शिरच्छेद स्वत चे हातानीच करणारे असणार, तरीही तुला पुढे गेले पाहिजे मगळे जग काय वाटेल ते करो, तू अेकटा तर तुझ्या देशाकरिता झुजत मरण्यास सिद्ध आहेस ना ? पुरे ! क्रातीची सामग्री तुझ्यापुरती तुझ्यापाशी जुळली तर मग ! चल, अेकोणतीस कोटी सरकारी साक्षीदार हातील हे गृहीत धरून चल त्या अुरलेल्या अेक कोटीत कोणीतरी तुझ्याबरोबर राहणारा किंवा तू मेल्यानतर तुझ्या मागून येणारा मिळेल तोही न मिळाला तरी तू चल ! माथेधरूपणापेक्षाही माथफिरूपणाच अेखादी भूकपीय अुलाढाल आता करील तर करील !')

या माथेफिरूपणाच्या विचारपरपरेने अुन्मत्त झालेल्या त्या क्रातिकारकास भयकर शिक्षा अैकून अधिकच अुन्माद चढल्यासारखा दिसू लागला श्री मालवीयाचे 'अभ्युदय'सारखे प्रमुख पत्र म्हणत —

'खटल्याच्या निकालाच्या वेळचे दृश्य खरोखर अपूर्व होते शिक्षा अैकिल्यानतर ते क्रातिकारक जेव्हा जाण्यास निघाले, तेव्हा त्यानी प्रथम अेकमेकाच्या गळ्यात मिठ्या मारल्या आणि डोळ्यातून गळत असलेल्या प्रेमाश्रूत त्यानी अेकमेकाचा निरोप घेतला. त्या वेळेस न्यायालयात अुपस्थित असलेले लोकही रडू

लागले. श्री. रामप्रसादजी, श्री. राजेंद्रनाथ लाहिरी, श्री. रोशनसिंग – ज्या त्रिवर्गांना फाशीची शिक्षा झाली होती आणि श्री सन्याल याना जन्मठेप झाली होती, त्या चौघाच्या चरणास अितर सर्व दंडितांनी भक्तिपूर्वक स्पर्श केला नंतर श्रीयुत रामप्रसाद याचे धुरीणत्वाखाली ते सर्व 'वन्दे मातरम्'ची तुमुल गर्जना करून अेक हृदयस्पर्शी गीत म्हणत न्यायालयातून जाअू लागले.'

'जिच्या प्रेमासाठी आम्ही प्राणही ओवाळून टाकीत आहो, त्या भारतभूमीचा वायु आता आम्हास कुठला श्वासोच्छ्वासास मिळणार! चिंता नाही! हे स्वदेशा, तुझे कल्याण होवो – आम्ही आता निघालो हे मातृभूमि, तू सुखी राहा म्हणजे झाले – आम्ही तर आता चाललो!!!'

हे वाचन, हे गाणे गात जे फाशीच्या खांबाकडे जात आहेत ते देशभक्त सर्व हिंदु आहेत साधनाच्या विषयी त्याच्याशी आम्ही सर्व समत नसलो तरीही हें ध्यानात ठेवण्यासारखें आहे की, त्याच्यात हें तेज आणि हें धैर्य ह हिंदूंची गीता वाचूनच अुत्पन्न झाले त्याच्या अुपस्थितीत तरी 'हिंदु दुर्बल आहे, हिंदु भ्याड

काकोरीच्या क्रांतिकारकांचे नाव अैकून तरी सावध व्हा आणि आपसातील यादवी बंद करा

आणि अिंग्रजहो, तुम्हीही या दृश्याकडे जरा गंभीरपणें पाहा आमची आमच्या पुढाऱ्यास विनंती आहे की, त्यांनी, जेव्हा आता रॉयल कमिशन अिकडे येअील तेव्हा त्याचेपुढे निर्भयपणे या क्रांतिकारक 'मार्येफिक्‌' चा अितिहास वाचून दाखवावा आज वीस पंचवीस वर्षें सरकारने आपल्या भात्यातील सर्व शस्त्रास्त्रें या क्रांतिकारकावर सोडून पाहिली आहेत साधी बंदी, सश्रमबंदी, काळे पाणी, फाशी, मारहाण, जाच, आत्मिक पीडन, दैहिक पीडन, विशिष्ट दंडक, सैनिक दंडक, यदुवा, वेयोनेटें, विमान, बाँब, सरसहा कत्तली—सर्व प्रकारची आयुधें सरकारने या माथेफिरूवर योजून पाहिली पण या मूठभर लोकांच्या संप्रदायाची वीण भुयाराभुयारातून वाढतच आहे—हे या काकोरीच्या अगदी आजच्या क्रांतिकारकांच्या अुदात्त अुग्रतेस साक्षी ठेवून सांगा सांगा की या अमर्त्य क्रांतिकारकासही मारण्याचा मार्ग आहे आणि आश्चर्याची गोष्ट की, तो अगदी सोपा आहे तो म्हणजे हाच की, जें हिंदुस्थानचे स्वातंत्र्य शेवटी केव्हा तरी द्यावे लागणारच आहे ते तुमच्या आमच्यातील लाखो लोकांचे रक्त सांडण्याच्या आधीच सुखासमाधाने देअून टाकून या चिरडीस आलेल्या प्रकरणाचे पर्यवसान आनंदात करा अजूनही जर अिंग्रज राष्ट्राने मोकळ्या मनाने हे धोरण स्वीकारून वैध प्रगति (constitutional) शक्य करण्यासारखी परिणामकारक राज्यघटना सुरू केली, तर तिच्या किंचित् दिरंगाअीच्या कार्यपद्धतीसही स्वीकारणे हे, हे क्रांतिकारक राजनीतिदृष्ट्या आपले कर्तव्य समजतील अितकेच नव्हे तर, जर ती राज्यघटना देताच अिंग्लंड निष्कपट रीतीने भारताशी समानतेचे सहकार्य करू लागेल, तर तेही अिंग्लंडशी तितक्याच निष्कपटपणे अुभयताच्या कल्याणास अनुरूप असे सहकार्यही करू लागतील

\+ + +

## क्रांतीच्या ठिणग्या

काकोरीच्या क्रांतिकारकांस सेशन्स कोर्टात ज्या शिक्षा झाल्या त्या कमी वाटून हायकोर्टाने त्या अधिकच भयंकर प्रमाणात वाढविल्या आहेत दहा वर्षें, चौदा वर्षें अशा शिक्षा जन्मठेपीपर्यंत वाढविल्या! अपिलात शिक्षा कमी होतील म्हणून अपिले झाली पण क्रांतीच्या काकोरीच्या कटाच्या ठिणगीने दाढी पेटलेल्या हायकोर्टी क्रोधास, त्या क्रांतिकारकांपैकी तिघाचौघास फाशी झाली असताही, तेवढा बळी पुरेसा न वाटून, त्याने त्या कटातील मंडळीच्या आधीच भयंकर असलेल्या शिक्षा अधिकच भयंकर प्रमाणात वाढविल्या!

ज्यास पाच वर्षे सश्रम कारावास होता त्यास तो दहा वर्षे दिला, ज्यास दहा वर्षे द्वीपान्तर होते त्यास जन्मठेपी दिल्या ! तरीही अेवढ्यावरून न्यायाधीशास दयेचा किंवा सौम्यतेचा लवलेशही शिवला नाही असे अनुमान मात्र कोणीही करू नये कारण अितरांच्या जरी त्यांनी अत्यंत कठोरपणे शिक्षा वाढविल्या, तरी काहींच्या शिक्षा त्यांनी सदयपणे वाढविण्याचे साफ नाकारिले अुदाहरणार्थ, सेशन्स कोर्टात ज्यास फाशीच्या शिक्षा झाल्या होत्या त्यांनीही अपील केले होते पण हायकोर्टाने सदय अंतःकरणाने, अितर कटवाल्यांच्या शिक्षा दुपटीने वाढविल्या असताही, फाशी दिलेल्या शिक्षेवर ही जी अपिले झाली त्यांच्या शिक्षा मुळीच वाढविल्या नाहीत त्यांना सेशन्सकोर्टाने दिलेली फाशीच काय ती पुरे, असे अेकमताने अुदारपणे घोषित केले या औदार्याविषयी न्यायमूर्तींचे आभार क्रांतिकारक कटवाले मानितीलच हो ! जशा अितर शिक्षा दुपटीने वाढविल्या तशी प्रत्यक्षात सेशनने या जन्मापुरत्या दिलेल्या अेका फाशीच्या शिक्षेतही दुपटीने वाढवून पुढील जन्माची फाशीही देअून टाकण्याचे हायकोर्टाने मनात आणिले असते, तर त्याचा कोण हात धरणार होता !

अेका क्रांतिकारक कटास अशा अत्यंत कठोर शिक्षा दिल्या की बाकीचे क्रांतिकारक भिअून त्या नादान पडणार नाहीत अशी जर हायकोर्टाची किंवा त्याच्यावर असणाऱ्या सरकारची समजूत असेल, तर ती मात्र सफल होण्याचा तितकासा रंग सध्या दिसत नाही कारण, ही काकोरीच्या कटाची ठिणगी, त्याच्यातील फाशी जाणाऱ्या तीन चार क्रांतिकारकांच्या अुष्णोष्ण रक्ताच्या शिरा तुटताच अुगळून पडणाऱ्या लालभडक सड्यात विझते न विझते तोच, बंगाल्यात आणखी अेक भयंकर कट अुघडकीस येण्याच्या मार्गास लागला आहे अेका घरास वेढा घालून पोलिसांनी कित्येक बाँब, बंदुका, पिस्तुले आणि क्रांतिकारक वाङ्मय धरिले आहे त्या घरातील घरधनी त्याचा भाअू त्याची दोन वर्षांची मुले निरनिराळ्या ठिकाणी पकडली गेली असून सहत्याचा गावभर नुसता धुमाकूळ चालला आहे आतल्या आत धुमसणाऱ्या क्रांतीची ही आणखी अेक ठिणगी वर अुडून सत्तेच्या काष्ठाची दाढी पुन पटवीत आहे काकोरीच्या कटवाल्यांची आज दोन वर्षांवर जी दुर्दशा आणि हाल चालले आहेत आणि हायकोर्टातल्या अपिलाचा वर जो भयंकर निकाल दिला आहे त्यामुळे क्रांतिकारकांचे मरणमारणाचे अुग्र अुद्योग बंद पडलेले दिसत नाहीत किंवा त्या अुग्र अुद्योगास पोसण्यास आणि त्यास लागणारी शस्त्रास्त्रादि साधनसामग्री जुळविण्यास लागणारा लाखो रुपयांचा आर्थिक निधि जमविण्यासाठी घालण्यात येणारे राजकीय दरवडेही अुतरत्या पायास लागण्याचे काहीही चिन्ह दिसत नाही दर आठवड्यास बहुधा

---

श्रद्धानन्द दि २२ सप्टेंबर १९२७

राजकीय दरवडे पडतातच आहेत क्रांति मारण्यासाठी म्हणून बंगाल्यात अनेक पुढारी लोकास मध्यंतरी दृष्टिबद्ध, स्थलबद्ध, कारावद्ध करून ठेवले, पुन सुभाष बाबूसुद्धा त्याच्यातील अनेकास सोडून देण्यात आले पण क्रांतिकारक चळवळ आतल्या आत धुमसतची धुमसतच आहे

क्रांतीच्या ठिणग्या अुडताच त्यावर क्रांतिकारकास फाशीवर चढवून त्याच्या अुष्णोष्ण रक्ताचा सडा घालण्याचा अुपाय असा निष्फळ होत आहे त्या क्रांतीच्या फाशीवरून अुसळणाऱ्या रक्ताच्या सड्यानी त्या ठिणग्या विझत नाहीत तर आगी-वर ओतलेल्या राकेलप्रमाणे अुलटा भडकाच घेतात ! पचवीस वर्षे हा क्रांतीचे रक्त शिपडून क्रांतीच्या ठिणग्या विझविण्याचा अुपाय सरकारने करून पाहिला आहे पण तो काही पुरतेपणी सफल होतासे दिसत नाही तेव्हा अजून तरी सरकारने क्रांति विनविण्याचा सरळ आणि सफळ असा अुपाय—जो अितिहासाच्या वैद्य-शास्त्राने आणि जगाच्या अनुभवाने अगदी रामबाण म्हणून ठरविलेला आहे, तो योजून पाहावा क्रांतिकारक जी क्रांति करू म्हणतात ती आपण होअूनच करून टाकावी आणि हिंदुस्थानास स्वातंत्र्य देअून टाकून या क्रांतिकारक वृक्षाच्या मुळा-वरच कुऱ्हाड घालावी !

पण हा अुपाय सरकार करणार काय ? क्रांति मरणार काय ? अितिहासाची पुनरावृत्ति झाल्यावाचून राहणार काय ? काय ? या दैवदुर्विलसितास करावे काय ?

चाललेल्या पवित्र युद्धात लढत आहेत. त्यातही जर चीन स्वतंत्र झालें, प्रबळ झाले तर त्याचा हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या आकांक्षास पाठिंबा मिळण्याचा अधिक संभव आहे. अशा स्थितीत अिंग्रजाच्या आपल्या पायातील बेड्या तोडून टाकण्याअितकेही पौरुष अंगी नसणाऱ्या हिंदी सेनेने, केवळ अिंग्रजाकडून दिल्या जाणाऱ्या चार कवड्यांच्या वेतनासाठी चीनच्या नरडीचा घोट घेऊन त्याच्या पायातही अिंग्रजी वर्चस्वाच्या बेड्या ठोकण्यास साहाय्य व्हावे, ही अत्यंत नीचपणाची वर्तणूक कोणाही भारतीय मनुष्यास लाजिरवाणी वाटणारी होतीच. तेव्हा वरिष्ठ विधिमंडळाने हिंदी सैन्य चीनकडे लढण्यास धाडू नये, म्हणून सरकारास बजावून सांगितले; पण ते न अैकता अिंग्रजांनी चीनला हिंदी सैन्य धाडलेच ! विधिमंडळाच्या हातात शाब्दिक निषेध करण्यापलीकडे काहीच सत्ता नसल्याने ते बिचारें हतबल होऊन चूप राहिले !

पण हिंदी क्रांतिकारकांचे बळ नुसतें शब्दातच साठविलेले नसतें. विधिमंडळाचें शाब्दिक बळ जेथे जेथे संपते, तेथूनच त्यांचे अुग्र अुपाय सुरू होतात. चीनला हिंदी सेना विधिमंडळास न जुमानता अिंग्रजांनी नेताच चिनात असलेल्या हिंदी क्रांतिकारकांच्या गुप्त संस्थांनी, गुप्त आणि प्रकट अुपायांनी त्या सेनेतील शीखादिक सैनिकांच्या गाठी घेऊन त्यास सांगितले की, 'अरे, स्वतःच्या मातृभूमीस पारतंत्र्यातून सोडविण्याचे तुमचे वर्तव्य ! तें तर तुम्हास करवत नाही ! तेथे तुमच्या या मिशा आणि दाढ्या आणि तरवारी शेळीच्या शेंपटासारख्या मेंग्या होनात ! पण तेवढे पाप तुम्हास नरकास धाडण्यास पुरेसे नाही, म्हणून का तुम्ही आता या चीनलाही दास्यात ढकलण्यास अिकडे आला आहात ? आपल्या मायभूस दास्या-

गेले क्याटन, शांघाय, हाँगकाँग अित्यादि प्रमुख नगरांतून हिंदी राज्यक्रांतिकारकाची गुप्त संस्थांचीं जाळीं पसरलेलीं असून त्यांचें सर्व धोरण चिनी राष्ट्रीय पक्षास साह्य देअून अिंग्रजांचें नाव खाली करण्याचें आहे आशा ही की, चीनमधून अिंग्रज अुठला की त्या चीनच्या राष्ट्रीय सरकारच्या पाठिंब्यानें आणि रशियाच्या संगनमतानें अिंग्रजाशीं त्या दोन राष्ट्रांची लढाअी जुंपताच ब्रह्मदेशाच्या सरसीमेवरून बंड करून हिंदुस्थानवर स्वारी करावयाची आणि राज्यक्रांतीचा झेंडा हिंदभूमीवर पाय ठेवताच अुभारावयाचा !

पण चीनमधील हिंदी राज्यक्रांतिकारकांचा डाव अिंग्रजांच्या लक्षांत आल्यावाचून थोडाच राहणार होता ! त्या डावाचें मर्म विधिमंडळांतील, खादी मंडळांतील तुम्हां आम्हां अिंग्रजी चाबकाखालीं माणसाळलेल्या मंदांच्या लक्षांत येणार नाही आपणास तो अेक केवळ 'पोरखेळ' वाटेल, माथेफिरूपणाची अेक लहर वाटेल पण अिंग्रजांस त्या डावांतील अर्थ तत्क्षणीच कळला अिंग्रज विधिमंडळ, खादी मंडळ अित्यादि सभ्य संस्थांच्या माणसाळलेल्या निरुपद्रवी डावाकडे कौतुकानें पाहात बसतात त्यास वेळीं अवेळीं 'वाहवा ! भले !' म्हणून त्यांतील निरुपद्रवीपणाच्या प्रमाणांत अधिकाधिक भलाअी पण देतात, पण क्रांतिकारकांच्या डावाचें नाव काढताच कसे अगदी तत्काळ पिसाळून, दिसेल त्यास चावू लागतात हे सर्वश्रुतच आहे अिकडे जितर चळवळीच्या म्होरक्यांची अेंशी हजार लोकांची सभा भरून कडकांतील कडक भाषा बोलत बसली तरी गव्हर्नर स्वस्थ झोंप घेत असतात पण अेखाद्या अठरा वर्षांच्या पोरानें जरी अेखादा क्रांतिकारक शब्द बोलला तरी अेकदम 'राजाच्या विरुद्ध लढाअी' म्हणून रणशिंगें फुंकलीं जातात अठरा वर्षांच्या क्रांतिकारकाच्या माथेफिरू पोराची अेंशी हजार माथेंधड धाराहन अिंग्र-

क्रांतिकारक हे स्वारी करण्याची सिद्धता करीत आहेत, ही गोष्ट अिंग्रजी राजनीतीचे सूक्ष्म दृष्टीस दिसताच त्यांचे पटाअीत बुद्धिमत्तेस तिचे महत्त्व तत्काल समजून आले आणि त्यांनी हिंदुस्थानचे वायव्य सरसीमेवर ज्याप्रमाणे युद्धाची सज्जता आजवर ठेवण्यास ते झटत असत, त्याचप्रमाणे आता हिंदुस्थानचे पूर्व सरसीमेवरही लढाअीची सज्जता ठेवण्यास अिंग्लंड तत्काळ झटू लागले.

आजपर्यंत सरसीमा (सरहद्द), आणि सरसीमेवरची युद्धाची सिद्धता म्हटली म्हणजे वायव्य सरसीमा काय ती हिंदी लोकांच्या दृष्टीसमोर अुभी राही. रशिया पूर्वी तिकडूनच येणार होता. अफगाणिस्थानही तिकडूनच स्वारी करण्याच्या अुद्योगात असतो. गावठी जातीही, हिंदु लोकांच्या नाशास तत्पर होअून लूटमार करीत तिकडूनच धावे छापे मारितात. म्हणून आजवर हिंदुस्थानला त्या वायव्य सरसीमेची काय ती चिंता असे. हिंदुस्थानची पूर्व सरसीमा अगदी निरुपद्रवी आणि पूर्वी सभ्य असल्याने आणि नंतर दुर्बळ झाल्याने, दुसऱ्या आणि त्यातही त्यांची देवभूमि असलेल्या हिंदुस्थानावर स्वारी करण्याचे ज्यांच्या मनातही आले नाही अशा तिबेट आणि चीन या राष्ट्रांनी व्यापलेली असल्याने शतकोशतक हिंदुस्थानास पूर्व सीमेवर युद्धाची सज्जता म्हणजे काय याची कल्पनाही अुरली नव्हती. पण शेवटी आज वायव्य सरसीमेप्रमाणेच पूर्वसीमेवरही युद्धाची सज्जता ठेवण्याचा प्रसंग सरकारवर गुजरला आहे. कारण, अफगाणिस्थानास पुढे करून रशिया जसा वायव्य सीमेवर स्वारी करू पाहत आहे, तसाच चीनदेशास पुढे करून रशिया पूर्वसीमेवर स्वारी करू पाहत आहे. आणि त्या दोन्ही बाजूंनी या महायुद्धाचे सुदोपसुंदीत आपलाही लग्गा लागला तर पाहावा म्हणून हिंदी क्रांतिकारक फार दूरवर परिणाम करणारा राजकारणी डाव टाकून आणि अिंग्रजांच्या शत्रूंशी संगनमत करून हिंदुस्थानवर क्रांतिकारक सेनेची चढाअी करू पाहात आहेत.

यासाठी, त्यास तोंड देता यावे म्हणून दूरदर्शी अिंग्रजांनी आजपासूनच ब्रह्मदेशाच्या सरसीमेवर मोठी प्रबळ सज्जता चालविली आहे. त्या सीमेवर किल्ले बांधण्याचे काम वेगाने चालले असून मोठमोठे सैनिक-मार्ग सिद्ध करण्यात येत आहेत. त्यावर सुटलेल्या बंदिवानांच्या टोळ्यांच्या टोळ्या धाडण्यात येअून त्यांच्याकडून कार्य करून घेण्यात येत आहे. त्याप्रीत्यर्थ धनसंग्रहही सुरू असून त्या सीमेवर चाललेल्या या भावी महायुद्धाच्या पूर्वसिद्धतेविषयी कोणतीही बातमी किंवा सैन्याच्या हालचालींची गुणगूण प्रसिद्ध करण्याची कडक बंदी करण्यात आली आहे.

अफगाणिस्थानकडच्या जेवढ्या स्वाऱ्या – शिकंदराच्या स्वारीपासून तो परवाच्या जिहादी गुंडापर्यंत – झाल्या त्या हिंदुस्थानास दास्यात दडपून ठेवण्यासाठी होत्या. पण ब्रह्मदेशाकडून होअू पहाणाऱ्या या पूर्वसीमेवरील ही स्वारी झालीच तर हिंदुस्थान जिंकण्याकरिता होणारी नसून केवळ अिंग्रजास हिंदुस्थानातून हाकून

त्याची शक्ति कमी करण्यासाठीच होणारी आहे. अिंग्रजांच्या साम्राज्याचे तुकडे अुडविण्यासाठी, त्या साम्राज्याचें जे प्रत्यक्ष हृदय असें हिंदुस्थान, त्यावरच आघात करिता यावा, अिंग्रजांना हिंदुस्थानातच पेचात धरिता यावें, अेवढ्यापुरताच त्यांचा स्वारीचा बेत आहे. त्याचें आणि त्यांचेसह सहकार्य करीत असलेल्या हिंदी क्रांतिकारकाचें असें धोरण आहे की, हिंदुस्थानच्या पूर्व सीमेकडून अिंग्रजास टांच दिली असता त्यांची शक्ति विभागेल आणि आतून हिंदी लोक क्रांति करून अुठतील ! काय वेडें धोरण हें ! विधिमंडळें, खादी-मंडळें, शिवोत्सव, शुद्धि, स्वदेशी अित्यादि अत्यंत अुपयुक्त आणि सुखासीन अुपायांनी बैठी प्रगति करण्याचें सोडून या क्रांतिकारकांच्या कानठाळ्या बसविणाऱ्या पोरखेळाच्या घोडदौडी प्रगतीत शिरून दातखीळ फोडून घेण्याचे संकट स्वत.वर ओढून घ्यावयास आम्हा सभ्य गृहस्थास वेड थोडेंच लागलें आहे ! !

परंतु आम्हास नसलें तरी ब्रह्मदेशातील काही लोकांवर मात्र या वेडाची थोडीशी छाया पडत असल्याचें दिसतें. कारण, त्यांच्यातील बऱ्याच लोकांनी केव्हापासूनच अशी हाकाटी करण्यास सुरवात केली आहे की, जर कधी ब्रह्मदेशाच्या सरसीमेवर चीन आणि अिंग्रज यांचें युद्ध जुंपलें तर आपण अिंग्रजांस धनाची वा जनाची यत्किंचित्ही सहायता देणार नाही. कोण ही बंडगिरी! सरकार महात्मा गांधीस का तिकडे धाडीत नाही ! ते गेले तर सत्य, अहिंसा नाही तर निदान वनस्पत्याहार अशा कोणत्या तरी गालभरू मुद्दाम तत्त्वाच्या नांवाखाली तेव्हाच ब्रह्मी लोकांस समजावतील की, अिंग्रजांशी अशा युद्धाचे वेळीं निरपेक्ष, बिनअट, बिनबोभाट, मागतील तो सहकार करणें आणि साह्य देणें हेच खऱ्या असहकारितेचें लक्षण आहे. मागे जर्मन लोकांस मारण्यासाठीं महात्माजींनी सैनिक जमविले तसे आता रशियाविरुद्ध सैनिकभरती करणें आणि रशियन-चिन्याची हिंसा करणें हीच खरी अहिंसा आहे. आणि अशा रीतीनें अिंग्रज आपला अमित्र आहे म्हणनच

जर्मनांची मस्तक अुडविण्यासाठी अिंग्रजी सैन्यात हिंदी शिपायांची भरती करीत 'स्वराज्याच्या सरळ मार्गावर' भरधाव चाललेले होते, त्याच वेळेस शेकडो क्रांतिकारक तरुणांसह गुप्त रीतीने हा तरुण सन्याल, भरती झालेल्या पलटणीतून बंडाचा अुपदेश देत स्वराज्याच्या वक्र आणि रक्ताळलेल्या मार्गाने भरधाव चाललेला होता.

ते बंड फसले, लाहोरला मोठमोठे गुप्त कटाचे खटले होअून अिंग्रजांचे राज्य अुलथे पाडण्यासाठी आणि भारतीय स्वातंत्र्य संपादन करण्यासाठी शस्त्र धारण करून रणांगणात अुतरण्याच्या अपराधास्तव शेकडो फाशी गेले, जहाजें भरून जन्मठेपीवर धाडण्यात आले — त्याच धादलीत शचींद्रनाथ सन्याललाही काशीचे कटाच्या खटल्यात जन्मठेपेची शिक्षा झाली. त्याचे नादाने त्याचे बंधूही या कटात गवसले होते, त्यानाही बंदीची शिक्षा झाली, सन्यालचे घरदार जप्त करण्यात आले. त्याच्या गोतल्गाचे मागे ससेमिरा लागला. त्या अुद्ध्वस्त कुटुंबात त्यांची ती वृद्ध माता श्रीमती क्षीरोदवासिनी देवी तेवढी अुरली.

शोकाने विव्हल झाली असेल नाही ती माता ? होय ती विव्हल झालेली होती. वडील मुलगा वयात आल्यावर घरचा संसार तो संभाळील आणि वृद्धपणी माझ्यावर पडलेल्या वैधव्याच्या घाल्याखाली चुरडून गेलेली हीच माझी वाळे संततिसंपत्तीने युक्त होअून माझी सेवा करून माझे पांग फेडतील, ही तिची आशा जळून गेली होती. तिच्या वडील मुलाने वयात येताच त्या आशांचे पांग न फेडता, तिची विचारपूस देखील न करता तिकडे काळेपाण्यावर जाअून तेलाचा घाणा फिरविला आणि अिकडे घरादारावर नांगर फिरविला. त्याने त्याच्या अितर भावानाही त्याला लागलेले देशस्वातंत्र्याचे दिव्य वेड लावून दिले, त्यांचाही नाश केला, अितकेच नव्हे, तर त्याच्या संगतीने त्या त्याच्या आअीला देखील त्या सात्त्विक वेडाने पछाडले !

—आणि तिचे अुजाड घरही तिला भरलेले दिसू लागले. अंदमानात तिचा वडील मुलगा जन्मठेपीच्या शिक्षेवर असताना तिची त्याला जी पत्रे जात त्यामध्ये आपल्या चारही मुलांनी स्वदेशस्वातंत्र्यार्थ घेतलेल्या व्रतापायी आपला संसार अुद्ध्वस्त केल्याविषयी तिने अेका शब्दानेही खारा व्यक्त केलेला नसे !

पण लवकरच तो पुन्हा तिला भेटणार नाही अशा कठीण जन्मठेपीच्या शिक्षेवर गेलेला तिचा पुत्र योगायोगाने तिला लवकरच भेटला. जन्मठेपीची वीस वर्षांच्या शिक्षेची पाच वर्षांतच सूट मिळून राजक्षमेच्या अुलाढालीत सन्याल सुटले, आणि अंदमानातून घरी परत आले. त्याचे तिघे भाअूही कारागारातून आणि राजकोपातून मुक्त झाले. त्या वृद्ध आणि निराश क्षीरोदवासिनी देवीच्या 'हेचि देही हेचि डोळा' पुन्हा सर्व मुले भेटली. जे सबंध जन्मात पार पडणार नव्हते ते पाच-वर्षांचे आत पार पडले. तिच्या भ्रताराचे आकस्मिक निधनानंतर प्राणाहून पलीकडच्या प्रेमाने वाढविलेली आणि क्रांतीच्या वादळात मध्यंतरी नाहीशी झालेली

तिची कच्चीबच्ची तिच्या घरट्यास आणि तिच्या पखाखाली पुन्हा अेकसह्रा गोळा झाली आनंद झाला. घर भरले

—पण कोणाचे घर भरले ? क्षीरोदवासिनीचे घर भरले तथापि तिच्या मुलाला आणि त्याच्या संगतीने आता तिलाही त्या घराला स्वत चे घर म्हणावेसे वाटतच नव्हते, जिवावर आले होते पण शेपटावर गेले असे समजून आपल्या दैवाने अंदमानहून परत आलेल्या मुलास 'नोकरी कर कशी ! आता मात्र जपून राहा बर ! मरू दे तो देश संकटात ! तुम्ही तुरुंगात पडलात तेव्हा अेकजण देखील मग भीक घालीत नव्हता ! अशा या लोकासाठी कशाला मरतास ! ते सगळे तू गेलास तेव्हा म्हणत 'मग काय त्याच ?' मग तू तरी कशाला मरतोस अशा कृतघ्नाकरिता ?'—अित्यादि शहाणपणाचा अुपदेश क्षीरोदवासिनीने आपल्या मुलास दिला असता तर तो अगदी स्तुत्य नसले तरी क्षम्य होत, पण तिने तसा चकार शब्दही काढला नाही !

गरुडास जसे मातीत विसावा घेववतच नाही तस सन्यालला घरी करमेचना [वादळाशी झुजणे हीच जशी गरुडाची करमणूक तशीच वीरात्म्याची] देशवीर सन्याल आणि त्याचे तिघे भाअू पुन्हा क्रातीच्या भयकर निशेत चूर झाले त्या जनक-जननी-जननी भारतमातेची हाक त्याच्या हृदयात सारखी प्रतिध्वनित होअू लागली ते त्याच्यासारख्याच जाज्वल्य आणि अघोरी क्रातिकारकासह शस्त्रास्त्रे जमवीत, राजकीय स्वातन्त्र्यार्थ अग्रजादी जीव घेअू-देअू चकमकी लढत, सरकारी निधि वळवावीत, आगगाड्या लुटीन सयुक्त प्रातभर पुन धिंगाणा घालू लागले त्याचे तेच प्रकरण पुढे काकोरीचा खटला म्हणून प्रसिद्ध झाल !

त्या खटल्यात सन्यालला पुन्हा जन्मठेप झाली त्याच्या भावानाही पुन्हा शिक्षा झाल्या ! वर्ष दीडवर्ष पोलिसाना तिच्या मुलास तिच्या घरून पुन्हा धरून नेल्या-पासून ता मुलाना काकोरीच्या खटल्यात जन्मठेपीच्या दुसऱ्या शिक्षा लागेता त्या क्षीरोदवासिनी देवीने खाणे, पिणे, राहणे, निजणे अित्यादि शारीरिक आवश्यकतेच्या गोष्टीतही अत्यत त्राग सोसला, छळ सोसले, दु ख सोसले ! — पण अेका शब्दानेही 'मरो तो देश ! जळो ते स्वराज्य !' असे म्हटले नाही ती माता होती तिची चारी मुले दहा बारा वर्षे सारखी पोलिस अटकेत जाअून सुटत आणि पुन्हा पडत होती अर्थात् मुलाच्या ताटातुटीने ती विव्हल होअी, पण अेका शब्दानेही त्याना स्वातन्त्र्य युद्धापासून परावृत्त करीना ! अुलट त्याना विजय मिळो म्हणून ती त्याना आशीर्वाद देअी ! कारण ती नुसती माताच नसून वीरमाता होती स्वदेशस्वातन्त्र्यार्थ आपली मुले तिने देवाला आणि देशाला मनोभावाने अर्पणच केली होती शचीद्रनाथ सन्यालला दुसरी जन्मठेप होअून ते पुन्हा कारागारात पडल्यानतर आणि तिची अितर मुलेही दुरावल्यानतर क्षीरोदवासिनी झुरणीस लागली, आणि मुलावाचून तळमळत आअीची जी अवस्था होते, ती तिची झाली झुरत झुरत

# वीरमाता क्षीरोदवासिनी

स्वातन्त्र्याच्या मुसळीमाजी जन्म स्वतंत्रांचे
गुलामगिरीच्या अुकिरड्यावरि गुलाम निपजाचे !!
— सिंहगडचा पोवाडा

मागें 'श्रद्धानंद' मध्यें काकोरीचे क्रान्तिकारक या लेखांत श्री. शचींद्रनाथ सन्याल यांचा अुल्लेख केलेला होता आणि त्यांचे छायाचित्रही देण्यांत आलें होतें. त्या प्रखर देशभक्त वीरास्तव काकोरीच्या क्रान्तिकारकांच्या कटांत आजन्म काळ्या पाण्याची भयंकर शिक्षा मिळालेली आहे. त्याच शचींद्रनाथ सन्याल यांच्या वृद्ध मातेचें नाव श्रीमती क्षीरोदवासिनी देवी हें होतें.

ती वृद्ध वीरमाता, तिचे पुत्र देशस्वातन्त्र्यासाठीं कारागारांत जन्मठेपीच्या भयंकर शिक्षेच्या बेड्या ठोकून बंद घातलेले असतां, घरीं अेकटी त्यांच्या स्मरणानें विव्हळ होअी, परंतु त्यांस, स्वदेशसेवेच्या भीषण दिव्यांत यश येवो म्हणून सरत्या श्वासानेंही आशीर्वाद देत अेप्रिल १९२८ मध्यें मृत्यु पावली.

तिला अेकंदर चार मुलगे होते. वडील मुलगा साधारण वयांत येतो न येतो तोंच तिचा भ्रतार वारला आणि त्या चिल्यापिल्यांच्या भरणपोषणाचा भार श्रीमती क्षीरोदवासिनी देवी यांजवर पडला. तें कुटुंब मूळचें बंगाली पण फार दिवसांपासून काशीसच त्यांचा निवास होता. त्यांचा बाप वारल्यामुळें अुघडा पडलेलीं हीं चारी मुलें आपल्या ममतेच्या पखांखालीं घालून ही दुःखी आअी असा आशेनें कालक्रमण करूं लागली की, लवकरच माझा वडील मुलगा वयांत येअील, संसाराचा भार सांभाळील आणि माझ्या वाधर्वयाचे दिवस कौटुंबिक आनंदांत घालवून माझ्या कष्टांचें पारणें फेडील.

पण तिचा तो वडील मुलगा जसजसा वयांत येअूं लागला तसतसा ज्या मातेनें त्यास सांभाळलें तिच्याहून दुसरीच अेक मूर्ति त्याला आकर्षण करूं लागली. ती तिची — आशीची आअी — मातेची माता म्हणून सवोंघून आपल्या आअीला विसरत चालला! आपल्या आअीच्या खांद्यावर पडलेला संसाराचा भार सांभाळण्याचें सोडून तो त्या परम मातेच्या संसारासच आपला संसार मानून तिच्या दुःखामार्ठी तो झुरूं लागला. तिच्या मोचनासाठीं झुंजूं लागला. त्याच्या त्या दुःखी आअीच्या घरीं तिची नुसती भेट घेण्यासही त्यास सवड मिळेनाशी झाली. कारण, रात्रंदिवस जो त्या त्याचें मनास आकर्षण करून हरून नेणाऱ्या दिव्य मूर्तीच्या मंदिरांत 'हे भारत-माते! हे जननी! हे जन्मभूमि!' असा ध्यास धरीत पडलेला असे. आअीला

श्रद्धानंद ३ मे १९२८

जननी म्हणण्याचे विसरून स्वजातीलाच 'हे जनक-जननी-जननी!' म्हणून आओ' म्हणू लागला!

१९०५ ते १९११ च्या क्रान्तिकारकाच्या आगळ्या चळवळीचे ते दिवस होते. त्याच्या अुग्र व्रताच्या अुग्रतेसच तरुण अंत करणे मोहून जात होती आओबाप, बायका-मुले, घरदार याची दृश्ये त्या दिव्य ध्येयाची आणि त्या अुग्र साधनाची दैवी दारू जो अेकदा पिअी तो तरुण धुंद होअून त्याच्या दृष्टीस दिसेनाशी होत. त्याच्या दृष्टीस अेकच दृश्य दिसे. भारतमाता, ती 'जनक-जननी-जननी' दास्याच्या शृंखलात जखडलेली आहे आणि तिच्या तीस कोटी संतानातील जात्या-येत्यास हाकारीत आहे 'प्रथम पुढे होअून या माझ्या विमोचनार्थ पेटलेल्या महान् अग्नि-कुंडात अुडी घालून बलिदानाच्या नवसाची संख्या पुरी करण्यास कोणी प्रथम पुढे येतो आहे काय?'

या मनोवृत्तीने अुत्स्फूर्त झालेला तरुण, शहाणपणाच्या किंवा मूर्खपणाच्या सर्व अुपदेशाच्या टप्प्याबाहेर गेलेला असे प्रकृति विकृतीसारखी आणि विकृति त्यास प्रकृतीसारखी वाटे घरचा संसार बुडवून दारचा संसार तो थाटू पाही जीवन मरण वाटून त्यास मरणात मजा वाटे. काशीयात्रेहून त्यास फाशीयात्रा अधिक पुण्यप्रद वाटे सर्व जिवंत शहाण्याचा अुपदेश त्याला अेकू येअीनासा होअी आणि मेलेल्या आत्म्याचे वाचाहीन वक्तृत्वाचे त्यास अक्षर नि अक्षर अेकू येअी.

किशोर शचींद्रनाथ सन्याल त्याच वक्तृत्वास भाळला आणि त्याच आग-भिजू पथाचा अनुयायी झाला काशीला त्याने क्रान्तीच्या 'जीवघेअू जीवदेअू' शपथा घेतल्या क्रान्तिकारकाच्या कटात मिळून तो बाँबची विद्या शिकला, शस्त्रे संचवू लागला, महायुद्धाचे धामधुमीत आपले शिर आपले हातात घेअून सर्व हिंदुस्थान-भर वड करून क्रान्तिकारकाच्या भयंकर योजनात तो भाग घेअू लागला आणि तो सैनिकाच्या शिबिरात घुसून, नाना रूपे पालटून, पल्टणीस फितवू लागला त्याच्या घरावर पोलिसपहारे बसले दिल्लीच्या गव्हर्नर जनरल्वर बाँब फेकून सत्तेच्या सामर्थ्याच्या हत्तीच्या अंबारीत व्हाअिसरायास घायाळ करण्याचे अमानुष कृत्य करणाऱ्या क्रांतिकारकाच्या भीषण साहसाने आणि त्या प्रकरणी अनेक लोक फाशावर चढविले असताही त्या दृश्याने ज्या सन्यालचे मन चंचल न होता अधिकच रणोन्मत्त होअून अुठले त्याला लाहोरला, फिरोजपूरला, कोमागाटामारुच्या अुठावात, बालासोरच्या लढाअीत शालेल्या क्रान्तिकारकाच्या आणि अिंग्रजाच्या भयंकर चकमकीत क्रांतिकारकाचे शेकडो तरुण रणात लढून मेले असता, फाशीवर लटकाविले जात असता, अंदमानात शेकड्यांनी मोजून कोंबले जात असता, भीतीचा लेशही शिवला नाही किंवा त्याचा तो जिवंत शहाण्यानी निंदिलेला मार्ग त्यास टाकावू वाटला नाही, हे त्याच्या स्वभावास साजेसेच झाले. ज्या वेळेस राज-निष्ठेचा शपथा घेअून गांधीसारखे शहाणे लोक अिंग्रजास महायुद्धात साहाय्य देववून

देवी क्षीरोदवासिनी ॲप्रिल १९२८ मध्ये वारली । तिचा तो वडील मुलगा तिला मरताना माझी देण्यास देखील येऊ शकला नाही ! !

मुलासाठी झुरत आभी मेली — पण मरताना देखील, आपल्या या देवप्रिय मातृभूमीचे स्वातंत्र्यार्थ झुजणारे वीरपुत्र आपल्या कुशीत उत्पन्न झाले म्हणून ती वीरमाता स्वतःस धन्य मानीत मेली ।

*प्रिय मातृभूमीच्या स्वातंत्र्ययज्ञात आपण स्वतःच नव्हे तर आपला वंशचा वंश पुनःपुन्हा स्वातंत्र्यलक्ष्मीच्या स्थंडिलावर बळी देणारे जे काही धन्य देशवीर* या हिंदुस्थानात आणि या हिंदूत निघाले, त्यात शचींद्रनाथ सन्याल यांचे कुटुंबही गणिले गेले पाहिजे

त्या वीर कुटुंबातली ती वीरप्रसू क्षीरोदवासिनी — तिचे नाव, कुमारिकांनो आणि गृहिणींनो ! — गर्भवतींनो आणि मातांनो ! — तुम्ही प्रत्यही प्रातःकाळी स्मरण करा त्या तदा पंचकन्यांच्या स्मरणाबरोबरच ह्या अशा वीरकन्यांचे स्मरणही तुम्हास आणि तुमच्या देशास कल्याणकारक झाल्याविना राहणार नाही ।

\+ + +

## पाहिजे तर शस्त्राचारी म्हणा; पण अत्याचारी नव्हे ! !

आज क्रांतिकारकांना सरसकट अत्याचारी म्हणण्याचा जो प्रघातच पडल्यासारखा झाला आहे, तो अशाच हलकटपणाचा द्योतक आहे. क्रांतिकारक पक्षाला आजकालचे लेखक किंवा वक्ते जेव्हा सहजच अत्याचारी म्हणून जातात तेव्हा त्यांच्यातील अनेकांच्या मनात क्वचित् त्या पक्षाविषयी नसती निंदाच करण्याचा हेतु असतो असे नाही. पण शब्दाची योजना यथार्थपणे पारखून करण्याची सवयच नसल्याने ते स्वतःच्या बापाला 'वृद्ध' म्हणून न म्हणता सहज 'थेरडा' म्हणून जातात !

मागे अवघ्या हिंदी लोकांना 'नेटिव्ह' (Native) म्हणून स्वतः हिंदी लोकच म्हणत असत. वास्तविक हा नेटिव्ह शब्द प्रथमतः इंग्रजांनी भारतीयास--असभ्य, न सुधारलेले, बर्बर या अर्थी उपयोगिला. पण हा त्यातील गर्भितार्थ न समजून किंवा उपजून इंग्रजांचे देखोदेखी आमचे स्वतःचे लोकही स्वतःस नेटिव्हच म्हणवून घेत. प्रत्यक्ष राष्ट्रीय सभेच्या जुन्या लिखाणात हा शब्द भारतीय या अर्थी सरमहा वापरलेला आढळेल ! पण पुढे वंगभंगाच्या चळवळीत, आत्मसन्मानाच्या पहिल्या जागृतीत, या शब्दातील निंद्य भाव जाणवू लागला आणि भारतीयांनी स्वतःस नेटिव्ह म्हणून घेण्याचे साफ नाकारले. अर्थ पाहून शब्द योजिण्याइतका शहाणपणा लोक शिकू लागले.

पुढे लोकमान्यांच्या राष्ट्रीय पक्षाचा उदय होताच त्याचे शत्रु त्यास Extremists 'अतिरेकी' म्हणून संबोधू लागले. त्या शब्दातील निंदागर्भ खाच ज्यांच्या ध्यानात येईना ते स्वतःलाही I am an extremist म्हणून ऐटीने म्हणताना आढळत असत ! नंतर तोही शब्द जाणवू लागला आणि लोकमान्यादिकांचा पक्ष स्वतःला तरी 'अतिरेकी' न म्हणता राष्ट्रीय पक्ष म्हणवू लागला !

पण त्याहूनही आश्चर्याची गोष्ट ही की, भारतीय राजकारणात ज्या अेकाच पक्षाने काय ते आपले डोळे टिकाणावर ठेविले होते, जो शत्रूच्या मानभावीपणाने कधीही लेशमात्रही चळला नाही, फसला नाही, भुलला नाही, भ्रमला नाही त्या क्रांतिकारक पक्षाला भिक्षा, अर्ज, विनंत्यापासून तो जर्मनांस मारण्यासाठी त्या अिंग्रजांच्या वतीने लढू निघण्यापर्यंतच्या सर्व वेडाचारांनी भारलेले आणि कालपर्यंत 'स्वातंत्र्य शब्दाचा अर्थही मला कळत नाही' म्हणून स्वतःच सांगणाऱ्या गांधीच्या गोनावळीतील त्रिनधारणी आणि बिनमाथी लोकच 'माथेफिरू' म्हणत असत! अगदी कालपर्यंत म्हणत असत!

पण आता क्रांतिकारकास अराजक 'अनार्किस्ट' म्हणणारे स्वतःच त्या क्रांतिकारकाचे शिष्य होअून संपूर्ण स्वातंत्र्यवादी झालेले आहेत! आता अराजक असतील तर सारेच अराजक आहेत, कारण, परराज्य नको असे सारेच म्हणत असून तसा प्रयत्नही करण्यात येत आहे. तीच स्थिति 'माथेफिरू'पणाचा पूर्वी क्रांतिकारकांना माथेफिरू म्हणत जे 'अुदार अिंग्रजांचे' पाय चाटीत बसत, त्या सगळ्या किंकर्तव्यता विमूढ झालेल्यांची माथीही, अिंग्रजांच्या पुढे लाळ घोटीत थकून जाअून आणि अिंग्रजांच्या लाथा आणि यजीता खाअून शेवटी फिरावयाची ती फिरून गेली आहेत. क्रांतिकारकांत आणि त्यांच्यात आता माथेफिरूपणाचा फरक अुरला नाही. केवळ सहनशीलतेच्या, म्हणजेच स्पष्ट प्राकृतात कोडगेपणाच्या, परिमाणात काय फरक पडला असेल तेवढाच अुरला. तजस्वी सिंह अपमानाच्या नुसत्या खुणेसरशी चवताळून अुठला. अितर श्वापदे – ससे, सरडे – शतक शतक ब्रिटिशांच्या टेबलाभोवती तुकड्यातुकड्यासाठी गळा घाळून तोंडे वगाडून थकल्या नंतर मग वितरली मग किंचाळू लागली, भुंकू लागली. क्रांतिकारकांच्या ज्या ज्या वाक्यासाठी ते त्यास माथेफिरू म्हणत, त्या त्या सर्व वाक्यांची क्रांतिकारकाच्या पायापुढे शपथ घेअून आता ते सपच तीच भाषा बोलत आहेत. जवळ जवळ तसेच आचरण करीत आहेत.

अशा प्रकारे आता तो प्रसंग स्वतःवरच बेतल्यामुळे क्रांतिकारक पक्षाला अतिरेकी, अराजक किंवा माथेफिरू असे म्हणण्याचा हीनपणा — भ्याडपणा — भारतीय पक्षात तरी कोणी फारसा करीत नाही. त्या शब्दाचा अुपयोग अर्थ पारखून करण्याअितका शहाणपणा वा प्रामाणिकपणा बहुतेकांना दाखवू लागले आहेत. पण तरीही काहीजण मत्सराने तर काहीजण अंध सवयीमुळे क्रांतिकारकांना अत्याचारी म्हणण्याचा हीनपणा किंवा भ्याडपणा अद्यापही करीत आहेत.

आज क्रांतिकारक पक्षात आणि अितर प्रमुख राजकीय पक्षांत राजकीय मागणीत, भाषेत किंवा ताव्र अुद्वेगात फारसा फरक अुरला नाही. त्या सर्वांचेच ध्येयही पूर्ण स्वातंत्र्य हेच झालेले आहे. क्रांतिकारकांनी जे ध्येय तीस वर्षांपूर्वी घोषित केले त्याच ध्येयाच्या ध्वजाखाली, जे पूर्वी ब्रिटिशांना त्यांच्या गळ्यात

घातलेल्या पाळीव पदभानाच भूषण म्हणून मिरवीत, ते भूतदयेच्या भ्रमाचे भोपळ्याचे भोपे होऊन भटकत फिरणारे सारे पक्ष, आज अेकत्र झालेले आहेत आणि क्रांतिकारकांसह क्रांतिकारकांनीच आविर्भूत केलेल्या त्या दिव्य मंत्राच्या, त्या 'स्वातंत्र्य-लक्ष्मी की जय'-च्या गर्जना करीत आहेत आपल्या राष्ट्रमातेच्या हितार्थ आपली मागे झालेली 'गलती' भूल, भ्रम तत्काळ सुधारण्याची जी तत्परता आणि सरळता त्या आमच्या देशबंधूंनी दाखविली, त्याविषयी कोणाही देशभक्तास आनंदच होअील, पण ज्या अर्थी क्रांतिकारकांचे आणि त्यांच ध्येय अेकच असताही केवळ क्रांतिकारक त्या न्याय्य व दिव्य स्वातंत्र्यध्येयाच्या प्राप्तीस्तव अपरिहार्य असा सशस्त्र प्रतिकार करू अिच्छितात आणि अितर पक्ष नि शस्त्र प्रतिकाराने ते स्वातंत्र्य मिळवू पाहतात अेवढ्या फरकासाठी त्या क्रांतिकारकांस 'अत्याचारी' म्हणण्याचा शिवराळपणा अजूनही ते त्याग करीत आहेत, त्या अर्थी त्यांच्या ह्या हलकट मनोवृत्तीचा शक्य तितका तीव्र आणि वारंवार निषेध करीत राहिल्यावाचून गत्यंतरच नाही त्यांच्या मागच्या अनेक चुका जशा त्यांना क्रांतिकारकांच्या प्रतिकारामुळे सुधाराव्या लागल्या, तशी हीही चूक सुधारणे त्यांना भाग पाडलेच पाहिजे

सशस्त्र प्रतिकार करणाऱ्या क्रांतिकारकांच या 'अत्याचारा'च्या आक्षेपास काय अुत्तर असते त्याचा आम्ही नि पक्षपाती दृष्टीने प्रथमत विचार केला पाहिजे त्यांची साधने जशी आम्हांस आवडत नाहीत तशी आमची साधने त्यास सर्वस्वी आवडत नाहीत विशेषत आमच्या साधनांच्या समर्थनार्थ जो नीतिनियमांचा पाऊल पालहाळ आम्हा लावतो त्याचीच त्यांना घृणा वाटते आम्ही म्हणतो, आत्मशुद्धि – आत्मशुद्धीकरता अुपास करू या ! पण ते क्रांतिकारक म्हणतात, आत्मशुद्धि कोणाची ? ज्यांनी हा भारतवर्ष तरवारीच्या टोकाने पददलित करून ठेविला आहे त्याची ! हे महापाप त्यांनी केले – त्यांना अुपास घडले पाहिजेत स्वतःचा देश स्वतंत्र करू पाहणाऱ्या आम्हास पापच शिवत नाही तर शुद्धि कसली ! आम्ही म्हणतो आम्ही अनत्याचाराची शपथ घेतली आहे आम्ही अनत्याचाराने स्वातंत्र्य मिळविणार ! पण ते क्रांतिकारक म्हणतात तुम्हाला अत्याचाराची व्याख्याच कळली नाही आम्ही देखील अनत्याचारीच आहोत (आम्ही सशस्त्र प्रतिकार करीत असलो तरी तो न्यायाचे रक्षणार्थ आततायाचे दण्डनार्थ असल्यामुळे तो सदाचार आहे ! अत्याचार नव्हे आम्ही कोणाच्या देशावर शस्त्र-बळाने दरवडा घातला नाही जे आमच्या देशावर बळजोरी करीत आहेत ते अत्याचारी – आम्ही नव्हे ! आम्हास पाहिजे तर शस्त्राचारी म्हणा, पण अत्याचारी नव्हे ! कारण, अत्याचारी तो की जो दुसऱ्या निरपराध मनुष्याची हिंसा करतो दुसऱ्याचं घर दुष्टपणाने फोडतो, न की तो जो त्या घरफोडू दरवडेखोरास किंवा हत्यारीस सशस्त्र बळाने शासन देतो दुसऱ्याच्या देशावर बळाने राज्य करतो तो

अत्याचारी, न की तो जो स्वदेशास, वेळ पडली तर, सशस्त्र प्रतिकारानेही मुक्त करण्यासाठी झुंजतो !

क्रांतिकारक मार्ग कोणास मान्य नसले, सशस्त्र प्रतिकाराचा अवलंब आम्ही करावा असें कोणास वाटत नसलें, तरीही हिंदुस्थान देशास जे शस्त्रबळानेच पारतंत्र्यात ठेवीत आहेत त्यांच्याशी शस्त्रबळानेच जे झुंजू पाहतात त्या हिंदी क्रांतिकारकांस *अत्याचारी म्हणण्याचा मूर्ख गावराळपणा त्यांनी कां करावा ?* कारण त्यास केवळ शस्त्रधारणार्थ अत्याचारी म्हणताच देशस्वातंत्र्यार्थ झुंजणाऱ्या वॉशिंग्टन, मॅझिनी, लेनिन, अितकेच काय पण श्रीराम, श्रीकृष्ण, शिवाजी–फार काय अितिहासातील पूजनीय झालेल्या जवळजवळ साऱ्या व्यक्तींना अत्याचारी म्हणणें न्यायत: भाग पडेल. कारण ते सर्व आततायी शस्त्रबळाचा संरक्षक शस्त्र-बळानेच प्रतिकार करीत आले आहेत ! तात्त्विक दृष्ट्या पाहिलें तर क्रांति-कारकांना हिंसक म्हणून निंदिणाऱ्या लेखणीने वा जिभेने क्रांतिकारकांना हिंसक म्हणणाऱ्या तथाकथित अहिंसावाद्यांनाही हिंसकच म्हटले पाहिजे; कारण पिसाळ-लेल्या कुत्र्यास गोळी घालून ठार मारण्यास प्रोत्साहन देणे, गाअीलाही गोळी घालूनच ठार मारणें योग्य ठरवणें, माकडांनाही मारण्याचे कार्याला संमति देणें हें त्या गांधीप्रभृति अहिंसाचार्यांना न्याय वाटतें. जर्मनांना तर लढाअीतील क्रूरांतील क्रूर शस्त्रानीही ठार मारण्यासाठी ते बिनपगारी रिक्रूटिंग ऑफिसर बनण्यापर्यंत पाळी आली होती. तेव्हा ज्याना क्रांतिकारक शस्त्रधारक किंवा बलवादी आहेत म्हणून त्यांना अत्याचारी आणि हिंसक म्हणावयाचें असेल, त्यांनी तोच मान अहिंसावाद्यांनाही दिला पाहिजे. अत्याचारी भगतसिंह, हिंसक जतींद्रनाथ असें ते म्हणताच क्रांतिकारकही ' हिंसक अत्याचारी गांधी ' असें म्हणण्यास सोडीत नाहीत हें लाहोर काँग्रेसच्या मंडपात प्रत्ययास आलेंच आहे. अनेक वेळा क्रांतिकारकास हिंसक, अत्याचारी म्हणून संबोधण्याचा परिणाम हा झाला होता की, लाहोरच्या मार्गातून आणि स्टेशनवरून क्रांतिकारक तरुणांनी गांधीजींचें माहात्म्य अुपेक्षून

'अत्याचारी ' हे नाव देणे हा शिवराळपणाच नव्हे तर सत्याचे स्तोम माजविणाऱ्यांना लाज वाटावी असा मत्सरी ढोंगीपणा आहे कारण, ते लोक रामास हिंसक म्हणत नाहीत तर रावणासच म्हणतात, कृष्णास हिंसक म्हणत नाहीत तर कंसासच म्हणतात अर्थात त्यास हे कळण्याअितकी बुद्धि असते की, आततायी बळ हा अत्याचार होय, परतु आततायाचा प्रतिकार करणार बळ सदाचारीच समजले जाते भारतीय दंड विधानातही, म्हणजे प्रत्यक्ष अिंग्रजांच्या पिनल कोडामध्येही, स्वसंरक्षणार्थ अत्याचारीला मारण्याचे तत्त्व आणि भेद हा राजकीय विभाग सोडून अितरत्र मान्य केलेला आहे तेव्हा केवळ सशस्त्र प्रतिकारास ते सिद्ध होतात आणि शस्त्रबळाचा अंगीकार करतात म्हणून भारतीय क्रांतिकारकास अत्याचारी म्हणणे हा निर्भेळ मिथ्याचार होय

क्रांतिकारकाचे मार्ग त्याज्य म्हणा, त्यास पाहिजे तर क्रूर म्हणा, चुकलेले म्हणा, त्याचे मार्ग कोणी अवलंबू नयेत असे म्हणा परतु स्वदेशस्वातंत्र्यार्थ अत्यंत पवित्र हेतूने स्वार्थत्यागाची, प्राणत्यागाची, शौर्याची आणि पराक्रमाची पराकाष्ठा करणाऱ्या त्या क्रांतिकारक वीरास ' अत्याचारी ' ' हिंसक ' म्हणून हेटाळणाऱ्या ' अहिंसा (? ) वाद्यांनी येता जाता आपली जिव्हा विटाळून घ्यावी हे सत्याग्रही अत्याचाराचे अेक मासल्ेवाअीक अुदाहरण आहे )

क्रांतिकारकाचा देह आणि वाचा अिंग्लिश येयानटाच्या टाचानी अवरुद्ध केलेली असताना त्याच्या त्या अिंग्लिश अत्याचाराने भाग पडलेल्या मौनाचा लाभ घेअून पिंजऱ्यातल्या सिंहावर मूर्ख मुले थुंकतात तसे वाटेल त्याने थुंकत सुटावे यात न्याय तर नाहीच नाही पण साधा प्रामाणिकपणा देखील अुरत नाही क्रांतिकारकास जो अधिक शिव्या देअील, त्यास तितके दिवस बहुधा अिंग्रज सरकार बेड्या हातकड्या ठोकीत नाही त्याची वाचा त्याच प्रमाणात मोकाट सुटते, हा लाभ पदरात पाडून घेण्यासाठीच जर कोणी सशस्त्र क्रांतिकारकास हिंसक म्हणून म्हणण्याचा क्रम चालू ठेवील तर त्याच्या ह्या व्यवसायाचे आड आम्ही येअू अिच्छीत नाही परतु केवळ अज्ञानाने किंवा सवयीने किंवा अविचाराने जे क्रांतिकारकास अत्याचारी म्हणत असतील त्यांनी यापुढे तरी असा शिवराळपणा करू नये, (क्रांतिकारकाचे मार्ग तुम्हास मान्य नसतील तर नसोत तुम्ही तुमच्या मार्गाने जा पण तुमच्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी अधिकात अधिक पराक्रम आणि भव्यातील भव्य स्वार्थत्याग करणाऱ्या त्या देशवीरांना पाहिजे तर शस्त्राचारी म्हणा, बळवादी म्हणा शस्त्रवादी म्हणा पण अत्याचारी म्हणू नका ! आणि जर केवळ ते शस्त्रधारण करून त्यास अपरिहार्य वाटणाऱ्या रक्तपातास प्रवृत्त होतात म्हणून त्यास अत्याचारी म्हणावयाचे असेल तर मग अत्याचारी शिवाजी अत्याचारी गांधी अत्याचारी वॉशिंग्टन आणि हिंसक तुकाराम असे म्हणण्यास तरी सिद्ध व्हा ! कारण तुकाराम दुष्टांना म्हणतात की,

विंचु देव्हाऱ्यासी आला। देवपूजा नावडे त्याला।
तेथे पैजाराचे काम। अधमासी तो अधम॥

\+ \+ \+

# वीर युवक शशिमोहन दे

अेकेनापि सुपुत्रेण सिंही स्वपिति निर्भयम्।

असा आठवडा जात नाही, असा दिवस जात नाही की बंगालमध्ये कुठे ना कुठे तरी हिंदु कुमारिकांस आणि हिंदु कुमारांस कोणा ना कोणा तरी मुसलमान गुंडांनी राक्षसी अत्याचार करून पळवून नेले नाही! परंतु त्या हिंदु कुमारिका ज्या समाजातून पळवून नेल्या जातात तो हिंदु समाज स्वस्थपणे म्हणत आहे, 'मला काय त्याचे! बंगालमधील हिंदु कुमारिकांवर अत्याचार होत आहे— महाराष्ट्रात तर नाही ना? मग मला काय त्याचे?'

बंगालातील ज्या गावी प्रथम कोणा हिंदु अबलेस रात्री घरात छापा मारून अशा कोणी अधमांनी भ्रष्ट केला, त्या गावचे शेजारच्या गावी ती बातमी जाताच तेथील प्रत्येकजण म्हणत असे, 'त्या गावी ना? आग लागली त्या गावाला, मला काय त्याचे!' जेव्हा ती आग त्या दुसऱ्या गावीही लागली आणि त्यात हिंदु राष्ट्राची होळी पेटली तेव्हा तिसरा गाव म्हणाला, 'त्या दोन गावांची होळी झाली ना? असेल, मला काय त्याचे! माझ्या घरातील मुलंबाळं सुखरूप आहेत!'

अितक्यात त्या तिसऱ्या गावीही क्रूर आणि राक्षसी धर्मवेड त्यांच्याच घरच्या

जातीच्या शेकडो हिंदु स्त्रिया मुसलमान सरसहा भ्रष्टवीत गेले, तरी वरच्या जातीचे हिंदु असल्या गुंडगिरीच्या प्रकरणात लक्ष घालणे म्हणजे आपल्या सभ्य-पणास लांछन होय, असे समजून म्हणत बसले की, 'मला काय त्याचे !' पण आपल्या स्वधर्माच्या त्या खालच्या जातीतील स्त्रियांचा — आपल्या भगिनींचा — अपमान उघड्या डोळ्यांनी पाहण्याच्या या घोर पापाचे शासन निर्घृण काळाने अती त्या निर्लज्ज सभ्यपणासही देण्यास सोडले नाही ! आपल्या हिंदु शेजाऱ्याच्या पत्नीस परधर्मीय असुर छळीत असता दारे लावून बसणाऱ्या 'मला काय त्याचे'— वाल्या सभ्य गृहस्थाच्या पत्नीवरच आज प्रसंग कोसळत आहे त्या पळवून नेऊ दिलेल्या असभ्य स्त्रियांच्या पोटी झालेल्या संततीने सारखी वाढत गेलेली मुसल-मानांची संख्या शेवटी सभ्यांच्याही शिरावर नाचू लागली ! अशा वयात अेक वीर युवक बंगाल्यात जन्मास आला त्याचे नाव शशिमोहन दे तो सिल्हटचा निवासी तो वयाने अजून पुरता अठरा वर्षांचा देखील नाही ! पण अठराशे वर्षांत हिंदु जाति जे शिकू शकली नाही, ते तो या अठरा वर्षांत शिकला ! जो तो हिंदु मला काय त्याचे म्हणत होता गेल्या तीन वर्षांत प्रत्येक दिवशी कोणा ना कोणा तरी हिंदु कुमारिकेवर, हिंदु अबलेवर, कोणी तरी अधम मुसलमान बलात्कार करीत आला आहे पण मेल्या आओने दूध प्यालेले निर्लज्ज सभ्यपण अजूनही म्हणत होते की, 'मला काय त्याचे !' ते 'अहिंसावादी' होते, त्यांना स्वराज्य मिळवायचे होते ! त्यांच्या आया बहिणी मुसलमान नेत तेव्हा ते म्हणत, 'आम्ही स्वराज्य मिळवीत आहोत ! आम्हाला काय त्याचे !' अशा स्थितीत हिंदु कन्यकांवर हात टाका-वयास सवकलेला सिल्हट जिल्ह्यातील अेक मुसलमान जमिनदार फैयाजअल्ली हा आजूबाजूच्या कित्येक गावांत अेखाद्या पिसाळलेल्या कुत्र्यासारखा जो हिंदु दिसेल त्याला चावत चालला हिंदु कन्यकांना त्या गुंडाचे भीतीने अेकटे दुकटे मार्गातून फिरण्याची चोरी झाली ! जो जो तो या पापकर्मात पटाअीत होऊ लागला तो तो मुसलमानांतील पाजी लोकांत तो 'गाजी' म्हणून मान्यता पावू लागला ! कारण, हिंदु कन्यकास बलात्काराने भ्रष्टविणे म्हणजे अेक शतकृत्य करणे होय, मुसलमान जाति वाढविणे होय, मक्केची अेक यात्रा करण्याचे पुण्य जोडणे होय, अशी काही मुसलमानांची राक्षसी वृत्ति झालेली आहे हे केवळ गेल्या दोन तीन वर्षांतील न्यायालयांतून चाललेल्या अनेक खटल्यांवरूनही सिद्ध होण्यासारखे आहे ! असा तो पाजी गाजी फैयाजअल्ली चंदेरचंद्र, राधाचक्र अित्यादि गावी अनेक हिंदु कन्यकांना भ्रष्टवीत आणि पळवून नेत असता त्यास नेहमीप्रमाणे बहुतेक हिंदु 'मला काय त्याचे !' म्हणून म्हणणारेच मिळाले पण अेक दिवस मात्र त्याला अेक हिंदु वीर युवक असा भेटला की, ज्याने या मुसलमान गुंडास हटकले ! त्या वीर युवकाने त्या गुंडाच्या दुष्कृत्याम अैकून मनात म्हटले, थांब दुष्टा ! जी जी हिंदु स्त्री या बंगाल्यात आहे, या हिंदुस्थानात आहे ती ती माझी धर्माची बहीण आहे !

तिचा अपमान तो माझ्या बहिणीचाच अपमान !' त्या वीर युवकाने 'मला काय त्याचें' म्हणून पाठ फिरविली नाही; तर तोंडास तोंड देऊन म्हटलें, 'मला काय त्याचें? नाही ! तर मला त्याचें सर्व काही आहेच आहे !

'हिंदूच्या कोणत्याही स्त्रीचा अपमान तो माझ्या बहिणीचाच अपमान असून त्याचें शुभाशुभ मला आहेच आहे ! हिंदूचें कोणीही अपत्य कुठेही जन्मलें तरी मला सुवेर आहेच आहे; कारण त्याने माझे कुटुंब वृद्धि पावते ! कोणीहो हिंदु स्त्री वा पुरुष हिंदुत्वास कुठेही मुकला — मेला की, मला त्याचें सुतक आहेच आहे; कारण त्यायोगे माझ्या रक्ताचा माझा अेक भाऊ मला अंतरतो ! जेथे कोठें कोणा हिंदूचा छळ होत असेल तेथे तेथे तो माझाच छळ होत आहे. मला त्याचें दुःख होणार ! मी त्याचा प्रतिशोध — 'सूड' घेणार !'

अशा प्रवृत्तीचें काहूर ज्याच्या चित्तांत माजलें आहे, असा तो वीर युवक, तो अठरा वर्षांचा तरुण, अेक दिवस मार्गाने चालला असता, अेका सामान्यशा हिंदूचे घरात त्याने आरडाओरड अैकिली. तो किंचित् वळला, तों कोणा दीन अबलेचें करुणाक्रंदन कोणा नरपिशाच्चाच्या भेसूर भेवडावण्यात मिसळलेलें त्याला अैकू आलें. तो घरात डोकावला; तो त्या आजूबाजूच्या गावात कुलीन हिंदूवधूना भ्रष्टवीत माजलेला तो राक्षस, जमीनदार फैयाजअल्ली, अेका विवाहित हिंदु कुल-वधूस फरफर ओढीत हाणीत तिच्यावर बलात्कार करू पाहात असताना त्याला दिसला ! तें घर शशिमोहनच्या ओळखीचें नव्हतें; ती मुलगी शशिमोहनची बहीण, वा भावजय वा पुतणी — कोणीही लागत नव्हती. पण ती हिंदूची मुलगी होती. आणि शशिमोहनही हिंदच होता. म्हणनच तें घर त्याचें होतें: ती हिंद

तारुण्याने आत्ताच वाढून ठेवले आहे, मी त्या पानावरून तसाच कसा अुठू ! असा काहीही शहाणा पढपणा मनास शिवू न देता अेका हिंदु कन्येस अेक मुसल्मान बलात्काराने भ्रष्टवीत आहे हे पहाताच पूर्वी देवानी राहूस छाटले तसे शशिमोहनने फैयाजला छाटून टाकले ! ती कन्यका ग्रहणातून सुटलेल्या चंद्रकलेसारखी म्लान स्मिताने त्या वीर युवकाचे आभार मानती झाली

'मला काय त्याचे' ह्या पढतनातील मूलमंत्र अेका हिंदून पायाखाली तुडविला हे पहिले महान् आश्चर्य पाहून आजूबाजूच्या मुसल्मानास भयंकर वचक बसला मुसल्मानी गुंडगिरी शेपूट घालून घरादारात लपू लागली, परंतु ह्या घटनेतील दुसरे महान आश्चर्य ते पुढेच होते कारण शशिमोहनला पोलिसानी धरले तेव्हा तो फाशी जाणार हे बहुतेक गृहीतच होते (नागरिकांच्या जीविताचे आणि धर्माचे जे संरक्षण आपण करू शकत नाही ते अितरानी केलेले पोलिसास आणि सरकारास सहसा खपत नसते त्यायोगे त्याची अकर्मण्यता अधिकच अुघडी पडते) त्यातही अेका हिंदून शस्त्र अुपसून दुसऱ्या हिंदूचे रक्षणार्थ धावून यावे ही वृत्ति तर त्यास बहुधा अगदीच वावडी असते कारण अेकदा का ही वीरवृत्ति हिंदूंच्या अंगी बाणली तर मग ह्या हिंदुस्थानात जे जेथे आहेत ते तेथेच कसे राहू शकतील ? म्हणून आजपर्यंतच्या परकीय सत्तेच्या धोरणाप्रमाणे त्या हिंदुयुवकास भयंकर शिक्षा होणार हे अुघड होते त्याप्रमाणे पहिल्या न्यायालयात ती झालीही मृत्यू-सारख्या कठोर शिक्षेलाही न भिता शशिमोहनने सांगितले की, (माझ्या हिंदु धर्माच्या बहिणीला राक्षसी बलात्काराचे हातून सोडविणे हे माझे, अेका हिंदूचे, कर्तव्यच होते जेव्हा अितर कोणतेही साधन वा साहाय्य हातात अुरले नाही, तेव्हा शस्त्र अुपसून त्या दुष्टास ठार करण्याचा धार्मिक अधिकार तर मला होताच होता पण नैर्बंधिक (कायदेशीर) अधिकारही मला होता !) शशिमोहनच्या ह्याच विधानाचे आधारावर हायकोर्टात अपील झाले आणि केवढे आश्चर्य की हिंदूस पाण्यात पाहणाऱ्या आणि मुसल्मानास चिथावणाऱ्या या दिवसातही शशिमोहनला हायकोर्टाने निर्दोषी म्हणून सोडून दिले !

अितकेच नव्हे तर अेका अबलेवर अेक दुष्ट राक्षस क्रूर बलात्कार करीत असता, अितर पुरुष तिच्या साह्यार्थ धावून जाण्यास भीत असता आणि पोलिसांचे साह्य घेण्याची संधि अुरली नसता शशिमोहनने ज्या साहसाने आणि चपळाअीने त्या अधम फैयाजअलीस ठार मारून त्या अबलेची सुटका केली त्या साहसाचे आणि शौर्याचे नैर्बंधिक दृष्टयाही हायकोर्टाने स्पष्ट अभिनंदन केले !! कारण (भारतीय दंडविधानाच्या (अिंडियन पीनल कोडच्या) ९६ ते १०० पर्यंतच्या कलमात हें स्पष्टपणे सांगितले आहे की निर्बंधाच्या (कायद्याच्या) दृष्टीनेही प्रत्येक नागरिकास आपल्या स्वतःच्या किंवा दुसऱ्या नागरिकाच्या नैर्बंधिक अधिकाराचे आणि देहाचे संरक्षण करण्याचा पूर्ण अधिकार आहे त्यात दिलेले अपवाद मात्र प्रत्येक

नागरिकाने विचारपूर्वक टाळावे नीतिदृष्टीने तर ते कर्तव्यच आहे ) शशिमोहनला त्या अबळेच्या देहावर होणाऱ्या दुष्ट आणि अधम बलात्कारापासून तिची सुटका करण्याचाही अधिकार होता आणि त्या नैर्बंधिक (कायदेशीर) आणि धार्मिक अधिकाराचा अुपयोग करू जाताच फैयाजअल्लीशी जुपलल्या झुंजीत त्याचा स्वत चा प्राणही संकटात पडल्याने स्वसंरक्षणाचा दुसरा अधिकारही निर्बंध-दृष्ट्या प्राप्त झाला होता निर्बंधाच्या कक्षेत अुभे राहून त्याने फयाजशी झुंज घेतली आणि अपरिहार्य आवश्यकता म्हणून हायकार्टाने त्यास सन्मानासहित सोडून दिले

( वास्तविक पाहता शशिमोहनने निर्बंधाच्या घटपटादि खटपटाचा विचार तेथे मुळीच केला नव्हता निर्बंधाचा आज्ञा किंवा सवलत म्हणून नव्हे तर निसगप्रवृत्ति म्हणून त्याने त्या दुष्टास छाटून टाकिले अेका अनाथ हिंदु कन्येस गाआसारखी फरफरा ओढीत आणि हाणीत तिच्यावर अेक अहिंदु बलात्कार करीत आहे हे पाहताच त्याचे हिंदु रक्त अुसळले आणि प्रवृत्तीसरशी तो वार तिच्या साहाय्यार्थ धावून गेला ही त्याची 'अंत करण प्रवृत्ति च त्याला 'प्रमाण ' होती तो फाशी गेला असता तरी त्याने केले ते चांगलेच केले असे तो म्हणाला असता ते नैतिक कर्तव्यच होते हायकोर्टाने अशा सत्प्रवृत्तीचे समर्थन करून नैतिक कर्तव्यास नैर्बंधिक अधिकाराचाही दुजोरा दिला याविषयी कलकत्ता हायकार्टाचे आभार मानावे तितके थोडेच आहेत ) अेका युवकाचे प्राण वाचवून हायकार्टाने आमच्या हिंदु जातीवर खरोखर अुपकार केले आहेत हे वीर युवक शशिमोहन प्रत्येक हिंदु तुला

# आंध्रप्रांतीय भारतवीर श्रीराम राजू

(दुर्दैवी काळात काही सद्गुण निंदिले जातात स्वातंत्र्यकालातील गुणांना पारतंत्र्यकालात अपराधाचे स्वरूप येते तेव्हा परिस्थितीच्या शासनकक्षेत फिरत राहणाऱ्या आम्हा कूपमंडूकांना या स्वातंत्र्य-वीरांची कृत्ये विपर्यस्त स्वरूपात दिसावी हे स्वाभाविकच नव्हे तर अपरिहार्य आहे असे असले तरीही कधी कधी परिस्थितीच्या नैर्बंधिक (कायद्याच्या) दडपणाखाली चेपले जाणारे मन त्या दाबाखालून निसटते व निरपेक्ष वस्तुमूल्य दाखविणाऱ्या गुणज्ञतेच्या पवित्र वातावरणात काही काल का होईना, संचार करू लागते मनाला शिक्षा कोण करणार व कशी करणार? ज्याचे मन असते त्याला सुद्धा ते आवरता येत नाही त्याला झुकांडी देऊन वा बलात्काराने खाली दडपून टाकून मन स्वतः मोकळे होते आणि त्याला दडपू पाहणाऱ्या दुबळ्या प्रयत्नास जणू वाकुल्या दाखवीतच उंच उंच पवित्र वातावरणात उडून जाते )

आमचेही असेच झाले श्रीराम राजूचे चरित्र कोठेसे वाचावयास मिळाले आणि मनाने भरारी मारण्याला आपल्या कल्पनेचे पंख विस्फारले

त्याला आम्ही म्हणालो, 'अरे! श्रीरामराजू वडखोर साम्प्रतच्या राजसत्तेने बनविलेल्या निर्बंधाप्रमाणे तो अपराधी व या अहिंसायुगाच्या प्रवर्तनकाली त्याला अत्याचारी म्हणतात अर्वाचीन महात्मे त्याला वीरवृत्त पण दिशाभूल झालेला वेडापीर समजतात आणि राजसत्तेचे न्यायाधीश कोणी त्याच्यामारख्याला धरून दिले वा धरून आणले तर प्राणदंडनीय ठरवतात अशा या अपराधी, अत्याचारी, वेडापीर व दंडनीय श्रीरामराजूला तू डोक्यावर काय घेऊ पाहातोस?'

## तो अपराधी नाही

पण! क्षणापुरतीच का होईना त्या स्वतंत्र वातावरणातील कमलीशी उडणारी व चढणारी झुळूक लागून उंच भराऱ्या मारण्यास उद्युक्त झालेले मन आम्हाला वेडावीत म्हणू लागले - अरे वेड्या! श्रीरामराजू जितका व जसा बंडखोर तितकाच व तसाच इंग्लंडच्या हातातून अमेरिका हिसकावून घेणारा जॉर्ज वॉशिंग्टन - अथवा इंग्लंडच्या हातून आयर्लंड स्वतंत्र करू पाहणारा डी व्हॅलेरा - प्रत्यक्ष इंग्लंडच्या राजाच्या मानगुटीस बसून त्याला फासावर पाहू निघालेला क्रॉमवेल हेही बंडखोरच! मग त्यांची स्तुतिस्तोत्रे गातोस - त्यांना स्वातंत्र्यवीर म्हणतोस आणि श्रीरामराजूमध्येच तुला बंडखोरी दिसते? पारतंत्र्य-सुलभ दास्यवृत्तीच्या नैर्बंधिक भयासाठी का तू त्याला बंडखोर ठरवणार? तू वाटल्यास त्याच्या श्रेष्ठतेकडे डोळे उघडून पाहू नकोस असाच स्वार्थ राहा पण तुझ्या

---

श्रद्धानंद २८ मे १९२९

देशबांधवांचा उद्धार करील' ही त्याची तपवाणी गांधींच्या कानी त्यांनी पुष्कळ वेळा घातली. गांधीजी म्हणतात, 'हाय हाय! त्या शब्दाची महत्ता त्या वेळी मला किंचितही कळली नाही!'

पुढे आपला श्रीराम हा करमापूरला शिकण्यास गेला. तेथे गेल्यावर त्याला ज्योतिष-शास्त्र, हस्तसामुद्रिक व अश्वारोहण कला (घोड्यावर बसणे) या शास्त्रांची गोडी लागली. त्याचे लहानपणाविषयी याहून विशेष काही माहिती नाही.

## संन्यासी श्रीराम

१९१७ चे आरंभी त्यांनी संन्यास घेतला व १९१८ मध्ये आग्नशातील 'बेजगी' भागात मायारी डोंगरात ते तपस्या करू लागले. तपस्येनंतर डोंगरात त्यांना आपले निवासस्थान केले. तेथील लोकांत त्यांच्याविषयी फार पूज्यबुद्धि वाटली आणि स्वाभाविकतः व स्वयंस्फूर्तीने ते लोक श्रीरामच्या भजनी लागले. दूध व फळे हा व अशनाच त्याचा आहार होता. १९२० चे सुमारास ते नाशिकच्या यात्रेला चालत गेले.

देवालयातच निवासस्थान बनवून श्रीराम आपले तपानुष्ठान करी. प्रत्यही त्याच्या दर्शनासाठी खूप गर्दी होओी. श्रीरामच्या स्फूर्तिदायी व अुद्दीपक अुपदेशानी त्यांची मनें मंत्रमुग्ध होत. श्रीरामच्या आध्यात्मिक अुपदेशाला देशभक्तीचें अनुपान योजलेले असे. त्याच्या अुपदेशामृताचें पान लोक मोठ्या आतुरतेने करीत. पंचवीस वर्षे वयाचा हा ज्वलत देशभक्त सन्यासी आपल्या ओजस्वी वाणीने तेथील अशिक्षित समजल्या जाणाऱ्या कोया जातीच्या लोकांवर काय परिणाम घडवून आणीत असावा बरे ? (आमचे 'सुशिक्षिता'चें 'सुशिक्षण' त्यांना भावनाहीन, नि:सत्त्व व म्हणून कर्मशून्य बनवीत असतें. परतु हे अशिक्षित परतु पौरुषसपन्न लोक भावनाबलाने युक्त असतात. केवळ त्यांच्या अत:करणाला जागविणाराच पाहिजे. ही मंडळी चेतणे कठीण असते, पण अेकदा ते तापले, कर्मशक्तीच्या तेजाने त्याच्यात अेकदा खळबळ अुडाली की, मग त्यांना हात लावणाराचा हात भाजून निघाल्यावाचून राहणार नाही.) हिंदुस्थानवर केवळ पाशवी बळाच्या जोरावर राज्य करू पाहणाऱ्या सत्ताधारी पक्षाला या गोष्टीने अस्वस्थ केलें. लागलीच 'हा पाहा क्रांतिकारी — भयकर राज्यद्रोही व साम्राज्याचा शत्रु श्रीराम येथे प्रकट झाला आहे. तो नष्ट झालाच पाहिजे.' अशी घोषणा झाली आणि लागलीच जानेवारी १९२२ मध्ये 'राजू' फितूर फैलावीत आहे अशी बोंब अुठली. आणि त्याच्या 'असहयोगी'-पणाचा पुकारा झाला. पूर्व गोदावरी जिल्ह्याचा पोलिस सुपरिटेंडेंट तेथे धावत गेला. त्याने काय पाहिलें ? 'श्रीराम' आपल्या अनुष्ठानात मग्न आहे. विजगापट्टण जिल्ह्यातील नृसिंहपट्टण येथे सहा आठवडे श्रीरामला दृष्टिबद्ध कारावासात (interned) ठेवलें व नतर सोडून दिलें. तरीही त्याचे मागचा पोलिसी ससेमिरा सुटला नाही. श्रीरामनें तेथील डेप्युटी कलेक्टर फझलुल्ला याला हा पोलिसी त्रास चुकविण्याचा अर्ज केला. पुढें दोघाची गाठ झाली असें म्हणतात. त्या डेप्युटी कलेक्टराने मद्रास सरकारच्या श्रीरामला अेंशीं विघे भूमीचा तुकडा देअून शेती करण्याकरिता पुष्कळ सुलभता करून देण्याकरिता लिहून पाठविलें व मद्रास सरकारने खरोखरी ती देणगी सम्मतही केली आणि त्या देशभक्ताला अेक शेतकरी बनवण्याचा प्रयत्न झाला.

## रोजन्सीतील असंतोष

पण ! सर्व हिंदुस्थान ब्रिटिश सत्तापाशाचे हातून सोडवून स्वतत्र करण्याच्या महत्त्वाकांक्षेच्या प्रखर अग्निज्वालेने भडकणारे होमकुंड श्रीरामच्या देशभक्त अंत:करणात पेटलेलें होतें. अर्थात श्वानवृत्तिहीन मनुष्यप्राण्याना लागूलचालन करण्यास लावणारा ३० विघे भूमीचा तुकडा या महदाकांक्षी वीरवृत्त पुरुषाला कसा वश करू शकणार ? त्याने गीता वाचली होती. त्याला स्वधर्म कळला होता. त्या प्रदेशातील वस्तुस्थिति त्याला अनुकूल होती व तिचें त्याग फार साह्य झाले. त्याने

भ्याडपणाला झाकून त्याला बंडखोर कां म्हणतोस? तो बंडखोरही नाही. व जागतिक गुणग्राहकत्वाच्या निकषाने तो अपराधीही ठरू शकत नाही.)

आता तू त्याला अत्याचारी म्हणतोस? पण यात तू स्वतः अत्याचारी ठरतोस. रावण, कंस, कौरव, मोगल–मुसलमान आदिक दुसऱ्याला लुबाडणारे–लुटणारे हे जेव्हा दुसऱ्याचा जीव घेतात वा जीव घावयास अुद्युक्त होतात तेव्हा त्यास अत्याचारी म्हणतात; ते अत्याचारी असतात. पण त्या अत्याचाऱ्यांना–त्या हिंसक व परस्वापहारी अपराध्यांना लोककल्याणासाठी अपरिहार्य व आवश्यक म्हणून प्राणदंड देणाऱ्या श्रीराम–श्रीकृष्ण–श्रीशिवरायादि लोककल्याणेच्छाप्रेरित लहानमोठ्या लोककल्याणकर्त्यांना अत्याचारी ठरवणें म्हणजे शब्दाचा अर्थ न कळणारा मूर्ख मी आहे असें म्हणून घेणें आहे. हें तुझें अहिंसापुराण व अत्याचारशास्त्र तुझ्या त्या सडक्या मौर्ख्यातच कोंडून ठेव आणि सत्तावली न्यायाधीश, साधलें तर अशाना प्राणदंड देतात, म्हणून ते अन्यायी व अपराधी म्हणावयाचें तर मग यशस्वी जॉर्ज वॉशिंग्टन वा डी व्हॅलेराही अपयशी झाले असते तर अपराधी ठरले गेले असते, म्हणून त्यांना तू आता मानायला नको होतें. पण तू त्याना तसें म्हणू शकत नाहीस. तेव्हा श्रीराम राजूलाही जास्त यश मिळालें नाही वा यश मिळत नाही म्हणूनच केवळ अपराधी ठरविणारा तू न्यायप्रिय सत्यभक्त नव्हेस—केवळ अेक नेभळा, भित्रा, पौरुषहीन पण धूर्त व भोंदू आहेस!')

असें म्हणत तें माझें मन मला लायाडीत व हिणवीत अुंच अुडून गेलें. त्याच्या निरीक्षणकृत्यातील विचारपरंपरेने वर्णित श्रीरामराजूचें वर्णनात्मक चरित्र आम्ही वाचकांपुढे मांडीत आहोत. अर्थात् त्यानी केलेली कृति अितरांनी करावी की करू नये हा मुद्दा अगदी निराळा आहे. येथे केवळ त्यांचें चरित्रच कथन केलें आहे तेव्हा त्याच्या अनुकरणाचा प्रश्नच अुद्‌भवत नाही.

## परंपरा तीच

भारतमातेचा कुसवा धन्य करणारे वीरात्मे या भारतवर्षात सर्व प्रांतामधून जन्म घेअून या अनंत संकटमग्न दुर्दैवी हिंदु जातीची सेवा करीत असतात. ही अेवढी अेकच गोष्ट भावी कल्याणाच्या निश्चित आशेचा स्फूर्तिदायी किरण निराशेने निस्तेज झालेल्या अशा नेत्रात आल्हादाचें तेज चमकवू लागते. आज आम्ही अशाच अेका वीर पुरुषाचे—जो अद्याप आपणामधून स्मृतिसृष्टीच्या पडद्याआड मृत्यूच्या द्वाराने निघून जाअू शकला नाही—अशा धन्य वीराचें चरित्र देणार आहोत. श्रीरामाने जगाधील रावणी अत्याचार रत्नाच्या महानदात बुडवून टाकला. पांडवांनी कौरवी अत्याचाराला मृत्यूच्या जबड्यात भिरकावून दिलें; महाराणा प्रतापाने अिस्लामी मत्तेला, निराशेच्या भयंकर वणव्यात स्वतः होरपळत जात असताही, अेक नाही दोन नाही सतत अेकवीस वर्षे सिंहपराक्रमाने धक्का दिल्या व

मरणांतही नतमस्तक न होता हिंदु जातीच्या गौरवाचा यशोध्वज स्वातंत्र्या-काक्षेच्या अुच्च आकाशात फडकत ठेवला, श्रीशिवरायाने त्या मोंगली रावणसत्तेला धूळ चारीत हिंदुपदपादशाहीचा विजयप्रासाद बांधला, श्रीसंभाजीरायाने त्या हिंदु-वंशाचे स्वातंत्र्यप्रासादाला आपल्या तेजस्वी व पौरुषसंपन्न क्षुण्ण रक्ताने अुदित सूर्याच लाल भडक चमकते तेज चढविले छत्रपति राजारामाने अेकवीस वर्षांचा प्राण देतांघेतां युद्धयज्ञ करून तो स्वराज्यप्रासाद अभंग ठरविला, बाजीराव, नाना-साहेब, भाअूसाहेब, माधवराव, नाना फडणीस, शिंदे वीर-थोडक्यात अखिल महाराष्ट्रवीरांनी त्या स्वराज्याला साम्राज्यपदाचे वैभव मिळवून दिले दुर्दैवाने फेऱ्यात सापडून त्या कोसळल्या मंदिराला पुन्हा अुभवू पाहणाऱ्या या भारत-भूमीला पुन्हा प्रतापगिरीच्या भाग्यासनावर प्रस्थापित करण्याकरिता झगडत-लढत-मरत राहणाऱ्या नानासाहेब लक्ष्मीबाअी, तात्या टोपे, वासुदेव बळवंत आदिक वीरपुंगवांनी या जळत्या भारत्या कार्यक्षेत्रात आत्माहुति दिल्या आंध्र प्रांतीय भारतवीर श्रीराम राजू हा पुरुषही त्याच अखंड भारतीय वीरपरंपरेतील अेक नि सीम भक्तमणि आहे।

## बाळपण व शिक्षण

या भारतभक्ताचा जन्म आंध्र प्रांतात अेका सन्मान्य क्षत्रिय घराण्यात मगल्लू गावी झाला हे गाव पश्चिम गोदावरी जिल्ह्यात आहे ज्या वीर पुरुषांनी जगातील मोठमोठ्या क्रांत्या घडवून आणल्या, मोठमोठाली साम्राज्ये स्थापिली, आपापल्या देशांना पारतंत्र्याच्या घोर नरकातून अुद्धरून स्वातंत्र्याच्या स्वर्गाचे धनी बनविले अशा पुष्कळ महापराक्रमी थोर पुरुषांप्रमाणेच हा आपला श्रीराम आधु-निक दृष्टीच्या विद्येने अलंकृत (?) झालेला नाही निरनिराळ्या स्थळी शिक्षण घेत घेत हा पुरुष कसा तरी पाचवीपर्यंत 'विद्या' शिकला याला गायनकला चांगलीच अवगत असून तो होतकरू कवीत गणला जात होता त्या सुमारासच याच्या अंगातील भावी महनीय गुणाचे बीज स्पष्ट दृग्गोचर होअू लागले या गुण चिन्हावरून तो अेक वेडाच्या थराला पोचलेला जाणारा मस्त आहे अशी परीक्षा

ती वस्तुस्थिति आपल्या भारतमातेच्या हितकार्यी लावून घेण्यास कमी केले नाही. त्याने गुडेम तालुका आपल्या कार्याचे क्षेत्र बनविले. त्या रीजन्सीमध्ये अितर स्थला-प्रमाणे सरकारी कारभार नाही, तेथे 'जबरदस्ती' कारभार असतो. तेथे सताल परगण्यात तेन नाव आहे. त्या परगण्यात डायरन सत्ता चालवीत होते. त्या अरण्या-तील सताळादि लाकडांचे सर्व हक्क सरकारने हिरावले होते. त्यांना स्वयंपाक करण्यास लाकडे सुद्धा वापरता येअीनात. पूर्वीप्रमाणे त्यांच्या गाअींना चारा चारता येअीना. या व अितर अशाच अत्यंत अन्याय्य गोष्टींमुळे त्या रीजन्सीत भयंकर असंतोष माजला होता.

## लोकसंग्रह

श्रीरामला क्रांतीचे बीज पेरण्याला ही अुत्कृष्ट भूमि मिळाली. त्यांनी अुत्कृष्ट अनुयायी व समर्थ कार्यकर्ते मिळविले. लोकांत स्वराज्याची तीव्रतर अिच्छेची ज्योत पेटली. श्रीराम राजूंनी त्यांच्या सामान्य आकांक्षांना अेकदा महदाकांक्षेचे पेटते स्वरूप दिले. श्रीराम राजूवर तेथील लोकांची अत्यंत निष्ठा होती आणि ते प्राणपणाने त्यांच्या नेतृत्वाखाली स्वराज्यार्थ जीव देणारे प्रयत्न करण्यास अेका पायावर सिद्ध होते.

## स्वराज्यसंपादनाचा मार्ग

तो जेथे जेथे जाअी तेथे ब्रिटिश साम्राज्यसत्तेचे पोलिस आपल्या जिवाच्या भयाने शस्त्रास्त्र, बंदुका व दारूगोळा—तेथेच सोडून पळून जात. अेका अनत्या-चारी असहयोगीने 'तू स्वराज्य जे मिळवणार ते काय मार्गांनी?' असे विचारताच तो म्हणाला 'या साम्राज्यशाहीशी युद्ध केल्यावाचून स्वराज्य कधीही मिळणे शक्य नाही' त्याला त्या अनत्याचारी स्वराज्य संपादकाने विचारले, 'हे शक्य आहे काय?' 'अर्थात शक्य आहे! मजजवळ माणसांची वाण नाही. केवळ दारू-गोळाच काय तो मिळणे कठीण भासते'

धान्यसंग्रह, अशा प्रकारच्या सिद्धतेने, आधुनिक शस्त्रास्त्रांनी सुसज्ज असलेल्या साम्राज्यसत्तेच्या विपक्षाशी श्रीराम झगडत होता हा विषम झगडा होता आणि तरीही हा धाडसी वीर आपल्या दैवी साहसाच्या व निस्सीम प्रेमनिष्ठ असणाऱ्या अनुयायांच्या बळावर युद्धाचे डाव खेळत होता

## ब्रिटिश सिंहाशी धडका

अत्यंत कुशल सेनापति शत्रूला हानिकर व स्वपक्षाला अनुकूल असे युद्धक्षेत्र निवडील त्याचप्रमाणे या स्वराज्यसंपादनोत्सुक श्रीरामाने केले त्याने ब्रिटिश सिंहाला सहा धडका दिल्या व प्रत्येक धडक्त ब्रिटिश सेना तुकडीला किंचाळा-पयास लावले तिला धूळ चारली त्या प्रांतातील सेनाबळ पुरेसे होईना म्हणून मलबारहून सनिक तुकड्या आणाव्या लागल्या आणि आसामहूनही निवडक सैन्य आणावे लागले पेडवमल गावाच्या चकमकीत अिंग्लिश सैनिकांच दोन युरोपियन अधिकारी ठार झाले व अितर बरेच घायाळ झाले शेवटच्या सातव्या व आठव्या चकमकीत श्रीरामावर अचानक घाले घालून त्याला मोठ्या शर्थीने या आक्रमकाचे हातून लढत, झगडत निसटून जावे लागले आणि त्या अेका शूर, धाडसी, सैन्यचालनाकुशल राष्ट्रप्रेमी तरुण संन्यासी वीराला या विषम झगड्यातून निराशेच्या अंधकारात विलुप्त व्हावे लागले तरीही त्याच्या या स्वदेशप्रेमी स्वार्थत्यागाच्या दिव्य अुदाहरणाने कोणाच मनात सादर कौतुकाने प्रेमाश्रु अुभे राहणार नाहीत ! !

श्रीराम ! ! तुझ्या अंतःकरणाच्या कळकळीने आपल्या मातृभूमीच्या अुद्धारार्थ तू आपल्या सर्वस्वाची आहुति देत प्रयत्नांची पराकाष्ठा केलीस ! तुझी तू शर्थ केलीस ! अितकेच नव्हे, तर तू आपल्या दिव्य स्वार्थत्यागाच्या दीप्तिमान अुदाहरणाने आम्हा दुबळ्यांना हिणविलेस ! श्रीराम ! तू देवाच्या मांडीवर कृतज्ञतेच्या कुरवाळण्याने सुखी होण्यापूर्वी आम्हा हिंदु जनांचे हाताने ही मातृभूमि स्वतंत्र झालेली पाहण्याचे समाधान तुला लाभो ! ! स्वतंत्र हिंदुस्थानातील भावी अितिहासकारांनी तुला विसरू नये म्हणून, हे देशवीर श्रीराम तुझ्या पवित्र व स्फूर्तिदायक स्मृतीचा हा धागा, या लेखनाने घट्ट वळून ठेवीत आहोत ! तुझे नाव चिरस्मरणीय होवो !

\+ \+ \+

# देशवीर विष्णु गणेश पिंगळे

तळेगांवच्या शाळेस शंभर वर्षें झालीं. मनुष्यास शंभर वर्षें झाली तर आपण १०० वर्षें भरलीं असें म्हणतो. कारण, मनुष्याचे सामान्य आयुष्य तरी आजवर शंभराच्यावर गेलेलें नाही. परंतु संस्थांचे आयुष्य अनेक शतकांचें असू शकतें. म्हणूनच संस्थेला शंभर वर्षें झाली म्हणजे ती गोष्ट आगामी निकट अंताची दुःख-सूचक घटना होत नसून तिच्या भावी भरभराटीची आनंददायी हमीही होऊ शकते. आणि म्हणूनच आपण तो शतवार्षिक वाढदिवस अशा पूर्ण आनंदानें साजरा करतो. तळेगांवच्या अेका लहान शाळेच्या शतवार्षिक वाढदिवसाच्या लहानशा घटनेत आम्हां सर्वांनाच कौतुक वाटण्यासारखी पहिली गोष्ट म्हणजे ती शाळा १८२९ सनात अुघडली गेली. अिंग्रज-सत्तेतील अगदी पहिल्या अशा ज्या फार थोड्या नवीन परधर्मांच्या संस्था अजून तग धरून आहेत, त्यात ही शाळाही गणली पाहिजे. परंतु नुसते दीर्घ काळ जगणें ही जरी कौतुकाची गोष्ट असली तरी ती तेवढ्यामुळे आदरणीय महत्त्वाची होऊ शकत नाही. काकोऽपि जीवति चिराय बलिं च भुङ्क्ते ! पण तळेगावच्या शाळेविषयीं अशा आदरणीय महत्त्वाचीही अेक घटना सळग्न झालेली आहे आणि म्हणून तिची स्मृति आपण सर्वांनी बाळ-गली पाहिजे. ती घटना म्हणजे ही होय की, देशवीर विष्णु गणेश पिंगळे हा शाळेतील विद्यार्थी होते. पुढे ते विशीचे आतच महाराष्ट्रातील १९०९-१० च्या 'अभिनव भारतीय' क्रांतिकारक वातावरणात वाढले, नंतर अमेरिकेस गेले. तेथें अभिनव भारताच्या अिंग्लंडमधील शाखेच्या श्री. हरदयाळप्रभृति कार्यकर्त्यांनीं काढलेल्या 'गदर' (बंड) संस्थेत शिरले. ती वेळ सन १९१४ च्या जर्मन महा-

शस्त्रास्त्रार्थ लागणाऱ्या निधीसाठी दरवडे घालून, या लोकांनी मोठा धुमाकूळ मांडला. देशवीर पिंगळेही, त्यांचे बहुतेक साथीदार पंजाबातील शूर शिखातच असल्याने, तिकडेच त्या धुमाकुळीत गुंगून गेले. शेवटी लाहोरचा खटला झाला त्यात जे क्रांतिकारक सापडले, त्या सर्वांत वयाने अगदी तरुण आणि साहसाने अगदी अग्रगण्य असे दोन क्रांतिकारक होते. अेक करतारसिंग व दुसरे पिंगळे ! त्यानी आपण क्रांतिकारक असल्याचें स्वतःच सांगितलें. ब्रिटिशांची सत्ता आणि न्यायालये याचा अधिकारच त्यांनी नाकारला आणि अक्षरशः हसत हसत ते फाशावर चढले. त्यास पाहिलेले सरकारी अधिकारीही त्यांचें नांव निघताच माना डोलावतात. असा हा देशवीर—' A real hero' पंचविशीच्या आत स्वदेश-स्वातंत्र्यार्थ फाशावर चढला ! केवढी दुर्दैवाची गोष्ट की, त्याचें नावही सुशिक्षित महाराष्ट्रात हजारात अेकास माहीत नाही !

✦ ✦ ✦

अितिहाससंशोधक राजवाडे याचें तर काय, पण अगदी अलीकडील प्रो. पोतदार—आपटेपर्यंतच्या मडळींची नावे ज्याच्या त्याच्या तोंडीं आहेत—त्यांच्या कार्याचा गौरव होत आहे, तो ठीकच आहे; पण अितिहासाचें केवळ संशोधन करणाऱ्यांचा होतो तितका तरी गौरव अितिहास घडवून आणणाऱ्या या देश-वीराचा व्हावयास नको काय? शिवाजीच्या काळचा अितिहास असाच अनेक धाडसी तरुणांनी आणि देशवीरांनी अुत्पन्न केला नाही काय? आणि आजच्या अितिहासाची घडण करण्यात, या देशासाठी होणाऱ्या प्राणदानाच्या, मारीत मारीत मरणाऱ्या देशवीरत्वाच्या भट्टीतील अग्निही अेक आज्वल्य घटक होत आहे हें कोणास नाकारता येणार आहे काय? तसें असते तर रौलॅट रिपोर्ट प्रसिद्ध करण्याची आवश्यकता स्वतः अिंग्रजानाही भासती ना !

✦ ✦ ✦

आमच्या शिवकालीन किंवा परकीय आयर्लंड, अिटली प्रभृति देशाच्या अितिहासात ज्या ज्या वीरांनी या पिंगळे, कान्हेरे, करतारसिंग, कन्हय्या अित्यादिकासारखीच किंवा काही अुदाहरणात त्याच्याहून कमी स्वार्थनिरपेक्ष देशभक्ति दाखविली आणि स्वातंत्र्यार्थ झुंज घेतली, त्याचें वर्णनाने आणि स्तुतीने महाराष्ट्र-वाङ्मय नुसते फुरफुरून जातें पण तसेंच साहसी कृत्ये करणाऱ्या प्रस्तुतच्या कोण्या देशवीराचे किंवा सशस्त्र क्रांतिकारकाचें नाव काढताच तें भीतीने थरथरू लागतें. त्याना अहो जा( )सुद्धा कोणी करीत नाही—अरे जारे म्हणतात ! १

पण आमच्या शिवकालीन आणि राजारामीय पिढीत जे काही देशभक्त वहागिरी-अनामायरच झुजन, त्याच्याही देशभक्तांचा यथार्थ गौरव आणि योग्य कौतुक करणारे हे आजकालचे शिष्ट लेखक नि वाचिवीर यांच्या पिढीत जे

मापणें पुरावे म्हणून पुढे मांडीत. दे. भ. सावरकर जेव्हा प्रथम अिंग्लंडमध्ये गेले, तेव्हा त्यास पंडितजीच्या या अुपकारांच्या आभासाम हटविण्यासाठी सरासरी दोन महिने वादविवाद करावा लागला. दे.भ सावरकरांनी कॉलेजमध्ये असताना मेकॉलेची पत्रें वाचिली. त्यांत त्यास मेकॉलेचे त्याच्या जावयास धाडलेले अंतःस्थ पत्र अुपलब्ध झालें. त्यात मेकॉले स्पष्टपणे म्हणतात की, ' माझी निश्चिति आहे की, मी चालू केलेल्या शिक्षणपद्धतीप्रमाणे शिक्षित झालेले Hindoos, ' हे हिंदु बाबू लोक,' हिंदूंच्या वेडगळ धर्मांपासून च्युत होअून खिश्चानिटीचा अवलंब आपण होअून करू लागतील ! ' हा अिष्ट परिणाम तुम्हा आम्हासमोर घडूही लागला आहे.' ह्या पत्रावरून मेकॉलेच्या पोटातील हेतु अेलफिन्स्टनच्या हेतूप्रमाणेच होता हें स्पष्ट होतें. ' ब्रिटिशांचे अुपक्रम ' ह्या अुपरोधिक नांवाची अनेक व्याख्यानें दे. भ. सावरकरानी सार्वजनिक सभांतून त्या वेळी दिलीं होती, त्यात त्यानी हें पत्र महाराष्ट्रात प्रथमत अुघडकीस आणले आणि नंतर अिंग्लंडमध्ये त्याच अर्थाच्या Are we obliged to the British rule ? या व्याख्यानांतून ते तेथील हिंदी लोकांस परिचित केले नतर ते सत्तावन सालचे ' स्वातंत्र्ययुद्ध ' या पुस्तकात प्रथमतःच प्रकाशित होअून सर्वत्र प्रसिद्धि पावले.

ह्या मेकॉलेच्या पत्राविषयी अेक स्मरणीय गोष्ट विषयानुरोधानेच सांगण्यासारखी आहे की, प्रसिद्ध अभिनव भारतीय क्रांतिकारक पुढारी अय्यर हे सावरकराच्या Are we obliged to the British rule ? या नवीन व्याख्यानास अैकूनच क्रांतिकारक बनले आणि अभिनव भारतात शिरले, असें ते स्वतः सांगत असत. ' निदान हिंदी लोकांना पाश्चात्य शिक्षण दिले हा तरी ब्रिटिशांचा मोठा अुपकार असल्याने त्याच्याशी आपण कृतज्ञ म्हणजेच साम्राज्यनिष्ठ असले पाहिजे.' अशी त्यांची त्या काळाप्रमाणे प्रामाणिक समजूत होती. सावरकरानी व्याख्यानात रेल्वे अित्यादि प्रकरणी जो अिंग्रजांचा आपलपोटेपणा होता तोच शिक्षणाचे बुडाशी होता हे सिद्ध करताना अनेक पुरावे दिले; त्यात मेकॉलेचें हे पत्रही होतें ते सारे पुरावे वाचून सावरकर म्हणत, ' नव्या पाश्चात्य शिक्षणापासून आमचा पुष्कळ लाभही झाला हे खरे, पण तो तें देणाराचा अुपकार म्हणून नव्हे तर अपकार म्हणून /शत्रु तरवार घेअून गळा मारावयास आला; योगायोगाने त्याचे हातून ती तरवार निसटली आणि माझ्याच अुपयोगी पडली ! आता तिचाच वार 'मी त्यावर करू लागताच तो म्हणतो ही तरवार मी तुला दिली, माझे अुपकार मान नि मला सोड ! त्याला जें अुत्तर तेच अिंग्रजी शिक्षणाने आम्हांस झालेल्या लाभास अुपकार माना म्हणणाऱ्या अिंग्रजासही दिले पाहिजे की, ' अुपकार देवाचे, योगायोगाचे ! तू अपकार म्हणूनच हें कार्य हातीं घेतलेस ! ' ही विचारपरपरा अैकून श्री. अय्यर याच्या मनावरील आंग्लनिष्ठेचें भ्रमपटल निरस्त झालें आणि क्रांतिकारक विचारांची बीजें त्यात झपाट्याने रुजू लागली./

देशस्वातंत्र्यार्थ झुंजताना फाशीवाचून दुसऱ्या अितर कोणत्याही जहागिरीचे आमिष डोळ्यापुढे धरीत नाहीत, अशा जाज्वल्य देशवीरांनाही देशवीर म्हणावयास सिद्ध नसतात त्यांच्यावर अेक अक्षरही लिहिणे म्हणजे असभ्यपणा होय असे समजतात हा त्या 'अिंडियन पिनल कोडा'चा प्रभाव आहे जर कदाचित् त्या कोडात शिवाजी, बाजी, तानाजी यांचीही स्मृति करणे दंड्य अपराध गणला जाता तर या शिवकालीन कालालाही यांच्या भीतीच्या काळोखातच तोंड खुपसून राहावे लागते आणि मराठी वाङ्मयात तशीच अेकेरी अुल्लेखिलेली संभावना होती की, जशी त्या 'वासुदेव बळवंताची' होते ! त्या जाज्वल्य देशवीराचे अेक चरित्र अलीकडेच प्रसिद्ध झाले आहे तेच पाहा ! त्यात न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे यांना कित्येक ठिकाणी सन्मानार्थ बहुवचनी अुल्लेखिले आहे सार्वजनिक काकांनाही अहो जाहो म्हटले आहे, ते ठीकच आहे तेही देशभक्त आणि त्यागी देशसेवकच होत, पण वासुदेव बळवंत फडक्यांना त्या प्रत्यक्ष त्यांच्या चरित्रातच येथून तेथून अेकेरी अरे-तुरेने संबोधले आहे देशभक्तीत आणि देशसेवेसाठी केलेल्या त्यागात फडके त्यांच्या पिढीत अितके कमी प्रतीचे ठरले ? कारण त्यांनी देशहितार्थ आयुष्याच्या संध्याकाळची शिळोप्याची वेळ किंवा पगाराचा अेकलक्षांश तेवढाच त्याग करण्याचा सभ्यपणा न करता आयुष्याचे आयुष्य आणि सर्वस्वच सर्वस्व त्या देशासाठी त्यागाचे वेदीवर बळी देण्याचा हलकटपणा केला, म्हणून त्यांना दीडदमडीच्या खर्डेघाशांनी देखील अरे तुरे करावी ! ! वासुदेव बळवंताचे साहस अयशस्वी ठरले, पण यश हेच जर अहो जाहोंना अेकमात्र गमक असेल, तर मात्र मग काहीच म्हणणे नाही शिवाजी महाराजांचे तरी काय अफजुल्लखानाच्या कैचीत ते सापडले तिथे म्हणजे केवळ योगायोग होता जर का त्या पकडीत महाराजच मरते तर ह्याच जात्यावरच्या ओव्या गाणाऱ्या याच त्या सगळ्या डावात्या मूर्खपणाची पराकाष्ठा म्हणत्या-म्हणत्या आपण होअून गाढव'सारखा अफजुल्ल्याच्या तंबूत गेला ! तीच गोष्ट शाहिस्त्याच्या बगलानील, दिल्लीच्या पेटान्यातील ! जर पडले त्यांच्या अुलट पडत तर हेच 'शिवकालीन' आजचे भाट केवळ यशाचे भोपे, शिवाजीतानाजींनाही 'मायेपिरु' 'अत्याचारी, पारखट, अदूरदृष्टि,' म्हणून भुंकत सुटत ! कारण यांना पराक्रमाची पारख नाही ते केवळ यशाचे मिंधे आहेत त्यांना हेतूची आणि त्यागाची आणि कुलटलची ओळख नाही हे केवळ जिकडे घुगऱ्या तिकडे अुदो अुदो करणारे आहेत, नाही तर शिवकालीन किंवा परदेशातील प्रस्तुत काळच्या यच्चयावत पराक्रमाच्या तोडीस तोड देणारे पराक्रम आणि तेही क्वचित अेक रती अधिक निर्मळ अशा जाज्वल्य देशभक्तांनी अुत्स्फूर्त झाले —यांच्या ह्या स्वतःच्या पिढीत यांच्या डोळ्यासमोर घडत असताना यांना अमर्त्य देशवीरत्व ते अजून अयशस्वी होत आहे, म्हणूनच यांस ते हायकोर्ट-जज्जपणापेक्षा किंवा वकीलपणापेक्षा सापेक्षतः असभ्य आणि हलकटपणाचे वाटते ना !

दुर्लक्षाहि भासते ना ! आणि तेच गुण केवळ यशस्वी झाले म्हणून 'शिवकालीन पद्यीत' वर्णनीय ठरले ना ! यश ! ह्यांना अेक सैनिक पडला न पडला की, लडाओी जिंकली गेली पाहिजे ! बीज टाकलें न टाकलें की त्याचा आंबा होअून, पाडास लागून—अगदी अढीत पिकून यांच्या ओठाशी आला पाहिजे. नाहीतर तें बीज व्यर्थ गेलें, तो सैनिक मायेफिल्सारखा व्यर्थ मेला !'

स्वकालीन देशवीरांविषयीच्या ह्या मिथ्या अनास्थेचें ढोंगी समर्थन कुणी असेंही करतील, की आजच्या क्रांतिकारकांचीं चरित्रे लिहिलीं, त्यांच्या हेतूची का होअीना, पण स्तुति केली तर अितर तरुण मंडळीही त्याचा क्रांतिकारक मार्ग चोखाळू लागतील आणि त्यायोगे स्वदेशावर मोठे अरिष्ट कोसळेल. हिंदुस्थानच्या सध्याच्या विमल कीर्तीला मोठा कलंक लागेल ! पण मग हीच गोष्ट 'शिवकालीन' क्रांतिकारकांच्या नावावर रचलेल्या ज्या पैशापासरी कादंबऱ्या, नाटकें, पोवाडे आणि रडगाणी, 'सूड ! सूड !! सूड !!!' म्हणून अुसन्या नाटकी अवसानाने भरमसाट बरळत सुटत आहेत त्याना नाही का लागू पडत? अफजुलखानाचा पोवाडा अैकताच जसे कोणी लगेच लोहाराचे दुकानात वाघनखे घडवून घेण्यासाठी घुसतोच असें नाही, किंवा दिसेल त्या मुसलमानास शाहिस्तेखान-म्हणून त्याची बोटे कापण्यास धावतोच असें नाही, तसेच पिंगळे, चाफेकर, अमरसिंह, कान्हेरे अित्यादींची चरित्रे वाचताना प्रत्येक जण बाँब करू धावलाच पाहिजे असेंही नाही. निदान हिंदुस्थानातील या 'नैष्कर्म्यसिद्धि परमां' प्राप्त झालेल्या जीवन्मृत पिढीत तसा अघोर संभव कल्पिणे म्हणजे त्या पिढीचा घोर अपमान करणें होय. न्यायमूर्ति रानडे किंवा नामदार गोखले याचे मार्ग ज्यास पसंत नाहीत, तेही त्यांस महान् देशभक्त समजून 'अहो जाहो' लिहितातच, कीं नाही ? मग त्या बिचाऱ्या वासुदेव बळवंत, कान्हेरे, चाफेकरांनाच, त्यांच्या मार्गाविषयी मतभेद असला तरीही, अगदी अरे तुरे म्हणून धिक्कारलेच पाहिजे, असे का ? निदान 'शिवकालीन' लेखकाच्या विशीस तरी तें शोभत नाही. नाहीतर, दिल्ली—विजापूर सरकारच्या दरबारातील अेखाद्या धर्मनिष्ठ न्यायाधीशाची किंवा त्यांच्या दरबारातील अेखाद्या जयसिंगासारख्या नामदाराची स्तुति तरी त्यांनी बाजी, येसाजी, तानाजीसारख्या बंडखोर पोराहून अधिक करीत जावें. म्हणजे त्यांचें वर्तन निदान विसंगत तरी दिसणार नाही.

विसंगतपणाचा दंड देशवीर पिंगळ्यांच्या स्मृतीला जरी आजवर भोगावा लागला तरी तळेगावच्या शाळेच्या शतवार्षिक समारंभाच्या निमित्ताने त्यांची आठवण महाराष्ट्रास किंचित् का होअीना पण झाली हेंच त्या अुत्सवाचें आम्ही अेक मोठें महत्त्व समजतो. अुदाहरणार्थ, या अुत्सवाप्रीत्यर्थ 'केसरी'त काही दिवसापूर्वी अेक सुरेख लेख आला होता. त्यात त्या शाळेतील संस्मरणीय विद्यार्थ्यांत पिंगळ्यांचा अुल्लेख आला होता, अितकेंच नव्हे तर 'मायेफिल्,

तळेगावच्या शाळेच्या चालकांना आमची अशी सूचना आहे की, त्यांनी त्या शाळेत देशवीर पिंगळे ह्यांच्या नावाचा एक पितळी स्मृतिफलक लावावा किंवा त्यांचे तैलचित्र तरी ठेवावे. पिंगळे ह्यांचेच नव्हे तर महाराष्ट्रात सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धानंतर झालेल्या देशवीरांच्या — जे जे देशासाठी प्राणत्याग करते झाले त्यांच्या — सर्वांच्या जन्मग्रामी किंवा शाळेत किंवा वसतिगृहात कुठे तरी असा एक छानदार आणि ठळक असा स्मृतिफलक लाविला जावा. वासुदेव बळवंत आणि कामास आलेले त्यांचे इतर मावळे — चाफेकर बंधु, रानडे, कान्हेरे, कर्वे, देशपांडे, पिंगळे इत्यादींची तैलचित्रे, सन्मानपूर्वक, त्यांच्याशी संलग्न झालेल्या निश्चित स्थानांचा पत्ता काढून, प्रकटपणे लावण्यात यावी आणि या सर्वांची चरित्रे परिश्रमपूर्वक माहिती मिळवून ऐतिहासिक प्रमाणांच्या कसोटीने लिहिली जावी. बंगालमधील क्रांतिकारक देशवीरांची चरित्रेच प्रसिद्ध होतात असे नसून यतींद्रनाथ मुखर्जींसारख्या सशस्त्र क्रांतिकारक देशवीरांचे स्मृतिदिन बंगालभर पाळण्यात येतात. मुकर्जी अंक, मुकर्जी दिन, मुकर्जी सप्ताह असा प्रांतभर उत्सव मानण्यात येतो. कारण, त्यांचे मार्ग इतरांहून भिन्न असले तरीही ते देशास्तव झुंजत पडले. पंजाबात मोठ्या समारंभाने हुतात्मा धिंग्रांचे तैलचित्राचे गेल्या महिन्यातच उद्घाटन करण्यात आले, मग महाराष्ट्रासच भयाची आणि संकटाची एवढी हुडहुडी का भरावी! इंग्रज सरकारच्या दृष्टीनेही यात काही वावगे नाही. कारण, पूर्वी फाशी गेलेल्या राजद्रोह्यांची शिरे वेशीवर लटकाविणे हाही सत्ताधीश दंडच समजत. कारण, त्यायोगे इतर तरुणांस अशा चळवळींच्या भयंकर परिणामांची कल्पना येऊन त्यांस उलटा धाक बसावा. आता शिरे नाहीत तर निदान त्यांची चित्रे आणि नावे जरी वेशीवर लटकली, तरी लोकांवर तोच परिणाम होणार आणि इंग्रजांविरुद्ध सशस्त्र बंड केले, तर असा भयंकर प्राणदंड द्यावा लागतो अशी इतरांस धडकी भरेल. त्यायोगे उगीच गंमत म्हणून राज्यक्रांतीतील 'स्वातंत्र्य,' 'मरा, मारा', 'सूड' इत्यादि शब्दांनी भरलेली वायफळ बडबडीची करमणूक करण्याचे व्यसन लागलेल्या अनेक निःशस्त्रसंप्रदायी वाचिवीरांस त्या व्यसनाचा चटकाही कसा असतो याची कल्पना येऊन ते त्या आगीशी खेळेनासे होतील आणि ज्यांना तो चटकाच चटका लावून सोडील असा कोणी निपजणे शिवाजी न जन्मलेल्या प्रांतात शक्य असो वा नसो पण या शिवाजीच्या महाराष्ट्रात शक्यच नाही. कारण ऐका शिवाजीने त्यांचे पोट भरून पुरून उरले आहे!

+ + +

# प्रशंसनीय! वंदनीय! आदरणीय—! पण अनुकरणीय नव्हे!

## जितेन्द्रनाथांचें बलिदान !!

'की समयीं न वदावी तरि मग केव्हा हितोक्ति बोलावी !'

—मोरोपंत

जितेन्द्रनाथ दासानी, राजबंदींना तुरुंगातून अितर अनैतिक अपराध्यांप्रमाणें न वागविता त्यांच्या पवित्र हेतूला आणि अुच्च भावनांना शोभेल अशा सभ्य रीतीनें वागविण्यात यावें, अशी मागणी करून ती पुरविली जाअीतों अन्नत्याग करण्याची प्रतिज्ञा केली, आणि शेवटी त्या प्रतिज्ञेपायीं अुपासमारीच्या अत्यंत हालअपेष्टा सहन करीत आपला प्राण सोडला, ही माहिती अैकताच अुभे राष्ट्र विव्हल व्हावें हे साहजिकच होतें. या भारतीय राष्ट्रीय स्वातन्त्र्यार्थ ज्यांनी ज्यांनी गेल्या वीस पंचवीस वर्षांत आपल्या सर्वस्वाची आहुति दिली, त्या त्या हुतात्म्यांत जितेन्द्राचें नांव अक्षय झळकत राहील यात शंका नाही. स्वदेशास्तव कोणी मारीत मारीत मरतात; ते देशवीर होतात. जितेन्द्रांवरील अिंग्रजी आरोपाची छाननी होअून त्यांनी काय काय केलें हे आपणा सर्वांस अद्याप कळलें नाही, तरीही आजच्या परिस्थितीत स्वदेशासाठीं जितेन्द्र अन्नत्यागाची अमोघ प्रतिज्ञा करून स्वतःच स्वदेश-स्वातंत्र्याच्या यज्ञात बळी पडला—मरणीं मेला, हें तरी स्पष्टच आहे म्हणून जितेन्द्रनाथ हुतात्म्याच्या गौरवास तरी पात्र आहेच आहे, यात शंका नाही. याला शेवटच्या आटकड्यापर्यंत तरी आपलें मरण कोणत्याही क्षणी टाळता आलें असतें. त्याने अन्नस्वीकार करावा म्हणून अनेक देशभक्त त्यास विनवीत होते. त्याने प्राणावर बेतण्याने सधीस अुपास सोडला असता, तर कोणीही समंजस भारतीय त्यास माघार घेतली म्हणता ना पण तरीही त्या मानी आणि अेकवचनी वीराने अन्न स्वीकारलें नाही, तो मरणास तिळमात्र भ्याला नाही जिवाचे तिळतीळ तुकडे करून ते अेकक मोजून त्याने राष्ट्रीय यज्ञात स्वाहा केले, हे त्याचे अलौकिक प्राणदान, हें त्याचें धैर्य, ही त्याची सत्यसंधता प्रशंसनीय आहे. शूर संभाजी, वीर बंदा, गुरु तेगबहादूर या पूर्वकालीन महान् हुतात्म्यांच्या बलिदानाची गोष्ट जरी सोडली, तरी गेल्या वीस वर्षांत भारतीय हुतात्म्यांच्या राष्ट्रीय यज्ञात दिलेल्या कोणत्याही आत्महविर्दानाअितकें तें जितेन्द्राचें प्राणदान प्रशंसनीय आहेच आहे; वंदनीय आहेच आहे—पण ?

### भगतसिंग—दत्त, सतीन—सेन अित्यादि

भारताच्या या अवनत कालीं असा अेक जरी देशभक्त तरुण अुत्पन्न झाला असता, स्वातन्त्र्ययज्ञात केवळ स्वतःच मरणीं मरून कां होअीना, पण अेकाने जरी

---

श्रद्धानन्द : ५ मे १९२९

असा भीषण हाल्हअपेक्षा साशीत आपला प्राण आपणच 'स्वदेशाय स्वाहा ! स्वदेशाय अिद न मम !' म्हणून हवन केला असता, तरीही ते प्राणदान आपल्या भारताच्या पुनरुत्थानाची अेक सुनिश्चित हमी होअू शकते, परंतु जितेंद्राप्रमाणेच, अगदी या क्षणीही त्याच्याच सहकाऱ्यांपैकी अनेक जण तेच दिव्य आणि दुर्धर साहस करीत आहेत भगतसिंग आणि दत्त तर काय — ते अन्नत्याग करून स्वतःचे देहास अनेक दुःसह यातनांत ढकलणारे केवळ तपस्वीच नाहीत, आपल्या देहाचा आपणच बळी देणारे 'मरणी मरते' हुतात्मेच नाहीत, पण 'मारता मारता मरणारे' देशवीरही आहेत, असी या भारतातच नव्हे तर जगातही शेकडो लोकांची धारणा आहे त्यांच्या मार्गावर विश्वास ठेवावा, त्या मार्गाचा पाठपुरावा करावा की नाही ही चर्चा येथे अुद्दिष्ट नाही, म्हणून तो अप्रस्तुत विषय सोडला, तरी त्यास शेकडो लोक देशवीर मानीत आहेत ही गोष्ट लपविण्याचे काही कारण नाही — लपविणे शक्यही नाही त्या देशवीरांनी अन्नत्याग केल्यापासून प्रत्यही वृत्तपत्र अुघडताना प्रत्येक राष्ट्रभक्ताचे मनात धस्स होते की, वीर भगतसिंग — दत्ताची काही अशुभ बातमी तर आज वाचावी लागणार नाही ना ? तीच स्थिति बंगाल्यातील हिंदुकुलभूषण सेनानी सत्येन्द्रनाथ सेनाची ! पत्वाखालीला हिंदुराष्ट्राचे वर्तान सतत वर्षभर झुंज घेअून विजयी झालेला हा अटल सेनानी — आज बारिसालच्या तुरुंगात असाच अेका सापेक्षत क्षुल्लक अटीवरून निकरावर आला, त्याने अन्न वर्ज्य केले आणि आज शंभरावर दिवस नाना देहदंड भोगीत भोगीत जर्जर होअून पाण्यजरी पडला आहे अन्नावाचून शक्ति क्षीण होत आहे, त्याचे अर्धांग लुळे झाले आहे ! वाचा मंद झाली आहे ! आता ते सुटले तरी जन्माचे पंगूपण घेअून सुटणार मेले — तर मरणी मरणार ! भारतीय हुतात्म्यांच्या नामावलीत अेक नाव अधिक वाटणार, पण — ! या सर्वांचा निर्धार, ही तपस्या, हे धैर्य, ही देशभक्ति प्रशंसनीय आहे, वंदनीय आहे ! — पण !

## हुतात्मा देशवीर रामरक्षा आणि अंदमानातील अन्नत्यागी

आज हे राजनैतिक बंदिवान् लाखाच्या डाळधामसमोर आहेत, ते हिंदुस्थानच्या कारागृहात आहेत, त्यांनाही कच्च्या कैदीत अजून अभियुक्त अवस्थेत आहेत, accused आहेत, दंडित झालेले नाहीत — म्हणून त्यांच्या भावना, त्यांचे निश्चय, त्यांचे अपमान, त्यांचा मृत्यु — राष्ट्रीय दृष्टीच्या निःस्पंद दृष्टीसमोर अेखाद्या चित्रपटासारखा धरलेला आहे म्हणून त्यांची यातना अुभ्या राष्ट्रभर हृदयाहृदयास पीळ पाडीत आहे तथापि या क्लेश, माहीत नसणारास नसले तरी माहीत असणारास, राजकीय बंदिवानांना सन्माननीय वागणूक मिळावी याच प्रश्नासाठी असाच अन्नत्यागाच्या भीषण प्रतिज्ञा करून असाच दुर्धर यातना, जशा महिनोगणतीच्या अुपासमारीने झिजत, झिजत त्या दृष्टीच्या पलीकडील कठोर काळोखात — त्या

अंदमानात – ज्यांनी गेली दहा वर्षे सहन केल्या, त्या नानी-गोपाळाची, त्या भाओी परमानंदांची, त्या शूर पृथ्वीसिहांची – भाओी सोहनसिंगादि त्या अनेकानेक राजकीय जन्म ठेप्याची आठवण आज झाल्यावाचून राहणार नाही. अशाच अुपासमारी, हेच हाल त्यांनी चार चार महिने सोसले ! ...... स्वदेशाच्या ह्या 'भले वीर' म्हणून मारखी पाठ थोपटणाऱ्या प्रेमळ सहानुभूतीची संजीवनी जवळ नसताना सोसले ! — आणि ह्या जितेन्द्रासारखाच तो वीर रामरखा अन्न सोडून, कपडे टाकून, अुपाशी, हातकडींनी जखडलेला महिनोगणतीच्या यातनांनी क्षय होअून शेवटी मरणी मेला ! अंदमानच्या अंधारात संतापून संतापून मरणी मेला — त्याच्या देशाच्या अेकाही डोळ्यातील अेकाही अश्रूने त्याच्या त्या संतापास लवलेश शीतलता न मिळता मरणी मेला ! त्याचे शव कुठे फाडले, कुठे पुरले, कुठे पडले, याचा पत्ता देखील नाही ! अनशन करून, आमची अमुक मागणी तुम्ही मानीत नसाल तर हे अिंग्लंड देशा, तुझ्या दाराशी मी त्रागा करीत, अुपाशी प्राण सोडीत ते पाप तुझ्या माथी म्हणून भीति घालीत, ते अंदमानात जे मेले, जे पंगू झाले, हे जे अिथे मरत आहेत, पंगु होत आहेत — ते सर्व हुतात्मे निःसंशय प्रशसनीय आहेत ! पण !

( जे अेकाच्या अुदाहरणात प्रशसनीय असते ते अेकदरीत सर्वांना अनुकरणीय असतेंच असे नव्हे ! –

पण जे जे वर्तन किंवा जो जो सद्‌गुण सर्वसामान्यतः प्रशसनीय किंवा वंदनीय असू शकतो, तो तो, सर्व परिस्थितीत सारखाच अनुकरणीय असतोच असतो असें नसल्याने, किंबहुना काही विशिष्ट परिस्थितीत तो सामान्यतः सद्‌गुण किंवा तें सामान्यतः प्रशसनीय वर्तन अनिष्टच होत असल्याने, राष्ट्रीय लढ्यात, राजकीय पेचापेचीत, मर्योदित विपक्षाची हालचाल आणि स्वपक्षाचे बल ही तोलून विवेचून, मग काय ते आपल्या सैनिकाचे संचलन करणे अगत्याचें होअून बसतें. राष्ट्रातील प्रत्येक चळवळ, राष्ट्रीय झुंजाराचा प्रत्येक सामना, नुसता प्रशसनीयच असून अुपयोगी नाही, तर तो कुशल, अिष्ट आणि कार्यक्षमही असला पाहिजे.) अत्यंत तीव्र देशभक्तीच्या वेदनांनी विव्हल होअून अेका तरुणाने, लोकमान्य टिळक मेल्याची वातमी अैकताच, माडीवरून अुडी टाकून जीव दिला म्हणून अैकिवात होते. आता ही त्याची अुत्कट देशभक्ति वंदनीय होतीच होती. तें प्राणार्पण करताना त्याची दैहिक जीवनाची तुच्छता कोणत्याही हुतात्म्याअितकीच प्रशसनीय होती – पण त्यामुळे तें कृत्य अनुकरणीय ठरत नाही. कारण, ज्या ध्येयासाठी, स्वदेशाहितासाठी, प्रेरित झाल्यामुळे त्याच्या हृदयात लोकमान्यांचें मरणवृत्त अैकताच अशी बलिदानाची भावना अुसळून आली, ते देशहित ते त्याने प्राण असे न देता – नुसते मरणी न मरता – जर जरा निराळ्या रीतीने त्याने दिले असते, तर अधिकच साधले असते. त्याचे कृत्य प्रशसनीय असताही अिष्ट नव्हते. ज्या नीच स्वार्थपरायण

ज्याला लोकमान्यांचे मरणाचे दिवशीही क्षणभर देखील स्वदेशासाठी दुःख सोसण्याची ऊर्मि आली नसेल, क्षणभर देखील ज्याचें स्वार्थलंपट मन विचलित झालें नाही, त्याने मनाहून हा स्वदेशप्रेमाने तळमळून तरवाला आत्मार्पण करणारा तरुण कोटिपटीने वंदनीय आहे. पण तरीही त्यांचे त्या कृत्यामुळे झालें त्याहून त्याच प्राणांच्या मूल्याने, शतपट अधिक स्वदेशहित त्यास सहज साधता आलें असतें. म्हणून तें कृत्य, प्राण देण्याची ती रीत, नुसतें मरणी मरून जाण्याचे तें बलिदान, अितर राष्ट्र-योद्ध्यांपुढे अनुकरणीय म्हणून धरता येणार नाही. कारण, बलिदान आणि कत्तल, हवि आणि हत्या यांत अेक चांगले आणि दुसरें वाअीट हें जें आपण ठरवितो, तें कां ह्याचें विवेचन केले असता त्यातील भिन्नतेची हीच कसोटी आढळून येते की, त्यापैकी पहिलें परोपकारास्तव आणि आत्मोन्नतीस्तव अत्यंत अवश्य असा त्याग असतो, महत्तर अर्थ साधण्यासाठी अपरिहार्य असा अर्थाचा त्याग असतो आणि दुसरा म्हणजे स्वतःचा किंवा दुसऱ्याचा तामसी नाश असतो. लोककल्याणाला पोषक न होता क्वचित् अुलट विघातकच होणारा परिहार्य प्राणनाश असतो. मुक्तीला अवश्य तितकेच हवि घेतो तो खरा मंत्र—हवी देतो तो खरा यजमान. न्याय्य समर जिंकावयाला अवश्य तितकेच सैनिक, अन्याय्य वर्गाचे शासनार्थ जो मरणावर चाल करावयास धावतो, तो खरा सेनापति. नुसते आत्मार्पण करणें म्हणजे मुक्ति मिळणे नव्हे; नुसते मरत राहणें म्हणजे समर जिंकणे नव्हे; तसेंच नुसतें मरणी मरणें, हुतात्मा होत राहणे म्हणजे राष्ट्रीय वा धार्मिक स्वातंत्र्य संपादन करणें नव्हे. ते जेव्हा केव्हा त्या स्वातंत्र्ययुद्धातील अपरिहार्य घटक असेल, तेव्हा तेही केलेच पाहिजे, जसें तेगबहादुराने केलें, जसे जे लढाअीच्या पहिल्याच पायरी शत्रूच्या गोळीस बळी पडतात ते करतात, जसें शत्रूच्या कारागारात जन्मोजन्म जे स्वदेशार्थ सडतात ते करतात.

परंतु राष्ट्रीय सैन्याचें मुख्य ध्येय विजय हें आहे. आपल्या न्याय्य पक्षाची अेकदरीत कमीत कमी हानि होअून अन्याय्य विपक्षाची अेकदरीत जास्तीत जास्त हानि करण्यास जी युद्धकला झटते ती खरी युद्धकला होय !)

त्या युद्धकलेचा हुतात्मता हाही केव्हा केव्हा अेक अत्यंत अवश्य आणि अत्यंत वंद्य असा घटक होअू शकतो. पण तो अपवाद म्हणून. केवळ हौतात्म्य ही काही विजयाची निश्चित हमी नव्हे ! रामाची सीता रावणाने चोरली; जो सीतेला चोरून नेण्याअितका नीच आणि दुष्ट होता, तो रावण रामाने प्राण अुपोषणे करीत त्याच्या दाराशी 'सीतेला दे, नाही तर मी प्रायाने स्वतःचा प्राण देतो' असे म्हटले असता ज्याच्या अंतःकरणास लेशाही द्रव फुटणार नाही अितका, निर्लज्ज निष्ठुर होताच होता ! म्हणून रामाने अन्न सोडले नाही, तर अुलट रावणाचे पुढील जीवनाच्या अन्नाचे ताट ठोकरून त्यालाच मरणाच्या अुपासमारीने कसा नामशेष करून टाकता येअील याच्या व्यवस्थेस श्रीराम तातडीने लागला. सीतेने

देईल अशोक वनात असता, मग अमुकच भोजन आणि अमुकच मान देशील तर बरं, नाही तर अन्न सोडून मरेन, अशी नसती प्रतिज्ञा केली नाही. कारण, तिचे मुख्य ध्येय जे रामाकडून रावणाचा वध करविणे, त्यास ते आवश्यक नव्हते, अितकेच नव्हे तर क्वचित् अपायकारकही झाले असते हा. अेक मात्र प्रतिज्ञा तिने केली — अेका गोष्टीसाठी मात्र ती प्राणत्यागही करती — ती म्हणजे स्वत:चे प्रीतिस्वातंत्र्य — ते पातिव्रत्य — ते ध्येयच जर संकटात सापडते, आणि प्राण वाचविणे म्हणजे मुख्य ध्येयच सोडणे असा प्रसंग येता, तर — तर मग मात्र प्राण सोडणेच तिचे कर्तव्य होते — आणि तिने ते केलेही असते. गुरु तेगबहादूर, बंदा वीर किंवा राजे संभाजी यांचे मुख्य ध्येयच स्वधर्मरक्षण होते, म्हणून जेव्हा त्या ध्येयासाठीच प्राण देणे प्राप्त झाले, तेव्हा त्यांनी प्राण दिला हेंच युक्त झाले. तेच खरे हौतात्म्य. नुसते प्रशंसनीयच नव्हे — वंदनीयच नव्हे — पण अनुकरणीयही असणारे हौतात्म्य तेच! तीच गोष्ट सोळल्याही राजकीय क्रांतिकारकाचे मुख्य ध्येय जे महनीय स्वदेश-स्वातंत्र्य आहे, त्यासही लागू आहे. त्यासाठी झुंजताना ते धरले जाऊन, वाताहत होऊन, त्याच्या विपक्षाचे हाती पडले असता, जर अुदाहरणार्थ त्यास त्याच्या स्वातंत्र्य-सेनेची वा त्याच्या दारूगोळ्याची माहिती त्याचा विपक्ष विचारू लागला — जर त्याकरिता त्याचे प्राणांतिक छळ होऊ लागले, तर ते छळ सोसून त्याकरिता प्राणही गेला तर तो देणे हे त्यास त्याच्या दृष्टीने कर्तव्य वाटलेच पाहिजे

—कारण मुख्य ध्येयासच ते प्राणदान तशा स्थितीत अवश्य आहे, म्हणूनच अुपयुक्त आहे (ज्या अेका प्राणाच्या तशा दानाने शेकडो निरपराध प्राण, अेका राष्ट्राचा मान, अेका न्याय्य ध्येयाच्या ध्वजाचा गौरव हे राखले जातात ते प्राण देणे हेच खरं हौतात्म्य — केवळ प्रशंसनीयच नव्हे वंदनीयच नव्हे — पण अनुकरणीय हौतात्म्य) क्रांतिकारकाच्या तत्त्वाशी किंवा मार्गाशी ज्याची सहानुभूति नाही त्याची चर्चा या विवेचनात अप्रस्तुत म्हणून तीविषयी अनुकूल प्रतिकूल असं काहीच मत या स्थली न देता तटस्थपणे आम्ही अितकेच सांगतो की ध्येयास अत्यवश्य असलेले प्राणदानच तेवढे सूक्त आहे, पण ध्येयार्थ अनावश्यक असलेले प्राणदान त्या वीरात्म्याच्या देशभक्तीचे किंवा निग्रहाचे किंवा निःस्वार्थ निर्भयतेचे द्योतक होणार आणि म्हणूनच हेतुतः वंदनीय असणारे परंतु व्यवहारतः ध्येयाच्या अंतिम विजयास अनावश्यक नव्हे तर अेका अर्थी अपायकारकही होणार आणि म्हणूनच अनुकरणीय नसणार आहे हे सर्वसाधारणपणे सांगण्यास काहीअेक हरकत नाही केवळ प्राणहानीसाठी प्राणहानि अनिष्टकारकच होय आणि या दृष्टीने सध्या जिकडे तिकडे अुठलेल्या या अन्न सोडून, आपण होअून अनेक यातना सोशीत, केवळ मरणाने मरून जाण्याच्या पद्धतीची जी अन्न सोडून मरून जाण्याची साथ अुठू पाहत आहे तिचा, या असत्याग्रहाच्या साथीचा, युद्धातील अेक धोरण म्हणून, निषेध करणे हे आम्ही आमचे कर्तव्य समजतो.

जी माणसे अशा उच्च देशभक्तीने प्रेरित होऊन, अशी कठोर तपस्या करून, मरणी मरतात, त्यांचें वैयक्तिक मोल कमी न करता, त्यांच्या त्या दैवी वैयक्तिक बलिदानाचा यथोचित आदर करीत असताही हें स्पष्टपणें सांगणें अवश्य आहे, भावना दुखली तरी दुखवून, राष्ट्रीय हितासाठी हा बुद्धिवाद प्रकटपणे बोलून दाखविणें कर्तव्य आहे की, ही अनशनाची लाट जर अशीच फैलावू पाहील, तर तिच्यामुळे राष्ट्राच्या मुख्य ध्येयाला — स्वातंत्र्याला — ज्या माणसाच्या सक्रिय जीवनाची किंवा लढत्या मरणाची अपेक्षा आहे, त्यांना जवळ जवळ व्यर्थ गमावून, नुसतें मरणी मारवून, आपण दुर्धर हानि पोचवू. कारण हे जे देशभक्त आता अेकाचें पाहून दुसरा. दुसऱ्याचें पाहून तिसरा, असे अन्नत्याग करून लुळे, पागळे, क्षयग्रस्त होत, दुःखद मरणी मरणाचे भक्ष्य होऊं पाहत आहेत हें कशाकरता? तर राजकीय बंदींना थोडें बरें वागविलें जावें, या सापेक्षत: अगदी दुय्यम मागणीसाठी! आणि अशा अगदी दुय्यम मागणीसाठी अेवढाले वीर बळी द्यावयाचे! जितेंद्र, सेन, भगतसिंग, दत्त — असे अेकाहून अेक अभिमन्यु, जनकोजींसारखे वीर — अेखाद्या भारतीय युद्धास जिंकणारे — अेकेकाच्या प्राणाचें मूल्य दहा दहा प्राण — असे हे देशभक्त, मुख्य ध्येय जें स्वातंत्र्य त्याच्यासाठी होणाऱ्या लढ्यामध्ये (struggle) अभियुद्ध आक्रम करीत, मोलास मोल घेत मरावयाचे, ते असे अवेळी, अकाली, अेका सापेक्षत: यःकश्चित् चांगल्या भाकरीच्या किंवा वर्तमानपत्राच्या तुकड्यासाठी किंवा अेक खुर्ची-टेबल राजबंदिवानास मिळावें म्हणून अन्न सोडून सडत मरावे — नुसते मरणी मरून जावे! मातीच्या मोलानें असला अमला घाटकरी शिरेस घालून मातीस मिळवावा! राजबंद्यांच्या मानाप्रमाणे त्यास वागवावें हा प्रश्न मानाचा आहे ही गोष्ट खरी आहे. त्या मागणीसही मोल आहे; पण ते असल्या प्राणाचे नव्हे. अंदमानातही दहा वर्षे सप करून, अितर कैद्यांत संप पसरवून, अधिकाऱ्यास अुध्यापन देण्याचें नाकारून, बळानें पत्रें आत आणून, बळानें अेकमेकाशी बोलून, हातकडी, बेडी — अितका त्रास अशा दुय्यम प्रश्नांकरिता, हक्कांकरिता, सोसला, परंतु तिथे जेव्हा जेव्हा अन्नत्यागाचा त्रागा करण्याअितका कुणी संतापे आणि भलतीच प्रतिज्ञा करी, तेंव्हा त्यास तत्काळ प्रेमाने आग्रह केला जाअून त्या आत्मघातक निश्चयापासून परावृत्त केलें जाअी. अेखादा अवसानबाज मनुष्य अेखाद्या लिलावात अेका दोन कवडीच्या वस्तूचे मोल हट्टास पेटून जसा दोन हजार रुपयांपर्यंत चढवीत जातो, तसेच राजबंदींना सुधारलेल्या पद्धतीने वागविण्याच्या दुय्यम मागणीसाठी अशा वीरांच्या अमोल प्राणाची अशी मातीमोलाने नासाडी करण्याची ही हट्टवादी चूकही अपायकारकच होणारी आहे. अेखादा जितेंद्रासारखा अुदात्त अपवाद झाला तर झाला; झाला तेवढा क्षम्य आहे. पण आता या यःकश्चित् मागणीसाठी ही अनशनाची साथ अधिक फैलावू देता कामा नये.

राजकीय बंदिवानांना कितीही बऱ्या रीतीनें वागविलें तरी काय ! स्वतःस बंदिवान् म्हणवून घेण्याचें दौर्बल्य तर राहणारच ना ! अगदी खुर्चीवर बसून ताजें पत्र वाचीत राहिले, तरी अिंग्रजांचा बंदिवान् ! बरें, कारागृहाबाहेर आले तरी काय ?

'बंदी नसे त्यांतिल कोण बोल ।
जो लोक दैवें परदास झाला ।।
तो बंदि तद्भूचि तुरुंगशाला ।।

या अितक्या दहा पंधरा हिंस्यास नागवून तो 'बरें वागविण्याचा' अधिकार मिळाला — तरी काय ? तो अुद्या सामसूम होताच पुन्हा छिनला जाअील ! जोंवर हिंदुस्थान पारतंत्र्यात आहे तोंवर लहानसहान अधिकार, जागा, पागा हिसकवेल तितक्या हिसकीत राहायचेंच, त्यासाठीं परिमित आणि प्रमाणशीर तो स्वार्थत्याग आणि प्राणत्याग करीत राहायचेंच — पण तरीही हे कधी विसरायचें नाही कीं, ते अधिकार जिनें दिले ती परकी सत्ता जोंवर जिवंत आणि प्रबळ आहे, तोंवर ते केव्हा छिनावले जातील याचा काही नियम नाही. तें धुळीवरचें सारवण ! म्हणूनच भलत्याच दुय्यम प्रश्नास 'हा मानाचा प्रश्न' आहे असें नसतें महत्त्व देअून, लाखाचा प्राण मातीच्या मोलानें देण्याच्या प्रतिज्ञा यापुढे तरी कोणी कधी करूच नयेत. केल्या असल्या तरी मुख्य ध्येय जें स्वातंत्र्य त्यास असला सापेक्षतः निरर्थक आणि अतिशय महाग प्राणत्याग अपायकारक असल्यानें तशा भलत्याच प्रतिज्ञांची चूक त्या प्रतिज्ञा मोडून सुधारावी.

(भलती प्रतिज्ञा करणें अेक भूल, तर ती प्रतिज्ञा राष्ट्रीय हितास अपायकारक असताही तशीच चालविणें ही सवाअी भूल. अशा परिस्थितीत शक्यतों त्वरित पाय मागें घेणें हेंच खरें शौर्य, खरा देशाभिमान, खरें धैर्य आहे, म्हणून आम्ही आमच्या सर्व देशबंधूंस — त्यातही भगतसिंगादि अत्यंत तेजस्वी आणि लाखाच्या मोलाच्या नररत्नांस, वीरांस, अशी आग्रहाची विनंती करतो कीं, त्यांनीं राजकीय बंदिवानांच्या हक्कासारख्या दुय्यम आणि सापेक्षतः थोड्या मोलाच्या मागणीचे पायीं आपल्या राष्ट्रीय पक्षाचे केवळ धुरंधर असे तरुण बळी देअू नयेत. मुख्य ध्येय जें स्वातंत्र्य, त्याचे प्राप्तीसाठी हे प्राण व्यय करावे. युद्धाच्या मुख्य केंद्रावर, शत्रूच्या मुख्य मर्मावर ह्या निवडक वीरांच्या फळीच्या फळींनें चालून जायचे कीं, विपक्षाच्या बाजारबुणग्यांशीं मूठभर 'आट्या'साठी झगडा करीत अनशनाच्या चिमट्यानें अेखाद्या फकिराप्रमाणें आपलेंच अंग भोसकून मरणी मरून जायचें ! त्यातही राजकीय बंदिवानांच्या दुय्यम प्रश्नासाठींच काय ते अनशन हें अनुपयुक्त साधन आहे. अितकेंच नव्हे तर स्वातंत्र्ययुद्धाच्या अशा प्रकारच्या युध्यमान परिस्थितीत अशा विपक्षाशीं लढण्याचें ते साधनच नव्हे, ते शस्त्रच नव्हे.

सोडल नाही, तर दंगे करून दुप्पट सारले, आतून बंदीगृहे फोडली, बाहेरून सशस्त्र आक्रमणे करवून बंदिवान सोडवून नेले! आयर्लंड स्वतंत्र झाला, तो मॅक्स्विनीच्या नुमत्या अन्नत्यागाने नव्हे, केवळ हुतात्मतेने नव्हे तर त्या हौतात्म्याचा पुरा पुरा लाभ घेणारी सशस्त्र रणधुमाळी अुठवून देण्याचा त्याने त्यापूर्वीच हरिॐ केला होता, त्यामुळे आणि पुढे क्रांतीचा सारखा भडिमार करीत राहिला त्यामुळे, म्हणून आयर्लंड यशस्वी झाला, नुसते सगळ्यानी मरणी मरून नाही तशी सिद्धता आज हिंदुस्थानात कोणाची आहे? क्रांतिकारकाचे मार्ग बरे की वाअीट, आयर्लंड तसे वाचू शकले म्हणून आम्हालाही तस समरताडव केलेच पाहिजे किंवा करता येअील की काय, याची चर्चा या लेखात प्रस्तुत नाही, तो प्रश्न स्वतंत्र आहे पण तरीही अितके स्पष्टच आहे की, क्रांतिवादी किंवा शांतिवादी अशा कोणत्याही हिंदी पक्षाची, अशा हुतात्म्याच्या नुसत्या मरणी मैदान अुत्पन्न होणाऱ्या क्षणिक क्षोभाचा भीषण चटका रिपूस बसल अशी कोणतीही कृति किंवा कल्पना करण्याची किंवा योजण्याची छाती नाही, सिद्धताही नाही तावर अशा नुसत्या राष्ट्रक्षोभाच्या क्षणिक अुत्तेजनाचा निशा अुपभोगण्यासाठी ह अेकाहून अेक वीर नुसते मरणी का मारावे? (जो क्षोभ विपक्षास लवलेशही चटका न देता आपल्या स्वत सच जाळीत सुटतो तो काय कामाचा ! जो क्षोभ अेकदा राष्ट्रीय रडारडीचे अश्रु गाळताच विरून जातो, त्यासाठी हे अिनके शूर वीर देशभक्त हाल्हाल करून मानीच्या मोलाने, अन्न अन्न करीत दळेच मारविणे हा अगदी आत्मघातकी वेडेपणा आहे त्यापेक्षा परकी सत्ता या देशभक्ताचे असे छळ करते त्याना स्वीकारोक्ती (confessions)-करिता मारहाण करून लुळे पांगळे करते, त्याना अशी बळाने अुपाशी मारते, तर त्याचा दोष अधिक निश्चितपणे तिच्यावर पडून जातात आणि स्वजनात चाला, त्याहूनही अधिकच क्षोभ अुत्पन्न होअू शकता हिंदुवीर सतीन बाबू असे अन्न सोडून आपण होअून मरणी न मरता सतीन बाबूसारखे आपखी दहाजण जरी परवान्यालीच्या सत्याग्रहात किंवा तशा कोणत्या शत्रूची प्रत्यक्ष हानि करणाऱ्या लढ्यात मरते तर त्याच दुःख नव्हत !)

(कारण विपक्षासही त्याच मानाने किंवा बऱ्याच मानाने तशीच हानि पोचत राहाती पण अशा भलत्याच आग्रहापायी या अडाणी आत्मनाशक मार्गापायी, विपक्षाची हानि मुळीच न होता आपलीच मात्र शतपट हानि होते नव्हे विपक्षाचे डाव आपणच असले अडाणी पच मारू मल्याने सुकर करून देतो !)

अहो कोर्टात खटले होअून दोन चार वर्षे शिक्षा होत्या, त्या शिक्षा भोगून ते देशसेवेस आणि परसत्तेच्या छातीवर पुन्हा नाचावयास मोकळे होते, पण ज्याना शत्रु फाशी देअू शकत नाही अशा दहावीस आरोपिताना अन्नत्यागाची फाशी आपण होअूनच देतो हजारो रुपये व्यय करून नवे कडक निर्बंध करकरून, वशिले लावून लावून, ज्या देशभक्ताना फाशी व्हावी म्हणून ही परसत्ता धडपडते तरीही ते सुटून

किंवा दहा वर्षेन् बंदी होऊन तिच्या छातीवर जिवंत नाचत पुन्हा झुंजण्यास परत येताना पाहून ती परसत्ता हिरमुसली होते –– तीच परसत्ता त्या देशभक्तांना अेक दोन महिन्यात अने अेकामागून अेक पटापट अन्न सोडून मरताना पाहून मनातल्या मनात टाळया पिटून निस्संशय असेच म्हणत नसेल कशावरून की–– 'ठीक! ठीक! औषधावाचून खोकला गेला माझा अेक पैसही बाकडा न करता अेक कट्टर शत्रु अनायासें मरणी मेला !'

ज्या वेळी अंदमानांत भाअी परमानंद नानी गोपाळ, भाअी पृथ्वीसिंग, भाअी सोहनसिंग अित्यादि अनेक देशभक्तांनी असाच प्राणपणानं अन्नत्याग केला, तेव्हा त्यें सावरकरांनी त्या पद्धतीचा हानिकारक आत्मघातकी परिणाम राजबंदींच्या मनावर वारवार ठसविण्याचा अत्यंत निग्रही प्रयत्न केला, म्हणून त्यातील काही-तरी देशभक्त अन्नत्यागापासून परावृत्त होअून, सुटून, आज पुन्हा देशाची अुत्कट सेवा करीत आहेत ते सर्व प्रकरण 'माझी जन्मठेप' ह्या पुस्तकात वाचकांनी अवश्य वाचावे नाहीतर ते लोक मरणी मरत विपक्षाचे बळ वाढविते, तर त्यांची नावे देखील अितडे कोणास कळती ना! पेल्यानर दुधासाठी, पौंडभर तेल गाळण्यासाठी, अेखाद्या वृत्तपत्रासाठी अेका खुर्ची–टेबलासाठी कामाचे संप करा, अधिकाऱ्यांशी भांडा, अधिकाऱ्यांना सळो की पळो करा, वेळेवर अन्नत्यागही मर्यादित अवधीपर्यंत करा! पण प्राणत्याग ? आणि तोही आपणच अुपाशी मरत आणि अशा सापशा-न यत्किंचित मागणीसाठी? आणि विपक्षाचा केसही बाकडा न करता? आणि भगत-सिंग, दत्त, यतीनबाबू अशा अशा पाच पन्नास धुरंधर देशवीरांनी? छट! हा कसला अपायकारक आग्रह! अडाणी पेच! शत्रूचा दाणावैरण बंद करावयाचा की आप-

# सावरकरांच्या गोष्टी–समाजचित्रें

## १. कुसुम

वडगाव येथील शाळेचा आज पारितोषिक समारंभ. अशा प्राथमिक मराठी शाळांचा पारितोषिक समारंभ म्हणजे मुलांच्या मेहनतीचे चीज होण्याचाच काय तो दिवस नसून, शिक्षकांच्या मेहनतीचेही चीज होण्या न होण्याचा दिवस असतो. त्यातही गावठी शाळेत खितपत पडलेल्या आजकालच्या आमच्या अधपोटी मराठी शिक्षकांना तर ह्या दिवसाचे फारच महत्त्व. कारण त्यांच्या पोटापाण्याच्या प्रश्नाशीही ह्या असल्या वार्षिक पारितोषिक-समारंभाचा थोडाफार संबंध पोचण्याचा संभव असतो.

कारण गावपंचांना, गावातील पालकांना आणि वेळी डेप्युटीमहाशयांनाही संतुष्ट करण्याची, ह्या वेळी त्या बिचाऱ्या शिक्षकाला अेक सुवर्णसंधिच आलेली असते. अशा समारंभाच्या दिवशी त्या गावचे ते गावपंच, दीडदमडीच्या भांडवलाचे गावशेठजी, जन्मात ज्यांना कोणी खुर्ची देत नाही असे 'पालक' ह्या थोर पदवीने त्या दिवशी शाळेतील खुर्च्यांवर बसविले जाणारे रमेडाके गावगृहस्थ, मुले, मुली, जातीयेती बायामाणसे ह्या साऱ्या जणांना अशा समारंभातील त्या झिळमिळ्या, ताशे-ढोल, गाणी-संवाद, पटा-नगारा, 'या हो ! या हो !'ची आजवी स्वागत याहा त्या शाळेविषयी मोठी आपुलकी वाटू लागते आणि विद्यार्थ्यांच्या परीक्षेपक्षाही ह्या असल्या पारितोषिक-समारंभामुळेच त्या शिक्षकाचे नाव गावात ज्याच्या त्याच्या तोंडी अेकू येऊ लागते, त्यामुळे वर डेप्युटीलाही आपली शाळा आणि आपण स्वत गावकऱ्यात किती लोकप्रिय आहो हे शिक्षकांना सहजासहजी दाखविता येते.

या समारंभाचा गावठी शाळांतील बापड्या सरकारी शिक्षकांना जर आणखी अेक महत्त्वाचा अुपयोग होत असेल तर तो आपल्या शाळेच्या प्रगतीच्या भाषणात येनकेनप्रकारेण स्तुति च्या आधाराच दु:ख वेगावर टागण्याचा संधि त्या निमित्ताने मिळते. ह्या हाय ... भाषण करून शाळेच्या प्रगतीच्या व्याख्यानाच्या विषयात स्वत च्या पोटापाण्याच्या अधाताचा थोडातरी अुल्लेख शिक्षकांना सहज घुसडून देता येतो !

वडगावचे शिक्षकही असेच आशाळभूत. त्यांनाही जरा भाळभर त्यांच्या त्या गावातील शाळेच्या या आजच्या पारितोषिक-समारंभास गावपंचासुद्धा झाडून सारे लोक न येत, तर बाजारच्या त्या तालुक्याच्या मुख्य ठाण्यात महिन्या दान

म्हणतो – 'बारा भाव छत्तीस मास्तर!' त्यासरशी अध्यक्ष वगैरे सर्वजण खो खो हसतात! दिगाजीपंत आपल्या करुण महाणाच्या भर शोकरसात ह्या हास्यरसाने माती कालविल्यामुळे संतापून देहभान विसरतात. डाव्या हातातली छडी केव्हा अुजव्या हातात घेतली आणि त्या पायापाशीच बसलेल्या गाद्या राम्याच्या अंगावर सपासप केव्हा लगावल्या ते ती मुले मोठ्यामोठ्याने 'अयामाया! अयाय!' असे किंचाळून अुठेतो दिगाजी निक्षवाच्या स्पष्टपणे ध्यानात सुद्धा येत नाही!) ह्या गोंगाटा-सरशी त्या सभेच्या समयास अध्यक्षमहाशयांना शेवटी आपण मध्येच अुठून सांगितले,

'दिगाजीपंत, आता असे करा. तुम्ही ते तुमचे प्रतिवृत्त नि हे तुमचे लिहिलेले मूळ भाषण दोन्हीही माझ्याकडे धाडून द्या. मी ते जगत्समाचारात समग्र छापतो. मग अर्थात ते भाषण नुसते वाचून दाखविण्यासाठीच काय तो हवा कशाला हा गोंधळ! नाही तरी तुम्ही हे लिहिलेले भाषणच पाठ केलेले दिसते–!'

'छे! तसेच नाही नाही, रावसाहेब, अगदी! पण आपण जर ते समग्र छापीत असाल तर मागितला अेक डोळा नि देवाने दिले दोन असाच अुपकार होईल या दीनावर!' अखेर अध्यक्षांनी सारे भाषण रद्द करून दहापाच पारितोषिके तेवढी स्वहस्ते वाटावयास ठरविले.

'कुसुम!' पहिलेच नाव अध्यक्षांनी घेतले—पहिल्याच क्रमांकाच्या पारितोषिकास योग्य म्हणून!

कुसुमला जरीचा खण मिळताच पहिली टाळी पडली दिगोजीपंतांची! त्यासरशी मुलामुलींनी कळसूत्री बाहुल्याप्रमाणे कडकडाट चालविला. मध्येच काही कानांना सोडल्याच्या सार्थाने पछाडल्यासारखे होऊन खोडसाळपणे मोठमोठ्याने खाकरल्यावाचून राहवले नाही. बाकीची पारितोषिके वाटून होताच समारंभ संपला. मुले मुली आणि त्या गावच्या वाटेवाटेने आनंदाचा अेकच गलका करीत घरोघर चालला.

शेतातल्या मेंढवाड्या घुसुरवणातून अुडताच अेखादे कोकरू जसे हिरवळावर मोकाट बागडू लागते आणि अुगीच अुंच अुड्यांवर अुड्या मारीत इकडे तिकडे आनंदाने नाचू लागते तशी आपल्या घरच्या अंगणात पाऊल टाकताच कुसुम बागडू लागली. बाहेर गेलेली आअी परत येताच तिला ते पारितोषिक मिळालेला जरीचा खण कधी दाखवीन असे तिला होऊन गेले होते! आअी परत येताना दुरून दिसताच ती धावत सुटली. आअीला भेटताच तिला तिने मिठी मारली. खण दाखविला. सभेतल्या काय काय गमती सांगितल्या. पद पण म्हणून दाखविले. आअीने जो जो तिचे कौतुक करावे तो तो तिचा आनंद गगनात मावेनासा झाला.

त्या दहा वर्षांच्या लेकराला त्या क्षणी काय ठाऊक की, त्या मनमोकळ्या आनंदाचा तिच्या आयुष्यातला तो बहुधा शेवटचाच क्षण होता!!

✦ ✦ ✦

कारण त्याच क्षणी गोपाळभटजी — तिचे वडील — तिथे आले ते अेक अूच गोरेपान रूढीलाच शास्त्र समजणारे, भिक्षुकी आणि दूधदही विकण्याचे दोन्ही परस्परविरुद्ध व्यवसाय अेकत्रच करणारे त्या तुटपुंज्या अुत्पन्नावर कसावसा चरितार्थ चालविणारे, बरेच कमठ, थोडे तापट नि फारच हेकेखोर पुरुष होते त्यांनी अंगणात पाय टाकताच गंगाबाअीला, कुसुमच्या आअीला, म्हटले

'काय, मनात काय मुलीला नायकीण करायचच आणलं आहेस की काय! किती मोठ्यानं म्हणते ही कारटी ती पाचकळ पद! कुसुम, अुद्यापासून तू शाळेत पाअूल टाकता कामा नये!'

'हं का?' गंगाबाअी रागावून यजमानास हटकत्या झाल्या

'का! कुसुम काय आता सातआठ-वर्षांचं कुक्कूबाळ आहे वाटतं? दहा वर्षांची लग्नाची मुलगी झाली ती आता! शाळेत आज कुचाळ लोक तिच्याकडे टकमक पाहत होते माहीत आहे! बाराबारा वर्षांच्या घोडनवऱ्या शाळेत नाचविणाऱ्या अुलूतांत मी नाही, समजलीस? शास्त्रांनी काही अुगीच 'अष्टवर्षा भवेत् कन्या' ही मर्यादा घातली नाही!

बाराबारा वर्षांच्या मुलींना घोडनवऱ्या म्हणणाऱ्या ह्या कर्मनिष्ठ गोपाळभटजींचं गंगाबाअी हे तिसरं कुटुंब होतं पन्नाशीच्या वयात त्यांचं दुसरं कुटुंब वारलं दोन मोठी मुलंही होती पण तरीदेखील त्यांनी तिसरं लग्न करण्याचे ठरवून अेका तेरा वर्षे वयाच्या कुमारीस पाणिग्रहिलं त्याच गंगाबाअी त्याला आता सोळा वर्षे झाली होती गंगाबाअींची वडील मुलगी चवदा वर्षांची होती ती रानपाटच्या खोताना दिली होती दुसरी कुसुम

आमच्या या गोष्टीतल्या समाजचित्रांपैकी हं पहिलं समाजचित्र! गोपाळभटजी पासष्ठी अुलटलेले त्यांची तिसरी बायको गंगाबाअी तिशीच्या वयाची, आणि तिची ही दुसरी धाकटी मुलगी कुसुम दहा वर्षांची! — ती तिच्या त्या वडिलांच्या शास्त्रमर्यादांगते घोडनवरी होत आलेली आहे!!

  

गोपाळभटजी आपल्या बायकोला असं फर्मावरीत असताच अंगणात अेक शिपाअी येअून 'तार!' म्हणून ओरडला तार शब्द अैकताच ज्यांना नेहमी तारा येतात त्यांच्या देखील मनाची चलबिचल झाल्यावाचून राहत नाही फार निकडीची विशेष आनंदाची वा घोर संकटाची बातमी म्हणजे तार! त्यातही खेडेगावात गोपाळभटासारख्या बापड्या कुटुंबाला तार येण्याचा प्रसंग जन्मात दोनतीन वेळाच येणार! स्वतः गोपाळभटांना त्या वेळपावेतो अेकच तार आलेली आठवत होती ती त्यांच्या पत्नीनिधनानंतर मोठ्या प्रयासाने गंगाबाअींशी लग्न जमलं तेव्हा ते ठरल्याची होती! त्यानंतर तार अशी ही दुसरीच काय ती त्यांना आली! या वेळी

महिन्यांनी अेखादा अंक काढणाऱ्या 'जगत्समाचार' नावाच्या साप्ताहिकाचे संपादक श्री वडोपंत हेच अध्यक्षपदी विराजमान होण्यास्तव येणार होते. वर्तमानपत्राच्या संपादकासारखी आपला दुःख जावर जगतासमोर टांगता येताल अशी अुच्च नि भव्य वेस दुसरी कुठे मिळणार ? अशा विश्वासाने वडगावातील ह्या शाळेच्या दिगोजी-पंत शिक्षकांना आपल्या होणाऱ्या व्याख्यानात आपल्या दुःखाची कहाणी सांगोपांग गावून पगाराच्या नि तांदूळ डाळ भाजी भाडं प्रभृतींसाठी संसारात कमीत कमी जो खर्च येतो त्याच्या प्रमाणशुद्ध प्रमाणशून्यतेचा पाढा वाचलेला होता. ते भाषण त्यांनी स्वतः तर पाठ केलेच होते पण त्याच अर्थाचे अेक पद रचून त अितर पदा प्रमाणेच मुला मुलींकडूनही पाठ करविले होते.

याच पद म्हणणाऱ्या मुलांत कुसुम होती. ती दिसण्यात चांगली, वयाने दहा वर्षांची, बोलण्यात चुणचुणीत, गळ्याची गोड. अर्थात पद बसविताना दिगोजी-पंतांनी तिलाच मुख्य गायिकेचे काम दिले. ते पद तिला शिकविताना आतागी तिच्याशी दिगोजीपंत येता जाता अितके बोलत की अितर मुलामुलींना मत्सर वाटून त्यांच्या त्यांच्यातच नव्हे तर काही गावगुंड वायामाणसांनाही जुळतस आहे

करतील का ?' –तो झालीच त्या भाषणाची वेळ–आणि मुलांमुलींच्या अेकच गलबलाची ! दिगोजीपंतांनीही मुलामुलींचा तो गलका थांबविणाऱ्या शिक्षकाची नि शाळेच्या प्रगतीचा वृत्तान्त वाचून त्यावर भाषण करणाऱ्या व्याख्यात्याची अशा आपल्या दोन्ही भूमिका अेकमहाच करण्यास कंबर कसली. अुजव्या हातात प्रतिवृत्तावें (रिपोर्ट) तें पुडकें नि डाव्या हाताशी टेबलावर ठेवलेली छडी घेअून ते बोलावयास अुभे राहिले. 'मुलांनो, मुलींनो !' असा पहिल्या शालेय भाषणातील सवयीचा संबोधनी हाकार दिगोजीपंतांनी घसा खरडून देताच त्या आज्ञाधारक मुलामुलींनी 'ओऽ ! ओऽ ! मास्तर !' अशा प्रत्युत्तरांची अेकच ओरड चालविली. 'हा चूप ! चूप ! भुमते अंका ! राम्या ! तू, तू, तिथं गोंद्या ! गप !' असें त्या दिगोजींनी मुला-मुलींना दटावीत डाव्या हाताने टेबलावर छडी दहापांच वेळा कडाकड आपटल्यानंतर मुलामुलींच्या बरेचसें ध्यानात आले की, ह्या वेळी मास्तरांनी आपणांस हाका मारल्या किंवा काही विचारलें तरी आपण बरोबर अुत्तरें न देता

लग्नाचा प्रश्नच नव्हता—अर्थात् काहीतरी अरिष्टच असेल तर असणार ! ही शंका येऊन थरथरत्या हाताने गोपाळभटजींनी तार घेतली नि शेजारच्या घरी ती वाचून घ्यावयास ते घाओीघाओीने चालले असता त्याच शंकेने ताड मुकून गेलेल्या गंगाबाओींनी हात जोडून देवास प्रार्थिले,

'अिडापिडा टळो नि अमंगळ पळो !'

गंगाबाओींची वडील मुलगी रानपाटच्या खोताना दिली होती. ती आजारी होती हीही बातमी आधीच कळली होती. गंगाबाओींच्या हृदयात सारखी धडकी भरली—तार तिच्या घरचा तर नसेल ना ? तिचेच काही वेडेवाकडे तर—! तो भयंकर विचार मनाला देखील तिने पुरता अुच्चारू दिला नाही. अर्धा अुच्चारला म्हणून सुद्धा ती बिचारी मायाळु आओी मनावर रागावली—'वैरी चिंती ना तं हे मेलं मन चिंतित !' गोपाळभटजी डोळ्यातून टिपे गाळीतच लगालगा परतले. तार त्यांच्या वडील मुलीकडचीच होती ! रानपाटच्या खोतांनी—त्यांच्या जावयांनी—त्या तारेने कळविले होते की,

'त्यांची वडील मुलगी अत्यवस्थ. सासूबाओींना नि कुसुमला जेवत असल्यास तर हात धुवायलाच अिकडे शुश्रूषेसाठी धाडा ?'

'जेवत असले' तर कशाला? जेवण्यास सुद्धा न बसता, पाण्याचा घोटदेखील न घेता तातडतोब गाडी करून कुसुमसह गंगाबाओी रानपाटला त्वरेच निघून गेल्या.

पण त्या तिथे पोचतात ताच ती त्यांची वडील मुलगी मृत्यूच्या पाशात न सुटशी अडकून आली होती. आपल्या आओीला नि कुसुमला तिने डोळे भरून काही वेळ पाहिले, वाचा बंद म्हणून हात तेवढा कुसुमच्या तोंडावरून फिरवला, त्या दणासरशी हंबरडा फोडलेल्या आओीच्या मांडीवर आपली लग्नता मान अेक वेळ

पोटीच पत्नीच्या सुतकाचे दहा दिवस अुलटतात न अुलटतात तोच त्याना वाटले की कुसुमच्या शिक्षणाचा भारा भार आपण घ्यावयाचे सासूबाअींना आश्वासून तिला अिथेच ठेवून घ्यावे सासूबाअींनी परत घरी जायचे नाव काढले तेव्हा खोत म्हणाले,

'मला तुम्हीच आयीच्या ठिकाणी होतात ज्या आम्हास अंतरल्या त्या अंतरल्याच; तिथ त्याचा आमचा अुपाय खुटला. पण आपण जी मायेची माणस अुरलो आहोत त्यानी तरी अेकमेकाना अंतर देअू नये यापुढेही मला आपण आअी-च्याच ठिकाणी असाव. आपण जाअू म्हणता ते ठीकच. गोपाळभटजी काही झाल तरी अिकड येअून राहणार नाहीत त्याच्यासाठी आपणालाही तिकड जाण भाग; पण हे लेकरू आहे ते तरी मायेच माणूम म्हणून, आपल्या कुटुंबातील ममतेची साखळी म्हणून मजजवळ ठेवाव सैंपाकी, गडी घरी आहेतच तिच्या सेवेला, तिच शिक्षण, लालनपालन मी तिच्या वडिलांअितक्याच ममतेन करीन '

'क्वचित् अधिक ममतेनसुद्धा कराल, वर ते सगळ झाल तर तिच शिक्षण होअील अिकडच पण सध्या मी तिला नेते आणि मग वडिलाचा विचार घेअून लवकरच धाडून देते परत!' सासूचे हे बोलणेच योग्य असे समजून खोतांनीही यास अनुमति दिली.

गगाबाअींनी घरी परत येताच वेळप्रसग पाहून गोपाळभटजींपुढे ती गोष्ट काढली. खोतांशी जुळलेला नात्याचा संबंध नि त्याचे पाठबळ तुटू नये ही भटजी-चीही अुत्कट अिच्छा होतीच. कुसुमच्या शिक्षणाची नसली तरी लग्नाची चिंता याना आधीच लागलेली! तिला बारा वर्षांची पोडनवरी करून कुळास बट्टा लावायचा नाही हा त्याचा निर्धार! त्या मन स्थितीत खोतांचा हा बेत अैकताच गोपाळभटजींच्या मनात अचानक अेक योजना जुळून आली.

बहिणीवर खोतानाच कुसुम देअून टाकली तर? सगळेच मनासारखे जुळणार! शास्त्रमर्यादेचा प्रश्नच नव्हता चालू शिष्टाचारास ते अगदी धरून होते. 'अस ममतेच, जिव्हाळ्याच, सुखवस्तु ठिकाण कुसुमला तरी कुठ पाहणार आम्ही! मुलीच भाग्यच म्हणायच हे सगळ जुळल तर!'

'लग्नाची मुलगी लग्नावांचून परक्या घरी अशी ठेवणे हें आपणांस रुचणार नाहीं; दहा लोक हसतील, तेव्हां कुसुमचें लग्न करायचें तर तें लगेच करावे हें अुत्तम. अितकेंच नव्हे, तर पुढे चातुर्मास, मुहूर्त नाहीत, म्हणून अगदी याच महिन्यात तें मंगलकार्य अुरकल्यास ठीक. टिपण जुळतें आहे—' असें, जरा निर्वाणीचा झोक असलेलें अुत्तर गोपाळभटजींनी धाडले. त्यांना धास्ती होती की, दिवसगत लागल्यास न जाणो खोतांना दुसरें अेखादें हुंड्याचे ठिकाण देखील येअील, त्यांचें मन बदलेल! कुसुमच्या तोंडचा घास काढून घेण्यास टपलेल्या बारा वर्षांच्या 'घोडनवऱ्या' घरोघर त्यांना आढळत होत्याच! या शंकेमुळे मुलीनें कल्याण व्हावें या सदिच्छेनेच गोपाळभटजींनी लग्नाचो घाअी चालविली. त्याचा हा बेत त्यांच्या कक्षेतील भट-भिक्षुक-शास्त्री मंडळींनी शास्त्रोक्त आणि शिष्टांनी शिष्टसंमत ठरविलेलाच होता. काही बापाबापड्या 'अिश्श ऽऽ' म्हणत. कुटाळ लोक मोळ देत, पण शास्त्राची टिपणांची वा शिष्टाचाराची अशी काहीं अडचण नव्हती.

खोतांच्या कक्षेतील भट-भिक्षुक-आप्तेष्टांनीही त्या योजनेस शास्त्रोक्त [illegible] शिष्टाचारास धरूनच आहे, अशा प्राप्तकार्याचा निर्वाह असा अनेक वेळा करावा लागतो, वहिणीवर मेहुण्याला बहोण देतातच असा अभिप्राय दिला. खोतानीहं बेत पसतिला, लग्न जुळलें, मुहूर्त ठरला, भट-भिक्षुक-आप्तेष्ट निःसंकोचपणे मिळाले सर्व सोहाळे यथाशास्त्र यथामाग होअून अकरा वर्षांच्या आत असलेल्या त्या मुलीं कुसुमचे, लग्न त्या तिच्या वडील वहिणीच्या विधुर झालेल्या प्रौढ नवऱ्याशी, त्य वडील वहिणीस मरून अेक वर्ष उलटतें न उलटतें तोंच, वाद्यांच्या आनंदी गजरा

लावणारे तिशीपस्तिशीचे बिजवर खोत! पन्नाशीनंतर लावलेल्या आपल्या तिसऱ्या विवाहापासून झालेल्या त्या दहा वर्षाच्या मुलीचे तिच्या वडील बहिणीच्याच नवऱ्यास तसे कन्यादान करणारे शास्त्रमर्यादाभिमानी गोपाळभटजी! आणि त्या सासऱ्या-जावयाच्या तिसऱ्या दुसऱ्या विवाहाप्रमाणेच त्या दहा वर्षाच्या अल्लड मुलीच्या विवाहासही शास्त्रोक्त नि शिष्टाचार संमत मानून तो यथासांग स्वतः पार पाडणारा भट भिक्षुक-आप्तेष्ट शिष्टादिकांचा समाज!

त्यातही हे समाजचित्र अर्वाचीन नव्हे दहा वर्षापूर्वीचे-अगदी ताजे!

✦ ✦ ✦

लग्न लागल्यानंतर लगेच कुसुमला खोताकडे पाठविण्यात आले. त्यांनी तिला शक्य त्या त्या अुपायांनी सुखात ठेवण्याचा यत्न केला. लग्न झाल्यामुळे शाळेत धाडण्याचा प्रश्नच राहिला नव्हता! पण कुसुमला खोतांनी घरी स्वतः मासिके कादंबऱ्या नाटके वाचण्याचा नि अैकण्याचा चांगला नाद लावला. कुसुम बुद्धीची कुशाग्र, देहाने अुफाड्याची नि स्वभावाने तरतरीत मुलगी होती. हळुहळू तिचे मनही सासरी रमू लागले. तिचे असे स्वतंत्र बौद्धिक विचार बनू लागले. काय हवे काय नको कळू लागले. कामुक भाव जागू लागले, रुजू लागले. घरच्या संसाराचेच नव्हेत तर सार्वजनिक अुठाठेवीही करावयाशा वाटू लागल्या. एकंदरीत खोतांशी झालेल्या विवाहामुळे तिचा संसार सुखातच जाअील असा रंग दिसू लागला. गोपाळभटजींना आणि गंगाबाअींना आपल्या मुलीचे कल्याण झालेले पाहून जी कृतकृत्यता वाटे तिला तर पारावारच नव्हता.

कुसुमच्या लग्नाला आता वर्ष दीड वर्ष होअून गेले होते. गंगाबाअींनी पाहिले का गोपाळभटजी आज बरेच रंगात दिसत होते. पहाटेच स्नानसंध्या आटोपून गाअीम्हशींचे दूध काढून त्या चरायला गड्यापाशी सोपवून ते सांगत होते — अमक्याला जिन्नस अुधारीचे धाडा, तमक्याकडून दुधाचे पैसे येणे ते आणा. दूध विकायला गडी जाताच भिक्षुकीसाठी बाहेर जायच्या आधी ते अेक स्तोत्र म्हणत गंगाबाअींकडे आले नि सहजी जिज्ञासले

तोंच अंगणांतून आवाज आला 'तार ! गोपाळभटजी, तुमची तार !!'

जळता निखारा पायावर पडावा तसा तो भयंकर शब्द त्या बिचाऱ्या नवरा-न्यायकोच्या कानावर पडला !

'तार !' गोपाळभटजींच्या जन्मातली ती तिसरी तार! मागची तार त्यांची वडील मुलगी अत्यवस्थ असल्याची होती. ही तार त्यांचा जावई कुसुमचा नवरा अत्यवस्थ असल्याची होती !

गंगाबाअी तर तिथल्या तिथेच खचून खाली बसली. गोपाळभटजी तिला कसेबसें अुठवून गाडी करून स्वतःबरोबर घेअून कुसुमच्या सासरी तावडतोब निघाले. तिथे पोचतात तोंच घरातून रडारडीचा अेकच आक्रोश त्यांच्या कानावर आला. कुसुमचा नवरा बाधा होअून तडकाफडकी वारला !

बारा वर्षांची कुसुम बालविधवा झाली ! हें तिसरें समाजचित्र पहा ! वाचक *हीं समाजाचीं चित्रें नव्हेतच, छायाचित्रे आहेत तीं ! अगदी यथावत् !*

\+ \+ \+

कुसुम मानवी शास्त्राधारें बालविधवा झाली; पण निसर्गाचें शास्त्र मानवी शास्त्राधाराला थोडेंच भीक घालणार ! दिवसेंदिवस यौवन तिच्या अंगात वहरू लागलें. भोगेच्छा सळमळू लागल्या; पण सासरहून तिला गोपाळ भटजींनी माहेरी आणन जी कोंवली ती पुन्हा काहीं अंगणाबाहेर जाअू दिली नाही. तिच्या नात्या-गोत्यांच्या घरीं लग्नकार्यें, गौरी-गणपति होत. तिची वयातीत आजी समारंभांना, मिरवणुकींना, हळदी-कुंकवाला जाअी; पण ती भोळा सनराची, भर हौसेच्या वयाची नि मूळच्या खेळकर स्वभावाची कुसुम अेखाद्या घातक अपराध्यासारखी घरातच डांबून ठेवलेली राही. ती गोरी असताना नि तिचा काहीं अेक अपराध घडला नसताही तिच्या तोंडाला कसली काय काळोखी फासली गेली ! समाजात तिला अेखाद्या अशुभासारखी, चोरासारखी, तोंड लपवून जगण्याची पाळी आली. अेकदा तर टाळूपर्यंत भाग फाटलेल्या गावसामूने तिच्या तोंडावर तिच्या भरदार

पहिल्या छुकड्या लेकराचा निमुळता हात हातात खेळवीत जेव्हा त्याला पाजीत बसताना ती पाही, तेव्हा कुसुमला वाटे, आपणही झपकिनी त्या गोड तान्ह्याला घेऊन छातीशी तसेच पाजावे पण ह्या वासनेच्याही उत्कट वासनेचा उच्चार म्हणून तिला उघडपणे करण्याच लवलेश धैर्य नव्हते उलट त्या लपविण्यासाठी ती वरवर त्याचा तिटकारा दाखवी

(रमणीचे जीवन म्हणजेच रति आणि वत्सलता !) ह्या दोन्ही जीवनप्रवृत्तीच तिच्या जीवनातून वजा घातलेल्या, वर्ज्य घातलेल्या ! तिचे जीवन तिला असह्य झाले आणि ते अगदी सुसह्य आहे असे आजीबाबांना भासावे, त्यांना मुलगी विषण्ण अशी न वाटावी म्हणून वरवर दाखविणे तर तिला भाग त्यामुळे तिचा स्वभाव लपंडाव-निष्णात होऊ लागला दहा बाया जमल्या की, गावातील वा जगातील स्त्रीपुरुषांच्या बऱ्यावाईट भानगडी हसून करायच्या, तशा गोष्टी निघताच कुसुम, 'इश्श ऽऽ ! मला नाही बाई अशा पाचकळ गोष्टी आवडत' असे म्हणत फणकारून निघून उठून जावे, पण आडोशाला उभे राहून शक्य तावर त्या गोष्टी आवडीने ऐकाव्या अशा परिस्थितीतील अनेक तरुण कुमारिकांचा नि बालविधवांचा स्वभाव समाजभीतीमुळे जितका मिथ्याचारी बनतो की, असल्या ज्या विषयाचा त्या तिटकारा दाखवितात त्या त्यांना नक्की हव्याशा असतात असे समजावे 'हे मुळीच आवडत नाही मला अं ! असे त्यांचे पणकार्याचे वाक्य 'हे मला फार आवडते अं !' याच अर्थी बहुधा योजलेले असते !

मनातल्या मनात ती बिचारी बालविधवा कुसुम अशी कुढता कुढता तिला अठरावे वर्ष उलटत आले ! गोपाळभटजींना पन्नासाव्या वर्षी ज्या कारणाकरिता तिसरे लग्न करून त्यांच्या विजवर जावयाचा संसार पुन्हा थाटणे योग्य वाटून वडील मुलीच्या मृत्यूनंतर एकाच वर्षाच्या आतबाहेर, ज्या कारणाकरिता आपली दुसरी दहा वर्षांची मुलगी त्या जावयाला देणे त्यांना माणुसकीचे शिष्टाचाराचे नि शास्त्रसंमत वाटले त्यापैकी कोणत्याही कारणासाठी या यौवनाने मुसमुसत राहिलेल्या आणि आता जरत्वतन धुरणीस लागलेल्या आणि बाराव्या वर्षी बालविधवा झालेल्या मुलीचा पुनर्विवाह करणे किंवा तिला नुसते मनमोकळे अंगणाबाहेर जाऊ देणसुद्धा माणुसकीचे वाटले नाही !

हाय रे! शेवटी कुसुम कुरणामच लागली अतृप्त वासनांच्या मानसिक कळा तिला सारख्या जाळीत ! त्यायोगे तिची क्षीणता वाढत वाढत तिला बारीक ताप येऊ लागला तिने अंथरुण धरले आजी तळमळे पण ती आपधपाणी काय करणार ? पैशाचे पाठबळ नाही आणि तितकी चिंताही नाही म्हणून डॉक्टर पाहण्याचे नाव गोपाळभटजी कसले काढणार ? गंगाआजी हे जाणतच होत्या पण तरीही त्या माउलीने एक युक्ति योजून कुसुमचा जो एक मावसभाऊ चालता डॉक्टर झाला होता त्याला घरीच काही दिवस राहावयास बोलावून विनामूल्य कुसुमची प्रकृति

परीक्षून घ्यावी असा घाट घातला नि मोठ्या मिनतवारीने त्यास यजमानाची अनुज्ञा मिळविली.

कुसुमचे मावसभाअू डॉ. गोविंदराव पत्र पावताच आले. कुसुमची प्रकृति परीक्षिताच त्यांनी ताडलें की, दुखणें मानसिक हृद्रोग काय तो! गोपाळभटांच्या मागे गंगाबाअींनी गोविंदरावांशी मनमोकळेपणें बोलण्या-वसण्याची सवलत कुसुमला देत असावें. दोनचार दिवसातच गोविंदरावांनी तिच्या मनाची सारी व्यथा युक्तिप्रयुक्तीने तिला हसवून खेळवून समजावून घेतली. त्या हसण्याखेळण्याचा तिच्या प्रकृतीवर तत्काल अितका चांगला परिणाम झाला की, ती दुसरीच कोणी ताजीतवानी कुसुम दिसू लागली. डॉ. गोविंदरावानाही तिचें वाचन, बहुश्रुतता नि बुद्धि पाहून कौतुक वाटे. त्यांनी तिला तिच्या मानसिक व्यथेचें मूळ स्पष्टपणें समजावून दिले आणि अशान काही बालविधवांनी धीटपणें स्वतंत्र होअून आपलें शिक्षण वा पुनर्विवाह करून सुखाचे संसार कसे थाटले त्याचीं अुदाहरणें सांगितली. शेवटी तिला आश्वासिलें—

'तुझी अिच्छा असल्यास मी तुझ्या शिक्षणाचा भार अुचलीन. म्हणशील तर तुझा कुठल्यातरी चांगल्या स्थळी पुनर्विवाहही लावून देता येअील. तुझ्यासारख्या सुबुद्ध, सच्छील, सुरेख नि निर्कोप तरुणीच्या अुदरी दोनतीन देवदूतासारखी बाळं अुपजून तुझ्या कुळाला आणि आपल्या राष्ट्राला धन्य करतीलही क्वचित्! अुगीच का झुरावं! मग काढू का हा विषय स्पष्टपणें तुझ्या वडिलांपाशी?'

(नवस ही अेक देवाच्या नावे चाललेली दैवी लॉटरीच नाही काय? मानवी लॉटरीत शेकडो वेळा पसंगत होत पण केव्हातरी लागोपाठ तीन टोले हाणून दहा हजारात अेकाधाला अखादं पारितोषिक मिळून जाते नवसाचेही तसेच आहे शेकडो वेळा नवस खोटे ठरतात जो जो मनुष्य आजारी पडतो त्याच्या बरे होण्यासाठी बहुधा दहापाच नवस होतच असतात पण लाखांनी माणसं मरतच असतात! तितके लाखो नवस खोटे पडतातच की नाही? लहान माणसांचे कावडी वरूरा कापण्याचे नवसच नव्हेत तर मोठमोठ्या राजे-महाराजांच्या प्राणांतिक दुखण्याच्या महादानाचे नवसही खोटे पडतात पहिले माधवराव पेशवे क्षयाने मरणी टेकले तेव्हा गोपिकाबाअींनी साऱ्या महाराष्ट्र राज्यभर ठिकठिकाणी हजारो ब्राह्मण बसवून देवळादेवळी अधिकाऱ्यांच्या सक्त देखरेखीखाली मृत्युंजय मंत्राचा कोटी जप करविला पण ती कोटीची संख्या पुरी झाल्याची बातमी येते तोच माधवराव पेशवे मरायचे ते मेलेच! तो नवस व्यर्थ गेला! पानपतची स्वाअी जिंकली गेला तर लाखो रुपयांच्या धर्मादायाचे नवस मोठमोठ्या जागृत देवदेवतांना पेशव्यांनी केले होते पण ते सारे विफल होअून पानपती महाराष्ट्राची दोन लाख बांगडी फुटली! पण हे खटके पडलेले लाखो नवस आपण विसरून जातो — आणि मुलगा व्हावा म्हणून जिजाबाअीने केलेला भवानीचा नवस योगा-योगाने सफल होअून शिवाजी जन्मला तर त्या अेकट्या दुकट्या नवसावर कथा रचल्या जातात पोवाडे गायिले जातात! ज्या ज्योतिषाची लाखो भविष्ये खोटी पडतात त्याचे काकतालीय न्यायाने अेखादे भविष्य खरे ठरताच तो तवडंच आपल्या प्रसिद्धकात (जाहिरातीत) छापून प्रख्यात ज्योतिषी म्हणवितो तसेच ह्या नवसाचे प्रस्थ भावड्या लोकांच्या विस्मृतीवर काय ते अुभारलेले असते खोटे पडलेले लाखो नवस विसरून सहजगत्या वा गफलतीस गाठ पडताच नवसावाचूनही ज काय ज्या साधनांनी शेकडो वेळा घडले तेच त्याच साधनांनी घडघडीत पडले असताही त्या वेळी केलेल्या नवसानेच ते केले असे भोळे लोक मानतात आणि देवदयाच नवसाचा काय तो चहूकडे बोलबाला होअून देव नवसास कसा पावतो पहा, म्हणून जो तो म्हणू लागतो जो तो नवसाच्या दैवी लॉटरीची तिकीटे दर्शनीहुंडीप्रमाणे त्यास अमोघ फलीच मानून पुनःपुन्हा काढीत असतो

अेक वेळ मानवी लॉटरीला तरी थोडबहुत बूड असते पण ही नवसाची दैवी लॉटरी अगदी चकचकीत बिनबुडाची असते मानवी लॉटरी निवळ फसवणु-कीची ठरली तर सरकार कधीकधी त्या भामटेगिरीच्या चालकांना दंड तरी करते पण देवाला दंड कोण करणार? त्याच्या नावे चाललेल्या या नवसाच्या दैवी लॉटरीची सारी तिकिटे जरी खोटी ठरली तरी कोणी विचारता ना पुसता! अेखाद्याचे सारे नवस खोटे ठरले तरी दोष कोणी कोणास दिलाच तर त्या फसलेल्यासच दिला जाणार! 'तुझा भावच खोटा म्हणून तुझ्या नवसाला देव पावला नाही!' असेच जो तो म्हणणार! पण तरी देखील—

अितक्यात मागे दार करकरलें. गंगाबाअी अुम्या असाव्यातसें तिला वाटलें — आणि तिच्या मनाने भयंकर अुचल खाल्ली ! तिने गोविंदरावांना दूर ढकललें. आअीने हें पाहिलें असल्यास आपल्यावर अेका अक्षराचाही बोल येअू नये म्हणून ती ताडकन् तशीच आअीकडे गेली नि रागाचे रडें रडू लागून स्फुदली —

'आअी, गोविंदा वाअीट मनुष्य आहे ! मला सहज पाठमोरी पाहताच त्याने पट्ट मिठी मारली आणि — किती दुष्ट असतात हे पुरुष ! ! '

तोंड हातात झाकून ती हुदके देअू लागली ! तिच्या आअीला ती अितकं खोटं बोलेल हें शक्यच वाटेना !

'गोविंदाला म्हणाव, तू आता घराबाहेर जा ! मी त्याचं पुन्हा तोंड पहाणार नाही ! बाबा येण्याच्या आधी जा म्हणावं !

कुसुमने कपटी कोपाची पराकाष्ठा केली ! — आणि ती किती सहज साधली तिला ! — किंबहुना त्या वेळेपुरतें तेंच तिचें सगळें मन होतें, दुटप्पी कपटाला लागतें तसें तिचें दुसरें मन म्हणून जें होतें तें त्या भीतीच्या धक्क्याने तेवढ्यापुरतें तरी चक्काचूर होअून गेलें होतें ! !

लाखो तिकिटे फुकट जातात तरीही जशा लॉटऱ्या चालल्याच आहेत तसे लाखो नवस फुकट पडतात तरीही लोक नवस करीतच आहेत !!)

गोविंदा गवळ्यानेही त्या दाही साडतीची तिकिटे काढली. प्रथम लॉटरीचे तिकीट काढले नि ते यशस्वी व्हावे म्हणून त्याचे कुलदैवत जे मोरया त्याला नवसही केला ! नुसते लॉटरीच्या तिकिटात यश यावे म्हणूनच नव्हे तर आपल्या मुदुखावरची सारी संकटे टळावी यास्तव त्याने संकष्टीचतुर्थीचेही व्रत केले.

\+ \+ \+

त्या गांवात गोविंदा गवळ्याच्या ओळखीचा एक कासम नावाचा मुसलमान मनुष्य होता. त्यानेही लॉटरीच्या व्यसनात विशेष रुपये दवडले नी दमडाही कमावला नव्हती. त्यानेही गोविंदाबरोबर एक तिकीट त्याच लॉटरीचे घेतले. मोरयाच्या नावे गोविंदाने नवस केला. तसाच आपणही खुदाचा वशिला लॉटरीकडे लावावा म्हणून कासमनेही त्याच्या गावी गडदारखिचडी प्रभृति नवस पीराच्या नावे घेणाऱ्या एका फकिराकडे जाऊन पीराला नवस केला. नवसाच्या लाटेच्या हिंदूतच भरमराट झालेल्या आहेत असे नाही. हिंदु एकपट धर्मभोळे तर मुसलमान सातपट धर्मभोळे. इतकेच नव्हे तर ते त्या व्यतिरिक्त बहुधा धर्मवेडे नि धर्मोन्मत्तही असतात. देव पावला नाही तर फार तर फार हिंदु देवापुढे आपलेच डोके फोडील. पण मुसलमानात खुदाने पावावे म्हणून दुसऱ्याचे डोके फोडण्याचा नवस देखील करणारे अल्लाउद्दीन खिलजी किंवा माय ब्रह्म मोपला प्रदेश ' काही थोडेथोडके निघत नाहीत.

हेच कशाला. वाटमारे नि ठग यांच्याही देवता असतात ! आणि लग्नाची वऱ्हाडे लुटण्यात जर आम्हाला या वर्षीच्या लग्नसराईत खूप यश मिळेल तर कोणातरी वधूवराचे रक्त तुला वाहू किंवा एखादा तरी नरबळी तुला देऊ म्हणून नवस ते करतात आणि त्या नवसालाही केव्हा केव्हा देव किंवा खुदा पावतो !! वास्तविक दरोडेखोरांना ज्या मानाने त्यांची तडफ क्रूरता नि धारिष्ट्य जाजोर असतात त्या मानानेच दरवडयात यश मिळते. देव वा अल्ला स्वतः कधीच दरवडयात भाग घेत नाही किंवा नवस करून ज्ञापा गेलेल्या दरोडेखोर भक्तासमोर स्वतः दरोडा मारून देव वा खुदा दरवडयाचे द्रव्य आणून ओतीत नाही. पण दरोडेखोर यश पावतात त्यांच्याच प्रत्यक्ष प्रयत्नाने आणि समजतात ते नवसाने मिळाले म्हणून ! त्यांचेही शेकडो नवस लटके पडतात पण ते विसरून जो एखादा योगायोगास गाठ पडून खरा ठरल्यासारखा भासतो तेवढाच ते ध्यानात ठेवतात नि नवसाच्या बिनबुडी लॉटरीचे अभिमानी बनतात !

लॉटरीच्या निकालाची तारीख उलटली. गोविंदा गवळी नि कासम दोघेही टपालवाल्याच्या वाटेकडे प्रत्यही सकाळपासून डोळे लावून बसू लागले. तो दिसताच

'आमचे काही आहे का ?' म्हणून धडधडत्या काळजाने विचारीत त्या टपाल-वाल्याने स्थितप्रज्ञ मुद्रेने नकारार्थी मुंडी मान हालवून पुढे चालू टाकले की त्यास त्या टपालवाल्याबाबत अगदी मनापासून राग येई गोविंदा लगेच मनाला म्हणे, 'दैवास दोष ! तो टपालवाला काय स्वतः च मला हवे ते पत्र लिहून धाडणार होता की काय !' आणि चूप राही पण कसमने तिसऱ्या दिवसापासून आपल्या निराशेचा राग त्या टपालवाल्यावरच काढण्यास आरंभिले 'क्या साला मगरूर है यह पोस्टमन ! हाथ मे चिठ्ठी है या नहीं देखता भी नहीं ! इस काफरकोही लाठीसे जरा नरम करना पडेगा, तब यह डाकू जिसका खत उसको ठीक वक्तपर पहुचायगा !'

तीन चार दिवस आणखी गेले तो गणेशचतुर्थी आली त्या दिवशी घरातून गोविंदा म्हैस सोडूनबिडून बाहर पडतो तो टपालवाला नीट त्याच्याच दाराशी येताना दिसला

'गोविंदा, तुझी मनीऑर्डर आली आहे' टपालवाला म्हणाला

'काय आली ? मनीऑर्डर ? माझी ?

'होय शंभर रुपयाची !'

गोविंदा गवळ्यास उभ्या जन्मात स्वतःच्या नावे मनीऑर्डर येण्याचा हा पहिलाच प्रसंग ! त्यात ती शंभर रुपयाची मनीऑर्डर ! खरी दलील वाटू नये इतकी चांगली ती बातमी ! गोविंदाचे ऊर धडधडू लागले सहीबिही कुठे करायची ते टपालवाल्याने सांगितल्याप्रमाणे सुन्नपणे सारे करून शंभर रुपये त्याच्या हातात पडले, तरी त्याला ते नक्की काय घडत आहे ते आकळेना सोबतचे पत्रही नव्हते लॉटरीत त्याचा क्रमांक कुठेसा येऊन त्याला शंभर रुपये मिळाले इतके मात्र अगदी खरं !

शंभर रुपये ! एक रकमी ! अगदी रोकड ! त्याचे हाती !!! मरे मरेतो खपून पाचपंचवीस रुपयापलीकडे ज्याच्या घरात कमाईची रक्कम म्हणून जन्मात दिसली नाही त्याला कावाडकष्ट न करता अचानक शंभर रुपये रोख मिळावे ! खरोखर लॉटरीसारखा धंदा नाही मारम्यासारखा दव नाही, नवसा-सारखी मोडत नाही !

त्याच दिवशी गणेशचतुर्थी त्यामुळे मोरयाला केलेल्या नवसामुळेच हे घडले आहे, अशी त्याची पक्की निश्चिती झाली त्याच्या बायकोच्याही आनंद हृदयात मावेनासा झाला ती म्हणाली 'तुमचा नवस लॉटरीपुरता जसा खरा झाला तशीच संकष्टीचतुर्थीची प्रचिती येऊन तुमचा आजार बिमारी, झिडापिडा, समदी संकट आता टळणार ! चांगले दिवस आगले दर बाप्पा मोरयाने !'

ह्या वर्षी गोविंदा गवळ्याने गणपतीचा उत्सव मोठ्या गाजावाज्याने केला.

साऱ्या गावात त्याला लॉटरीची रक्कम मिळाल्याची आणि ते यश गणपतीला केलेला नवस सफळल्यामुळे आल्याची अद्भुत कथा ज्याच्या त्याच्या तोंडी झाली

कासमला लॉटरीत काही मिळाले नाही त्याचा पीराला केलेला नवस विफळला, हीही टीका जो तो करू लागला त्यामुळे कासम नि पीराच्या नावे नवसाची लॉटरी काढून बसलेला तो फकीर हे मात्र चिडून गेले असले नवस या जगाच्या यशापयशाच्या प्रश्नी फुकट असतात हे सत्य शिकण्याचे सोडून कासमने नि फकिराने गोविंदास नि त्याच्या मोरयास यथेच्छ शिव्या हासडल्या 'देख लेंगे तेरे को भी' म्हणून कासमने मूठ वळवून गोविंदाच्या ताटावर हातवारे करीत धमकावले गोविंदाही कच्च्या मातीचा नव्हता 'जा रे ! अशा कावळ्याच्या शापाने ढोरे मरत नसतात ! जा !' म्हणून कासमलाही धिक्कारिले

✦ ✦ ✦

आज साऱ्या गावभर गणपति बोळविण्याची धादल चालू आहे सारे मार्ग 'मोरया ! मोरया' ! अशा जयजयकाराने घुमत आहेत त्या साऱ्या जयघोषाहून अुच जयघोष होता गोविंदा गवळ्याचा याची चिमुकली गणपतीची मूर्ति आपल्याच हाती अुच धरून 'मोरया ! मोरया !' गजत तो पुढे आणि त्याची मुले टाळ्या वाजवीत मागे, अशी त्या बापड्याने आपल्यापरी मोठी थाटाची मिरवणूक काढून गणपति समुद्रावर आणला अत्यंत भक्तिभावाने मनात आभार मानले— 'देवा मोरया, मला लॉटरीत यश दिलेस, माझ्या नवसास पावलास ! संकष्टी चतुर्थीचे व्रतही सफळवून तू माझी सारी संकटे निवारशील निवारशील ! गणपतिबाप्पा मोरया, पुढच्या वर्षी लवकर या !!' असे गर्जून ती ल्हानशी मूर्ति हाती घेऊन त्याने समुद्रात अुडी घातली आणखीही दहापाच कसलेले पाहणारे त्याच्या मूर्ति सगळ्याच्यापुढे बुडविण्यासाठी पाहत निघाले गोविंदा कसलेला

गणपतीचें घर जें कैलास — थेट तेथे गणपति गोविंदास घेऊन गेला. गणपती-बरोबर शक्य तितकें पुढे जाता जाता गोविंदा थेट कैलासास गेला ! गोविंदा कैलासवासी झाला !!'

+ + +

गोविंदाच्या ज्या अंगणात तिसरे प्रहरी ती आनंदाची मिरवणूक मातली त्याच अंगणात तिन्हीसांजा अुलटून जातात न जातात तोंच अेकच रडारड माजली! त्याची धायधाय रडणारी बायको, त्याची मुलें, समजावित्या शेजारच्या आया-बाया — अेकच आकांत झाला ! आपल्या नवसास पावून आपली सारीं संकटें दूर करणारा म्हणून ज्या मोरयास मिरवत आणलें त्यालाच मिरवत नेतांना त्याच्याच पायी आपल्यावर हें महासंकट गुजरावें, ' असा माझा घात देवा, तू केलास तरी कसा ?' असें विचारून ती विचारी गोविंदाची बायको विवळत होती ! तिचा अुपाध्याय पांडुभटजी तिथे येअून शक्य तें समाधान करूं लागला तों ती अधिकच तळमळून हंबरली, ' भटजी, भटजी, माझ्या गोविंदाने किती हो कळवळून आताच देवास विनविलें होतें — गणपतिबाप्पा मोरया, पुढच्या वर्षी लवकर या ! भटजी ! मोरया पुढच्या वर्षी येतीलच, पण माझा गोविंदा मात्र आता पुन्हा — ! हाय रे देवा, हाय !'

पांडुभटजींच्या देखील डोळ्यास टचकन् पाणी आलें तें अुपरण्याच्या पदराने टिपीत आहेत तोंच —

'क्यों, पाडुभट, अब रोते हो क्यों भाअी ? अब तुम्हारे मोरयाके नामसे रडो — देवके नामसे क्यों रोते हो !' त्या झोपडीच्या अंगणातील हिरवळीवर अुभा असलेला आणि दश धरून अचानक निपाजलेल्या नागासारखी त्याच्या मानेची फणा अुर्मटपणे अुभारलेला कासम होता तो ! 'मोरया नवसास पावतो ना ? या गोंद्याचीं सारीं संकटें तो हरणार होता नाही ? दिलें लॉटरीचें तिकीट नी हरून नेला प्राण! ये तुम्हारे मिट्टीके देव देखो ! अब तो फेंक दो अुनको और भजो हमारा पीर ! आमच्या खुदाला जो नवस करतो त्याचे निदान प्राण तरी जात नाहीत ! मोरयाला भजणारा गोंद्या मेला — पण मी ? मोरयाला दगड म्हणणारा

तशा सरोसरच घडलेल्या विवाहांच्या आणि विवाहविषयक घटनांच्या वैयक्तिक सत्यकथा ह्या, निर्भेळ वृत्तान्ताचे मालेखात, उपयोगी पडणाऱ्या असतात; आणि केव्हा केव्हा कल्पिताहून अधिक आकर्षक नि रोमहर्षण असू शकतात.

समाजाच्या वास्तव परिस्थितीवर लख्ख प्रकाश पाडणारी अशीच अेक सत्य-कथा आणि त्याच विवाहविषयक प्रकरणी आम्हास श्री. पित्रे ह्यांच्या तोंडून अैका-वयास मिळाली, ती पूर्वी त्याच्या स्वत:च्याच होवू घातलेल्या दुसऱ्या लग्नाची. त्यांच्या स्वत:धीन कागत तीन असताहो ती त्यानी स्वत:च न लपविता सांगितली. ह्यावरून नि त्यांच्यासारख्या सरळ मनाच्या सद्‌गृहस्थाने ज्या निष्कपट सहजपणे ती सांगितली त्यावरून ती जवळजवळ अक्षरश: खरी आहे अशी ग्वाही आमचें मन देत होतें. पण तरीही ती आम्ही त्यातील दोषानिधा महत्त्वाच्या निष्पक्षाकडून पडताळूनही पाहिल्यामुळे तिच्या सत्यतेविषयी आम्हांस शकाच अुरली नाही.

आजचा काळ तर बोलूनचालून शारदा निर्बंधाच्या कलियुगाचा! पण जेव्हा 'अष्टवर्षा भवेत्कन्या'चा अगदी सत्ययुगीन काळ होता तेव्हा त्या सनातन सूत्रा-प्रमाणे चालणाऱ्या धर्मशील लोकांचीही विवाहनीति प्रसंगी काय काय रूपें धर हें यथातथ्य दाखविण्यासही सत्यकथा अेखाद्या आरशासारखी कामी येते. त्या सभ पणाचा महत्त्वाचा भाग असा :—

'म्हणजे? तुम्ही पेशावरकडे नोकरीवर असतानाच तुमचें पहिले कुटुं अिकडे वारले? त्या कुठे असत?'

'माझ्या पत्नी म्हणजेच सौभाग्यवती अिंदिराबाअी पित्रे! तुमच्या अित डॉक्टरांच्या नातलग लागत त्या, आलें ध्यानात? त्या वारल्याचें कळताच मी ती दीडशे रुपये दरमहाची पेशावरची नौकरी सोडून तडक महाराष्ट्रात परत फिरलो तिकडील मंडळींनी पुष्कळ म्हटलें की 'पित्रे तुम्ही असे वैरागी काय होता अेक-दम! नोकरी सोडू नका.' पण मी काही अैकले नाही. तडक पंढरपूरला परत आलो. पहिलें कुटुंब जे वारलें त्यापासून झालेली माझी दोन लहान मुलें त्याच्या आजोळी पोचविली आणि रामभाअूनी बोलावल्याप्रमाणे त्यांच्या भेटीस गेलो. जाताच राम-भाअूनी मला स्पष्टपणे सांगितले की 'तुमच्या मनात असेल तर छान मुलगी कोक-णात आत्ताचे आत्ता मिळण्यासारखी आहे. तेव्हा, पित्रे, तुम्ही ही लग्नसराअी हातची जाअू देअू नये. तुम्हास दुसरी काही अेक अुठाठेव करावयास नको. ज्यानी माझें दुसरें लग्न गेल्या वर्षी असेच बिनभोबाट जुळवून दिले ते धोंडभट जोशी हेच तुमचे हे लग्नही जुळविणार! मग चिंता काय! त्यांनी कोकणातल्या अशा अनेक मुलींची लग्ने देशावर जुळवून आपल्या घरी पार पाडली आहेत. तुम्ही नुसते अेकटे जरी तिकडे जाल तरी बाकीचे सगळे सोहाळे ते जोशीबुवा अुरकून घेतील नि येताना तुम्ही नवीन बायको खाकोटीस मारून जोडीने याल! माझें पहिलें कुटुंब निवर्तल्याचें अैकताच मला धोंडभटजीनी असेच अेकटे कोकणात बोलावून नेले

आणि आठदहा दिवसात सारा विधि अुरकून मुलगी माझ्या पदरात टाकून माझी सहकुटुंब पाठवण करून दिली. या, आत या असे. ही पहा ती मुलगी. हें आमचें द्वितीय कुटुंब. गेल्याच वर्षी लग्न झालें आमचें!' रामभाअूंनी असे अुत्तेजन दिल्यां-वर मीही विलंब न करता लग्न अुरकून घेण्याचें ठरविलें. रामभाअू माझे बालमित्र. त्यांना स्वतःच्या अनुभवाने जो जितका वर्ता नी विश्वासार्ह वाटला तो कोकणातील ह्या धोंडभटजींसारखा साहाय्यक काही वारंवार मिळणार नाही हें मी जाणून होतो. त्यातही रामभाअूंनी केलेली ती कोकणातील त्यांची दुसरी बायको चांगली चुणचुणीत, अकराबारा वर्षांची, त्या वेळच्या समजुतीप्रमाणें अुपवर पोर दिसली. श्रीमान् विधुरांना अशा मुली कोकणात मिळू शकतात असा त्या वेळी भारी लौकिक असे.'

'म्हणजे ही गोष्ट अशी घडली तरी किती वर्षांपूर्वी ? आपलें वय काय होतें तेव्हा ?'

'सरासरी तीन वर्षांपूर्वी. मी चाळिशीच्या वर्षाच्या आतबाहेर असेन.'

'बरं, पुढे ? तुम्ही मग काय कोकणात अेकटेच गेलात की धोंडभटजींशीं आधी मुलीच्या माहितीविषयी काही पत्रव्यवहार केलात ?'

\+ + +

'छे! मला गाजावाजा नको होता पुन्हा लग्नसराअी जवळ आलेली आणि रामभाअूंचे यशस्वी अुदाहरण डोळ्यापुढे. यास्तव त्यांनी सांगितल्याप्रमाणें पधरा-शेच्या नोटांचे पुडके अेका पैशाच्या कशात घालून नि तो कमरेस बांधून कोकणात निघालो, तो थेट धोंडभटजींच्या गावी जाअून त्यांच्या घरी अुतरलो. रामभाअूंनी सगळें कळवून ठेवलेच होते धोंडभट माझी वाट पहात होते, ओटीवर त्या खेड्या-तले काही भडारी होते. त्यांना मी का आलो हें कळलेले असावेसे दिसलें. कारण ते मी थोडा अिकडे तिकडे अुभा राहिलोसे पाहून आपापसात बोलत होते की मुळ्याच्या मुलीच बामणाशी जमलं तर बेस होअील बुवा धोंडभट काय म्हणतील ते करतील. त्या मुळ्याच्या तोंडच पाणी पळाल आहे. मुलगी तर गळी लागली. आता अकराव वर्ष लागणार. समद्या बाया विचारतात लगीन कधी करणार ! पण

प्रामाणिक लाटरीत काही तिकिटें यशस्वी व्हायचीच गोविंदाचे तिकीट अुचलले गेले म्हणून त्याला पारितोषिक मिळाले कासमचे तिकिट अुचलले गेले नाही म्हणून त्याला काही मिळाले नाही घडघडीत कार्यकारणभाव ह्या दो घटना अुलगडून दाखविण्यास जितका पुरायचा तितका पुरता त्यापलीकडे नवस अधिक काय केले ? कोणचा अधिक पटणारा कार्यकारणसंबंध अुलगडला ? यार नवस सफळला तर त्याचा विफळता ! आणि नवसाचे थातोड ज्या युरोपमध्य आजकाल जवळजवळ नामशेष झाले आहे त्यात शेवडो लॉटऱ्यात हजारो लोका नवसावाचूनही पारितोषिके मिळत आहेतच की नाहीत !

( भर समुद्रात पोहण्याची शक्ति संपली म्हणून गोविंदा बुडाला ! — गुरुत्वा कर्षणाच्या नियमाला मोरया अुलटवू शकला नाही सापाच्या शेपटीवर पाय पडताच साप चावला नि ते विष अुतरविणारे औषध वेळीच मिळाले नाही म्हणून कासम मेला शारीरिक नियमास अल्ला अुलटवू शकला नाही या दोन घडघडीत सृष्टिनियमांनी या दोन घटनांचा जो काही अुलगडा होतो त्याहून कोणचा अधिक समंजस नी अव्यभिचारी कार्यकारणसंबंध नवसाच्या भाकड गृहीत कृत्याने स्थापिला जातो ?

मोरया मोरया करीत गोविंदा मेला ! या अल्ला या अल्ला करीत कासम मेला ! देवाच्या म्हणा या दैत्याच्या म्हणा अशा कोणाच्याही भाकड नावावर चालविलेला नवसाचा धंदा म्हणजे अेक अगदी अनवलंबनीय पोकळ आणि बिन-बुडाची सोंडत आहे ! नुसत्या नवसाने काय घडतही नाही नि बिघडतही नाही ' नवसे कन्यापुत्र होती । तरि का करणे लागे पति ' असे तुकाराम विचारतात !

नवस फेडण्यासाठी मक्केला जाणाऱ्या मुसलमानांची कित्येक जहाजं पश्चिम समुद्रात (अरबी समुद्रात) बुडतात नवस फेडण्यासाठी पंढरीच्या यात्रेला जाणारे शेकडो वारकरी महामारीने चंद्रभागेच्या वाळवंटावर पटापट मरतात !

ज्या घटनांचा कार्यकारणभाव स्थापिणारा सृष्टिनियम आपणास आज अवगत नाही त्यास कोणी ' चमत्कार ' म्हणतात, कोणी त्यासच नाव देतात ' नवसास देव पावला ! ' ' चमत्कार ' किंवा नवसास देव पावला ' ही दोन्ही नावे अज्ञानाचे प्रतिशब्द आहेत, ज्ञानाचे नव्हेत ! )

✦ ✦

## ३. पिऱ्यांचें दुसरें लग्न कसें फिसकटलें ?

सत्य म्हणजे जवळ जवळ जशी त्यांनी स्वत: आम्हास सांगितली तशीची तशीच; पण तरीही 'कथा' अेवढ्याचसाठी म्हटली की, तीत नावें गावें तेवढीं, भाग पडले म्हणूनच, बदलली आहेत नि घटनेशी घटना जुळवून घेतल्या आहेत.

ज्यांना जुन्या समाजस्थितीतील काही गोष्टी टाकाअू वाटतात ते जुन्या पात्रांची अेक कल्पित कथा रचून तीत त्या गोष्टींचा विपाक किती हानिकारक वा हास्यास्पद झाला ते वर्णू पाहतात. अुलटपक्षी ज्यांना नव्या समाजस्थितीतील काही पालट भयावह वाटतात तेही त्या पालटाची हिडीस वा अनिष्ट बाजू अुठाव-दारपणे रंगविली जाअील अशी पात्रांची नी परिणामांची कल्पित जुळणी सहज करू शकतात. अशा कल्पित कथा-कादंबऱ्यांचीही ती ती बाजू समाजाच्या मनावर ठसठशीतपणे ठसविण्यास पुष्कळ अुपयोग होतोच होतो. परंतु नव्याचा वा जुन्याचा दुर्विपाक दाखविणाऱ्या कल्पित गोष्टीस झिडकारून जुन्याचे वा नव्याचे अभिमानी त्या कल्पितकथेच्या फुगलेल्या शिडास ज्या अेका टोल्यासरशी फाडून, त्यातील सारा वारा काढून ते शीड अकस्मात् ढिलावून सोडतात तो टोला ह्याच आक्षेपाचा असतो की 'जा रे ? कल्पनाच करायची तर वाटेल ती करता येअील! 'अेकच प्याला' नाट्यात दारू पिअून बायकोला मारणारा नवरा जसा दाखविला तसा दारू पिअून बायकोला कडेवर घेअून नाचणारा नवराही दाखविता येअील! सिंधूसारखी दारुड्या नवऱ्याची पतिव्रता बायको आज बायकांच्या कैवाऱ्याने रंगविली, तशी स्त्री जात्याच कुलटा असते, 'पुमानित्येव भुंजते' हें पुरातन सूत्र समर्थिणाऱ्यांना जाराचे नादी लागून, दारू पिअून, नवऱ्याचा गळा कापणारी सिंधूही रंगविणें कठीण नाही! बोलून चालून भाकडकथा!

तशा खराखरच घडलेल्या विवाहाच्या आणि विवाहविषयक घटनांच्या वैयक्तिक सत्यकथा ह्याच, निर्मळ वृत्तांताचे खालोखाल, उपयोगी पडणाऱ्या असतात, आणि केव्हा केव्हा कल्पितांहून अधिक आकर्षक नि रोमहर्षण असू शकतात.

समाजाच्या वास्तव परिस्थितीवर लख्ख प्रकाश पाडणारी अशीच अेक सत्य कथा आणि त्याच विवाहविषयक प्रकरणी आम्हास श्री पित्रे ह्यांच्या तोंडून अैकावयास मिळाली. ती पूर्वी त्यांच्या स्वत:च्याच होअू घातलेल्या दुसऱ्या लग्नाची त्यांच्या स्वत:चीच कमगत तात असताही ती त्यांना स्वत:च न रुपविता सांगितली ह्यावरून नि त्यांच्यासारख्या सरळ मनाच्या सद्गृहस्थानं ज्या निष्कपट सहजपणे ती सांगितली त्यावरून ती जवळजवळ अक्षरश: खरी आहे अशी ग्वाही आमचे मन देत होतें. पण तरीही ती आम्ही त्यांतील दोघातिघा महत्त्वाच्या शिष्टपात्राकडून पडताळूनही पाहिल्यामुळे तिच्या सत्यतेविषयी आम्हास शंकाच अुरली नाही.

आजचा काळ तर बोलूनचालून शारदा निर्बंधाच्या कलियुगाचा! पण जेव्हा 'अल्पवया भवकन्या'ना आदी सत्ययुगीन काळ होता तेव्हा त्या सनातन सूत्रा प्रमाणे चालणाऱ्या धर्मशील लोकांचीही विवाहनीति प्रसंगी काय काय रूपे धरी हें यथातथ्य दाखविण्यासही सत्यकथा अेकाद्या आरशासारखी कामा येत त्या सम

तोच व्यापार, आज खरेदीस्नो जाणार मी तुमचेभी लगिनसाहित्य स्वस्तात घेऊन यानी येतो तर !' मी म्हटल, 'जाच तू' ताच धोडभट आले नी मुलीकडे निघा-यचे म्हणाले मी अगदी प्रसन्न झालो, त्या निघण्याच्या लगबगीतच घोडभट मला झटक्न् थांबवून म्हणाले 'शिदू जिवास जीव देणारा मनुष्य, तादूळ खरेदीसाठी गडला आहे आज न गला तर लग्नापर्यंत परतू शकणार नाही पण तो नसला तर साऱ्या गावास वेळी दटाऊ नकून कार्य पार पाडणारा दुसरा दडम माणूस कोण मिळणार ! तर त्याला हव ते २०० रुपये लगच द्यावे तो येताच रुपये परत दईल आपल्या लग्नाचे तादूळ पण स्वस्तात घेऊन येईल ह चला, मुलीकडे त्वकर गेल पाहिजे'

मुलीकडे जायच्या माझ्या धादलीत याच्या हिरमोडाची आडकाठी मुळीच नको, या विचारावाचून दुसरा विचार मला सुचूच न शकल्यामुळे मी २०० रुप-याच्या नोटा शिदूला दऊन लगबग मुळ्याच्या घरी गेलो.

'मुलगी ठीक होती त्या खेडेगावात त्या काळपर्यंत 'अष्टवर्षा भवेत् कन्य'-चेच युग नादत होते त्यामुळे त्या अकरा वर्षांच्या मुलीस लोकानी घोडनवरी म्हणू नये म्हणून मुळ्यानाही लग्नाची घाई आहे, ह मी जाणून होतो पण तरीही माझ्यासारख्या बिजवराकडून मुलीच्या नावे अुलट हडा अपटणारे कित्येक आजी

ते हे पहा, ते पहा, करण्यात मन व्यावळले होते. त्यामुळे अंगावर अुभ्याअुभ्या तीनचार तांबे पाणी ओतून अंग हाताने पुसू लागतो तो नोटांचा कसा कमरेला बांधलेला आहे याचा मला आठवणच राहिली नाही. हात कमरेला लागताच चमकलो! घाअी-घाअीने कसा सोडला तो नोटा भिजत आलेल्या! तसाच पुढे होअून, अुन्हात त्या नोटा पसरून, त्यावर दगड ठेवून स्नान अुरकून मी धोतर नेसतो तो घोडभटांनी दुरून कोकणात जे सहज बोलणे म्हणतात पण ज्याला देशावर ओरडणेच म्हटले जाअील अशा अुंच आवाजाने 'मुलीला पाणी भरायचेय, किंचित् अिकडे यावे' असे घाअीघाअीने सांगितले. मी झटकन् तिकडे गेलो, तो सध्येचा पाट ठेवलेला पाहिला. त्यांच्या कोणची भावना दुखवू नये म्हणून पाटावर बसून भस्म लावतो न लावतो तोच अेका मुलीने धावत येअून सांगितले की, 'ते कागद कोणाचे पडले आहेत, कावळ्याने अुडविला की अेक! मी तिकडे दृष्टि ठेवली होती नी लगेच परतणार होतो नोटा अुचलण्यास तोच ती मुलगी हे ओरडली. झटपट जाअून पाहतो तो शंभराची अेक नोट नाही! अर्थात् कावळ्याने नेली! कावळ्याचे नाव घेणार? घोडभटाने, त्यांच्या बायकोने, त्या भटाच्यापैकी अेकाने कावळ्याच्या अुपद्रवास शिव्या हासडल्या. कावळ्याच्या अुपद्रवाचे प्रकार सांगण्यात येअू लागले, कोकणचे कावळे नी देशी कावळे यांच्या जातीपातीपर्यंत गोष्टीवरून गोष्ट गेली, पण नोट काही परत आली नाही

'तरी देखील ती खेडवळ माणसे किती हळहळली! अेका भटाच्याच्या डोळ्यात तर टिपे आल्यासारखी दिसली. मोठ्या नगरातील लोकांपेक्षा खेडेगावची माणसे दयाळू, सरळ साधी असतात म्हणून कवि जे गोडवे गातात ते काही खोटे नव्हे! मी मनात म्हणू लागलो — माझ्याअेवढा प्रौढ बिजवर मिळेल तो मुलगी पदरी पाडून घेण्यास आला असता अजून अेकानेही मला खिजवले नाही — नाहीतर नगरातील ती हुल्लड सभ्यता! अेवढ्यात अेक शंभरदा मजकडे बोटे दाखवून फिदी फिदी हसली असती! लागट बोलली असती!

'या विचारात नोट गमावल्याचा मला जवळजवळ विसरच पडला. मात्र आठवण होत होती ती अेवढीच की, दोन दिवस अुलटून गेले पण घोडभटजी मुळ्यांच्या मुलीकडे मला अजून कसे नेत नाहीत'

'तोच मजविषयी प्रथमपासून कळकळ दाखविल्यामुळे ज्याविषयी मला ममत्व वाटे तो शिद्रू भंडारी येअून मला म्हणाला, 'महाराज आले की .अेकदाचे मुळे बाहेरगावाहून परत! आज घोडभट तुम्हासनी नक्की नेणार बघा मुलगी बघायास'

'मी म्हटले, अरे! घोडभटजींना पसंत, ती मला पसंत आहेच की, बघायची कसली! ठरवूनच टाकायचं अेकदम!'

त्यावर शिद्रू म्हणाला, तांदुळाचे गोण भारी सस्तावले आहेती. आमचा

तोच व्यापार, आज खरेदीस्नी जाणार मी. तुमचेभी लगिनसाहित्य सस्तातं घेऊन यानी येतो तर!' मी म्हटलें, 'जाच तू.' तोंच धोंडभट आले नी मुलीकडे निघायचे म्हणाले. मी अगदी प्रसन्न झालो, त्या निघण्याच्या लगबगीतच धोंडभट मला झटकन् थांबवून म्हणाले, 'शिदू जिवास जीव देणारा मनुष्य, तांदूळ खरेदीसाठी नडला आहे. आज न गेला तर लग्नापर्यंत परतू शकणार नाही. पण तो नसला तर माझ्या गावास वेळी दटावू नकून कार्य पार पाडणारा दुसरा दंडम माणूस कोण मिळणार! तर त्याला हवे ते २०० रुपये लगेच द्यावे. तो येताच रुपये परत देईल. आपल्या लग्नाचे तांदूळ पण स्वस्तात घेऊन येईल. हं चला; मुलीकडे लवकर गेलं पाहिजे.'

मुलीकडे जायच्या माझ्या घाईतील यांच्या हिरमोडाची आडकाठी मुळीच नको, या विचारावाचून दुसरा विचार मला सुचूच न शकल्यामुळे मी २०० रुपयांच्या नोटा शिदूला देऊन लगबग मुळ्याच्या घरी गेलो.

'मुलगी ठीक होती. त्या खेडेगावात त्या काळपर्यंत 'अष्टवर्षा भवेत् कन्ये'-चेच युग नांदत होते. त्यामुळे त्या अकरा वर्षांच्या मुलीस लोकानी घोडनवरी म्हणू नये म्हणून मुळ्यानाही लग्नाची घाई आहे, हे मी जाणून होतो. पण तरीही माझ्यासारख्या विजवराकडून मुलीच्या नावे बुलट हुंडा उपटणारे कित्येक आशीबाग आमच्या नगरातून मला आढळले असल्यामुळे तशा टग्याशी माझी गाठ पडते की काय अशी मला भीति वाटत होती; पण देण्याघेण्याची कोणचीही भानगड मुळ्यानी केली नाही. मी म्हणेन त्यात त्यांचा संतोष! मला पुन्हा वाटले, हे खेडवळ लोकच खरे धर्मभीरु! किती साधाभोळा व्यवहार यांचा! रामकृष्णपंत मुकदम नावाचे कुणी गृहस्थ तिथे शेजारच्या गावाहून सहजासहजी आले होते. त्यांस बोलावून, त्यांचे समक्ष लग्न ठ-

तुम्ही गेल्यावर त्या भडाऱ्याचे हातीं जे सामान घाडलेन ते येताच मी मुळचाला गाडवविडव घालण्याची विनती करावयास जो गेलो तो त्यांनी मुलगी देण्याचा बेत रद्द केल्याचे कळविले, तेव्हा म्हटले, हे सामान आता अगीच सडवून का टाका ? यासाठी त्यातच मुलाची मुंज अुरकून घेतली !' घोडभटाचे हे बोलणे अैकताच मला राग आला मी म्हटले, 'मला मुलगी तरी द्या नाहीतर माझे पैसे तरी भरून द्या आणि तो शिदू भडारी आला की नाही ? त्याने नेलेले दोनशे रुपयेही मला तुम्हींच दिले पाहिजेत !

'माझ्या या रागीट मागणीने मुळीच न रागावता अधिकच थडपणे घोडभट म्हणाला, 'तुमची दमडी न दमडी आम्ही देअू अितकेच नव्हे, पण दुसरी मुलगीही मी शोधीत आहे तुम्ही काही दिवस धीर धरून अिथेच रहावे '

'मी पुन्हा गोंधळलो क्षणभर वाटले, हा मनुष्य लुच्च्या असता तर अितक्या न्यायाची गोष्ट बोलता ना ! पण आता आपण थोडे सावध रहावे, आणि पुन्हा दमडी देअू नये म्हणने झाले असा विचार करीत जेवून जो ओटीवर यतो तों माझी दागिन्याची लहान ट्रंक तिथ नाही, माझ्या अुरात आता मात्र धडकीच भरली

मुलगी, कसला शिंदू भंडारी नि कसले तांदूळ घेअून बसला आहात महाराज! ती अेक चांडाळ चौकडी आहे नि त्या घोडभटाने आजवर असे तुमच्यासारखे दहापाच अुतावळे नवरे फसविले आहेत! तुमची नोट तुम्ही स्नान करता करता ज्या कावळ्याने पळविली ना, तोच कावळा तुमची ही ट्रंक पळविण्याच्या बेतात होता पण अुचलगी नाही त्याच्या चोचीला झटकन्, अितकेच! आम्ही त्या गडगनेराच्या दिवशीच तुम्हास सावध करणार होतो पण बोलावे कोणी! तुम्हीच ते खोटे मानतेत तर आमचेच दात पडते कारण तो घोडभट, तो मुळचे नी ते दोनचार भंडारी गुंड, गाजावाजा तर होअू नये, शिकार पण शिकार गवसावी, अशा बेतानेच, निर्बंधाचे कैचीत स्वत: न गवसता, गळा कापतात दुसऱ्याचा! अितक्या सावधाणे की, त्यास गळेकापू म्हणून जो कोणी म्हणेल त्यावरच अुलट मानहानीचा खटला भरून कोर्टात खेचता यावे!

'मुळचाच्या माझ्या मुळावरच आलेल्या मुलीच्या पायी मी पडत असलेल्या खड्ड्यातून सुरक्षित सुटलो ह्याचा आनंद मला होतो न होतो तोच काय सांगू राव, पुन्हा अेक लग्नाचे नवे संकट तिथल्या तिथेच दत्त म्हणून अुभे राहिले! कारण वरील भाषण संपते न संपते तोच रामकृष्णपंत म्हणाले, 'आता हे पहा, ही आमची मुलगी, ही आम्ही तुम्हाला देतो आणि कोकणात येण्याच्या तुमच्या श्रमाचे शेवटी सार्थक करतो!' हे बोलतबोलतच त्यांनी मुलीला मजसमोर अुभी केली तरी ती माझ्या गुडघ्याहून फारशी काही अुंच दिसली नाही त्या काळी शिष्ट-संमत असलेला 'अष्टवर्षा भवेत् कन्ये'चा परकर देखील तिला मोठा होअीलसे स्पष्ट दिसत होते मी देखील थोडे ओशाळूनच विचारले, 'मुलीचे वय किती? फारच

लग्न लावणार होता ना, त्याच दिवशी तिच्या सवाअी ठिकाणची मुलगी वरणारच तर मी ! असा सूड अुगवल्यासारख्या अेक आवेशाच चढला मला.

'अगदी शेजारी देखील फारसा गवगवा न होअू देता ठरल्या दिवशी विवाह संस्कारास आरंभ झाला. मला नी मुलीला हळदही लागली. तोंच —

'दुरवरून दहापांच दांडगट लोक मोठमोठ्याने बोलत येताना दिसले. बोलता बोलता शिदू भंडारी त्या धोंडभटाच्या बैठकीतल्या अितर भडान्यासह दाराशीही येअून ठेपलेला नी मला भेटण्यासाठी दंडम हट्ट धरून अुभा असलेला पाहिला. मनात कसलीशी भीति वाटली, पण रामकृष्णपंतानीं याच म्हटलें म्हणून तसाच हळद लावलेला मी पुढे आलो. त्या शिदू भडान्याचे डोळे लाल, फिरलेले, माडी पिअून तर्रर्र झालेले ! त्याच्या साथीदाराच्या तोंडातूनही माडीच्या अुग्रट गंधाचे भपकारे येत होते. मला पहाताच ते दटावून ओरडले, 'अरे वामणा, त्या मुळ्याच्या मुलीशी ठरलेले लग्न मोडून. आमच्या गावाला काळोखी लावून अिये आलास काय पळून !' मी शक्य त्या सौजन्याने दादा-बाबा करीत म्हणालों, 'अरे, धोंडभटांनी मला सांगितलें ना की, मुळ्यांनीच मुलगी देण्याचें नाकारलें म्हणून !

'ते वेड्यावाकड्या शिव्या हासडीत म्हणाले, 'चुलीत गेला तो पाजी धोंड-भट ! आम्ही तुला या कोकणातली कोणाचीच मुलगी आता करू देणार नाही. चल, धुवून टाक ती अंगाला माखलेली हळद ! चल सडोवा दिसतुया जसा !'

अितक्यात रामकृष्णपंतानी मधे पडून शिदूला बाजूला घेअून काहीसें गयावया करून सांगताना मीं दुरून पाहिलें. शिदूची माडी त्यांच्या चागली परिचयाची

'पण रामकृष्णपंतांनी मात्र माझ्याकडून काहीही दंड न घेता माझे दाग-दागिने परत केले नी मी आल्या वाटेने परत फिरलो ! तेव्हापासून —

'खेड्यातील लोक म्हणजे गोगलगाय' साळसूदपणाचे आगर म्हणजे खेडे. नागर तेवढा काय तो लुच्चा ! अशी अेक अेक कविता त्यावर लिहिलेली आहे आणि मी स्वत:, ते धोंडभट, तो शिदू भंडारी, ते त्या आटीवरच्या पंक्तीतले अितर सालस खेडवळ, ते मुळचे, आणि आम्हा सर्वांच्या पायदळी त्या दोन आठदहा वर्षांच्या निरपराध अभक मुली वरमाला घेअून ज्यामध्ये विवाहहोमाच्या पेटलेल्या कुंडात अुडी घेत आहेत, असे अेक छायाचित्र काढून त्याची अेकेक प्रत जुन्या नीतीच्या अमर्यादित अभिमान्यांना भेट द्यावी अशी मला लहरीवर लहर येते !!'

—१९३५

* * *

## ४. काळ आणि कसर !

साऱ्या प्रमुख अितिहास संशोधकांची अेकच दाटी मंडपाच्या दाराशी अुडालेली होती. अेकमेकावर वर्षानुवर्षे नियतकालिकांतून तिखट नि प्रसंगी शिवराळ टीका करण्यापुरतीच ज्यांची परस्पर ओळख असे, असे दूरवरचे शेकडो अैतिह्य संशोधक आज येथे दाटलेले असल्यामुळे आज त्यांची परस्पर ताडओळखही होणारी होती. हाही अेक संशोधनाचा विषयच असल्याने अेक संशोधक त्याच कामावर नियोजिला होता. प्रत्येक आलेल्या संशोधकाची वंशावलि नि बिरुदावलि मोठ्याने संकीर्तीत तो त्यास त्यास मंडपात प्रवेशवून योग्य स्थानी बसवी.

अैतिह्य संशोधक महामंडळाचे हे संमेलन अगदी अपूर्व असल्याने अनेक प्रख्यात अितिहासज्ञ आपले अगदी अपूर्व तेवढेच निवडक निबंध घेअून सभेस आलेले होते. अध्यापक चिंते यांनी गेली चाळीस वर्षे ज्या शोधाविषयी खर्चिली त्याची गंभीर चर्चा त्यांनी आपल्या निबंधात केलेली होती. त्याचा तो विषय म्हणजे 'ग्रीसावर चालून जाताना सम्राट् चंद्रगुप्त ज्या घोड्यावर बसला त्याच्या शेपटीचे केस किती लांब होते?' हा होय. ती चंद्रगुप्ताच्या घोड्याच्या शेपटीच्या केसांची लांबी निश्चिणारे अनेक पुरावे त्यांनी त्या निबंधात गणनाच्या तक्त्यासह देअून त्या पुराव्याचा पुरावा म्हणून मौर्यकालच्या घोड्याची चित्रे असलेली नाणी छायाचित्रे, कागद, ताम्रपटप्रभृति प्राचीन वस्तु सोबतच्या प्रदर्शनातही मांडलेल्या होत्या. प्रख्यात पुरातत्त्वज्ञ श्रीयुत रावणे यांनीही त्याच प्रदर्शनात अेक अत्यद्भुत प्राचीन वस्तु धाडलेली होती. ती म्हणजे नारिकेलाच्या चोळीची अुजवी बाही ही होय.

हजारों प्रेक्षक ती वाही पाहण्यास त्या गाळचात दाटलेले असत. हा शोध जर खरा ठरला, तर पुराणकालावर, रामायणावर आणि अेकंदर मनुष्यजातीच्या ज्ञानावर मोठाच प्रकाश पडून तिचें असीम हित साधणारें असल्यामुळे गेली चार वर्षे साऱ्या विद्वान् मंडळींनी साऱ्या वृत्तपत्रांतून नि मासिकांतून अुलटसुलट चर्चेचे लेखामागून लेख लिहून मोठी सळवळ अुडवून दिलेली होती. त्याताही ते संशोधक रावणे नाशिक पंचवटीचे राहणारे असल्याने खरी पंचवटी राजमहेंद्रीच्या बाजूला आहे असें मानणाऱ्या संशोधकांनी त्या शोधाविरुद्ध कुचाळकीही करण्यास कमी केलें नाही. असा श्री. रावणे यांच्या पक्षाचा आक्षेप होता. त्यामुळे त्या वादास नाशिककर विरुद्ध महेंद्रीकर असें स्वरूप येअून जो जो नाशिककर तो तो त्या शोधास भरासर अनुकूल होत चालला आणि जो जो महेंद्रीकर तो महेंद्रीकर म्हणूनच त्या कुचाळकीस खरा शोध म्हणून अुचलून धरू लागला. पुरातत्त्वज्ञ रावणे यांचे म्हणणें असें होतें की, पंचवटीच्या ज्या बाजूकडे क्षेत्रोपाध्यांच्या अखंड परंपरेप्रमाणे खडकावर खडक होअून पडलेलें लक्ष्मणाने कापलेलें राक्षसिणीचे नाक नि कान

विचारले होते की ' अेका रुपयाच्या पठाणास लाच देअून अेका अत्यंत महत्त्वाच्या ऐतिहासिक सिद्धांतास खोटे पाडण्याचा यत्न करताना महद्रीवरांना लाज कशी वाटली नाही ! '

जपानने चीनवर जी स्वारी केली आहे, तिचे हिंदुस्थानावर काय परिणाम होणार आहेत, ह्या वा अशा क्षुल्लक विषयास अेक अक्षरही जागा न देता वरील ज्या अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नाची चर्चा करण्यात सारी वृत्तपत्रे नि विद्वान् गेली चार वर्षे गुतले होते, तो प्रश्न ' आर्टिकेच्या चोळीचो वाहो का पठाणाच्या तुमानीचा पाय ? ' हा आजच्या समेलनात प्रमुखपणे चर्चिल्या जाणाऱ्या विषयातील जसा अेक विषय होता तसाच दुसराही अेक तितक्याच महत्त्वाचा विषय श्री नार्वेकर ह्या सुप्रसिद्ध संशोधकानी निबंध लिहून समेलनात प्रस्ताविला होता. नार्वेकर हे देशभक्त नि स्वाभिमानी अितिहासकार म्हणून प्रख्यात होते. ते स्वत वैश्य जातीचे, गोमातकातील नार्वे येथील पेठेतून त्यांच्या जातीची मंडळी देशावर पसरलेली होती. आर्य लोक हे अुत्तर ध्रुवाकडून भारतात आले या स्वाभिमानी देशभक्तीस लाछिणाऱ्या मताच्या ते अगदी विरुद्ध होते. आर्यांची जन्मभू भारतच असून ते नतर अुत्तरध्रुवाकडे वसाहत करीत गेले, ह्या स्वदेशाभिमानी मतास ते पुरस्कारीत. अितकेच नव्हे तर साऱ्या जगातील प्रत्येक राष्ट्र हे कोणातरी जयिष्णु भारतीय जातीने बाहेर जाअून वसविले असलेच पाहिजे असा त्यांचा अुपजत ठाम सिद्धान्त होता. त्यास समर्थिणारे अेक अत्यंत महत्त्वाचे गमक त्यांना अलीकडेच जे सापडले त्याचीच सागोपांग सिद्धि करणारा निबंध या समेलनाकरिता त्यांनी धाडलेला होता. त्यांचा हा नवीन नि अत्यंत साधार शोध असा की नार्वे हा देश नार्वेकर वैश्यांचीच वसाहत आहे ! पुरावा ? भरभक्कम ! दुसरा तिसरा सोडा—प्रत्यक्ष नावाचाच ! गोमातकातील ह्या नार्वे पेठेच्या वैश्यांनी जाअून तो देश वसविला नसता तर त्यास नार्वे नाव ठेवण्याचे दुसऱ्या लोकांचे काय अडले होते !

घेतला होता. तोच आज संमेलनात चर्चिला जाणार असल्याने तोही मोठी रडाजंगी उडणारच होती.

अशा अनेक अपूर्व ऐतिहासिक शोधांचा निर्णय ह्या संमेलनात लागणार होता. त्यामुळे त्या संमेलनाचें महत्त्वही अपूर्वच आहे, असें जाणून जो तो ऐतिह्य-संशोधक त्या मंडपात वेळेआधीच येऊन बसला आणि संमेलनाचा आरंभ होण्याची प्रतीक्षा आतुरतेने करूं लागला.

शेवटी ललकाऱ्यांच्या नि जयघोषांच्या दणदणाटात नियोजित अध्यक्ष राव-साहेब धुरंधर हे ज्ञानवृद्ध असल्यामुळे मुळीच न हलता आणि वयोवृद्ध असल्यामुळे लचकत लंगडत सभास्थानी प्रवेशले. संमेलन आरंभले.

## अध्यक्षांचें भाषण

अध्यक्ष रावसाहेब धुरंधर हे ज्ञानवृद्धास नि वयोवृद्धास शोभेल अशा गांभीर्याने नि विलंबाने, गुळाची भेली काटव्यावर चढवून, तोलून, उचलून फेकावी तसा प्रत्येक शब्द थबकत थबकत तोंडाबाहेर टाकीत म्हणाले, ' जंटलमेन अँड लेडीज ! मला टाईम नसताही केवळ तुमच्या फ्रेंड्ली प्रेशरसाठीच काय तें मी ही प्रेसिडेंटची चेअर अॅक्सेप्टली. ह्या कॉन्फरन्सच *इंपॉर्टन्स अगदी यूनिक आहे. हे तुम्हां सर्वांच्या* मनावर इंप्रेसणें ही माझी ड्यूटी समजतो. माझे स्पीच आपण अटेन्टिव्हली लिस-नावें. (हंशा होतो) व्हॉट ! सायलेन्स ! आचरटासारखे बिहेव्हता ! (हसणेच हंशा) मी इंग्लिश व्हर्बस् यूजतो म्हणून ना ! अहो, मराठीत मुसलमानी आणि इंग्रजी नाऊन्स अँड अॅडजेक्टिव्हस् यांची भर घालून आपली मराठी लँग्वेज रिच करण्याचें महत्कार्य आजवर पुष्कळ जण करीत आले आहेत. बट तुम्ही अगदी फरगेटता की, मराठी भाषा जर खरोखरच अगदी पुअर असेल तर ती व्हर्बस्‌मध्येच होय. आपल्या मदर लँग्वेजचा जर तुम्हास काही अभिमान असेल तर तुम्ही इंग्रजीसारख्या क्रियापदांनी समृद्ध असलेल्या कल्चर्ड लँग्वेजमधून शक्य तितकी व्हर्बस् मराठीत आणली पाहिजेत. तें महत्कार्य मी माझ्यासाठी रिझर्विलें आहे. जर इंग्रजी मदर, फादर, ब्रदर, वाईफ, अेट्सेट्रा अगदी घरगुती नामेंही तुम्ही वापरता तर तीच यूजफुल प्रोसेस् पुढे रेटून मी इंग्रजी व्हर्बस्‌हीं मराठीत बोलू लागलो तर त्यात

रक्षण केलं म्हणून जर चिपळूणकर मराठीचे शिवाजी ठरतात, तर आम्ही मराठीत ह्या व्हेरियस पारेन नाउनांना, अडजेक्टिव्हांना, ॲडव्हर्बस्‌ना, व्हर्बांना सामील करून, अनेक्सून, मराठीचे बाजीराव का बनू नये ? (टाळ्या) जिंग्लिश व्हर्बस्‌ची भर मराठीत घालून ह्या माझ्या मदरटंगच्या क्रियापदांचं दारिद्र्य नाहीसं करण्याचं मी अगदी रिझॉल्व्हिंग आहे मग मला फूलिश पीपल वाटेल तितके रिडिक्युलोत! (अवसानाच्या भरात दम लागून धापा टाकीत खाली बसतात, आणि आता तुमचा मुख्य ठराव मांडा म्हणून श्री तत्त्वे यास हातानेच सुचवतात त्याबरोबर श्री तत्त्वे अुठतअुठत अुठून बोलू लागतात )

श्री तत्त्व—मी वायफळ बाजणारा माणूस नाही कोणच्याही प्रकरणी तत्त्व तेवढ नेमकं सांगतो आजच समेलन अपूर्व का ? अध्यक्षांनी मराठीचे क्रियापद-दारिद्र्य निवारण्यासाठी जिग्रजी क्रियापद घ्यावी असा जो अुपक्रम केला त्यामुळे काही हे समेलन अपूर्व ठरत नाही मराठी भाषा क्रियापदाच्या प्रकरणी दरिद्री आहे खरीच, साऱ्या प्राकृत भाषाच तशा आहेत आपली सस्कृत भाषा ही अितर कोणच्याही सपत्तीप्रमाणे क्रियापदाच्या सपदतही जिंग्लिशला देखील हार जाणारी नाही तव्हा मराठीत क्रियापद जी घ्यायची ती आपल्याच सस्कृत भाषेच्या अगाध निधीतून घ्यावी ही कुबेराची सपत्ति घरी असता दुसऱ्याच्या दाराशी भीक मागत नि त्याच्या अुच्चारांनी दात विचकीत फिरण्यास आम्हास लाज वाटली पाहिजे (अध्यक्ष—बाश ! स्टुपिड ! ) तत्त्व हे की, स्वत च्या सस्कृतप्राकृत भाषात जे शब्द आहेत वा निर्मिता येतात त्यांना लाथाळून, मारून, नामशेष करून, फादर, मदर वायदा, तहहयात, कबूल प्रभृतिसारखे अनावश्यक परकी शब्द घेअू नयेत, वापरू नयेत पण आपल्यात जे मुळीच नसतील तसे विशिष्ट प्रकाराचे शब्द जसे बूट, कोट जाकीट पुडिंग गुलाब प्रभृति खुशेनव घ्यावे पण (अध्यक्ष—तो विपयच ड्रापा ! स्टापा ! ) बर तर, मी तत्त्व तेवढच सांगतो आमच्या ह्या अैतिहासिक सहाध्य

हा माझा अितिहास-संशोधन शास्त्रावर आणि कलेवरच अुपकार झाल्ला आहे. तेव्हा थोडक्यात माझा ठराव हा की आपण 'अैतिहासिक—साधन—निदालक—समिति' ह्या नावाचा आपला अेक स्वतंत्र विभाग स्थापून आज प्राचीन ठरणारे जुने कागदपत्रच नव्हेत तर अुद्या प्राचीन ठरणारे आजचे महत्त्वाचे कागदपत्र—पट्ट—वस्तु—ग्रंथ—वास्तु प्रभृति अैतिहासिक महत्त्व पावणारे पदार्थ फाडून ताडून, जाळून पोळून निदाळण्याची मोठी मोहीम आरंभावी! (नेम! व्हेरी! स्वीकार! धिक्कार! बोला! थमा! अशा गर्जनांची अुठलेली सुन्दर सरबत्ती सभेत चालू होते. अध्यक्ष घंटा वाजवीत वजावतात हा! हा! स्पाकरगा मध्यच अिंटरप्टता कामा नये!) मला वायफळ बोलण्याची सवय नाही. तत्त्व तवढ मी सांगितले. बाकी अुल्गडा अनुमोदक करतील. म्हणून माझें भाषण!

अनुमोदक श्री अुल्गडे म्हणाले, सभ्यहो! आपणापैकी काहीजणास श्री तत्त्वे याचा अैतिह्यसाधननिदालकमंडळ स्थापण्याचा ठराव अैकून बरं वाटलं नाही, ते साहजिकच आहे. पण अितिहास साधन संरक्षण-कार्य सांभाव त्स काही हा ठराव म्हणत नाही हे आपण विसरू नये. आपल्या महामंडळाने प्राचीन वस्तु संरक्षणार्थ हा किती खटपट केली आहे ते ध्यानी आणा! प्राचीन कागद—ताम्रपट—साधन अग्निजलवायुप्रभृतींच्या अुत्पातातही सुरक्षित रहावी म्हणून आजवर जगातील अैतिह्यसंशोधकांनी फारतर चिरेबंदी संग्रहालय बांधली, पोलादी कपाट ठेवली. तीही पडझड पावतात. यास्तव कित्येकांना कोणच्यातरी प्रचंड पर्वताच्या पोटात भुयार पाडून त्यात जगातील सर्व महत्त्वाच्या प्राचीन वस्तु जतन कराव्या अशी युक्ति सुचविली. पण प्रचंड भूकंपासारख्या अुत्पातात त्या पर्वतातील ती गर्भस्थ

हे ते कोडें सोडविण्यास, जो आपणास, आनंद वाटतो, त्यास आपण आंचवलो असतो, नव्हे का ? आपण असा अेका श्लोकाने केवढे तरी बुद्धिस्वातंत्र्य गमावून बसतो ! पण त्या कविकुलगुरूने दूरदृष्टीने तसा श्लोक लिहिला नाही किंवा तसा श्लोक अितरांनी जिवंत राहू दिला नाही, त्यामुळे आज आमची बुद्धि त्या प्रकरणी अितकी स्वतंत्र आहे की, अुद्या कालिदासाची जन्मभू लंका होती असें प्रतिपादण्या-सही आम्हां संशोधकांच्या प्रतिभेस मज्जाव करण्याची कोणाचीही छाती नाही ! पेशव्यांचें दप्तर जितके अजून अक्षुण्ण आहे, तितके जरी राजगृहातील बिंदुसार प्रभृति राजांचे वा मोर्यांचें दप्तर आज अबाधित राहतें तरी साऱ्या बुद्धकालीन संशोधक मंडळांची दिवाळी निघतीं दिवाळी! बुद्ध हा मनुष्य असा कोणी नव्हताच – त्याची ती सारी कथा सूर्यावरचें अेक रूपक, असा जो प्रतिभाशाली पाश्चिमात्य अितिहास-संशोधकाने प्रश्न काढला आहे, तसा प्रश्न विचारून तो सोडविण्यात संशोधनशास्त्रास जो रम्याद्‌भुत आनंद होतो, त्यास आपण सर्वस्वी पारखे झालो नसतो काय ? चंद्रगुप्त होता नि त्याचा घोडाही होता, येवढीच माहिती प्रचलित ठेवून बाकी गहाळ केली म्हणूनच ना आजच्या संमेलनांत चंद्रगुप्ताच्या घोड्याच्या शेपटीची लांबी किती हा रम्याद्‌भुत वाद आपणास अुपभोगता येतो आहे ? अहो, अितिहास-साधनांचा सारखा नाश होत आला म्हणूनच अितिहास-संशोधनशास्त्र नाश पावलें नाही ! अितिहासाची साधने, जर विनाशिली नाहीत तर अितिहास संशोधनशास्त्र ठार झालेच म्हणून समजा ! ज्ञानेश्वर अेक की दहा, शिवाजीची जन्मतिथि कोणती, शिवाजीला लिहिता येत होतें की नव्हतें, या कोड्यांस सोडविताना जो आनंद मनुष्यजातीस होतो त्या काव्यमय आनंदास शिवाजीचें नक्की हस्ताक्षर नाना फडणिसाच्या अक्षरासारखें पेंगापासरीने मोकाट, सापडते तर आपण आंचवतो नाही का ? रामदास नावाच्या दुसऱ्या कोणा साधूची संशयास्पद चरित्रें त्या वेळीच लिहून ठेवण्याचा शहाणपणा केला नाही म्हणून आज आपणास रामदास अेक की अेकवीस ह्या वादाच्या हृदयंगम व्यवसायास मुकावे लागते, याचा तुम्हा अितिहाससंशोधक मंडळीस राहून राहून खेद नाही का वाटत ? अितिहाससंशोधनास सर्वस्वी जतन करणे म्हणजे ज्या फांदीवर आम्हां अितिहाससंशोधकाचे अस्तित्व तग धरून आहे, तीच तोडण्याचा आत्मघातकी मूर्खपणा करणे होय ! यास्तव माझें ठाम मत आहे की ––

प्रत्येक शतकाच्या शेवटी त्या शतकातील अैतिहासिक कागदपत्रादि साध-नाचा आंशिक नाश करावा.

अुदाहरणार्थ, लोकमान्य टिळकासारखा महापुरुष घ्या. येवढा थोर पुरुष या शतकात निपजून जर आम्ही त्यांच्याविषयीच्या अितिहाससंशोधनास पुढील पिढीस काहीच वाव ठेवला नाही तर त्या पुढील पिढ्यांस, ज्ञानेश्वर अेक की दोन प्रभृति कोडी सोडविताना आम्हांस जो रम्याद्‌भुत आनंद होतो तसा

आज आपण केलें पाहिजे आणि अैतिह्य साधनांचा नपाटून विनाश करणाऱ्या काळाचे ह्या ठरावाने आभार मानून अनृणी झालें पाहिजे! (टाळ्या)

अध्यापक चिते – आणि कसरीनेही! काळाप्रमाणेच कसरीनेही आमच्यावर अनंत अुपकार झाले असल्याने तिचे आभार मानून तिचेही आम्ही अनृणी होणे अवश्य आहे! काळ हा राजा पण त्याचा ह्या कार्यी अतिकुशल कामदार कसर होच! अितिहासाचीं मुख्य साधनें म्हणजे राज्यांची सुविशाल दप्तरें – जसें पेश-व्यांचे, ती दप्तरें तुम्ही काळालाही कठीण जाअील अशा वज्रप्राय दुर्गांत पोलादी कपाटात, शंभर शंभर कुलुपं लावून ठेवलीत तरी पहारेकऱ्यांना पत्ता न लागू देताही काळाचा कुशल नि चिमुकला कामगार त्या दप्तरांत केव्हा घुसेल नि रुमालांची फडर्का, कागदांची बाडें, दर जशीची तशी दिसू देअून आतून त्यांचें कसें पीठ पाडील हें सांगूनही सांगता येणारें नाही, टाळू म्हटले तरी सम्राटांनाही टाळता आलें नाही! खरोखर, ही कसर अैतिहासिक कागदपत्रांचा जो नाश करते तोही आपणां अैतिहासिक संशोधकास हवा तसाच! सगळा कागद नासणार नाही. मधलीच अक्षरें खाअून टाकील – पण अशी की, जिज्ञासेने विंचू चावल्याप्रमाणे ताडकन् जागें व्हावे, अोरडून अुठावे. बाजीराव प्रभृति वाक्यांतील बाकी सारे शब्द खाअील पण 'बाजी' ठेवील; म्हणजे ह्या कागदात तो बाजी घोरपडे की देशपांडे की पहिला बाजीराव की दुसरा – अुमगूही नये! कोड्यात जसे थोडें तर सांगावें पण पुरतें तर सांगू नये, तसे ही कसर करते. अितक्या मार्मिकपणे की, कसरीचा हा कीडा पूर्वजन्माचा कोणी मर्मज्ञ अैतिहासिक संशोधकच असावा असें वाटावे!

ह्यास्तव मी म्हणतो की पराक्रमाची मूर्ति जशी सिंह तशी अैतिहासिक साधननिर्दालक जो काळ ह्याची प्रत्यक्ष मूर्ति कसरच असल्याने कसरीच्या स्वरू-पाचा अेक पुतळा अुभारून त्याची आमच्या या आज स्थापिलेल्या नव्या नि अैतिह्य साधननिर्दालक अुमंडळाची देवता म्हणून नित्य पूजा होत जावी. (टाळ्या)

हे दोन्ही प्रस्ताव संमत होताच अध्यक्ष महाशय आळस देत अुठले नि म्हणाले, 'आता फार लेट झाला आहे. बाकी काम आपण टुमारोच्या मीटिंगमध्ये रिझ्युम! मी आजची मीटिंग आता क्लोजतो!'

* * *

# ५. नारदाची पृथ्वीस पुन्हा भेट!

स्वर्गामध्ये अिमदीसनाप्रमाणे ता. १९ जुलै सन १९३५ शुक्रवारी, सुरसम्राट अिंद्राने झाडून साऱ्या देवदेवतांची राजसभा बोलावली. सारे देव आपापल्या आसनांवर बसल्यानंतर देवाधीश अिंद्र म्हणाला, ' नारद कुठे आहे ?'

तोंच अत्यंत श्रुतिमनोहर अशा संगीताने वातावरण मंजुळ झालें आणि— असे नारदमुनि देवसभेच्या मध्यभागीं आविर्भवले.

वीणा ज्याची डुलवित दिशा घे वहावा वहावा ।
पायीं, ज्यांच्यावरी जडविल्या चांदण्या, त्या खडावा ॥

सुरपति अिंद्र—' नारदा, त्रिभुवनात अेकसारखें संचरत प्रत्यहींचें वृत्त सुरसभेस निवेदिणें हें तुमचें पूर्वापार कर्तव्य असता, गेली हजार दीड हजार मनुष्यवर्षें तरी आपल्या पृथ्वीकडील काही अेक प्रतिवृत्त (रिपोर्ट) धाडले नाही हे कसें ? पृथ्वीचा स्वर्गाशी संबंध जवळजवळ सुटत आल्यासारखें झाले आहे. आमची बातमी त्याना नि त्यांची आम्हाला काहींच कळेनाशी झाली आहे. देवांमाणसात पूर्वी किती दाट संबंध असे. पृथ्वीवरील मोटमोठी युद्धें तर काय, पण साधारण गृहकृत्येंदेखील आम्हां देवाना सुपारी दिल्यावाचून होत नसत. आमच्या स्वर्गातील अुलाढालींचाही त्यास वारंवार पत्ता मिळे. मनुष्यांच्या—त्यांतही त्या यज्ञीय भारताच्या—कोणच्याही प्रकरणी तुम्हांला किती ममत्व वाटे ! विशेषत: मोटमोठ्या लढायापासून तो लहान मुलाच्या परस्पर बोचकाऱ्यापर्यंत आपण स्वत: अुपस्थित राहून सारीं भांडणे यथाशास्त्र भाडली जातात की नाहीत हें पर्यवेक्षीत (सुपरिंटेंडत) असा आणि त्या कथा आम्हास सुरेख संस्कृत अनुष्टुपात येअून सांगत असा. आम्हा देवाची ती किती करमणूक होअी ! देवां-मानवातील तो जिव्हाळ्याचा संबंध पुन्हा जुळावा यास्तव आमची अशी अिच्छा आहे की, आपण पूर्वीप्रमाणे पृथ्वीला पुन्हा प्रत्यही भेट देत जावी आणि मानवांकडील प्रत्येक वृत्त आम्हाला येअून निवेदीत असावें, पृथ्वीवर देवांविषयी कोण काय बोलते, ते तर बिनचूक कळवीत राहावें.'

सुरेश्वर अिंद्राचें हे भाषण ऐकून दोन-चार रुद्र रागावून म्हणाले, ' देवांचा त्या मानवाशी संबंध तुटत आहे तोच बरा ! त्याचा आम्हाला आता अेवढा कोणता अुपयोग होतो आहे ! मानव अुर्मट झाले आहेत, देवांची त्यांना

सन १९३५ च्या वर्षी बिहारमध्ये मोठा भूकंप झाला. त्या वेळी गांधीजींनी अेका लेखात असे लिहिले की अस्पृश्यतेच्या पापासाठी देवाने ही भूकंपाची शिक्षा दिली ! या खुळचटपणाचा या गोष्टीत खरपूस समाचार घेतला आहे.

अनंतदास नागविन्यासारखेंच होणार नाही काय ? पण टिळकांचे केळकरकृत विस्तृत चरित्र तसेंच स्थिर ठेवल्यास पुढील अितिहाससंशोधकांना आपली प्रतिभा चालविण्याला म्हणण्यासारखी जागाच अुरणार नाही ! यास्तव त्या केळकरचरित्राचा या ग्रंथाच्या प्रती नाश करावा. टिळकांच्या कुंडल्या चार पाच तरी निरनिराळ्या करून ठेवाव्या. सन बरोबर तर शक चुकलेला, शक बरोबर तर महिना निराळा, शक महिना जुळेल तर भलत्याच तिथीस भलताच वार लिहिलेला, तसेंच कुठें केसरीकार टिळक कवि होते, असा अुल्लेख तर कुठें कवि टिळक बंदिवासात पडले असा अुल्लेखाच्या बखरींची दहावीस पानें लिहून जतन करून ठेवावी. टिळकांच्या पुतळ्यावरील काहीं अक्षरें ठेवून काहीं घासून नासावीं. सन १८ शे ठेवून ५६ आकडा खरवडून टाकावा, म्हणजे आज शिवजन्मतिथीच्या कोड्याची जी मौज आम्हां संशोधकांस अुपभोगिता येते तशीच रेव्हरंड टिळक नि लोकमान्य टिळक अेक की दोन, जन्मतिथि ही कीं ती, टिळकांचा ‘केसरी’ म्हणजे अेक वृत्तपत्र होतें कीं त्यांनी खरोखरच अेक सिंह पाळलेला आणि गायकवाडवाड्यात बांधलेला होता, असा अनेक प्रकारचे मनोरंजक प्रश्न पुढील पिढ्यांच्या अितिहास संशोधक प्रतिभेस अुद्भवितां येअून अितिहाससंशोधक नि अितिहाससंशोधनशास्त्र बेकारीपायीं मरूं शकणार नाहीं. फार काय सांगावें, जर आपण कुशलपणें अितिहासाचीं काहीं नावें-गावें—आख्यायिका नि आख्यान यांची चलाखीची पेरणी करून बाकीचीं साधनें गहाळ करूं शकूं, तर कालिदास कोणत्या विक्रमाच्या पदरीं होता हें जसें आज मनोरंजनाचें कोडें पडलें आहे, तसें पंचवीस पिढ्यांनंतर टिळक हे कोणत्या छत्रपति शिवाजीमहाराजांचा पक्ष घेअून लढले, रायगडचे सतराशेंतील प्रथम शिवाजी कीं कोल्हापूरचे अेकोणीसशेंतील शिवाजी, हीच अेक जटिल समस्या होअून बसेल नि त्या भावी पिढींतील कोणीतरी जदुनाथसरकार आज रामदासासंबंधीं काहीं

व्हावा अशी जर तुमची दुष्ट अिच्छा नसेल तर तुम्ही ठरावास संमताचे नि प्रत्येक अितिहाससंशोधक मंडळाने आपल्या अेका अुपमंडळाकडे अितिहाससाधननिर्दालक विभागाची कामगिरीही सोपवून द्यावी '

टाळयांच्या कडकडाटात ठराव अेकमताने सभेने संमतिला लगेच श्री तत्त्वे ह्यांनी दुसरा ठराव मांडला

तत्त्वे — मी प्रत्येक प्रकरणातील तत्त्व तेवढं पाहणारा माणूस, अितिहास-संशोधनशास्त्राची शक्यताच जगात कशी झाली ? अितिहासाची साधने वारंवार नाश पावतात ह्यामुळे अगदी पहिला मनु राजा म्हणतात त्याच्यापासून जे लक्षावधी राजे झाले — सारे सूर्यवंशी, रघुवंशी, चंद्रवंशी, यादववंशी, पंडुवंशी, मौर्य-वंशी, काण्ववंशी, आंध्रवंशी, शालिवाहनवंशी, राष्ट्रकूटवंशी, पाड्य, चेर, चोळ-यदव, राठोड, गुहिलोत — रामा रामा ! नुसत्या वंशाची नाव घेता घेता श्वास अुखडून जातो ! —

त्या त्या वंशातील शंभर शंभर पिढया ! त्या लाखो राजांची चरित्रे जर प्रत्यकी नेपोलियनच जस विस्तृत चरित्र अुपलब्ध आहे तितकी जरी विस्तृत चरित्र आज अनष्ट असती आणि मोर्लेने ग्लॅडस्टनच लिहिल तस वाडचे वाड त्याच्या दशलक्षावधि प्रधानाच्या चरित्राच जर आज अुपलब्ध असत, तर त्या पुस्तकाच्या भाराखाली शेष देखील मटकन मांडून बसता त्याचा नुसती वंशावळी प्रथमापासून शेवट-पर्यंत म्हणता म्हणता आयुष्य संपून जात अेक आवृत्ति करायला दहाल आयुष्य पुरत ना ! मग अभ्यास कुठला? त्यातच त्या त्या पिढीच प्रमुख कवि ज्योतिषी, शिल्पी, वैद्य ऋषि, पुराणिक यांचीही आत्मचरित्र जिवंत राहती प्रत्यकी लक्ष लक्ष ग्रंथ लिहिणाऱ्या ग्रंथकाराच्या ग्रंथांची वाडे, साम्राज्याची दप्तर शतकोटी रामायण, कोटिकोटी अभंग रामा रामा ! तर ती सारी मेलेल्याची अितिहास-सामग्री ठेवण्याला भूमि कमी पडून जिवंताना राहण्यास अंगुळभर स्थलही अुरतं ना ! तेव्हा वरचेवर जुने ग्रंथ, चरित्र ताम्रपट, कागद, वस्तु वास्तु सारखी नाश पावत गेला ह्याविषयी आपण अैतिहासिक संशोधकानी महोत्सव करावयास हवा महोत्सव ! पण तत्त्व पाहतो कोण? ह्या जीर्ण ताडपत्र्याचा चुराडा करून, अितिहासाचा नाश करून आमच्या अितिहाससंशोधनशास्त्राचे अस्तित्व कोणी संभव केले? काळाने ! त्या विनाशवर्तीने ! ह्यास्तव आपल्या ठरावात ज्या अर्थी अितिहासनिर्दालन हही अितिहाससंशोधनाच प्रमुख मंतव्य आहे हे तत्त्व आपण मान्य केले आहात त्या अर्थी त्या विनाशाची देवता जो काळ तिचेच आभार सर्वांआधी आपण अितिहाससंशोधकास मन पूर्वक मानायलाच नकोत काय ? अितिहास-संशोधकाच काळ हाच कुळदैवत आहे आजवर तत्त्व न जाणल्यामुळे कोणाही अितिहाससंशोधक मंडळाने काळाचे अुपकार समजले नाहीत ह्यास्तव ते अपूर्व काम

आठवणदेखील होत नाही. पूर्वी आमचे हविर्भाग व्यवस्थित पोचत, आम्हीही त्यांची वास्तपुस्त ठेवीत असू. पण आताशी त्यांनी आमची खंडणी साफ बंद पाडली आहे. ना चौथाई ना सरदेशमुखी ! ग्रीकांचीं स्थंडिलें कधीच विझून गेली; पारसिकांचा अग्नि उद्ध्वस्त; आर्यदेखील अनार्य झाले. अहो, ज्या भारतवर्षातून प्रत्यहीं देवांचे मुख जो अग्नि त्यात सुगंधी नि स्निग्ध अशा ताज्या ताज्या तुपाचे हौद आणि रुचिर मांसाचे ढीगच्या ढीग अर्पिले जात, त्या भारतातून गेल्या अुम्या वर्षात कुरुंदवाडच्या टपालातून अेक बोकड काय तो धाडला गेला !. चारपाच माणसाना देखील जें मास अपुरें पडावें त्यात तेहतीस कोटी देवांची भूक भागेल असें का त्यांस वाटले ? त्यांनी आमची चेष्टा चालविली आहे दुसरें काय ? अशा मानवाशी यापुढे जिव्हाळ्याचा संबंध कसला ठेवता ? अिंद्रा, भारतवर्षाकडून अजून वर्षाकाठी थोडातरी आज्याच्या आहुतीचा नी अजमासाचा पुरवठा आम्हां देवास होतो, पण त्या अुद्दाम, अुर्मट नि नास्तिक युरोप अमेरिका, विशेषत: तो रशिया, त्यांनी तर ज्या देवमुखास्पद अग्नीमध्ये प्रत्येक जन्ममृत्युप्रवासयुद्धप्रभृति प्रसंगी सुरुचिर आज्य नी अजमांस अर्पावयाचे त्यात हटकून कोळसे आणि पेट्रोल ओतीत बसावें आं ! अिंद्रा, जिव्हाळ्याच्या संबंधाचे नांव सोड. देवांची खंडणी गेलीं हजार वर्षे तुंबली ती अुगवून घेण्यासाठी या मानवांशी जर कोणचा संबंध

नारद—'त्याच कारण असेच अेक होते मजविषयीही त्याचा अेक गैरसमज झाला होता की,

> 'हा तो सारा कलह करवी !' भाडखोरा जनानी ।
> पूर्वी कडो पिकविलि तिला लोक तो सत्य मानी ॥

त्याच्या 'भाडाभाडी पूर्वी चालत तेव्हा मी थोडी गमत पाहत अुभा असे खराच ! पण—

> मातेचो का ? कलह बघता मौज कोणा न वाटे ? ।
> तीचेहो मी परि अलिकडे काढि का नावही तें ! ॥
> लोकार्था म्या सतत झटतां नारदानें, पुराणे ।
> गातो थोडें ! चुकुनि कळही लागता लाव गाणें ! ! ॥

म्हणून मी त्याच्यात जाणेच सोडून दिले तरीही ज्या अर्थी त्याच्या भाडा-भांड्या नि लठ्ठालठ्ठी सारखी चालूच राहिली त्या अर्थी 'नारद येतो म्हणून आगची भाडणे होतात' असे म्हणण्यास त्याना तोडच राहिले नाही. जर्मन महा-युद्धात मी अेवढ्याचसाठी चकार शब्दसुद्धा अुच्चारला नाही कैसरला भेटलो नाही की झारला, की लेनिनल। अतज्ञानान आपलो सगळी लाथाळी पाहन होतो, पोट धरधरून हसत होतो'

अिद्र—'आता त्याना तुमच्याविवाचूनही चागले मरेमरेतो भाडता यावयास लागले असल्यामुळे, तुम्ही कळ लावीतो ते थाबतच नाहीत म्हणता ? असो आता तुम्ही पृथ्वीवर पुन्हा सचारार्थ नित्य जावे, देवाविषयीचे मानवाचे गैरसमज शक्य तो दूर करावे पृथ्वीवरील लोक देवाविषयी काय बोलतात ते सारे वृत्त आम्हास सागत चलावे आपण आणलेल्या माहितीचे अेक परिपत्र (सर्क्युलर) आम्ही सर्व देवास धाडले जाण्याची व्यवस्था करु भगवान् विष्णूने घेतलेला नवयुगप्रवर्तक नवावतार जो विज्ञान त्याचे वर्चस्व मानव्यावर स्थापण्याच्या पुण्यकार्यीही आपण झटालच'

✦ ✦ ✦

अहिंसानद नि शब्दशास्त्री वादाच्या भररगात आले होते वाद रगता रगता काला जगदी फेकेरीवर आला भूकप देवाच्या रागाने येतो हे दोघासही मान्य होते पण ह्या वर्षी अेकदम दोन भयकर भूकप लागोपाठ बिचाऱ्या भारतावर धाडण्या-अितका देव रागावला का, हा त्याच्या मतभेदाचा मुख्य प्रश्न होता

शब्दशास्त्री—'अहो अहिंसानद, अस्पृश्यता ही शास्त्रशुद्ध, सनातन, प्रत्यही कोट्यवधि लोक तो पाळतात, सर्व भारतवर्षभर ती पाळली जाते, पण हा बिहारमधील भूकप तर ह्याच वर्षी झाला अर्थात् देवाला मनुष्याचा अितका

विशेष राग येण्यासारखी कोणतीतरी विशेष पापमय घटना ह्याच वर्षात घडलेली असली पाहिजे. अस्पृश्यतेची शास्त्राज्ञा सनातन असताही अुच्छेदून त्या हीन जातीचा सारा विटाळ समाजात कालवावा, अितकेच नव्हे, तर देवांच्या देवळात देखील अस्पृश्याना येअू द्यावें ही तुमची पाखंड चळवळ ज्या अर्थी याच वर्षी चालू झाली त्या अर्थी तीच ती पापी विशेष घटना असली पाहिजे की, जी योगें देवाला आम्हा मानवांचा हा विशेष राग येअून आमचे डोळे अुघडण्यासाठी हा दंड त्याने द्यावा! अहो देवाचा न्याय किती सत्वर नि किती काटेकोर असतो पहा. गुरुवायुपूरच्या देवालयात त्या कुश्याहूनही ओंगळवा नि अमंगळ असणाऱ्या अस्पृश्यांस नेण्यासाठी तुम्ही पापी लोक त्या देवळाच्या दरवाजाशी जाता न जाता तोंच देवाने भयंकर भूकंपाच्या जबड्यात सारा बिहार प्रांत ढकलून दिला. गंगामाय रागानें फुगून या पापी भूलोकास सोडून स्वर्गात परत जाण्यासाठी अंतराळांत अर्धी अुंच चढून गेली! तेव्हा हे स्पष्ट आहे की, महाराधेडांना देवळात नेण्याचा जो पापी अुपक्रम तुम्ही केलात त्यामुळे चवताळून देवाने हा दंड मनुष्यास दिला आहे. भूकंप नको अस-तील तर अेकच अुपाय की, धर्मशास्त्रानुसार नि सनातन रूढीप्रमाणे अस्पृश्यता पाळावी नि मंदिरप्रवेशाचा हा भ्रष्टाकार तत्काळ बंद करावा!'

अहिंसानंद—' अहो शब्दशास्त्री, ती सुधारणाचळवळ आम्ही तत्काळ बंद केली तर आज अेकट्या बिहारला भूकंप झाला तो साऱ्या भरतखंडभर पसरेल. नुसती गंगाच नव्हे तर गोदा, कृष्णा, कावेरी, प्रत्येक ओहोळ, फार काय नगर-संस्थेचें प्रत्येक गटार रागाने तुडुंब फुगून वर अुसळून यच्चयावत् नगरसंस्थातील आधीच नाकास असह्य झालेली घाण शतपटीने अधिक वाढवील. सुधारणा ही या वर्षीची भूकंपकारक विशेष घटना नव्हे; तर आजवर अस्पृश्यता हें महापाप आहे असें तुम्हास कोणी शिकवीत नसल्यामुळे तुमचें तें पाप अहेतुक नी अज्ञानजन्य म्हणून जें थोडेसें क्षम्य होतें तें, आता आम्ही तुम्हांस तें पाप आहे असें या वर्षी सांगत असताही तुम्ही अेकत नाही त्यामुळे, अक्षम्य ठरलें. ही ती भूकंपकारक विशेष घटना होय. *अस्पृश्यता ठेवणारच, मद्रासला गुरुवायुपूरचे मंदिर अस्पृ-श्याना अुघडणार नाहीच,* असा हट्ट धरलात म्हणून बिहारला भूकंपाचा भयंकर

अहिंसानंद— अहो शब्दशास्त्री जर गुरुवायुपूरच्या आणि अितर देवमंदिरास भ्रष्टविण्यासाठी आम्ही सुधारक धडपडतो म्हणून भूकंप झाला हें तुमचे म्हणणे खरें असतें तर तो भूकंप जे सुधारक त्या वेळी त्याच गुरुवायुपूरच्या देवळात बळं बळं—नव्हे—सत्याग्रहानं घुसत होते त्यांच्या छावणीत व्हावयास हवा होता पण अस्पृश्यतानिवारणाची नि मंदिरप्रवेशाची घोर प्रतिज्ञा करून गांधीजीप्रभृति जे सुधारक त्या देवळाजवळ ठाण मांडून बसले होते त्यांच्यासमोरील त्या साधुशील दरिद्रीनारायणास शोभेशा द्राक्ष लोणी मोसंबीप्रभृति बापड्या आहाराचा ढीगसुद्धा डळमळू नये आणि डळमळून कोलमडला तरी नेमका त्यांच्या तोंडात यथाप्रमाण पडावा अशाच बेताने कोलमडावा, अशा थुलट देवाने त्यांचा यावदिष्ट पाहुणचार केला तो कसा? अस्पृश्यतानिवारक पुढारी मद्रासमध्ये पाप करतात म्हणून बिचाऱ्या बिहारच्या हजारो बायकामुलें गंगेच्या भूकंपीय महापुरात गळचेपी देऊन बुडवून टाकण्यास हा तुमचा देव म्हणजे कोणी ठकांचा सरदार होता की काय?

अहिंसानंद— केव्हाही नाही! आम्ही त्या क्रूराविरुद्ध प्रथम त्याच्या दारात आडवे पडण्याचा सत्याग्रह पुकारू; शेवटी अन्नसत्याग्रह पुकारून स्वतःच अुपाशी मरू !

नारद— तर मग जो देव त्याची प्रार्थना करण्यास, त्याची स्तुति गाण्यास काही लोक विसरतात म्हणून जे प्रार्थना करतात त्यासुद्धा, जीं लेकरें पुरते दोन शब्दही अजून बोलू शकत नाहीत, नव्हे जीं अपत्यें अजून गर्भातच आहेत, त्यांसुद्धा हजारो जणाचे जीव भूकंपादि भयंकर अरिष्टांच्या गदेखाली चेंदामेंदा करून टाकतो, तो देव की दैत्य ; अहो, तुम्ही त्या दयाळू सत्त्वमय परमकारुणिक पतित-पावन भगवंताच्या ठायी अशा कल्पना आरोपून त्याची नकळत का होअीना, पण कोण विटंबना करता आहां, पहा बरें !

शब्दशास्त्री— मग नारदमुनि ! वेद, अवेस्ता, पुराण, कुराण, बायबल, तालमदप्रभृति यच्चावत् अीश्वरी धर्मग्रंथात देवाची प्रार्थना न केली, तर तो रागावून त्या लोकांवर रोग, दुष्काळ, भूकंप, जलप्रलय, अग्निप्रलय प्रभृति संक आणतो असे जें अीश्वरानेच ग्रथिलें वा कथिलें आहे, तें काय सारें लटके आहे सांगा, हीं धर्मरहस्यें आम्हांहून आपणांस अधिक बिनचूकपणे कळतात यांत आम्ह काहीच शंका नाही.

नारद— तर मग सांगतो अैका ! हे सारे ग्रंथ अीश्वरग्रथित वा अीश्व कथित नसून मनुष्यकृत आहेत. आपल्या 'आतला आवाज,' 'अंतःस्फूर्ति.' ही देवाची प्रत्यक्ष वाणी, अिच्छा, स्फूर्ति, आज्ञा होय, अशा प्रामाणिक भावनेने काह थोर पुरुषांची स्वतःच फसगत झाली, काहींनी स्वतःचें स्तोम माजविण्यासाठ जाणूनबुजून दुसऱ्यास फसविलें. या विशाल विश्वाचे सृष्टिनियम ठरलेले असू त्यांचा, तुम्ही मानव तुमच्या अत्यंत तुच्छ आवडीनिवडीप्रमाणे तुमच्या त्या धर्म ग्रंथात ज्यास पाप वा पुण्य समजता त्याच्याशी लवलेशही संबंध नाही. मुसलमान खिस्त्याना गाय मारणे पाप नसून बहुधा पुण्यही वाटतें, हिंदूना तें महापाप ! नियोग अेकदा ब्राह्मणानाही पाप नव्हते; आज तें महापाप ! असा तुमचे तुम्हीच जे पापपुण्याचा बोटावरच्या थुंकीप्रमाणे, पत्त्यांच्या पिसणीप्रमाणे, खेळ करू शकता, त्याच्या लहरीप्रमाणे या प्रचंड विश्वाचे अबाधित सृष्टिनियम बदलू शकतील हे मानणे म्हणजे देव हा माणसाचा गुलाम आहे असे मानण्यासारखे आहे. तुमच्या घराची कलती भिंत धाडकन् कोसळली किंवा जुन्या किल्ल्याचा भक्कम बुरुज ढासळला वा नवीन बांधलेल्या कच्च्या पायाचा प्रचंड पूल कोलमडला तर तो, पाया खचल्यामुळे वा जीर्ण बांधकाम हदरल्यामुळे होय. पण त्या, भिंतीवर बुरजावर वा पुलावर रेंगाळणारे वागुरडे जर समजले की, आमच्या हातून काही पाप घडले म्हणून हें घर, बुरुज वा पूल कोसळला, भूकंप झाला, त्यांचीं अंडीं कच्चीबच्चीं चक्काचूर झाली, तर तुम्ही हसाल ! त्याचप्रमाणे तुम्ही माणसें

जेव्हा भूकंपात पर्वत कोसळले, समुद्र अुफाळले, नद्यांचे डोहच्या डोह आचमनासारखे भूगर्भातील अुसळत्या अग्नीने पिअून टाकले, तेव्हा हा सृष्टिक्षोभ तुम्हा चार सुधारक वागुरड्यांनी 'देवमंदिरें अस्पृश्यांस अुघडा' म्हणून सांगितलें असता अितर सनातनी वागुरड्यांनी तें अैकलें नाही यास्तव झाला, असें समजता तेव्हा मला हसू येतें ! प्रार्थना केली नाही तर देव रागावतो म्हटल्याने देवच दैत्य ठरतो अितकें मी तुम्हांस सांगितलें! आता आणखी असें सांगतो की, सृष्टिव्यवहारापुरते तरी जे कोणी देवाची प्रार्थना न करता सृष्टिनियमांच्या अबाधित क्रमासच तोंड देतात आणि त्यातील अनुकूल ते नियम पाळून प्रतिकूल नियमांस तोंड देतात ते प्रार्थना न करणारे लोकच देवास अधिक आवडतात. तो रशिया पहा ! तुम्ही देवालाच दैत्य बनविणाऱ्या ज्या भावड्या कल्पना करून खऱ्या देवाचें विडंबन करता तसें करण्याचें रशियाने सोडून तशा देवाचें अस्तित्वच नाकारलें. मानव्याला एकदरीत ज्या परिस्थितीत जें अुपयुक्त ते चांगलें, तें पुण्य, जे अनुपयुक्त ते त्या परिस्थितीत वाअीट, पाप ! हा मानवांचा मानवधर्म ! और सब् झूट ! त्या मानवी पापपुण्याचा, वागुरड्याच्या पापपुण्याचा मनुष्याच्या हालचालीशी नसतो तसा, सृष्टिनियमानुसार होणाऱ्या सृष्टीच्या प्रचंड भूकंपापासून तों यःकश्चित् कीथिविरीच्या पर्णकंपापर्यंतच्या हालचालीशी काहीअेक संबंध नसतो; म्हणून प्रार्थना, अनुष्ठानें प्रभृति तदर्थक भावडे अुपाय अज्ञान वा थोतांड ! असें म्हणणाऱ्या त्या रशियावर खरा देव अुलट प्रसादला आहे ! रशियात प्रजा वाढत आहे, त्यांना पुरून अुरेल अितकी धनधान्यसमृद्धि पिकत आहे, रोगराअी घटत आहे ! प्रार्थना करणाऱ्या तुमची घरेदारें—देवळेंसुद्धा अेक वर्षांत दोन भूकंपात गडप करणाऱ्या देवाने तिकडे यावर्षी अेकसुद्धा भूकंप धाडला नाही, अितकेंच नव्हे तर तुम्ही भूकंप थांबविण्यासाठी अस्पृश्यता निवारावी की ठेवावी, प्रार्थना कुराणानुसार मशिदीत करावी की वेदमंत्राही देवळात, या भावड्या चर्चा करीत असता तिकडे ते रशियात भूकंपविद्येस अध्ययून त्याचे सृष्टिनियम समजावून घेत भूकंप कुठे, कसे, केव्हा होतात ह्याचे कित्येक अबाधित नियम आविष्कारूनही बसले आहेत. नक्की ओळखलेले भूकंपाचे पट्टे टाळून ते आता नगरें वसवू शकतात !

शब्दशास्त्री — पण ते रशियन नि युरोपियनही ख्रिस्ती आहेत, आणि ख्रिस्ती लोकही चर्चांतून प्रार्थना करतात असें आम्ही अैकतो !

नारद — तुम्हा हिंदु-मुसलमानांप्रमाणे ते रशियनादिक युरोपियन पूर्वी बायबलास अीश्वरकृत मानून तसाच वेडगळपणा करीत, तेव्हा भूकंपाविषयी त्यांच्या तुमच्यासारख्याच दुधखुळ्या कल्पना असत. त्यांचा अेक अैतिहासिक दाखला (पूर्वीप्रमाणे पौराणिक भाषेत नव्हे तर—) अैतिहासिक भाषेत सांगतो तो अैका—

करणारा — हा तुमचा देव म्हणजे एका चोराच्या अपराधासाठी नांदणाऱ्यांसुद्धा साऱ्या नगराची कत्तल करणारा आणि ज्या बापड्यांना त्या चोराने लुटले त्या बापड्यांनाही फाशी देणारा कोणी सवाई नादिरशहाच असला पाहिजे नव्हे काय ?

शब्दशास्त्री — वा ! नारदा वा ! भली खोड मोडली या सुधारकाची ! अगदी असेच मीही विचारले होते ! काय अहिमानंद, वाग्मी आता चूप का ?

नारद — आणि काय हो शब्दशास्त्री, 'अस्पृश्यतानिवारक सुधारकांच्या पाखंडास रागावूनच मी देव, बिहारचा भूकंप पाडला' अशी देवाची स्वहस्ताची वीतभर चिठ्ठी तरी तुम्हास आली होती काय ? जर आली असली या शास्त्रार्थानेच देवाचा तसा निश्चय तुम्ही अनुमानीत असला तर बिहारच्या भूकंपात मूठभर सुधारकांबरोबर हजारो वर्णधर्माभिमानी स्पृश्यांसही देवाने ठार मारले इतकेच नव्हे तर जी शेकडो स्पृश्य मंदिरे आत अस्पृश्यांची सावलीदेखील पडू न देता शेकडो वर्षे शुद्ध राहिली त्यांच्या देवमूर्तीसुद्धा भूकंपाच्या लाथेच्या ठोकरीसरशी धुळीस मिळविली आणि अस्पृश्य थेट गाभाऱ्यात जाऊन ब्राह्मणांसह रुद्र पढून ज्यात स्वहस्ते देवास अभिषेक करतात, शेकडो चांभार—महार—ब्राह्मण—मराठे ज्यात प्रकट सहभोजने झोडतात, ज्याने अस्पृश्यांस 'पूर्वास्पृश्य' करून सोडले ते जातिभेदतोडक असे रत्नागिरीचे पतितपावन मंदिर मात्र सुरक्षित ठेवले ! अशा शास्त्रार्थाचा निव्वळ टर उडविणाऱ्या ह्या तुमच्या देवाहून कोणचा अस्पृश्यतानिवारक सुधारक अधिक पाखंड आहे सांगा बरे ? सुधारकांइतका पाखंड पण अस्पृश्यता पाळतो म्हणून तुम्ही सनातनी मंडळींवर कोपताही ! सुधारक जो कहर कधीही करू इच्छिणार नाही अशी जाळपोळ हत्या याही तुम्ही बिहारी

मातांना, जन्मून दुधाची पहिली धार पीत असलेल्या शेकडो लेकरांना ज्या भूकंपाने बकासुरासारखा आपला रक्तबंबाळ जबडा शुघडून कचाकच खाअून टाकलें, त्या भूकंपाच्या भयंकर संकटास दंड म्हणून जो देव देअू शकतो, त्याचे भक्त म्हणवून घेण्यास हिंस्र राक्षस देखील कचरतात! अशा हिंस्र देवाचे भक्त म्हणविणारे तुम्ही अहिंसावादी अेक मिथ्याचारी तरी आहात नाही तर महामूर्ख ! त्या बापड्या सनातन्यांची बुद्धि पालटून त्यांना अस्पृश्यतानिवारणाची सद्बुद्धि द्यावयाची शक्ति त्या देवास — तो देवच असला तर — होतीच होती ! क्षमाशील देवाने तें न करता प्रथम त्यांना अस्पृश्यांचा छळ करणाऱ्या स्मृत्या पढवून त्यांना दुर्बुद्धि दिली आणि नंतर त्या दुर्बुद्धीसाठी, त्यांच्या हजारो जीवांच्या सपासप माना कापल्या. गळे घोटून प्राण घेतले ! — हा देव कीं दैत्य ! बरें, क्वेट्टयाच्या मुसलमानात, जपानमध्यें, दक्षिण अमेरिकेत अस्पृश्यता हिंदुस्थानसारखी नाही ना ?

दोघेही — नाही !

नारद — मग तेथेही असेच भूकंप कां झाले ?

अहिंसानंद — त्यांच्या परिस्थितीचा मी अद्याप फारसा अभ्यास केला नाही पण — पण त्यांनी काहीतरी दुसरीं पापें केली असतील!

शब्दशास्त्री — बहुधा सर्वरोगप्रतिबंधक पंचगव्य ते लोक नियमाने पीत नसावेत; आणि सर्वारिष्टशांतिप्रीत्यर्थ 'श्रीराम जयराम जयराम' हा मंत्र अेक कोटी वेळा जपतही नसावेत ! रामनामाचा प्रताप अरिष्टशामक आहे ?

नारद — तुम्ही प्रत्येक मढें नेताना 'राम बोलो भाअी राम' म्हणून राममंत्र सारखा अुच्चारीत स्मशानापर्यंत जाता; पण स्मशानात तिरडी ठेवताच ती सारीं मढीं तें अरिष्ट टळून जिवंत होतात काय ? हिंदुस्थानात हा मंत्र युगोयुगे जपता — हिंदुस्थानवरच जगात कुठेही नाहीत अितकीं अरिष्टें आज कोसळलीं आहेत ! भूकंपाची मायची साथ आली आहे !

अहिंसानंद — पण तथापि भूकंपविषेचा मी आजवर जो खोल अभ्यास केला, त्यावरून अेक सिद्धान्त मात्र मी निश्चितपणे सांगू शकतो की, त्या क्वेट्टा जपान, दक्षिण अमेरिकाप्रभृति ठिकाणी देवाची प्रार्थना वेळच्या वेळी होत नसावी, म्हणून तिकडे भूकंप होतात. आमच्या अस्पृश्यता-निवारक मंडळीच्या केंद्रात जिथे जिथे देवाची प्रार्थना वेळच्या वेळी होते तिथे तिथे भूकंप आला नाही. साबरमती, वर्धा, अहिंसाळू क्षात्रयापासून राष्ट्रीय सभेची अधिवेशनें जिथे जिथे भरलीं ती तीं स्थळें भूकंपाची छाती झाली नाही डिवचायची! प्रार्थनेमुळे प्रसादून देव भूकंप धाडीत नाही. भूकंप नकोत तर प्रार्थना करा ! मग देव रागावून भूकंप कां बरें धाडील ?

नारद — अहिंसानंद, अेखाद्या गव्हर्नरला तुम्ही मानपत्र दिलें नाहीत म्हणून त्याने राजधानींतील यावत्कामुलामाणसांची सरसहा कत्तल केली तर त्या गव्हर्नरला तुम्ही न्यायी, सत्वशील, नि दयाळू म्हणाल का ?

## लिस्बनचा भूकंप आणि युरोपियनांचा धर्मभोळा मूर्खपणा

*ख्रिस्ती सन १७५५ त लिस्बनला भयंकर भूकंप होऊन लिस्बन नगरीची* नगरी गडप झाली! पंधरा हजार माणसे चुटकीसरशी चक्काचूर झाली! सारा युरोप हादरला! तेव्हा या भयंकर अरिष्टास टाळण्यासाठी त्या भावड्या ख्रिस्ती लोकांपैकी जे प्रॉटेस्टंट सुधारक होते ते म्हणाले, 'या रोमन कॅथोलिक सनातन्यांच्या धार्मिक रूढि देवाला आवडत नाहीत म्हणून देवाने हा दंड दिला यास्तव आता *प्रॉटेस्टंट सुधारकांच्या धर्मासच सर्वांनी आचरावे, म्हणजे भूकंप येणार नाहीत'* हे ऐकताच रोमन कॅथोलिक सनातनी खवळून प्रतिपादू लागले की,' सनातन ख्रिस्ती धर्मरूढींना तोडण्याचे पाप जे हे प्रॉटेस्टंट सुधारक करीत आहेत त्यानेच देव रागावून लिस्बनला उच्छेदिले! ह्या प्रॉटेस्टंटांमच नामशेष करणे हाच एक भूकंपापासून जगतास बचावण्याचा उपाय आहे' कॅथोलिक सनातनी बहुसंख्य असल्यामुळे त्यांनी नुसते बोलूनच न थांबता लिस्बन नगर पुन्हा उभारण्याच्या आधी जे भूकंपातून उरलेसुरले प्रॉटेस्टंट त्यांच्या हाती लागले त्यांची त्या कॅथोलिकांनी कत्तल *केली आणि ते बळी दिल्याने देव प्रसादला असे समजून त्यांच्या कत्तलीच्या पायावर* नगरग्राम पुन्हा उभारले आणि हे पुण्यकृत्य देवास निवेदण्यासाठी ह्या कॅथोलिक सनातन्यांनी एक मोठी सामुदायिक प्रार्थना केली! परंतु त्यानंतर झालेल्या अनेक भूकंपात हजारो कॅथोलिक लाखा सापडले, तिथे जिवंत गाडले गेले—जाताहेत!

शब्दशास्त्री — मोठे दुधखुळे होते हे युरोपियन ख्रिस्ती लोक!

नारद — होय, फरक इतकाच की, ते युरोपियन ख्रिस्ती पूर्वी दुधखुळे होते नि तुम्ही हिंदु मुसलमान अजूनही या प्रकरणी दुधखुळे आहात! अस्पृश्यतेच्या पापाने—की अस्पृश्यतानिवारणाच्या पापाने भूकंप झाला हे तुम्ही हिंदु तुमच्या अपुऱ्या, अघवट नि अवळ्या 'आतल्या आवाजास' विचारीत बसला आहात आणि तो भूकंप *मशिदीत सामुदायिक निमाज पढले म्हणजे टळेल म्हणून मुसलमान* अल्लाच्या प्रार्थना करीत आहेत! तरी बरे की त्या भूकंपात विहारमधली शेकडो देवळे जशी चक्काचूर झाली तशाच पंनेटघाला प्रत्यहा निमाजांनी निनादणाऱ्या डोकडा मशिदी मातीस मिळाल्या!'

अहिंसानंद — मग हा दुधखुळेपणा त्या युरोपियनांनी कव्हा सोडला? कोणी शिकविले ते त्यांना?

नारद — जेव्हा त्यांनी बायबलाची स्मृति मिटून विज्ञानाची स्मृति उघडली तेव्हा!—विज्ञानाने शिकविले हे त्यांना

शब्दशास्त्री — हा विज्ञान कोण?

नारद — हा विष्णूचा नवा अवतार! सृष्टिव्यवहारापुरते तरी तुम्ही आता ह्या विज्ञानाचीच स्मृति अनुसरा! तिच्या बळेच युरोप दूरदर्शन, दूरश्रवण, पृथ्वीचे

साम्राज्य, समुद्राच्या खोल तळापासून ता आकाशाच्या विरल स्तरापर्यंत अव्याहत गति प्रभृति अत्यद्भुत आश्चर्यें युरोप करू शकत आहे हा विज्ञानदेव लाचलुचपत, पूजानैवेद्य, बळी-बाकड निमाजकुरबानी, मत्रतत्र, स्तुतिनिंदा, कशासही अपेक्षित नाही, कशानेही प्रसादत नाही, रागावत नाही, तो कोणाच्या गळ्यातील ताबीत होत नाही कोणास गडा घालीत नाही! अबाधित सृष्टिनियमान्वये त्याचा सारा कारभार चालतो तुम्ही माणसानी त्याच्या स्मृतीत भूकप का होतो नि त्याच्या अुत्पातापासून माणसाच रक्षण कस नि किती प्रमाणात करता येअील तें शिकावे ह्या विज्ञानाने आणलेली ही स्मृति तुमच्या बायबल-कुराण पुराणाप्रमाणे मनुष्याच्या कोत्या ज्ञानाच्या नि अज्ञानाच्या आतल्या आवाजाचे पडसाद नसून ती खरोखरच अीश्वरकृत आहे सनातन आहे, कारण ती त्रिकालाबाधित सृष्टिनियमासच काय ती मागते—तुमच्या मानवी कल्पनानी कल्पिलेले देवही त्या स्मृतीतील नियमास अुल्लघू शकत नाहीत! कारण ती मनुष्याच्या देवानें युजवया ताडपत्रावर वा खजुराच्या पानावर लिहिलेली नसून विश्वाच्या देवाने आकाशाच्या नीलपत्रावर ताऱ्याच्या जाज्वल्य अक्षरात मुद्रिली आहे! त्यातल्या त्यात कशास म्हणावयाचेच तर मनुष्यास तरी, तिलाच सनातन धर्म म्हणता येअील!

शब्दशास्त्री — ह्या स्मृतीतून भूकप टाळण्याचा आमच्यापुरता आत्ताच्या आता आपण कोणता अुपाय सागू शकता?

नारद — (हसून) भूकपविद्येचे जे नियम आहेत त्या सृष्टिनियमाचा शोध लावा जे कळले आहे त्याच्या आधारे भूकपाचे पट्टे भूगर्भात कुठे कुठे आहेत ते निश्चित करून त्या त्या कक्षेत वसति करू नका, नगर वसवू नका आणि भूकपात आपण दगावलो तर आपल्या कुटुबातील जी काणी मुल माणस वाचतील त्याना काही तरी अन्नवस्त्राचा आधार असावा म्हणून सापडण्याच्या आधीच शक्य तितक्या मोठ्या रकमेचा विमा अुतरून ठेवा महाराष्ट्रापुरतें बोलायच तर मुबअीची नवभारत किंवा पुण्याची कामनवेल्थ ह्यात विमा अुतरावयास येत असाल तर माझ्याच बरोबर का चलाना! मी तिकडेच चाललो आहे

नारदाच्या तोडची ही वाक्ये अैकताच शब्दशास्त्री सविस्मय वर पाहात म्हणाले नारदा आपण या विमा मडळाची अडती (अेजसी) घेतलेली आहे की काय आजकाल? अेवढ्या गभीर सनातन विषयाचा हा असला भिकार अुपसहार? अरेरे! या परम भगवदभक्त भगवान नारदाचा शेवटी अेक विमा मडळीचा अडत्या व्हावा ना? कोण अध पात!

पण ही वाक्य सपण्याच्या आधीच नारद अतर्धान झाले होते!

# ६. अेक घडलेला चुरचुरीत संवाद

(जसा धार्मिक भाबडेपणा असतो तसाच अेक बौद्धिक भाबडेपणा असतो) धर्मभोळा वर्ग जर अेखादी गोष्ट धर्म म्हणून करू लागला नि त्याला विचारले की, अहो, त्या गोष्टीचा काय लाभ ? हे का करता असे ? तर तो बिचारा सरळपणे सांगतो, 'पोथीत असे आहे, देवाला आवडते, हा आमचा धर्म आहे'—अितकेच काय ते ! कोणचे तरी कारण सांगून माझी तशी श्रद्धा म्हणून मी करतो अेवढेच काय ते म्हणतो त्याचे ते म्हणणे आपल्याला पटले नाही तरी समजते पण काही लोकांना नुसते पोथीत आहे म्हणून आपण अेखादी गोष्ट करतो, ती तर्काला टिकते की नाही, अुपयुक्त आहे की नाही, हे आम्ही पाहिलेले नाही, असे मान्य करून स्वत:ला धर्मभोळे म्हणवून घेण्याची तर लाज वाटते, पण ती धर्मभोळी गोष्ट, आचार वा समजूत तर सवयीमुळे सोडवत नाही पोथीत सांगितले म्हणून काय ते खरे असे म्हणून न पाळता, तो आचार वा ती समजूत आजच्या बुद्धिवादाच्या कसोटीसही पूर्णपणे अुतरते आणि विज्ञानाच्या प्रत्यक्षसिद्ध प्रयोगात ती तशी कसास अुतरते म्हणूनच आम्ही त्या समजुतीस अनुसरून धरून तसे आचरतो. आम्ही भोळे नसून बुद्धिनिष्ठच आहोत, असे सिद्ध करण्याचा त्यांचा यत्न चालतो त्यांना धर्मभोळेपणा तर सोडवत नाही आणि बुद्धिवादी पण म्हणून घ्यावेसे वाटते त्यामुळे निर्मळ धर्मभोळेपणाहूनही त्यांचा हा बौद्धिक भाबडेपणा किळसवाणा वाटू लागतो ज्या आचाराचे ते समर्थन करू जातात तो अधिकच हिणकस ठरू लागतो आजच्या सुधारकांतही अशा अर्धवट वृत्तीचे कितीतरी लोक आढळून येतात ! त्यातही काही जण केवळ दुटप्पीपणामुळेच किंवा मिथ्याचारीपणामुळेच असे वितंडवाद करतात असे नाही त्यांच्यातील काहींचा अेक निरपेक्ष नि निःस्वार्थी अशी पूर्वजाभिमानाची सद्‌भावनाही त्यांस आपल्या धर्मभोळ्या नि आज टाकाअू ठरणाऱ्या आचारास असे यनकेन प्रकारेण समर्थिण्यास प्रवृत्त करते त्यांस असे भय वाटते की, जर आपले पोथीगत आचार आजच्या विज्ञानाच्या वा तर्काच्या कसोटीस अुतरत नाहीत असे सिद्ध होअू दिले, तर आपले ऋषि त्रिकालदर्शी आमची शास्त्रे त्रिकालाबाधित, नि आमचा धर्म सनातन नाही असे मानावे लागेल पूर्वज मूर्ख होते असे ठरेल ! या चुकीच्या समजुतीमुळे ते जो जो त्या धर्मभोळेपणाचे समर्थन बुद्धिवादाने नि विज्ञानाने करू जातात, तो तो तो आचार वा रूढि अधिकच धर्मभोळी ठरू लागते, नि पूर्वजांच्या पदरी नसता मूर्खपणा अधिकाधिकच पडू लागतो

(मागच्या परिस्थितीत अेखादी रूढि अुपयुक्त असली किंवा त्या काळच्या भौतिक ज्ञानाच्या मानाने अेखादा सिद्धान्त बरोबर वाटला, पण जर ती रूढि आज समाजास हानिकारक ठरत असेल वा तो सिद्धान्त वाढत्या भौतिक नि प्रयोगसिद्ध ज्ञानाने खोटा पडत असेल तर ती रूढि बदलण्यात वा तो सिद्धान्त असिद्ध मानण्यात

पूर्वजांचा काहीही अपमान होत नसून अुलट त्यात आमचा नि त्यांचा गौरवच आहे. कारण त्यांनी मानवी ज्ञानाची सीमा त्या काळी तितकी वाढविली, त्या भांडवलाचा योग्य अुपयोग करून त्याच्याच भांडवलाच्या बळावर आम्ही आपली मानवी ज्ञानाची संपत्ति अधिकाधिक वाढवीत चाललो आहो, असेच त्यायोगे सिद्ध होते. वडिलांचे राज्य वंशजांनी वाढविले, 'बापसे बेटे सवाओ' निघावे हेच पूर्वजांना नि वंशजांना भूषण पण काही लोकांना वडिलांहून आम्ही अधिक मूर्ख होत आहोत, बापाची मिळकत आम्ही बुडवीत आहोत, असे सिद्ध करण्यातच स्वतःची धन्यता, वडिलांचा गौरव, नि त्यांच्या पोटी आपण जन्म घेतल्याचे सार्थक वाटते!

स्वतःस धर्मभोळे म्हणवून घेण्यात कमीपणा मानणाऱ्या आणि बुद्धिवादास टिकेल तेच स्वीकारू असे म्हणणाऱ्या प्रामाणिक सुधारकातही हा बुद्धिभोळेपणा कसा त्यांना नकळत दडून बसलेला असतो ते स्पष्ट व्हावे याराठी आणि 'आपली प्रत्येक रूढि आणि आचार आजच्या परिस्थितीत आपल्या हिंदु राष्ट्राच्या अुद्धारास अुपयुक्त आहे की नाही, तो बुद्धिवादास टिकतो की नाही, ते कोणत्या कसोटीवर कसे पारखावे, याची पद्धत ध्यानी यावी म्हणूनही' 'पंचगव्य' या विषयावर आमचा अेका सुधारक मित्राशी झालेला संवाद खाली देत आहो. ...

घेऊ लागणाऱ्या पशूसारखे ते निव्वळ हास्यास्पद होतात। 'पाप' याचा अर्थ 'रोग' असा घेणे हेंच विपरीत नाही काय? रामकृष्ण परमहंस रोगाने गेले ही खरी गोष्ट सांगताना रामकृष्ण परमहंस पापाने मेले म्हणून जर कोणी म्हणाला तर त्यास तुम्ही दीडशहाणाच म्हणणार नाही का? आमच्या औषधानी रोगी तत्काळ रोग-मुक्त होतात, अशी पाटी न लावता जर अेखाद्या वैद्याने अशी पाटी लावली की, 'आमच्या औषधान पापी पापमुक्त होतात!' तर तुम्ही त्याची हुर्यो अुडविणार नाही का? डॉक्टरच्या घरी जाअून जर आपण म्हणालात, 'आमच्या घरी अेक पापी आहे, त्यास आपण पापमुक्त कराल काय?' तर डॉक्टर तुम्हास सांगणा रच की, 'गृहस्था, तू पत्ता चुकलास, शंकराचार्य अिथे रहात नाहीत!'—'अितका गैरसमज वाढविणारा शब्द वैद्यकशास्त्रासारख्या काटकोर विज्ञानात वापरणारा ह्या श्लोकाचा कर्ता किती गबाळधा मनुष्य असला पाहिजे बर! वैद्यकात पांडुरोग, क्षयरोग, वैद्याने रोगचिकित्सा करावी, असे शब्दप्रयोग, आम्ही शतावधि पाहिले आहेत पण पांडुपाप, क्षयपाप, वैद्याने पापचिकित्सा करावी, असे प्रयोग काही पाहिलेले नाहीत!'

वैद्यमहाशय— बरें, आम्ही तुमचा हा आक्षेप मान्य करतो की पंचगव्य हें वैद्यकीय औषध म्हणून ग्राह्य असें न सांगता आपल्या धर्मशास्त्रात तें पापक्षालक म्हणून सांगितलें आणि त्यामुळे आज लक्षावधि लोक श्रावण्यांतून, प्रायश्चित्तांतून नि व्यवहारांतून जें पितात तें मूळचा वैद्यकीय हेतु साफ विसरून जाअून निव्वळ धार्मिक भावनेनेंच काय तें पितात. पण आम्ही म्हणतो की, त्यामुळे त्यांचा वैद्यकीय अुपयोग अधिकच व्हावा, औषध घ्या म्हणून सांगितलें म्हणजे लोक अितके नियमाने तें पिणार नाहीत, पण धर्म म्हणून सांगितल्याने पाप जाण्याच्या आमिषामुळे तें पंचगव्य लाखो लोक अधिकच सापेक्षाने पितील, असाच शास्त्रकाराचा त्या पंचगव्याच्या धर्मीकरणात सद्धेतु नव्हता का? आणि त्याचा परिणामही अेकंदरीत चांगलाच झाला नाही काय?

आम्ही— चांगला परिणाम तर झाला नाहीच, पण अुलट अेकंदरीत पाहता अगदी वाअीट परिणाम झाला. त्या भाबड्या काळी जो काही अुपयोग अशा धर्मीकरणाचा असेल नसेल तो आता तर अगदीच दुर्घट, कसें तें पहा. अमुक औषध अमक्या रोगावर रामबाण आहे अितकीच यथार्थ प्रशंसा वैद्यक ग्रंथात शेकडो औषधाची केली असताही आणि त्या औषधाने पाप जातें, पुण्य लागतें प्रभृति भाकड थापा लावले नसताही तीं औषधें हजारो रोगी वैद्यांना पैसे देअून देअून घेतातच ना? धडधडीत बाटलेल्या महार डॉक्टर असलेल्या औषधालयात त्याच्या हाताने बाटल्या पितात, त्याला बुटासुद्धा घरात आणतात! रोग रोखठोक बरा करणारें औषध घेणें 'पाप' आहे म्हणून निषिद्ध केलें तरी रोगी घेतातच! तेव्हा गोमूत्र—गोमयाने अमुक रोग बरे होतात असें नुसतें सांगितलें असते नि तसा रोखठोक अनुभव येता तर वैद्यकातील ओवा, शोपा धर्माचा वशिला नसतानासुद्धा जशा घरोघर वापरल्या जातात, तसें ते पंचगव्यही त्या त्या रोगावर वापरलें जातेच! पण त्या गोमूत्राने पाप जातें, गाय म्हणून तिची शेपटी शिवली तरी विटाळ जातो, तिचें गोमूत्र म्हणजे गंगा, अशी वाह्यात् स्तुति केल्याने त्या गोमूत्र—गोमयाचा जो खरा औषधी गुण तो अुलट लुप्त होअून कुचकामाचा झाला. रोग घालविण्याअैवजी बुद्धिभ्रंशाचा नि भाबडेपणाचा अेक नवा रोग फैलावण्यास

आम्ही – ठीक, जे मनुष्यहितास अैहिक दृष्ट्या अुपयुक्त आहे ते कसे अुपयुक्त आहे हें न सांगता नुसतें तें कृत्य पुण्य, अुलट कृत्य पाप, त्या कृत्याने देव पावतो, अुलटपक्षी रागावतो, अितकेच सांग तें सांगण्याची, धर्माच्या पारलौकिक अवडंबरात तो आचार गुरफटून टाकण्याची पद्धत पूर्वी कितीही आवश्यक असली तरी ती आता त्याज्य नि अहितकारकच ठरविणे भाग आहे. कारण अमुक अेक गोष्ट अुपयुक्त म्हणून न सांगता तो त्रिकालाबाधित सनातन धर्म आहे अेवढेच सांगत राहिल्याने, तो आचार वा ती वस्तु स्वरूपतःच स्वयमेवच धर्म्य आहे असा लोकांचा बुद्धिभ्रम होतो आणि त्यामुळे ज्या परिस्थितीत त्या वस्तूपासून वा आचारापासून मनुष्याचे अहित होतें, त्याही परिस्थितीत ती वस्तु वा आचार धर्म्य मानला जाअून लोक अनुसरू लागतात. गायीचेच पहा. ती अुपयुक्त पशु म्हणून पालनीय ठरली, त्यायोगे हळूहळू तिला देवता, परलोकी स्वर्गति देणारी देवी, असे समजू लागताच ती गाय वस्तुतःच पूज्य, पवित्र, मनुष्याहूनही श्रेष्ठ वाटू लागली. त्यामुळे ज्या परिस्थितीत गाय ही राष्ट्रास अैहिक दृष्ट्या अनुपयुक्त ठरते वा गोवध हेच मनुष्यहितसाधक कृत्य ठरते त्याही परिस्थितीत गाय ही वस्तुतःच पूज्य देवता, माता अशी धर्मभावना दृढ झाल्याने तिला मारण्याचे ‘पातक’ करण्यापेक्षा राष्ट्राच्या लढाया हरून राष्ट्र देखील लोक मरू देतात! शत्रूच्या गायी, केवळ अुपयुक्ततेच्या दृष्टीने आपल्या शत्रुच, हे तत्काळ पटते, शत्रूच्या दाणावैरणीप्रमाणे त्याच्या गायींचाही नाश करणे अवश्यमेव सत्कृत्य ठरते. पण गाय ही वस्तुतःच पूज्य देवता मानली जाअू लागली म्हणून, वस्तुतःच अवध्य ठरली म्हणून, शत्रूच्या गायीदेखील मारावयास हिंदु सैनिक सहसा सिद्ध होत नाहीत. कित्येक परदेशी वेढ्यात शत्रूच्या गायींचे मांस खाण्यास नाकारून हिंदी शिपाअी अुपाशी मरत, पण ते गोमांस खाअीनात. कारण गोमांस हे धर्मतः निषिद्ध ही त्यांची भावना केली गेली होती. पण जर केवळ गाय ही अुपयुक्त म्हणूनच रक्षणीय असे स्पष्ट ज्ञान त्यांना दिलेले असते तर ते हिंदु लोक युरोपियनांप्रमाणेच परशत्रूच्या गायी चापून कापून काढून

भाबडेपणाची नाही. मी वैद्यशास्त्राच्या आधारे पंचगव्य पिणे कसे अवश्य ते सिद्ध करून देतो.

आम्ही — वैद्यकीचे आधार थोडे मागाहून बघू. प्रथम आज गोमय-गोमूत्र हें पापक्षालनार्थंच लोक पंचगव्यात घालून, फार काय, गोमूत्र तर नुसतें देखील पितात, त्यात आपण अेखाद्या रोगावरचे हें औषध घेत आहोत, ह्याचे भान देखील त्याना नसते ही गोष्ट खरी की खोटी ? जे हजारो ब्राह्मण श्रावणीच्या दिवशी गोमूत्र-गोमय पितात, त्यातील बहुतेक लोक तो अेक पापक्षालक धर्म्य संस्कार म्हणूनच करतात — हे नाकारणे निव्वळ खोटे बोलणे होअील विटाळलेल्या कपड्या-वर जेव्हा म्हातारी माणसें गोमूत्राचे अुगीच चार शिंतोडे टाकतात, सहभोजनाचे प्रायश्चित्त म्हणून गोमूत्र पळीभर प्या नि मोकळे व्हा, म्हणून जेव्हा भट म्हणतात, महारानी अेखाद्या महाडाच्या तलावात पाणी भरले म्हणून तो 'शुद्ध' करण्यासाठी जेव्हा सारे गाव त्या विहिरीत वा तलावात गायीचे शेणमूत्र ओतून त्यास अधिक घाणेरडे करीत असताना समजतात की, ते पाणी पुन्हा 'शुद्ध' करून घेतले — अशा प्रत्यही हजारो प्रसंगी गोमूत्र जे आम्ही वापरतो, ते गोमय गोमूत्राने 'पाप' जाते, पवित्रता येते, ह्याच भावनेने होय — रोग जावा ह्या भावनेने नव्हे, हे कसे नाकारता येअील ? प्रत्येक प्रायश्चित्तातच पंचगव्य असते, प्रत्येक रसायनात नव्हे, या अेकाच गोष्टीवरून हें सिद्ध होते 'मूत्रे गंगा' असे गोमाहात्म्यात शास्त्रवचन आहे, 'मूत्रे औषधय' असे नाही. फार काय, पंचगव्य पिताना जो श्लोक मंत्र म्हणून आपण म्हणता तोच हे निर्विवाद सिद्ध करतो तो मंत्र हाच ना की 'यत्त्वगस्थिगतं पापं देहे तिष्ठति मामके। प्राशनात् पंचगव्यस्य दहत्यग्निरिवेन्धनम्॥' आता बोला! यात पंचगव्याने हाडीमासी खिळलेले 'पाप' जळले जाते असे सांगितले आहे, रोग बरे होतात असे नव्हे, हा धार्मिक श्लोक आहे का वैद्यशास्त्रीय ?

वैद्यमहाशय — धर्मशास्त्रात जरी हा श्लोक असला तरी वैद्यशास्त्रास अगदी धरून आहे आमच्या धर्मशास्त्रातील प्रत्येक श्लोकात गूढ अर्थ भरलेला असतो.

आम्ही — ती नुसती धमकी नको! कोणता गूढ अर्थ तो ह्या श्लोकापुरता काढून वैद्यशास्त्रीय कसा ते सांगा!

वैद्यमहाशय — ह्या श्लोकात 'पाप' असा जो शब्द आहे त्याचा अर्थ 'रोग' असा घ्यावा म्हणजे 'हाडीमासी खिळलेले रोग बरे होतील' असा अर्थ होअील, हा श्लोक वैद्यशास्त्राच्या कसोटीस अुतरेल

आम्ही — आता गमत पहा अ हा श्लोक धर्मशास्त्रीय होता, तोवर फार तर अुपेक्षणीय ठरता पंचगव्याने पाप जाते ही श्रद्धा होती, श्रद्धेला कशाला तर्काची करवत लावा, असे अेक वेळ म्हणता येते, पण जुन्या भोळ्याभाबड्या श्लोकाना तर्कशुद्ध ठरविण्याच्या हौसेने तुम्ही त्याच्यात नसता गूढ अर्थ दडपून जेव्हा तर्काच्या कसोटीला लावता तेव्हा धावण्याच्या स्पर्धेस हावभरी होअून भाग

पिताच देहाग्नीत राख होऊन जातो तर मग वाग्भट चरकांना वैद्यक ग्रंथाचे पृ अेक पानदेखील लिहिण्याची आवश्यकता नव्हता! सारी औषधे शल्ये, रसायनें मात्रा, डॉक्टर, वैद्य क्षकिरणे, जंतुघ्न टोचणी—निरर्थक ठरता सारी रुग्णालयें बंद करून गोमूत्रालये तवटी अुघडी ठेवली की आरोग्यखात्याचे काम आटोपतें! जिकडे तिकडे पी हळद नि हो गोरी, पी पंचगव्य नि हो बरी!!—हा धडाका सुरु झाला असता! असली मूर्खपणाची अतिशयोक्ति तुम्हास खपत तरी कशी? नि अशा भाबडट मंत्रात तुम्ही वैज्ञानिक अद्ययावत औषधीय पाठ म्हणून आजच्या वैद्यकात लिहू धजणार तरी कोणच्या तोंडाने! जर गोमूत्र अशी सर्वांगी संजीवनी असती तर त्याच्या हौदात शतकाशतक डुबत राहणार आम्ही आज प्लेग—महामारीचे राखीव रान कसे झालो आणि सात पिढ्यांत त्या पशूच्या शेणामुताचा थेंबही तोंडात न घालणारे ते युरोपियन असे लठ्ठबुद, गलेलठ्ठ, निकोप नि निरोगी कसे? अगदी आमच्याच वायुमानात आमच्या शेजारी राहणारे मुसलमान गोमूत्र पीत नाहीत म्हणून पटापट मरत नाहीत ते कसे? गोमूत्राच्या वैद्यकीय अुपयोगाची हा अवांच्य नि भरमसाट स्तुतिच त्याची विटंबना करते—आणि त्यास कारण त्या पदार्थाचे धर्मीकरणच नव्हे काय? पशूचे मूत्र प्याल्याने म्हणे मनुष्य 'पवित्र' होतो! अशा भाकड गोष्टींवर विश्वसणाऱ्या बुद्धिभ्रंशाचा रोगमात्र ह्या पंचगव्याने फैलावला खरा!

वैद्यमहाशय—आपण ह्या भाबड्या धार्मिक अनिष्टप्रथेविरुद्ध हत्यार अुपसलेत हे अगदी ठीक केलेत पण शास्त्रशुद्ध पद्धतीने लिहिलेल्या आपल्या वैद्यक ग्रंथांत अशी अतिशयोक्ति नाही अं! गोमूत्राचे औषध कोणकोणच्या रोगांवर लागू पडते ते जसे त्यात दिले आहे तसेच गोमूत्र कोणच्या प्रकृतिपरत्वे अपायकारक होते तेंही दिले आहे अुदाहरणार्थ गोमूत्र हें पित्तप्रकृतीच्या माणसाने प्याले असता अपाय करते असे स्पष्ट सांगितले आहे पित्तप्रवण साऱ्या रोग्यांना तें वावडे आहे

शकत नाही अुलट सर्वांस सरसहा गोमूत्र – गोमय देणे वैद्यकाच्या दृष्टीने अपाय-कारकच होते तसे म्हटले तर गायीचेच का, गाढविणीचे मूत्रही औषधीयच आहे!

वैद्यमहाशय—होय, आठ प्रकारची मूत्रे औषधीकर्मात सांगितली आहेत शेळीचे, अुंटिणीचे, गाढविणीचे, घोडीचे –'

आम्ही— फार काय 'नास्ति मूलमनौषधम्' ह्या सूत्राप्रमाणे 'नास्ति मूत्र-मनौषधम्' असे म्हटले तरी चालेल! नृमूत्रही औषधीय आहे! पण गोमूत्राचेच अेवढे प्रस्थ का? गाय ही देवता म्हणून! पुन्हा असे पहा वैद्यकात वाटेल त्या गायीचे शेणमूत काही औषधीय मानलेले नाही

वैद्यमहाशय— मुळीच नाही अुलट असे, पक्वाने खाणाऱ्या गायीच्या शेण-मुतास निषिद्ध मानले आहे काल्यड, रानात हिरवेगार गवत खाणारी, अशा गायीचे गोमूत्रच औषधीय

आम्ही—असे नियम आहेत पण तेही अेकरूप नाहीत! आणि व्यवहारात तर त्याचा मागमूसमुद्धा अुरलेला नाही! ठाणवद, जख्खड ओखटवाणीखाऊ, ज्याच्या शेणास दुर्गंध रोगीट, क्षयी, गाय म्हटली की देवता! गोमूत्र म्हटले की गंगाजल! अशा ह्या आंधळ्या रूढीचे समर्थन वैद्यकाच्या आधारे कधीतरी करता येअील का? धर्मीकरणाने आमचे वैद्यकदेखील गोमूत्राच्या प्रकरणी थोडे अधळेच झाले आहे म्हणून त्यात जे रोग गोमूत्राने बरे होतात म्हणून लिहिले आहे त्याची अद्ययावत् चिकित्सा नि रसायन याच्या कसोटीने प्रयोगशाळेत पुन्हा अेकदा परीक्षा व्हावी औषध म्हटले म्हणजे त्याचे पाठप्रमाण—पात्र—परिस्थितिपरत्व नियमबद्ध करून हवे नुसते आपले 'दहत्यग्निरिवेन्धनम्' काय कामाचे! तशा अद्ययावत् प्रयोगशाळेतील वैद्यकीय आणि रासायनिक कसोटीत गोमूत्र—गोमयाचे जे औषधीय किंवा कृषिकर्मीय अुपयोग ठरतील त्या मानाने ते सेव्य समजण्यास मत किंचितही हरकत नाही हा प्रश्न अेक गोमूत्राचा गायीचा वा पंचगव्याचाच नाही प्रत्येक पदार्थ मनुष्याला ज्या प्रमाणात अुपयुक्त त्याच प्रमाणात सेव्य त्याचे धर्मीकरण केले की, तो वस्तुनच देवता होअून पडते आणि ह्या भाबड्या वृत्तीने राष्ट्राची बुद्धिच मारली जाते ह्या भाबड्या प्रवृत्तीस अुच्छेदण्यासाठी गाय वडे तुळस गोमूत्र हा काही अुपलक्षणे म्हणून निवडून त्याच्या चर्चेत अितका वेळ आम्ही दवडलो'

—१९३५

✦ ✦ ✦

## ७. आता मात्र दिवाळीत दुष्काळाची भीतिच नको !

दिवाळीचा सण किती गोड ! किती प्रेमळ ! त्याचा ज्याला त्याला आनंद !

दिवाळी आली रे आली की लहान लेकरांना, मुलांमुलींना, कुमारी-कुमारांना नव्यानव्या छानछान वेषांचीं, जरीच्या टोप्यांची, रेशमी पोलक्यांची, गुलाबी पातळांची, ऐटदार नव्या घाटाच्या कोट—जाकिट—सदऱ्यांची, सुरेख धोतरजोड्यांची आणि फुलबाज्या, हवया, मापतारा, तोटे लवंगी फटाके, अित्यादि नाना प्रकारच्या गमतीदार दारूकामाचीं स्वप्नें पडू लागतात ! वडिलांपाशी 'मला हें हवें अं, तें हवें अं' 'घ्याल न बाबा' असा सादर अर्जाग्रह, आणि तो अमान्य होणार अशी भीति पडली तर आओपाशी 'पेनलंच पाहिजे अं आओ—हवंच तें मला !' असा गोड हट्टाग्रह मुलांमुलींचा घरोघर चालू होतो. अितक्यात नाना मोहक खेळण्यांचें, वेषांचें फटाक्यांचे, अत्तरें, अुदबत्त्या, सुगंधी तेलांचे सामान अेकेक घरात येअू लागतें. आओच्या हातीं त्यानील जे पडेल त्याची 'पाहू ग पाहू ग !' म्हणून मुलांची ओढाताण चालू होते. त्यांत लहान रागती मुलेही हातास येअील तें अुचलू लागतात. त्याना आओ अिकडे आवरते आहे; तिकडे मोठ्या मुलांच्या ओढाताणीत अेखादी सुगंधी तेलाची वा अतराची कुपी खाली पडून फुटल्यामुळे तीं ओशाळी होत आहेत. तोंच तो सुगंध जिकडे तिकडे दरवळून ते वातावरण अितकें आनंदमय होतें की आओला रागावू म्हटलें तरी रागावता येतच नाही ! !

घरोघर झाडमारव, साफसफाअी, रंगरंगोटी चालली आहे. तिकडे बंगल्यांत बैठका, टेबलखुर्च्या, चित्रें, तसविरी, पुष्प-पात्रें याची थाटदार मांडणी होत आहे. अिकडे सैपाकघरात पुऱ्या, करंज्या, कडबोळ्यांचे सगंग तळण सळसळत आहे. मुलें आशाळभूतपणे डोकावून डोकावून पळत आहेत. अेखादा दुसरा अचपळ मुलगा लम्या लागला तर त्यातील काहीतरी पळवून तोंडांत घालून रागावणाऱ्या आओला, आजीला, वहिनीलाच अुलटा हसत आहे !

सासरी—सासरी नववधू आपल्या भावाकडच्या भाअूबिजेसाठी येणाऱ्या आमंत्रणाची सोत्कठ वाट पहात आहेत. माहेरी—माहेरी माअुलीचे डोळे आपल्या, आमंत्रणाप्रमाणे मुलगी दिवाळीला घरी येते की नाही, अशा घुगधुगीनें वाटेकड लागलेले आहेत !

दिवाळीत सारें हिंदु-राष्ट्र आनंदाची लूट करीत असतें ! गृहोगृही मिष्टान्न, नगरोनगरी दीपोत्सव, जिकडे तिकडे लखलखाट, स्वस्थता, संगीत, प्रियजनांच्या भेटी, भावास वहिणी ओवाळीत आहेत, मित्राना मित्र, आप्तांना आप्त प्रीतिभोजनें देत आहेत, प्रेमोपहार वाटीत आहेत, सारी जनता चद्रज्योतींच्या, फटाकेफुलबाजाच्या गमतीत रंगून गेली आहे दिवाळीचा सण हीच अेक आनदाची फुलबाजी आहे ! ! !

राष्ट्रेंची राष्ट्रें जी अेकजीव होअून शतकोशतके नादतात, ती काही त्यांच्या पुस्तकी वा तार्किक व्याख्येने नव्हे ! हिंदु-राष्ट्र हें अेकजीव आहे की नाही ते

हिंदुत्वाची शाब्दिक व्याख्या पाहून कितीसे ध्यानात येणार ? गंगा नदीच्या व्याख्ये-वरून तिची जितकी कल्पना येईल किंवा आलेख्यातील (नकाशातील) तिची केसासारखी आखलेली रेषा पाहून तिच्या प्रवाहाची गंभीरता, शीतलता या गोडी जितकी पटणार, तितकीच राष्ट्राच्या रूक्ष नि शाब्दिक व्याख्येने त्याच्या जिवत-पणाची कल्पना येणार ! गंगा सरासर कशी आहे, ते जसे गंगेला प्रत्यक्ष पाहिल्या-वाचून यथावत् कळत नाही, त्याप्रमाणेच हिंदु राष्ट्राच्या जीवनौघाची, जिवत-पणाची, अेकात्मकतेची खरी खरी कल्पना त्याच्या कोटि कोटि हृदयांना सुखदु खाच्या अेकाच भावनेची अेकच ऊर्मी कशी थरथरून सोडते, तो साराचा सारा प्रचंड राष्ट्रपुरुष, अेका व्यक्तीसारखा, ह्या दसऱ्याला, रंगपंचमीला, दिवाळीला, ह्या रामनवमीला, ह्या कृष्णाष्टमीला, अेकाच भावनेने कसा अुचंबळून जातो, तें प्रत्यक्षपणे पाहिल्यावाचून यथावत्पणे ध्यानी येणार नाही ! पुस्तकी नि तात्त्विक व्याख्याचाही अुपयोग आहेच जसा आलेख्यांतील तिळाअेवढ्या दाखविलेल्या हिमालयाचा ! पण हिमालयाची काहीतरी यथावत कल्पना हवी तर निदान काश्मीर तरी पाहिले पाहिजे ! तसेच या हिंदु-राष्ट्राच्या अखंडित परंपरेची नि सामाजिक अेकात्मकतेची काहीतरी यथावत् कल्पना हवी असेल तर हा दिवाळीचा अेक सण तरी पहा ! दिवाळी हिंदुत्वाची अेक मार्मिक व्याख्याच आहे !

निदान मौर्यकालापासून तरी, म्हणजेच गेली दोन हजार वर्षे, ह्या दिवाळी ह्या आपल्या हिंदुसमाजात प्रतिवर्षी अशीच लखलखाटत आलेली आहे त्याचा त्याचा ऋतु आला की कमलवने जशी आपोआप फुलून अुठतात तसा ता दिवाळीचा दिवस आला की आपोआप हिंदूहिंदूची मुखकमळे आपोआप फुलू लागतात त्याला राष्ट्रसभेचे किंवा हिंदुमहासभेचे ठराव नकोत, प्रचार नको, हिंदूहिंदूच्या स्वनातच ती दिवाळीची जाणीव जागून अुठते, काश्मिरातील अत्युच्च पर्वतश्रेणीवरील अेकटदुकट हिंदु देवालयापासून, नेपाळतराअीतील घनदाट जंगलातील रानटी छपरी-पासून भिल्ल गोंड कोळ्याच्या पर्णकुटचापासून तो मोठमोठ्या राजामहाराजाच्या प्रासादापर्यंत दिवाळीचे दिवे जणू काय आपणच पेटावे तसे लखलखाटू लागतात ! अशी हिंदु झोपडी नाही दूरवरच्या घनदाट रानावनातील निबिड अंधारातील अेकट्या रानटी पहारेकऱ्याचीही झोपडी नाही की जिथे ह्या दिवाळीच्या रात्री दहापाच पणत्या तरी तेवत नाहीत ! हे सामाजिक सणच आमच्या राष्ट्रीय अेकतेच्या नाड्या होत राष्ट्रीय जाणिवेचे हिंदुत्वाच्या ममत्वाचे ज्ञानतंतु होत

त्यातही जे काही थोडे सण आजमुद्धा जातीपातीपंथनिर्विशेषपणे यच्चयावत् हिंदूना अेकाच भावनेने अेकाच संस्काराने अेकजीव करून सोडीत आहेत, त्यातही दिवाळीच प्रमुख आहे आमच्या हिंदुत्वाच्या वैजयंतीतील सारे मणि माणिक, मौक्तिक ह्या दिवाळीच्या सूत्रात आपण होअून ओवले जातात वैदिक हिंदूची कोटि कोटि जनता तर दिवाळीस आपला अेक राष्ट्रीय सण समजतेच समजते.

पण महावीरांची स्वर्गारोहण जयंती म्हणून आमचे जैन हिंदुही हा सण पाळतात. आमचे शीख हिंदुही हा सण पाळतात, लिंगायत हिंदु, आर्यसमाजी हिंदु, ब्राह्म-समाजी हिंदु देवसमाजी हिंदु– हिंदुमात्र तितका हा सण स्वकीय स्फूर्तीनेच पाळीत आहे. काश्मीरते सिंहलपर्यंत ह्याला अपवाद नाही. गेली दोन हजार वर्षें तरी हा सण आपण पाळीत आलो. आजही अखिल हिंदुराष्ट्राचा तो अत्यंत आवडता सण आहे आणि आणखी अेक हजार वर्षें तरी–नव्हे, हिंदुराष्ट्र राष्ट्र म्हणून जगतें आहे तोवर ती दिवाळी, ते फटाके, तें सुंदर आगकाम, ते गळे, तो फुलबाजा, तो दीपदिव्यांचा लखलखाट, तीं मिष्टान्नें त्या भाअूबिजा – तो आनंदाची दिवाळी अशीच चालू राहणार ! – अशा तर्कसंगत विश्वासाने निचा विमा अत्यंत सावध अशी विमामंडळी-देखील काढण्यास सहसा कचरणार नाही !

परंतु केवळ ती अेकदोन हजार वर्षांची परंपरा आहे म्हणूनच काही ह्या सणाला आम्ही चिकटून राहणें योग्य होय असा अर्थ नाही. (राष्ट्रीय जीवनात परंपरेला अेका अंशी महत्त्व असले तरी अुपयुक्ततेला नि स्थलकालविवेकाला त्याहूनही अधिक महत्त्व दिले पाहिजे. प्रस्तुत परिस्थितीत जर अेखादी रूढि हानिकारक ठरत असेल किंवा मानवी ज्ञानाच्या अुज्ज्वलतर प्रकाशात अेखादी समजूत किंवा सिद्धान्त चुकीचा ठरत असेल, तर त्याच्या मागे कितीही लांबलचक परंपरा असली तरी तो त्याज्यच गणला जावा.) पण हा दिवाळीचा आमचा राष्ट्रीय सण स्वतःच अितका गोड, प्रेमळ, सामाजिक संघटनेस सर्वथैव अनुकूल, आजच्या बुद्धिवादाच्या कसोटी-सही अुतरणारा आहे की, त्याची परंपरा खंडिण्याचे काहीही कारण त्यात आढळत नाही; अितकेंच नव्हे तर दिवाळीसारख्या ज्या सणाची परंपरा गौरवास्पद आणि अुज्ज्वल आहे त्यांची सामाजिक अुपयुक्तताही त्या परंपरेनेच अुलट अधिक वाढत असते. नाना प्रकारच्या अैतिहासिक स्मृति आणि आपल्या राष्ट्रीय जीवनाच्या सत्त्वाचा नि सातत्याचा आत्मविश्वास अशा परंपरेनें जागत राहतो. सुदैवाने कोणत्याही धार्मिक भारुडांच्या दलदलीत दिवाळीचा सण रुतलेला नाही भाबड्या नि बुद्धिविहीन लोकभ्रमांची पुटें त्यावर म्हणण्यासारखीं चढलेली नाहीत. नरकचतुर्दशीला पहाटेच स्नान न केले तर अंगावर घाण पडते प्रभृति लोकभ्रम लेकरावाचून कोणी खरे मानीत नाहीत – आणि लेकरांनाही तसल्या अमंगळ थापा ह्यापुढे कोणी देअू नयेत, म्हणजे झाले. दिवाळीच्या सणात मंत्रतंत्र, जादूटोणा, होमहवन, गोमूत्र-गोमय प्रभृति कोणत्याही धार्मिक जंजाळाचे प्रस्थ लवलेश नसतेंच म्हटलें तरी चालेल. दिवाळी अेक निर्मळ सामाजिक सण आहे. आपल्या निवृत्तिप्रधान राष्ट्राचाही तो अेक प्रवृत्तिप्रधान आनंदोत्सव आहे. त्याचे सारे संस्कार प्रेमळ, सभ्य, समाजसंघटक, श्रवण-नयनानंदक, आरोग्यप्रद, आल्हादक आणि सर्वस्वी निर्मळ आहेत. घरेंदारें, गोपुरे, नगरे रंगवून, शृंगारून जिकडे तिकडे आरोग्यप्रद वातावरण निर्मावयाचें, सुगंधी तेल लावून अभ्यंग स्नान करावयाचे, शोभिवंत नवें वस्त्र

त्यावयाचे, स्निग्धरुचिर, मिष्टान्ने खावयाची, स्नेहीमंडळ पाचारायचे, प्रेमोपहार परस्परांना द्यायचे–घ्यायचे, दीपोत्सव करावयाचे, साऱ्या जनतेने दारूकामाच्या, सोंगट्यांच्या संगतीच्या सम्य होईत निमग्नावयाचे, शब्दस्वरूप गंधस्पर्शांचा आनंदीआनंद लुटावयाचा, असा हा सण ! त्याची देवताच मुळी लक्ष्मी आणि सत्कार आनंद ! ! —आणि परंपरा श्रीकृष्णमहावीरादि अनेक राष्ट्रपुरुषांच्या ऐतिहासिक विजयोत्साहांनी गजबजलेली ! ! !

असे राष्ट्रीय सण राष्ट्रास अेकजीव नि अेकरूप करण्यास फार अुपयोगी असतात म्हणूनच आसेतुहिमाचल हिंदुमात्र ितका गेली दोन हजार वर्षे ज्या ह्या सणात रंगत आला आहे त्या ह्या दिवाळीच्या सामाजिक सणास आपण सर्व हिंदूंनी आपलं अेक राष्ट्रीय कर्तव्य म्हणून अत्यंत अुत्साहाने साजरे करीत राहावे. आपल्या पूर्वपरंपरेत आपल्या हिंदु राष्ट्राच्या अभ्युदयास आजही जे काही अुपयुक्त, बलप्रद नि संघटक सण वार आहेत आणि जे समाजमानसाच्या (सोशल सायकॉलॉजी) बुद्धियुक्त कसोटीसही अुतरतात, त्यातच हा दिवाळीचा राष्ट्रीय सणही गणता येतो दिवाळीतील बहुतेक सत्कार अुपचार हिंदुसंघटनास पोषकच आहेत, प्रत्यक्षनिष्ठ समाजमानसासही धरूनच आहेत

दिवाळीचा सण आम्हास असा अगदी मनापासून आवडत असल्यामुळे आम्ही तो या वर्षीही आनंदाने पाळणार होतो पण दुष्काळ पडल्याच्या वातम्या जशा वरचेवर येअू लागल्या तसतशी आमच्या आनंदावर विरजण पडू लागले अशा अुद्विग्न मनःस्थितीत आम्ही होतो, तोच आमच्या ओळखीचे अेक भाटिया गृहस्थ–मुंबअीकडे धर्मप्रचारक म्हणून कार्य करीत असतात ते आमच्या खोलीत आले येताच त्यांच्या गळ्यातील धर्मार्थ दानाची अेक पेटी होती ती आणि हातातील पत्रकांचा अेक गठ्ठा बैठकीवर ठेवून नि, लोडाशी टेकून ते विचारत झाले, 'काय वाचता आहात? काय बातमी आहे त्यात अेवढी ? '

'वऱ्हाडात दुष्काळाचं ठाण बसले आहे ! काही बापडे लोक तर आताच अितक्या अन्नानदशेस पोचले आहेत की, झाडाचा पाला ओरबडून खात आहेत ! या बिचाऱ्यांना कसली दिवाळी ! या वर्षाची दिवाळी म्हणजेच बोलून चालून दुष्काळातील दिवाळी तुम्ही आम्ही साजरी केली तरी अेक रूक्ष कर्तव्य म्हणून !

साठीच दुष्काळाचे सवट येतें न येतें तोच आम्ही त्यावर तोडगा करण्याचा निश्चय केला आहे. आता या दिवाळीत दुष्काळाच्या भयाचं नाव कशाला घेता! अवढा रामबाण अुपाय मात्र वेळीच योजला गेला पाहिजे. त्या कार्याला साहाय्य योजण्या-साठीच मी आपल्याकडे आलो आहे!'

'कोणचा बुवा तो अुपाय! अेवढा अमोघ, दुष्काळास दिवाळीच्या आत पिटून घालविणारा-पर्जन्याचा शिळधार भूमीवर कोसळविणारा?' आम्ही अश्रद्धपणे हसलो.

'अहो, कोणचा म्हणजे काय विचारता? पर्जन्यसूक्ताचा जप!! आणि लोकांनी हवे तितके द्रव्यसाहाय्य दिलेच तर पर्जन्यसूक्तात्मक अेक महायज्ञ!!' अितके बोलता बोलताच त्यांनी अत्युत्साहाने झटपट त्या पत्रकाच्या पुडक्यातील दोनचार पत्रकें ओरबाडून आमच्या हाती दिलीही! त्यातील अेकांत बातमी होती ती अशी की—

'मुंबअी ऋषिकुल आश्रम दहिसर या संस्थेचे संचालक विद्यार्थि-गणासह मुंबअी, आंग्रेवाडा, काळबादेवी रोड येथे पुरुषोत्तम मासानिमित्त आले असून सर्वत्र पर्जन्याच्या अभावामुळे दुष्काळाची चिन्हें जीं भासत आहेत त्यांच्या निवारणार्थ त्यांनी पर्जन्यसूक्ताचे जपानुष्ठान चालू केले आहे! सनातनी धर्माभिमानी सद्‌गृहस्थांचे साहाय्य मिळाल्यास पर्जन्यसूक्ताचाच यज्ञ करण्याचाही त्यांचा विचार आहे!'

हें पत्रक आम्ही वाचतो आहो न वाचतो आहो तोच भाटिया मित्र म्हणाले, "ही बातमी केसरीतही प्रसिद्ध झाली आहे. आमची वरील ऋषिकुल-संचालकांशी काही ओळख नाही तरी आम्ही स्वयंस्फूर्तीनेच त्यास वरील यज्ञाच्या कार्यार्थ काही द्रव्य मिळवून धाडण्याचे मनात आणले. नि ही दान-पेटी गळ्यात बांधून आज बाहेर पडलो. प्रथम आपला विचार घ्यावा म्हणून अिकडे आलो आहोत.'

आपण होऊन त्या पचपात्रीत न साडेल यितके काठोकाठ भर! मग हे पचपात्री तू येऊन अल्गत माझ्या तोंडास लाव! मला भयंकर तहान लागली आहे! जलदेवतानो, प्रसन्न व्हा, नि ताब्यातले जल कधीही आटू देऊ नका !' तर हा निर्जीव ताब्या नि ही पचपात्री आपण होऊन मला तहान लागताच लगबग उठून मला पाणी पाजतील का? तुम्हाला हे पहा ह्या कल्पनेच हसू आले, पण पर्जन्यसूक्ताचा मुखशीस नुसता जप केल्याने वा यज्ञ केल्याने आकाशातील असले-नसलेले मेघ सारे अेकत्र होऊन, जे ह्या ताब्यासारखेच निर्जीव ते, जिवंत माणसाप्रमाणे जप अैकून संतोषून, आपल्या ह्या सार्‍या अफाट राष्ट्रातील हजारो योजन शेतीवर धो धो वर्षाव करतील अशा कल्पनेचे मात्र तुम्हाला हसू येत नाही! नुसत्या प्रार्थनेने अेक पचपात्रीभर पाणीदेखील जर माझ्या तोंडात आपण होऊन जल्देवता पाडीत नाहीत तर त्या तशाच नुसत्या प्रार्थनेसरशी धो धो पाऊस हजारो कोसाच्या शेतीवर पाडतील हे संभवते का तरी ?'

'पण पर्जन्यसूक्त ही तुम्ही ताब्यापचपात्रीच्या केलेल्या ह्या टवाळखोर प्रार्थनेसारखी नुसती प्रार्थना नाही! परमपूज्य वेदातील तो मंत्र आहे! त्यात कोण गंभीर नि दिव्य अर्थ भरलेला आहे!'

'असेच काहीतरी गूढ नि भ्रामक समजूत ह्या वेदातील मंत्रासंबंधी लोकाची झालेली असते, म्हणूनच त्याना त्या मंत्रातूनच काहीच्या काहीच अशी रहस्यमय शक्ति भरलेली आहे असे वाटते! पण मी सांगतो की, त्या पर्जन्यसूक्तातून, मी आता टाकसूक्त वा शाओसूक्तात जी प्रार्थना केली ती अगदी तशी अेक प्रार्थना साधी काय ती केलेली आहे! तुम्ही ती पर्जन्यसूक्ते सार्थ वाचली आहेत का? ऋग्वेदातील मूळ सूक्ते पाहिली वा अैकिली तरी आहेत?'

'नाही ऋग्वेद समजण्याअितके संस्कृत येत आहे कोणास! ऋग्वेदाचा अर्थ कोणी सांगितला आहे का कधी?'

'हो, आहे आम्ही कोणी सांगितला तर तो चुकला म्हणून म्हणता येअील, पण अगदी वैदिक वर्गानेच अत्यंत अधिकृत म्हणून मानलेल्या आणि ज्याच्या आधारानेच आजवर परंपराभिमानी विद्वान् वेदशास्त्रसंपन्न गुरुजी शतावधि वेदशाळांतून तो शिकवीत आले आहेत त्या सायनाचार्यांच्या भाष्यातच जो ऋग्वेदाचा अर्थ सांगितला आहे, तो तरी अमान्य करता येणार नाही वेद अर्थशून्य आहेत असे जर म्हणावयाचे नसेल तर सायनभाष्यातील अर्थ जो परम भाविक ब्राह्मण वैदिकही मानतात तो तरी मानला पाहिजे तुम्हास संस्कृत येत नसले तरी मराठी चांगले येते सायनभाष्याच्याच मुख्याधारे चित्रावशास्त्र्यांसारख्या विद्यानिधि ब्राह्मणाने केलेल्या त्या पर्जन्यविषयक सूक्तांपैकी अेकदोन प्रमुख सूक्तांचा अर्थ मी तुम्हास वाचून दाखवितो म्हणजे तुम्हास माझ्या शाओसूक्ताहून त्यातील प्रार्थना फारशा निराळ्या वाटणार नाहीत मंडूकसूक्ताचे तर हसूच कोसळेल! अशा

प्रार्थनांनी खरोखरच देवदेवता संतोषतात अशी भावना ज्या काळी प्रामाणिकपणे साऱ्या मनुष्यजातीस वाटे, तेव्हाच्या मानवी मनाच्या प्राथमिक अवस्थेत आणि मानवी जीवनाच्या प्राथमिक अनुभवात त्या प्रार्थना अगदी साहजिक नि सन्मानार्ह होत्या. दोष त्या कालांच्या त्या ऋषींचा नाही. पण आता युगोयुगींच्या अनुभवाने त्या प्रार्थना फोल ठरतात, हें प्रत्ययास आल्यानंतरही आणि ग्रहणें, पाऊस, ऋतु कसे नि कां घडतात याचे निसर्गनियम कळून चुकल्यावरही, ह्या वैज्ञानिकज्ञानाच्या पू[illegible]

ट्रा[illegible]

भावडपण होय! हें अेका त्या अेका प्रमुख पर्जन्यसूक्ताच थोडेसें भाषांतर—

देवापि ऋष्टिषेण पुत्र म्हणतो—'हे बृहस्पते, माझ्याकडे पाऊस पाडणाऱ्या देवतेला पाठीव...तू शंतनूकरिता पाऊस पाड! हे बृहस्पते, तू आमच्या स्तोत्रात निर्दोष आवाज, सारखा प्रवाह नि ओज अुत्पन्न कर. ज्या स्तोत्राने आम्ही शंतनूकरिता पाऊस पाडण्याची मागणी करीत आहोत, त्या स्तोत्रात स्वर्गातून मधुर पाझर अविष्टोत! देवांची स्तुति जाणणारा आर्ष्टिषेण ऋषि यमला आहे तो वरच्या अंतरिक्षाखालील जलमय भागातून अुत्कृष्ट पावसाचें पाणी अुत्पन्न करो. ह्या जलमय भागावर वरचा जलमय भाग देवांनी अडवून ठेवला आहे तें अुदक त्यांच्या अिच्छेनुसार योग्य भूमीवर पावसाच्या रूपाने पडेल! हे अग्ने, तू पाऊस पाडणाऱ्या मेघांना प्रेरणा कर. हे अग्ने, ह्या नव्याण्णव गाअी तुला समर्पितो. द्युलोकांतून आमच्या अिच्छेनुसार पाऊस पडू दे. हे अग्ने, नव्याण्णव सहस्र गाअी पाऊस पाडणाऱ्या अिंद्राला त्याचा भाग म्हणून दे. हे अग्ने, शत्रूचें किल्ले फोड. रोग दूर कर.

मुसलमान राजा होता त्याने यज्ञ करविलाच नाही—ध्वंसिला मात्र !—पण तरीही पाऊस पूर्ववत् चालू झालाच की नाही ? बारा वर्षांच्या दुष्काळानंतर पाऊस सृष्टि-क्रमाने केव्हातरी पडणारच; तसा पडताच ते त्या काळच्या धर्मभोळ्या लोकांना राजाच्या यज्ञाचें वा ह्या सूक्ताचें फळ वाटणें कितीही साहजिक असलें, तरी हे यज्ञ राजाने न करताही दुर्गादेवीसारख्या प्रदीर्घ दुष्काळानंतर निसर्गाची प्रतिक्रिया होऊन पाऊस पर्जन्यसूक्तावाचूनही पडतातच, असा अनुभवच शंभरदा येऊन गेल्या-नंतरही आम्ही अशा प्रार्थनांना दुष्काळावरील रामबाण उपाय मानावा हे साह-जिकही म्हणता येत नाही, शहाणपणाचें तर नाहीच नाही. हा निव्वळ खुळचटपणा आहे !'

'पर्जन्याच्या प्रार्थनेविषयीची आणखी अेक वैदिक सूक्ताची गोष्ट अैका. मं.७ सू. १०१ हें सूक्तही पाऊस पाडण्यासाठी म्हटलें जातें. 'जो औषधींना वाढवितो आणि जो पाण्याची लयलूट करतो, तो पर्जन्य आम्हांस सुख देवो ! ह्या पर्जन्याचें अेक रूप वांझ गाअीसारखें आहे नि दुसरें अुत्पादक. हें स्तोत्र तो स्वयंसिद्ध पर्जन्य अैको, तो संतोषो, आम्हास पावसाचा लाभ होवो ! तो पर्जन्य बैलाप्रमाणे अनेक औषधींना अुत्पन्न करणारा, तोच स्थावर जंगमांचा मूलाधार, तें अुदक मला लाभो. देवांनो, माझें कल्याण करा !' असें वशिष्टाचें 'पाऊसदेवते'चें सूक्त आहे. त्याच्याच पुढचें १०३ वें सूक्त हे 'बेडुक-देवते' च्या प्रार्थनेचें आहे !

'पर्जन्यसूक्त ऋषींनी म्हटलें तेव्हा त्याला बेडकांनी अनुमोदिलें. यास्तव वशिष्ठाने मंडूकसूक्त गायिलें अशी याची पीठिका दिली आहे तें सूक्त असें —

व्रताचरणी ब्राह्मणाप्रमाणे वर्षभर पडून राहिलेले बेडूक पर्जन्याला प्रिय असणारे शब्द बोलू लागले ! सुकलेल्या पखालीप्रमाणे पडून राहिलेल्या ह्या बेडकां-कडे जेव्हा स्वर्गीय अुदक आलें, तेव्हा वासरासाठी हंबरणाऱ्या गाअीप्रमाणे ह्या मंडूकाचे शब्द कोलाहलू लागतात. वर्षाकाळ आल्यावर तृषार्त बेडकांवर जेव्हा वृष्टि होते तेव्हा मूल बापाकडे बोबडे बोल बोलत जातें, तसें अेक मंडूक दुसऱ्या मंडूकाकडे शब्द करीत जातो. पाऊस पडल्यामुळे आनंदलेला चित्रविचित्र अेक बेडूक दुसऱ्या हरितवर्ण बेडकाशी आपला आवाज मिसळतो; अेक जाअून दुसऱ्याला धरतो शिक्षकाचा शिष्य अनुवाद करतो तसा अेक बेडूक दुसऱ्याचा अनुवाद करतो. अुन्हा-ळ्यात मातीला मिळून गेलेले बेडूक पाऊस पडताच पुन्हा जिवंत होअून शब्द करीत फुगून जातात. अेक बेडूक गाअीसारखा ओरडतो तर अेक शेळीसारखा. अनेक रंगाचे पण अेकच 'मंडूक' नावाचे हे बेडूक शब्द करीत आहेत ! अतिरात्र नांवाच्या सोमयागात ब्राह्मण ज्याप्रमाणे मंत्र म्हणतात त्याप्रमाणे भरलेल्या सरोवराभोवती मंडूक शब्द करीत आहेत ! सोम पिअून वार्षिक स्तोत्र म्हणणाऱ्या ब्राह्मणांप्रमाणे शब्द करणारे, प्रवर्ग्य ऋत्विजाप्रमाणे घामाने डवडवलेले काही बेडूक पाऊस पड-ताच बाहेर प्रकटतात ! हे सर्वश्रेष्ठ मंडूक देवांची आज्ञा पाळतात ! ह्या बेडकांनी

आम्हास संपत्ति दिली वर्षाऋतूनंतर मंडूकांनी शेकडो गाई आणि दीर्घायुष्य आम्हास दिले ! ! (ऋग्वेद, मं ७ सू १०३)

'अैकलेत ना ? वास्तविक हे सूक्त छान आहे त्यातील विनोद गोड, स्वभावोक्ति चटकदार ! पण असा सूक्तांना ओश्वरोक्त समजणे किंवा त्याचा जप केल्याने पाअूस पडतो असे मानणे म्हणजे निव्वळ भावडेपणा नाही का ? आम्हास तर असे वाटते की, पर्जन्यसूक्ते म्हटल्याने पाअूस पडतो या भावडेपणाची चेष्टा करण्यासाठीच वसिष्ठाने 'बेडूक देवतक' हे सूक्त रचलेले असावे ! कारण पर्जन्य-सूक्ताचे मंत्र म्हटल्याने पाअूस पडतो ही धर्मभोळी समजूत बेडके ओरडतात म्हणून पाअूस पडतो अशा स्तुतीअितकीच खुळचट आहे असे त्यात मोठ्या गमतीने सुचविलेले दिसते ! निदान नकळत तरी त्यात तसा ध्वनि अुमटला गेला खरा !'

'बरें, वैदिक प्रार्थना नि सूक्ते युगोयुगे म्हणत असता आपल्या अिकडे युगोयुगे दुष्काळ नि अवर्षण पडतच आली आहेत हें खोटे आहे काय ? अुष्टपक्षी पर्जन्य-सूक्तें कशाशी खातात हेंही माहीत नसलेल्या नि वेदनिंदक अशा अनेक म्लेच्छ देशांतून दुष्काळाची आवृत्ति आपल्या अिकडच्यासारखी प्रतिवर्षी न निघता ते धन-धान्याही आपणाहून अधिक समृद्ध आहेत हेंही खरे नाही काय ? अेखादे वेळी पर्जन्य सूक्त म्हणावयास नि पाअूस पडण्यास बोराफुलाची गाठ शंभर वर्षांत अेकदा पडली असेल, कावळा बसायला नि फांदी मोडायला जशी पडते तशी ! पण म्हणून फांद्या मोडायच्या की त्यावर अेक कावळा बसवावा असा नियम का त्यायोगे बांधता येतो ? कुऱ्हाडीने हटकून फांदी तुटते तशी कावळा बसल्याने जोवर बहुतेक प्रसंगी तुटत नाही तोवर तसा नियम बांधणे मूर्खपणाचे होय, नव्हे काय ? आमच्या स्वतःच्या आठवणीत पंचवीसदा ल्हानमोठे दुष्काळ आले, पंचवीसदा पर्जन्यसूक्ताचे ल्हानमोठे यज्ञ झाले, पण अेकदाही दुष्काळ हटल्याचे किंवा तत्काळ भरपूर पाअूस पडल्याचे आठवत नाही ! तुम्हासही असाच आठवण नाही काय ? अितिहासातही हेच आढळते, नव्हे काय ?'

'खरे सांगायचे तर माझाही अनुभव हाच अितिहासाविषयी म्हणणे मला पटते आजकाल ह्या कलियुगात मंत्राचेही सामर्थ्य लोपलें खरेच, पण वैदिक काळी ते मंत्र —'

'मी मघाच तुम्हास दाखवून दिले की, आजकालच नव्हे तर मंत्र जिवंत होते असे तुम्ही ज्या युगी समजता, त्या वैदिक युगात अशा प्रार्थनांनी पाअूस पडत होताच होता ही गोष्ट मुळातच सवस्वी असंभवनीय होय आणि बंदात पुरावा तसाच सापडतो ह्या वरील सूक्ताच्या पूर्वपीठिकेतच बारा वर्षांच्या दुष्काळाचा अुल्लेख आहे अहो, अितर जनांना सोडाच पण प्रत्यक्ष मंत्रद्रष्ट्या ऋषींनाही पर्जन्यसूक्ताच्या घोकण्याने असाच चीत मिळाले नाही, दुष्काळाने फटफजिती केली ! तो तपोभास्कर विश्वामित्र पहा ! पदपाठक चतुर्वेदीच नव्हे तर वेदमंत्रद्रष्टा !

पण त्याच्याही काळात असाच अेक भयंकर दुष्काळ पडला. पर्जन्यसूक्त काय विश्वामित्राला किंवा त्या भरवैदिक काळातील मंत्रद्रष्टयांच्या पिढीत कोणालाही येत नव्हतें ? पण त्याचा काही अुपयोग झाला नाही. प्रत्यक्ष विश्वामित्रऋषि अन्न अन्न करीत श्वपचाच्यासुद्धा घरी भीक मागत फिरले. तेथेही काहीच खावयास मिळेना, तेव्हा कुत्र्याच्या मढ्याची तंगडी त्यानी तिथून चोरून पळविली आणि भुकेने कासावीस झाल्यामुळे मिटक्या मारीत चघळली ! तेव्हा हीं पर्जन्यसूक्तें वा प्रार्थना वैदिक काळीसुद्धा 'पड पावसा' म्हणताच पाअूस पाडीत ही समजूत अगदी निर्मूल आहे !'

'पण ही असमर्थता काही वेदपुराण यांतील प्रार्थनांची किंवा सूक्तांचीच आहे असे नव्हे, तर कुराणातील आयतात वा प्रार्थनातही पाअूस पाडण्याचें सामर्थ्य नाही, न बायबलातील, न अवेस्तातील. दुर्गादेवीचाच बारा वर्षांचा दुष्काळ घ्या. त्यात हजारो हिंदूंच्या देवाच्या नावानी केलेल्या पर्जन्यसूक्तादी प्रार्थना जशा फोल ठरल्या, तशाच त्या काळीं मशिदीमशिदीतून अल्लाच्या नावाने केलेल्या शेकडो प्रार्थनाही फोल ठरल्या; आणि मुसल्मानी राज्यातच लाखो मुसलमान अन्न अन्न करीत तडफडून मेले ! आजही प्रत्येक दुष्काळात जसे पुराणाचे अनुयायी हिंदु तसेच कुराणाचे अनुयायी मुसल्मान दोघेही दुष्काळाच्या जबड्यात चिरडून जात आहेत. बायबलच्या जुन्या करारात तर, ज्यांना देव जाता येता भेटे अशा पैगंबरादिकाना सहकुटुंब दुष्काळात अुपासमारीने छळल्याना आणि जेहाव्हाचे भक्त असणारे तें राष्ट्रचे राष्ट्र अन्नावारी अिजिप्तच्या फरोहाचें दासानुदास झाल्याच्या कथा आहेत! तेव्हा वैदिक वा पौराणिक, कुराणीय वा बायबलीय प्रार्थनाही वा मंत्रजपाही पाअूस पडतो, वा दुष्काळ हटतो ही निव्वळ भाबडेपणाची समजूत, अनुमानधपक्याचा बाजार ! पाअूस पाडण्याचें किंवा दुष्काळाना नामशेष करण्याचें जें काही सामर्थ्य मनुष्याच्या अंगी येणें शक्य आहे तें ह्या दैविक अज्ञानाच्या मागे लागून नव्हे, तर प्रात्यक्षिक विज्ञानाच्या ! अबाधित सृष्टिनियमाच्या ज्ञानाने आजही आपल्या अिच्छेप्रमाणे पाअूस पाडण्याचे काही प्रयोग रशियाकडे सफळत आले आहेत. आणि ते पूर्णपणे सफळ होअीतोपर्यंत ही दुष्काळाची नागी ठेचणे अितर मानवी मार्गांनीही शक्य आहे. हे पहा, जर का राष्ट्रसत्ता प्रबळ, प्रयत्नशील, नि प्रज्ञ असेल तर ज्या हिंदुस्थानात दुष्काळाच्या वर्षीतही ठिकठिकाणी यथेच्छ पर्जन्य पडतो नि अफाट पाणी वाया जातें त्याचा योग्य अुपयोग करून, शेतीसुधार कार्यवाहीत आणून नि जेथे धान्याची मागणी तेथे झटपट धान्याची वाहतूक करून दुष्काळाची नागी ठेचली जाअू शकेल ! पण आपला अिथे तो विषय नाही.

'आपलें म्हणणें सर्वस्वी खरें आहे. पण आता आजच्या, आज मी माझ्या व्यक्तीपुरतें ह्या प्रकरणी काय करू तेवढें सांगावें.'

'प्रार्थना — पर्जन्यसूक्ताच्या गुळाचाची भर दुष्काळातही आहे तें सूप नि धान्यसुद्धा अग्नये स्वाहा करण्याचा हा एकच उपाय त्यागून या दिवाळीत हेंच पेटी गळ्यात बांधून अितर प्रचारकासह घरोघर हिंडावे. दिवाळी साजरी करणारे होणारच. पण अुदाहरणार्थ, फटाक्यांच्या दारूकामापायी जे हजारो रुपये अगदी थेट परदेशी जातात तेवढे तरी वाचवून प्रत्येक कुटुंबाने ती रक्कम दुष्काळग्रस्त बंधूसाठी दान द्यावी अशी भीक मागावी आणि जें जमेल त्या द्रव्याचें धान्य घेऊन स्वहस्तें प्रत्यक्ष दुष्काळात जे भुकेने व्याकूळ, त्यांच्या तोंडी दोन घास घालावे. ठीक ना? चला तर लागा कामाला. अकरणान्मन्दकरणं श्रेयः! ही माझी वर्गणी पहिल्याने घ्या!!

— १९२६

\+ + +

'मी धरून का ठेवले आहे तुम्हाला ' जास्त पैसा देईल तिकडे जा! अडीच आणे मोळी मिळाली तरच मला हवी माझ्यावर तरी तुझ बळ का ?'

सौद्याच्या दृष्टीनं शेटाणीचे हे बोलणं सरळच होतं तिनाही तिचा रामार होताच!

शेवटी आवट ताड करून जळफळून बडबडत त्या भारेवाल्या बायानी अडीच आणे मोळीप्रमाणे भाऱ्या टाकण्याचे मान्य केलं त्या बायाच्या कटीना अनेक लहानस लुगडं त्यातल्या त्यात काच्या मारून गुंडाळलेले, कटीखाली मांड्याची पोतदेखील पुरती न झाकणार! वर अेक फाटकीतुटकी चोळी, अंग घामात डब-डबलेल, हातात पितळी कथलो नि काचेच्या रावट बांगड्या तेवढ्या भरपूर! अशा त्या चार पाच मोळीवाल्या बाया शेटाणीने दाखविलेल्या बोळात वळून त्या घराच्या मागच्या दाराकडे त्या मोळ्या टाकण्यास गेल्या धडाधड अेकावर अेक मोळ्या पडल्या शेटाणीने गणन करून पैसे त्याच्या हाती टाकले तोच त्या भारेवाल्या बायानी ठरावि़क भांडण काढले आणि जिने अडीच आणे मोळीला 'हो 'म्हटले होत, ती सोडून बाकीच्यानी मोठा गलका केला

'नाय! नाय! आम्ही नाय म्हटल अडीच आणं! तीन तीन आण म्हणालीस बाओी तू, म्हणून आम्ही आमच्या मोळ्या टाकल्या तिची अडीच आण्याची असेल, नाय नाय नाय! नगत आम्हाला तुझ पैस! मोळ्या दे परत आमच्या!' असा कालाहल करीत दोघीतिघीनी आपले पैसे फेकले नि भाऱ्या अुचलू लागल्या? अर्थातच शेटाणी संतापली तिचा वडील मुलगा दारातच होता त्याला ओरडून म्हणाली, गप्या! अुचल त पैसे नि हात लावू देअू नको या लुच्च्या बायाना त्या मोळ्याना!'

गप्या हा हायस्कुलात शिकणारा अुंच नि दडमपाऱ्या होता तो लगेच धावला

पैसे अुचलीत गप्याने दटावले 'हट दूर! हात लावशील मोळीला तर ध्यानात धर! हो हो! देत नाही जा! पैसे नाहीत नि मोळ्या पण देत नाही जा! ल्याडी करता काय?'

शेवटची युक्ति पण फसली! बुडव बाओी आम्हा बापड्याना 'लूट केलीस वया आमच्या मोळ्याची' असे शाप तोंडाने देत त्या भारेवाल्या बायानी शेवटी फेकलेले पैसे अडीच आण्याच्या भावानेच परत घेतले ते वाटून घेण्याच्या अवधीत मागचा सगळा रागलोभ त्या विसरल्या आणि नहमीच्या प्रघाताप्रमाणे मोळ्याच्या सौद्यात भांडणापायी अुगावलेले अुत्पन्न गोंजागुंजावान भरून काढण्याचा ठराविक असा दुसरा अंक चालू झाला

'पाणी तरी दे बया थोडं! लोणच दे ग ताओी लेकराला अेक फाड'

'शिळा घास हाय का अेखादा? थोडा भात भाकर तरी अिवलीशी दे ग मावली' असे गयावया करू लागल्या 'जात कोण' ते आधी विचारून शेटाणीने

जातींच्या योग्यतानुरूप कोणाला ओंजळीने, कोणाला तपेली देऊन पण सर्वेच्च पाणी पाजले, थोडी शिळी ताजी भातभाजी हातावर टाकली त्या भारेवाल्या बायांनी सौद्यात लबाडी केल्याचा शेठाणीसही राग उरला नाही – मोळ्या फार स्वस्तात गेल्याचे दुःख भारेवाल्याही विसरल्या दोघानाही त्या ठराविक वाचा-वाची नि हो-नाची सवयच होती – रीतच होती ती – शिष्टाचारच होता तो मोळ्यांच्या व्यवसायामधला !

थोडेसे हुश्श करून त्या बाया तो भातरसुकडा खात नि पाणी पीत बसल्या- झुंजुरक्यापासून जे भारे डोक्यावर वाहत आपल्या खेडेगावाहून त्या नगरानगरातून घरोघर भर दुपारपर्यंत हिंडत हिंडत त्यांची कवरडी बसली होती, नाकी नव आले होते ! आणि शेवटी तो लाकूडफाटा तोडून आणून विकीतो झालेल्या कष्टाची मिळकत झाली अडीच आणे !

त्या शेठजीच्या घरासमोरच आपल्या माडीच्या खिडकीत रामभाऊ उभे होते त्या मोळीवाल्या बापड्या बाया शेठजीच्या पुढच्या दारी मोळ्यांच्या अडीच आणे की तीन आणे दराविषयी घासाघीस करीत असताना ती ते पाहत होते त्या बाया शेठजीच्या मागच्या दारी मोळ्या टाकण्यासाठी वळल्या वळेतो त्यांना दिसल्या नि त्यांच्या कष्टाळूपणाविषयीचे विचार रामभाऊंच्या मनात घोळत होते शेठजींच्या मागल्या दारी शेठाणीची नि त्या बायांची तिकडे गडबड

त्या आरडाओरडीने अेकदाची घरातील दोनचार मंडळी येतातशी पाहून त्याने धर्मोपदेशाचे संगीत छेडले, पण ते देखील कसे ? कोणचाही भिकारी निदान अेखादा अभंग, श्लोक गाणे तरी पाठ करण्याचे श्रम घेतो पण त्या नदीबैलाच्या नि गोमातेच्या भांडवलावर चरितार्थ चालविण्याचे भाग्य पदरी असलेल्या साधुपुरुषास तेवढेदेखील कष्ट करावयाची आवश्यकता नव्हती ! त्याचा धर्मोपदेश, शास्त्रविरळ छंद–मुक्तछंद ! ! तो साधे गद्य जे सुचे तेच अेका कोणच्या तरी सुरात मनात यअील तिथे, मनास यअील तो शब्द ताणीत वा आखडीत बोलणेच गाअू लागला ! त्यातील प्रकार साधारणत असा—

‘ द्या ऽऽ हो बाअी । ह्या गोमा ऽऽ तेला कपडा कू ऽऽ डता द्या । हळदकुंकू गा ऽऽ मा ऽऽ तेला महादेवाचा । चा ऽऽ नदीबै ऽऽ ल देवाचा ऽ। नदीरा ऽऽजा । पैसा ऽ पैसा । गोमाता तेतीस ऽऽ कोटी देवाची । चो ऽऽ पैसा चारा घाला ऽ हो बाअी । ध ऽ र ऽ म करा ऽ बा अी ।। डुम् डुम डुमुक । डुम डुम् डुमुक् । । हो बाअी । नवा माग ऽऽ तो पैसा ऽऽ दानाचा ! महादे ऽऽ वाचा ऽ ।।’

तो गागाट अेकून शेटाणीही पुढल्या दाराशी आली, तिला पाहताच साधुबुवा धर्मोपदेशकाच्या अधिकारी स्वरात म्हणाला,

‘ माअी ! दारी नदीराजा आला, महादेवाला दान दे ! ही आदिदेवी गोमाता कामधेनु दारी आहे तिच्यावर दया कर ! चाऱ्यासाठी धर्म काहीतरी कर ! —काय मागतोस नदीबा ? पाठीवर अेक कपडा ?’ हातातले दावे प्रश्नार्थक-पणे बुवाने खेचताच नदीने मान हालविली ! पोरं हसली शेटाणीही हसल्या नि चार आण्याचा तुकडा त्यांनी गाअीवरून ओवाळून त्याला दिला !

रामभाअूही हसले—पण अुपहासाने ! महादेवाचा जो नंदी, त्याला म्हणे फाटकातुटका कपडा पाठ झाकायला हवा ! त्यासाठी महादेव माणसापाशी दान मागतो ! आणि जिला हा आदिदेवी कामधेनु म्हणतो त्या गाअीला म्हणे चाऱ्यासाठी भीक घाल ! कामधेनु चाऱ्यासाठी दारोदार भटकते ! ! ह्या भिकाऱ्यांना ह्यातील मुसमुसतपणा कसा मानावी ते कळत नाही ! ! भीक मागणारे अेरपट मूर्ख नि भीक घालणारे दसपट मूर्ख ! धार्मिक भावडेपणाने साध्या शब्दाचा अर्थही कळेनासा होतो अितर सर्व व्यवहारात जे डोळस नि चाणाक्ष तेही अंधळे नि मूढ होतात. इथे न फसणारे होणार स्वतः फसवून घेतात ! सदा त्या कष्टाळू मोळीवाल्याशी सुद्धा अडीच की तीन आणे दर, अितकी बारीक घासाघीस ज्या ह्या शेटाणीने केली तिने धर्मदिशी या अेनखात भिकाऱ्याला नदीबैलाची नुसती ओवाळणी म्हणून चार आणे दअून टाकले ! जी कामधेनु ती भीक मागते तरी कशी हा प्रश्नसुद्धा तिच्या मनात आला नाही !

शेटाणीने सुणावल्यावरून तिच्या मुलाने हळदकुंकू आणून त्या गाअीला लावले, नदीलाही लावले नि नमस्कार केला अितके झाले तरी तो गलेलट्ठ साधु

गप्याला त म्हणणे तत्काळ पटल ! तो होकार भरू लागला, 'अगदी खर आहे बर भाऊच म्हणण मी मघाच ताओला म्हणालो की, देऊ नकोस चार आणे टचकन् ह्या अैतखाऊला म्हणून त्या बिचाऱ्या कष्टाळू भग्याच्या डोक्यात दगड घालण्यापेक्षा या आळशी भिकारड्याच्या डोक्यात दगड घालायला हवा वर का ताओ !' शेटाणीला गपूने बजावल !

'दगडच नको काही घालायला ! त्याची खोड मोडायची म्हणजे त्याना कोणी भीक घालू नय म्हणजे चाले ! भीक मिळत आयती म्हणूनच ते भीक मागण्याचाच धदा म्हणतात ! आपण ती भीक अशा नदीबैल घेऊन मिरवत राहणाऱ्याना न घातली की बसताच त्याचा भिकेचा हा धदा !' रामभाऊने शेटाणीकडे पाहिल

शेटाणीताओी आपली बाज सावरू लागल्या, 'अहो भाऊ ! पण त्या नदी-बैलान नि ह्या गामातेन काय केल आहे पाप ? ह्या भिकाऱ्यावर नाही मी दया केली नाही, तर त्या नदीबैलावरून नि गाओीवरून ओवाळून टाकली ती पावली ! त तर देवन आहे ना ?'

'पशूला देवत म्हणणही पापच ! पण जर म्हणायचेच ना, तर ह्या भग्याच्या गाडीचा हा बैलच ह्या नदीबैलापेक्षा अधिक पूज्य, दयाह नि देवलसी म्हटला पाहिजे वर ताओी ह्या भगीबैल पहा वर समाजाचे कावाडकष्ट किती करतो आहे ! ह घाणीचे जिवापाड ओझे सकाळपासून सध्याकाळपर्यंत तो वाहात असता त्याला अेक सोडून चार पढचा चारा घाला त्या चाऱ्यावर समाजाच येवढ हित साधता यओील ! पण ह्या भिकारड्या माधून समाजाच्या कष्टावर स्वत मच अैतखाऊ बनविल नाही तर ह्या त्याच्या बैलालाही नदा' नि गाओीला 'आदिदवी' बनवून अैतखाऊ करून सोडल आहे ! समाजाची शेती गाडीभाड अस काणतही अुपयोगी काम न करणारा हा बैलही ह्या भिकाऱ्यान अैतखाऊ करून सोडला ! हा माणस बैल नि हा ह्याचा नदीबैल ! दोघाच्याही श्रमाना समाज वतरतो ह्या भावडपणापायी ! अेक रिकामटेकडा अैदी मनुष्य नि अक रिकामटेकडा अैदी बैल ! दोघाना समाजाला म्हणजच तुमच्या आमच्या-सारख्याना, व्यथ पोसाव लागत ! त्यापेक्षा ह्या नदीबैलाला जुपावा नागराला नि ह्या माणूसबैलाला धरावा समाजाच्या वठीला हच योग्य नव्ह काय ? तोच

आपले डमरू डुमुक् डुमुक् वाजवीत भिक्षेचा पाल्हाळ करीतच होता 'चारच आणे दिले' ते गोमातेला पुरेसे नाहीत हा नंदी कपडा मागतो, देवाच्या घरी तू देशील त्या दानाच्या शंभरपट तुला परत मिळेल ग मया।' म्हणून मागतच होता, नि डमरू वाजवून नि दाव हिसडून आपल्या मागण्या नि वचन महादेवाच्या नंदी-देवाचीच आहेत, असे प्रमाणपत्र देण्यासाठी त्या नंदीबैलाची मान हालवून त्याचा होकार घेतच होता त्याची कामधेनु ही गाडी सा, त्या कचऱ्याच्या ढिगात तोंड खुपस, अंगणाच्या बाहेर आलेल्या झाडाचा फांदीपाला ओरबाड, अशी मागेपुढे वाट अडवून वावरत होती

अितक्यात त्याच वाटेने नगरसंस्थेची (म्युनिसिपालिटी) मोठी मैलागाडी आली त्या गाडीवर नगराच्या मैल्याने भरलेला गाडीवर आडवा ठेवलेला अेक बंद अवजड बंब होता त्या जड ओझ्याला दिवसभर वाहणारा अेकच बैल जुपलेला होता नि नगरसंस्थेचाच भंगी तिला हाकीत होता, मध्यान्हपर्यंत घामट, ओगळ नि अबाड ओझे अुचलीत, फेकीत, बंबात भरीत, गाड्यावर चढवीत, अुतरीत तो भंगीही त्या बैला-सारखाच मेटाकुटीस आलेला होता निढळाच्या घामाच्या, कावाडकष्टाच्या, रक्ताच्या केलेल्या पाण्याच्या धारा त्या बैलाच्या नि त्या भंग्याच्या डोक्यावर नि तोंडावर निथळत होत्या बारा वाजण्याच्या आत ती मैलागाडी वर्दीवरची ठिका-णावर पोचवून भाकरीच्या मधल्या सुटीत घरी जातो कधी, नि थोडा मोकळा होतो कधी, असे त्या भंग्याला होअून गेले होते आपली गाडी त्या मार्गातून शक्य तितक्या सावध वेगाने जरी हाकीत होता, बिचारा बैल हूं का चूं न करता जरी ती ओढीत होता, तरी त्या भंग्याच्या मैलागाडीच्या घाणीने आलेल्या शिसारीचा

फिडीस हुते–'घाणीने जीव नकोसा करतो हा गाढव, भर वाटेन मैलागाडी नेऊन !' तेव्हा आपण ध्यानात धरावे की, कोणत्यातरी वाटेने ते घरोघरच्या मैल्याचे डबे नि शेवटी गाडी नेण्याची त्या भग्याला काही हौस नसते ! तुम्ही विमानातून घरचेवर अलगत ती मैलागाडी नेवविली वा खालून पाताळातून, तर तो ती तशी नेईल, आणि विशेष हे की, तो गाढव तस अत्यंत घाणेरडे काम करून ती मैलागाडी दाखविलेल्या वाटेने तशी हाकीत असता तुम्हाला क्षणभर तुमचा जीव नकोसा करतो—म्हणूनच तुम्ही दीडशहाणे, सभ्यजन तुम्हाला हवा ता जीव जन्मभर सुखरूपपणे अुपभोगू शकता, नगराचे स्वास्थ्य नि आरोग्य निर्वेध राहू शकत !

ती भग्याची गाडी तिकडून जो येते, तो ह्या भीकमाग्या साधूचे त लट्ठाबर ता वाट अडवून अुभ होते भग्याने दानदातीनदा आरडून सांगितले की, 'ते गाय-बैल बाजूला घ्या ! अे बुवाजी !' पण भीक मागण्याच्या त्या त्याच्या रडगाण्यात तोबोवा मग्न होता, त्याच्या त्या गायबैलालाही त्या भग्याने हट हॅट करून पाहिले, पण त्या पशूला नंदीबैल नि कामधेनूपणाचें भीकमार्गे पावित्र्य आल्यापासून त्याना सहसा कोणाही वाटत हिडिसफिडीस करीत हुसकील वा चपराकीत नसल्यामुळे आपण अेक अवध्यच नव्हे, तर अताडच दैवी जाव आहोत, अशील जणू काय जाणाव असलेली दिसली मारील तर हा आपला साधु धनीच आपणास मारील—बाकीचे लान पूजाच करणारे—त्याच काय अेकायचे अशी सवयीन जणू त्याना निश्चिंति पटलेली असल्यामुळ त्या भग्याच्या हुम्हट्या न जुमानता ती गाय नि नंदीबैल पाटून दूर म्हणून होअीनात ता साधुही अैकेना हा घोळ पडला आहे तोच त्या भुकेल्या गाअीला तो मलाचा वास येअून ती थवाच्या पुढच्या टोकाला सेन्न जिभेने चाटू लागली तिला जरी म्हटली आदिदेवी जगज्जननी गोमाता—तरा होता तो अेक पशुच !

निरुपायाने तो गाडी थोपवन तो भंगी थोडा थांबतो तोच आजूबाजूच्या घरातून दाटमरातून नि प्रत्यक्ष शटाणीच्या तोंडातून अेकच धिक्कार अुठला ! 'अे भंगड्या, हाक ती गाडी ! घाणीने जाव नकोसा केला या गाढवान !– अरे, हाक ! ने ती ब्याद अेकदाची येथून !

भंगी ओशाळला जसा काही ता कोणी चोर चोरी करताना धरला जातो, आहे असा घाबरला ! त्याने गाडीच्या बैलाला अक चाबूक हासडून गाडी पुढे घातला मैलाववाचे पुढील टोक चाटणारी गाय मध्ये लुडबुडू लागली, म्हणून तिला त्यान चाबकाच्या काठीने मागे ढोसली

हे पाहताच तो गलेलठ्ठ भीकमाग्या 'साधू' अेखाद्या सैतानासारखा खवळून 'अे साल्या ! त्या माझ्या पवित्र गोमातेला शिवलास ? मारलंस ? तुझ्या

अशा आओमाओवरून शिव्या देसडून त्या साधूने अेक धोंडा अुचलून भरकन् त्या भग्याला मारला. थोडें चुकल म्हणून तो भग्याला लागला नाही यासाठी दुसरा टोला अुचलून तो साधू त्या भग्यावर फेकू पाहत आहे तोंच सारा प्रकार पाहून खवळलेले राममाअू माडीवरून ओरडले, 'हा ! ध्यानात धर ! अे भिकारड्या, जर त्या भग्याला मारलस तर— ! थाब आलाच मी खाली !' असे ओरडत राम-भाअू मागच्या पायी जिना धडधड अुतरले आणि वाटेशी आले

'टाक तो दगड खाली ! वाटेतून दूर हो ! भिकारड्या ! अैतखाअू ! तो विचारा भंगी कावाडकष्ट करून आपल्या निटळाच्या घामावर पोट भरतो तो आपली गाडी हाकीत असता त्याची वाट अडविलीस तो अडविलीस नि अुलट त्यालाच शिक्षा देतोस मारतोस !' राममाअू गरजले

'मग माझी पवित्र गोमाता त्यान विटाळली, तिला डोसल तें नाही का दिसल तुम्हाला ?' भिकारड्या साधु दटावू लागला, 'गाअीला तो शिवला, ती मला शिवली, मुलाही विटाळ झाला ! हें कस पाहत नाही तुम्ही ?'

'तेवढच पाहत नाही मी, तर मघापासून मी हेंही पाहत आहे की, तुझी ही पवित्र गोमाता आपण होअून मोठ्या आवडीन तो मैलावर चारीत होती ! मग तेव्हा नाही का ती बाटली ? आणि त्या भग्याचा विटाळ तुला झाला म्हणून जे म्हणतोस ना, त्याच असं की, जर कोणी शिवल म्हणून विटाळ होत असेल, तर कावाडकष्टावर स्वत च पोट भरणारा नि अत्यंत किळसवाण काम तेच आपल्या वाट्याला घेअून समाजाची घाण स्वच्छ करून समाजाच्या आरोग्याची साधना करणारा हा भंगीच तुझ्यासारख्या अैतखाअू साधुड्यापेक्षा अधिक पवित्र आहे, त्याच्या शिवण्यान विटाळ होत नाही. झालाच असेल, तर तुझ्यासारख्या अैतखाअू

गप्याला ते म्हणणे तत्काळ पटले ! तो होकार भरू लागला, 'अगदी खर आहे बर भाऊच म्हणण मी मघाच ताओला म्हणालो की, देऊ नकोस चार आणे टवकन् ह्या अैतखाऊला म्हणून त्या बिचाऱ्या कष्टाळू भग्याच्या डोक्यात दगड घालण्यापेक्षा या आळशी भिकारड्याच्या डोक्यात दगड घालायला हवा बर का ताओ !' शेटाणीला गपूने बजावले !

'दगडच नको काही घालायला ! त्याची खोड मोडायची म्हणजे त्याना कोणी भीक घालू नये म्हणजे झाले ! भीक मिळत आयती म्हणूनच ते भीक मागण्याराच धंदा म्हणतात ! आपण ती भीक अशा नदीबैल घेऊन मिरवत राहणाऱ्याना न घातली की बसतोच त्याचा भिकेचा हा धंदा !' रामभाऊने शेटाणीकडे पाहिले

शेटाणीताओ आपली बाज सावरू लागल्या अहो भाऊ ! पण त्या नदी-बैलान नि ह्या गामातेन काय केल आहे पाप ? ह्या भिकाऱ्यावर काही मी दया केली नाही तर त्या नदीबैलावरून नि गाओवरून ओवाळून टाकली ती पावली ! गाी तर दैवत आहे ना ?'

'पशूला दैवत म्हणणही पापच ! पण जर म्हणायचेच ना, तर ह्या भग्याच्या गाडीचा हा बैलच ह्या नदीबैलापेक्षा अधिक पूज्य, दयाह नि दक्षसी व्हायला पाहिजे बर ताओ हा भगाबैल पहा बर समाजाचे केवढे काम करीत आहे ! हे धाणीचे जिवापाड बाज सकाळपासून सध्याकाळपर्यंत तो वाहात असता त्याला अेक मोडून चार पेंढ्या चारा घाला त्या चाऱ्यावर समाजाच केवढ हित साधता येओल ! पण ह्या भिकारड्या साधून समाजाच्या कष्टावर स्वत भक्त अैतखाऊ बनविले नाही तर ह्या त्याच्या बैलालाही 'नदी' नि गाओला 'आदित्या' बनवून अैतखाऊ करून सोडल आहे ! समाजोप शेती गाडीभाडं अस कोणतेही अुपयोगी काम न करणारा हा बैलही ह्या भिकाऱ्याल अैतखाऊ करून सोडला ! हा माणस बैल नि तो ह्याचा नदीबैल ! दोघांच्याही श्रमाना समाज अंतरला ह्या भाकडेपणापायी ! अेक रिकामटेकडा अंदी मनुष्य नि अेक रिकामटेकडा अैदी बैल ! दोघाना समाजाला म्हणजच तुमच्या आमच्या-सारख्याना, व्यर्थ पोसाव लागत ! त्यापेक्षा ह्या [illegible] ह्या माणसबैलाला धरावा समाजाच्या कामाला .

'खरं काय रे साधुबुवा ?' शेटाणी पण थोड्या तिरस्काराने हसली. 'इश्श, मला हें माहीत असतं तर मी पावली तर काय पण गवताची काडीदेखील घातली नसती ह्याला ! पण नंदी पूजावा हा धर्म –'

' ह्या धर्मछापानंच डोळ्याला अंधेरी येते ताअी आपल्या ! नाहीतर त्या मोळीवाल्या बायांच्या चार आणे मोळीच्या धापांना कसं डोळसपणानं परीक्षून पाहिलत ! त्या मोळीवाल्या बायांनी जर तुम्हाला सांगितलं असतं – ' बाअी, ह्या सोन्याच्या मोळ्या आहेत, तेव्हा ह्यांना चार आणे देशील तर तुला देवाच्या घरीं सोन्याच्या मोळ्या मिळतील,' तर तुम्ही हसला असतात ! त्याना म्हणाला असतात, ' ह्या मोळ्या अेवढ्या सोन्याच्या आहेत तर तू कां दारोदार चार आण्यावारी विकीत फिरतेस !' पण हा लुच्चा जेव्हा म्हणाला, ' बैल नंदी देव आहे ही गाय कामधेनु आहे ' तेव्हा तुम्हीं त्याला काही हासडल नाहीत की, ' जर ही कामधेनुच तुझ्या घरी तू पाळतोस तर तू दारोदार भीक कां मागतोस ? गाअीला, नंदीला चारा घालणं हा धर्म आहे तर तू आपल्या देहास कष्टीव, चार पैसे मिळव नि त्यातून त्या गाअीनंदीला पोसून स्वतःच त्या धर्माचं पुण्य कां जोडीत नाहीस? ' पण तो काही विचार तुम्हांला सुचला नाही कारण गाअीला चारा द्यावा, नंदीला पुजावं हा धर्म आहे, हे पोथ्यांतून तुम्हीं अैकलेलं ! मोळीवाल्यांना दान द्यावं, मागतील त्या दरानें मोळ्या घ्याव्या, हा धर्म आहे, असं पोथीनं शिकवलं नाही ! ताअी, आता यापुढे तरी मोळी घेतांना जसे डोळे अुघडून वस्तु पारखून घेता, तसाच धर्म पण पारखून घ्यावा ! नाहीतर अंधळेपणान केलेला धर्मच असा अधर्म होतो. कोणत्याही भिकाऱ्याला पारखल्यावाचून ' धर्म ' करण हें पाप आहे. तेंच दान, कायाक्लेकष्ट करून समाजाची काम करतात, दुसऱ्यानं मिळवावं नि यानी खावं, असे आळशी, अैतखाअू नाहीत, अशांनाच जें देण तें दान द्यावं. पोटचा मुलगा जर न मिळवता घरबसा खाअूं लागला, तर त्यालाही आपण सांगतो की, धंदा कर तर जेवायला मिळेल ! पण नुसती अेक कफनी किंवा रुद्राक्षमाळा किंवा टाळ विकत घेण्यापुरत तेवढ भांडवल हे लुच्चे लोक खर्चतात आणि त्या भांडवलावर जन्मभर ' साधु ' ' बुवा ' बनून, समाजाचा पैसा अुकळून, चरितार्थ चालवितात ! ते आळशी, लुच्चे, अैतखाअू बनतात ! समाज त्याना पोसण्यात त्या मानानं दरिद्री बनतो ! दोन्ही पाप अशा अंधळ्या दानान आपणा स्वतःस न कळत लागतात !

ताअी, तुला गाअीला धर्मच करायचा ना, तर अेक छान गाय स्वत च विकत घेअू तिला खूप चारा पाणी घाल, नि स्वत च पाळ ! नदी देव म्हणशील, तर शेतीत राबणारा बैलच खरा नदी कारण त्याच्या कष्टान नागर-ओखर करून,जो धान्य अुगवितो नि घरीदारी सगळ्याना जो आनदवितो, तोच खरा नदी ! त्याला शेता-वरून थकून जाताना हिरवीचार गवताची पेंढी सोडीत जा–! 'त्या शेतकऱ्याना चवली पावली त्या नावे देत जा गप्या धर्मोपदेशक बनला !

'आणि त्या घरी पाळलेल्या गाअीच दूध अेकदोन निर्धन पण सच्छील विद्यार्थ्यांना प्यायला देत जा हव तर ! किंवा गाअीची वीण नि समाजाला प्रत्यक्ष अुपयोगी असे गुण वाढविणाऱ्या ज्या गोरक्षण संस्था असतील, त्यातील गाअीच्या खिल्लाराना ते दान देत जा हव तर !'

'पण अैकलत का ताअी, गाय नि बैल पशु आहेत – समाजाला अुपयुक्त पशु आहेत – म्हणून त्याचा समाजाला अुपयोग होअील, अशा पद्धतीच दान दिल तरच पुण्य, ही दृष्टि धरा की, मग तुमच दान आपोआप डोळस होअील नि त्या पशूची अुपयुक्तता वाढेल अशाच प्रकार पारखून दान देण्याची तुमच्यासारख्या व्यवहार-चतुराना बुद्धि होअील पण गायबैल ह्या स्वयमेवच देवता आहेत, असा धमछाप डोळ्यावर मारून ठेवलात की तुमच्या दानबुद्धीचे डोळे फुटून हा असा अधळा धर्म तुमच्याकडून अधर्म घडवीत गेलाच म्हणून समजा !

'आणि गप्या, नदीबैलवाले हे असे आले म्हणजेच नव्हे, तर कोणीही भिकारी दाराशी आला की त्यालाही हच सागत जा की, समाजाला अुपयोगी असा काहीतरी अुनाजक कष्ट तू करतोस की नाही ते आधी बोल ! काम कर नि पोट भर ! काम नसल तर मी तुला देईन त देतो त काम देण अेवढच खर दान! कामाच प्रतिमूल्य त्याला दयन योग्य वाटल तर थोड अधिक द्या, पण अंतवाअू भिकाऱ्याला नुसती कफनी वा रुद्राक्ष घालतो वा शख फुकतो म्हणून दगडीची देखील भीक घालू नका !'

निदान दिलेल कोणी परत घेत नाही हा ह्या भिक्षेकऱ्याचा नेहमीचा बहुधा अचूक अनुभव असता ' घे ताजी घे ! तुझी ही पावली पण घे परत ! दव बघून घेओल ह्या तुझ्या पोराला ! गोमाता, नदीराजा महादेव—'

ताच त्यान फेकलेली ती पावली परवन अुचलून गप्याने अकाळ विकाळ अवसानाने त्याच्यावर चालून जाअून दटावल, ' चल हालतोस का नाही यथून चालता ! होतोस का नाही ?'

त्याबरोबर तो नदीबैलवाला अेकदम दबला आणि नदीच दावे ओढून वहा पावले चुपचाप मागे हटला पण तथून पुन्हा अेकदा अगदी गयावया करीत मानी पावली तरी दे रे दादा ती परत ! म्हणून त्यान हात पसरला ! पण गप्याचा तो ' चालता हा !' पुन्हा गडगडताच पुन्हा चुपचाप पुढ चालता झाला गप्या पण काही बडबड करीत घरात परतलेला जेव्हा त्या साधूजीना दिसला, तेव्हा अकदा त्यानी स्वत च्या मनासमोर तरी स्वत ची पत राखण्यासाठी झालेल्या अपमानाचा सूड अुगवला —आठातल्या ओठातच त्या गप्याला अेक शिवी हसडून ' हा अेक तिसरा भगीच दिसतो ! ह्या आळीत भग्याचेच बटे रहातातस दिसतात सगळे !

तिथेच ती आळी सपली होती आणि गप्याच्या मागच्या दाराशी जाणारा बाळ लागला होता गप्याच माग च दार त्या बोळातच अुघडत हा कल्पनाच नसल्याने, नवी वाट म्हणून साधु त्याचा नदी नि ती कामधेनु अस त सार लटाबर त्या बाळात घुसल अितक्यात त्या दारातून त्या मोळावाल्या बाया हातात मोळ्याच्या सुटचा घेअून त्याना मिळालेल्या त्याच्या काबाडकष्टाच्या त्या अडीच अडीच आण्याच्या प्राप्तीत किती मीठ—मिरची—तल विकत घ्यायच त चन मोजात तिकडून येत होत्या त्या त्याला भेटल्या त्या नव्या नि हाअिकाना पाहताच साधूच

गप्याचाच तो आवाज ! पण ही ब्याद बोलते आहे कुठून असे गोंधळून त्या साधूने बोळाच्या तोंडाकडे वळून पाहिले, तो गप्या तिथे नाही! पुढे पाहिले तो गप्या त्याच्या मागच्या दारातून खवळून बाहेर पडताना दिसलाच त्या भयभीत साधूंना!

'बायानो, देऊ नका काहीअेक ह्या असल्या भोंदू भिकाऱ्याला ! हा माणूस बैल नि हा त्याचा नदीबैल दोघेही अैतखाअू आहेत अैतखाअू । आणि तुम्ही ? कुठे रानावनात भमून ती लाकडं तोडलीत, फोडलीत, पहाटेसच भारे बांधून खेड्यातून नगरात अनवाणी येअून तो बोजा माध्यान्ही दिवस येअीतो डोक्यावर वाहून दारोदार भटकल्यात, तेव्हा कुठं अडीच आणे पदरात पडतात ! ते तुमच्या निढळाच्या घामाचे पैसे हा अैतखाअू आता आयते अुपटणार ? देअू देणार नाही मी ते त्याला! त्या अडीच आण्यात तुमच्या घरच्या मुलालेकराना मीठ, मिरची, तेल ते तुम्ही काय नेणार ! अे साधु अरे, तू त्याना या पशूवर 'दयाधरम' करायला सांगतोस पण त्यांच्या लेकराची दया तुला नको का यायला ? आपल्या मुलालेकराच्या तोंडचा घास हिसडून, बायानो, कशाला ग देत होतात तुम्ही त्याला पैसे ? गप्याने कळवळून विचारलं

'गोमातेच्या पायाचा अंगारा देत हाता साधु आम्हाला !'

'साधु ? भोंदू आहे तो भोंदू ! पशूच्या पायाचा अंगारा माणसाना विकतो ! बायानो, तुमच्या घरी शेतीचे बैल नि गायी, गुरढोर असतीलच ना ? मग त्या कष्टाळू गुराढोराचा अंगारा आपल्या माथी लावीत जा जर काही लांवायचाच तर ! कारण ते पशु तुमच्या कामास तरी येतात ! हे पाहा, ह्या अैतखाअू साधूला मघा माझ्या आजीने चार आणे दिले होते दान म्हणून ! ते कुपात्री दान मी देअू दिलं नाही सत्पात्री द्याव म्हणून ! जा, हे घ्या ते चार आणे ! तुमची ती मुलंलेकरं नि तुमची ती गुरढोरं दानाला खरी सत्पात्र ! घ्या हे'

'नग नग आम्हासनी त, दादा ! त्या बाया अगदी कळवळून म्हणाल्या, 'तुमचं पैस आम्ही कशापायी घेणार ! काबाडकष्ट करून खातो दादा आम्ही दोन घास, अधळधा पागळंचा थोडंवाच आहोत ? आम्हासनी कशा हव दान !'

'अे साधु ! अेकलंस का ? दिसलं आहे का ई तुला ? बघ ह्या कष्टाळू बायाची थोर हृदय ! अरे तुझ्या त्याच्यात खऱ्या साधु ह्या मोळीवाल्या आहेत, नि तू निव्वळ भोंदू ! आता तरी सोडून दे हा अैतखाअूपणा आणि हे अंगारा विकणं ! अरे जर कोणाच्या पायाचा अंगारा लावायचाच ना, तर त्या तुझ्या नंदी पशूच्या पायाचा अंगारा ह्या बायामाणसाना लावण्यापेक्षा ह्या काबाडकष्ट करून समाजाच्या काहीतरी अुपयोगी पडणारी काम करून त्यावर पोट भरणाऱ्या त्या श्रमपाच्या, ह्या मोळीवाल्या शतकरणी कामकरिणीच्या पायाचा अंगारा तुलाच लावायमास हवा ! समाज जो अजून जीव धरून आहे तो ह्याच्याच काबाडकष्टावर होय ! तुझ्यासारखं माणूसबैल, नि ही पशुपूजा, नि हे अंगारे, नि

ही अंतसाळ साधुता, नि हे तुझे नदीबैल ही समाजाच्या भावडेपणाची मेंढागाडी आहे— *त्या भग्याच्या मेंढागाडीहूनही तिरस्करणीय टाकाऊ! कारण त्या भग्याच्या* मेंढागाडीने वेताळ तरी नष्ट होते—पण ह्या भावडेपणाच्या मेंढागाडीने बुद्धि-भ्रंशाची रोगराईच काय ती जिकडे तिकडे फैलावते! उपयोग असा काहीच नाही! बायांनो, दान म्हणून नाही, पण तुमच्या लेकरांना खाऊ म्हणून खुळाण्यासाठी मी तुम्हाला देतो हे चार आणे घ्या! ओशाळू नका! घ्या ते अं!''

गप्पाने बळे बळेच ती पावली भोळीभागीच्या हाती टाकली. त्या भिकाऱ्याच्या तावडीतून सुटून त्या बाया बोळाबाहेर पडेतो गप्पा तिथे उभा राहिला. त्या बाया त्या बोळाच्या दुसऱ्या तोंडाकडे जात आहेत असे पाहिले, तेव्हाच काय तो गप्पा घरात परतला.

गप्पा दिसेनासा होताच त्या साधूच्या पोटात साचलेला गप्पावरचा सारा राग एकदम वर उसळला आणि त्याचा वचपा ज्या एकाच वस्तूवर त्या भिकारड्याला काढता येण्यासारखा होता, त्या वस्तूवर, म्हणजेच त्याच्या नदीबैलावर त्याने हातातील काठीचा एक रट्टा असा बळाने हाणला की तो बिचारा बैल धूम पुढे पळाला आणि लगेच माग वळून गवतकाडी वेचून खात रेंगाळत चालणाऱ्या त्या बिचाऱ्या गाईच्या पाठीवरच त्याने दुसरा रट्टा हाणला की, गाईला देवता न मानता केवळ एक उपयुक्त पशु म्हणूनच काय ते मानणाऱ्या मनुष्याचेही हृदय, त्या निष्कारण क्रूरतेने कळवळून यावे! ज्या नदीला देव आणि गाईला देवी म्हणून लोकांनी पोसावे असे ढोंग तो लोकांना शिकवी, त्यांनाच तो भोंदू स्वत: पशूइतक्या देखील दयेने वागवीत नव्हता! असे हे नदीबैल काहीतरी दहा हजार आणि अंतसाळू रुद्राक्षे टाळकुटे, भोंदू दहा लाख साधुसंत भटकत आहेत! समाज जर गप्पासारखा होईल तर अशा दहा लाख अंतसाळूंना काम करून पोट भरणे भाग पडेल! भोंदूपणाचा नि भावडेपणाचा रोग प्लेगासारखाच समाजाला पोखरीत आहे!

रखमाबाओी—या या सकुताओी, लीला—या अशा, कुणी अिथ वसा, कुणी अिथ वसा या। (पुन्हा गोपद्मे काढू लागतात)

सकुताओी—हे काय चालल आहे रखमामावशी ?

रखमाबाओी—अग, या चातुर्मास्यात मी कनी गोपद्माच व्रत धरल वर अग, पण ती कमला नाही आली ती कुठ तुमच्याबरोबर आज? कित्ती चातुरी आहे ग ती! आली की कुठ मेल त हिंदुसभटन का कायस आहे-न ते काढलच तिन !

सकुताओी—मग त्यात ही वाओीट ते काय आहे रखमामावशी? ती जरी वयान लहान असली न तुमच्याहून, तरी तिचे विचार किती पोक्त असतात ! तुमच हो वय काय रखमामावशी आता ?

रखमाबाओी—आमच काय बाओी ! दहा गेले नि पाच राहिले ! (बोटे मोजून) बघ, तीन सिंहस्थ मला अगदी चागले आठवतात मग तूच पहा आपली आता माझ वय काय असेल ते।

सकुताओी—आता मला जर तिशी अुलटली तरी तुम्ही-साठीच्या जवळ लागणारच मावशी ! अहो, आलीच वाटत ती कमला ! हाक मारत आहे ! ओ !— या दार लोटलेल आहे हो नुसत अुघडा, या आत (कमला येताच) या शिक्षकीण बाओी! बसा अशा

कमला—काय रखमामावशी, कस काय आहे? हे काय करता आहा ?

रखमाबाओी—अग, ही गोपद्म काढत आहे मी चातुर्मास्यात गोपद्माच व्रत फार पवित्र १०८ गोपद्म प्रत्यही रांगोळीन काढावी, मग त्याची पूजा करावी, स्वत सोवळच्यान सैपाक करून पक्वान्नाच पान वाढून गोठ्यात जाव, गाओीला हळदकुंकू लावून फुलाची माळ घालून सोवळच्यान आपल्या हाती गोग्रास घालावा आणि मग जेवाव अशी १०८ गोपद्म—अग, म्हणजे गाओीच्या खुराची ही अशी चित्र—चार महिने काढलीं न, म्हणजे गोलोक नावाचा स्वर्ग १०८ वर्षं जिवाला भोगायला मिळतो! हो पण व्रत सपताच दहा तरी भट जेवायला बोलावून प्रत्येकाला अेकेक सोन्याच गोपद्म दिल पाहिजे हां ! —नाहीतर नाही स्वर्ग मिळणार ! अग कमळे, तुला काही व्रत नको का धरायला आता ! शिक्षकीण झालीस म्हणून काय झाल ! अग देवाची सेवा काही करावी काही धर्म आचरावा ! तू पण हे गोपद्माचच व्रत धर पाहू

कमला—पण प्रत्यही गायीसारख्या अेका पशूच्या खुराची १०८ चित्र काढल्यान आणि भटाना सोन्याची गोपद्म दिल्यान देवाची सेवा ती काय साधणार ! धर्म तो काय घडणार? धर्म म्हणजे परोपकार परोपकार पुण्याय ! तेव्हा ह्या लोकी काही प्रत्यक्ष असा परोपकार घडल अस व्रत करण बर तस एक व्रत मी धरल तर त्यात नाही का देवाची सेवा घडत ?

रखमाबाओ—लागलीच पाचकळपणा करायला ! अग, गायीची सेवा तीच देवाची सेवा भाव ठेवावा तिथ देव आहेच ! पोथीतच आहे हो हें सार !

कमला—होय ना ? मग जर पशूत भाव ठेवला तरी देव पावतो, तर आपल्या ह्या हिंदुराष्ट्राच्या भावाबहिणींची, माणसासारख्या माणसाची सेवा देवाच्याच नाव केली तर काय तो पावणार नाही ? नराची सेवा तीच नारायणाची सेवा, ह सुद्धा पोथीच सागते !

सकुताओ—हे आदी खर हो कमलाताओी, मी तस व्रत धरतें या ग्स दुधापेक्षा ताच खरा परोपकार, खरी देशसेवा, कोणच धरू ?

कमल—अस बघा सकुताओी, अका बिहाराच्या भूकपात अनाथ अशी हिंदूची तीन हजार बाळ मिशनरी मोल्वीनी नली, वाटवली, त्याचे आओीबाप त्याना मुकले अितकच नव्ह, तर हे तीन हजार वश पुढील पिढीपासून हिंदूचे कट्टर शत्रू होणार आपल्या हिंदुराष्ट्राच सख्याबळ अशा प्रत्यहीच्या धुडगुसापायी कोगीकोटीनी घटत असता, हिंदुधर्माच खर व्रत म्हणजे लाख लाख दूर्वाच्या गवताचे भार दवाच्या नाव बाधात बसण नसून अशी अेक्क अनाथ हिंदु बालबालिका वाचविण हेंच हो पण यासाठी हिंदुसभेन काढलेल्या अनाथालयाना भीक्देखील कोणी घालीत नाही आम्ही दवीन दरिद्री, अशा हिंदु अनाथालयास पैसे कुठन दणार ! पण आप शरीर तरी हिंदुसघटनाच्या अशा पवित्र कार्यासाठी कष्टविण आपल्या हात आह, हेंही तपच आहे अशा हतून आम्ही दहा पाच मैत्रिणींनी अस व्रत धर आहे की, प्रत्यही आमच्या यथील हिंदुसभेच्या अनाथालयात दोन तास जाअू तेथील लकराना अगजणीन आघोळून जववून, त्याचे कपडे घरच्या साबणान धुअू परीटघडीसारखे चक्क करून ठेवायचे आणि दर रविवारी त्याना हिंदु वी पुरुषाच्या माऱ्या कथा सागायच्या विज्ञानाचे चमत्कार खेळाव विमानयत्र

अनाथाल्यास धर्मार्थ शिवून द्या फुकट, त साहाय्य त्या सस्थेची केवढी तरी चिंता दूर करील !

सकुताओ— हो हा! पण वाओ कापड कुठल विकत आणू मी अितक!

रखमाबाओ—मी देते वर तुला कापड या माझ्या १०८ गोपद्मामाग १०८ मुलाच्या झबल्यासदऱ्याच कापड मी देओन हो धर्मार्थ मग तर पावेल ना मला सुद्धा तो तुझा हिंदुसघटन—देव? अग हसता काय अशा! हिंदुसघटना हाही अेक देवच आहे वर गणपति म्हणजे गणाचा पति सघटनाचा देव अग आम्हाला कळत का नाही हु? पण आम्ही आपली जुनी माणस तुमच्या नव्या कल्पना आम्हाला आमच्या जुन्या भाषेतच सागितल्या म्हणजे ऽवकर पटतात हो मी ही आपली १०८ गोपद्म पूजीनच पण अनाथालयातील १०८ लेकराना कापड पण धर्मार्थ दिल्यावाचून व्रताची सागता झाली अस मानणार नाही वर म्हणजे जुन व्रत पण झाल नि नवही झाल काय कमला?

कमला— आभार आहेत हो मावशी तुमचे तुम्हा वडीलधाऱ्या माणसानी आम्हाला अितका आशीर्वाद नि सहाय दिल तरी पुर आह! वर लीला शालिनी, मालिना तुम्ही साऱ्या जणीना कोणकोणचा व्रत या चातुर्मास्यात धरला आहेत?

लीला— आम्हा दहा जणानी प्रत्येकी लक्ष लक्ष वातीच व्रत धरल आहे प्रत्येकी शभर दानणे वातीचा कापडा सकाळी देवघरात या देवळात जाळायचा अग ऽखेोला प्रत्येकीन जाळली का दहा भट बोलावून त्याना दहा सोन्याच्या वाती द्यायच्या (सगळ्या हसतात)

कमला— भटाच्या घरा सोन्याच्या वाती जाळतात हाय? लीले पूर्वी विजेच गसचे राकेलचे दिवे नसत तव्हा घरी देवळा पणत्यातून वातीच लावीत तेव्हा त्या काळी लाख वाती फुकट जात नसत घरी देवळा त्याचा अुपयोग होओ, पण आता जिकडे तिकडे राकेलचे कंदील गस व विजेचे दिवे झगझगाटत आहेत आता त्या झगझगाटात लाख वातीपायी तुम्हा दहा पाच जणाच ज मणभर तरी तूप नुसत जाळून टाकायच त्यात काय अर्थ आहे वर! पुन्हा वाती पटवायच्या त्या म्हणे सकाळी अुजाडल्यावर पेटवायच्या किती व्यर्थ कष्ट! म्हणून म्हणते, तुम्ही ते मणभर तूप अस अुगीच जाळून टाकण्यापेक्षा त्या अनाथालयातील लेक रांच्या ताडी घाला तुमच्या कापसाच्या वाती पटवून पडलल्या अुजेडात आपल्या राष्ट्रातील दास्य दारिद्र्य दुष्काळ दुर्दशा याचा अधेरच काय तो दिसतो! पण आपल्या हिंदुराष्ट्राच्या त्या लेकराच्या जीवनाची विझती वात जर तेवविली ना तरच तो अधार घालविणारा खरा अुजेड आपल्या घरी पडेल!

सकुताओ—आणि प्राणदानाच तच कृत्य देवालाही जास्त आवडेल! अग माझ्या मुलीन मुलाल्लेकराच्या तोडी पडणार तूप जर चुलीत अुगीच ओतून दिल तर मी तिच्यावर रागावेन का प्रसादेन? तसच देवाच्या लेकराच्या तोडी पडणार हे

मणोगणती तूप असं नुसतं जाळून टाकल्यानं देव अुलट रागावतच असला पाहिजे त्यापेक्षा ते मणमण तूप देवाच्याच नावं त्या अनाथ लेकरांस पोसण्यासाठी लाऊं घातलं तर त्यातच खरा परोपकार घडेल! अिहलोकी प्रत्यक्ष लाभ, परलोकी पुण्य!

शालिनी—मी कनी चातुर्मास्यात केळीच्या पानावर जेवायचं व्रत धरलं आहे चार महिने केळीच्या पानावर जेवायचं नि मग भटाना जेवायला घालून अेकेक चांदीचं केळीचं ल्हानमोठं पान दान द्यायचं

मालिनी—मी कनी भेंडीव्रत धरलं आहे या चातुर्मास्यात भेंड्याची भाजी खायची नाही आणि शेवटी भटाला बोलावून अेक चांदीची भेंडी दान द्यायची आमच्या गोपाळ भटजींनी सांगितलं आहे की, अिथ अशी चांदीची भेंडी दान दिली की मेल्यावर स्वर्गात सोन्याच्या भेंड्या मिळतात हो जिवाला (सगळ्याजणी पुन्हा हसतात) हसता ग काय सारख्या ?

रखमाबाअी—अग, हसू नको तर काय करू! मला म्हातारीला देखील ही भटाची लुच्चेगिरी पसंत नाही वर पडत! कोणग हा गोपाळभटजी! तो का? वा ग वा! लोकांची घरं मक्त्यानं बांधायचा त्याचा अेक धंदा आहेच घरीं गाअीम्हशी बाळ-गून दूध गावभर विकतोच अग परवा मी मनुस्मृतीत अैकलं की जो ब्राह्मण दूध विकतो तो तत्काळ पतित होतो म्हणून! त्याचा मुलगा पोलिसखात्यात मोठा कारकून आहेच तीन मजली नवं घर त्यानं अलीकडेच बांधलं आहे तिकडे तीं आपल्या हिंदूंची शेवडो लेकरं भुकेनं मरताहेत मिशनरी, मुसलमान त्यांना बाट-वून हिंदु राष्ट्राचे कट्टर शत्रु बनविताहेत नि आम्ही अिकडे मणमण तूप आगीत जाळतो आहोत नि अशा पैसेवाल्या धंदेवाअीक भटाना चांदीची केळीचीं पानं नि सोन्याच्या भेंड्या धर्म म्हणून दान देत आहोत! हा कसला मेला धर्म—अधर्म आहे हा! कमल, तुझं म्हणणं अगदी खरं आहे, हे भट मोठे लुच्चे आहेत देवाच्या नावे भावड्या लोकांना मनास येतील तशा थापा मारून स्वतःची तुंबडी

वडाभोवती लक्ष प्रदक्षिणा तेवढ्या गेल्या घर्पी घातल्या या चातुर्मास्यात गोग्रास कानवल्याच व्रत धरल आहे दर सोमवारी नअू गुळाचे कानवले करते पैकी आठ कानवले गाअीला घालते नि अेक तेवढा प्रसाद म्हणून मुलाना देते मी स्वत अुपास करते असे सोळा सोमवार करायचे !

सकुताअी— अिदश! हा तर निव्वळ आचरटपणा नाही का ? अहो, घरी मुलाना गोडधोड मिळत नाही म्हणून अेकीकडे म्हणता आणि गुळाचे नअू कानवले करून गाअीसारख्या अेका पशूला आठ चारता नि मुलाच्या तोंडी अेक घालता ! (अहा, मुलामाणसाना दूध देते म्हणून जी गाय हवी, तिला, मुलामाणसाना अुपाशी ठेवून तुपाची जेववायाच काय ? पशूची जापासना करायची तर पशूसारखी करा पशूला हिरव गवत पेढीभर आणून घाला, पाहिजे तर ओंसटवाणी घाला आणि कानवल मुलाना द्या ! गोठ्यातला पशु देव आहे, तर तुमची पोटची लेकर काय भुत आहेत? माणसाहून पशु श्रेष्ठ आहे हे सागणार व्रत देवाच नसून दैत्याच आहे दैत्याच !)

लीला—तसच तुझ्या त्या वडाच्या भोवती लक्ष वेळा गरगर फिरायच व्रत देखील भावडटपणाच नाही का? त्यात परोपकार असा ग कोणचा केलास ?

रखमाबाअी—तुम्ही सगळ्याजणी कमलेच्या पट्टशिष्यिणी झाल्यातस दिसत मग्ग खरच बर, तिच जे म्हणण की अशीच व्रत करावी की ज्यात या लोकी प्रत्यक्ष परोपकाराच काही कृत्य राष्ट्राची काही सेवा घडेल, त अगदी बरोबर आहे हो अमुक भाजी खायची नाही, केळीच्या पानावर जेवायच, अुगीच लाख वेळा गरगर फिरायच असा व्यर्थ देहदड करण्यापेक्षा देहदडाच तपही घडाव आणि राष्ट्राची प्रत्यक्ष सेवा, या लोकी काही तरी प्रत्यक्ष परोपकार करावा अस मी अक व्रत तुम्हाला सागते अ तुम्हा निधन असल्यात तरी देखील दुब्बळ दान दिल्याच पुण्य तुम्हाला कम जोडता येअील बघा अ माझ्या अगणास लागून मागी ही केवढी तरी मोकळी जागा आहे तीत नुसत रान अुगवत तर तुम्ही दहावीस जणा प्रत्यही अिथ येअून स्वहस्तान खणून पेरून या चातुर्मास्यात वागी अळू, मिरच्या, कोथिंबीर प्रभृति शाक भाजी लावा त्या अनाथालयास चारसहा महिने पुरेल जितक्या भाज्या आपण स्वत च्या मेहनतीने पुरवू या !

कमला—ठीक ठीक ! दूर्वाचे भारे बाधीत भटकण्यापेक्षा वा वाती करीत वा ही अशी गाअीच्या अुराजी जिन कळीत वा झाडाभोवती लाख वेळा गरगर फेऱ्या घालीत राहण्यापेक्षा असा आपल्या धर्मबाधवाच्या या हिंदुराष्ट्राच्या सेवेत देह झिजवावा हच अुत्तम जर देव झाडपशूच्या सेवेन सतोषत असेल तर तो नराच्या सेवेन अधिक सतोषत असला पाहिजे आणि त्या त्या व्रतानी पारलौकिक फळ मिळत असतील तीही मिळत असलीच पाहिजेत ! आता बघा अ रखमाबाअी त्या अनाथ शभर लेकराना कापड देतील सकुताअी त्याची सवली नि सदरे शिवून देतील.

तुम्ही मणभर तूप घाल, ह्या सगळ्याजणी मिळून चार महिन्यांच्या भाज्या पुर-वतील. म्हणजे आपण त्या अेका अनाथालयाचा केवढा खर्च भागवू बरं ? — हिंदु धर्माची, राष्ट्राची, केवढी सेवा नि केवढा परोपकार करू शकू बरं ! मग घेताना हीं सगळी व्रतं ?

साऱ्या जणी—अगदी आम्ही सगळ्यांनी हींच व्रतें या चातुर्मास्यात करा-यचा संकल्प हा आताच केला बरं. तुम्ही जा नी त्या अनाथालयाच्या संचालकांना द्या हें वचन अितक्या धर्मार्थ साहाय्याच.

कमला—त्यांना कितीतरी आनंद होअील. त्यांची केवढी चिंता दुरावेल हें अैकून ! जाअू या आपण साऱ्याजणीच तिकडे. चला ! (जातात).

\+ \+ \+

## १०. ताबुतांची गोष्ट

आपल्याला ताबुतांची गोष्ट माहीत आहे काय ? तुम्ही प्रतिवर्षं मुसलमानाचा ताबुताचा सण पाहतच असता. लाखो मुसलमान त्यात जरी खूप नाचतावागडताना दिसतात तरी तो सण आनंदाचा नसून त्याचें मूळ अेका अत्यंत हृदयद्रावक शोककथेत आहे. मुसलमानी धर्मसंस्थापक जे महंमद पैगंबर, त्याच्या प्रत्यक्ष नातवाच्या झालेल्या क्रूर कत्तलीची ती वार्षिक स्मृति आहे.

पण अशी अेखादी करुणरसानें थबथबलेली गोष्ट नुसती कल्पनेनेंच कोणी रचिते तर तिने भावना खळवळून सोडल्याच असत्या हें जरी खरें असलें तरीही तिच्यापासून शिकण्यासारख्या ज्या काही महत्त्वाच्या गोष्टी आहेत त्यांचा परि-णाम वाचकांवर व्हावा तितका सहजच झाला नसता; कारण मन म्हणतें 'अूः ! ही नुसती कल्पकथा आहे ! असें काही खरोखर थोडेंच घडले आहे ! प्रत्यक्षाच्या व्यवहारात अशा भाकडकथाचा तो काय अुपदेश घ्यायचा ! स्वप्नात तीन फुटांच्या खोलीत तीन हजार शिपाअी शिरलेले दिसतात, बिछान्यावर असता स्वतःला डोहात फेकलेलें दिसते; पण म्हणून जागें होताच त्या डोहात आपण पडलो आहोत, असेच समजून तरण्यासाठी कोणी पोहू लागतो थोडाच ! स्वप्नातला चुटका सर्वस्वी स्वप्नापुरताच ! कल्पित गोष्टींचा चटका मुख्यतः मनोरंजना-पुरताच !'

यासाठी व्यवहारात घेण्यासारखा अुपदेश मनावर पक्का ठसविण्याच्या कामी नुसत्या भावना खळवळून सोडणाऱ्या अरेबियन नाअिटसारख्या कल्पित कथांचा जरी थोडाबहुत अुपयोग होतो तरी त्याच्याहून किती तरी पटीने अितिहासात

तशा ज्या घटना खरोखरच घडलेल्या असतात त्याची पकड भावनेवर नव्हे, तर बुद्धीवरही अधिक पक्केपणी बसते (कोणतेही सत्य मनावर बिंबवावयाचे झाले तर त मूलन च बव्हशी असत्य असलेल्या कल्पित कादंबरीपेक्षा, तितकेच भावनो-द्दीपक असताही अक्षर नि अक्षर सत्य असणाऱ्या ऐतिहासिक घटनेनेच अधिक परि-णामकारकपणे बिंबविले जाऊ शकते )

ही ताबुताची गोष्टही कादंबरीसारखीच अत्यंत चित्तवेधक असताही इतिहासाइतकीच सत्य आहे

त्यातही गिबन, सेल प्रभृति अनेक इंग्रजी इतिहासकाराच्या नि कुराण-शरीफच्या अभ्यासकाच्याकडे न जाता आपण ही ताबुताची गोष्ट हेतुत जस्टिस अमीरअल्लीसारख्या निष्ठावत पण सुविद्य मुसल्मानी लेखकाच्याच तोडून ऐकू म्हणजे त्यायोगे ती सागताना बिनमुस्लिम लेखकानी ती जाणूनबुजून चुकलेली सांगितली अशी शका आपणास वा दुसऱ्यास घेण्याचे फारसे कारण उरणार नाही

महमद पैगंबरानी ज्या वेळी ते अत्यंत हीन स्थितीत होते आणि त्याच्या गावीही ते पैगंबर—ईश्वरदूत—म्हणून जेव्हा बहुतेकास माहीत नव्हते त्या वेळी एक होतकरू, दक्षणा नि प्रामाणिक मुलगा पाळला होता त्याचे नाव अल्ली त्यास पुढे महमद पैगंबर यानी आपल्या पुत्राच्या ठायी मानले, कारण पैगंबरास पुत्र नव्हता पुढे महमदानी आपली मुलगी फातिमा हीस त्या तरुण अल्लीलाच देऊन त्यास आपला जावईही केले

महमदावर आलेल्या अनेक संकटात अल्लीने त्यास सोडले नाही अरबानी महमदाचे पैगंबरत्व मान्य केले तेव्हा त्याच्या वाढत्या वैभवासह अल्लीचेही महत्त्व वाढत गेले पण महमद पैगंबर सन ६३२ त वारले तेव्हा त्याच्या गादीवर अल्ली-चाच हक्क आहे असे त्याच्या पक्षाच्या लोकाचे मत असताही त्या खलिफापदावर

मिळाले ! कुराणाचे प्रार्थनामंत्र त्या अल्लीच्या ओठावर असताच मारेकऱ्याचा सुरा त्याच्या हृदयात घुसला ते कुराणाचे मंत्र त्यास ह्या जगात तरी वाचवू शकले नाहीत !

## राजपुत्र हसन-हुसेन

अल्लीला, महमद पैगंबराच्या फातिमा नावाच्या ज्या मुलीशी त्याचे लग्न झाले होते, तीपासून हसन आणि हुसेन हे दोघे पुत्र झाले अल्लीला वर सांगितल्या प्रमाणे मारेकरी घालून ठार मारल्यानंतर त्याच्या प्रतिपक्षाने मोअवियाचे खलिफापद मान्य केले परंतु अल्लाच्या पक्षाच्या मते खलिफापद हें महमद पैगंबराच्या वंशातच राहावे असे असल्याने आणि अल्लाचे जे वरील पुत्र तेच महमद पैगंबराच्या वंशाचा उरलेला अंकुर असल्यामुळे त्या हसन हुसेनाच्या हातीच खलिफापद ठेवण्याचा अल्लीच्या पक्षाने पराकाष्ठा चालविली अल्ली ठार मारला जाताच त्यांनी हसनला खलिफा म्हणून घोषित केले पण तिकडे मोअविया हा प्रबळ सैन्य घेऊन त्याच्यावर चालून येत आहे असे कळताच त्याची गाळण उडाली पैगंबराचा हसन हा नातू असला तरी ते दैवी नातें ह्या मानवी जगात प्रबळ असलेल्या सैन्यावाचून अगदी दुबळे ठरले, आणि हसनला खलिफापदावरील आपला अधिकार सोडून देऊन मोअवियास अेका वर्षाच्या आत शरण रिघावे लागले दोन्ही पक्षाचा करार झाला तो असाच की मोअवियानेच खलिफा व्हावे पण त्याच्या मृत्यूनंतर मात्र पैगंबराचा दुसरा नातू जो हुसेन त्याला खलिफा नेमावे

अशा रीतीने मोअविया हाच शेवटी मुसलमानी साम्राज्याचा अेकमेव नि अप्रतिरथ खलिफा झाला यश त्याला आले ! तो कोणी मोठा धर्मभीरु कुराण निष्ठेने पाळणारा न्यायी सदाचारी होता म्हणून का त्याला हें अप्रतिम यश येऊन तो कुराण मानणाऱ्यांचा मुख्य राज्याध्यक्षच नव्हे तर धर्माध्यक्षही झाला? मुळीच नाही ! यच्चयावत् मुसलमानांचा अगदी निर्विवादपणे झालेला आणि अत्यंत प्रबळ ठरलेला असा ना पहिला खलिफा तो हा मोअविया कसा होता याविषयी अमीर अल्लीच म्हणतात —

ज्याचे मित्रत्व राखता येणे कठीण जाओ किंवा ज्याचे शत्रुत्व डाओजड होओ त्याचा त्याचा विषप्रयोग वा खंजिराने त्या मोअवियाने घात केला आणि करविला हत्या ही त्याच्या अगवळणी पडलेले अेक प्रबळ हत्यार होते त्याच्या सत्तेला अडथळा करू लागेल अशी वाटले ती कुराणातील दैवी वा व्यवहारातील मानवी आज्ञा वा आधार झुगारून देण्यास तो कमी करीत नसे पण सोअीस्कर असल्यास कुराणातील आचार बाह्यतः पाळण्याचे सोंगही असे वठवून देई की मग ! हा केवढा दैवदुर्विलास होय की, ज्यांनी प्रत्यक्ष महमद पैगंबराचा छळ केला तेच त्याच्या वंशजाच्या पैतृक संपत्तीचे नि राज्याचे वारस ठरावे ! आणि ज्यांनी

मूर्तिपूजकाचा पक्ष घेतला तेच महमदाच्या मूर्तिभंजक मुसलमानी धर्माचे खलिफा –धर्माध्यक्ष–व्हावे !'' (हिस्टरी ऑफ दि सारासेन्स पृ ७१ नि ८२)

पण ऐहिक दृष्टीने पाहता मोअवियाला हे यश बरे आले ते अगदी सूर्य-प्रकाशाइतके स्पष्टपणे दिसू शकते ! तो अत्यंत धाडसी, राजनीतिपारंगत, शूर, कारस्थानी पुरुष होता ऐहिक राज्ये जिंकण्यास जे गुण अवश्य ते त्यात होते त्याचे सैन्य चुझार असून, शस्त्रास्त्र उत्कृष्ट असत, म्हणून ऐहिक राज्य जिंकण्याच्या कामी त्याला यश आले आणि पैगंबराचा दैवी वश तिकडे धुळीस मिळत असता मोअवियाने स्थापिलेले दमास्कसचे मुसलमानी साम्राज्य नि धर्माध्यक्षत्वाचे ते खलिफापद त्याच्या साध्या मानवी वंशात शंभर वर्षे अव्याहतपणे नांदत राहिले !

हसनच्या हातून खलिफापद नि साम्राज्य हिसकावून घेऊनच मोअविया स्वस्थ बसला नाही थोड्याच अवधीत त्याचा मुलगा येझिद याच्या कारवाईने हसनाला विष पाजून ठार मारण्यात आले ! पैगंबराचा–देवदूताचा तो प्रत्यक्ष नातू पण त्यालाही वाचविण्यासाठी महमद पैगंबर दवापाशी मध्यस्थी करू शकले नाहीत–देवाने मागे अल्लीला कट्याल्याच्या खंजिरास मारू दिले तसेच आता त्या सुष्ट हसनलाही विषाच्या पल्यास पिण्याआधी अकवार दखील सावध न करता दुष्टाच्या घाताला बळी पडू दिले !

राहता राहिला महमदचा दुसरा नातू हुसेन खलिफा मोअवियाने पूर्वी करार केला होता की, त्याच्या मागे खलिफापदावर नि साम्राज्यपदावर हुसाला स्थापिल जाईल ! पण त्याचा वडील भाऊ हसन त्याला विषप्रयोगाने ठार केल्या-बरोबर हा करारही मोडून खलिफा मोअवियाने आपल्यामागे आपला पुत्र येझिद ह्यासच खलिफापद मिळावे म्हणून निश्चित केले आणि मुसलमानी साम्राज्यातील मशिदीमशिदीतून येझिदलाच खलिफा करण्याची ग्वाही दिली गेली सैन्याने नि राजधानीने तीच शपथ घेतली पराक्रमी मोअविया सन ६८० मध्ये वारताच त्याचा हा सवाई पराक्रमी पुत्र येझिद, राजधानी दमास्कसमध्ये आपल्या पित्याच्या विस्तीर्ण साम्राज्याचा धनी नि मुसलमानी धर्माचा धर्माध्यक्ष झाला !

## खलिफा येझिद

ह्याच येझिदने महमद पैगंबराच्या अका नातवास, हसन यास विषप्रयोग करवून मारले हे वर दिलेच आहे. महमद पैगंबराचा दुसरा नातू हुसेन, त्याला खलिफा नेमण्याचा झालेला करार लाथाडून आता तोच येझिद खलिफा झाल्या-मुळे हुसेनच्या जातीचे नि पक्षाचे लोक अर्थातच फार चिडले त्याच्यापैकी अिरा-कच्या लोकानी तर हुसेनला बंड करून अुठण्यास खूपच भर दिली 'आपण आमच्या प्रातात पाऊल टाकताच सारी जनता अका माणसासारखी बंड करून अुठेल ! आपल्या येण्याचाच काय तो अवकाश !'' असे उत्तेजक निरोप ...

येत राहिले ! त्यासरशी त्या निरोपावर विश्वासून आपल्या खलिफापदाचा येझिदने छिनावून घेतलेला हक्क रणांगणावरच परत मिळवीन अशा निश्चयाने हा पैगंबराचा धर्मशील नातू हुसेन अिराककडे अुघडपणे चालून गेला. त्याच्याबरोबर त्याचे नातलग, दोन मोठे मुलगे, काही निष्ठावंत अनुयायी, बायकामुलें, अितकी मूठभर सेना काय ती होती !

## हाय हसन ! हाय हुसेन !

येझिदला तर हेंच पाहिजे होतें ! तो जितका पराक्रमी तितकाच लुच्चा ! त्याने साऱ्या मुसलमानी साम्राज्यात असा दरारा बसविला होता की त्याच्या वर्तनात तो कुराणाच्या आज्ञांचा अुपमर्द जमेल तेव्हा करीत असताही तोच खलिफा धर्मनिष्ठांचा धर्मगुरु ! — म्हणून सारा मुसलमान त्याच्यापुढे चुपचाप गुडघा टेकीत होता. सारी मुसलमानांची सहानुभूति प्रत्यक्ष महंमद पैगंबराच्या त्या संत्रस्त असताही सत्यपरायण रहाणाऱ्या नातवाकडे—हुसेनकडे—होती. पण खलिफा येझिदच्या विरुद्ध ब्र काढण्याची कोणाची छाती होअीना ! अशा स्थितीत हुसेन बंड करून अुठतो आहे हें पाहून खलिफा येझिद अुलट संतापला ! गुप्त हस्तकाकरवी अुद्योगर बातम्या त्याने होअूनच हुसेनला चहूकडून धाडविल्या की, 'या ! आम्ही येझिदविरुद्ध तुम्हांस तत्काळ मिळतो !!' त्या निरोपास सत्य मानून तो सत्यपरायण हुसेन या मूठभर बाजारबुणग्यासारख्या टोळीनिशी जों जों पुढे चालला तों तों त्याला कोणी अडविण्यास येअीच ना ! त्यासही हें आश्चर्यच वाटलें ! निष्ठावंत भाविक मुसलमान म्हणू लागले 'अल्ला सत्याचा अभिमानी. प्रत्यक्ष पैगंबराच्या नातवाविरुद्ध असणाऱ्या शत्रूचे डोळे अल्लाने अंधळे केले, बुद्धि भ्रमिली ! नाहीतर खलिफा येझिद असा नांगी टाकून बसणारा प्राणी नव्हे! देवाचा अद्भुत चमत्कार आहे हा !'

तो अद्भुत चमत्कार होता खराच ! पण तो देवाच्या दयेचा नसून येझिदच्या राजनीतीचा ! कारण हुसेनला असें खोट्या आशेच्या मागे लावीत लावीत त्याने अशा ठिकाणी आणून सोडले की, जिथे निराशेच्या जाळ्यात तो पैगंबराचा नातू अचानक नि पुरतेपणी सापडावा.

अिराकच्या प्रांताने त्यास बोलावले होते. तिथपर्यंत जायचेच काय तें कठीण काम. तिथे जाताच तो प्रांतचा प्रांत 'अल्ला हो अकबर' करून हुसेनसाठी अुठणार ह्या अपेक्षेतील कठीण काम तेंच पार पडले. हुसेन अिराकमध्ये प्रवेशतो त्याला कोणीही अडविले नाही. पण अिराकमध्ये बंडाचा झेंडा घेअून त्याने पाय ठेवताच जें सोपें वाटले तेंच काम कठीण ठरले—हुसेन कान देअून अैकत राहिले पण अिराकमध्ये निजलेल्यांची झोप मोडण्याअितकी देखील गडबड कुठे अैकू येअीना. 'हुसेन की जय' गर्जत अेकही तरवार म्यानातून खणखणेना !

तोंच तरवारी खणखणल्या; तीरही सों सों सुटत चालले ! पण हाय हाय ! ते हुसेनला साहाय्य देण्याचें वचन दिलेल्या मुसलमानांचें नसून त्या लबाड खलिफा येझिडने हुसेनला अचानक गाठून कापून काढण्यासाठी धाडलेल्या मुसलमानी सैन्याचे होते !

'विश्वासघात !' हुसेनच्या टोळीत अेकच हाहाकार अुडाला. निरुपायाने अेका गावच्या आश्रयास आपले तंबू ठोकून त्यातल्या त्यात रचता येअील तितका व्यूह रचून हुसेनने ठाण माडलें. शत्रूने वेढ्याची तात त्या ठाण्याच्या गळ्याभोवती घातली !

## करबलाची लढाअी नव्हे, कत्तल !

त्या जागेचें नांव करबला होतें. खलिफा येझिडने हुसेनला त्या पिंजऱ्यात कोंडण्यासाठी जो सेनानी धाडला होता, त्याने हुसेनच्या टोळीवर चढून न जाता त्याचा छळ करावयाचाच तेवढा विडा अुचलला होता. हुसेनची ती मूटभर टोळी --ही जरी तरवार अुपसून अुभी होती तरी तिलाही शत्रूवर चालून जाणें अशक्य होतें. लढाअीचा प्रश्नच नव्हता तो! शत्रूने हुसेनचें पाणी तोडलें, दुरून दुरून तीरांचा वर्षाव चालविला. दिवसामागून दिवस हुसेनचे लोक पाण्यावाचून तळमळू लागले. शत्रूशी हुसेनने बोलणें केलें, 'मला सुखरूप परतू द्या--मी लढणार नाही !' पण त्याच्या लढाअीला भीत होता कोण ! महंमद पैगंबराचा तो नातू, हजारो मुसलमान पैगंबराच्या ज्या वंशास दैवी अंश मानीत त्या वंशाचा तो राजपुत्र ! ...पाण्यावाचून तडफडू लागला, 'मी शरण येतो--पण मला खलिफा येझिडकडे न्याल तें बंदिवान म्हणून नेअू नका, तर माननीय वीरपुरुष म्हणून न्या !' पण त्यास बंदिवानच नव्हे तर नीच, पापी म्हणून, अपराधी म्हणून आणा, आणला तर ! अुत्तम मार्ग म्हणजे जिवंत आणूच नका ! हीच तर त्याच्या शत्रूची--खलिफा येझिडची--आज्ञा होती ! शेवटी तो न्यायपरायण हुसेन म्हणाला, 'माझाच जीव तुम्हांस हवा आहे ना ? मग हा मी पुढे येतो, मला मारा नि वाद संपवा. पण निरपराध लेकरांना नि स्त्रियांना तरी तहानेने तडफडत मारू नका. त्याना सुरक्षितपणे वेढ्याबाहेर काढून द्या !' पण हीही विनंती खलिफाच्या सेनानीने अमानली ! आता मृत्यूवाचून गत्यंतर नाहीसें पाहून हुसेनने आपल्या अनुयायास सांगितलें, 'तुम्ही व्यर्थ मरू नका, ज्यास जाणें त्याने मला सोडून जावें हेंच अुचित, त्यातच मला समाधान वाटेल !' पण कोणी गेला नाही. अुलट आपल्या मुसलमानी धर्मसंस्थापकाच्या प्रत्यक्ष नातवावर तलवार चालविण्यास नकारून झुंजणें तर त्याच्या वतीनेच झुंजू अशा निश्चयाने येझिडच्याच सैन्यातील काही धर्मशील मुसलमान सैनिक हुसेनच्या छावणीत निघून आले.

तीरामागून तीर अेकसारखा येझिडच्या सैन्यातून सुटत चालला हुसेनच्या मूठभर लोकातील वीरामागून वीर वेचक वेचक पडत चालला शेवटी तो पैगंबराचा नातूही घायाळ झाला त्याने पाणी मागितले मोठ्या प्रयासाने पाण्याच्या प्रवाहाशी त्यास नेण्यात आले तोच शत्रूच्या तीराची झोड अुडाली तहान तहान करीत हुसेन पुन्हा तंबूच्या दाराशी आला स्त्रिया ओक्साबोक्शी रडू लागल्या हुसेनचे रडते पुत्र मरून पडले होते अेक अर्भक अुरले, त्याचे शेवटचे चुंबन घेण्यास हुसेनने ते लेकरू अुचलले—तोच शत्रूने त्यास अेका तीक्ष्ण बाणाने खिळून टाकले! त्यासरशी 'अल्ला' असे ओरडून तो राजपुत्र हुसेन तंबूपुढे मटकन बसला पाणी पाणी!! अेका सतीने प्रयत्नाची शर्थ करून अेक पेला पाणी मिळविले

पाणी! पाणी! त्या घायाळ राजपुत्राच्या हातात तो पाण्याचा पेला येताच त्याने तो पिण्यास आवडीने अुचलला घोट घेण्यास कोरड पडलेले तोंड पटकन अुघडून आ केला, तोच पाण्याच्या घोटाआधीच शत्रूचा बाण नेमका त्याच्या तोंडात सू सू करीत शिरला अेक कच्चा निराळी फोडून चीरपुन तरवार अुचलून अुठतो तो चोहोंकडून हाणा, मारा करीत शत्रू धावला नि हुसेन तरवारीच्या घावानी छिन्नविछिन्न होअून ठार झाला!

मुसल्मानी धर्मसंस्थापकाच्या नातवाचे त्या मुसल्मानाच्या दैवी खलिफाचे देवावर त्या मानवी खलिफा येझिडचे ते क्रूर मुसलमान थै थै नाचले, त्याच्या प्रेतास त्यानी हाणले, ठोकरले, त्याचं शिर भाल्यास टोचून मिरवीत निघाले!! पण देवान त्या 'दैवी' पण दुबळ्या खलिफाच्या साहाय्यार्थ हू का चू केले नाही! (अमीरअल्ली पृ ८६) मानवी पण प्रबळ अशा खलिफा येझिडपुढे देवसुद्धा असंतोषाचा अेक शब्दही काटू धजला नाही!

येझिडचा तो सेनानी ओबाअिदुल्ला त्या राजपुत्र हुसेनची ती दुर्दशा पाहत राहिला त्याच्या त्या क्रूर सैनिकानी हुसेनचं शिर आणून त्याच्यापुढे जेव्हा टाकले तेव्हा तो अगदीच पिसाळला हुसेनविषयीचा त्याचा राग अन्नावर होअून त्याने हातातल्या छडीने मृत राजपुत्राच्या कापून आणलेल्या रक्ताळ मस्तकाच्या

खलिफा येझिडच्या भव्य राजवाड्याच्या तटाखाली भिंतीला टेकून महमद पैगंबराच्या त्या मुली – लेकी – सुना लक्तर नेसलेल्या, मळलेल्या, हुसेनचे ते कापून आणलेले मस्तक ज्याच्यापुढे पडले आहे अशा त्या राजस्त्रिया ओक्साबोक्शी रडत बसल्या ! आपले केस तोडतोडून मोठमोठ्याने त्यांनी अेवढा आक्रोश मांडला की, सारी राजधानी रडू लागली, चिडू लागली येझिड देखील थोडा गडबडून गेला, त्याने त्यांची झाली ती निर्भर्त्सनाच बस झाली असे समजून त्यांना परत मक्कामदिनेकडे आपापल्या गावी जाअू दिले

अशी करबलाची कत्तल झाली ! मुसलमानी पैगंबराचे प्रत्यक्ष नातू जे हसन-हुसेन त्या राजपुत्राचा असा अत्यंत शोचनीय शेवट झाला ! महमदाच्या वंशाची करबलाला अशी दुर्दशा झाली, असा नायनाट झाला ! तीच करुणकथा आठवून आठवून करबलाच्या त्या कत्तलीच्या दिवशी प्रतिवर्षी कोट्यवधि मुसल्मान ताबुताच्या स्मृतिदिनी 'शोक ! हाय शोक !' असे वारंवार आक्रंदत धायधाय रडू लागतात करबलाची हीच करुणकथा ताबुताची गोष्ट होय ! हसन-हुसेनच्या या हृदयद्रावक शेवटाचा तो शोकदिन असतो, ते दुःखस्मारक असते!

हुसेनच्या ह्या दुर्दशेची बातमी पोचताच मुसलमानांची जी प्रमुखतम धर्मक्षेत्रे नि पैगंबर महमद स्वतः जीत राहत, त्या मदिना नगरीतील लोक अत्यंत खवळून गेले त्यांनी येझिडचे खलिफापद रद्द केले व त्याचा अधिकारी पिटून घालविला ही बातमी पोचताच तो पराक्रमी येझिड डिवचलेल्या सिंहासारखा चवताळला आणि सिंहाहूनही हिंस्र अवतार धरून ससैन्य मदिनेवर येअून कोसळला ! त्याच्या क्रोधाने तो सारा अरब देश थरथर कापू लागला येझिड, मुसल्मानी साम्राज्याचा मुख्य धनी मुसल्मानी धर्माचा धर्माध्यक्ष खलिफा ! पण त्या मुसल्मानी खलिफानेच मुसलमानी धर्मक्षेत्राची राखरांगोळी अुडविली ! महमद पैगंबराचे निधडे अनुयायी ल्हानमोठे वेचून वेचून कत्तल करण्यात आले जे अुरले त्यांना दास बनविण्यात आले त्यांच्या मानेवर डाग देअून ठेवले अल्लीच्या खिलाफतीपासून जी दप्तरे, सार्वजनिक कार्यालये, अुठविलेली होती ती सारी धुळीस मिळविली, फार काय – त्या मुसल्मानी पुण्यक्षेत्रातील ती पैगंबराची पुण्यतम मशीद, तिची खलिफा येझिडने घोडशाळा बनविली, नि पवित्र स्थलाची अनन्वित विटंबना केली ! (हिस्टरी ऑफ सारासेन्स पृष्ठ ८८) मदिनेला धुळीस मिळवून येझिड मक्केवर चालून गेला आणि तेथील पवित्र 'काबा' आणि अितर पुण्यस्थळे यांचीही यथेच्छ नासधूस करण्यात आली !

येझिड हाच शेवटी अप्रतिरथ खलिफा ठरला अैहिक राज्य, यश, दरारा, विजयश्री ही सारी त्याच्या पायाशी कुर्निसात करीत होती

हा अेवढा विजय त्या येझिडला मिळाला आणि हसन-हुसेनादिक पैगंबराच्या पुत्रपौत्राचीही धूळधाण झाली मा तर ? येझिड हा त्या हसन हुसेनहून कुराणाच्या

) जर वेद, कुराण, बायबल, तौरिद अिंजिल प्रभृति धर्मग्रंथ, त्यांचे त्यांचे अनुयायी मानतात तसे अीश्वरप्रदत्त, अीश्वरकृतच असते तर अीश्वराने त्यांची वचनं अशा खोटी पडू दिली नसती! त्याच्याच पैगंबराच्या नि ऋषींच्या वचनांची अशी धुळधाण अुडू दिली नसती. कधी पुराणाचे आचार पाळणाऱ्यांचाही सत्यनाश, कधी कुराणाचे आचार पाळणाऱ्यांचाही सत्यनाश कधी बायबलवाल्यांचीही दुर्दशा! किंबहुना या धर्मग्रंथात 'गाय पूज' नि त्या धर्मग्रंथात 'गाय पुजू नकोस, खा!' अशा धडधडीत अुलटसुलट फसवेगिरीच्या आज्ञा देअून मनुष्यात नसता कलह चेतविण्याचे दुष्ट काम निदान देवासारख्याने तरी करावयास नको होते!

पण देवाने ते केले हे म्हणण्यातच खरी चूक आहे. हे सारे वेद, बायबल, कुराण प्रभृति धर्मग्रंथ मनुष्यकृत आहेत. त्यातील अनेक वचने जी आज खोटी पडली आहेत ती टाकून जे ज्ञान आज खटके ठरते ते सोडून आजही जे अुपयोगी वा सत्य वाटते तेवढे मानावे हेच अुचित. कोणत्याही मानवी ग्रंथाप्रमाणेच तेही आहेत. अेवढे मानताच ते ग्रंथ मनुष्यजातीचीच अैतिहासिक नि सामाजिक संपत्ति होते. देवाचे नावे डोकी फोडणे बंद पडते. आपण सर्वांनीच बाबीलोनच्या अिष्टिका ग्रंथाप्रमाणे त्यांस सादर संरक्षावे. साभार आदरावे, सावधान अभ्यासावे. पण देव न्यायाचा वाली आहे. सत्य पक्ष विजयी होतोच. पुराण वा कुराणवाल्यांचा जय हा ठेवलेलाच प्रभृति मिथ्या आशांवर न विसंबता राज्य संपादिणे वा जाडे शिवणे — तर त्या त्या अैहिक साध्यास ज्या अैहिक साधनांची आवश्यकता प्रत्यक्षपणे भासते ती साधने संपादावीं.

अैहिक जगापुरता खरा धर्म म्हणजे अैहिक विज्ञान, (अेक्सपेरिमेंटल सायन्स) हेच होय.

—१९३४

\+ \+ \+

## ११. 'तोतया' राजा झाला!

* चितेवरून अुठलेले प्रेत!
* नागा गोसाव्यास गादी!
* बारा वर्षे आपलीच ओळख विसरलेला राजकुंवर!
* आपल्या पतीसच तोतया पति ठरविणारी राणी!
* मरून बारा वर्षे झालेल्या भावास भेटणारी बहीण!

वरील मथळ्यांपैकी कोणताही अेक मथळा जरी अेखाद्या कथेस देता आला तरी ती कथा मनास चटका लावून सोडती, मग हे सगळे मथळे ज्या कथेस लावता

निकाल लागला आणि पंचाच्या अेकमतानुरूप न्यायाधीशाने तो घाडसी मनुष्य सर रॉजर नसून अेक लुच्चा तोतयाच काय तो आहे, असा निर्णय दिला !

## मेलेल्यांचेच नव्हत तर मुळी जन्मलेच नाहीत त्यांचे सुद्धा निघालेले तोतये !

जन्मून हरवलेल्या किंवा मेलेल्या माणसांचे तोतये जसे अितिहासात प्रसिद्ध आहेत तसेच कित्येक वेळा न जन्मलेल्या व्यक्तींचेही तोतये निघाल्याचे अितिहास सांगतो! त्याचेंही अेक अुदाहरण घेअू. कोल्हापूरचे राजे संभाजी १७६० त निपुत्रिक वारले. त्या वेळी त्याची धाकटी बायको कुसाबाअी गरोदर होती. पेशव्यांचें फार दिवसाचें धोरण म्हणजे मराठ्यांच्या साम्राज्यातून पूर्वी फुटून निघालेल्या कोल्हा-पूरच्या राज्यास सातारच्या राज्यास पुन्हा जोडून टाकावें नि सारी महाराष्ट्रीय शक्ति अेककेंद्री नि अेकमुखी करावी, त्यास अनुसरून माधवराव पेशव्यांनी कोल्हा-पुरास औरस धनी अुरला नाही असे पाहून पूर्वीच्या अंत:कलहामुळे दोन झालेली, पण वस्तुत: अेक राज्य असलेली, सातारा-कोल्हापूरची संस्थाने अेकवटून मराठ्यांचें अेकछत्र करावें असा घाट घातला. पण संभाजीच्या विधवा बायकांचा हट्ट की, कोल्हापूर निराळें ठेवावे. ह्यासाठी त्यांनी पत्र टाकलें. राज्य निपुत्रिक हा प्रश्नच मिटला. कारण ' कुसाबाअी वैशाख वद्य ७ अिंदुवासरी प्रसूत झाली. राजकुवर जन्मास आले. तुम्हा कारणें साखर धाडली आहे स्वीकारणे.' पण ह्या बातमीच्या खरेपणाचा पेशव्यास संशय आला. तेव्हा रागावून आणखी अेका पत्रात संभाजीच्या बायकांनी फटकारून लिहिलें की, ' आमचे वंशी अशा क्लिष्ट कल्पना यामागें झाल्या नाहीत; पुढे होणे नाहीत. तुम्ही येअून परीक्षा पाहून सांगणाराशी सांगावें. त्यांचे मुखें ' होय ' म्हटल्याने हा राजा होतो नाहीतर ब्रह्मदेवाचें लिहिणें लटके पडतें असे नाही !'

परंतु माधवराव पेशवे काही फसवियाने फसणारे थोडेच होते! शोध लावून खरा प्रकार त्यांनी अितक्या पुराव्यासह अुघडकीस आणला की, संभाजीच्या पत्नीने शेवटी आपल्या मुखे मान्य केलें, ' कुसाबाअीस पुत्र झाला ही आमची बतावणी खोटी ! 'तेव्हा मुळातच न जन्मलेल्या कोल्हापूरच्या राजाचा तो बनविलेला तोतया ते मूल— खोटें पडले, त्याचे खरे आअीबाप धरून आणले आणि त्यांना शासनही करण्यात आलें. अशा खोडसाळ वर्तनाने जिजाबाअी-कुसाबाअीचा फार दुर्लौकिक झाला. पण पुढे तो क्षमा करून माधवराव पेशव्याने बाअीस दत्तकाची अनुज्ञा दिली. (सरदेसाअी मध्यविभाग ४ पृष्ठ १३४).

परतु आपल्या वा अितर देशांच्या अितिहासामध्ये असे जे अनेक तोतये निघाल्याच्या मनोरंजक कथा आहेत, त्या सर्वामध्ये ह्या बंगालमधील भोवाल संन्याशी खटल्यातील प्रकरणाअितकें चमत्कारिक नि रोमहर्षण वृत्त अगदी विरळा!

कारण ह्या प्रकरणी नुसता कोणी तोतया अुभा राहिला किंवा कोण्या सन्या पुरुषावर तोतयेपणाचा आरोप आला अितकीच चमत्कृति नसून, त्यातील प्रत्येक घटना निरनिराळ्या प्रकारे तिच्या रम्याद्‌भुततेने मनास चटका लावून सोडणारी आहे.

**भोवाल संस्थानच्या राजकुवराचें प्रकरण : चमत्कार पहिला !**

बंगालयात भोवाल नांवाचें अेक वर्षाचें साधारणतः आठदहा लाखाच्या अुत्पन्नाचें छोटेंसें संस्थान आहे. त्याचे विगत स्वामी कै. राजेन्द्रनारायण राय. ह्यांचा द्वितीय पुत्र कुमार रामेन्द्र नारायण राय. त्यांची पत्नी विभावतीदेवी. वडील वारल्यानंतर आपल्या वाट्याच्या अुत्पन्नाचा अुपभोग घेत असता ख्रि. स. १९०९ मध्ये कुमार रामेन्द्र नारायण हे आपली पत्नी विभावतीदेवी हिच्यासह दार्जिलिंग नामक रमणीय थंड प्रदेशी वारापालट करण्यासाठी गेले. त्यांच्यासह त्यांचे मेहुणे विभावतीचे बंधु सत्येन्द्रनाथ बानर्जी, कौटुंबीय चिकित्सक डॉ. आशुतोष, अनेक सेवकसेविका असा परिवारही होता. दार्जिलिंगला काही दिवस शीतल जलवायूचा अुपभोग घेतात न घेतात तोंच त्यांस अचानक संग्रहणीच्या रोगाने पछाडलें. चिकित्सा होअून त्या डॉ. आशुतोष प्रभृति मंडळींनी — काही अघोर कटामुळे असो वा नसो, पण राजकुवरांना सोमल देण्यात आला ! त्या विषाने जी बेशुद्धि आली तिचा विकोप होअून शेवटी राजकुवर वारले असे सर्वानुमते ठरलें. पत्नी विभावती, तिचा तो भाअू, तो डॉक्टर प्रभृति सर्वांनी मिळून रातोरात प्रेत स्मशानात नेण्याचें योजून घाअीघाअीने प्रेत हलविलें. स्मशानात जाअून चिता रचून प्रेत तीवर ठेवून आग जो लावणार तोंच आश्चर्यकारक योगायोगानें अकस्मात् मोठें वादळ अुठलें. पाअूस धो धो करीत वर्षू लागला. सोसाट्याच्या वाऱ्यात अुभें राहणेंसुद्धा भयप्रद झालें. आग तर चितेस लागता लागेना. तेव्हा त्या स्मशानातील त्या भीषण वादळामधून आपला जीवच कसाबसा वाचविणे आधी अवश्य असें होअून, प्रेत चितेवर तसेंच ठेवून ती सारी मंडळी धावत्याधावत्या घरी परत आली तोंच अेक दुसरा चमत्कार घडून आला. चितेवर तें प्रेत ठेवताच भयंकर वादळी नि मुसळधार पाअूस जसा अकस्मात् चालू होअून त्या प्रेताचे अग्नीपासून रक्षण झाले, तसेच ती मंडळी त्या प्रेतास चितेवरच टाकून घरी पळून गेली असता, त्याच वादळात त्याच रात्री तिथे नागा सन्यासी काही दुसऱ्या चमत्कारिक योगायोगाने भटकत आले ! क्वचित् राजकुवराच्या घाताच्या ह्या कटाची बातमी कटातीलच काही व्यक्तींच्या वेंधळेपणाने ह्या नागा संन्याशांना त्या स्थानी निवसत असता आगाअू कळली असावी !

जें अघोर, त्याच स्थळी; जी अघोर, नेमक्या त्याच वेळी, जें अघोर त्याच संकटात अुडी घेणे, सहन करणे, भटकत राहणे, आणि स्मशानी रानीवनी हिंस्र श्वापदांतून असें भटकत असता अनेक जीवांना दारुण संकटांतून सोडविणें — हेंच ह्या अघोरपंथी, सर्वसंगपरित्यागी पण प्रबळ अशी अेक संघटित मठसंस्था असलेल्या ह्या नागसंप्रदायाचें ब्रीद आहे !

येतात असे कथानक कल्पित असलं तरीही किती रम्याद्भुत (रोमँटिक) असलें पाहिजे!

मग वरील सर्व चमत्कारिक घटनांनी परिपूर्ण असं कथानक जर कल्पित नसता खरोखरच घडलेलं असेल तर तो योगायोग अेक अलौकिक आश्चर्यच नव्हे काय? ब्रह्मदेवच कादंबऱ्या लिहू लागला तर अितिहासदेखील कादंबरीहूनही रम्याद्भुत व्हायलाच पाहिजे! केव्हा केव्हा घटनाच (फॅक्ट) कल्पिताहूनही आश्चर्यकारक असते खरी!

बंगालमध्ये अलीकडेच जो 'भोवाल संन्यासी' नावाचा खटला निकालात निघाला आणि न्यायालयात पुराव्याची सूक्ष्मातिसूक्ष्म छाननी होअून त्याच्या स्वतःच्या पत्नीनेही 'तोतया' म्हणून नाकारलेल्या अेका राजकुवरास खरा राजपुत्र म्हणून जे ठरविण्यात आलें ती घटनाही असेच अेक, कल्पित कथानासुद्धा मागे सारणारं, आश्चर्य आहे!

## तोतये!

कोणत्याही तोतयाची कथा बहुधा मुळातच थोडीबहुत आश्चर्यकारक असणारच! मग तो तोतया लबाड असो किंवा त्याला तोतया ठरवूं पाहणारे लबाड असोत. हें खरें की खोटें याविषयी तुमुल कुतूहल वाटूं लागलें की त्या प्रश्नाचा मनास चटका लागल्यावाचून राहत नाही. तोतयाचा प्रश्न मुळातच 'हें खरें की खोटें' असं कोडं घालणारा असल्यामुळें तोतयाच्या कथा लोकांना हटकून आश्चर्यकारक वाटतात. तें कोडं अुलगडेतो सहस्रावधि लोकांच्या मनास सारखा चटका लावून सोडतात. कित्येकदा तोतयांनी लक्षावधि लोकांना चकविलें आहे, कित्येकदा लक्षावधि लोकांनी खऱ्यालाच तोतया ठरविलें आहे!

## मेलेल्याचे तोतये

अुदाहरणार्थ पानपतच्या संग्रामाची गोष्ट घ्या. सुप्रसिद्ध भाअूसाहेबांच्या तोतयाचा बोलबाला केवढा! सहस्रावधि मराठ्यांना तो खराच भाअूसाहेब म्हणून पडलेला भ्रम, पुण्यावर चालून येण्याचा धमक यावा अितका त्याच्या हाताखाली त्याला खराच भाअूसाहेब समजून जमलेला दळभार, फार काय प्रत्यक्ष पार्वतीबाअींना हा आपला खराच पति असावा असा झालेला संदेह या गोष्टी प्रसिद्धच आहेत! फसला नाही असा भला बुद्धीचा सागर नाना फडणवीसच काय तो होता! म्हणून शेवटी सर्व राष्ट्रास निर्विवाद वाटावा अशा पुराव्यानं तो भाअूसाहेब नसून तोतयाच आहे असं अुघड झालें आणि त्याचं डोकें मेखसूनें फोडून त्या तोतयास देहान्त शासन देण्यात आलें.

त्याच पानिपतच्या संग्रामात पडलेले जे दोन वीर जनकोजी शिंदे नि यशवंतराव पवार ह्यांचेही तोतये त्या धामधुमीत निर्माण झाले होते आणि त्यांनी ग्वाल्हेरच्या नि धारच्या संस्थानावर अधिकार सांगून बरीच गडबड माजविली. त्यांचेही कपट शेवटी असेच अुघडकीस आले तरी काही काळ अनेक लोकांना त्यांनीही भुरळ पाडलीच होती।

## अिंग्लंडमधील अेक अुदाहरण

आपल्याअिकडेच अशा मोठमोठ्या अैतिहासिक व्यक्तींचे नामधारी तोतये अुत्पन्न होअून सहस्रावधि लोक फसत गेले असे नसून, तोतयाच्या मायाजालात युरोपमधील जनताही वारवार अशीच कशी फसते, सामान्य जनाची चमत्कार लोलुपतेची सहज प्रवृत्ति 'तोतया' अुठताच युरोपमध्येही कशी अुत्तेजित होअून अुठते, याचेही अेक अुदाहरण म्हणून सर रॉजर 'टिचवोर्न' या मनुष्याचे प्रकरण सांगता येअील आपण सर रॉजर टिचवोर्न हेच असून कित्येक वर्षांपूर्वी नाहीसे झाल्यामुळे बिनवारशी समजली जाणारी आपली मत्ता आपल्यास मिळावी असा अेकजणाने दावा आणला त्यावर प्रतिवादीचे म्हणणे पडले की, हा मनुष्य खरा बेपत्ता झालेला सर रॉजर टिचवोर्न नसून क्वीन्सलंडमधील 'वाग्गावाग्गा नावाच्या गावातील अेक खाटीक आहे। सर रॉजर सडपातळ होते तर हा लठ्ठ, ते फ्रेंच भाषापंडित तर ह्याला फ्रेंचचे अक्षर बोलता येअीना, ते सुशिक्षित नि सभ्य तर हा निरक्षर नि अडाणी सर रॉजरच्या कुटुंबातील बहुतेक मंडळींनीही तो तोतयाच आहे असे स्पष्ट सांगितले पण तरीदेखील तोच सर रॉजर आहे असे प्रामाणिकपणे वाटणाऱ्या जवळजवळ शंभर भिन्न भिन्न वर्गांच्या प्रमुख गृहस्थांनी तोच खरा सर रॉजर असे न्यायालयात शपथेवर सांगितले। फार काय, सर रॉजरची प्रत्यक्ष मातासुद्धा चकली तिच्या पोटच्या मुलाची मुख्य खूण जी कानाची विशेष ठेवण ती त्या मनुष्याचे कान बघताच तिला तंतोतंत पटली आणि प्रथमदर्शनीच तो आपला पुत्र म्हणून त्या आअीने जो ध्यास घेतला तो शेवटपर्यंत सोडला नाही। आअीनेच मुलास ओळखले ह्या अेका बातमीचा सामान्य जनतेवर अितका पगडा बसला की सहस्रावधि अिंग्रज लोकांनी त्या मनुष्यासच खरा खरा सर रॉजर म्हणून अुचलून धरले। सामान्य जनतेची समज काही काही प्रसंगी अेक स्पर्शजन्य साथ कशी असते आणि पाचामुखी परमेश्वर हीं म्हणसुद्धा भाबडेपणाचेच अेक सूक्त कसे ठरते, तें अिंग्लंडसारख्या प्रगत देशांतील लोकही अशा हुल्लडीला जेव्हा बळी पडतात तेव्हा सहजी दिसून येते शेवटी, जेव्हा सर जॉन कोलेरिजने त्या मनुष्याच्या अितथभूत वृत्ताचा छडा लावून ते कपट चव्हाट्यावर मांडले आणि त्या आअीला अेकप्रकारची वेडगळपणाची बाधा असल्याचे डॉक्टरांनी सिद्धिले, तेव्हाच काय तो अतोनात द्रव्याची राखरांगोळी करून शंभर दिवस अव्याहत चाललेल्या त्या खटल्याचा

## तिसरें आश्चर्य

ते नागसंप्रदायी साधु त्या स्मशानात येऊन पहातात तों चितेवर 'प्रेत' म्हणून जें पडले होतें तें अगदी प्रेतच नसून अेक-मरणासन्न वेशुद्धीतील माणूस होतें! गाद्यागिरद्यांवर पथ्यपाण्याची पराकाष्ठेची व्यवस्था नि शुश्रूषा असताही अशा घातक वेशुद्धीत आजारी मनुष्य सुधारणें असाध्य! – पण आजाराच्या तशा भयंकर मरणासन्न अवस्थेत लाकूडगवत्यांच्या चितेत कोंबलेल्या आणि वादळाच्या वाऱ्यात नि पावसाच्या शिळंधार वर्षावात स्मशानात पडलेला तो आजारी मेला नाही – तर अुलट असाध्य अशा मृतावस्थ वेशुद्धीतून सुधारून, गेलेली जीवनाची धुगधुगी त्याच्या हृदयात, नि बंद पडलेले ठोके त्याच्या नाडीत पुन्हा संचरले! 'विषमप्यमृतं क्वचिद्भवेदमृतं वा विषमीश्वरेच्छया !!'

त्या परोपकाररत नागा गोसाव्यांनी ती धुगधुगी पाहून त्या 'प्रेतास' अुचलून निर्जन नि अेकान्त अशा गुहेत नेले. औषधोपचारात ते गोसावी अत्यंत निष्णात. वनस्पत्यादिक अुपचारांनी त्यांनी त्या राजकुवरास पुन्हा जन्मच दिला आणि त्यास त्याचें काही अेक पूर्ववृत्त न सांगता आपल्या संप्रदायात सामावलें. त्याची प्रकृति पुन्हा अगदी धडधाकट झाली.

पण चवथें आश्चर्य असें की, त्या मरणासन्न वेशुद्धीच्या तडाक्यात त्या राजकुवराची पूर्वस्मृति आमूलात् नाहीशी झाली! आपण कोण, कोठील, कोणाचे, हें त्याला मुळीच आठवत नव्हतें, त्यास तें कोणी सांगणारेही भेटत नव्हतें. नागांच्या महंतांना ती माहिती – त्यांनी ती गुप्त राखलेली, अशी ती विस्मृति बारा वर्षे टिकली!

त्या राजकुवराला त्या अद्भुत विस्मृतीमध्येही मधून मधून जिज्ञासा होअी – आपण मूळचे कोण? तो विचारीही महंतांना तो प्रश्न. पण ते म्हणत, 'वेटा, यथासमय तुझे तुलाच ते सगळे आठवेल; थोडा थांव!' कारण काही दैवी नव्हतें तरी अद्भुत होतें – असा पूर्वस्मृतिभ्रंश जसा तीं स्मृतिकेंद्रें दुखावल्याने अकस्मात् होतो तसाच हळूहळू मज्जापिंड पुन्हा वळावत जाअून जर पूर्ववत् निरोगी झाला तर तीच स्मृतिकेंद्रें पुन्हा स्वकार्यक्षम होताच तो स्मृतिभ्रंश तितक्याच अकस्मात् नाहीसा होअून पूर्वस्मृति पुनरुदित होते.

नागसंप्रदायाप्रमाणे त्या नवशिष्याची यथाक्रम बढती होता होता काश्मीरचे बावा धरमदास नागा ह्या मुख्य महामहंताच्या हस्ते त्यास नागसंप्रदायाची महादीक्षाही देण्यात आली. अेकंदर बारा वर्षे तो राजकुवर, आपण राजकुवर आहोत ही जाणीव लेशमात्र अुरली नसल्याने, नागा गोसावी म्हणूनच काय तो स्वतःस समजत त्या संप्रदायानुरूप अुल्लिंग अवस्थेत महंताच्या आदेशानुसार प्रदेशोप्रदेशी भटकत राहिला.

## अिकडे काय झाले ?

राजकुवर रामेन्द्र नारायणाचे प्रेत त्या वादळात चितेवर तसेच टाकून जे त्याचे मेहुणे प्रभृति पळून गेले होते ते, वादळ काही शात होताच ती रात्र सपण्याच्या आधी स्मशानात ती चिता पेटविण्यासाठी पुन्हा आले — पण पाहतात तो प्रेतच नाहीसे झालेले ! तरीही त्यानी धीर न सोडता रातोरात आणखी अेक कपटव्यूह रचला, आणि सकाळी गावात त्या समयीच मेलेल्या कोण्या अेकाचे प्रेत नेअून राजकुवराचे तेच प्रेत अशा बहाण्याने त्याला अग्नि दिला ! ह्या गोष्टीवरून तर राजकुवरला सोमल देण्यात आणि त्या बेशुद्धीसच मृत्यु समजून त्याना झटपट जाळण्यासाठी नेण्यात त्या चाडाळचौकडीचा प्रथमपासूनच अेक नृशस कट असला पाहिजे असे अुत्कट अनुमान सभवते !

राजकुवराचे म्हणून असे अेक दुसरेच प्रेत जाळल्यानतर त्या लोकानी राजकुवर रामेद्र मेले असल्याची द्वाही सर्वत्र फिरवली राजकुवराची पत्नी बिभावती ही बारातेरा वर्षांचीच त्या वेळी होती अर्थात तिचे पालकत्व तिच्या त्या भावाकडे आले त्याने तिच्या हस्ते त्या मृत म्हणून प्रसिद्धिलेल्या नवऱ्याची अुत्तरक्रिया यथासाग करविली, तिच्या वाट्याचे सस्थानचे तिसऱ्या भागाचे दोन तीन लाख रुपयाचे वार्षिक अुत्पन्न तिच्या नावे सरकारातून रीतसर करून घेतले, तिच्या पालकत्वाच्या नि पालकत्वाच्या मिषे त्याचा सगळा भोगवटा आपल्या हाती घेतला आणि तिला आपल्याच घरी नेअून ठेवले

त्या अुत्पन्नाचा असा यथेच्छ अुपभोग घेत ती दोघे भाअूबहीण तिकडे अशा प्रकारे जी नादत राहिली ती अेकसारखी भरभक्कम बारा वर्षे !

अिकडे त्या पुनर्जीवित राजकुवरास नागा सन्याशी मडळीने त्या चाडाळचौकडीकडून पुन्हा काही अपाय होअू नये ह्या सदबुद्धीने पजाबात नेले तिकडे तो राजकुवर स्वत चा स्वत सही पूर्णपणे विसरून आणि नागा सन्यासी मडळात आपल्याला तसाच अेक पूर्वापार नागा सन्यासीच समजून बारा वर्षे भटकत राहिला परतु तो काळ सपत येताच —

पाचवे आश्चर्य असे घडले की त्याची प्रसुप्त पूर्वस्मृति आपण होअून हळूहळू जागू लागली ! ! तो पुन पुन 'आपले खरे खरे पूर्ववृत्त काय, मला आता असे स्मरते की, मी भोवालचा राजकुमार रामेद्र नारायणच असलो पाहिजे, मला माझ्या मडळीना अेकदा तरी बघावयाचे आहे !' असे विनवू लागला त्याच्या जिवाला अपाय होअू नये म्हणून नागा गोसाव्याच्या रूपातच त्याने स्वग्रामी जावे असे योजून नागा महत महाशयानी शेवटी त्यास बगाल्यात जायची अनुज्ञा दिली आणि त्याचे सारे पूर्ववृत्त त्यास कळविले त्याप्रमाणे १९२० सनात तो राजकुवर नागा गोसाव्याच्या रूपात डाक्का स्टेशनवर येअून अुतरला भोवाल त्याचे

जिल्ह्यात. तिथे पाय टाकताच त्याला तें वातावरण नि दृश्य पूर्वी अनेकवार पाहिलेसें वाटलें. त्या त्या वस्तु पाहताच अनेक पूर्वस्मृति अंधुकपणें जागू लागल्या. तो डाक्का नगरातून प्रवासत अेका नदीतीरी जाअून आपला डेरा टाकता झाला. त्याची लांब दाढी, मस्तकी जटाजूट, सारें शरीर विभूतिचर्चित, आचार नामपरंपरा नाग-संप्रदायाची, परंतु तरीही बोलता बोलता लोकांमध्ये कुजबूज चालू झाली की, होय ना होय, हाच तो भोवालचा मधला राजकुंवर असला पाहिजे ! साऱ्या नगर-भर ही अद्‌भुत बातमी पसरताच आजूबाजूच्या गावचे लोकही त्याला पाहण्यास येअू लागले. सन १९२१ त जवळील कासीमपूरच्या भूमिदाराने त्या जटाजूटधारी गोसावी महाशयास आपल्या गावी नेलें. तिथे ते अुतरताच साऱ्या लोकांनी अेक-मुखाने ' भोवालचे मधले राजकुंवर' ह्या नांवाने त्याचा जयजयकार केला. भोवाल तेथून सन्निधच. तिथे ही बातमी पोचताच साऱ्या संस्थानातील गावोगावचे लोक आपल्या राजकुंवराच्या दर्शनार्थ लोटू लागले. ज्याच्या त्याच्या तोंडी 'हेच ते ! हेच ते !' झाले. नंतर लोकांनी आग्रहपूर्वक त्यांना जयदेवपुरास, जिथे त्यांची बहीण ज्योतिर्मयीदेवी आणि मातामही राणी सत्यभामादेवी होती तिथे आणलें. ते तिथेही नागा गोसावीच होते. परंतु त्यांची सूक्ष्मानिसूक्ष्म परीक्षा घेत घेत त्या दोघींचीही पक्की निश्चिति पटली की, हाच तो आपला भाअू, आपला नातू ! तेंव्हा प्रजेचा फार आग्रह पडला की, राजकुंवराने आता प्रकटावें. राजकुंवराने आढेवेढे घेतले, पण शेवटी जवळजवळ बळाने त्याचें जटाजूट काढण्यात येअून त्याचें मूळ रूप सर्वत्राना दाखविण्यात आले. सर्वांनी ' हेच ! हेच !' म्हणून जयजयकार केला. तेंव्हा राजकुंवराने स्वमुखें आपले रोमहर्षण वृत्त, जें ज्या नागा संन्याशांनी त्यांना शेवटच्या दिवशी कळविलें, तें प्रकटिलें. त्या दिवशी साऱ्या संस्थानातून लोटलेल्या चाळीस सहस्र जनतेच्या प्रचंड सभेत प्रजाजनानी ठराव करून अुद्‌घोषिले की, 'कुमार रामेन्द्र नारायण ते हेच होत !' अितकेंच नव्हे, तर आपला संस्थानिक या

निर्विवादपणे सिद्ध करण्यासाठी आपली पत्नी जी विभावतीदेवी तिलाच आपल्याकडे बोलाविलें ! पण सर्वांत मोठें आणि सर्वांत दुःखद आश्चर्य हें की त्या राणी विभावती-देवीने 'हा गोसावडा माझा पति नसून माझ्या मृत पतीचा ठग आहे (तोतया आहे ! ) असें सरकारात नि लोकात चक्क प्रसिद्ध करून त्याच्या बोलावण्याप्रमाणे त्याच्याकडे जावयाचें साफ नाकारले. अर्थातच ती ज्याच्याकडे गेली बारा वर्षे राहात आली, त्या तिच्या भावानेही तिच्या म्हणण्याचा प्रथम पाठपुरावा करून बहुतेक अुच्च सरकारी अधिकाऱ्यांचाही, अुत्पन्नाची धनीण वहिवाटीप्रमाणे जी ठरलेलीच होती त्या विभावतीलाच, पूर्ण पाठिंबा मिळविला.

आपल्या धर्मपत्नीनेच आपणास ठग ठरविलेले अैकताच राजकुवरास परा-काष्ठेचे दुःख झालें. 'तिला वैधव्यातच आनंद वाटतो तर तिच्या सुखात माती का कालव्या आणि हें प्रकरण पुढे कोर्टात आणून आपल्याच अशा अत्यंत लज्जास्पद दुर्लौकिकाचा डांगोरा जगभर का पिटा ?' असें बोलून तो स्वस्थ राहिला. पण त्याच्या बहिणीने आणि आजीने त्रागा करून आपला वारसा तू सिद्ध केलाच पाहिजेस, असा अगदी हट्ट धरला. तेव्हा सन १९३० च्या अेप्रिल महिन्यात राज-कुवर रामेंद्र नारायण ह्याने कोर्टात संस्थानावर आपलाच अधिकार असल्याचा दावा आणला.

## जगातील अेक अत्यंत भानगडीचा, चमत्काराचा आणि लांबीचा खटला

खटला कोर्टात चालू होताच त्याकडे सहस्रावधि लोकांचें लक्ष वेधून गेलें. हा खटला अेकंदर सहा वर्षे चालला होता. विभावतीने भरकोर्टात सांगितलें की, 'ह्या गोसाव्याचो मुद्रा माझ्या पतीशी कोणच्याही प्रकरणी जुळत नाही. माझ्या पतीचे शव माझ्यासमक्ष जाळण्यात आलें, दुसरें कोणाचे तरी शव आम्ही जाळलें हे साफ खोटें' हा मनुष्य पंजाबातील औजला गावचा निवासी असून धरमदास नावाच्या नागा संन्याशाचा शिष्य आहे, ह्या लोकानी हा सारा कपटव्यूह रचलेला

खोटे पाडणें आणि तेंही मोठमोठे सरकारी अधिकारी, स्वतःचेच अनेक नातेवाअीक आणि शिष्टजन राणी विभावतीच्या वतीने शपथेवर सांगत असताना की हा मनुष्य ठग आहे – राजकुवर नव्हे! असा बलवत्तर पुरावा. हाणून पाडणें रामेंद्र कुमाराला फारच दुर्घट गेलें असल्यास काही नवल नाही. यामुळेच अुभय पक्षांच्या वतीने मिळून या खटल्यात अेकंदर पंधराशे साक्षीदार आले, दोन हजार निवडक निदर्शके (अेव्हिडविट्स), दीडशे निवडक छायाचित्रें दाखविण्यात आली. या खटल्यात शेवटी शेवटी लोकांचें अितकें लक्ष वेधलें की 'भोवाल दैनिक' नावाचें अेक विशेष वृत्त-पत्र प्रसिद्ध होअून तें अडीच वर्षें चाललें!!

राजकुवर ते हेच, हें ठरविताना आनुवंशविज्ञानाचे अनेक चमत्कृतिजनक पुरावे जे पुढे आले, त्याची काही कल्पना येण्यासाठी आणि सामान्यतःही ती माहिती अुपयुक्त म्हणून, काही अुदाहरणें देत आहो.

राजकुवराच्या 'मृत्यू'पूर्वीच्या जोड्यांचा अेक जोड प्रतिवादीनेच पुढे आणला त्यावरून राजकुवराच्या पायांची अेक विशिष्ट ठेवण होती, ती ह्या 'ठगा'च्या पायाची नाही, हा विभावतीचा पक्ष. पण तो जोडा निरीक्षिता वादीच्या पायाची तीच ठेवण नि तो जोडा त्याच्या पायास तंतोतत जुळतो असें सिद्ध झाले!

पूर्वीच्या फोटोत राजकुवराची अुजव्या हाताची बोटें असमान लांबीचीं, पण डाव्या हाताची समान दिसत. हा विशेष 'ठगा'च्या बोटातही तंतोतंत आढळतो. असें छायाचित्रणतज्ज्ञ (फोटोग्रॅफिक स्पेशियालिस्ट) मि. विटरटर्न ह्यांनी दाखविलें आणि रामेंद्र नारायण ते हेच असें मत दिलें.

याहूनही आश्चर्यकारक पुरावा म्हणजे हा की, कै. राजेंद्र नारायण, त्यांची बहीण कृपामयी, त्यांची मुलगी ज्योतिर्मयी आणि त्याचा वडील नि धाकटा मुलगा याच्या सर्वांच्या घोट्यावरील कातडें जाड, रखु आणि सुरकुतलेलें असे. कर्नल मॅकजिल ध्याअिस्ट ह्यांनी सांगितलें की, हा आनुवंशिक रोग असतो. आणि परीक्षेत त्या कुटुंबातील ह्या रोगाचा ठसा 'ठग' (तोतया) म्हणून म्हटल्या जाणाऱ्या त्या मधल्या मुलाच्या, वादी रामेंद्र नारायण याच्याही घोट्यावर जसाचा तसाच अुमटलेला आहे! अर्थात् तेच रामेंद्र नारायण खरे राजकुवर होत!

सान्या न्यायालयास चकित करून सोडणारा आणखी अेक पुरावा पुढे आला, विभावतीनेच 'मृत' राजकुवराचीं काही छायाचित्रें पुराव्यात दाखल केली होतीं. ती बारकाअीने पाहता, प्रसिद्ध छायाचित्रक (फोटोग्राफर) श्रीयुत गांगोली ह्यांनी न्यायाधीशास दाखविलें की, त्या प्रत्येक छायाचित्रात डोळ्याच्या पापणीखाली अेक प्रकाशबिंदु आढळतो. हा प्रकाशबिंदु येण्याचे अेकच कारण असे असले पाहिजे की, त्या ठिकाणी राजकुवराच्या तोंडावर काहीतरी शारीरिक वैशिष्ट्य असलें पाहिजे. त्याप्रमाणे वादी रामेंद्र नारायणाची मुद्रा न्याहाळता अगदी त्याच ठिकाणी पापणी-

पाशी अेका तिळासारखी अेक मासाची पुटकुळी नित्याची अुठलेली आढळली ! प्रत्येक छायाचित्रणतज्ञाने (फोटोस्पेशियालिस्ट) हा पुरावा अखडनीय असाच मानला

बारा वर्षे अेखाद्या प्रबल मानसिक धक्क्यासरशी, पूर्वस्मृति सवस्वी विलोपणे आणि नतर ती हळुहळू पुन्हा जागणे हे शक्य नाही, असं काही मानसविज्ञात्यानी सांगितलं, तर अुलट काही प्रख्यात मानसविज्ञानतज्ज्ञानी ती घटना शक्य आहे असं शपथेवर प्रतिपादिलं ! !

अशा अत्यंत किचकट नि अत्यत विस्तृत नि विविध पुराव्याची छाननी होअून शेवटी जज्ज श्री पन्नालालजी यानी २४ ऑगस्ट १९३६ ला या अभूतपूर्व खटल्याचा निकाल दिला की, वादी हे ठग नसून, तोतया नसून राजकुवर रामद्र नारायण ते हेच होत ! !

या निकालासरशी भोवाल सस्थानच्या प्रजाजनामध्ये तुमुल हर्षाची अेकच लाट अुसळली ! घरोघर दीपोत्सव झाला ! शेकडो वृद्ध तरुण स्त्री-पुरुषाच्या डोळ्यातून घरोघरी आनदाच्या अश्रुधारा वाहू लागल्या !

न्यायाधीशाने विभावतीविषयी लिहिले की, द्रव्यलोभाने आणि वैधव्याच्या स्थितीत सव अुत्पन्नावर तिचीच अबाधित चाललेली सत्ता सोडण्याच तिच्या जिवावर येत असल्यामुळेच या स्त्रीने जाणूनबुजून आपला पति हा ठग आहे, तोतया आहे असा कांगावा केला या दुष्कर्मास तिला तिच्या कुटिल भावानेच अुद्युक्त केले असून त्याला साहाय्यक असणाऱ्या चांडाळचौकडीनेच हा अधम कट बारा वर्षांपूर्वीच प्रथमपासून रचला होता त्या भावाच्या हातीच नि घरीच विभावतीदेवी असल्याने त्याला नि त्याच्या साग्यासोग्याना तिच्या अुत्पन्नावर जे राजवैभव भोगता येअी, ते सोडण्याचे त्याच्या जिवावर आले आणि म्हणूनच त्यानी हा सारा अधम अुपद्व्याप केला

या सहा वर्षे चाललेल्या खटल्याचा लक्षावधि रुपयाचा व्यय राजकुवराच्या भगिनीनेच प्रमुखत केला होता पण आता जिच्या पक्षाचा जय झाल्याने आणि सस्थानची सत्ता राजकुवर रामद्र नारायण याच्याच हाती आल्याने तिला त्या व्ययाचे वा कष्टाचे झालेले दु:खच आनदप्रद होत आहे ! क्लेश फलेन हि पुनर्नवता विधत्ते ! !'

ती सस्थानची राज्यलक्ष्मीच नव्हे तर ती पतीस मेला—चितेवर जळला—म्हणून टरवू पाहणारी विभावतीही त्याच पतीच्या हाती आज पुन्हा निदान नैर्बंधिक अधिकारात तरी पत्नी म्हणून सोपविली गेली आहे ! ! ! किती बिजोड जोड हा ! !

—१९३६

✦ ✦ ✦

# १२. अंगरख्याला माणसें-बेतणारा शिंपी

माणसाच्या अंगास जुळेल असा अंगरखा बेतणारे शिंपी आपणा सर्वांच्या चांगल्या परिचयाचे आहेतच. माणूस अुंच असेल तर अंगरखा लांब होईल जितकें कापड फाडून त्या माणसाच्या छातीचा घेर जितका रुंद असेल तितका अंगरख्याचाही घेर रुंद धरून आणि ज्या माणसाला अंगरखा शिवायचा असेल त्याच्या हाताच्या लांबीप्रमाणे अंगरख्याच्या बाह्या लांब वा आखूड अशा कापून, अेकंदरीत त्या माणसाला ठीकठाक बसेल असा अंगरखा शिंपी बेततात; मनुष्याच्या आकाराप्रमाणे अंगरखा मोठा वा लहान कापतात.

पण अंगाला जुळेल असा अंगरखा न कापता अंगरख्याला जुळेल असें अंगच कापणारा शिंपी तुम्ही पाहिला आहात काय? त्याच्या अंगरख्याचा आकार ठरलेला आहे. तो अंगरख्याचा आकार काही कधीही बदलणारा नाही, अितका घोळ, अितकी लांब बाही, अितकी मोठी मान. त्या ठरलेल्या आकारापेक्षा निराळा अणुमात्र अधिक मोठा किंवा अधिक लहान असा अंगरखा शिवणे वा घालणें हें त्या जातीच्या शिंप्यांच्या शास्त्रात पाप समजलें जातें. प्रत्येक माणसानें अंगरखा म्हटला की, तसाच घातला पाहिजे. अगदी शिवणाचे टाके देखील ठरलेले. ह्या नियमामुळे त्या जातीच्या शिंप्याच्या दुकानी कोणीही मनुष्य गेला की, ते शिंपी त्या मनुष्याच्या *अंगाप्रमाणे अंगरख्याचे कापड फाडीत नाहीत*, तर त्यांच्या त्या ठराविक अंगरख्याप्रमाणे त्या माणसाचे अंग बेतून घेतात. त्या अंगरख्यापेक्षा माणूस लहान असेल तर त्यानें अंगरख्याअितके मोठे होओीतों अुघडे फिरावें किंवा अंग लहान असलें तरी तो अंगरख्याचा लफालोळ तसाच, जसा जमेल तसा, अंगावर बाळगावा अंगरखा अंगात घालण्याच्या ठायी अंगच अंगरख्यात घालावें. बरें, पण जर अंगरखा अंगास लहान होओील असा मनुष्य आला तर? तरी देखील शिंप्याची ही जात अंगरख्याच्या त्या ठराविक प्रमाणापेक्षा अधिक मोठ्या आकाराचा अंगरखा बेतणार नाही, ठराविक प्रमाणाहून जास्त कापड कापणार नाही, तर अंगरख्यास अंग बेतून घेओील. अंगरख्याची बाही शास्त्राप्रमाणे जितकी लांब असावी म्हणून त्याचा पूर्वापार जातिनियम आहे त्या बाहीहून जास्त लांबीचा

देणे म्हणजे हे शिंपी अेक अधार्मिक कृत्य समजतात अेक ठराविक प्रकारच्या कापडाचा तो ठराविक साच्याचा अगरखा घालून माणसाने अत्यंत थंड अशा अुत्तरध्रुवावर असो किंवा अत्यंत अुष्ण अशा सहारा वाळवंटाच्या आसपासचे प्रदेशात असो, राहिले पाहिजे जर तं त्याग करवत नसेल तर त्याहूनही अुत्तम मार्ग म्हणजे त्या कापडाचा अगरखाच वापरणारे धार्मिक लोक ज्या गावात वसत आले त्या गावाच्या बाहेर काही झाले तरी जाअूच नये गावात भीक मागण्याचा प्रसंग आला आणि बाहेर कुठे जरी सोन्याच्या खाणीत फुकट सोनं घुवायची सोय असली तरी त्याने त्या सोयीसाठी आपल्या गावची अटक ओलांडता कामा नये कारण न जाणो तिकडे तो अगरखा बदलण्याचा मोह पडायचा !

ह्या शिंपीधर्माचा आणखी अेक महत्त्वाचा सिद्धान्त आहे तो हा की, मनुष्य पापी की पुण्यवान, थोर की हलकट, अुच्च की नीच हे त्या मनुष्याच्या अंगच्या गावगुणावरून ठरविणे पाखंड आहे तर तो मनुष्य ह्या ठराविक प्रकारच्या लांबी-रुंदीचा हा धार्मिक अगरखा घालता की आपल्या अंगास येअील नि बदलत्या वायुमानास जुळेल असे भिन्न आकारप्रकाराचे अगरखे बदलीत राहतो ह्यावरून तो धार्मिक वा अधार्मिक, सात्त्विक वा तामसी, साधु वा ठग आहे ते ठरविले पाहिजे जर तो अगरखे अंगास बदलत तर तो हलकट असलाच पाहिजे, जर तो आपले अंग त्या शास्त्रीय अगरख्यास बेतील तरच तो थोर होय, साधु होय, धार्मिक होय!

अशा या शिंपीधर्माच्या शिंपीमंडळीस त्यांच्या अगरख्यास आपली अंगे बेतू देणारी माणसं तरी, गिऱ्हाअिक तरी कसची मिळणार? असं जर आपणास वाटल तर ती चूक ठरेल कारण ह्या ठराविक अगरख्यावाचून दुसऱ्या प्रकारच्या अगरख्यास मनुष्य केवळ आपल्या अंगच्या लांबीरुंदीच्या वा वायुमानाच्या सार्‍या गैरसोयींच्या बदलत्या आवश्यकतेप्रमाणे वापरील तो माणूस घोर अशा नरकात 'सावय' पडेल असा शाप देणारी अेक पोथी ह्या शिंपी जातीच्यापाशी आहे आणि ती पोथी कोण्या मनुष्याने लिहिलेली नसून प्रत्यक्ष अीश्वराने स्वत च्या हातूने स्वत चा बोरू तासून त्या स्वत च्या लखणाने स्वत लिहिलेली आहे अशी मुसलमानांची निष्ठा आहे म्हणजे हिंदूंच्या वेदाला ज्या अर्थी हिंदू 'श्रुति' म्हणतात त्याच अर्थी 'कुराण' हा मुसल्मानांचा श्रुति आहे वास्तवच त्यात दिलेले बारीक सारीक आचारदेखील त्रिकालाबाधित म्हणून मानले जाअू लागले अितकच नव्हे तर महमद पैगंबराच्या मृत्यूनंतर त्याचा घालावयाचा जो अगरखा असे तो देखील त्याच्या राजदंडाप्रमाणेच मुसलमानी धर्मपीठाच्या आणि राज-पीठाच्या अध्यक्षत्वाचं अेक प्रतीक—न बदलता येणारे दिव्य चिन्ह—समजले गेले महमदमहाशयाच्या मृत्यूनंतर त्याच्या गादीचा धनी आणि मुसलमानांचा सर्वोच्च धर्माध्यक्ष म्हणून जो झाला त्यास खलिफा म्हणत आणि खलिफासच काय तो

महमद पैगंबराचा पवित्र अंगरखा घालण्याचा अधिकार असे खलिफाच्या पदवी-साठी अनेक अिच्छुक अुभे राहत, लढत, परस्पराच्या हजारो सैनिकांच्या कत्तली करीत, मुसलमान मुसलमानाच्या रक्ताचे या यादवीत पाअूस पाडीत आणि अेकेका वेळी निरनिराळ्या भागात तीन तीन निरनिराळे प्रबळ सेनापति स्वतःस खरा खलिफा तो मीच म्हणून म्हणवीत राज्य करीत त्यात बगदादच्या ओमेयेड खलिफाचा वंश मोठा प्रबळ निघाला. महमदाचा राजदंड, धर्मदंड नि हा पवित्र अंगरखा त्याच्याच हाती असे

ह्या बगदादच्या खलिफात काही खलिफा मोठे प्रबळ आणि साधुशील असे निपजले ते महमदाचा हा पवित्र अंगरखा धर्मोपदेशाच्या वेळी घालीत

जो खलिफापदास योग्य ठरेल किंवा ते पद छिनावून घेण्याअितका प्रबळ ठरेल त्याला खलिफा होताच अंगरखा घालण्याला अधिकार येअी पण भाबड्या धर्मभावनेची शेवटी जी विकृति होत जाते तीच मनुष्यस्वभावानुसार मुसलमानातही होत जाअून जो पूज्य खलिफा असेल त्याच्या अंगात हा पवित्र अंगरखा असतो हें पाहता पाहता हा पवित्र अंगरखा ज्याच्या अंगात असतो तो खलिफासारखा पूज्य होय अशी वृत्ति बोकाळली !

आपल्या अिकडे पूज्य सन्यासी असता, तो भगवी कफनी घालतो, हें पाहता पाहता ज्याच्या अंगावर भगवी कफनी दिसते तो सन्याशासारखाच सहजगत्या पूज्य वाटू लागला आणि भगवी कफनी पाहिली की सन्यासी म्हणून चोरानाही सन्मान नि भिक्षा मिळविणे अगदी सोपे होअून बसले तशीच हीही गोष्ट

अशा बुद्धिहीन धर्मभोळेपणाची शेवटी त्याच बगदादच्या मुसलमानी राजधानीत अितकी पराकाष्ठा झाली की, खलिफाचा हा अंगरखाच जवळजवळ खलिफा होअून बसला ! खलिफापदाला योग्य ते गुण त्या व्यक्तीत असोत वा नसोत, तिच्या अंगावर हा पवित्र अंगरखा आहे ना ? असल्यास तो खलिफा ! दुबळ्या खुळ्या अनुयायांचे पुढारीही दुबळे खुळे असेच निपजतात ओमेयेड खलिफांचीही तशीच अवनति झाली खलिफापदावर विक्षिप्त व्यक्ति येअू लागल्या पण बाह्य आचाराच्या पोकळ मुखवट्यालाच जिथे मुख म्हणून समजले जाअू लागले तिथे मुखवटा तेवढा सांभाळला का पुरे होअी असल्या पहिल्या काळी या पवित्र अंगरख्याने मोठ्या गमती केल्या ! अुदाहरणार्थ, या ओमेयेड वंशातील या पहिल्या काळचा खलिफा दुसरा वालिद यांचीच गोष्ट पहा ! /

ह्या खलिफा वालिदला, मुसलमानी साम्राज्याचा सम्राट नि अवघ्या जगाचा धर्माध्यक्ष, 'शंकराचार्य' ह्या नात्याने राजधानीतील भव्य मशिदीत प्रार्थना घालावयाची असे, त्या नमाजासाठी जायचे असता अेका वेळी त्याला आळस आला म्हणून त्याने आपल्या अेका सुंदर रमणीला आपल्या खलिफापदाचे मुख्य

प्रतीक असा तो 'पवित्र' अगरखा घालून प्रार्थनेचे पौरोहित्य करण्यास धाडली[1]।
अवघ्या मुसलमानी साम्राज्याच्या वतीने मुसल्मानी धर्माचा खलिफा म्हणून तिने प्रार्थना चालविली आणि खलिफाच्या त्या पवित्र वेषाचा तो अधिकार खलिफा-प्रमाणेच समजून त्या रमणीची ती प्रार्थना खलिफाच्या प्रार्थनाप्रमाणेच त्या धर्मनिष्ठ अनुयायांनी अनुवादिली ! क्वचित कोणीही नसोही असो—तो मुख्य खलिफा नव्हे, मुख्य खलिफा म्हणजे तो खिलाफतीचा पवित्र अगरखा !

पुढे अनेक अगाढांनी होत होत अरबी मुसलमानांची सत्ता आपसातील हाणा-मारीत अितकी दुर्बळ झाली की, बगदादच्या खलिफाच्या वाड्यात पगारी तुर्क मूळचे मुसलमानी धर्माचे अनुयायी नसून ते आपल्या शौर्याच्या बळावर ह्या मुसल-मानांना खिलाफतीचे सत्तेस दाबून टाकीत आले होते खलिफा त्याच्या हातातले बाहुले झाले कोणास गादीवर बसवावे, कोणास काढावे ते ह्या भाडोत्री तुर्की सैन्याचे सरदार ठरवीत । अशा अेका प्रबळ तुर्क सेनापतीचे प्राबल्य असता आबासाअीड खलिफा वासिक हा वारला मरणाच्या आधी आपला वारस सांगण्याचा अधिकार खलिफाकडे असे त्याप्रमाणे त्या खलिफा वासिकने मरणाच्या आधी सांगितले की, 'माझ्या मागे माझा मुलगा खलिफा व्हावा'

ती रीतच होती मुसलमानी समाजाने खलिफाची आज्ञा शिरोधार्य करून म्हटले, 'तो मुलच खलिफा करावयाच ।'

पण त त्या तुर्क सेनापतीस अिष्ट नव्हते त्याला त्याच्या पुठ्यातील अेका खलिफावंशीयास खलिफा बनवावयाचे होते म खर कारण न सांगता तो अिनक्च म्हणाला, 'छट खलिफाचा मुलगा ते मूल खलिफा होण्यास अयोग्य आहे ।।'

'का अयोग्य ?'

खलिफाच्या आज्ञेला लाथाडून दुसरा मनुष्य खलिफा करण्यास त्या मुसल-मानाच्या धर्मभावनेस पटेल असे काहीतरी कारण सांगणे भाग होते तुर्क सेना-पतीस आपल्या मनातले कारण सांगता येअीना कारण ते धार्मिक कारण—'सनातनी' कारण नव्हते वरतो मुलगा लहान आहे म्हणून खलिफापदास शोभेसा दुसरा कोणी पराक्रमी वा साधुशील पुरुष हवा हे कारणहा अप्रस्तुत होते कारण पराक्रमाच्या दृष्टीने क्वचित योग्य की अयोग्य हा प्रश्न त्या मुसलमानी बहुजनाचा मुळी नव्हताच ते बहुतेक त्या धर्मभोळ्या सनातनी शिपी जात घेच लोक ! क्वचित कसी असो—तो योग्यतेचा ठराविक जुनाट मुखवटा तिने घातलेला आहे ना ? येवढाच त्याचाही प्रश्न असणार ! खलिफा सांगेल तो त्याचा अुत्तराधिकारी हा धर्मदंडक त्याप्रमाणे तो मुलगाच खलिफा व्हावयास योग्य! मग तो अयोग्य का म्हणावा ?

---

१ हिस्टरी आफ सारासन्स—अमीरअल्ली पृ १०६

केवळ धर्मभोळेपणाच्याच आक्षेपाची अडचण असल्याने त्या धूर्त तुर्क सेनापतीने धर्मभोळेपणालाच तंतोतंत पटेल असें, त्या मुलाची अयोग्यता निर्विवादपणे सिद्ध करणारें कारण सांगितलें.

तो तुर्क सेनापति म्हणाला, ' जरी खलिफाने मरताना त्या आपल्या मुलास खलिफा करण्यास सांगितलें असलें तरी तो त्या खलिफापदास अयोग्य आहे. कारण, तो अितका लहान आहे की, खलिफा होण्यास जो अेक मुख्य संस्कार करावा लागतो तोच त्यास करता येणार नाही. खलिफास जो अवश्यमेव घातलाच पाहिजे तो पवित्र अंगरखाच मुळी त्या मुलाच्या अंगास येत नाही. तो अंगरखा नि तो धर्मदंड त्यास झेपणार नाही, फार मोठा होअील. यास्तव तो मुलगा खलिफापदास अयोग्य. तो अंगरखा ज्याच्या अंगास होअील नि तो धर्मदंड ज्यास झेपेल असा माणूस खलिफा हवा ! '

' सनातनी ' जातीच्या शिंपीशास्त्र्यास तो शास्त्रनिर्णय अगदी पटून होता. खलिफापदास शोभेल असा योग्य पुरुष कोण ! खलिफापदाचा तो जुनाट, पवित्र अंगरखा ज्याच्या अंगास होअील तो ! त्याप्रमाणे त्यांनी तो अंगरखा ज्याच्या अंगास होअील असा खलिफा नेमला ! अंगरख्यास माणसें बेतणारा शिंपी असावा तर असा !

—१९३४

\+ + +

# समाजचित्रें

## १. बाळंतीण

तो गाव दहाबारा हजार हिंदु वस्तीचा. अेक पडवीसारखी धर्मशाळाही बोर्डाने बांधलेली गावच्या मध्यवस्तीपुढील वाटेच्या टोकास होती. आज त्या धर्मशाळेपाशी पाचपंचवीस लोक जमून हें करताहेत तरी काय, असे वाटेने जाताना स्वतःशी पुटपुटत, श्री. गोदास सुखे तिकडे वळले. पहातात तो अेक मरतुकडी, घाटचुकार नि वीण संपलेली अेक जख्खड गाय तिथे मटकन् बसलेली आहे आणि जमलेले ते दहापांच लोक अेकमेकास विचारीत आहेत, 'मारलें? कोठे? कुणी? गायीला छडी मारली?'

गायीला छडी मारली हे शब्द अैकताच गोदास सुखे त्या लोकांस हाताने ढकलीत अेकदम गायीजवळ गेले. त्याना पाहताच अेका मुलाने सांगितलें की, 'ही जख्खड गाय दोन चार दिवस सध्याकाळी येथे बसलेली असते. शेजारच्या अेका काम करणाऱ्या मनुष्याने वाटेत आली म्हणून तिला माझ्या समक्ष छडी मारली. मी ओरडलो नाही—नाहीतर तो मला मारता. पण तिला वाटेतून उठवून तो गेला, तेव्हा मी या दोघाचौघा जात्यायेत्यांना तें सांगितले. हें पहा अिथे मारलें!' असें म्हणून त्यानें गायीच्या पाठीकडे बोट दाखविलें. पण तिथे वळवीळ काही दिसत नव्हता. गोदास सुखे अगदी मोठमोठ्याने बोलण्याच्या आवेशात येअून मुलास फटकारू लागले; 'चूप भिन्या! गोमातेला छडीने मारणाऱ्या त्या माणसाचा तू शिरच्छेद का केला नाहीस? गाय वाटेत येअून बसली होती. तर माणसाने वाट

घातलें. नि आपलें प्रचारकार्य प्रस्ताविण्यास हें प्रत्यक्ष अुदाहरण त्या गावी चांगलेंच अुपयोगी पडेल असीही अटकळ त्यांनी बांधली. लगेच त्या गायीस अुठवून त्यांनी अेक दावें तिच्या गळ्यात बांधलें नि तें धरून अेक गोसेवागीत म्हणत त्या घोळक्यासह ते रस्त्यानें चालले.

जें त्यांचें मूळचें नांव गोपाळराव, तें त्या गोरक्षणसंस्थेत ते होते तोंवर वापरीत असत. पण त्या संस्थेतून ते जेव्हा फुटून निघाले तेव्हा त्या संस्थेविषयी त्यांनी जे आक्षेप आणले त्यात हाही अेक आक्षेप होता की, कोणच्याही हिंदु संस्थेने गोरक्षण संस्था म्हणविणें म्हणजे हिंदुधर्मास कलंक लावणें होय. कारण गाय ही हिंदूंची देवता. तिचें पूजन, सेवन, भजन करणें हें हिंदूचें कर्तव्य ! पण स्वतःस गोरक्षणकर्ता म्हणवणें म्हणजे देवतेचें रक्षण मनुष्य करतो, असा विपरीत भ प्रकटवून त्या देवतेची थोरवी नि शक्ति मनुष्याहूनही कमी लेखणे हो त्या देवतेची ती निंदा होय ! गाय ही देवता, मनुष्य तिचें रक्षण करणारा, ति पालन करणारा, तिच्याहून कोणी महादेव आहे की काय? मनुष्याने 'मी गायी सेवा करतो' असें म्हणणें शोभेल; 'गायीचें रक्षण करतो' असें म्हणणें म्हणजे दे दुर्बळ नि भक्त नवळ असें म्हणण्यासारखें होतें. यासाठी साऱ्या गोविषयक हि संस्थांनी गोरक्षणसंस्था हें नाव टाकून गोपूजक वा गोसेवक संस्था असें म्हणा आणि प्रत्येक कार्यकर्त्याने स्वतःस गोदास, गोभक्त, गोरज अित्यादि गायीच थोरवी व्यक्तविणारी नावें घ्यावी. गोपाळ हे नांव श्रीकृष्णास शोभलें, कारण त गोदेवतेहूनही श्रेष्ठ असा जो जगाचा पालक त्या परमेश्वराचाच अवतार होत पण मनुष्याने स्वतःस गोदेवीचे, या 'विश्वजननी' चे पालक वा रक्षक म्हणवून घे म्हणजे काय ? असें सावेश प्रतिपादीत गोपाळराव सुखे यानी भरसभेत आप

देखील मिळाला — गाअीहून गाय झालेल्या मलातर मिळेलच मिळेल ! अशी योग्य अटकळ बाधून त्या गाअीची मिरवणूक चालली असता लटपटत्या पायानी ती आसन्नप्रसवा स्त्री, बुवा थोड रस्त्याच्या कडेस झालेल पाहताच त्याच्यापुढे पदर पसरून अुभी राहिली

'मी चार दिवसाची भुकी ! बाळतपणास टेकल आहे ! मला दोन पैसे—!'

तिचे त वाक्य पुरे होण्याच्या आधीच बुवा चवताळले

'भिकारडे ह्या गोमातेच्या भुकेलाच पुरेस पैसे जमत नाहीत तिथे तू गाणमासारखे माणूस—जा काबाडकष्ट कर नि पोट भर ! गाअीच्या ताडचा घास हिसडून स्वत च्या पोटाची खळगी भरण्यास तुला लाज वाटत नाही ? माणुसकी आहे, की नाही तुला ? अहो आपल्या देशाचे कोट्यवधि रुपये ह्या अैदी भिकाऱ्यास पोसण्यास मातीत मिळतात आणि या बिचाऱ्या जख्खड गोमाता भुकेने तडफडत राहतात '

अितक्यात बुवाच्या कानाशी अेकाने त्या स्त्रीच्या पोटाकडे बोट दाखवून नगाळी केली त्यासरशी सात्त्विक सतापाने अुसळून बुवा ओरडले,

'हसता तिला ! असे काय ? काळतोंडी !' असे हातवारे करीत लोक गात सलेल्या पदाच्या पालुपदाची वेळ आलेली पाहून बुवानी आपल्या अुच व घोगऱ्या तवाजाचीही त्या पालुपदात भर टाकली

'गाअीस द्याव भिक्षा । हा हिंदुधर्म रक्षा ॥'

दोघाचौघानी तेवढ्यात त्या बाअीची चेष्टाही चालविली पण अितक्यात रामभाअू वद्य तेथे आल आणि लाजाम तस न करण्याविषयी सागून बाअीस आश्वासीत विचारू लागले, 'तू कुठली बाअी ! सासरमाहेरच कोणी नाही का तुला ? रामभाअू तिच्याशी हे विचारतात न विचारतात ताच त्याच्या दहापाच स्नेह्यानी त्याचा हात ओढत अेकच गोगाट केला, 'हा ! हा ! रामभाअू तिच्याशी काय बोलता ? तुमच्यासारख्या प्रतिष्ठित माणसावर नसत किटाळ यअील पहे

'पण मग घरच्या मुलालेकराना तांदूळ कशाचे नेऊ दादा ! खातील काय ती आज ?'

'आणि ही गोमाता काय खाओल ! गोदेवींच्या नावे लेकराना उपास करू देत आजची रात्र ! स्वर्गात तुला कामधेनु मिळेल !' बुवानी समाधान केले

'बघता काय ? घ्या तो भारा तिचा !' असे म्हणत दोघे तिचे भारा ओढू लागले तेव्हा तिला आपला बचाव करण्याची शेवटची युक्ति सुचून ती म्हणाली, 'हा, हा ! मी म्हारीण ! विटाळाल ! दूर व्हा !'

तो तिच्या अटकळीचा परिणाम अगदी उलट झाला झोंबून भारा ओढणारे ते लोक चेकाळले आणि तिच्या तोंडात देऊन ओरडले, 'तुझी पहिल्याने दातखीळ बसली होती काय ? चांडाळणी ! विटाळ झाला ना आम्हाला !'

तिला सोडविण्यास रामभाऊ धावत आले समाजास गाजावून म्हणाले, 'त्या गायीसारख्या अेका पशूला मघाचे कुरवाळता आहा—आणि महार माणूस असता, त्याला विटाळ मानता ? हा काय भूतदया की धर्म ?'

हे अैकताच बुवा चिडले, 'अहो दोडम्हाणे, गायीला पशु म्हणताना तुमची जिव्हा झडत कशी नाही ? गाय पशु असली तरी देव विश्वव्यापी, पशूत नाही

पण बुद्धिवादी (Rationalist) तरुण वकील आजीच्या भिडेन त्याने गोदास-बुवाना घरीच अुतरविले होते दाराशी मिरवणूक येताच बुवानी वकिलास आज्ञा सोडली की, त्या गायीला त्यानी घरी पाळावी वकील हसून म्हणाले, 'अहो, आमच्या घरास गोठा नाही, अंगण नाही, तुम्हा गोसेवकाना बगल्यात अुतरविले तेथेच गायीला बाधतो पाहिजे तर त्या गायीला थाड गवत घेअून देतो--त्या मोकळ्या मैदानातील झाडाला बाधीत जा हवं तर!

अितक्यात त्याची आजी बाहेर आली बुवानी कथा सागताच मुलावर रागावली नि म्हणाली, 'घराशी चालत आलेली लक्ष्मी विन्मुख दवडायची? आजचा रात्र तरी घरीच बाधायची तिला! या ओसरीवर --अगदी घरात बाधा. अुचला त्या बैठकी! तुझी वकिली बगल्यात, खाली सत्ता माझी' आजीच्या आज्ञेसरशी वकील हसून चूप अुभे राहिले

गायीला वर आणला, गाद्या, बैठकी, खुर्च्या काढून ओटीचा गोठा केला, आजीनी घरातून ताम्हनात आरती आणली त्या मळमातीने बरबटलेल्या गायीस हळदकुंकू लावून, फुले वाहून ओवाळून संतापून वकिलास म्हणाल्या, 'तेतीस कोटी देवाची पूजा अेकनच करायची तर बाळ गायीची पूजा करावी!'

बुवा ठरीव गोसेवक ठेक्यात म्हणाले, 'सर्वाभूती परमेश्वर आहे! ही आमच्या हिंदुधर्माची अत्युदार शिकवण अंगी बाणण्यासाठीच पाहिलीत ना गोपूजा हेच एक अुत्कृष्ट साधन आहे ते? पशु नि माणूस ह्याचे आत्मैक्य! भूतदयेची परिसीमा!'

संबंध त्या बाओशी ? ' असे म्हणून रामभाऊची पाठ फिरताच कुटाळकी करण्यास सोडू नये !

रामभाऊ स्वतः भाड्याच्या घरी राहत. त्यांनी त्या बाटलेल्या बाओीस कोणाच्यातरी घरी आणण्याचा योजलेला बेत औकताच आगाअूच सावध राहावे म्हणून घरधन्याने सांगितले, ' आधीच तुम्ही महारास शिवून येअून घरात विटाळ घालविता म्हणून कांगावळया होतात आता मुसलमानाचे खाल्लेल्या त्या भटक्या बाओीची व्याद जर आणणार असाल, तर घर सोडून चालते व्हावे लागेल बाहेर जाय नगा नाच घालायचा तो घाला, आम्हास अुपद्रव नको ! '

रामभाअू म्हणाले, ' मी आणीत नाही त्या बाओीस वळेवळे तुमच्या घरी पण ती गाय पाळावयास मागत होता तीही भटकीच नव्हती का ? मुसलमानाच्या हातचे तीही खाओीच ना ? '

' पण तो पशु होता, पशुधर्म तो '

' हाय हाय ! तर मग हे समजत असूनही त्या पशूस गोठ्यात ठेवता, सोवळ्याने पूजता, तिचे गोमूत्र पिअून तिला पक्वानाचे गोग्रास स्वहस्ते घालता ! मग ही हिंदु बाओी तर माणूस, मूळ मराठ्याचे, माणसाचा जीव तो, त्याला मुसलमानाच्या हातून सोडवून हिंदूने घरी आणून दोन घास — ! ' रामभाअूंनी वाक्य पुरे करण्याच्या आधीच घरधन्यांनी त्याचे तोंड बंद केले

' पूर्वीचे ऋषि गाढव नि तुम्ही शहाणे ! कुठे ती कुल्टा नि ते बिनवारशी कारटे, कुठे ते महारडे आणि कुठे ती विश्वजननी पवित्र गायत्री गोमाता ! होअू द्या मुसलमान तिला ! अशा कुल्टा मुसलमानात गेलेल्याच बऱ्या ! '

' अशाच हिंदूतून हिसटलेल्या स्त्रियांच्या पोटी हिंदूचे कट्टर शत्रु जन्मले ! आणि हे मूल ? मुसलमान होताच अठरा वर्षांच्या आत ह्याच गायत्रीस मारणारा

देखील पळवून आणता येओल, याचा कट करीत होत्या आपल्या गोषातदेखील वेळी तिला लपवून ठेवू म्हणून आपण होऊन त्या कटास पाठिंबीत होत्या.

तिकडे त्या धर्मशाळेत तो मुसलमान भगी, रामभाअूनी अन्न दिले त्याची गुणगुण कळली म्हणून लगोलग सध्याकाळ होते न होते तो तिथे आला वाओीने माहिती सागताच ते पोर हिंमकू लागला. वाओी ओरडू लागली अेकदोन करता-करता वीसपचवीस हिंदु तिथे जमले, पण दूर! त्या मुसलमानाने 'काफरास' काफराच्या धर्मास शिव्याची लाखोली वाहिली! त्या वाओीस मूल देत नाहीस तर टाक माझी चीजवस्त ' म्हणून दरडावले तिचे चिध्याचे गाठोडे नि मुलावरचा लुगड्याचा तुकडादेखील त्याने हिसकला मूल उघडेवाघडे घेअून ती वाओी कोपऱ्यात स्फुदून स्फुदून रडत हिंदूकडे बघत होती की कुणी पुढे यावे! पण कुणी पुढे होओीना! मुसलमानाने ते कपडे घेतले, धर्मशाळेसमोर भर वाटेवर त्यास आग लावली आणि कोण तुला कपडा नी खाणे देतो ते बघून घेओीन! मी रात्री पुन्हा येओीन! त्याला नि तुला ठार करीन! ' अशा धमक्या देत त्या होळीपाशी ठाण माडून राहिला!

त्या दाटीत ते गोदामबुवाही थोडा वेळ अुभे होते त्याच धर्मशाळेसमोर मटकन् बसलेल्या गायीच्या पाठीवर अेक छडी कुणी मारली ती अैकून त्याचे हृदय पिळवटले होते, पण ह्या वाओीस तो दुष्ट छळताना पाहून त्यानी हू का चू न करता 'असले प्रकार आपल्यासारख्या सभ्याच्या दृष्टिक्षेपात घेण्याच्या योग्यतेचे नव्हत. अशा अैटीने ते लगेच वाटेने पुढे गेले सकटातून सोडविण्यात ती कुणी जख्खड गाय थोडीच होती! ती अेक अतिवाह्य हिंदु बाळत वाओी, नि तीनचार दिवसाचे बिनवारशी मूल!

त्या अेका मुसलमानास जाणीव होती की, तो अेकटा तिथे असला तरी मुसल्मान तितका त्याच्या मागे तिथे असलेल्या प्रत्येक हिंदूसही तीच जाणीव होती. आणखीही अेक जाणीव होती की, आपल्यामागे हिंदुसमाज असा नाहीच, आपण खरोखरच अेकअेकटे आहो! तेवढ्यात बितक मात्र कोणी साहस केले, की धावत जाअून रामभाअूस ती बातमी दिली, रामभाअूनी पोलिसास दिली आणि अेक पोलिस त्या वाटेकडे येताना दुरून दिसताच त्या भगी मियासाहेबाचा धर्मोन्माद अुतरून ते रोखून पाय काढते झाले!

तरीही ह्या वाओीस त्या धर्मशाळेत अेक मिनिटभरही ठेवणे धोक्याचे आहे असे रामभाअूना वाटले पण तिला नेणार कुठे? गावात कोणी गोठामुद्धा देओीना! म्हणून त्यानी रत्नागिरी हिंदुसभेस तार केली

पण रात्री मध्यतरी हलवून तिला लगेच कुठे ठेवायची? ते तरुण वकील रामभाअूचे सहकारी त्यानाच शेवटी रामभाअूनी अगदी गळ घातली, त्याची आओी, फिनी दयाळू देवळसी गोभक्त वृद्ध आओी! त्या दोन गायीची देखील त्या

मिशनविशनच्या जाळ्यात तर ती फसणार नाही ना ? ते तिला पाहण्यास जाण्याचें मनात आणीत, पण त्यांना देखील तें साहस करण्याजितकी धमक मनात येण्यास तीन दिवस लागले. शेवटी समाज काय घाटेल तें म्हणो, तिची चौकशी अेकदा करायचीच, असें निर्धारून दोन तरुण विद्यार्थी बरोबर घेअून ते भरदिवसा अेका दुपारी धर्मशाळेत गेले. बाअीपाशी थोडें शिळेपाके अन्न होतें. त्यानी गोड बोलून तिची माहिती विचारली; तों त्यांना कळलें की. तिला जो अेकच मनुष्य रात्री येअून भेटतो, थोडें अन्न देतो, अेकदोन फाटकी वस्त्रेंही ज्याने दिली, तो दुसरा कोणी नसून होता त्या गावचा अेक मुसलमान भगी !

तो काय तिची दया येअून भूतदयेसाठी तें दान देअी ? काही अेक प्रतिमूल्य घेतल्यावाचून तो तें धर्मकृत्य करी ? भुकेल्याला अन्न देणे हें धर्मकृत्य तो मानी म्हणून तो अन्न देत नसे, तर काफरास बाटविणें धर्मकृत्य होतें अशी त्याची समजूत असल्याने तो तें अन्न त्या बाअीस देअी नि सांगे, 'बघ ! तू हिंदु, मुसल्मानांचें खातेस; आता हिंदु राहिली नाहीस हं !' आणि त्या अन्नाचे प्रतिमूल्य म्हणून त्या बाअीस त्याने सांगितले होतें, 'तें मूल मला दिलें पाहिजे अं, मी मागताच ? — नाहीतर ठार मारीन ठार !'

रामभाअूना ती हकीकत सांगत असताच ती थरथर कापत होती — नाहीतर तो मुसलमान भगी येअून तिला नि त्याना पण ठार करील ! रामभाअूनी तिला धीर दिला, 'जर तुला आम्ही सर्व साहाय्य दिलें तर तू त्या मुसलमानाचें अन्न घेणार नाहीस ना ? मूल देणार नाहीस ना ? तू हिंदुधर्माच्या रक्तावीजाची ना ?' तिच्याही अंगी आवेश येत होता, पण झटकन् हताश होअून ती म्हणाली, 'पण आता काय त्याचें ? मी मुसलमानाच्या हातचे खाल्ले आहे ! कोणता हिंदु मला जातीत घेअील ? माझे मूल विनजात ! तें हिंदु कसें राहील ?'

'राहील ! ती चिंता तुला नको. मी रत्नागिरी हिंदुसभेचा या गावचा अेक कार्यकर्ता आहे. आम्ही तुला जातीत घेअू प्रत्यही मी तुला अन्न नि मुलास दूध देअीन ! पोलिसांना सांगून त्या मुसलमानास पायबंद घालीन. हे घे थोडे पैसे. अन्न नि दूध आत्ताच धाडून देतो !'

कोण्या हिंदूच्या तोंडून असे शब्द अैकण्याचा तिला पहिलाच प्रसंग ! तिला सुद्धा मुसल्मानाचें खाल्ल्यावर मनुष्य हिंदु राहतो कसा तें पटेना. पण साहाय्य मिळतें तें पाहून ती चूप राहिली रामभाअूच्या पायावर तिने मूल ठेविलें. 'माझा धर्म वाचवणारा तू देवच भेटलास ! पण मला धर्मशाळेतून प्रथम घरी न्या. नाही तर तो मुसलमान मला खाअून टाकील ! न्याल तर तुमच्या शब्दावर विश्वास ! !'

रामभाअू परत आले थोडें अन्न नि दूध त्यानी तिला पोचविलें ; पण ते नेण्यास त्या सार्‍या गावात अेकदोन तरुणच काय ते धजले ; बाकी ज्याला रामभाअू विचारीत त्याने त्याने उलट 'बाटगा ! लुच्चा ! याचा तर नसेल काही

संबंध त्या बाअीशी ? ' असें म्हणून रामभाअूंची पाठ फिरताच कुटाळकी करण्यास सोडू नये !

रामभाअू स्वत: भाड्याच्या घरी राहत. त्यांनी त्या बाटलेल्या बाअीस कोणाच्यातरी घरी आणण्याचा योजलेला बेत अैकताच आगाअूच सावध राहावें म्हणून घरधन्याने सांगितलें, 'आधीच तुम्ही महारास शिवून येऊन घरात विटाळ कालविता म्हणून कागाळचा होतात. आता मुसलमानाचें खाल्लेल्या त्या भटक्या बाअीची ब्याद जर आणणार असाल, तर घर सोडून चालतें व्हावें लागेल. बाहेर काय नंगा नाच घालायचा तो घाला, आम्हांस अुपद्रव नको ! '

रामभाअू म्हणाले, 'मी आणीत नाही त्या बाअीस बळेंबळें तुमच्या घरी. पण ती गाय पाळावयास मागत होता तीही भटकीच नव्हती का ? मुसलमानाच्या हातचें तीही खाअीच ना ? '

'पण तो पशु होता, पशुधर्म तो... '

'हाय हाय ! तर मग हें समजत असूनही त्या पशूस गोठ्यात ठेवता, सोवळ्याने पूजता, तिचें गोमूत्र पिअून तिला पक्वान्नाचे गोग्रास स्वहस्ते घालता ! मग ही हिंदु बाअी तर माणूस, मूल मराठ्याचें, माणसाचा जीव तो, त्याला मुसलमानांच्या हातून सोडवून हिंदूने घरी आणून दोन घास – ! ' रामभाअूंनी वाक्य पुरें करण्याच्या आधीच घरधन्यांनी त्याचें तोंड बंद केले.

'पूर्वीचे ऋषि गाढव नि तुम्ही शहाणे ! कुठें ती कुलटा नि तें बिनवारशी कारटें, कुठे ते महारडे आणि कुठे ती विश्वजननी पवित्र गायत्री गोमाता ! होअू द्या मुसलमान तिला ! अशा कुलटा मुसलमानात गेलेल्याच बऱ्या ! '

' अशाच हिंदूतून हिसडलेल्या स्त्रियांच्या पोटी हिंदूचे कट्टर शत्रु जन्मले ! आणि हे मूल ? मुसलमान होताच अठरा वर्षांच्या आत ह्याच गायत्रीस मारणारा अेक कसाअी होअील ! त्याचा वंशाचा वंश गोमांस खाणारा – गोघ्न होअील गोभक्तांची संख्या घटून गोघ्नांची वाढेल ! तेव्हा गोसेवेच्या दृष्टीने देखील !'

' पुरे करा तें ब्रह्मज्ञान ! मला माझें घर बाटवून घ्यावयाचें नाही ! बस्स !'

रामभाअू त्या गावी शेटजींच्या, भटाच्या, मराठा पाटलांच्या सबंध त्या त्या घरी हिंडले. ती मरतुकडी गाय पाळावयास सिद्ध झालेल्या भूतदयावान् लोकांपैकीसुद्धा कुणीच त्या बाअीस आश्रय देअीना, गोठ्यातदेखील राहू देअीना ! मग इतरांची गोष्टच बोलणे नको !

तो गाव बारा हजार हिंदु वस्तीचा. मुसलमानांची वसती तीनशे माणसांची असेल नसेल. ह्या बारा हजार हिंदूस त्यांच्या धर्माची अेक स्त्री नी अेक मूल परधर्मात जात आहे याची रेसभर चिंता नव्हती! अेक घर, अंगण, गायीला मिळणारा गोठादेखील कोणी त्या बाळंत बाअीला देअीना ! त्या तीनशे मुसलमानांतील बाया देखील त्या 'काफर ' स्त्रीला नि मुलाला अिस्लाम धर्मात कसें ओढून, बळाने

देखील पळवून आणता येथील, याचा कट करीत होत्या. आपल्या गोषातदेखील वेळी तिला लपवून ठेवू म्हणून आपण होऊन त्या कटास पाठिंबीत होत्या.

तिकडे त्या धर्मशाळेत तो मुसलमान भंगी, रामभाऊंनी अन्न दिलें त्याची गुणगूण कळली म्हणून लगोलग संध्याकाळ होते न होते तो तिथे आला. बाईने माहिती सागताच तें पोर हिसकू लागला. बाई ओरडू लागली. अेकदोन करता-करता वीसपंचवीस हिंदु तिथे जमले, पण दूर! त्या मुसलमानाने 'काफरांस' काफ-रांच्या धर्मास शिव्यांची लाखोली वाहिली! त्या बाईस मूल देत नाहीस तर टाक माझी चीजवस्त ' म्हणून दरडावले. तिचें चिंध्याचे गाठोडें नि मुलावरचा लुग-ड्याचा तुकडादेखील त्याने हिसकला. मूल उघडेवाघडे घेऊन ती बाई कोपऱ्यात स्फुंदून स्फुंदून रडत हिंदूकडे बघत होती की कुणी पुढे यावे ! पण कुणी पुढे होईना! मुसलमानाने ते कपडे घेतले, धर्मशाळेसमोर भर वाटेवर त्यांस आग लावली आणि कोण तुला कपडा नी खाणें देतो तें बघून घेईन ! मी रात्री पुन्हा येईन ! त्याला नि तुला ठार करीन ! ' अशा धमक्या देत त्या होळीपाशी ठाण मांडून राहिला !

त्या दाटीत ते गोदासप्रवाही थोडा वेळ अुभे होते. त्याच धर्मशाळेसमोर मटकन् बसलेल्या गायीच्या पाठीवर अेक छडी कुणी मारली ती अैकून त्याचें हृदय पिळवटले होतें; पण ह्या बाईस तो दुष्ट छळताना पाहून त्यांनी हू का चूं न करता 'असले प्रकार आपल्यासारख्या सभ्याच्या दृष्टिक्षेपांत घेण्याच्या योग्यतेचे नव्हत. अशा अैटीनें ते लगेच वाटेने पुढे गेले. संकटातून सोडविण्यात ती कुणी जखडत गाय थोडीच होती ! ती अेक जातिबाह्य हिंदु बाळंत बाई, नि तीनचार दिवसांचें विनवारशी मूल !

त्या अेका मुसलमानास जाणीव होती की, तो अेकटा तिथे असला तरी मुसलमान तितका त्याच्या मागे. तिथे असलेल्या प्रत्येक हिंदूसही तीच जाणीव होती. आणखीही अेक जाणीव होती की, आपल्यामागे हिंदुसमाज असा नाहीच, आपण खरोखरच अेकअेकटे आहो ! तेवढ्यात अितके मात्र कोणी साहस केले, की धावत जाअून रामभाअूस ती बातमी दिली; रामभाअूनी पोलिसास दिली आणि अेक पोलिस त्या वाटेकडे येताना दुरून दिसताच त्या भंगी मिय्यासाहेबाचा धर्मोन्माद अुतरून ते तेथून पाय काढते झाले !

तरीही ह्या बाईस त्या धर्मशाळेत अेक मिनिटभरही ठेवणें धोक्याचें आहे असे रामभाअूना वाटलें. पण तिला नेणार कुठे ? गावात कोणी गोठासुद्धा देईना! म्हणून त्यांनी रत्नागिरी हिंदुसभेस तार केली.

पण रात्री मध्यंतरी हलवून तिला लगेच कुठे ठेवायची ? ते तरुण वकील रामभाअूचे सहकारी त्यानाच शेवटी रामभाअूनी अगदी गळ घातली, त्यांची आअी, निरी दयाळू देवळमी गोमंतक वृद्ध आअी ! त्या दीन गायीची देखील त्य

दिवशी तिला किती हळहळ वाटली! मग ही बाओी तर माणूस, त्यात अेक बाळंतीण स्त्री, छातीशी तीन दिवसाचें पोर मूल घेअून येणार! तिला दया आलीच पाहिजे. 'थोडें नाकतोंड मुरडलेंच तरी आमची आजी नको म्हणणार नाही. घेअून या त्या बाओीस आजची रात्र! अुद्या मात्र ताबडतोब मोटारीनें रत्नागिरीस धाडली पाहिजे हं!' त्या तरुण वकिलांनी पाठबळ देतांच रामभाअू त्या बाओीला नि मुलाला मोठ्या प्रयासानें त्या दोघा तरुण शिष्यांच्या साहाय्यानें रातोरात घेअून आले –

तों घरांत त्या वकिलाच्या आजीचें रागारागानें चाललेलें बोलणें त्यांनी अैकिलें. दार अुघडण्याला ते वकील धजेनात. रामभाअूंनीही जोरजोरानें दार खड-खडविण्यास आरंभिलें. शेवटी वकिलांनी दार अुघडलें–दिवा बाहेर केला. ती बाओी थरथर कापत 'तें मूल छातीशी धरून पाजत पायरीवर बसली आहे; ती कुडत आहे' तोंच वकिलाची ती गोंभवत आजी धावतच ओसरीवर आली! त्या बाळंत बाओीस तिनें पाहिलें नि मोठ्यानें किंचाळी फोडून म्हणाली, 'कुठली मेली अवदसा ही! नि तें कारटें! ना जात ना पात! तिला आत घेअून घर बाटवणार तर ही मी घराबाहेर पडतें. पुन्हा पाणी घेणार नाही या घरात!' स्वभावानें त्या वृद्ध बाओी दयाळू होत्या, पण पोथी! पोथीनें त्यांच्या दयेला जी आरशी लावली त्यातूनच त्या बघणार!

गोदागबुवाही तिथेच अुतरलेले. त्यांना हात जोडून रामभाअू म्हणाले, 'वकिलाच्या आजीस थोडें समजावा ना!' कपाळास आठ्या घालून ताठ्यानें गोदासबुवा गरजले, 'आम्ही गोदास, वर्णाश्रमधर्माचे अभिमानी! तुम्ही लोक सब गोलंकार करू पाहता! महारामांगांना शिवता! या कुलटा बाया तुमची प्रेमपात्रें! मुसलमानांच्या हातचें तिनें खाल्लेलें, तिला म्हणे हिंदु म्हणा! अशा पतितेला ह्या कुलीन सदाचारी ब्राह्मण कुटुंबाच्या घरात घेण्यास मी संमति देअू?

लहान बावीला खेळायला पत्र्याचा जोड काढून दिला त्या मखराच्या रंगविलेल्या कोनाड्यात, तो पत्र्याचा जोड ती काढावयास गेली असता विमलेला अेक जाळे लागलेले दिसले तिने 'अिश्श' म्हणून तिरस्काराने ते कोळिष्टक जाळें अितक्या झटकिनी नि सहजपणे त्या पत्र्याच्या जोडाचे दोन तीन फटकारे मारून मोडून तोडून टाकले, की तिला ते जाळे मोडल्याची आठवणसुद्धा बावीकडे वळताच राहिली नाही

पण कोळ्याच्या त्या कोळिष्टक जाळ्याची अेकदोन चिकट गुडाळी त्या पत्र्याच्या जोडास ल्पेटलेली पाहून लहानशी बावी जेव्हा म्हणाली, की 'ते बघ कायसे चिकटले आहे पत्र्याच्या जोडाला !' तेव्हा विमलेचे लक्ष पुन्हा तिकडे गेले नि ती गुडाळी झटकीत ती बावीला म्हणाली, 'जाळे ते ! ता किडा नसतो का तो कोळी ! त्याचे हे घर असते ! —'

'मग ते तर तू चुरगाळून तोडलेस आता ग तो कुठे राहील आजी ? रडत असेल न तो आता ?'

'असेल रडत मेला बांधील पुन्हा दुसरे घर त्याला हवे तर ? दिवसभर काळो विणतच असतो आपली जाळी नि कोणीतरी येताजाता झाडूनच टाकात असतो तो मारी ! कसा सुंदर मखराचा रंगीत कोनाडा तो आपला ! या किड्याच्या जळमटांना सोय हवी म्हणून का असा शिमटाचा गिलावा लावून सुरेख केला, रंगविला ?'

'अग आजी, पण त्या किड्याला तसेच वाटत असेल न ?' विमलेचा सतरा-अठरा वर्षांचा पाणीदार मुलगा ती गमतीची बातणी अैकून तिथे आला नि म्हणाला, 'मी त्या काळ्याला ते जाळे विणताना परवा बघितले, किती दंग होता तो ते विणण्यात नि किती पटाअीत ! अेखादा मोठा यंत्रशिल्पी (अेंजिनियर) अिनका हातखंडा नसेल ! त्या जाळ्याला हवे तिथेच काय ते बारीक ततूंचे ताण त्याने दिले ती मोठाली ततुवर्तुळ प्रथम रचून मग त्याच्या आड्या ततूंचे धागे कसे झटपट गुतवीत, धावत चिकटवीत, ती त्याची चिकट धाग्याची पोटातील गुंडी सपसप कशी अुकलीत चालला होता म्हणून सांगू ? जसा कोणी पटाअीत विणकर मागात आडवअुभे दोरे दाहचा सटासट मारीत गुंड्या भरभर अुकलीत चालला आहे ! त्याच्या त्या तिळाअेवढ्या डोक्यात तें विणकामाचे शास्त्रच्या शास्त्र नि त्याच्या तांदुळाअेवढ्या पोटात अर्ध्या अर्ध्या मैल लांब धाग्याच्या गुंड्या मावलेल्या पाहून मला अितका आचंबा वाटला की आपल्या मखराच्या कोनाड्यात ते जाळे बांधीत असतानाही त्या किड्याला मारायचे वा तें जळमट सुपक्ना झाडून टाकायचे मनात येअीनाच ! मध्ये अेकदा मी गमत म्हणून त्याच्या जाळ्यास जोराने बोट लावले त्यासरशी धावरून तो या धाग्यावरून त्या धाग्यावर पळत, त्याच्या मते त्याच्या राज्याचा सुरक्षित जो भाग त्या टोकावर जाअून थांबला मग परचक्राचे

सकट गलत पाहून पुन्हा आपल्या राजधानीच्या मध्यबिंदूत येऊन राहिला आपण जसं वास्तुशांति करून आपल्या राजवाड्यात प्रवेशतो नि देवाचे आभार मानतो की ' केवढी त्याची कृपा ! त्यानं आम्हास हं घर दिलं ! ' तसा तोही देवाची प्रार्थना करीत नि आभार मानीत असावा !

' तर तर ! हं अेवढं मोठं घर नि तो माझा सुरेख मखराचा कोनाडा तो त्या किड्याला जाळं विणून त्यात सुखानं नांदता यावं म्हणून बांधला वाटतं ! देवाची सोडून मोठी महादेवाची प्रार्थना किड्यानी केली म्हणून किड्याच्या सोयी-साठी काही देव माणसाची घरं राखून ठेवीत नसतो ! ही तिनीसांज झाली म्हणून मी जो हा दिवा लावते आहे तो जसा त्या किड्याला दिसावं म्हणून लावीत नाही, तसंच हे टोलेजंग वाडे नि राजवाडे माणसं जी बांधतात ती कोळ्यांना जाळी विणून त्यात नांदता यावं म्हणून नव्हंत, हं त्या किड्यांना कळलं नाही तरी देवाला कळतं हो बाळा ! '

' आणि देवाला कळतं तरी आम्हा माणसांना कळत नाही, की आम्हा माणसांना हे टोलेजंग वाडे नि राजवाडे बांधता यावे नि त्यात नांदता यावं अेवढ्याच सोयींसाठी हं जगड्व्याळ विश्व रचलं नाही हा दिवा त्या किड्याला दिसण्यासाठी आम्ही लावीत नाही असं आम्ही म्हणतो, पण तो प्रचंड सूर्य मात्र मनुष्याना दिसावं, त्यांनी जगावं म्हणूनच काय तो देवानं पेटविलेला आहे असं आमच्या वेद–बायबल–कुराणासारख्या धर्मग्रंथांतूनदेखील सांगितलेलं आहे ! किड्याच्या वेडगळ प्रार्थनेसाठी माणसाची गैरसोय जर देव दूर करणार नाही, तर या अनंतकोटि ब्रह्मांडाच्या सोयीगैरसोयी न पाहता आम्हा माणसाच्या घर-कुल्यांनाच तेवढं रक्षावं ' अशा आम्हा माणसाच्या प्रार्थना तेवढ्या देव अैकलंच हे तरी कशावरून ? मग प्रार्थनेनं देव पावतोच पावतो रामनाम जपा अल्ला अल्ला म्हणा, की देव साहाय्याला आलाच म्हणून समजा हे जे आमच्या पुराणकुराणादिक पोथ्यांतून सांगतात ते भाबडेपणच नाही का ? '

' हं विक्रम पुरे झाला हा पाचकळपणा ! ' विमलेची वृद्ध सासू नि तिच्या या विक्रम नावाच्या मुलाची नि छोट्या बाबींची आजी देवघराशी बसून स्तोत्रे पुटपुटत होती ती हा संवाद अैकत असता विक्रम जरा चतालपणे बोलत चालला आहे असं वाटून त्याला दाबू लागली ' अिंग्रजी चार अक्षरं शिकली न की पोरं अशी चटोर होतात मेली ! पोथ्याविथ्याविषयी असं पाचकळपणानं बोलू नये हो विक्रम ! कधी तुला कळणार आता हे ? '

हं त्यांचं बोलणं चाललं आहे तो त्या लहानग्या बाबीनं त्या पत्त्यांचा तंबू हळुवार हातानं बांधला होता तं कठीण शिल्पकार्य संपून तिसऱ्या मजल्याच्या शिखरासारखा शेवटचा तंबू अुभारण्यात यश येताच सफलतेच्या अत्यानंदाने बाबी टाळ्या पिटीत नाचू लागली बघ माझा तंबू ! आजी, मामू आजी ! माझ्या

बांधकामाचे प्रचंड दगड, वृक्ष, भिंती, राशीच्या राशी कोसळून हजारो जिवंत पुरले गेले, ठेचले गेले एक दोन तासाच्या आत भयंकर भूकंपाच्या जबड्यात ते क्वेट्टयाचे नगरच्या नगर गडप झाले! देवळाला देवाने रक्षिले नाही, न मशिदीला अल्लाने! न जीजस न जेहोव! निसर्गाच्या अिच्छेस मनुष्याच्या प्रार्थनेसाठी म्हणून कोणीही आड येअू शकला नाही! आडवू शकला नाही!!

विमलेच्या घरी मखराच्या कोनाड्यातील जाळे तिच्या सोयीच्या आड येताच तिने, त्या कोळ्याच्या लाख आशाआकांक्षा, सोयीगैरसोयीस न जुमानता अेका फटकाऱ्यासरशी मोडून चुरगळून टाकले तसेच सृष्टीच्या त्या कोनाड्यात माणसांकिड्यांनी विणलेले ते क्वेट्टा नगराचे जाळमट सृष्टीच्या स्वतःच्या सोयीच्या आड येताच तिने रागाच्या झाडूच्या अेका फटकाऱ्यासरशी झाडून चुरगाळून टाकले, होते की नव्हतेसे केले! भुकेली दूधपिती लेकरं दुधाचा ओठावरचा घोट गिळू देखील न देता त्यांच्या डोक्यावर दगड लोटून जिथे ज्या सृष्टीने ठेचून टाकली, तिथे ती सृष्टि वा ता सृष्टिसंचालक, पोथ्यांतील लावलाव संस्कृत स्तोत्रे वा कुराणांतील अरबी आयत थोडीच अैकून घेणारा होता! भूगर्भात जे अत्युग्र स्फोटकांचे समुद्रासारखे हौद शतकाशतकं कढत, तापत स्फोटाच्या सिद्धत आले होते, त्या प्रचंड सृष्टिशक्ति काय 'सप्तते चिरंजीविनां'च्या वा सोरटी सोमनाथाच्या 'स्मरणमात्रेण' किंवा निमाजानंतर केलेल्या काणा मुल्लामौल्वींच्या दुव्या' ने द्रवणार होत्या! आपला दैवनियमाचा आखलेला बेत बदलणार होत्या!

प्रार्थना! त्या लडिवाळ छोट्या बाबीची प्रार्थना मात्र अेका अर्थी सफळ झाली 'माझा घरट्याचा तबू चिरेबंदी वाड्याअितका टिकाअू होअू दे रे देवा!' असे ते अल्लड मूल मनोभावे प्रार्थून झोपले ते मात्र देवाने अैकलेसे वाटते! तिचा घरट्याचा तबू क्वेट्टा नगरच्या चिरेबंदी वाड्याअितका खरोखरच टिकाअू ठरला! कारण त्या चिरेबंदी क्वेट्टा नगरातील यच्चयावत् चिरेबंदी वाडे त्या घरट्याच्या

भाहुलाचा वाडा अ हा ! तुम्ही आता बोलत होतात त्या राजवाड्यापेक्षा पक्का चिरेबंदी आहे अ ! दूर अ भाऊ ! फुंकर मारलास तर बघ माझ्या पत्त्याच्या राजवाड्यावर !'

विक्रम हसला हा का ? 'आमच्या चिरेबंदी राजवाड्यापेक्षा तुझा पत्त्याचा तवू पक्का आहे न ? नि फुंकराला भितेस ?'

बावी मानेला अेक झटाका हिसडा देत अुपहासली, 'पुरे हो ! तुमचे चिरेबंदी राजवाडे नाही पडत वाटत फुंकरासारखे ! काल तूच मला ते चित्र दाखविलस न ! विहारला अेक नगरच्या नगर भुअी फाटून धडाड्धडाड कोसळल त !' हे वाक्य म्हणताच त्या सातआठ वर्षांच्या बालिकेच्या गोजिरवाण्या अल्लड तोंडावर भावी ससाराच्या चिंतेची छाया पडल्यासारखे होअून ती केविलवाण्या स्वरात आजीला पुसू लागली, 'आजी ! तशी भुअीबिअी फाटून आज रात्री माझा हा तवू तर कोसळणार नाही न तसा? अुद्या माझा बाहुली राहायला यायची आहे हो त्यात !'

'चूप ! अस अशुभ काही बोलू नाही हो बावी ! ये मी स्तोत्र म्हणते आहे, देवापाशी तू हात जोडून बैस ये अशी देवाची प्रार्थना करीत ही स्तोत्र म्हटली न म्हणजे देव सारी अिडापिडा दूर करतो बर नाही पडणार हो तुझा पत्त्याचा तवू ये देवबाप्पाला हात जोडून प्रार्थना करू ये !'

आजीपाशी ती बालिका मनोभावाने जाअून बसली आजी काही संस्कृत काही प्राकृत स्तोत्र नित्याप्रमाणे अगदी श्रद्धेने म्हणत असता बावी मनातल्या मनात देवाला हात जोडून विनवीत होती 'माझा हा पत्त्याचा तव कधी पड दव

वादळांत तें माडाचें झाड हलतांच जसा गदगद हलतो तसा पायाखालची सारी पृथ्वी भूकंपात थरकापून झोकांड्या घेत पायरीवरच पडला – मागोमाग कडकड-कड आवाज होऊन त्याचें घर कोसळलें !

घर भुईंत पुरुषभर गड्ड्यात दगड पडावा तसें खचून गेलें. त्यामुळे अंगणा-तली मोठमोठ्या शिळापट्टांची अेक टेकडीही कोलमडून त्या खड्ड्यात तिचे पुरुष पुरुष अुंचीचे दगड धडधडा आदळले. ‘ अपमृत्यु ’ स्मरणमात्रेण टाळणाऱ्या मार्कंडे-याचे स्तोत्र गारखे स्मरत निजलेल्या नि तो अंगारा लावलेल्या नातीस पोटाशीं धर-लेल्या आजीचा त्या छोट्या बाबीसुद्धा त्या प्रचंड दगडाखालीं चेंदामेंदा झाला ! !

पण त्याच खड्ड्यात अेक हातांवर रतलेली विमला! तिने कोणचेंही स्तोत्र म्हटलेलें नव्हतें, पण तिचा चेंदामेंदा झाला नाही. तिच्या तिन्ही बाजूनी मोठ्या शिळा पडून त्या धक्क्याने ती गुंग झाली, जितक्यात पटओर्वी लाकडें तिच्या छातीवर पडून बेशुद्ध झाली–पण मेली नाही.

जेव्हा ती अर्ध्या शुद्धीवर आली तेव्हा तिच्या शून्यपणे अुघडलेल्या डोळ्यांना वरून त्या खड्ड्यात अुतरत आलेला अेक सूर्यकिरण दिसला. रात्री झालेल्या भयंकर अपघाताची अंधुक जाणीव तिला होअून ‘ बाबी ! माझी बाबी ! माझा विक्रम ! माझी नोकरें ! ’ अशी तिने अर्धबेशुद्ध किंकाळी फोडली !

‘ थाबा ! अिथ कुठंतरी कुणी घायाळ माणूस आहे ! ’ असें अेक सैनिक ती खड्ड्यातील किंकाळी अैकून वर ओरडला. चारपाच सैनिकांची ती तुकडी काल-रात्रीं झालेल्या भयंकर भूकंपात जे गाडले गेले त्यांना तत्काळ शक्य ते साहाय्य पुरविण्यासाठीं सरकारी आज्ञेने त्या भागात फिरत होते. त्यानी लगेच तिथे तो ढिगारा खणून पाहिले, तों तीन अुंच दगडाच्यामध्ये, गुहेत रत्न पडलेलें दिसावें

होय ! तो विक्रमच होता. भूकंपाच्या धक्क्यासरशी तो घराबाहेरच्या पायऱ्यांवर पडला पण म्हणूनच घराखाली गाडला गेला नाही. तिथून सुटून भटकत हिंदुरक्षक दळात शिरून क्वेट्टयाच्या भूकंपातून पळापळ झालेल्या हिंदु अनाथाना यथाशक्ति साहाय्य देत होता.

ते सारेजण पोलिसांनी आपल्या अटकेत ठाण्यावर नेले. पाहतात तो पीरदाद हा अेक फरारी दरोडेखोर ! लगेच जुनें वॉरंट त्याच्यावर बजावलें गेलें. क्वेट्टयाकडे त्याने दोघा हिंदु सावकारास ठार मारून संपत्ति लुटली होती. त्या नोटा, मोतीं, दागिनेही त्याच्यापाशी धरले गेले. त्याच्या साथीदाराच्या वक्तव्यावरून (जबानी-वरून) सिद्ध झाले की,'दोन वर्षे हिंदु स्त्रियामुलाना पळवून नेअून ही टोळी सर-सीमेपलीकडच्या पठाण टोळ्याना विकी ! क्वेट्टा ! भूकंप म्हणजे त्यांना अेक पर्व-णीच होती ! ह्या हिंदु स्त्रियांनाही तो तसाच पळवून नेत होता !

विक्रमच्या हाती विमलेसुद्धा त्या हिंदु स्त्रिया सोपविण्यात आल्या. विक्रम आर्यसमाजाच्या आश्रमात आला. तो त्याच्या मित्राने त्याला अेक वर्तमानपत्र दाखवून म्हटले, बघ ! महात्मा गांधींनी भूकंपाच्या संकटातून मनुष्यजातीची सुटका करणारा अेक अद्‌भुत अुपाय शोधून काढला ! ! विक्रम दुर्लक्षमय स्वरात जिज्ञासला, 'कोणता अुपाय बुवा ?' मित्र म्हणाला, 'प्रार्थना, देवाची प्रार्थना करा !

भूकप हा अेक गणितागत आला, भूकप झाला माझ्या आजीचा वा माझा द्वेष कुणी केला म्हणून नव्हे ! त्या भूकपात जसे अनेक धुळीचे कण वाताहत होअून अुडाले तसाच अेक कण मी भुअीन गाडला न जाता योगायोगाच्या वाऱ्यावर अुडून अिथ पडलो माझ्यावर दया करण्याच्या मुख्य नि हेतुपुरस्सर बुद्धीने कोणी रक्षिल म्हणून नव्हे! प्रार्थना ! अरे, ज्या गाधीजीना प्रार्थनानी नि अुपासानी गुरुवायु-पूरच देअूळ अुघडण्यापुरत त्या अेका य:कश्चित् झामोरिनच मन वळविता आल नाही ते गाधीजी केवळ प्रार्थनेन भूकपाच मन वळत म्हणून सागतात नि तुम्ही अैकता तुम्ही सारे वर्ध्याला जा नि प्रार्थना करा माझ हे पडयाळ वद पडाव म्हणून त्या तुमच्या प्रार्थनेत ह्या माझ्या चिमुकल्या हातघडीतील (रिस्टवाच-मधील) टाचणीसारख्या या लवकाने कपदखील निरोधिले जाणार नाहीत आणि त्या प्रार्थनेन भूकपाची प्रस्फोटक नि पर्वताच्या रागाच्या रागा अुचलून फेकणारी आदोलन निरोधिली जातील अस तुम्ही म्हणता हा निव्वळ खुळेपणा नव्हे काय ? (प्रार्थना ही मनुष्याची आशा आहे, आशापूर्तीची हमी नव्हे.)

\+ \+ \+

अुपद्रवाचे स्वरूप धारण करू लागतो तेव्हा! त्याचा वर्णद्वेष हा जातिद्वेषाचे आणि राष्ट्रद्वेषाचेच दुष्ट हत्यार होअू पाहतो तेव्हा? तेव्हा तरी त्याची आम्हास चीड नको का यावयाला? अहो, अिंग्लंडमध्ये असता अेका भरसभेत अेक मिशनरी-महाशय गंभीरपणे सांगू लागले की, 'अेशिया, आफ्रिका, अमेरिका येथील काळ्या रंगाच्या लोकांवर युरोपियनांनीच प्रभुत्व गाजविणे योग्य होय हा अीश्वरी संकेतच असला पाहिजे आणि तो संकेत व्यक्तविण्यासाठी देवाने आमचा वर्ण गोरा केला आणि त्यांचा काळा कारण कोणत्याही जातीच्या वाङमयात वा समाजात शुचिता, शुद्धता पवित्रता, आरोग्य बळ आणि प्रभुत्व ह्यांचा रंग श्वेत, गोर, स्वच्छ असाच निर्देशिला जातो आणि काळा रंग हा हीनतेचे क्रूरतेचे मळकटपणाचेच द्योतक मानले जाते!' ह्या त्याच्या चपटपंजरीतील अंतस्थ दुष्ट हेतु राष्ट्रद्वेषावाचून दुसरा कोणताही नाही हे पाहून मला फार चीड आली आणि मी तिथल्या तिथेच प्रत्युत्तराची वेळ येताच ताडकन अुभा राहून त्या मानभावी मिशनरीस हटकले की 'देव देवदूत, देवतांचा रंग गोर, शुभ्र, स्वच्छ असाच वर्णिलेला असल्यामुळे जो जो गोरा वा पांढरा तो तो देव, देवता वा देवदूत असला पाहिजे, काळ्याहून श्रेष्ठ सुधीक, बलवान आणि प्रभुत्वास पात्र असला पाहिजे हे आपले तर्कशास्त्र आम्हाला ततोतंत पटले आहे आता हत्ती हा बहुधा काळा असतो आणि हजारो डुकरे पांढरी स्वच्छ असतात तेव्हा यापुढे डुक्कर हेच हत्तीहून बलवान आणि सुधीक असे आपण सर्वांनी समजले पाहिजे! अगावर कोड अुठले की काळा मनुष्यही अितका गोरापान दिसू लागतो की, दुरून पाहताच तो कोणी गोरा मिशनरीच येतो आहे का काय असे वाटावे! तेव्हा यापुढे कोड फुटलेल्या मनुष्यास आम्ही देवदूता-सारखा सन्मान दिला पाहिजे व्याघ्रसिंहाहून रानचे ससे अगदी हिमगोर वर्णाचे

सारखा विरघळून गेला आणि त्या शेकडो गोऱ्या स्त्रीपुरुषांनीच माझ्या वाक्या-गणीक मला टाळ्या दिल्या !'

रमाकांत : झाले तर! आमच्या सावळ्या रंगासाठी कोणी मर्यादेबाहेर दुष्ट-बुद्धीने अपमर्द करू लागला तर त्याचे दात असे त्याच्या घशात कोंबले की झाले!

घनश्याम : अहा, पण, गोऱ्या लोकांतील मोठमोठे शहाणे आणि तत्त्वज्ञदेखील गोऱ्या जाती ह्या प्रभुत्वास निसर्गतः पात्र असून काळ्या रंगाचे लोक हे निसर्गतःच जीवनीय कलहात टिकाव धरण्यास अक्षम आहेत असा ठाम सिद्धान्त ठोकून देतात हे आश्चर्य नव्हे काय ?

रमाकांत : त्यात कसले आश्चर्य आहे! शहाणे लबाडही लुच्चे नसतात की काय ? अहो, ह्या गोऱ्या मूर्ख मिशनरींची काय कथा ? तो ॲरिस्टॉटलसारखा तत्त्वज्ञांचा मुकुटमणिदेखील एकदा असेच भकून चुकला की ग्रीस देश हा देवाने जगावर स्वामित्व गाजविण्यासाठीच अुत्पन्न केला असला पाहिजे! कारण जगाचे राज्य त्याच्या मध्यभागी राहूनच चांगले चालविता येणार, आणि ग्रीस हाच जगाच्या मध्यभागावर—आशिया, युरोप नि आफ्रिकेच्या संगमस्थानी निर्मिलेला आहे अर्थात तोच जगद्राज्याचा अीश्वरनिर्मित केंद्र असला पाहिजे! ॲरिस्टॉटलला माहीत असलेल्या जगावर त्या काळी ग्रीसचे प्रभुत्व होते म्हणून त्याला हा सिद्धान्त सुचला पुढे तोच ग्रीस रोमचे पादपीठ झाले नि आज आहे की नाही ते जगाच्या आलेख्यात (नकाशात) सूक्ष्मदर्शक यंत्रातूनच पाहिल्यास दिसते. गेल्या शतकातीलच गंमत पहा युरोप—म्हणजेच पाश्चिमात्य राष्ट्रे ही प्रभुत्व गाजविण्यास निसर्गतःच सक्षम आणि पौर्वात्य दास होण्यास, हा सिद्धान्त बोकाळला होता, तोच जपानने रशियाचे कंबरडे मोडले! तेव्हा जपान अपवाद ठरून अिंग्लंड आणि जपान ही दोन्हीही प्रबल राष्ट्रे या गोलार्धाच्या अुत्तरीय शीतकक्षेत असल्यामुळे आणखी काही शहाण्यांनी नवा सिद्धान्त काढला की अुत्तरीय शीतकक्षेतील देश हेच दाक्षिणात्य कक्षेतील देशांचे नैसर्गिक विजेते असणार! पण रोम दाक्षिणात्य कक्षेतच मोडणारे असताही ह्या अुत्तरीय शीतप्रधान ब्रिटनभूमीला त्याने शतकोशतके आपली दासी करून ठेवलेली होती! ब्रिटनहून काळ्या अमणाऱ्या रोमच्या साम्राज्यात ब्रिटनच्या गोऱ्यापान रंगाचे अस्तित्व जर कशात अुपयोगी पडले असेल तर ब्रिटनच्या गोऱ्या-पान पोरीकाच्या रोमन सैनिकांसाठी आणि सरदारांसाठी आवडत्या दासी म्हणून पुरवठा करण्याच्या कामीच काय तो होय आपल्या लाटवाजीचे आणि अहंकाराचे समर्थन निसर्गाच्या आणि देवाच्या नावाने करण्याची खोड मनुष्यमात्रास लागलेली आहे. ठगाच्या अत्याचाराचीही अेक देवता होती आणि सैतानही सायिस्टर वाटेल तर आपल्या समर्थनार्थ बायबलचा आधार घेत असतो

घनश्याम : पण मग काळा रंग हे अेक नैसर्गिक व्यंग आहे हे मग तुम्हीच कसे म्हणता ?

त्या राष्ट्रीय महामंत्रांनी आपापली विभिन्न जीवनें होमून अेकदेह, अेकजीव, अेकप्राण झाली ती अेकदेह म्हणजेच फरेंच भू! तो अेकजीव म्हणजेच हें फरेंच राष्ट्र! आणि त्या राष्ट्रीय अेकतेचें मूर्तिमान् प्रतीक म्हणजेच हें 'अेकतेचें अुद्यान!' हें 'प्लेस दी ला काँकार्ड' येथूनच ज्या महामंत्राने पुढे त्रिखंड हादरून सोडलं तो महामंत्र अुद्घोषित झाला— स्वतंत्रता, समता, बंधुबंधुता!'

'अरेरे सोडून हादरून त्रिखंड त्या मंत्राने!' रमाकान्ताच्या अवमानास हेटाळीत घनश्याम म्हणाले 'रावणानेदेखील कैलास असाच गदागदा हादरून हालवून सोडला होता म्हणजे रावण राक्षस नव्हता असे थोडेच सिद्ध होते! भूकंपहि खडचे खड हादरून लक्षावधि मनुष्यास पाताळात जिवंत गाडून टाकतो म्हणजे तो अुत्पात ठरत नाही की काय! तसाच हा या दांभिक गोऱ्याचा 'समतेचा नि स्वतंत्रतेचा' महामंत्र! अहो, राष्ट्रीय या आर्थिक समता नि बंधुबंधुता तर सोडाच, पण ज्या समतेसाठी त्यांच्या त्रिशातली अक मर्यादितहि वेचली जाती ना ती नुसती वर्णविषयक समता तरी हे गोरे लोक पाळताहेत का? जिथे जावे तिथे आम्हा हिंदी लोकांची हेटाळणी, हुर्यो नि हिडीसफिडीस! का? याच्याहून विद्येत, संपत्तीत, कर्तृत्वात आम्ही व्यक्तिशः काही कमी म्हणून नव्हे, तर ह्यांचा व्यक्तिशः रंग गोरा नि आमचा व्यक्तिशः रंग काळा म्हणून! ब्रिटनमध्ये मी तर काय पण आमचे देवतसमान पूज्य असलेले विवेकानंद, टिळक, लजपतराय, गोखले यासारखे थोर पुरुषहि मार्गाने जाताना ह्या गोऱ्यांची हुच्चीं पोरटारे देखील त्यांची 'ब्लॅकी' 'ब्लॅकी' म्हणून हुर्यो करीत मागे लागतात! विद्यापीठात काळ्यांना मज्जाव वसतिगृहात काळ्यांना मज्जाव, खेळात काळ्यांबरोबर खेळणे अपमान, जाल तिथे काळा म्हणून त्यांच्यातील पाजीतला पाजी गोरा देखील आमची हेटाळणी करणार — शिवणार नाही! पण म्हटलं ब्रिटनचे नि आमचे राष्ट्रीय संबंध आज ते धनी, आम्ही दास, असे पडल्यामुळे त्यांच्या या वर्णद्वेषाला ही अितकी विषारी धार पाजली जात असेल पण ज्यांच्याशीं आमचा घेण्यादेण्याचा किंवा जितजेतेपणाचा अर्थाअर्थी संबंध नसून केवळ माणुसकीचेच काय ते नाते, अमेरिकेत जर्मनीत, फार काय या तुमच्या समतेचा महामंत्र अुद्घोषिणाऱ्या फ्रान्समध्ये केवळ काळेपणासाठीच आम्हा हिंदी लोकांचा जो पदोपदी अुपमर्द होतो तो पाहून या गोऱ्यांची मला अगदी चीड येते कालच पाहिलेत ना, सार्वजनिक म्हणून धडधडीत पाटी असलेल्या त्या चहाच्या दुकानात त्यांच्याच विद्येत त्यांच्याहून, श्रेष्ठ असलेल्या आणि संपत्तीत त्यांच्यासारखे दहा नोकर घरी राबत असलेल्या मला नि माझ्या त्या विद्वान देशबंधूला केवळ आम्ही रंगाने काळे म्हणून तुमच्या त्या पारीसमधल्याच अुपाहारगृहात त्या गोऱ्यांनी कसा मज्जाव केला नि दीडदमडीच्या त्या बाजारी फरेंच पोरीटारींनी किती टवाळकी केली ती? कोण हा अमानुष वर्णद्वेष!

'अगदी अमानुष नव्हे ! असमर्थनीय म्हणा, असहनीयही म्हणता येईल — पण अगदी अमानुष नव्हे' घनश्यामास थोपवीत आणि थडावीत रमाकांत म्हणाले ! 'युरोपियनांना वाटणाऱ्या काळ्या रंगाच्या तिटकाऱ्याला तुम्ही आता जो 'वर्णद्वेष' म्हणून शब्द योजलात, त्यातील, निदान तो वर्ण हा शब्द तरी आमचा अेक प्राचीन ऋणानुबंधी आहे ! आपल्या वर्णव्यवस्थेस ह्या गोऱ्या काळ्या रंगाच्या आवडी-नावडीचे गालबोट चांगले हौसेने रेखून लावलेले नव्हते का ? गोरा तो द्विज, अुच्च. काळा तो शूद्र, तो क्षुद्र, सत्त्वाचा रंग श्वेत, तमाचा कृष्ण परंतु गोऱ्या वर्णाचा पत्ता 'ब्राह्मणवाडीत,' आणि काळ्या वर्णाचा पत्ता 'शूद्रवाडीत' असा जरी नोंदला गेला तरी प्रतिलोम अनुलोम आणि गांधर्व विवाहाच्या लग्नमंडपातून आणि लताकुंजातून त्या पत्त्याची सारखी पिसणी होता होता आणि अुन्हाळ्यामागून अुन्हाळ्याच्या झळी लागता लागता तो गोराकाळा हा वर्णभेद बेपत्ता झाला. ब्राह्मणात काळेपण नि शूद्रात गोरेपण मिसळून गेले जो अुरला तो वर्णभेद नसून वास्तविक पाहता वर्णद्वेष, जातिद्वेष होय यासाठी आता काळ्यागोऱ्या रंगाचे तीव्र भांडण आपणात आज तितकेसे अुरले नाही तरी देखील गोऱ्या रंगापेक्षा काळा रंग हा आपणही हिणकसच मानतो नाही काय ? काळा रंग आपणा श्यामलवर्णीय लोकांसही हवासा वाटता असे थोडेच आहे ? अितकेच नव्हे, तर श्यामल वर्णांनही कमीअधिक काळसरपणाप्रमाणे आम्हीही अगदी काळेकुट्टपणाचा तिटकारा करतो ज्याविषयी आम्हास तिरस्कार व्यक्तवावयाचा त्यास आपण 'काळतोंड्या' म्हणतो गंदळ असेल त्यास 'कळकट' म्हणतो सुनेस 'कुठली काळुंद्री पदरी बांधली आहे ग बाओ आमच्या !' म्हणून चाच मारणाऱ्या नाकेल्या सासवा आमच्यातही आहे-तच ! प्रकाश, अुज्ज्वलता आणि सौम्य चाकचक्य ही मनुष्याच्या नयनातील ज्ञान-तंतूस आल्हादक वाटावी अशीच त्याची स्वाभाविक घडण असल्यामुळे कोणाही मनुष्यास काळेपणा हा सहजच अुद्वेजक वाटतो मनात कोणताही विशेष जातीय वा राष्ट्रीय अुद्दामवृत्ति वा विरोध नसताही आपणा श्यामल लोकांस अगदी कोळशा-सारखा काळाकुट्ट शिद्दी पाहताच जशी सहजच अेक नकोशी वृत्ति अुत्पन्न होते तशीच शिद्द्याहून आम्ही जितके अुजळ तितकेच आमच्याहूनही अुजळ असणाऱ्या ब्रिटालियनांस वा दुधासारख शुभ्र असणाऱ्या गोऱ्यापान रशियनादिकांस आमचा श्यामल रंग थोडासा अुद्वेजक वाटणे साहजिकच आहे हे आम्हीही ध्यानात धरले पाहिजे काळा रंग हे शारीरिक आपपणाच्या दृष्टीने आमच्यात असणारे अेक किंचितसे व्यंग आहे त्यास गोऱ्या लोकांनी सहजासहजी व्यंग म्हणून म्हटले तरी आपण न चिडणेच बरे तसा अुपहास त्यांनी केल्यास तो त्यांच्या सभ्यपणास कमी-पणा आणणारा आहे आपल्या नव्हे असे जाणून त्यांची दयनीयता अुपेक्षाच करावी !'

घनश्याम परंतु जेव्हा काळा रंग पाहताच ह्या गोऱ्यांना वाटणारा तुम्ही ज्यास 'साहजिक' म्हणता, तो अुद्वेग साहजिकपणाचा कडा सोडून खाडसाळ

अुपद्रवाचे स्वरूप धारण करू लागतो तेव्हा ! त्याचा वर्णद्वेष हा जातिद्वेषाचे आणि राष्ट्रद्वेषाचेच दुष्ट हत्यार होअू पाहतो तेव्हा ? तेव्हा तरी त्याची आम्हास चीड नको का यावयाला ? अहो, अिंग्लंडमध्ये असता अेका भरसभेत अेक मिशनरी-महाशय गंभीरपणे सांगू लागले की, 'अेशिया, आफ्रिका, अमेरिका येथील काळ्या रंगाच्या लोकांवर युरोपियनांनीच प्रभुत्व गाजविणे योग्य होय हा अीश्वरी संकेतच असला पाहिजे आणि तो संकेत स्पष्ट करण्यासाठी देवाने आमचा वर्ण गोरा केला आणि त्यांचा काळा कारण कोणत्याही जातींच्या वाङमयात वा समाजात शुचिता, शुद्धता, पवित्रता, आरोग्य, बल आणि प्रभुत्व ह्यांचा रंग श्वेत, गौर, स्वच्छ असाच निर्देशिला जातो आणि काळा रंग हा हीनतेचे, क्रूरतेचे, कळकटपणाचेच द्योतक मानले जाते ! ' ह्या त्याच्या चर्पटपंजरीतील अंतःस्थ दुष्ट हेतु राष्ट्रद्वेषावाचून दुसरा कोणताही नाही हे पाहून मला फार चीड आली आणि मी तिथल्या तिथेच प्रत्युत्तराची वेळ येताच ताडकन् अुभा राहून त्या मानभावी मिशनरीस हटकले की 'देव, देवदूत, देवतांचा रंग गौर, शुभ्र, स्वच्छ असाच वर्णिलेला असल्यामुळे जो जो गोरा वा पांढरा तो तो देव, देवता वा देवदूत असला पाहिजे, काळ्याहून श्रेष्ठ सुश्रीक, बलवान आणि प्रभुत्वास पात्र असला पाहिजे, हे आपले तर्कशास्त्र आम्हाला तंतोतंत पटले आहे आता हत्ती हा बहुधा काळा असतो आणि हजारो डुक्कर पांढरी स्वच्छ असतात तेव्हा यापुढे डुक्कर हेच हत्तीहून बलवान आणि सुश्रीक असे आपण सर्वांनी समजले पाहिजे ! अंगावर कोड अुठले की काळा मनुष्यही अितका गोरापान दिसू लागतो की, दुरून पाहताच तो कोणी गोरा मिशनरीच येतो आहे की काय असे वाटावे ! तेव्हा यापुढे कोड फुटलेल्या मनुष्यास आम्ही देवदूता-सारखा सन्मान दिला पाहिजे व्याघ्रसिंहाहून रानचे ससे अगदी हिमगौर वर्णाचे असतात, अर्थात् यापुढे रानातील राज्याचे प्रभुत्व सिंहव्याघ्रास पदच्युत करून, सशासच अर्पिले पाहिजे यापुढे सिंहाने सशास भ्यायले पाहिजे ! ग्रीक सैन्याच्या त्या शिकंदरी सेनापतीस भारतीय चंद्रगुप्ताने रणांगणात जेव्हा धूळ चारली तेव्हा त्या यवनाधिपति सेल्युकसने त्या चंद्रगुप्ताच्या पायावर जयश्रीच नव्हे तर आपली राज-कन्याही करभार म्हणून वाहिली यास्तव ते लाखो पराभूत गोरे ग्रीक सैनिक नि तो ग्रीक सेनानी सेल्यूकस हे सारे त्या लाखो श्यामल भारतीय सैनिकाहून नि त्या विजयी चंद्रगुप्ताहून शतपटीने अधिक बळिवंत असले पाहिजेत असा अेका नवीन शोधाची भर आता अितिहासात घातली पाहिजे ! तुम्ही आमच्या भारतीयांतील गौरवर्णीय जातीहून जितके अधिक गोरे आहात तितकेच ते रशियन लोक तुम्हा साम्राज्याहून अधिक गोरेपान—अगदी वैदिक 'हंस' वर्णाचे आहेत अर्थात अिंग्लंड-वर रशियनांचेच प्रभुत्व असावे ही तुमच्याच सूत्राप्रमाणे देवाची अिच्छा असली पाहिजे तर मग बोला, अिंग्लंडचा राजमुकुट रशियनांचे हवाली केव्हा करायचा ? '' रमाकान्त, ह्या माझ्या भडिमारासरशी तो मिशनरी पाण्यात टाकलेल्या ढेकळा-

सारखा विरघळून गेला आणि त्या शेकडो गोऱ्या स्त्रीपुरुषांनीच माझ्या वाक्या-गणीक मला टाळ्या दिल्या !'

रमाकांत : झाले तर! आमच्या सावळ्या रंगासाठी कोणी मर्यादेबाहेर दुष्ट-बुद्धीने अुपमर्द करू लागला तर त्याचे दात असे त्याच्या घशात कोंबले की झाले !

घनश्याम : अहो, पण, गोऱ्या लोकांतील मोठमोठे शहाणे आणि तत्त्वज्ञदेखील गोऱ्या जाती ह्या प्रभुत्वास निसर्गतः पात्र असून काळ्या रंगाचे लोक हे निसर्गतःच जीवनार्थ कलहात टिकाव धरण्यास अक्षम आहेत असा ठाम सिद्धान्त ठोकून देतात हे आश्चर्य नव्हे काय ?

रमाकांत : त्यात कसले आश्चर्य आहे ! शहाणे लोकही लुच्चे नसतात की काय ? अहो, ह्या गोऱ्या मूर्ख मिशनरींची काय कथा ? तो ॲरिस्टॉटलसारखा तत्त्वज्ञांचा मुकुटमणिदेखील अेकदा असेच भकून चुकला की ग्रीस देश हा देवाने जगावर स्वामित्व गाजविण्यासाठीच अुत्पन्न केला असला पाहिजे ! कारण जगाचे राज्य त्याच्या मध्यभागी राहूनच चांगले चालविता येणार, आणि ग्रीस हाच जगाच्या मध्यभागावर—आशिया, युरोप नि आफ्रिकेच्या संगमस्थानी निर्मिलेला आहे. अर्थात तोच जगद्राज्याचा अीश्वरनिर्मित पद्र असला पाहिजे! ॲरिस्टॉटलला माहीत असलेल्या जगावर त्या काळी ग्रीसचे प्रभुत्व होते म्हणून त्याला हा सिद्धान्त सुचला. पुढे तोच ग्रीस रोमचे पादपीठ झाले नि आज आहे की नाही ते जगाच्या आलेख्यात (नकाशात) सूक्ष्मदर्शक यंत्रातूनच पाहिल्यास दिसते. गेल्या शतकातीलच गमत पहा. युरोप—म्हणजेच पाश्चिमात्य राष्ट्रे ही प्रभुत्व गाजविण्यास निसर्गतःच सक्षम आणि पौर्वात्य दास होण्यास, हा सिद्धान्त बोकाळला होता, तोच जपानने रशियाचे कंबरडे मोडले ! तेव्हा जपान अपवाद ठरून अिंग्लंड आणि जपान ही दोन्हीही प्रबल राष्ट्रे या गोलार्धाच्या अुत्तरीय शीतकक्षेत असल्यामुळे आणखी काही शहाण्यांनी नवा सिद्धान्त काढला की अुत्तरीय शीतकक्षेतील देश हेच दाक्षिणात्य कक्षेतील देशांचे नैसर्गिक विजेते असणार ! पण रोम दाक्षिणात्य कक्षेतच मोडणारे असताही ह्या अुत्तरीय शीतप्रधान ब्रिटनभूमीला त्याने शतकोशतके आपली दासी करून ठेवलेली होती! ब्रिटनहून काळसर असणाऱ्या रोमच्या साम्राज्यात ब्रिटनच्या गोऱ्यापान रंगाचे अस्तित्व जर कशात अुपयोगी पडले असेल तर ब्रिटनच्या गोऱ्या-पान कन्यकांचा रोमन सैनिकांसाठी आणि सरदारांसाठी आवडत्या दासी म्हणून पुरवठा करण्याच्या कार्याचे काय ते होय. आपल्या लाटजाडीचे आणि अहंकाराचे समर्थन निसर्गाच्या आणि देवाच्या नावाने करण्याची खोड मनुष्यमात्रास लागलेली आहे. ठगाच्या अत्याचारांचीही अेक देवता होती आणि सैतानही सोयिस्कर वाटले तर आपल्या समर्थनार्थ बायबलचा आधार घेत असतो.

घनश्याम : पण मग काळा रंग हे अेक नैसर्गिक व्यंग आहे हे मघा तुम्हीच कसे म्हणालात ?

अुपद्रवाचे स्वरूप धारण करू लागतो तेव्हा ! त्याला वर्णद्वेष हा जातिद्वेषाचे आणि राष्ट्रद्वेषाचेच दुष्ट हत्यार होअू पाहतो तेव्हा ? तेव्हा खरी त्याची आम्हास चीड नको का यायला ? अहो, अिंग्लंडमध्ये असता अेका सभेत अेक मिशनरी-महाशय गंभीरपणे सांगू लागले की, 'अेशिया, आफ्रिका, अमेरिका येथील काळ्या रंगाच्या लोकांवर युरोपियनांनीच प्रभुत्व गाजविणे योग्य होय हा अीश्वरी संकेतच असला पाहिजे आणि तो संकेत ठसविण्यासाठी देवाने आमचा वर्ण गोरा केला आणि त्यांचा काळा. कारण कोणत्याही जातीच्या वाङ्मयात वा समाजात शुचिता, शुद्धता, पवित्रता, आरोग्य, बल आणि प्रभुत्व ह्यांचा रंग श्वेत, गौर, स्वच्छ असाच निर्देशिला जातो आणि काळा रंग हा हीनतेचे, क्रूरतेचे, मळकटपणाचेच द्योतक मानले जाते !' ह्या त्याच्या चर्पटपंजरीतील अंतस्थ दुष्ट हेतु राष्ट्रद्वेषावाचून दुसरा कोणताही नाही हे पाहून मला फार चीड आली आणि मी निघाल्या तिथेच प्रत्युत्तराची वेळ येताच ताडकन् अुभा राहून त्या मानभावी मिशनरीस म्हटले की 'देव, देवदूत, देवतांचा रंग गौर, शुभ्र, स्वच्छ असाच वर्णिलेला असल्यामुळे जो जो गोरा वा पांढरा तो तो देव, देवता वा देवदूत असला पाहिजे, काळ्याहून श्रेष्ठ सुश्रीक, बलवान आणि प्रभुत्वास पात्र असला पाहिजे, हे आपले तर्कशास्त्र आम्हाला पटलेले आहे. आता हत्ती हा बहुधा काळा असतो आणि हजारो डुकरें पांढरीं स्वच्छ असतात. तेव्हा यापुढे डुक्कर हेच हत्तीहून बलवान आणि सुश्रीक असे आपण सर्वांनी समजले पाहिजे ! अंगावर कोड अुठले की काळा मनुष्यही अितका गोरापान दिसू लागतो की, दुरून पाहताच हा कोणी गोरा मिशनरीच येतो आहे की काय असे वाटावे ! तेव्हा यापुढे कोड फुटलेल्या मनुष्यास आम्ही देवदूता-सारखा सन्मान दिला पाहिजे. व्याघ्रसिंहाहून रानचे ससे अगदी हिमगौर वर्णाचे असतात, अर्थात् यापुढे रानातील राज्याचे प्रभुत्व सिंहव्याघ्रास पदच्युत करून, सशासच अर्पिले पाहिजे. यापुढे सिंहाने सशास भ्यायले पाहिजे ! ग्रीक सैन्याच्या त्या शिकंदरी सेनापतीस भारतीय चंद्रगुप्ताने रणांगणात जेव्हा धूळ चारली तेव्हा त्या यवनाधिपति सेल्युकसने त्या चंद्रगुप्ताच्या पायावर जयश्रीच नव्हे तर आपली राज-कन्याही करभार म्हणून वाहिला. वास्तव ते लाखो पराभूत गोरे ग्रीक सैनिक नि तो ग्रीक सेनानी सेल्यूकस हे सारे त्या लाखो श्यामल भारतीय सैनिकांहून नि त्या विजयी चंद्रगुप्ताहून शतपटीने अधिक काळेकभिन्न असले पाहिजेत असा अेक नवीन शोधाचा भर आता अितिहासात घातली पाहिजे ! तुम्ही आमच्या भारतीयातील गौरवर्णीय जातींहून जितके अधिक गोरे आहात तितकेच ते रशियन लोक तुम्हा ताम्रमुखांहून अधिक गोरेपान—अगदी वैदिक 'हंस' वर्णाचे आहेत. अर्थात अिंग्लंड-वर रशियनांचेच प्रभुत्व असावे ही तुमच्याच सूत्राप्रमाणे देवाची अिच्छा असली पाहिजे. तर मग बोला, अिंग्लंडचा राजमुकुट रशियनांचे हवाली केव्हा करायचा ?'

रमाकांत, ह्या माझ्या भडिमारासरशी तो मिशनरी पाण्यात टाकलेल्या ढेकळा-

सारखा विरघळून गेला आणि त्या शेकडो गोऱ्या स्त्रीपुरुषांनीच माझ्या वाक्या-गणीक मला टाळ्या दिल्या !'

रमाकांत : झालें तर! आमच्या सावळ्या रंगासाठी कोणी मर्यादेबाहेर दुष्ट-बुद्धीने अपमर्द करू लागला तर त्याचे दात असे त्याच्या घशात कोंबले की झाले !

घनश्याम : अहो, पण, गोऱ्या लोकातील मोठमोठे शहाणे आणि तत्त्वज्ञदेखील गोऱ्या जाती ह्या प्रभुत्वास निसर्गतः पात्र असून काळ्या रंगाचे लोक हे निसर्गतःच जीवनार्थ कलहात टिकाव धरण्यास अक्षम आहेत असा ठाम सिद्धान्त ठोकून देतात हें आश्चर्य नव्हे काय ?

रमाकांत : त्यात कसलें आश्चर्य आहे! शहाणे लोकही लुच्चे नसतात की काय ? अहो, ह्या गोऱ्या मूर्ख मिशनरींची काय कथा ? तो ॲरिस्टॉटलसारखा तत्त्वज्ञांचा मुकुटमणिदेखील अेकदा असेंच भकून चुकला की ग्रीस देश हा देवाने जगावर स्वामित्व गाजविण्यासाठीच अुत्पन्न केला असला पाहिजे ! कारण जगाचें राज्य त्याच्या मध्यभागी राहूनच चांगले चालविता येणार; आणि ग्रीस हाच जगाच्या मध्यभागावर—आशिया, युरोप नि आफ्रिकेच्या संगमस्थानी निर्मिलेला आहे. अर्थात तोच जगद्राज्याचा अीश्वरनिर्मित केंद्र असला पाहिजे! ॲरिस्टॉटलला माहीत असलेल्या जगावर त्या काळी ग्रीसचे प्रभुत्व होते म्हणून त्याला हा सिद्धान्त सुचला. पुढे तोच ग्रीस रोमचें पादपीठ झाले नि आज आहे की नाही तें जगाच्या आलेख्यात (नकाशात) सूक्ष्मदर्शक यंत्रातूनच पाहिल्यास दिसतें. गेल्या शतकातीलच गंमत पहा. युरोप—म्हणजेच पाश्चिमात्य राष्ट्रे ही प्रभुत्व गाजविण्यास निसर्गतःच सक्षम आणि पौर्वात्य दास होण्यास, हा सिद्धान्त बोकाळला होता, तोच जपानने रशियाचे कंबरडे मोडले ! तेव्हा जपास अपवाद ठरून अिंग्लंड आणि जपान हीं दोन्हीही प्रबल राष्ट्रे या गोलार्धाच्या अुत्तरीय शीतकक्षेत असल्यामुळे आणखी काही शहाण्यांनी नवा सिद्धान्त काढला की अुत्तरीय शीतकक्षेतील देश हेच दाक्षिणात्य पट्टेतील देशाचे नैसर्गिक विजेते असणार ! पण रोम दाक्षिणात्य कक्षेतच मोडणारें असताही ह्या अुत्तरीय शीतप्रधान ब्रिटनभूमीला त्याने शतकोशतके आपली दासी करून ठेवलेली होती! ब्रिटनहून काळसर असणाऱ्या रोमच्या साम्राज्यात ब्रिटनच्या

रमाकांत आमच्यात ते अेक व्यंग आहे असे म्हटले म्हणजे त्या गोऱ्यात काहीच व्यंग नसून आमच्याहून सर्वतोपरी ते श्रेष्ठ आहेत आणि जगाच्या अंता-पर्यंत श्रेष्ठच राहणार आहेत असे ठरते की काय ? देहाच्या रंगाचा संबंध मुख्यत व्यक्तीशी राष्ट्रीय शक्तीशी, क्षमतेशी किंवा कर्तबगारीशी गोरेपणाचा वा काळे-पणाचा लवलेश संबंध नाही आज आमचे श्यामलवर्णीय हिंदी राष्ट्र जर गौर वर्णीय युरोपियनांपेक्षा राष्ट्रशक्तीत कनिष्ठ ठरत असेल, अवनत असेल तर तो परिणाम आमच्या सामाजिक, राजकीय आणि धार्मिक दुर्गुण नि दुबळेपणाचा आहे, आमच्या श्यामलवर्णाचा किंवा त्यांच्या गौरवर्णाचा नव्हे ! ते दुर्गुण नि दुबळेपणा नव्हता तेव्हा आम्ही राष्ट्र ह्या दृष्टीने श्यामल असूनही जगास भारी झालेलो होतो–ते दुर्गुण सुटताच पुन्हाही असेच भारी होऊ ! लंकेच्या गोऱ्या रावणाची दाही शिरं छाटणारा तो अयोध्येचा राजपुत्र घनश्यामलच होता ! तो गीताद्रष्टा सुदर्शनधारी श्रीकृष्णही घनश्याम होता ! आजही अर्धजगत् ज्याच्या चरणाची धूळ अंगारा म्हणून मस्तकी धरीत आहे त्या देवकल्प बुद्धाहून कुणी युरोपियन टॉमी अधिक गोरा आहे म्हणून अधिक श्रेष्ठ ठरणारा आहे की काय ! जपान्यांना मिशा नसतात म्हणून जसे ते मिशाळ रशियनांहून पौरुषात हीनतर ठरले नाहीत, तसेच आमचा रंग काळा म्हणून आम्हीही जित झालो नाहीत ! अेक वेळ जपानच्या वैयक्तिक बुटकेपणामुळे राष्ट्रीय शक्तीला किंचित कमीपणा येण्याचा संभव असू शकेल, पण आमच्या वैयक्तिक काळेपणाचा किंवा त्यांच्या वैयक्तिक गोरेपणाचा राष्ट्रीय शक्तीशी वा श्रेष्ठकनिष्ठतेशी लवलेश संबंध पोचू शकत नाही.

घनश्याम आणि वैयक्तिक श्रेष्ठकनिष्ठतेशी तरी काळ्या व गोऱ्या रंगाचा कोणता मोठा संबंध आहे ? आज देखील हिंदी विद्यार्थी युरोप अमरिकेच्या कोणत्याही विद्यापीठात गोऱ्या विद्यार्थ्यांच्या रतिभरही मागे नसता परकी देशाच्या भाषेच्या पक्षपाताच्या अडचणींशी त्याला तोंड द्यावे लागत असताही त्या अडचणी ज्यास मुळीच नसतात त्या गोऱ्या विद्यार्थ्यांमध्ये हिंदी विद्यार्थी व्यक्तिश अनेक स्थळी अुलट सरसच ठरलेला दिसतो वैद्यक, निबंध, शिल्प, यंत्र गणित–कोणत्याही विषयात युरोपियन पीठात हिंदी तरुण पहिल्या दहा क्रमांकातच बहुधा झळकतो–अगदी पहिल्या क्रमांकही तो अनेकदा पटकावतो या बौद्धिक समानते प्रमाणेच सैनिक–योग्यतेतही हिंदी सैनिक गोऱ्या सैनिकांशी व्यक्तिश तुल्यबळ तरी आहेच आहे, ही गोष्ट जर्मन महायुद्धात अगदी युरोपातील ताज्यातील ताज्या शस्त्रास्त्रानायुक्त शूरातील शूर अशा गोऱ्या जर्मनसैन्याशी आमच्या शीख, गुरखा सैनिकांनी ज्या लढाया झुंजविल्या त्यावरून निर्विवादपणे साऱ्या युरोपने मानली आहे तीच गोष्ट श्रमिक कर्मांची आहे मारिशसपासून तो ग्वायनापर्यंत, कॅनडा पासून कालिफोर्नियापर्यंत, अति शीत वा अति अुष्ण अशा कोणत्याही वायुमानात हिंदी श्रमिक हा त्यास कोणत्याही राजशक्तीचा ममत्वाचा पाठिंबा नसता

युरोपियन क्षत्रियांच्या चढाओढीत टिकून राहतो; नव्हे, आपल्या साध्या राहणीनें आणि कष्टक्षमतेने त्यांना न झेपेल असा प्रतिस्पर्धी बनू शकतो. फिजी, ग्वायना, आफ्रिका, मारिशसप्रभृति जगातील अनेक प्रदेशांत दासासारखे करारबद्ध करुन नेलेल्या लाखो हिंदी श्रमिकांनी केवळ आपल्या सहिष्णुतेच्या बळावर तिकडे मोठमोठ्या हिंदी वसाहती वसविल्या आहेत आणि ज्या गोऱ्या मळेवाल्याचे ते दास म्हणून गेले त्यांच्याच तोडीचे धनाढ्य मळेवालेही त्या हिंदी श्रमिकातील कित्येक कर्तबगार पुरुष हळूहळू झालेले आहेत ! तेव्हा आमच्या काळ्या रंगामुळे युरोपियन गोऱ्यांच्यापेक्षा कोणच्याही रीतीने शौर्य, धैर्य, बुद्धिमत्ता साहस, श्रमक्षमताप्रभृति पौरुषाच्या वैयक्तिक गुणात आम्ही लेशमात्र हीनतर ठरलेलो नाही. मग त्या काळ्या रंगास आमच्यातले व्यंग म्हणून आमच्यातील अेक अुच्चार करण्यासारखी नैसर्गिक अुणीव म्हणून आपण कोणत्या अर्थी समजावी आणि कां म्हणून मानावी ?

रमाकांत : केवळ ह्या अगदी दुय्यम अर्थीच मी ती मानतो की, त्यामुळे आपल्या शारीरिक सौंदर्यास अंशतः बाध येतो ! (सौंदर्य हें माणुसकीचा कोणताही महत्वाचा गुण नसलें, शौर्य, धैर्य, दया, दाक्षिण्य, प्रामाणिकपणा, जनतत्परता, थोडक्यात म्हणजे शील हें जरी सौंदर्याहून शतपटीने श्रेष्ठ असा सद्‌गुण असलें, शील असून सौंदर्य नसले तरी ती अुणीव तुच्छ, नि सौंदर्य ओसंडत असलें तरी शील नसलें तर तें माणूस माणूस नसून राक्षसासारखे भयंकर, हें जरी खरें असलें तरी शील असूनही सौंदर्य जर असलें तर तो मनुष्य देवदूतासारखा शोभू लागतो हेंही काही विसरता कामा नये. )

घनश्याम : मान्य. पण गोरेपणा म्हणजेच सौंदर्य नव्हे. सौंदर्यातही — शारीरिक सौंदर्यातही — शरीराची सुबक ठेवण, सुरेख अंगलट हीच नुसत्या शुभ्रतेहून, नुसत्या गोरेपणाहून अधिक नयनानंदकारी असते. आणि सुरेख अंगलटीत आणि सुबक तोंडावळ्यात आम्हा भारतीयाचें सौंदर्य युरोपियनांहून अेकंदरीत लवलेश कमी असत नाही. मी मघा म्हटल्याप्रमाणे डुकरें पांढरी शुभ्र असतात — हत्ती काळे असतात. पण डुक्कर तें डुक्कर — हत्ती तो हत्ती !

रमाकांत : पण हत्ती असूनही जर तो त्यातल्या त्यात शुभ्रही असला तर तो शोभेच्या प्रश्नापुरता तरी अधिक अभिलषणीय ठरणार नाही का ? अैरावत हिमधवल—यास्तव देवानीही रत्न म्हटला. पांढरा हत्ती हा आम्हीही राज्यलक्ष्मीचें भूषण समजतो ! तीच गोष्ट आधुनिक शरीरसौंदर्याच्याविषयी. सुबक वा सुडौल देहयष्टि असूनही त्याना, हेमगौर किंवा हिमगौर अंगकांतीची देणगी निसर्गाकडूनच लाभलेली असल्याने अेकंदर शरीरसौंदर्यात ते श्रेष्ठ ठरतात. कारण काही झालें तरी गोरेपणा हा शरीरसौंदर्याचा अेक अनुपेक्षणीय घटक आहे आणि काळेपणा हा सौंदर्यास बाधक आहे हें नाकारण्यात काही अर्थ नाही. सोन्यामोत्याचे अलंकार कोणा काळ्याकुट्ट शिद्दिणीला घातले तर ती होती त्याहून चांगली दिसेल, पण

तिच्या काळ्या रंगास त्या सोन्यामोत्यांच्या तेजाने जसा थोडासा उजळा येतो तसाच तिच्या सांवरी काळ्या छायेने त्या सोन्यामोत्यासही किंचित् काळवटपणा आल्याशिवाय रहात नाही. कोण्या ओषत् श्यामल कन्यकेला तेच सोन्यामोत्यांचे अलंकार अधिकच शोभतात आणि तीं सोनेंमोतीही सोन्यामोत्यासारखींच दिसतात. पण अेखाद्या गोऱ्यापान कन्यकेला तेच सोन्यामोत्यांचे अलंकार घातले असता तिची कांति खुलते! सौंदर्य जसें नाचू पाहतें! आणि सोन्याचे अलकार तिच्या कांतीनें सोन्याहूनही पिवळे आणि मोती मोत्याहूनही पाणीदार भासतात! (म्हणून हा प्राण्यांचा अनेक गुणांत राजा आहे. सौंदर्यानेही सुंदर प्राण्यांचा जेव्हा तो राजा शोभतो तेव्हा तें त्याच्या त्या अेकदर श्रेष्ठतेस अधिकच साजतें आणि सौंदर्यानेही निसर्गाची राणी साजण्यास मानवी सुंदरतेची सुवर्णप्रभ देहकांति सोन्याच्या कोंदणा-तच खुलून दिसावयास हवी. मोरासारख्या सुंदर प्राण्यास वा हरणासारख्या सुरेख मृगास अेखादी काळी कन्यका कुरवाळीत अुभी राहिली तर तो सुंदरतेत त्याची स्वामिनी शोभण्यापेक्षा दासीच भासू लागेल. पण मोरास वा हरिणास कोणी गोरी-पान कन्यका कुरवाळीत राहिली तर ती सौंदर्यातही त्यांची राणीच साजेल!)

घनश्याम : पण मी म्हणतो निदान आपणा आर्यांचा रंग वैदिक काळात तरी हिमासारखा किंवा सोन्यासारखा गोरापान होता ही गोष्ट त्या काळच्या वैदिक वर्णनावरून स्पष्ट असताही आमचा रंग पुढे अितका काळा कां पडत गेला?

रमाकांत : त्याची पुष्कळ कारणे सांगता येण्यासारखी आहेत. पण अितर कृष्णवर्णीयांसह झालेले प्रतिलोम, अनुलोम वा संकर-रक्तबीजसंबंधप्रभृति दुय्यम कारणे वगळली असता आपणा भारतीय आर्यांपुरते तरी आपला गोरा रंग काळा पडण्याचे प्रमुख कारण म्हटलें म्हणजे आमच्या देशाचें अुष्णतामान हेच होय. म्हणूनच आपल्या देशात काश्मीरसारख्या शीत प्रांतात आजही गोरापान रंग पुष्कळ प्रमाणात टिकलेला आहे — आणि मद्राससारख्या अुष्ण प्रांतात ब्राह्मणही भिल्लासारखे काळवडून गेलेले दिसतात. जे युरोपियन लोक ब्राझिल प्रभृति अुष्ण अमेरिकेत किंवा अत्युष्ण आफ्रिकेत वसाहती करून राहिले त्यांचा गोरा रंग अेका चारपाच पिढ्यांतच ध्यानात येण्यासारखा काळवडत जात आहे. मग आज पांच हजार वर्षांच्या अुष्ण वायुमानाने आम्ही भारतीय आर्य अितके काळवडलो यात काही आश्चर्य नाही

घनश्याम जर आमचा गोरा रंग अुष्ण वायुमानाने पाच हजार वर्षांत अितका काळवडला तर तो पुढच्या पाच हजार वर्षांत आफ्रिकेच्या सिद्द्यांसारखा अगदी कोळशाप्रमाणे काळाकुट्ट होणार की काय? आणखी अेक गमतीची शंका— आज कोळशासारख्या असणाऱ्या सिद्द्यांच्या काळ्या रंगावर आफ्रिकेच्या भयंकर अुष्णतेचे ताप बसता बसता तो पुढे माणिकरत्नासारखा तेजःपुंज होअून अुठणार नाही कशावरून! कारण कोळशाचीच कुठे कुठे माणिकें, रत्ने होतात म्हणून अैकतो!

रमाकांत — पण दहा हजार वर्षांनी पुढे माणिक रत्नासारखा चमकदार रंग व्हावा म्हणून आधी पाच हजार वर्षे कोळशासारखी काळीकुट्ट तोंडे मिरविण्यास सिद्ध आहात का? कोळशाचीच पुढे माणिके होतात ही तुमची कल्पित गृहीत धरून विचारतो.

घनश्याम — अहो, सिद्ध न होऊन करणार काय? आपण म्हणता तसा जर अुष्ण वायुमानाचा हा नैसर्गिक परिणाम असेल तर हिंदुस्थानच्या नागरिकांना दिवसदिवस अधिकाधिक काळे पडण्यावाचून गत्यंतरच नाही. अत्यंत क्षुल्लक का होअीना पण शारीरिक सौंदर्यातले हे व्यंग आम्हास केव्हाही पुसून टाकता यावयाचे नाही. टिकाअूपणात युरोपच्या आम्ही व्यक्तिशः समान वा वरचढ असताही दिखाअू-पणात नेहमीच हीन ठरणार! कारण नैसर्गिक वातावरण कोण बदलू शकणार?

रमाकांत — (निसर्गच! अहो, निसर्गाचे मनुष्यास सोयीस्कर नसलेले नियम बदलून देणारा प्रतिनियम निसर्गच आम्हास अनेक वेळा पुरवीत आलेला आहे, विषास प्रतिविष आणि रोगास औषधे देत आलेला आहे!) काळ्या जातीत दोन भेद पाडता येतात. मनुष्याची अुत्पत्ति ही वानरा वा मर्कटाचाच विकास मानला तर ह्या प्राण्यांत काही लाल तोंडाची, काही काळ्या तोंडाची तर काही शुभ्र असतात. ह्यावरून त्यांना मनुष्यपण येऊ लागले तसे मनुष्यांतही त्या वंशपरंपरे-प्रमाणे मूळपासूनच काळा, तांबूस वा श्वेतवर्ण अुतरला असावा. ज्या मानवजाती कधीतरी गोऱ्या होत्या असा पुरावा मुळीच मिळत नाही, त्यांना हे स्पष्टीकरण लागू पडेल. पण आपल्या भारतीय आर्यांचा रंग मूळचा अगदी 'हंस धवल' असल्याची निश्चितिच असल्याने आपण आज काळसर जे पडत चाललो आहो तो मुख्यत्वेकरून अुष्ण वायुमानाचाच अर्वाचीन परिणाम असला पाहिजे, अपरिवर्तनीय-पणे ठाम झालेला आनुवंशाचा नाही. कारण अजूनही आपल्या अनेक जातींत स्पेन-पोर्तुगिजाअितका तरी गोरेपणा असणारी माणसे आढळतातच. अर्थात ज्या अर्थी सर्व आर्यांनाच अुष्ण वायुमानात राहावे लागत असूनही अद्याप सगळेच अगदी काळे झाले नाहीत तर अेका कुटुंबातील भावंडात सुद्धा काही युरोपातील स्पेन अिटलीत सहज मिसळून जावी अितकी गोरी मुले नि काही काळी निपजतात त्या अर्थी भारतीय अुष्णवायुमानाचा आमच्या मूळच्या गोऱ्या रंगावर होणाऱ्या वाईट परिणामास हाणून पाडून त्या वातावरणातही गोरेपणा टिकवू शकणाऱ्या माता

अुडू लागली. हिंदु लोक त्यांच्या भारतीय राष्ट्राची संघटना करीत असता आपण आपल्या गर्दभीय राष्ट्राची संघटना न करता स्वस्थपणे कुंभाराची ओझी वाहत पडावें, याची गाढवांतील कर्त्या पुढाऱ्यांस लाज वाटू लागून त्यांनीही गाढव संघटनाची चळवळ हाती घेण्याचें ठरविलें. त्याप्रमाणे निरनिराळ्या रानातून भटकत असलेल्या रानटी गाढवांच्या कळपांनी आपआपले प्रतिनिधि निवडून ते नागरिक गाढवांच्या समित्यांतून धाडावे आणि हिंदुस्थानातील कोणत्या तरी मुख्य नगरी प्रतिवर्षी अखिल भारतीय गाढव ज्ञातीचा अेक राष्ट्रीय गोंधळ भरवावा असें ठरून त्यांचीं अधिवेशनेंही भरू लागलीं. त्यांपैकी अगदी काल परवाच भरलेल्या अेका सभेची माहिती आमच्या वाचकांस त्या चळवळीचें स्वरूप समजण्यासाठी खाली देत आहोत.

ही सभा भरविण्यासाठी नगराच्या कुंभारवाड्यासमोरील विस्तृत अुकिरड्याचें मैदानच निश्चित करण्यात येअून तें अनेक तरुण गाढवांनी फुकून फुंकून साफ करून ठेविलें होतें. या सभेसाठी शेकडो प्रतिनिधि ठिकठिकाणच्या अखिल गाढवीय मज-लम-जि-आमच्या शाखांकडून धाडण्यात आलेले होते. आरंभ होताच सभेच्या कार्य-वाहकाने त्या जमलेल्या गाढवांत जें अत्यंत शाहणें होतें, त्याचें नांव सुचविलें आणि अनुमोदन मिळून तें शहाणें गाढव अध्यक्षपदावर विराजमान झालें. त्याच्या अध्य-क्षीय भाषणात त्यानी सांगितलें की, 'आपलें गर्दभीय राष्ट्र हें वास्तविक पाहता हिंदु-राष्ट्राच्याही आधीचें आहे. संस्कृतमध्येही पुराणातून तत्कालीन ज्या अनेक राष्ट्रांचा अुल्लेख केला आहे, त्यात किरातादिक नावांसहच 'गर्दभाः' नावाच्या जातीचा अुल्लेख येतो. खरें पाहता या भारतभूमीचे मूळचे रहिवासी आम्ही गाढवच आहोत. कारण शास्त्राच्या शोधावरून हें निश्चित झालें आहे की, मनुष्यजात ही गाढवा-नंतर जन्मास आली. नव्हे, मी तर असें छातीठोकपणे सांगतो की प्रत्येक मनुष्याचें मूल हें जन्मत. गाढवच असतें. विकृत शिक्षणानें तें पुढे गाढवपणास अंतरून माणुस-कीच्या परधर्मात ढकललें जातें. या दृष्टीने पाहता प्रत्येक माणसाच्या मुलास या

आहे. अितकेच नव्हे तर ते अुलट आपल्यातील कित्येक सन्मान्य गाढव नागरिकांस शुद्ध करून माणुसकीची दीक्षा देत चालले आहेत! त्याच्या संघटनेचा प्रतिकार करणे, हे आपणा सर्व अस्सल गाढवांचे पवित्र धर्मकृत्य आहे असे आपण समजले पाहिजे. हे हिंदुलोक किती वेडगळ आहेत पहा! ते म्हणतात, 'देवाने त्यास जो माणुसकीचा संदेश दिला आहे तोच संपूर्ण धर्म होय!' त्यास मी बळपूर्वक असे विचारितो की, कोणाचे कान जास्त लांब आहेत? तुम्हा माणसांचे की, आम्हा गाढवांचे? जर आम्हा गाढवांचे कान जास्त लांब आहेत हे तुम्हास नाकारिता येत नाही तर मग तुमचे कान आखूड आणि आमचेच लांब करण्यात देवाचा काही विशिष्ट हेतु आहे की नाही? तो हेतु हाच नव्हे का की तुमच्यापेक्षा आमचे कान अधिक लांब आणि मोठ्या मानाचे असल्याने, देवाचे शब्द तुमच्यापेक्षा आम्हास अधिक लौकर आणि अधिक पूर्णपणे अैकू यावेत? तुमच्या लहान कानात देवाचा संपूर्ण संदेश मावेना म्हणून तर मग त्याने आमच्या कानास तो संदेश संपूर्णपणे मावेल अितके मोठे केले ही गोष्ट अितकी स्पष्ट असता हिंदु लोक त्याच्या माणुसकीसच संपूर्ण धर्म समजून आमच्या गाढवकीस अपूर्ण धर्म समजतात हा त्या हिंदूचा केवढा गाढवपणा आहे! छे! छे! हा विचार माझ्या मनात आला की, त्या हिंदुसंघटनवाद्यांच्या वल्गनांचा मला अगदी राग येतो! त्यांस खाअू का गिळू असे मला होअून त्याचा असा प्रबळ निषेध करावासा वाटतो.'

अितके बोलताच सात्त्विक रागाने फुरफुरत त्या अध्यक्षीय गाढवाने चटकन वळून आणि सभेकडे पाठ फिरवून हिंदुसंघटनाचा प्रबळ निषेध करण्यासाठी अितक्या जोराने दुगाण्या झाडल्या की, त्याच्या पुढचे ते टेबल ताडकन अुडून श्रोतृसमाजावर जाअून आदळले. त्यासरशी सर्व सभासद 'हिंदु संघटनाचा जोराचा निषेध करा' म्हणून अेकच गर्जना करीत आपआपल्या दुगाण्याही जोराने झाडू लागले. त्या राष्ट्रीय अुत्साहाच्या भरात कोणाच्या दुगाण्या कोणास लागत आहेत, याचे कोणाही गाढवास भान अुरले नाही! ती सभा कोणत्या पक्षाची आहे हे अगदी माहीत नसणाऱ्या कोण्या अडाणी परस्थास देखील त्या वेळेस माजलेल्या त्या नुसत्या लाथांच्या सुकाळावरूनच बिनचूकपणे सांगता आले असते की हा ध्यानगाढवीय मनाऱ्स अि आम चाच राष्ट्रीय गोंधळ असला पाहिजे. तिकडे या सभागृहातील शेकडो दुगाण्यांच्या झाडण्याने आणि गर्जनेने अधिकच अुत्साहित होअून अध्यक्षांचे व्याख्यान प्रबल वेगाने सारखे फुरफुरत चालले. त्या अध्यक्षांच्या वक्तृत्वाचे विषयात हात घालील असा त्या अुभ्या गाढव समाजात कोणीही मनुष्य नव्हता. तो अेकदा व्याख्यानाचे भरात गर्जू लागला की, गाढवातल्या सिंहासारखा घोंघू लागे.

या गर्जन-तर्जनांच्या भरात ती सभा अशी अगदी रंगून गेली असता, अेकाअेकी दोन चार मनुष्ये त्या सभेत अत्यंत नम्रपणाने हात जोडून आत येताना

हेंही त्या दुर्लक्षाचे अेक कारण आहे खरेच. परंतु आता मनुष्याच्या जीवनशी अत्यंत संबद्ध असताही आज मनुष्यास ज्ञात असणाऱ्या सर्व शास्त्रांत अत्यंत मागासलेले असणाऱ्या त्या गर्भशास्त्राकडेही शास्त्रीय शोधकांचे लक्ष वेधले जाअू लागले आहे. मनुष्याची रुची पालटविणाऱ्या ग्रंथी कोणच्या, मस्तिष्कातील कोणच्या ज्ञानपिंडाचीं वा ज्ञानतंतूंचीं कार्यें कोणचीं, गर्भावर विभिन्न अन्नपाणी प्रकाश ह्यांचे काय विभिन्न परिणाम घडतात, अनुवंशाचा (हेरिडिटी) परिणाम कुठपर्यंत अपरिवर्तनीय समजावा लागेल आणि परिवर्तन (व्हेरिअेशन) मात्र शारीरिक असो वा मानसिक कुठे कसे होअू शकते अित्यादि अनेक महत्वाचे शास्त्रीय सिद्धान्त आमच्या ज्ञानाच्या आटोक्यांत येत आहेत. मुलगा किंवा जे काहीं अपत्य हवें असेल तेंच नेमके होण्याचा वैज्ञानिक निश्चितीचा नियमही सापडल्यासारखाच आहे. जन्माच्या आधीच गर्भाचा लिंगनिर्णय करता येअू लागला आहे. अितकेच नसून जन्मानंतरही शस्त्रक्रियादिक अुपायांनी लिंगपरिवर्तन अनेक प्रकरणीं करण्यात आले आहे. आतापर्यंत ज्यास आपण मेलेले समजून पुरून वा जाळून टाकू असा काही हृदयविषयक रोगांनी मेलेल्यांना जिवंत करता येअू शकतें. फार काय, पुरुष संयोगावाचून स्त्रियांस गर्भसंभव नि प्रजोत्पादन नुसतें टोचून घेतल्यानेही साध्य आहे हें गाल्ट डॉ. कार्नेर यांच्या आश्चर्यकारक प्रयोगावरून आता मान्य करावेच लागेल असे दिसते. फार नको, आणखी दोनशे वर्षांच्या आंत जर शास्त्रज्ञांनी गर्भविज्ञानावर अगदी नेटाचा हल्ला चढविला आणि वैज्ञानिक प्रयोगांना मारा सारखा चालू ठेवला तर आज आपण कपडा जसा हवा तसा विणतो तसा मनुष्य मागणीप्रमाणे घडविता आला ना — अितकी अुंची, पुरुष की स्त्री, असा रंग, अशी मुद्रा, असे मन, अितकी बुद्धि, अशी मापें घेअून मनुष्य घडविता आला ना — तरी मला आश्चर्य वाटणार नाही! कारण निसर्ग हा मनुष्याहून ज्या अर्थी नियमानेंच करतो त्या अर्थी ते नियम समजतांच त्यांत हवी ती निवड करणे मनुष्यास शक्य असलेच पाहिजे. ती शक्ति त्या निसर्गानेच मनुष्यात ठेवली आहे असा अनेक प्रकरणीं — अपवाद वजा जाता — आजपर्यंतचा अनुभव आहे.

घनश्याम : परंतु असे मनुष्यनिर्मितीचे शोध ज्या ज्या शास्त्रज्ञांनी लावले त्यांना रंगपरिवर्तनाचा शोध अजूनही लागला नाही यावरून तो दुर्घट दिसतो नाही का?

रत्नाकांत : त्याचें अेक कारण आहे. युरोपियन वैज्ञानिक, जे आज संशोधनाचे नेते, ते गोरे असल्यामुळे रंगपरिवर्तनाची आवश्यकताच त्यांस नसल्याने त्यांनी त्या प्रकरणीं कसून यत्नच केले नाहीत. पण ग्रामोलसारख्या अुष्ण प्रदेशांत जे गोरे वसाहतवाले काळवंडू लागले आहेत त्यांचे लक्ष गोरा रंग टिकविण्याकडे असून त्यांनी त्या कार्यी पुष्कळ प्रगति केली आहे! काळ्या अुंदरावर प्रयोग करून विशिष्ट रसायन टोचल्यानें ते पांढरे शुभ्र होतात असे सिद्ध झाल्याचें अलीकडेच अैकिवात

आलें. परंतु काळ्या रंगास धुवून देहास गौरवर्ण करण्याची आवश्यकताच भारतास आज निकडीची असल्याने भारतीय वैज्ञानिकांनीच हा प्रश्न तावडतोब हाती घेतला पाहिजे. जर ते त्यावर आपल्या बौद्धिक बळाचा मारा सारखा करतील तर प्रयो-गांती असें अेखादें रसायन सापडल्यावाचून बहुधा राहणार नाही की, जें अंगात टोचलें असता वा गर्भात संचविलें असता या पिढीचा वा पुढील पिढ्यांचा रंग आमच्या पूर्वजांप्रमाणे पुन्हा गोरापान होअू शकेल.

घनश्याम : खरोखरच जर असा अेखादा रंगपरिवर्तनाचा शोध लागला तर मला तुमच्याहूनही अधिक आनंद होअील ! यद्यपि शौर्य, धैर्य, युक्ति, दया, दाक्षिण्य प्रभृति माणुसकीच्या कोणच्याही महत्त्वाच्या टिकाअू गुणात भारतीय व्यक्ति ही युरोपियन व्यक्तीशी व्यक्तिशः तुल्यबळच ठरते आणि शारीरिक सौंदर्याच्या सापेक्षतः अुपेक्षणीय असणाऱ्या दिखाअू गुणांतही देहाच्या सुरेख ठेवणीत हीनतर ठरत नाही तरीही जो नसल्यास मुळीच नडत नाही, पण असल्यास हवासाच आहे तो गौरवर्णही जर आम्हांस लाभला तर सोन्याहून पिवळेच होअील ! तर मग आता प्रथम विशेषतः आमच्या भारतीय वैज्ञानिकांचें लक्ष ह्या रंगपरिवर्तनाचा शोध लावण्याकडे प्रबलपणे वेधण्याचा तुम्ही प्रयत्न करा आणि जिकडे तिकडे प्रसिद्ध जाहिराती फडकवून की, 'पाहिजे ! देहाचा काळा रंग बदलून गोरा करणारें रसायन पाहिजे!' हें काम तुमचें. मी म्हटल्याप्रमाणे जो कोणी संशोधक असा अुपाय शोधील त्यास दहा लक्ष रुपये निनावी पारितोषिक धाडून देण्याचें काम माझें ! माझा पत्ता मात्र कुणालाही लागू दिला न पाहिजे !

रमाकांत : अच्छा, मी माझ्या कामास लागतोच म्हणून समजा पण माझाही पत्ता लागू न देता !

असें म्हणत ते दोघेही अंधेरात बेपत्ता झाले !

हा लेखही आमचेकडे प्रेषकाच्या पत्त्यावाचून आलेला आहे.

नाहीतरी कोणत्याही मानवी लेखाचा मूळ प्रेषक कोण याचा पत्ता कोणासही लागत नसतोच ! !

\+ + +

## ४. गाढव संघटन

गेल्या अेकदोन वर्षांमध्ये हिंदुसंघटनाची चळवळ जशीजशी प्रबळ होत चालली, तशीतशी तराअीच्या रानापासून तो थेट मलबार सिंधुतीरापर्यंत राना-वनातून आणि गावागावातून विखुरलेल्या असलेल्या गाढव समाजात मोठी खळबळ

सुरू झाली. हिंदु लोक त्यांच्या भारतीय राष्ट्राची संघटना करीत असता आपण आपल्या गर्दभीय राष्ट्राची संघटना न करता स्वस्थपणे कुंभाराची ओझीं वाहत पडावे, याची गाढवांतील कित्येक पुढाऱ्यांस लाज वाटू लागून त्यांनीही गाढव संघटनाची चळवळ हाती घेण्याचे ठरविले. त्याप्रमाणे निरनिराळ्या रानांतून भटकत असलेल्या रानटी गाढवांच्या कळपांनी आपापले प्रतिनिधि निवडून ते नागरिक गाढवांच्या समितीकडे धाडावे आणि हिंदुस्थानांतील कोणत्या तरी मुख्य नगरी प्रतिवर्षी अखिल भारतीय गाढव जातीचा एक राष्ट्रीय गोंधळ भरवावा असे ठरून त्यांची अधिवेशनेंही भरू लागली. त्यांपैकी अगदी काल परवाच भरलेल्या एका सभेची माहिती आमच्या वाचकांस त्या चळवळीचे स्वरूप समजण्यासाठी खाली देत आहोत.

ही सभा भरविण्यासाठी नगराच्या कुंभारवाड्यासमोरील विस्तृत उकिरड्याचे मैदानच निश्चित करण्यात येऊन ते अनेक तरुण गाढवांनी फुंकून फुंकून साफ करून ठेविले होते. या सभेसाठी शेकडो प्रतिनिधि ठिकठिकाणच्या अखिल गाढवीय मज-लस नि आमच्या शाखांकडून धाडण्यात आलेले होते. आरंभ होताच सभेच्या कार्यवाहकाने त्या जमलेल्या गाढवांत जे अत्यंत शहाणे होते, त्यांचे नाव सुचविले आणि अनुमोदन मिळताच ते शहाणे गाढव अध्यक्षपदावर विराजमान झाले. त्यांच्या अध्यक्षीय भाषणांत त्यांनी सांगितले की, 'आपले गर्दभीय राष्ट्र हे वास्तविक पाहता हिंदुराष्ट्राच्याही आधीचे आहे. संस्कृतमध्येही पुराणांतून तत्कालीन ज्या अनेक राष्ट्रांचा उल्लेख केला आहे, त्यांत किरातादिक नावांसहच 'गर्दभा' नावाच्या जातीचा उल्लेख येतो. खरे पाहता या भारतभूमीचे मूळचे रहिवासी आम्ही गाढवच आहोत. कारण शास्त्राच्या शोधावरून हे निश्चित झाले आहे की, मनुष्यजात ही गाढवानंतर जन्मास आली. नव्हे, मी तर असे छातीठोकपणे सांगतो की प्रत्येक मनुष्याचे मूल हे जन्मतः गाढवच असते. विकृत शिक्षणानेच पुढे गाढवपणास अंतरून माणुसकीच्या परधर्मात ढकलले जाते. या दृष्टीने पाहता प्रत्येक माणसाच्या मुलास या

आहे. अितकेच नव्हे तर ते अुलट आपल्यातील कित्येक सन्मान्य गाढव नागरिकां-राच शुद्ध करून माणुसकीची दीक्षा देत चालले आहेत ! त्याच्या संघटनेचा प्रतिकार करणे, हे आपणा सर्व अस्सल गाढवांचे पवित्र धर्मकृत्य आहे असे आपण समजले पाहिजे. हे हिंदुलोक किती वेडगळ आहेत पहा ! ते म्हणतात, 'देवाने त्यास जो माणुसकीचा संदेश दिला आहे तोच संपूर्ण धर्म होय ! त्यास मी बळपूर्वक असे विचारितो की, कोणाचे कान जास्त लांब आहेत ? तुम्हा माणसांचे की, आम्हा गाढवांचे ? जर आम्हा गाढवांचे कान जास्त लांब आहेत हे तुम्हास नाकारिता येत नाही, तर मग तुमचे कान आखूड आणि आमचेच लांब करण्यात देवाचा काही विशिष्ट हेतु आहे की नाही ? तो हेतु हाच नव्हे का की तुमच्यापेक्षा आमचे कान अधिक लांब आणि मोठ्या भोकांचे असल्याने, देवाचे शब्द तुमच्यापेक्षा आम्हास अधिक लौकर आणि अधिक पूर्णपणे अैकू यावेत ? तुमच्या लहान कानात देवाचा संपूर्ण संदेश मावेना म्हणून तर मग त्याने आमच्या कानास तो संदेश संपूर्णपणे मावेल अितके मोठे केले ही गोष्ट अितकी स्पष्ट असता हिंदु लोक त्यांच्या माणुस-कीसच संपूर्ण धर्म समजून आमच्या गाढवकीस अपूर्ण धर्म समजतात, हा त्या हिंदूंचा केवढा गाढवपणा आहे ! छे ! छे ! हा विचार माझ्या मनात आला की, त्या हिंदुसंघटनवाद्यांच्या वल्गनांचा मला अगदी राग येतो ! त्यास खाअू का गिळू असे मला होअून त्यांचा असा प्रबळ निषेध करावासा वाटतो '

महत्त्वाचीच आहे. म्हणजे आमच्या जातीशी तुमच्या जाती अापण होऊन रोटीबेटी-व्यवहार देखील करितील.'

'करतील असें कशाला म्हणता ? हे आम्ही, हीं सर्व गाढवें आत्ता देखील करावयास सिद्ध आहोत.' उत्साहानें तो नवागत मनुष्यें म्हणाला. 'तुम्ही नवीन संस्था काढण्याच्या भानगडींत कशास पडता ? आमच्या स्वत:च्या शिक्षणसंस्था विश्वप्रेमाच्या पायावरच आम्ही उभारलेल्या असल्यानें, त्यात आम्ही मुलांमुलींस 'माणुसकी आणि गाढवकी' यात काहीच फरक नाही असें शिकवीतच असतो त्यातच आपण आपल्या बुद्धिमान् गाढव मुलांमुलींस धाडावें. माणसात आणि गाढवात काहींअेक फरक न मानिता सर्व अेकाच निराकार अीश्वराचीं लेकरें आहेत, हे सक्रिय रीतीनें सिद्ध करण्याचा विडाच आम्ही अुचलला आहे. यासाठी आमच्या मुलींनी अेक विश्वप्रेमी मध स्थापिला असून त्यांनी प्रतिज्ञाच केल्या आहेत की, — वरीन तर गाढवालाच वरीन. दुसऱ्या व्यावहारिक विश्वप्रेम न ठेवता तें पुनि पंथ स्वपाकें च समदर्शी होअून प्रत्यक्ष आचरून दाखवीन !'

हें अेकताच त्या सभेतील श्रोतृवृंद हर्षातिरेकानें अेकमहाच गर्जना करू लागला. अध्यक्षही प्रसन्न झाले आणि सर्वजणानी त्याच्या समाजात येअू अिच्छिणाऱ्या या नवागताचें मन:पूर्वक स्वागत करीत म्हटले, 'ज्या आपणास गाढवपणाचा आमच्याहूनही अधिक अभिमान वाटतो, त्या आपणास आम्ही आमच्या जातीचेच समजत आहोत. या असे या.' अध्यक्ष म्हणाले, 'आज माणुसकीवर गाढवकीचा विजय झाला आहे. आमचें गाढव-संघटन हिंदुसंघटनाचें लवकरच नाक कापील ! आता आज बराच अुशीर झाल्यानें सभा संपविली पाहिजे.' अध्यक्षांचें भाषण संपताच कार्यवाहानें अध्यक्षाचे आभार मानिले व म्हटले, 'गर्दभाचार्यांसारखा आमच्या गर्दभीय संस्कृतीचा अभिमानी विरळाच सापडेल. त्यांच्यात आमच्या गाढवपणाचें सर्व शहाणपण अेकवटलेलें आहे. आम्हा गाढवात अितका थोर गाढव आजपर्यंत झालाच नाही त्या जातीच्या आणि त्याचप्रमाणें आम्हा गाढवांशी बेटीव्यवहारही आजच्या आज करण्याचें नीतिधैर्य ज्यानी दाखविलें त्या ह्या नवागत माणूस-गाढवाचेही मी आभार मानीत आहे.'

शेवटी गाढव-संघटनाच्या जयजयकाराच्या आकाश दुमदुमवून टाकणाऱ्या खिकाळ्यात ती पॅन-गाढवीय-मजलस-अि-आमची सभा विसर्जन पावली.

# ५. शेंदाडपूरचा शिवाजी अुत्सव

गेल्या पंधरवड्यात नागूजीरावाच्या जिवाची अेकच तारावळ अुडालेली होती। कारण त्याच्या वास्तव्याने पावनलेल्या शेंदाडपुरात ह्या वर्षापासून शिवाजी-अुत्सव प्रथमच चालू करण्याचा बेत ठरला होता

महाराष्ट्रातल्या अनेक नगरातून जरी शिवाजी-अुत्सव गेल्या पंचवीस वर्षां-पूर्वीपासून होत आला असला तरी शेंदाडपूरच्या नागरिकांनी आजवर त्याच्याकडे जो पाठ फिरवलेली होती ती काही त्यांना त्या अुत्सवाला तोंड देण्याची छाती नव्हती म्हणून नव्हे पुण्याकडचे कुचेष्टेखोर लोक तसे हिणवत, पण शेंदाडपूरचे नागरिक आजवर तो अुत्सव जो करीत नव्हते त्याचं मुख्य कारण असे होत की, पहिली कित्येक वर्षे तो अुत्सव काही संशयित वर्तनाच्या लोकांनी काढलेली अेक जाती-जातीत वैमनस्य फैलावणारी टूम होती अुत्सवात भाग घेणे हे त्या वेळी सुसरूप सभ्यतेचे किंवा निर्धोक नि अनपवाद राष्ट्राभिमानाचे कृत्य समजले जात नव्हते, पण आता त्या अुत्सवातील विष काढीत काढीत तो अगदी पाण्याहून पातळ, पाणी तेरा रंग कैसा -- जिसमें मिलेगा वैसा, असा झाला, त्यात राष्ट्रातील वाटेल त्या गणगाला आता भाग घेता येअू लागल्यामुळे त्याला पूर्णपणे राष्ट्रीय स्वरूप आले आहे त्यात आता हिंदु मुसलमान, ख्रिश्चन, पारशी, यहुदी, अदमानी, नीग्रो, हबशी, अिराणी, तुराणी प्रभृति हिंदुस्थानातीलच काय, पण जगातील कोणच्याही जातीच्या सभ्य गृहस्थास मनमोकळ्या सुखरूपपणे, निर्धोक सामावता येते गव्हर्नर व मिशनर-देखील त्याचे अध्यक्ष होअू शकतात खानसाहेब, मुल्लाजी, पाद्री मुख्य वक्ते होण्यास नाकारीत नाहीत, असे अत्यंत शुद्ध राष्ट्रीय स्वरूप त्यास आले तेव्हा आता शेंदाड-पूरच्या राष्ट्राभिमानी नागरिकांना तो हवासा वाटू लागला यामुळेच पूर्वी त्या अुत्सवापासून दहा पावलं दूर राहणाऱ्या नागूजीरावासारख्या गृहस्थांनीही ह्या वर्षापासून 'शिवाजीमहाराज की जय' असे प्रकटपणे गर्जून गर्जून त्या शेंदाडपूरचे वातावरण दुमदुमविण्यास दोन पावले सगळ्यापुढे राहावयाचं असे नक्की ठरविले होते त्यातही नागूजीरावांचे रचित्व त्याच अुत्सवात जगतासमोर प्रथमच प्रकटा-वयाचे होते। त्यायोगे अर शिवाजीमहाराजाविषयीचा नागूजीरावाचा अभिमान त्यांना सळो का पळो करून सोडता झाला अुत्सवाविषयी सर्व लोकात अपूर्व अुत्साह संचरविण्यासाठी अुत्सवमंडळाचे ते कार्यवाह श्रीयुत कविवर नागूजीराव, हे जातीने गावभर हिंडत होते, 'शिवाजीमहाराज की जय' असे घरोघर जाताना गर्जत होते परत जाताना 'माझे प्रथम काव्यगायनही ह्या समारंभात आहे' असे गुणगुणत होते

या अुत्सवासाठी दोन कविता रचण्याचे कार्य दोन वर्षांपूर्वीच नागूजीरावांनी हाती घेतलं होते

दिसली त्यासरशी अध्यक्षाने त्यास हटकून विचारलें की, 'तुम्ही कोण ? गाढवाच्या राष्ट्रीय गोंधळात येण्यास तुम्हास कोणी परवानगी दिली ?'

'विश्वप्रेमाने !' ते गृहस्थ नम्रपणाने म्हणाले, 'विश्वप्रेमाने आकर्षित होऊन आम्ही तुमच्यात मिसळण्यासाठी आलेलो आहो मनुष्य काय, आणि गाढव काय, अेकाच ओीश्वराची लेकरें आहेत ही माणुसकी आणि ही गाढवकी अशा धर्मा-धर्माच्या आणि संस्कृतिसंस्कृतीच्या नसत्या कल्पनांनी वेडावलेले लोक गाढवात आणि माणसात निष्कारण वैरभाव माजवीत आहेत, ते आम्हाला संमत नसल्याने आम्ही आपणास अशी विनती करतो की, यापुढे आमच्या तुमच्यात अगदी जाति-धर्मनिर्विशिष्ट भावनेने प्रेरित झालेली अेकी स्थापित व्हावी '

/ हे शब्द अेकताच अेक वृद्ध गाढव म्हणाला, "पण हे तुमचे कपट कशावरून नसेल ? ते हिंदुसंघटनाचे पुरस्कर्तेही जीवमात्राच्या अेकीच्या अशाच तात्त्विक गप्पा मारीत असतात पण आम्ही जेव्हा त्याचेकडे अेकी करण्यास गेलो आणि म्हणालो की, अेकी हवी तर तुम्ही तुमच्या माणुसकीच्या संकुचित संस्कृतीस सोडून आमच्या गाढवी संस्कृतीस अंगीकारा तेव्हा त्याचे तें अेकाचे कपट अुघडकीस आल कारण ते साफ सांगू लागले की 'गाढवांनी माणुसकी धरावी, हाच अेकीचा खरा मार्ग आहे, माणसांना गाढव व्हाव हा नव्हे ! कारण मानवीय संस्कृति ही गर्दभीय संस्कृतीहून श्रेष्ठ आहे !' अशा प्रकारचे तुम्ही कोणी हिंदुसंघटक नसाल कशावरून?"

'आमच्या वर्तनावरून !' ती तीन चार माणसे म्हणाली 'आमच्या वर्तना-वरून आम्ही माणस आहोत कीं गाढव आहोत याची आपण परीक्षा करावी"

तेव्हा अध्यक्ष म्हणाले वर्तनावरून परीक्षा करावयास फार वेळ लागतो त्याशिर-हित तुमच्या वर्तनावरून तुम्ही गाढवे का माणसं' ही परीक्षा करण्याचे ज्ञान येण्याअितका शिक्षणाचा फैलाव आमच्या गाढव ज्ञातीत अजून चालला नाही तेव्हा जर तुम्ही विश्वप्रेमाने खरोखरच प्रेरित झालेले असाल, तर तुम्ही बाह्य वर्तनातही आमच्या गाढवी संस्कृतीप्रमाणे चालले पाहिजे गाढवांनी मनुष्यासारखं वागावं म्हणजे अेकी होअील हा हिंदुसंघटनाचा अुपदेश लुच्चपणाचा आहे विश्वप्रेमाचा जर तुम्हास खरोखरच अुमाळा आला असेल तर तुम्ही माणसांनी गाढव का होअू

विचारतो की, तुम्ही पूर्वीची हिंदूची मानवी संस्कृति सोडून आमची गाढवी संस्कृति स्वीकारण्यास सिद्ध आहात काय ?'

'हो, हो, हो विश्वप्रेमाचे अंजन लावल्यापासून आम्हाला माणुसकीत आणि गाढवकीत काहीएक फरक दिसत नाहीसा झाला आहे.' ते सर्व मनुष्य ओरडले

तेव्हा आनंदाने उल्हसित होऊन अध्यक्ष गर्दभाचार्य आपल्या अखिल गर्दभ-वर्गास म्हणाले 'सभ्य गृहस्थ हो ! पूर्वी शेकडो हिंदु आपल्या गाढवी संस्कृतीचा स्वीकार करीत आलेत आहेत या हिंदु संघटनाच्या दुष्ट चळवळीमुळे तो ओघ बराच सुकत चालला तथापि अजूनही या हिंदु मनुष्यासारखे काही मनुष्य, विश्व-प्रेमाने का होईना, पण आपल्या गाढवी संस्कृतीचे अनुयायी होऊ इच्छीत आहेत, ही थोडक्या उत्साहाची गोष्ट नाही यापुढे या आलेल्या माणसास आपण गाढवच समजावे आणि हे मनुष्य हो, तुम्हीही यापुढे आम्हा गाढवाशी समरस होऊन जाण्यासाठी आम्ही चालतो तसे चालावे तर चला, तुम्ही नुसत्या मागच्या पायावर उभे न राहता तुमचे पुढचे पाय जे तुम्ही हातांसारखे उचलून धरीत असता, तेही टेकून चारी पायांवर उभे राहा '

त्या आज्ञेसरशी ते सर्व गृहस्थ आपल्या हातास भुईवर टेकून चारी पाया-वर चालू लागले परंतु त्यास प्रथम नीट चालता येईनासे पाहून सब गाढव 'खो खो ' हसू लागले इतक्यात तो वृद्ध गाढव पुन म्हणाला, ' छा ! गाढवांनी सभ्यतेचे असे उल्लंघन करू नये या नवीन गृहस्थास गाढवासारखे चालावयास शिकवावे की तसे एकाएकी चालता येत नाही म्हणून हसावे ? बरं, आता याचे आखूड कान आपल्यासारखे लांब केले पाहिजेत, नाही का ? ते जरा ओढले पाहिजेत तुम्हास लागणार तर नाही ना ? '

गृहस्थ म्हणाले 'छे छे, आमचे कान आजवर विलायेकांनी असे ओढलेले आहेत आम्हास त्याची अगदी सवय आहे आपण आमचे कान ओढावे ' तेव्हा त्या सभेतील दोघा पुढारी गाढवांनी ते कान तोंडात धरून थोडे बहुत ओढलेही-परंतु ते यथिकाधिक लांब होणाऱ्या स्थली अधिकाधिक लालच होत आहेत हे पाहून अध्यक्ष गर्दभाचार्य किंचित् रागाने त्या कान ओढणाऱ्या गाढवास म्हणाले, 'किती गाढव आहात तुम्ही, राहू द्या ते ओढून का कान वाढतात ? प्रत्यही त्या कानाचे मुळाशी उद्यापासून पाणी घालीत जा म्हणजे ते वाढतील आता हे नवागत बघूनो, गाढव संघटनेच्या मुख्य कार्यकारी मंडळाने आमच्या गाढवी संस्कृतीचा फैलाव करण्यासाठी काही शिक्षणसंस्था काढण्याचे ठरविले आहे त्यात तुम्ही अध्यापकाचे काम कराल का ? गाढवाची मागासलेल्या जातीत गणना न होता तुम्हा हिंदूतील तुमच्यासारख्या पुढारलेल्या जातीत गणना व्हावी अशी आमची

पण कविवर नागूजीरावांच्या त्या दोन कवितांचें बांधकाम अजूनही पुरें व्हावयाचें होतें. रचना चालूलीच होती, पाविषयी नागूजीरावांना मोठा अभिमान वाटे. ते म्हणत, ह्यावरून शिल्पापेक्षा काव्याची श्रेष्ठता किती मोठी आहे हें कसें आपोआप सिद्ध होतें पहा ! काव्य म्हणजे काही दगडाचुन्याचें बांधकाम नव्हे ! ताजमहाल बांधावयास जीं अनेक वर्षे लागलीं तीं काही त्याच्या शिल्पास, बांधकामास, लागलीं नाहीत; तें दगडी बांधकाम काय अेका दहा दिवसांचें ! पण वर्षानुवर्षे जीं लागलीं तीं त्या ताजमहालच्या भिंतीभिंतींवर नि तावादानांवर जीं काव्यमय चरणें कोरलेलीं आहेत तीं काव्याचीं अक्षरें कोरण्यास होत ! तरी देखील तीं चरणें रचायचीं नव्हतीं, नुसतीं कोरायचीं होतीं. पण मग तर त्या दोन कविता मुळातच रचावयाच्या होत्या. त्याचें बांधकाम पायातील धोंड्याच्या भरीपासून तो कळसाच्या दगडापर्यंत 'अेकहातो' करावयाचे होतें. (नागूजीराव 'अेकहाती अेकटाकी ! 'असेंच' म्हणणार होते. पण त्यांच्या त्या दोन कवितांच्या बांधकामात कमीत कमी दोनशे बत्तीस टाक झिजून गेले होते; खुडाखुड झालेले अेरशें वेचाळीस चवरखे कामास आले होते ! )

कवि होण्याचा निश्चय नागूजीरावांनी दोन वर्षांपूर्वी जो केला त्याचें असें झालें होतें. नागूजीरावांना स्वतःच्या असामान्य बुद्धिमत्तेविषयी नि कर्तृत्वाविषयी असलेल्या दांडग्या आत्मविश्वासामुळे आपण जगात कोणच्या तरी नात्यानें अलौकिक नांव मिळविणार असे त्याना नेहमी वाटत असे. त्यांनी प्रथमतः प्रो. परांजप्यांचा वडेजाव अैकून रँग्लर होण्याचा निश्चय केला. पण दशांश अपूर्णांकाची घोंड दुर्दैवानें हायस्कूलमध्ये आडवी आल्यामुळे त्यांना ती वाट आरंभीच सोडावी लागली. अिंग्रजी चौथीत असताना त्यांनी दोन वर्षे तीत अुत्तीर्ण व्हावयाचा प्रयत्न चिकाटीने केला आणि तिसरे वर्षही ते चौथीत घालविणारच होते. पण मॅट्रिक होअून तरी काय दस रुपडीची नोकरीसुद्धा मिळत नाही असे जेव्हा त्याना कळलें, तेव्हा 'साठाव्या वर्षापर्यंत मॅट्रिकला बसत राहीन, पण या जन्मी मॅट्रिक झाल्यावाचून राहणार नाही,' अशी चौथीच्या मास्तरांपुढे जी कृतनिश्चयी प्रतिज्ञा ते करीत असत, ती मोडण्यास अुत्तम निमित्त सापडलें नि वयाच्या बाविसाव्या वर्षी त्यानी अिंग्रजी चवथीतून नांव काढून शाळा सोडली. पुढे अेका व्यापाऱ्याला सट्ट्यात खूप पैसे मिळाल्याचे अैकून त्यानीही घरची होती नव्हती ती पुंजी सट्ट्यात घातली. ती त्यातच गडप झाली. त्यानी घेतलेल्या लॉटरीच्या तिकिटाचा तर पत्त्याचा जोडच झालेला होता आणि त्यापायी खिशाची चाळणी झाली होती. त्यांनी अलौकिकत्व संपादण्यासाठी मध्यंतरी अेकदा सार्वजनिक चळवळीत भाग घेतला. प्रथम फेटा फेकून देअून खादी टोपी घातली; नंतर ती फेकून देअून केस फिदारून चोडके हिंडले. पण आधीच डोक्यावर केस फार थोडे अुरलेले असल्यामुळे टक्कल पडलेल्या त्यांच्या त्या डोक्याला त्या पक्षातही समरस होता आलें नाही.

अशा स्थितीत वैतागून गेले असता त्यानी त्याची कहाणी त्याचे अेक मित्र छंदोपत याना सांगितली नि म्हटले, की 'माझ्यात अलौकिक होण्यासारखे अनेक गुण आहेत हा माझा ठाम सिद्धान्त झालेला असताही मला अजून जगात काहीच कसे होता येत नाही ! याला काय करावे !' हे अैकताच छंदोपत म्हणाले, 'मित्रा, तुला काहीच होता आले नाही हें अगदी खरं ना ? वेड्या, तर मग कवि होण्यास तू योग्य असलाच पाहिजेस ! तू कवि हो! मीही असाच भटक भटक भटकलो, काहीच साधेना, तेव्हा कविता करू लागलो, आणि आता पहातोसच की, मला गेल्या कविसंमेलनात त्यानी किती गौरविले छंदोपत ही अेक पदवी तरी मला शेवटी पटकावता आली !'

'हो रे हो ! पण, कविता करायची म्हणजे त्याचे शास्त्र हवे शिकायला ! जर या दशांश अपूर्णांकासारखे प्रकरण त्यात पुन्हा आडवे आले ! –'

'छट्! कवितेच्या शास्त्रात अपूर्णांकाचा प्रश्नच येत नाही ! कवि हा स्वयमेवच अेक पूर्णांक आहे ! तुला सांगतो अेक काव्यशास्त्राचे शास्त्र अेका सूत्रामध्ये! तें पाठ केलेस की सारं पाठ केलेस ! ज्याला शास्त्रच नाही ते काव्य, ही त्याची व्याख्या, आणि 'निरंकुशा कवय ' हे त्याचे सूत्र ! कवींचे जन्मसिद्ध-ताम्रपट ! !'

'ठीक ठीक ! पण कवीला अंकुश नसला तरी छंदोबंधनाचा लगाम तरी असतोच ना कोणचासा ?'

'छंद ! – बंध ? जाळून टाक ते बंधही! तेवढीदेखील अडचण कवींना अुरू नये म्हणून तर मी मुक्तबंध नावाच्या कविमंडळाचा सभासद झालो आहे कवींना बंधनच जर नाही, जर कवि जन्मजात निरंकुश आहे तर पुन्हा छंदाचे बंधन पाळा म्हणून त्याना सांगणे म्हणजे वदतो व्याघात नव्हे काय ? तू मुक्तबंध छंदातच कविता कर गद्याच्या ओळी तुला लिहिता येतात ना! त्या सरळ न लिहिता अेका-खाली अेक लिहीत गेलास, की मुक्तबंध छंद साधला !'

'वा ! ताट पण काय सुचविलीस ! अडचण पण टळली आणि कालिदासा-पासूनच्या साऱ्या लौकिक कवींपेक्षा आपली अशी काही तरी अलौकिक अपूर्वाअी पण आपल्या कवितला लाभणार ! अडचणीवाचून अलौकिकता ! बरे, छंदाचा प्रश्न सुटला, पण काही झाले तरी कवितमध्ये शिष्टाच्या कानाला गोड लागावे असे संस्कृत शब्द म्हणे पुष्कळच घालावे लागतात आता मला संस्कृत येतच नाही असं नाही, पण कोणचा शब्द संस्कृत नि कोणचा असंस्कृत हे आळखणं तेवढे बरच जड जातं त्यातही तो भाषाशुद्धीचा कायसा अेक वाष्कळ वाद काही अुपद्रवी लोक पाळीत आहेत म्हणे ! त्याच्या अुपद्रवामुळे 'दिल, ' 'आदमी ' 'दुनिया ' असे अगदी शुद्ध संस्कृत शब्ददेखील कवितेत घालण्याची चोरी झाली आहे ! आमच्या तोंडी तर छप्पन भाषाचे अिंग्रजी, अुर्दू, हॉटेंटाट, तुर्की शब्द सिद्धलेले-

सट्टेबाजारात, गोदावर चोर बाजारात ही बाजारी बोलीच तुमच्या शुद्ध संस्कृता-पेक्षा किंवा किंग्ज अिंग्लिशपेक्षा आमच्या जास्त अुपयोगी पडते. ती बाजारी बोली म्हणजेच आजची माझी मातृभाषा! पण तीत कविता चालेल काय?'

'होय तर! अरे, ती बाजारी बोली तुला खरेच छान येते का? तर मग वेड्या, भविष्यकाळाचा महाकवि होण्यात तूच आघाडी मारणार! अरे आता कोण विचारतो त्या भूतकाळाच्या संस्कृताला नि भाषाशुद्धीला? त्या शिवाजीचे नि त्या चिपळूणकरांचे ते भाषाशुद्धीचे ख्वार होणार! आता राष्ट्रीय भाषेची जागा कोण घेणार आहे माहीत? न ज्ञानेश्वराची मराठी न टागोराची बंगाली न तुलसीदासाची हिंदी! ही सट्टेबाजारातील बाजारी भाषाच आता राष्ट्रपदाच्या महत्पदावर चढणार आहे. अरबी, तुर्की, पारशी, यहुदी, पोर्तुगीज, फ्रेंच, अिंग्रजी — धर्मात जमा अितक्या भाषांचे प्रतिनिधि शब्द तीत असणार! त्या त्या हिंदु, मुसलमान, यहुदी, ख्रिश्चन प्रभृति हिंदुस्थानातील नागरिकांच्या संख्येच्या प्रमाणात प्रत्येक प्रांतातील बोलीत ते ते विदेशी शब्द मूळच्या स्वदेशी भाषांतून घेतलेच पाहिजेत! अुदाहरणार्थ बंगालात शेकडा हिंदु शब्द जितके, शेकडा मुसलमानी शब्द जितके शेकडा मुसलमान तितके; शेकडा ख्रिश्चन जमती तितके अिंग्रजी-पोर्तुगीज-फ्रेंच शब्द! त्यातही मुसलमानी समाजाचा तर मागासलेले आहेत हा अेक मोठा सद्गुण, अेक मोठी अधिकाराही थोरवी! त्यांनी आमच्यावर केलेला अेक मोठा अुपकार असल्यामुळे त्यांच्या अुर्दू शब्दांना विशेष प्रतिनिधित्व त्या राष्ट्रभाषेत मिळाले पाहिजे ही गोष्टही ठरलेलीच. तेव्हा जर तुला खरोखरीच सट्टेबाजाराची नि चोरबाजाराची भाषा येत असेल, तर तीत पुष्कळ अुर्दू नि थोडे अितर शब्द असल्यामुळे तू तुझी नवी कविता बेधडक तीतच करू लाग! टागोराची बंगाली कविता बंगाल्याबाहेर कोण वाचतो! पण तू जर त्या भावी राष्ट्रीय भाषा होणाऱ्या अुर्दूबहुल बाजारी भाषेत कविता करशील तर ती तुझी बाजारी कविता साऱ्या हिंदुस्थानात घरोघर वाचली जाअील. थोडक्यात म्हणजे, तू अुठ नि कविता करू

(चाल :— बाजीराव नाना । तर तुंबडीभर दाणा ।। अशी काहीशी)

रोमान्सच्या राज्यांत चल मारूं लांब मजल ।।
प्रिये तूं पोअेट्री अँड मी अेक तुझी गजल ।।
अिष्काने मी बेजार झालो देना[1] माझी दाद ।।
गल्लोगल्लीं झाअुटेन[2] तुझा खावो जिंदाबाद ।।
स्पीक अेक वर्ड तरी ! रडतो धाय धाय ।।
रिक्वेस्ट नको रिजेक्ट्‌ हो चाटिन तुझे पाय ।।
दिलाच्या गोठ्यांत दयेची जी गाय ।।
फुटूं दे ना पान्हा तिला ! डोंट मी [3]अॅनॉय ।।
स्तोत्रें, स्वीट हार्ट[4] ! तुझीं सिंगतो[5] बारबार
खुदी[6] तूं माझी मी तुझा खुदाअि खिदमतगार ।। १

या कवितेच्या 'दिग्विजय' मराठीस मूर्ख लोक पूर्वी हसले. पण आज अनेक कवि आपल्या मराठी कवितेत खुदाअी खिदमतगार आणि झिंदाबाद हे शब्द अुघडपणे खरोखरीच योजीत असतात ही गोष्ट गेल्या वर्षांतील काही मराठी मासिकें चाळताच वाचकांचे ध्यानात येअील.

त्या कवितेमुळे नागूजीरावाचें नाव कविमंडळात चमकू लागलें असले तरी त्याना अुघड सभेत स्वतःचे काव्य स्वतःच गाअून दाखविण्याची संधि भाषानुद्धीवाल्या जुन्या कवींच्या मत्सरामुळे आजवर कुठेही मिळाली नव्हती, ती शेंदाडपूरच्या ह्या आजच्या शिवाजी-अुत्सवात शक्य तितक्या प्रचंड प्रमाणावर साजरी करण्यासाठी नागूजीरावांनी त्याचें कार्यवाहपद स्वतः स्वीकारून अेक अत्यंत मनोरंजक नि भपकेबाज कार्यक्रम आखला होता.

पण तो कार्यक्रम अुत्सवमंडळाकडून संमतवून घेताना सत्कार्याला नेहमी येतात, तशाच अनेक अडचणी आल्या होत्या. प्रथमतः त्या जिल्ह्याचे लोकप्रिय कलेक्टर मि. ब्लॅकस्टोन यानी सर्व सरकारी नोकराना अुद्देशून जें अेक परिपत्र (Circular) काढलें होतें, त्याचा विचार करावा लागला. या परिपत्रात असें लिहिले होतें की —

विषयी केवळ अैतिहासिक चर्चा करणारे निबंध, भाषणे, कविता – ह्याच काय त्या नव्या कार्यक्रमात समावेशिल्या. हे कळताच अुत्सवाचे अध्यक्षपद घेण्याचे स्वतः कलेक्टर महाशय मि ब्लॅकस्टोन यांनी मान्य केले

तोच दुसरी अडचण दत्त म्हणून अुभी राहिली ! शिवाजीच्या चरित्रातील अैतिहासिक घटनांचे वर्णन निषिद्ध नाही म्हणून नागूजी कवींने अफझुलखानवधावर कविता करावयाचे ठरविले थगदी अितिहासाला धरून तेवढेच बोलणे, सद्य.-परिस्थितीचे नाव नाही, अशी दोन कडवी रच लीही आणि स्वागतमंडळाच्या बैठकीत रावबहाद्दुर पोटाळ्यांच्या पूर्ण संमतीने त्यांनी नवीन कार्यक्रम वाचून दाखविला ! त्यात अफझुलखानाच्या वधावरील आपला पोवाडाही गाविला जाअील असे वाक्य नागूजीरावांनी जेव्हा अुच्चारले तेव्हा अकस्मात् अफझुलखानच कोणाच्या अंगात सभाहून डुरकाळावा तसे डुरकळून 'Stop ! Stop that humbug' असं कोणीसे ओरडून अुठले पाहतात तो ते खानबहाद्दर फाजलखान-साहेब ! अुत्सवमंडळाचे अुपाध्यक्ष !

त्या खानबहाद्दर फाजलखानांनी मोडक्या तोडक्या मराठीत साफ सांगितले की,

हिस्ट्रीजिस्ट्री को आग लगा दो ! मुसलमानांना कमीपणा येअील असं अेकही अक्षर अुत्सवात निघता कामा नये, काफर शिवाजीका नाम भी हम नहीं सुनना मांगते ! लेकिन क्या करे ! कलेक्टरसाबनी चिठ्ठीच धाडली की राष्ट्रीय लोकप-चाच काय ते कार्यक्रम आहे तेव्हा तुम्ही बेशक या, म्हणून मी त्या बुदपरस्त शिवाजी का नाव तेवढा अैकण्याचा मान्य केला ता तुमने अे क्या बदमाषी मचाअी है ! अफझुलखानाचा वध क्या ! वधबिध आम्ही काही सुनेंगे नहीं ! अितिहासच कशाला हवा, या तमाशात ! अफझुलखानानेच शिवाजीचा वध केला असा काही कविता रचून म्हणा हवा तर ! नहीं तो हम चल देंगे ! '

'हा हा ! खानबहाद्दरसाब ! ठैरिये माफ करिये ! अैका तर खर आम्ही तुमचे सारे म्हणणे मान्य करतो मग झाले ना ? '

असा निकाल रावबहाद्दुर पोटाळे ह्यांनी दिला त्यासरशी नागूजी कवीचा अफझुलखानाचा पोवाडाच काय, पण वीररसाचं असं कोणतेही काव्य शिवाजींच्या अितिहासापुरते तरी निषिद्ध ठरले ! मनात चरफडत पण वरवर सौम्यपणे नागूजीराव कार्यवाह या नात्याने जिज्ञासले–'तर मग शिवचरित्रपर असे शिवानी-अुत्सवात काहीच वाचू नये हे अुत्तम घडलेला अितिहाससुद्धा सांगणे आता रद्द केले पाहिजे, नाही का ? शिवाजीविषयक हे सारे अैतिहासिक निबंध परतवितो तर ! '

रावबहाद्दुर पोटाळ्यांनी थोडा विचार केला नंतर ते म्हणाले, 'थांबा. शिवाजीच्या चरित्रातील जो भाग खानबहाद्दुरांना नापसंत तेवढा गाळला की

झालें. मुसलमानांच्या भावना न दुखवील असा भाग शिवाजीच्या चरित्रांतून पुष्कळ काढता येअील, काय खानबहाद्दुर, तुम्हीच तो निवडून द्यावा.'

त्याप्रमाणे त्या राष्ट्रीय शिवाजी-अुत्सवात मुसलमानांच्या भावना न दुख-तील असें जें शिवाजीचरित्र वाचावयाचें म्हणून खानबहाद्दुराच्या संमतीने ठरविले तें अेकश्लोकी रामायणाप्रमाणे अगदी चार चरणांचेंच होतें. ते असें :–

शिवाजी हा शहाजी नांवाच्या मुसलमानांच्या अेका अंकित सरदाराचा पुत्र होता. त्याच्या आअीचें नांव जिजाबाअी. तो कोणत्या तरी अेका तारखेस (सन १६२० ते १६३० च्या मध्यंतरी) अेका वर्षी जन्मला. (जन्मतिथि वर्ष वादग्रस्त असल्याने राष्ट्रीय अुत्सवात दोन्ही पक्षाना साभाळता यावें म्हणून नक्की तिथि व वर्ष सांगितलीं नाहीत.) जन्मल्यानंतर बरेच दिवस जगून तो सन १६८० त मृत्यु पावला !

या सर्वसंमत झालेल्या राष्ट्रीय शिवचरित्रावरही खानबहाद्दुराचा अेक अभिप्राय नोंदला होता. तो असा की, शिवाजी जन्मला हीच गोष्ट मुसलमानांच्या भावना दुखविते; पण राष्ट्रीय हिताकडे दृष्टि देअून आणि कलेक्टरसाहेबाच्या शब्दास मोडू नये म्हणून, येवढ्या अुल्लेखाकडे मुसलमान बंधूंनी दुर्लक्ष करण्याची सहिष्णुता दाखवावी.

हें शिवाजीचें राष्ट्रीय चरित्र राष्ट्रीय शाळांतून शिकविण्यास हरकत नाही असा, शिवाबावनीस रद्द केल्यानंतर गांधीजींच्या कलास अनुसरून नागपूर राष्ट्र-भाषासमितीनेही निर्वाळा दिला.

परंतु नागूजी कवीपुढे जो मुख्य प्रश्न होता तो कसा सोडवावयाचा ? आता शिवाजी अुत्सवात ह्या नव्या राष्ट्रीय कसोटीस अुतरेल आणि मुसलमानानाही मानवेल असें काव्य कोणत्या विषयावर करावयाचें ? इतक्यात त्यांना अेक युक्ति पण युक्ति सुचली ! शिवाजी-अुत्सव म्हणजे पराक्रमाचा, विक्रमाचा. बदललेल्या परिस्थितीत विक्रमाचें क्षेत्र बदलेल; पण थोरवी बदलणारी नाही. तेव्हा त्याच्या परिस्थितीत जो विक्रम तो शिवाजीने केला; तसा आजच्या परिस्थितीत जो

खाली म्हणून ठेवली नव्हती । साऱ्या जगातील न्हाव्यात श्मश्रू करण्यात त्याने अुच्चांक पटकावून कस भादरण्याचा हा जो विक्रम केला त्यामुळे महाराष्ट्राचे नाव या युगातही अुज्ज्वल झाले होते युरोपातही विक्रम करतात पण युरोपातील लोकात असला खरीखुरीं पौरुषाची कृत्ये करून त्यात अुच्चांक पटकावण्याची धमक कुठली असणार । त्यांचे विक्रम म्हणजे फार फार तर अटलांटिक महासागर अुडून जाण्याच्या स्पर्धेत, नाहीतर असल्याच दुसऱ्या कोणच्यातरी पोरखेळात असणार । विमान चालले असते की कोणीही अुडेल । तो यंत्राचा प्रताप, पौरुषाचा नव्हे । पण चोवीस तास सारख्या विडया ओढीत किंवा सारखा चहा ढोशीत किंवा सारखे कस भादरात राहण्यात पुरुषशक्तीचा खरा प्रताप व्यक्त होतो कारण तेथे यंत्रबळाचा प्रश्न नसून हस्तबळाचा वा श्वासबळाचा वा पोटबळाचा प्रश्न असतो त्यातही केस भादरण्याच्या चिकाटीत अुच्चांक पटकावणे, रेकॉर्ड करणे हे तर निर्भेळ पौरुषी कृत्यच होय । कारण की आमच्या अिकडे स्त्रिया अजून सहसा केस कापून घेत नसल्यामुळे आणि दाढीमिशा तर त्यांना फुटतच नसल्यामुळे चांगली झुळझुळीत जर कोणाची अुडवायची, जर कोणाची मिशी अुतरून द्यायची जर दाढी अुपटायची, तर ती बहुधा पुरुषाचीच अुपटावी लागते । केस भादरण्याच्या कृत्याचा मुख्य संबंध पुरुषांशीच असल्यामुळे ते खरे खरे पौरुषी कृत्य ठरते हजामतीत अुच्चांक पटकावणे हाच निर्भेळ पौरुषी विक्रम ठरतो । हे सारे विचार कवितेमध्ये घालायचे असे योजून कवीने कार्यक्रमात तो भाग प्रसिद्धही केला

चोवीस तास सारखे केस भादरण्यात जागतिक अुच्चांक ज्याने पटकावला आहे त्या श्मश्रूविक्रम करणाऱ्या नरू न्हाव्याचा गौरव । आणि त्या वीरावरील नागू कवीचे प्रशस्तिकाव्यगायन । या । पहा । अैका ।' अशी प्रसिद्धके (जाहिराती) भडक रंगात जिकडे तिकडे फडकताच शिवाजी-अुत्सवाच्या दिवशी मंडळीची धुमती रेटारेटी झाली । मुंगीस जागा नाही असा समाज लोटला ।

त्यातही तो राष्ट्रीय शिवाजी अुत्सव । हिंदुच काय पण मुसलमान बहुधा, पारशी सरकारी निमसरकारी बिनसरकारी मनुष्यमात्र चिक्कार दाटले । शिवाजी अुत्सवासच काय पण कोणत्याही प्रदर्शनास असे राष्ट्रीय स्वरूप दिले असता तो किती थोर पदास पावतो राष्ट्रीय अैकी कशी आपसूक साधते त्याचे ते प्रात्यक्षिक होते ।

अुत्सवास शेवटी अेकदाचा आरंभ झाला ! -अध्यक्ष स्वत कलेक्टर मि ब्लॅकस्टोन साहेब होते त्यांनी रावबहाद्दुर घोंगळ्यांना शिवाजीचे चरित्र सांगावयास आज्ञापिले त्यांनी ते वर दिलेले चार ओळी चरित्र कसेबसे वाचले ताच प्रेक्षकातून हुर्र ! हुर्र ते पुरे ! नरू न्हावी कुठे ? नागू कवि अुठा ।' म्हणून

ठरीव भाबडटपणाची असतात. प्लेग का झाला ? की ठरीव उत्तर 'बहिरोबाचे बोकड बळी थकले आहेत ! मरीआईला कोंबड्या गेली पाच वर्षे पोटभर मिळाल्या नाहीत ! म्हणून प्लेग आला, पटकी चेकाळली ! ! पाऊस पडेनासा झाला ! ! !' ही झाली प्राकृत देवसकी सर्व प्रकारच्या देवसकीतील मुख्य निष्ठा, मूलतत्त्व हेच की, कोणत्याही रोगाच्या साथी, आपत्ति, सृष्टिक्षोभ ह्या घटना देवाच्या रागामुळे वा लोभामुळे घडतात ती देवाची 'लहर' होय सृष्टीचा अबाधित नियमागत 'क्रम' नव्हे, आणि त्या प्रकरणी बचावाचा उपाय म्हणजे देवाची हाजीहाजी, पूजा प्रार्थना, श्राद्धादिक पारलौकिक आचारपालन, यज्ञ, बळी, इत्यादि देवताना प्रसन्न करण्याचे प्रकार, आधिभौतिक उपाय नव्हेत, तर आधिदैविक

## ब्राह्मणाना मृत्यु कां येतो ?

मनुस्मृतीत पाचव्या अध्यायाच्या आरंभीच महर्षींनी 'अनलप्रभव भृगुम्' प्रश्न केला की, 'कथ मृत्यु प्रभवति वेदशास्त्रविदा प्रभो ?।।' ब्राह्मणाना मृत्यु का येतो ? त्यावर भगवान भृगूनी उत्तर केले, 'श्रूयताम् येन दोषेण मृत्युर्विप्रान् जिघासति ।। अनभ्यासेन वेदानाम् आचारस्य च वर्जनात् ।। आलस्यादन्नदोषाच्च मृत्युर्विप्रान् जिघासति ।।' वेदाचा अभ्यास केला नाही, 'आचार' सोडले, अन्न 'दोष' घडला नि आळस वाढला की वेदज्ञ विप्राना मृत्यु येतो या उत्तरात सर्व कारणे आधिदैविक कशी आहेत हे तत्काळ ध्यानात येईल, आणि म्हणूनच प्रत्यही व्यवहारात ती कशी खोटी पडतात त्याचेही आश्चर्य वाटणार नाही 'आचार' म्हणजे स्नानसध्या, पितृतर्पणादि धार्मिक आचार, 'अन्नदोष' म्हणजे काय हे लगेच त्याखालच्या श्लोकातूनच सविस्तर सांगितले आहे लसूण, कांदा, खर्बस, खीर, प्रभृति पदार्थ विप्राने खाल्ले असता तो तत्काळ 'पतित' होतो, नतर नरकात जातो हा अन्नदोष, आणि अशा धार्मिक अर्थाच्या अन्नदोषापासून, आचारत्यागापासून आणि वेदाभ्यास न केल्यामुळे मृत्यु येतो ! ह्या धार्मिक नि आधिदैविक कारणमीमांसेला आधिभौतिक कारणमीमांसेने, म्हणजेच विज्ञानाने अेखाद्या प्रकरणी साफ खोटे पाडले की त्या प्रकरणी 'देवसकीचा प्रांत संपून 'माणुसकीचा' प्रांत लागतो

लसूण, कांदा काही रोगावर उपकारक, त्या रोगावर तो घेतल्याने ब्राह्मण मरायचे ते उलट जगतात शेकडो, हजारो ब्राह्मण कांदा, लसूण, खर्बस, दोडके जन्मभर खात असता, मनुस्मृतीतील डझनभर सव्वाशे 'अन्नदोष' प्रत्यही करीत असता दीर्घायुषी होतात, तत्काल तर केव्हाही मरत नाहीत, आणि लसूण, कांदा न खाणारे तडकाफडकी साथीसाथीतून मरताना आढळतात ! प्लेगची पिसू कोणी ब्राह्मण ऋग्वेद वाचीत बसला म्हणून त्याला डसावयास थोडीच थांबली आहे आणि तेवढ्या वेळात वेद कोणत्या कोणत्या ब्राह्मणांनी वाचला नाही त्याचा शोध काढीत

चालका चालला तेव्हा नागू कवि एकदम उठले आणि प्रेक्षकांच्या वर्तनाचे समर्थन खणखणीत शब्दांमध्ये करीत म्हणाले,

' शिवाजीचे चरित्र ऐकण्यास तुम्ही अिथे आलेला नाही हे मी जाणतो. मराठी शाळेतील क्रमिक पुस्तकं, अितिहास, पोवाडा, नाटक, कादंबऱ्या जे पहावे त्यात त्यात शिवाजीचे चरित्र चितारलेले असतेच ते ऐकून ऐकून तुमचे कान खरोखरच विटले आहेत ! शिवाजीचे आजच्या राष्ट्रास कल्या पिढीला अजीर्ण झाले आहे ! त्यांना आता ज्यापासून आज अुपयोगी पडेल अशी स्फूर्ति मिळविता येअील असा कोणातरी अद्ययावत विक्रमी पुरुष हवा होता ! आजच्या राष्ट्रीय कर्त्या पिढीला हा जुनापुराणा विक्रमी शिवाजी काय शिकविणार ? जे लोक त्याचे चरित्र गातात तेच सांगतात का, आजच्या परिस्थितीत शिवाजीच्या चरित्रापासून काही शिकावयाचे असले तर हेंच का शिवाजीसारखे काही भलते सलते करण्याचा वेडेपणा न करणे हाच शहाणपणा होय ! तेव्हा पूर्वकालीन अेक थोर पुरुष म्हणून शिवाजीमहाराज जरी समजले गेले होते तरी त्याचा अनुकरणापलीकडे आज त्याच्या विक्रमाचा आम्हास काय अुपयोग आहे ? आज ज्या सुधारलेल्या विक्रमाचा प्रत्यक्ष अुपयोग आहे असेच विक्रम आजच्या पिढीच्या पुढे आदर्श म्हणून धरावयास हवेत ! तशाच अेका विक्रमी वीराचा गौरव आज आम्ही करणार आहो ! – तो वीर हा पहा ! – (असे म्हणताच पडद्यास मागून पवित्र्याची अुडी मारीत नरू न्हावी पुढे येतो ) – हा पहा तो नरू न्हावी ! (टाळ्यांचा प्रचंड कडकडाट ! त्यासरशी नागू कवि बेभान भडकून ओरडतात –) त्या रायगडाचा तो पहा जुना शिवाजी ! – आणि हा पहा आमच्या शेंबडपूरचा अद्ययावत शिवाजी ! ह्याच्या वस्तरा त्या जुन्या शिवाजीची भवानी तरवार तळपत नव्हती असा तळपत आहे ! ह्याची ही धोपटी अर्जुनाच्या अक्षय भात्यासही खाली पाहावयास लावीत आहे ! जर आज शिवाजी महाराज असते तर त्यांना Misguided patriotism ची ती भवानी तरवार फेकून देअून या नरू न्हाव्याचा

अुनरड कड बड कड कोसळली ! —आणि तसविरीतून कवचकुडल मुकुटासहित भवानी तरवार अुपसलेले प्रत्यक्ष शिवाजी महाराज ' हरहर महादव ' गर्जून अुभे ठाकले।

महाराज सिंहासारखे गरजले—

' कोण म्हणाले आत्ता की ' जर का आज शिवाजी अिथ येअील ?' हा मी अिथे आलो आहे ! वोगा काय हवे त ?'

त्या सिंहगजनसरशी सारी सभा थरथर कापू लागला ! खानबहादुर फाजल-खानसाहेब तोबा तोबा ! दगा ! फिसाद ! अस ओरडत वाक्पीठावरून अुडी टाकून वाट फुटेल तिकडे पळत सुटल रावबहादुर पोटाळे खुर्चीवरच्या खुर्चीवरच थडे झाल अेवढा धीट अिग्रज तो कलेक्टर ब्लक्स्टोन पण त्या अदभुतासरशी अधारी यअून ताहा चक्करला ! सुरतच्या अेका बखारीत आपण आहात भरा ठ्याच्या नग्या तरवारी चारी बाजूनी चालून येत आहत, टबल होते त नाहीस होअन तिथे पोत्याचा रास दिसत आह असं त्या घेरीत मि ब्लॅक्स्टान ह्याना भासून त त्या पोत्याच्या राशाच्या आड म्हणून टबलाखाली जाअून दडल

विचारा नागू कवि ! मटकन् खालीच हवकत होता पण महाराजानी त्याचा अेक कान चटकन् ओढून त्यास अुभा केला नि विचारल काय रे, मला कशाला यावे म्हणून वोगावात होतास ? काय भक्त होतास ! अ ?'

ततत पपप करीत नागू कवि म्हणाला म म महाराज श श-श क्षमा करावी ! आपण याल असा ठाअूक असत तर वापजन्मी आपल्याला बोलावण्याच साहस केल नसत ये शिव भूपाला ! अशा कविना जो तो गातो म्हणून मीही तस साहीस बालून गेला ! म म म म मला च च-च चक्कर येत आह ! पाया पडतो, कान सोडावा ! मूर्च्छित पडू धाव या दासाला नाही बळ !'

ठीक !' महाराज हसल—' सोडतो तुम्हाला, पण ध्यानात धरा तुम्ही सारेजण की जर पुन्हा तुम्ही कोणी कोणत्याही शिवाजीअुत्सवात ' ये म्हणून म्हटलत तर मी शिवाजी महाराष्ट्रात पुन्हा खरोखरीच यअीन !'

नको ! नको ! महाराज ! दुसरी वाटल ती शिक्षा द्यावी, पण असली भयकर शिक्षा महाराष्ट्राला देअू नये ! आम्हाला फार फार तर शिवाजी-अुत्सव झेपतो पण शिवाजी झेपणार नाही ! आमच्या पिढीला हा नक्ल न्हावी आहे त्याचा विक्रम आम्हास पुरे ! त्याचा Razor Safety त्याला किंवा शेळीच्या दुधावर वाढलेल्या कुठल्याही दुसऱ्या शळपटाला आमचा शिवाजी करा, पण महाराज, आपण सिंहीच्या दुधावर वाढलेले सिंह ! आपण स्वत च येण्याचा धाक आम्हा बापड्याना घालू नका ! नुसते शिवाजीअुत्सव करू आम्ही हवे तितके ! —

नाही ! शेंदाडपूरच्या शेणकिड्याना, तुम्हाला शिवाजी नको हे तुमचे म्हणण बरोबर आहे ! पण म्हणून तुम्ही यापुढे केव्हाही शिवाजी-अुत्सव करता कामा

त्याना त्यानाच डसत चालली आहे, असे काही आढळत नाही. प्लेग, पटकी, देवी टोचली की वेद न वाचणारे आणि मनुस्मृतीतील आचार नि अन्नदोष न मानणारे शेकडा नव्वद नव्याण्णव ब्राह्मण जगतात. अगदी वेदाभ्यासरत सचप्नी स्नानसंध्याशील, अन्नदोष सापेक्षत. अधिक टाळणारे आस्तिक ब्राह्मण प्लेग, पटकी, देवी ह्याच्या तडाख्यासरशी जर टोचून घेतलेले नसले वा भौतिक औषधे सेविली नसली तर बहुधा शेकडा नव्वद पटापट मरतात! हा प्रत्यक्ष, प्रत्यहीचा अनुभव मनुस्मृतीच्या 'देवसकीस' काय किंवा आमच्या कोंकणातील 'गाऱ्हाण्याच्या' आणि गुरवाच्या देवसकीस काय, अेक धर्मभोळे खूळ यापलीकडे काहीही महत्त्व देवीनासा होता

( रोग, भूकंप, अुत्पात हे सर्व सृष्टिक्रमाच्या अबाधित कार्यकारणभावाचे परिणाम आहेत, ते नियम आपणास ज्या प्रमाणात कळतील त्या प्रमाणात नि त्या त्या प्रकरणी सृष्टीच्या त्या अुत्पातापासून मनुष्य आपले संरक्षण करू शकेल, देवसकीच्या प्रार्थनेने, पूजेने वा नैवेद्याने सृष्टिक्रम केव्हाही बदलू शकत नाहीत, रोगाचे औषध प्रयोगानी अमोघ ठरले की प्रार्थना न करणारे वा धार्मिक पापपुण्य न मानणारे लोकही त्या रोगापासून बचावले जातात हे ज्ञान म्हणजेच विज्ञान. मनुष्याला झालेल्या सृष्टिनियमाच्या ज्ञानामुळे मनुष्याची सत्ता ज्या मानाने वाढते त्या मानाने देवसकीचे प्रस्थ कमी होअून माणुसकीचे स्वामित्व प्रस्थापिले जाते. मनुष्य अनमान धपक्याच्या, दैवी अुपायाच्या नादी न लागता निश्चित नि अमोघ अशा मानुषीय आधिभौतिक अुपायावर अवलंबू लागतो )

या अर्थी जी जी राष्ट्रे 'देवसकी'च्या धर्मभोळ्या पायरीस ओलांडून 'माणुसकी'च्या पायरीवर चढतात आणि मनुष्याच्या प्रयोगसिद्ध नि प्रत्यक्षावगम्य ज्ञानाने खोटया पाडलेल्या 'धार्मिक' छापाच्या समजुती तत्काळ सोडतात, ती राष्ट्रे सृष्टीच्या जीवनकलहात तगतात

आजच्या सर्व राष्ट्रामध्ये जर कोणी या देवसकीच्या अनमानधपक्याच्या युगातून माणुसकीच्या विज्ञानयुगात प्रवेशले असेल, भरभराटत असेल तर ते युरोपीय जानपदच होय

पूर्वीच्या सर्व धर्मग्रंथात – मग ते वेद असोत, बायबल असो, वा कुराण असो – देवसकीच्या अनमानधपक्याचेच प्रस्थ माजलेले सापडते त्या काळी ते अगदी साहजिक होते दोनशे वर्षापूर्वी युरोपमध्येही भूकंप, रोग, अुत्पात देवाच्या रागानेच होतात, प्रार्थनेने, पूजेने तन्त्रमन्त्राने शमतात हीच खिरस्ती धर्माची शिकवण, हीच देवसकी बोकाळलेली होती लिस्बनला फ्रेंच राज्यक्रांतीच्या आधी भूकंप झाला तेव्हा तो प्रॉटेस्टंट लोकांच्या 'पापाने' झाला आणि त्याच्या प्रायश्चित्ताने शमेल अशीच दगल झाली! प्रॉटेस्टंटाचा त्या पायी छळ झाला! फ्रेंच राज्यक्रांतीनंतर मात्र युरोप झपाट्याने विज्ञानवादी बनू लागले सृष्टिनियमाचे ज्ञान हेच त्याचे

शास्त्र, हाच त्याचा धर्म होत चालला आणि देवसकीची राजवट संपून माणुसकीची राजवट चालू झाली. परिणाम हा झाला की, पूजा प्रार्थना, धूपदीप, धार्मिक अर्थीन पापपुण्य याना सर्व मनुष्यांत अगदी कमी प्रमाणात भीक घालणारा युरोप आज सर्व मनुष्यांमध्ये समर्थ, निरोगी दीर्घायुष्यपन्न नि जगन्सम्राट होऊन बसला आहे.

परंतु ख्रिस्ती देवसकीतून युरोप जसा सुटा झाला तसा आशिया अजूनही झालेला नाही. भारतीय हिंदु काय, मुसलमान काय, बुद्ध हिंदु काय, हजारो वर्षांपूर्वीच्या धार्मिक छापाच्या ग्रंथात जे अनमानधपक्याचे सृष्टिज्ञान नि आचार ग्रथित केलेले आहे, त्याच्या बाहेर पाऊल टाकणे हेच मुळी पाप मानीत राहिल्याने ते हिंदु नि मुसलमान आजही याच भाबड्या देवसकीत फसलेले आहेत. पटकी, देवी, प्लेगप्रभृति भयंकर रोगांच्या साथीवर रामबाण लसी दोनशे वर्षांपूर्वी मनुष्यास माहीत नव्हत्या. मग वेद, अवस्ता, बायबल, कुराण, प्रभृति जुन्या धर्मग्रंथांच्या काळी त्या साथींनी हजारो माणसे मृत्यूच्या झपाट्यासरशी मुंगती पाडून नेली जात, तेव्हा पैगंबराच्याही बुद्धि कुंठित होऊन कुराण व बायबलाच्या पानापानी त्यांनी आरोळ्या ठोकल्या, 'हा देवाचा राग! निमाज पढा, प्रार्थना पूजा करा तर त्याने साथ थांबेल!' मुसलमानांना वाटावे महंमद पैगंबरांचाच खरा नि अंत्य पैगंबर तुम्ही मानीत नाही म्हणून देवाने ही साथ घातली! ज्यूंना वाटावे मूर्तिपूजा केली म्हणून साथ आली! 'पाप' झाले हेच साथीचा निदान आणि उपाय, उपचार सृष्टीच्या वैद्यकग्रंथात न पाहता, आपण रचलेल्या वैदिक ग्रंथात, त्या त्या धर्मग्रंथात पाहत! प्रकाश, शुद्ध वायु, शुद्ध पाणी, जंतुघ्न औषध हे प्रत्यक्ष उपचार कोणी तितक्या नेटाने सांगेनात जितक्या तावातावाने जपजाप्य, सततधार, पीर-पैगंबरपूजा, ताईत तावीज गंडेदोरे यांचा उपदेश ते देत. त्या वेळच्या मनुष्यांच्या सृष्टिज्ञानाच्या अभावी तें तितकेसे अस्वाभाविकही नव्हते. पण त्यायोगे मनुष्याची दिशाभूल जी झाली ती मात्र ह्या पटकीच्या साथीपेक्षाही मनुष्यास मारक ठरली! भाबडेपणाच्या 'देवसकीची' ही साथ अजूनही थांबत नाही. पटकीवर औषध जसे विज्ञानास सापडले, तसेच या देवसकीच्या साथीवरही माणुसकीचे औषध आता युरोपला तरी सापडले आहे. ते आपल्या इकडेही आणून मनुष्यास टोचले पाहिजे. इतर लसी जशा टोचतात, भाबडेपणाच्या साथीवरील ही वैज्ञानिक लस मनुष्यांच्या मनात टोचली पाहिजे. देवसकीच्या दुष्परिणामांची उदाहरणे यासाठीच वारंवार प्रसिद्धिली पाहिजेत! पटकी प्लेग यांच्या साथीप्रमाणेच या देवसकीच्या भाबडेपणाची साथही शेकडो लोकांचे प्राण मृत्युमुखात कसे ढकलते याचा अनुभव आपल्या देशात पावलो-पावली आजही येतो!

थोड्याच काळापूर्वी रत्नागिरीकडे देवीची साथ आली. हिंदूंमध्ये सरसहा टोचणे चालू झाले. त्या लसीच्या टोचण्याने हिंदूंत कोणी फारसे दगावले नाही. पण मागासलेल्या मुसलमान वस्तीत अज्ञान, अशिक्षितपणा नि धर्मभोळेपणा एकंदरीत

हिंदूंपेक्षा अधिक. त्यामुळे तशा अडाणी मुसलमान वस्तीत कोणी टोचून घेईना-जो तो पीराला नवस, गंडेदोरे, याच्यावर अवलंबे. तोच साथ वळावून पटापट माणसे मरू लागली. ज्या जाणत्या मुसलमानांनी टोचून घेतले ते निरोगी राहिले, हे प्रत्यक्ष दृश्य पाहिल्यावर देवसर्वांही लटपटली आणि ते अडाणी मुसलमानही भराभर टोचून घेऊ लागले, वाचले. याच देवभोळ्या मूर्खपणामुळेच रत्नागिरी-मधील दाभोळे (ता. संगमेश्वर) या लहानशा गावी महारवाड्यात अशा महारा-तही मोठा कहर उडाला. त्याच्या सुदैवाने रत्नागिरीचे डि. टे. कलेक्टर श्रीयुत मुडकूरमहाशय सहजगत्या त्या गावी गेले म्हणून बरे झाले, नाहीतर त्या महार-वाड्यात राहता मनुष्य असा राहता ना! देवसर्वांच्या आत्मघातक मूर्खपणाचा एक हृदयविदारक पण परिणामकारक दाखला म्हणून ते वृत्त खाली देत आहोत.

१ रत्नागिरी जिल्ह्यात दाभोळे हे गाव संगमेश्वर तालुक्यात आहे. या जिल्ह्या-तील मोठमोठ्या महारवाड्यांपैकी एक महारवाडा ह्या दाभोळ्यास असून त्यात अजमासे ११० घरे नि ६०० माणसे गेल्या डिसेंबरात होती. त्या महारांपैकी काही महार परगावी कामावर कारपाटणाकडे गेले होते. तिकडच्या पटकीच्या रोगात ते लागून दाभोळे येथे येऊन मेले. त्यांच्या संसर्गाने त्या महारवाड्यात पटकीची साथ आली. पहिले दोनतीन मृत्यु लागोपाठ होताच महार लोक घाबरले. त्यांच्या पुरातन समजुतीप्रमाणे 'देव' रागावला! पटकी (कॉलरा) हा एक रोग आहे, तो ठराविक रोगाणूमुळे होतो, त्या रोगाणूंना प्रतिकारक अशी लस टोचली की ती साथ हटते आणि भरपूर प्रकाश, स्वच्छता, शुद्ध जलवायु, बागपाणी ही त्या साथीस फैलावू न देणारी प्रतिबंधके होत, ही साधी, सोपी उपपत्ति महारांना सांगितली तरी त्यांना अशा भयंकर साथींच्या राक्षसी थैमानाला न साजेशी मिळमिळीत वाटे. त्यांना त्या साथीची जी भयंकर भीति वाटे, त्या भीतीचे तितकेच रोमहर्षक कारण जे होऊ शकेल अशी कोणतीतरी उपपत्ति सांगणाऱ्यालाच ते पटकीचा खरा तज्ज्ञ समजणार. तशी कोणची तरी रोमहर्षक नि रागीट उपपत्तीच त्यांना पटणार. त्या कसोटीस पटकी हा एक रोग आहे ह्या नव्या मिळमिळीत कारणास सांगण्यापेक्षा पटकी ही महामारीची मरिआईची एक रागीट देवता आहे, ती भयंकर रागावली असून, बकासुरासारखे तिला ठराविक बोकडाचे बळी दिले पाहिजेत, ती 'औषधाने बरी होणारी' नसून मंत्र, पूजा, नैवेद्य, नमस्कार, बलिदान यांनीच काय ती झाल्यास प्रसन्न होणारी आहे असे सांगणाराच खरा गुरु वाटणार. डॉक्टरचा तो प्रश्नच नव्हता. पटकीची ती साथ रोग असता तर डॉक्टरचा प्रश्न! ती साथ म्हणजे चव-ताळलेल्या वाघिणीसारखी जी रागावलेली देवता मरीआई तिने माणसांना दिलेला दंड, केलेली भयंकर शिक्षा होती! ती रद्द करवील तर ही आमची गुरवीण, ही सतीण, ही चेटकीण काय ती करवू शकेल. कारण मरीआईची लहर तीच काय ती सांभाळू शकते. मरीआईच्या पुढे आमचे गाऱ्हाणे कसे मांडायचे ते तिलाच काय

त्तें ठावे मरीआओच्या पुढे जाण्याची वकिलीची सनद तिलाच काय ती मिळालेली ! त्या वैद्याला नि डॉक्टरला तिथे कोण विचारतो ! परंपरागत अशा या देवसकीच्या ठराविक भावनेप्रमाणे ते सारे महार त्याच्या महारवाड्यात त्या वेळी जी अेक सतीण होती तिला भयभीतपणे शरण गेले

## देवसकीचे सारें चेटूक जाणणारी मरीआओची महारवाड्यातील सतीण !

तिने काचा कमून मतरततर छा छूचा मारा पटकीवर करण्यास तत्काळ आरंभिले त्या महारवाड्यातील घरे आतून झाडून धुअून, फिनेल शिंपडून, अुजेड पाडून निरोगी करण्याचे कारणच नव्हते ! पटकी घरात का असते ! ती अवदसा कोणत्माही अितर माणसासारखी अंगणातून अुंबऱ्यावर नि अुंबरा ओलांडूनच गेली तर आत जाणार ! असा गूढ विचार करुन 'सतिणीने' प्रत्येक महाराच्या घरा-बाहेरच्या अंगणातच पटकीस ठेवण्यासाठी पहारेकरी ठेवले—शेणाच्या तीनतीन पट्ट्याच्या वर्तुळाचे ! ! असे मतरविलेले तीन तीन शेणाचे पट्टे प्रत्येक घराभोवती काढून मग त्यावर खडूची लहान लहान वर्तुळे ओढली अुंबऱ्यापर्यंत पोचण्याच्या आधीच ती अवदसा पटकी गुदमरून नाकात तिखट जाअून कासावीस व्हावी येवढ्यासाठी त्या खडूच्या वर्तुळात मिरच्या पेटवून ठेवल्या. मीठमोहऱ्या घरावरून 'अुतरून' दृष्ट काढून त्या मिरच्याच्या धुमीत सारखी टाकीत ती सतीण चेटुकाच्या मंत्राचा मारा करीत राहिली नतर तिने महारवाड्याकडे मरीआओचे जे काही देणे घेणे होत त्याचा आढावा काढला अुसनं, अुधार, गहाण, खरेदी, रोखीचे व हुन्याचे अेकंदर हिशोब ठिकठिक त्या सतिणीने आपल्या डोक्याच्या पाटी पेन्सिली-वर करुन मजावाट होता ठरविला की, महारवाड्याकडे मरीआओचे सरासरी तीन रेडे येणे बाकी निघते अितका अुलगडा झाल्याबरोबर त्या महारवाड्यातील थोरा-मोठ्या माणसासह मरीआओपुढे सतिणीने नारळ ठेवून नवस केला की, 'पटकी आवव ! आम्ही तुझे तीन रेडे लगोलग बळी देअून, मारून, मागची थकलेली बाकी साफ फेडून टाकू !' त्या बाकीसाठी पटकीचा वल्फि घाडून मरीआओ जी त्या महाराचे प्राण जप्त करीत होती आणि मृत्यु त्या लिलावात त्यांना पटापट बोलण्या-वारी विकत घेत चालला होता, तो भयंकर लिलाव आता थांबलाच पाहिजे असे त्या सतिणीने आश्वासिले आणि ते त्या महारांना पटल

पण अिकडे ? अिकडे घराघर लोक पटापट पटकीने मरू लागले आज सकाळी जो महार धडधाकट अुठे तो सध्याकाळच्या आत मृत्यूचे आचके देत पडे—अुद्या सकाळला जगातून नाहीसा होअी रेच, ओकाऱ्या, दुर्गंधि यांनी त्या मूळच्याच गदळ नि आकुंचित असलेल्या झोपड्या घाण घाण होअून गेल्या पण कुटुंबे त्यातच! बोलता बोलता १९ माणसं मेली, आणि जर केवळ देवसकीच्या अुपचाराचाच

मारा ते महार करीत राहते, तर ती पटकी त्याच्यातला अेकही मनुष्य जिवंत सोडती ना !

पण त्याच्या दुर्दैवाने कलेक्टर श्रीयुत मुडकूर महाशय हे नेहमीच्या फिरती-वर असता त्या गावी त्याच वेळी आले पाहतात तो महारवाड्यात कॉलरा ! पंधरावीस माणसे पटापट मरूनही गेलेली ! त्या गावचा पोलिस पाटील अेक अडाणी महारच होता त्याला विचारले, तू ह्या मृत्यूचे प्रतिवृत्त का धाडले नाहीस? आणि ह्या संकटास तोंड देण्यासाठी तावडतोब काय अुपाय केलेस ? त्याने सांगितले, ' संकटास तोंड देण्यास आमची सतीण आधीच सबळपणे झटत आहे, तिने घरोघर मंतरलेली शेणाची वर्तुळे अंगणातून काढून पटकीला ती ओलांडून घरात येण्याची बंदी केली आहे देवीपुढे नारळ ठेवला आहे, तीन रेडे बळी देण्याचा नवस केला आहे, देवाना गाऱ्हाणीही घातली आहेत ! ' पटकीला हटविण्यासाठी केलेल्या त्या महार मंडळीचा हा कडेकोट बंदोबस्त पाहून त्या मुडकूर महाशयानी प्रथम त्या सतिणीला बोलाविले आणि पटकी संपेतो त्या गावात पाअूल टाकण्याची तिला बंदी करून गावातून काढून दिले ! या अपमानकारक आज्ञेमुळे चिडून ती दैवी शक्तीने अद्‌भुत चमत्कार करणारी चेटकी मुडकूर महाशयाच्याच भोवती शेणाचे ते तीन पट्टे काढून मंतरळे ठिकठिकाणी त्याना आता डावून टाकणार अशी वाणीही अटकळ करता, पण काय झाले काय की ! थरथर कापत ती सतीण मुकाट्याने चालती झाली ! त्या महारवाड्यातील आपत्तीपैकी ती सतीण जाताच आता अुरली पटकी तेवढी !

तावडतोब मामलेदाराना आणि देवरखचे सरकारी डॉक्टर माहुली ह्याना पट-कीची लस घेअून महारमंडळीस टोचण्यासाठी धाडण्यात आले औषधेही नेली, पण पाहतात तो महारमंडळी अेकजात अुलटून पडलेली ! आम्ही टोचून घेणार नाही ! औषधानी पोट जाळायची आहेत आमची व्हय ?' वाटले तितके समजाविले महार टोचून घ्यायला म्हणून घराबाहेर पाअूल टाकीनात शेवटी संध्याकाळी निरुपायाने मामलेदार नि डाक्टर परतले टोचणं राहिले पण औषधं तरी घ्या, म्हणून यत्नाने त्याना औषधाचे घोट देअून ठेवले पण त्याची पाठ फिरताच महारानी औषधे गुपचूप आतून दिली ! टोचून घेणं नाही हाच निश्चय

औषधानी पोट मात्र जळतील, पटकीची माय थोडीच हटणार ? औषधानी बरा व्हायला तो रोग होता की काय ? मरीआअीचा राग तो ! त्याचं औषध देवसकी त्याचा डाक्टर ती सतीण, ती गुरवीण, ती चेटकी ! मामलेदार झाला तरी माणूसच ना? ह्या माणसाच्या औषधाचा, ह्या माणुसकीचा ही गोष्टच नाही, ही देवसकी आहे दवमर्की ! अस मानीत महारातील सगळ्या शहाण्यानी त्या मामलेदारप्रभृति सब जणाना निव्वळ मूर्खात काढले पटकी पुरवली पण हे प्रताधिकारी नकोत असा जळफळाट महारवाड्यात चालू झाला त्याच दिवशी त्या

टीचभर महारवाड्यात तीस जण पटकीने लागले। पूर्वी लागलेले पटापट मरत होतेच. देवसकीच्या शेणाच्या तिन्ही पट्ट्या ओलांडून पटकी घरोघर घुसत होतीच।

मामलेदाराचे महार अैकत नाहीत हे कळताच आपल्या हाताखालच्या मंडळीस घेअून सकाळीच (ता ८-१-३६ला) प्रांतमहाशय श्रीयुत मुडकुर स्वत महारवाड्यात गेले मनधरणी करून जे वळले त्याना लस टोचली, नाही त्याना घरात जाअून धरून टोचल जवळ जवळ शंभर माणसे टोचली तो लसच संपली म्हणून तावडतोब मुडकुर महाशय मोटारने रत्नागिरीस जाअून तेथील सरकारी डॉक्टर श्री देसाअी आणि सरकारी रुग्णालयात होती नव्हती तेवढी लस नि पटकीची औषधे घेअून दुपारी दाभोळ्याला परत आले आणखी १३० महाराना टोचले, तो तीहि लस संपली तव्हा चारपाच वाजता प्रांतमहाशय मोटारने कोल्हापूरला गेले संस्थानी अधिकाऱ्याच्या सहानुभूतीने तेथील मुख्य डॉक्टर रावबहादूर धनवडे याचा लसीचा सारा साठा मिळवून ता ९-१-३६ ला सकाळी प्रांतमहाशय श्री. मुडकुर पुन्हा महारवाड्यात आले

पहातात तो पटकीचा नुसता कहर अुसळला होता। जिकडे तिकडे अुलट्या रडारड, वण्ह, धावपळ। आअीबाप दोघेहि मरेले पडले आहेत भोवती लहान मुले रडारड करताहेत, जवळ कोणी नाही, शेजारी शेजाऱ्याच कोणी मरू घातल आहे। जिकडे तिकडे घाण, कचरा। त्यात त महार प्रांताधिकाऱ्यादर विथरलेले घरात येण्यास त्या सरकारी नि स्वयंसेवक डाक्टरादिक मडळीस त आडकाठी करू लागल। पण मेलेल्याची प्रेत घरातच पडलेली त्याना खपत होती काही घरात दोन दोन तीन तीन प्रेत खोलीत फेकून कुलुपे लावून बंद केलेली नी त्या खोपटातल्या दुसऱ्या खोलीत सारा कुटुंबकबिला निजत बसत पडलेली होती। त्यामुळे साथ किती झपाट्याने महाराना पछाडीत चालली असेल ते सागावयासच नको अशा स्थितीत पहिली गोष्ट प्रेत पुरण्याची त्यातल्या त्यात जे धष्टपुष्ट महार होते त्याना टोचून प्रेत पुरण्यास आज्ञापित गल ते खडडे किती खणणार। थकून त्यानी दुपारी हत्यारे फेकून दिली। तव्हा स्वत श्री पाडळकर मामलेदार आणि अितर मडळी प्रेताना अुचलण्यास पुढे झाली त्याच्या या निस्सीम कळकळीचा काही परिणाम होअून महारातील काही मडळीही वळली आणि अेका अटीवर काय ती प्रेत पुरू म्हणाली ती अट म्हणजे ब्रँडी। तीही ठीकच समजून ब्रँडी प्रत्येकास थोडी पाजली तेव्हा प्रेत पुरली गेली त्या विषारी नि घातक वातावरणात स्वयंसेवक नि सरकारी नोकर देखील घाबरून गल्यास नवल नव्हे। ती मंडळीहि महारवाड्यातील त्या मृत्यूच्या जबड्यात रावावयास कचरू लागलीस पाहून स्वत मुडकुरमहाशयानी त्याना हृदय हालवून सोडणाऱ्या शब्दात समजविले की, ' आता जर आपण पाय मागे घेअू तर ह्या महारवाड्याच्या दुर्दशेस पारावार अुरणार नाही भूतदया, धर्म, माणुसकी ती हीच की, ह्या अज्ञानी बापड्या अस्पृश्याना आपण मरणाच्या जबड्यात असेच

सोडून जाऊ नये ! मी तुमच्यातच आहे ! आता जे या बापड्या महाराच्या जिवाचं तेच आपल्या ! आओबाप सगेसोयरे गेलेली ही केविलवाणी लेकरं, अनाथ तरुणी, वृद्ध माणसे पहा ! मी तरी ह्यांना मरणाच्या खड्ड्यात असं जिवंत पुरू देणार नाही मी तरी ह्यांना सोडणार नाही ! पटकीत मलो तरी सोडणार नाही त्या दयाशील अधिकाऱ्याच्या डोळ्यातून टिपे गळली ! ती व्यर्थहि गेली नाहीत सर्वांनी तोच निश्चय केला सर्वांनी प्रथम स्वत ला टाचून घेतले , आणि महार-वाड्यात दिवसभर ते सारे थोरथोर अधिकारी आणि अितर स्वयंसेवक पुन्हा राबू लागले

पण त्या दिवशी रात्री महारांनी निराळीच तोड काढली ! त्यांनी त्यांच्या-तील अगदी मरणोन्मुख असे लोक बाहेर काढून दोनतीन गोठ्यात टाकून दिले नुसतेच लागलेले जे बऱ्या स्थितीत होते त्यांना बरोबर घेतलं, भाडीकुंडी जे घेववलं ते सामान बोचक्यातून भरून डोक्यावर चढविलं आणि रातोरात ते महार महारवाडा सोडून रानावनात पळून गेले ! अुरलेली अनाथ मुलेमाणसें त्या भयाण महार वाड्यात त्या पाण घालेल्या घरात, गोठ्यात हगवणी नि ओकारीने लडबडलेल्या कण्हत्या, मरत्या रोग्यातच मिसळलेली होती !

ता ११ ला सकाळी प्रांतमहाशयादिक मंडळी येअून पहातात तो महार पळून गेलेले ! हें आयतंच घालेलं स्थानांतर अेका अर्थी अिष्ट तर दुसऱ्या अर्थी भयंकर ! कारण गावोगाव ती साथ हे पळते महार पसरविणार यासाठी तावडतोब आजूबाजूच्या गावांना सक्त आज्ञा देण्यात आली की दाभोळचे मनुष्य येअू देअू नये तथील रानावनात आजूबाजूलाच महारांना रोखून ठेवण्यात आले त्या वेळी श्री शेड्ये हे आपले सहकारी शेटचे नि श्री तेंडुलकर या हरिजन संघाच्या स्वयंसेव-काची टोळी घेअून साहाय्यास आले तथील दोन मिशनरी शाळाशिक्षक सातवळेकर बंधु हे प्रथमपासूनच जिवापाड मेहनत करीत होते या सर्वांना मिळून महाराच्या घरांना साफ करण्यास आरंभ केला कोठार अुपसून आत अवश्य तो अुजेड आणला. आपल्या हाताने घर वाटा झाडून साफ केल्या सारवून काढलं अनाथ मुलामुलींना रोग्यापासून निराळे ठेवलं प्रेतं सारी पुरली पळून गेलेल्या महाराच्या मागं जाअून ते जिथं फुटून फुटून झाडाझुडपाखाली होते तेथं औषध पुरविली महार औषधं फेकीत म्हणून दिवसातून तीनदा ही सारी मंडळी त्या दूरदूरच्या महार टोळ्यात फेऱ्या घालून औषध समक्ष पाजू लागली अुरलेल्यांना टाचलं अशा अनेक अुपाया-अुपचारांना ता १५ च्या सुमारास पटकीची साथ अेकदाची आटोक्यात आली ! लागलेले अुणेपुरे शमर महार वाचले अनाथ मुलं दहापधरा त्यात अेक लेकरू अवघे सहा महिन्याचे त्याचं काय करावयाचं हा प्रश्न होताच मिशनरी त्यांना पाळाव-यास नेत पण ते धर्मांतराच्या अटीवरच असणार ! तो नाही त्यांचा दोष नव्हता.

कारण बोलून चालून हे मिशनच असा प्रसंग पाहून रत्नागिरी हिंदुसभेने तीं सारी अनाथ महार मुले रत्नागिरीस अवश्यच तर धाडून द्यावी, आपण पाळू म्हणून कळविले

अितक्यात रत्नागिरीच्या नि देवरुखच्या नागरिकानीही त्या संकटात त्या अनाथदशा झालेल्या महार कुटुंबासाठी अेकदर ५२ पोती धान्य, नि कपडे पण धर्मार्थ जमवून श्रीयुत मुडकुरमहाशयाकडे धाडले ते त्यानी यथोचितपणे वाटून दिले अनाथ लेकराना सर्वांनी चिर्ती ममतेने जोपासिले

त्या सहाणे महारानी देवसकीच्या पायी आपल्यावर मृत्यु ओढवून घेतला होता ! जर वेळीच त्याना श्रीयुत मुडकुरमहाशयासारख्या कनवाळू सज्जनाच्या 'माणुसकीने' हात दिला नसता तर ते बहुतेक पटकीला बळी पडल्यावाचून राहिले नसते अितकी धावाधाव केली तरी पन्नास महार त्या अेवढ्याशा महारवाड्यात आठ दिवसाच्या आत पटकीने मले जवळजवळ १०० महार पटकीने पछाडून मरणाऱ्या ताडात पडता पडता बळे बळे ओढून काढून वाचविले गेले वेळीच धरून धरून टोचल्यामुळे बाकीचे विनडाग बचावले खरोखर श्री मुडकुरमहाशय नि त्याचे सहकारी यानी पाचशे महाराचे जीव, आपले जीव धोक्यात घालून वाचविले जिल्ह्याचे कलेक्टर श्री जाशीमहाशय यानी त्याच्या या हाताखालच्या सर्व अधिकाऱ्याना शक्य ते पाठबळ नि प्रोत्साहनच दिले ह्या प्रकरणी तरी ह्या सर्व अधिकाऱ्यानी सरकारी नोकर हे खरोखरीच जनिक सेवक असावेत ह तत्त्व नि ही पदवी सार्थ केली ह त्याना भूषणावह आहे ! जे स्वयसेवक केवळ कर्तव्य म्हणून आपण होऊन त्या संकटात जिवापाड श्रम घेते झाले त्याचे महत्त्व स्पृहणीय आहच आहे

(रोग हा देवाचा राग नाही, लहर नाही म्हणूनच देवसकीचा तो विषय नव्हे प्रार्थनने, पूजेने, बलिदानाने देव पावून रोग बरा करीत नाही त्याच्या प्रतिकाराच साधन धर्मशास्त्र नव्ह राग हा सृष्टिनमाच्या अबाधित नियमाचा परिणाम आरोग्य, विद्या नि वैद्यकशास्त्र हच त्याच्या प्रतिकाराचे साधन त्यातील सृष्टिविज्ञानाप्रमाणे मानवी अुपचार कल की रोग हटतो. टोचल की 'पाप्याला'ही सहसा प्लग, दर्वा पटकी होत नाही न टोचल तर वेदज्ञ विप्रही हजारो हजार त्या त्या रोगात तडफडून मेल्यावाचून सहसा राहत नाहीत. ह साधे सत्य कोणत्याही कल्पित गोष्टीपेक्षा ह्या महारवाड्यात झालेल्या देवसकी नि माणुसकीमधील झटापटीत कितीतरी परिणामकारकपणे प्रत्ययास येते त पहा ! ते दोन्ही पथ जणू काय प्रयोगशाळतच हेतुत तसे कसोटीस लागले (भाबडी देवसकी बहुधा मृत्यूकडे नेते, विज्ञानप्रवण माणुसकी मृत्यूस बहुधा जिंकते)

## पटकीवरचाच नव्हे तर अस्पृश्यतेवरचाही तो अेक विजय होता !

आमच्या अेका दृष्टीने ही घटना सामाजिक महत्त्वाची आहे. 'अस्पृश्यां'च्या छळाविषयी आम्ही कठोरातील कठोर टीका करून आजपर्यंत त्यांना प्रतिकारीत आलो. तेव्हा आम्ही तिकडे कानाडोळा करू हे नव्हेच नाही; परंतु आंबेडकरा-सारखी काही मंडळी जो स्पृश्यांविषयी सरसकट चिडखोरपणा करू लागली आहेत त्याचा प्रतिवाद करणे हीही कृतघ्नताच होणारी आहे. स्पृश्यांत अस्पृश्यतानिवारणार्थ जिवापाड झटणारा वर्ग किती वाढत आहे, आपल्या 'सनातनी' कुटुंबाच्या आप्तांचादेखील असंतोष पत्करून त्यांच्या प्रेमावर पाणी सोडून अस्पृश्यतानिवारणार्थ तो वाढता वर्ग किती प्रामाणिकपणे झटत आहे, तेही ह्या दाभोळ येथील महारवाड्यातील पटकीच्या संकटातील वर दिलेल्या वस्तुस्थितीवरून स्पष्ट होत नाही काय ? स्पृश्य अस्पृश्यांचा कसा छळ करतात हें जसे दाखविले पाहिजे तसेच अस्पृश्यतानिवारणार्थ निरपेक्षपणे झटणारा स्पृश्य वर्गही झपाट्याने वाढत आहे हेंही लपविता कामा नये. दाभोळ येथे त्या महारवाड्यात स्वतःचा जीव धोक्यात घालणाऱ्या या वरील लहान थोर मंडळीत भूतदयेची जशी जाणीव होती, तितकीच अस्पृश्यतेस मूठमाती देऊन जात्युद्धाराचे विशाळ तेच खरा विशाळ, असे मानून अस्पृश्यतेची किंचितही किळस न मानता झटणे, अस्पृश्यांची विशेष सेवा करणे, हें कर्तव्यही आपण करीत आहो याचीही स्पष्ट जाणीव होतीच होती. नाहीतर अितर काही स्पृश्य लोक त्या महारांना नव्हे त्या संकटातही शिवेनात तसे हेही शिवते ना ! पण त्या अधिकारी नि बिनअधिकारी जनसेवकांत असलेले ब्राह्मण, प्रभू, मराठे, वैश्य प्रभृति अनेक स्पृश्यजातीय सज्जनांनी आपल्या भावाबहिणींची करावी तशी सेवा त्या महारबंधूंची केली, त्यांच्या रोगी अुलट्या घाण साफ करून स्वहस्ते त्यांची घरे सारविली, प्रेते पुरली, औषध देऊन सेवा करून त्यांना मृत्यु मुखातून सोडविण्यासाठी आपण मृत्युमुखात हात घातला ! असे अुदाहरण न च्छेतर कौतुक हे अस्पृश्योद्धाराच्या कार्यास अत्यंत अुत्तेजक झाल्यावाचून राहणार नाही. अस्पृश्यांतही महार भंग्यांसाठी वा ढोरांसाठी जी सहानुभूति दाखवीत नाहीत ती जे स्पृश्य दाखवितात त्यांचे आभार मानण्यात अस्पृश्यांचेही हित आहे !

(मार्च १९३६, किर्लोस्कर)

+ + +

## Ursula Blook यांच्या लेखातील महत्त्वाचा भाग

'ललनांच्या लावण्यापासून होणारे लाभ थोडक्यात असे सांगता येतील—

'चटकन स्नेह जुळविण्यास सौंदर्य अुपयोगी पडते कारण, पाहणाराचे मन सुंदरपणावर पडतांक्षणीच लोलुपते साध्या स्त्रीची ओळख करून घेण्यापेक्षा सुंदर स्त्रीच्या ओळखीकडे लोकांच्या मनाचा ओढा अधिक त्यातही पुरुषांचा विशेषच

'तिच्याविषयी पुरुषांना सहानुभूतिही अधिक वाटते, तिचे मन मोडणं अधिक जड जाते कारण तिच्या लावण्याने त्यांच्या भावनांना मोह पडतो

'मूळचेच रूप सुंदर असले म्हणजे स्त्रीला आपल्यापरीने आपली अधिकात अधिक छाप पाडण्यास अुत्तेजन मिळते सुलभ जाते आपण शक्य तितके आकर्षक व्हावे, निसर्गाने दिलेले सौंदर्याचे अुदार आभरण अधिकच खुलून दिसावे आणि त्याचा शक्यतो अुपयोग स्वतःला करून घेता यावा ह्यासाठी रूपवती स्त्रियांचा प्रयत्न सारखा चालू असतो

'लावण्यावर लुब्ध झालेल्या प्रियकरांची संख्या नहमी अधिकच असणार त्यामुळे साधारण स्त्रियांना वराची निवड करणं जसं जड जाते तसं सुंदर स्त्रीला जाण्याचे कारण नसते माता नि पत्नी ह्या दोन्ही नात्यांची कर्तव्ये पुरी करण्यातच स्त्रीजीवनाचे जे खरं साफल्य असते, तेही रूपवती महिलेला सहजसाध्य होते रमणीय वधूला वर मिळणं सुगमतर असते अितकेच नव्हे तर अुलट वरांमध्ये आपल्याला रुचेल तोच वर निवडण्याची संधिसुद्धा तिला केव्हाही दुष्प्राप्य नसते कारण वधूयाचना करणारे अनेक पुरुष तिच्या लावण्याने तिच्याचकडे आकर्षिले जात असल्यामुळे तिचे स्वयंवरक्षेत्र अधिक विस्तृत नि विविध असते ज्यांना मागणी घालणारे मुळातच थोडे, त्या साधारणमध्ये स्त्रियांपेक्षा सुंदर स्त्रियांना आपल्या

त्यांही अंगीच फुगून जाते, मानावर राहत नाही, ती छचोर होते, एहाडी बनते, गर्वाने बिघडते विवेक न सोडता सभाळून वागणे तिला फार कठीण जाते

'आपल्याला काय कमी, हवे तितके लोक आपल्याला वरण्यासाठी लोलुपलेले हवे तेथे सापडतील, अशा घमेंडीपायी ती ज्यालात्याला झिडकारीत जाताजाता शेवटी 'अति शहाणा त्याचा बैल रिकामा,' अशी तिची फमगतही होण्याचा संभव असतो हे नको, त नको, अस करताकरता शेवटी हाताशी काहीच राहत नाही किंवा ज टाकाऊ तच स्वीकारणे भाग पडत

'याच कारणाने आणि अशाच चोखदळ चुकीमुळे जगातील काही नामांकित लावण्यवतींना शेवटी सुखाचा ससार थाटता आला नाही, मनासारख दांपत्यसुख मिळाले नाही स्वत ची भरमसाट आकांक्षा नि स्वत च फुगीर मूल्यमापन या आपल्याच दोषामुळे कित्येक सुदरींचे विवाह श्रीमतीचे झाले, पण सुखाचे झाले नाहीत !

'आज तर अशीच स्थिति आहे ! कारण आजकाल पुरुषाचा ओढा तारुण्याकडे फार ! नुसती दिसायलाच नव्हे, तर वयानदेखील जी खरोखरीच तरुण आहे तिलाच आज जो तो अिच्छितो

'त्यातही लोकामध्ये अशी अेक घातक समजूत बळावलेली आहे, की कांति नि बुद्धि ही जुळी मावडे नसतात सुदर मनुष्य बहुधा शाहणा नसते 'देखनेमे डबू और चलनेमे शिवराअी' असाच प्रकार फार ज्या व्यवसायात बुद्धीलाच मागणी अधिक, त्यात अर्थातच सौंदर्य फिक पडते, त्याचा भाव अुतरतो साधारण नोकरीतही नुसत्या देखण्या स्त्रियाना त्याच्या देखणेपणाचे फारस साहाय्य न होता अुलट कित्यकदा ता अेक अडथळाच होअून बसतो

'रमणीच्या मागे तिच्याच स्त्रीजातीचा मत्सर सारखा हात धुअून लागलेला असतो, हें तर फार त्रासदायक असते विवाहित स्त्रिया अशा सुदरीकडे नेहमीच सवेखोर दृष्टीने पाहतात सुदर मुलीविषयी लोक अशा सहजासहजी कंड्या पिकवतात, तसा त्रास साध्यासिध्या मुलींना कोणी फारसा देत नाहीत, पण सुदर तरुणीवर ज्याचा त्याचा डोळा

'सुंदर स्त्रीलाही अितर लोकाची योग्य परीक्षा करणारा विवेक फारसा राहत नाही बहुधा तिच्या स्वत पेक्षा तिच्या लावण्यावर लोकाची दृष्टि खिळलेली असत तिच्यापेक्षा तिच सुदर मुख त्याना आवडलेल असत तिचे खरे स्नेही कोण, कोणाचे प्रेम प्रामाणिक, त ओळखणे कठीण जाअून माणसाची परीक्षा करण्यात तिची अनकदा फसगत होत केवळ मी चागली दिसत म्हणून काय त हे माझ्याशी लाडीगोडी लावतात अस ज्याच्याविषयी तिला वाटतं, तेच मात्र क्वचित् तिच्यावर खरेखर प्रेम करणारे असतात, आणि ज्याना ती खरेखरे मित्र म्हणून शपथपूर्वक मानते, तेच अती अप्रामाणिक ठरतात वारंवार अशा फसगतीन शेवटी तो सर्वांनाच संशयास्पद मानू लागते, तिला कोणीच खरा वाटेनासा होतो

'त्यानही सौंदर्याला मारको हीज लागलेली असते! ती मरून काढण्यासाठी सारखी खटपट करावी लागते. रमणीला ती आपली पदवी राखण्यासाठी आपल्या परीने शक्य तितके सर्वांगसुंदर दिसावेच लागणार! लोक कुजबुजू लागले की काय की 'ही अुतरलेली दिसते नाही का?' अशी तिला सारखी शंका येत राहते. आपल्या लावण्याची ख्याति फिकी पडू नये यासाठी प्रयत्न करताना सुंदर स्त्रीला पराकाष्ठेचा ताण सोसावा लागतो.

## आणि सौंदर्याचें सर्वांत असह्य व्यंग म्हणजे वार्धक्य!

'जिचे रूप मनोहर, जिच्या पायांशी तिच्या त्या लावण्याने मोहित होअून सारे जग लपटलेले आहे अशी रमणी अशा अेका अुच्च पदावर चढलेली असते, की त्यावरून अुतरणे अगदी दुर्घटच व्हावे. प्रभुत्वाची रुचि चाखलेली असावी, प्रभुत्व गाजविलेले असावे आणि नंतर ते प्रभुत्व आपल्या हातून दिवसानुदिवस निसटून जाअू लागावे, हें कोणासही असह्यच वाटणार! जो मोहक हावभाव नि खेळकर हसणे रुसणे सुंदरीच्या तारुण्यात जितके आकर्षक भासते, तेच त्या स्त्रीच्या वयोमानाने पुढे अेकाअेकी पाचकळ नि तिरस्कारार्ह ठरू लागलेले पाहून त्या सौंदर्य मुक्त जाणाऱ्या वार्धक्योन्मुख स्त्रीच्या मनास धक्का बसल्यावाचून कसा राहील? लावण्यवती स्त्रीचे सर कौशल्य वृद्धपणी वार्धक्याला शोभून जाण्यातच आहे!

सुंदर ललनांच्या या दुर्गतीची कीव करण्याचे सोडून लोक अुलट तो चेष्टेचाच विषय समजतात वृद्धपणी सगळे जवळजवळ सारखेच दिसतात तुम्ही आपुल्याच्या सवयी बदलणे आणि ज्या वार्धक्यात, प्रभुत्व गाजविण्याचें साधन जें लावण्य त्यालाच अंतरावे लागतें त्या म्हातारपणात दिवस काढणे हें कोणत्याही स्त्रीला दुःसह, दुर्घटच असणार.

## लावण्य हे जितके लोभनीय तितकेच हितकारकही आहे !

वर अुतारलेल्या Ursula Blook यांच्या लेखात लावण्यापासून हानिलाभ हे पुष्कळ विचारपूर्वक नि समतोलपणे सांगण्याचा यत्न केलेला आहे खरा, परंतु त्या विचाराची मांडणी सुसंगत नाही आणि त्या हानिलाभाची तुलना करून काढलेले तात्पर्य तर अगदीच अेकांगी आहे. आयव्ययातील रकमा टिपतानाच मुळी भलत्याच्या नावे रकमा पडल्या ! कारण सौंदर्यापासून होणारे म्हणून जे तोटे दिले आहेत ते वस्तुत: सौंदर्यापासून होत नसून त्याच्या दुरुपयोगाने किंवा सदुपयोग न केल्याने जे होतात ते आहेत.

सौंदर्यापासून होणारे जे तोटे वर दिलेले आहेत, त्यांपैकी अनेक 'दृष्टीपासूनही होतात' असे दाखविता येईल. चांगले दिसत म्हणूनच अनेक प्रसंगी पाहू नये ते अुद्वेजक पाहवे लागते. आपल्या प्रियकराला अपघातात रक्तबंबाळ झालेला पाहून किंवा कुपुत्राला दारूपायी दारोदार भीक मागताना पाहून किंवा पेशवाअीच्या शेवटच्या दिवशी त्या मानधन श्रीमंताच्या शनवारच्या वाड्यावरील हिंदुपदपादशाहीचा जरिपटका खाली पाडून त्यावर अिंग्रजांचा जॅक सरसर वर चढताना पाहून — दुखावलेले मनुष्यमात्र वैतागाने असेच म्हणून जाते, की 'अरेरे ! ही दुर्दशा पाहवी लागण्यापेक्षा देवाने डोळेच दिले नसते तर किती बरं झालं असतं !' तशा वैतागाने 'लावण्यच' नसते तर माझी अशी दुर्दशा का होती असे अेखादी हेलन किंवा क्लिओपात्रा किंवा पद्मिनी दुःखावेशात अुद्गारली, तरी त्यामुळे लावण्य स्वयमेवच टाकाअू ठरत नाही, घातकही ठरत नाही. दृष्टीने कधी कधी दुर्दशा पाहावी लागते, म्हणून दृष्टि हीच घातक आणि अेकंदरीत दोन्ही डोळ्यांनी आंधळे असणे किंवा निदान अधू दिसणे हेच चांगले असे का म्हणावयाचे ?

लावण्य वयोमानाने झिजते तशी दृष्टिही मंदावते, बुद्धिही झिजते. लावण्यवतीची म्हातारपणी केविलवाणी स्थिति होते, तशी बुद्धिमानाची आणि डोळसाचीही होते. वृद्धपणी डोळे आंधळे नि बुद्धि निकम्मी होत चालली असताही मनुष्यास असह्य खेद वाटतो. लावण्याच्या पायी अनेक अुन्माद घडतात, तसेच अुन्मार्गगामी बुद्धीकडून घडतात, दृष्टीकडूनही घडतात. म्हणून निर्बुद्ध मनुष्य किंवा जन्मांध मनुष्यच खरा सुखी असे काही त्याचे तात्पर्य काढता येणार नाही !

मनुष्याला आपल्या बुद्धीच्या बळाने आजवर अनेक सोयिस्कर शोध लावता आले, जे मनुष्याला जन्मत: मिळालेले नाहीत असे अनेक लाभ संपादिता आले. मोटारी–आगगाड्यांच्या साधनांनी त्याने आपली गति शतपटीने वाढविली, नावा, आगनावा काढून समुद्र अुल्लंघिले, विमानांनी पंखांची अुणीव भरून काढली, अनेक रोगांचा औषधांनी नि शल्यांनी त्याने पाडाव केला, पण अजूनही जन्माने जे मिळाले नाही ते लावण्य संपादिण्याअितकी, आपले मूळचे साधे वा आगळ रूप

बदलून ते सुंदर नि सुरेख करण्याची युक्ति साधण्याअितकी त्याच्या विज्ञानाची प्रगति झालेली नाही, सनिधच्या भविष्यकाळातही कुरूपाला सुस्वरूप करण्याची तर दूरच, पण काळ्यांना गोरे करण्याची युक्तिसुद्धा मनुष्याला सापडेलच अशी हमी आज देता येत नाही, मनुष्याला असा प्रकारे यत्नाने जे संपादता येत नाही, पण जे अत्यंत लोभनीय वाटते, ते दुर्लभ्य स्वरूपसौंदर्य ज्याला जन्मतःच लाभलेले आहे त्या पुरुषाने वा स्त्रीने ती अेक देवाची स्पृहणीय देणगीच मिळाली आहे असे समजणे आणि त्या मानाने त्या त्या प्रकरणी स्वतःस भाग्यशाली मानणे हें अगदी साहजिक नि अुचित आहे या राष्ट्रातील पुरुष 'दीर्घोरस्को वृषस्कंधः शालप्रांशु-र्महाभुजः' अशा पौरुषी सौंदर्याने आणि स्त्री जिला पाहताच विरक्त तपस्व्यांनीही 'स्वमस्य विश्वस्य च नेत्रकौमुदी !' असे सबोधावे, अशा लोभनीय लावण्याने विस्मित आहे, त्या राष्ट्राने त्या आपल्या रूपसंपदेस अेखाद्या स्वर्गीय वरदानासारखे जपले पाहिजे, सृष्टीच्या त्या विशेष अुपकृतीस्तव तिचे आभारीच असले पाहिजे

त्यातही ललनेचे लावण्य हा तर सृष्टीच्या कलाकुसरीचा अत्यंत कमनीय असा कांचना कळसच आहे ! चित्रलेखा अेकाहून अेक सुंदर पुरुषांची चित्रें रेखीत-रेखीत जेव्हा प्रद्युम्नाचे चित्र रेखिती झाली, तेव्हा अुषा जशी अत्युत्कट समाधानाने अुठून वदली, 'थांब सखे, ठेव ती कुंचली ! माझ्या स्वप्नातली मनोहर आकृति ती हीच !' तसेच अेकाहून अेक सुंदर आकृति कल्पीत, चितारीत ती मना-जोगी न झाल्याने भूगर्भीय (Geological) स्तराच्या टापलीत टाकीत सृष्टिदेवी आपल्या कलागृहात (Studio) युगायुग चितारीत बसली असता जेव्हा तिच्या कुशल कुंचलातून अती लावण्यवती ललनेचे चित्र अुतरले, तेव्हा ती सृष्टि, ती आद्य नि अमर चित्रलेखा ती आपलीच अपूर्व कलाकृति पाहून आपणच विस्मय पावली नि आपल्याशीच कलानंदात तन्मय होअून म्हणाली, 'अहाहा ! हीच ती माझ्या सौंदर्याच्या स्वप्नांतील मनोहर कलाकृति ! माझे आदर्श चित्र !' कवितादेखील ललनेच्या त्या मनोज्ञ लावण्याला पाहून अुद्गारली, वा रे वा !—'

> अस्याः सर्गविधौ प्रजापतिरभूच्चन्द्रो नु कान्तिप्रदः ।
> शृंगारैकरसः स्वयं नु मदनो मासो नु पुष्पाकरः ॥
> *वेदाभ्यासजडः कथं नु विषयव्यावृत्तकौतूहलो ।*
> निर्मातुं प्रभवेन्मनोहरमिदं रूपं पुराणो मुनिः ॥

कामले कविता तर काय ! — पण तो महादेव, तो विरूपाक्ष तपःतोदेखील त्या रमणीय ललनेला पाहून क्षणैक विचलित झाला ! 'चन्द्रोदयारम्भ अिवाम्बु-राशिः' आणि कुमारसंभवात वर्णिल्याप्रमाणे अुमामुखे बिंबफलाधरोष्ठे । व्यापार-यामास विलोचनानि ॥'

आजही सृष्टीच्या कलागृहात लावण्यवती ललनेच्या त्या सुंदर चित्रापेक्षा अधिक लोभनीय अशी दुसरी कलाकृति आढळत नाही. ललनेच्या लावण्याहून सरस असें दुसरें सौंदर्यस्वप्न सृष्टीलाही अजून पडलेलें नाही; तिच्या कल्पनेला सुचलेलें आजतरी दिसत नाही! अुचाचे कोणी सांगावे?

असें हें ललनेचें लावण्य जर नामशेष झाले तर जीवनाला अेका अत्यंत विमोहक आनंदास मुकावें लागेल; नव्हे, जीवनाची अेक प्रेरणाच पंगु होअील.

कारण, ललनालावण्य ही जीवनाची अेक नयनानंदक अशी शोभाच काय ती नसून तें सृष्टीच्या प्रजननलालसेचें वशीकरचूर्ण आहे. लावण्य हे भगवान् मदन-देवाच्या हातातील अमोघ अस्त्र आहे! याच अस्त्राच्या बळावर 'कुमारसंभवाचें' लोकहितकारक देवकार्य साधण्यासाठी सिद्ध झालेल्या परंतु त्याचें वज्रही तें देवकार्य साधण्यास अक्षम झालेले पाहून चिंतातुर असलेल्या अिंद्रास मदन सावेश आश्वासू शकला, की 'प्रसीद विश्राम्यतु वीर वज्रं शरैर्मदीयैः कतमः सुरारिः। बिभेतु मोघीकृतबाहुवीर्यः स्त्रीभ्योपि कोपस्फुरिताधराभ्यः॥'

ज्या हेतूसाठी प्रथमप्रसव मातेला सृष्टीने पुढे दूध दिलें, मुख्यतः त्याच हेतू-साठी तिने कामिनीकुमारीला आधी लावण्य दिले. प्रजाजनन हाच नव्हे तर सुजनन (Eugenics) हाच, ललनेला ही विलोभनीय लावण्याची दैवी देणगी देण्यात निसर्गाचा मुख्य अुद्देश आहे; हीच निसर्गाची अपेक्षा आहे.

तेव्हा लावण्यवती कुमारींनो, जननींनो, तुम्हांस जन्मतःच निसर्गाने दिलेल्या ह्या दैवी देणगीस आपल्या पूर्वपुण्याअीचे वरदानच माना आणि त्यास अत्यंत जपा! लावण्यच नव्हे तर प्रत्येक स्त्रीने तिला जें रूप जन्मतः लाभलेले असेल तें त्यातल्या त्यात खुलून दिसावे असा यत्न अवश्य करावा. प्रसाधनांनी आपली कांति, वर्ण, शोभा वाढवावी. स्त्रीचें सौंदर्य ज्यायोगे विकासेल तिला त्याचा योग्य तो लोभ लागेल असें अुत्तेजन तिला मिळाले पाहिजे.

आपल्या आर्य राष्ट्रात पूर्वी स्त्रियांच्या लावण्याचा गौरव होत असे. लावण्य हें लांछन नसून ललनाचे अेक स्पृहणीय विभूषणच कसें मानलें जाअी त्याचेही पुरावे आपल्या संस्कृत वाङ्मयात आढळून का येतात? रामायण, महाभारता-सारख्या आर्ष ग्रंथातही स्त्रियाना लावलेली संबोधनें पाहा! ऋषि नि राजपिमुद्धा त्यांना 'हे सुकेशि, हे सुलोचने, हे सुमुखि, हे रंभोरु' असें संबोधताना आढळतात. स्त्रीवाचक शब्द नि विशेषणे पाहा—रमणी, ललना, रामा, सुंदरी वरोरु, सुमध्यमा पृथुजघना, कामिनी, कांता! स्त्रियांच्या प्रत्येक अवयवाचें नि अेकदर देहलतेचें सुगठण नि सौंदर्य हें असें अेक गौरवार्ह आभूषण समजलें जात असल्याने स्त्रियां-करवी तें जन्मजात सौंदर्य शक्यतों जपून, कांतिवर्धक चूर्णादिक प्रसाधनांही जोपासून आणि आपल्याला मिळालेली ती पैतृक देणगी होअील त्याहून वाढवून आपल्या संतानाच्या हाती सोपविली जाअी. स्त्रियांना आपल्या लावण्याचा यथा सदुपयोग

करण्यास समाजाकडून अुत्तेजन मिळत गेल्याने पिढीपिढीचे सौंदर्य वाढत आजी आजीहून मुलगी सुंदर पित्याहून पुत्र अधिक सबळ असे ज्या राष्ट्रास आपले शरीर-सौष्ठव प्रतिपिढीस वाढत जावे असे वाटते, त्याची संस्कृतिही कलासुंदर बनते

जी जितकी गबाळ नि जितकी कुरूप—ती तितकी सुवृत्त नि सुशील असे मानणारी कलाहीन संस्कृति ही संस्कृति नसून विकृति आहे पिढीपिढी अशा अरसिक अुपेक्षेने ती अधिकाधिक बागळ बडोल नि भेसूर होत जाते !

परंतु लावण्यवतींनो तुम्ही हे मात्र विसरता कामा नये की लावण्य ही तुमच्या हाती सोपविलेली निसर्गाची दैवी ठेव आहे म्हणूनच त्या अनर्घ्य निक्षेपाची (Trust ची) नैसर्गिक अट ही तुम्हा पाळली पाहिजे ती अट म्हणजे सुजनन, सुप्रजनन ! जी लावण्यलतिका नि संतान ती निष्फळ आम्रलतिकासमान व्यर्थ आहे, निकम्मी आहे जीवन हाच अेक यज्ञ आहे, सद्गुण वा दुर्गुण ठरविण्याची मानवी कसोटी अेकच की मनुष्यजातीच्या सामुदायिक हितार्थ त्या यज्ञास जो अुपकारक तो सद्गुण, अपकारक तो दुर्गुण ! जर तुमचे लावण्य तुमचे लांछन न ठरविता दुर्गुण न ठरविता तुमचा अेक अत्यंत सौभाग्यास्पद सद्गुण ठरविणे असेल, तर त्या लावण्याचा असा सदुपयोग करा, की त्यायोगे तुमच्या राष्ट्राचे कल्याणच व्हावे तुमचे सुख नि हितही त्यातच सामावलेले आहे असले पाहिजे जर अेकाद्या आम्रवल्लरीला नुसता मोहोरच मोहोर फुलला पण फळ धरणार नाही तर तिला कोण विचारतो ? अमृतोपम मधुर आम्रफळांही लवलेली आम्रवल्लरीच खरी स्पृहणीय ! तसेच जी स्त्री स्वतःचे लावण्य झिजू नये म्हणून नुसती नट्टापट्टाच करीत मिरवीत राहते आणि सुरेख संतान प्रसवण्याचे नि जोपासण्याचे आपले जीवन-कर्तव्य तशा राक्षसी हावेने टाळते ती स्वतः तर वात्सल्याच्या अेका अत्यंत मधुर आनंदास आचवतेच पण राष्ट्रावरलाही अेक आपत्ति होअून बसते ! ज्या हेतून निसर्गाने ते लावण्य तिला दिले तो हेतु तो अट न पुरविल्याने आणि ते निसर्गधन संततिहितार्थ न नियोजिल्याने ती नैतिक चौर्याची अपराधिनी ठरते

भुञ्जन्ते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात्' संततिनियमन ते का जे अुत्तम संतति प्रसवण्यासाठीच काय ते आचरले जाते संततिनियमन म्हणजे संतत्युच्छेदन नव्हे ! तो आत्मघात तर आहेच आहे पण राष्ट्रघातही आहे ! अप्पलपोटेपणाची ती राक्षसी परिसीमा होय !

## संतत्युच्छेदन हे लावण्याची जोपासना नसून लावण्यहत्याच होय !

ही काही अलंकारिक अतिशयोक्ति नाही तर अेक सामाजिक सत्य आहे वर दिलेल्या Ursula Blook यांच्या लेखात लावण्याचे सर्वांत दुःखप्रद व्यंग म्हणून जे सांगितले आहे ते म्हणजे त्याची भंगुरता हेच होय लावण्य हे फूल आहे आणि फुलाप्रमाणेच दक्षनदेखत फुलत न फुलत तोच सुकते गलितयौवना कामिनी हे

अेका भर्तृहरीच्याच नव्हे, तर मनुष्यजातीच्या हृदयात सलणारे शल्य आहे! ललनानो, आपले लावण्य ओसरू नये म्हणूनच जर आपल्या सुप्रजननाच्या अत्युदार सामाजिक कर्तव्यालाही चुकण्याची अधम अिच्छा आणि वात्सल्याच्या अत्यंत मधुर सुखास मुकण्याची चुकी होत असेल तर ध्यानात धरा, की ते लावण्य तुम्ही काय वाटेल तें केलेत तरी गळत्या घागरीतील पाण्यासारखे भरता भरता ओहोटीस लागणारच लागणार, तें झिजणारच झिजणार! साचवू म्हटल तरी ते आटणार, टिकवू म्हटल तरी ते नासणार सोळापासून सव्वीस वर्षापर्यंत फुलणार हे पावसाळी फूल! फारफार तर दहा वर्षांची सौंदर्याची शिदोरी! तुमची चाळीस वर्षे म्हणजेच बहुतेक जीवन लावण्याच्या अुपासमारीतच तुम्हास काढावे लागणार! अशा ह्या लोभनीय पण अत्यंत क्षणिक नि नश्वर अशा सौंदर्याच्या नादी लागून साऱ्या जीवनाच्या कल्याणास नि कर्तव्यास मुकण्याची नि चुकण्याची चुकी कोणती विवेकी वनिता करील?

आणि तरीही अेका अर्थी व्यक्तीचे नसले तरी समाजाचे लावण्य अमर करण्याची अेक युक्ति निसर्गाने मनुष्याच्या हातीच ठेवलेली आहे. लावण्य झिजेल म्हणून ज्या सुप्रजननाची वेडसर वनितांना भीति वाटते त्या प्रसवानेच लावण्याची झीज भरून निघते.

## व्यक्तीचे नसले तरी राष्ट्राचे लावण्य अमर करण्याची युक्ति

अेखाद्याला गुलाबाची बागची बाग सदा टवटवलेली, सदा बहरलेली हवी असेल तर माळी काय करतो? दहापाच गुलाब अेकदा लावून काय तो स्वस्थ बसत नाही. ते गुलाब हळुहळू झिजणारच, नि सत्त्व हीणारच. यासाठी ते जोवर बहरलेले आहेत, तोवर त्यांची कलम करून माळी सर्वत्र नवेनवे गुलाब लावतो. त्यायोगे अेक गुलाब नि सार होतो तो त्याच्याच जीवनाचे धागोरे असलेल्या अन्य गुलाबांना नवनवा बहर येतो. ती गुलाबाची बाग अशी सदा बहरलेली असू शकते. तसेच ललनांनो, तुमच्या लावण्याचे आहे! ते जोवर खुललेले आहे तोवर त्या लावण्यलतेची कलम नवजीवनाच्या भूमीत लावीत चला. ह्या अेका सुंदर मातेच्या सभोवती तिच्या चार सुंदरशोभिवंत सुतसुतांचा मेळावा विलसत विहरत रमलेला आहे—तिचे लावण्य सफल झाले. जीवन पुन्हा ताजे झाले. तिच्या स्वतःच्या यौवनाचा बहर ओसरतो न ओसरतो तोच तिच्या लावण्यानंदाची झीज सतपटीने भरून काढणारा वात्सल्यानंद तिच्या हृदयात अुचंबळू लागतो. तिच्या जीवनाचा पूर्वार्ध जसा लावण्याने तसाच अुत्तरार्ध वात्सल्याने रसरसलेलाच राहिल्याने तिचे आयुष्य केव्हाच नीरस होत नाही, तिचे लावण्य नि तारुण्य तिच्या कन्यापुत्रांत पुन्हा वाढीस लागते, तिच्या राष्ट्राचे लावण्य नि तारुण्य अमर होते!

## लावण्य विलोभनीय आहेच; पण लावण्याहूनही शील अत्यंत विलोभनीय होय !

म्हणून लावण्याची जोपासना तर कराच, पण महिलांनो, ज्यायोगे मनुष्य-जातीच्या कल्याणार्थच त्याचा विनियोग होईल अशाच प्रमाणात नि प्रकाराने सौंदर्यास महत्त्व द्या, त्यास सत्कारणी लावा. हेच शील ! हे शील जन्मभर पुरणारी नि मृत्यूनंतरही पुरून उरणारी संपदा आहे. जिला रूप नाही, पण हे परोपकारी वत्सल नि विवेकी शील आहे ती स्त्री, जिला नुसते रूप आहे पण हे वत्सल नि प्रामाणिक शील नाही तिच्यापेक्षा अधिक गौरवार्ह समजली पाहिजे. ती अधिक सुखी नि समाजाला शेवटपर्यंत अधिक हवीशी असते. पण जिला लावण्य नि शील ही दोन्ही आभूषणे लाभलेली आहेत, तिला लावण्यापासून होणारे लाभ तर मिळतातच, पण Ursula ह्याच्या वरील लेखात सांगितलेले तोटेही त्याच्या सदुपयोगाने बव्हंशी टाळता येतात. आपलपोटया वारांगनेचे लावण्यही झिजतेच, पण अशाद्या कंजुषाचे धन नाहीसे होताच त्याला जशा असह्य वेदना होतात, तशी तिची त्या लावण्यास वयाने हरल्यानंतर दुर्गति होते. आपल्या वीजांना नवजीवनाच्या क्षेत्रात पेरून जी सुंदर संततीचे उद्यानचे उद्यान उगवते नि जगताची शोभा नि संपदा वाढविते त्या शीलवती मातेचेही लावण्य झिजतेच ! – पण जसा तो दानशील आर्यसम्राट् सर्वदक्षिण यज्ञात आपली सारी सत्ता प्रजाजनांत वाटून देऊन 'मृत्पात्रशेषामकरोद्विभूतिम' तसे त्या मातेचे लावण्य नाहीसे झाल्यानेच ती लावण्यहीनतेव्हापेक्षाही अधिकच मनोज्ञ भासू लागते ! तिचे लावण्यदारिद्र्यच तिला तिच्या लावण्यसंपदेहूनही शोभू लागते. 'आदानं हि विसर्गाय सतां वारिमुचामिव !'

आपल्या पुराणातील अनंत सुरेख कथांत अशी एक कथा आहे, की पौर्णिमेच्या पूर्णचंद्राला अमृताच्या काठोकाठ भरलेल्या पेल्याप्रमाणे देव पिऊ लागतात. त्या सुधाकराच्या कला पितापिता शेवटी देव एक कला तेवढी त्याला उरू देतात. तीच प्रतिपदेची चंद्रकोर ! पण म्हणूनच पुनवेच्या प्रफुल्ल चंद्राला जो मान नाही तो देवकार्यी आपले सर्वस्व वाटून क्षीण झालेल्या त्या प्रतिपदेच्या चंद्रकोरीला आहे – लोक तिला पूजितात, पूर्णचंद्राला नव्हे !

जिच्या कौमार्यात लावण्याचा नेत्रानंददायी चंद्र आरोग्याच्या सकल कलांही प्रफुल्ल झालेला आहे, सच्छील यौवनात जिच्या उदरी देवदूतांसारखी सुंदर नि सुलक्षणी बालके जन्मली आहेत, आणि त्यांना आपल्या त्या लावण्याचे नि शीलाचे ते वत्सल दूध पाजून संवर्धिताना जी स्वतः प्रतिपदेच्या चंद्रकोरीसारखी क्षीणकलाच पूर्ण कलापेक्षाही प्रौढावस्थेत सुभग भासत आहे, त्या जननीला आमचे शतवार वंदन असो ! !

तिच्या यौवनाचा नि लावण्याचा तो –

> पर्यायपीतस्य सुरैः हिमांशोः
> कलाक्षयः श्लाघ्यतरो हि वृद्धेः ॥

* * *

दूध पाजण्याने तो देव काय पावणार नाही? जे का रंजले गांजले, त्यासी म्हणे जो आपुले, त्याच त्या परोपकारी मनुष्यसेवेच पवित्र व्रत काय त्या देवास संतोषविणार नाही? तान्हेल्याला पाणी, तापलेल्याला छाया, न जाणत्याला ज्ञानदान, मरणाऱ्याला प्राणदान ही पुण्यकृत्यं करण्याचे व्रत हे काय व्रतच नव्हे? श्रुतिस्मृतिपुराणोक्त धार्मिक दृष्टीनेही ह्या मनुष्यसेवेलाच देवास संतुष्टविणार महाव्रत मानल नसतं तर पाणपोयी घालणे वाटेने वृक्ष लावणे, कथाकीर्तन करण, अतिथीस अन्न देण प्रभृति अनंत दानास नि आचारास पुण्यप्रद गणल असतं काय? पण हिंदु मुसल्मान, ख्रिस्ती यहुदी, पारशीप्रभृति झाडून साऱ्या धर्मांतून ही कृत्यं पुण्यकृत्यच समजलेली आहेत झाडात, पशूत, सापात, दगडात, मातीतही जर देव आहे–जर ती दगडमातीही त्याची प्रतीक होऊ शकतात, तर त्या देवाच्या जडसृष्टीचाच नव्हे, तर चिच्छक्तीचाही ज्याला शास्त्रेच परमव्यक्त अंश मानतात, तो मनुष्य त्या देवाचं सर्वोच्च प्रतीक मानावयास नको काय? नारायणाचा परमव्यक्त अंश, चिन्मय मूर्ति जर कोणची असेल तर ती नरच होय असच शास्त्रे म्हणतात आणि म्हणूनच त्या नराची सेवा अितर कोणच्याही प्रतीकाच्या सेवेहून नारायणास अधिक संतोषविणारी असलीच पाहिजे 'त्या अितर प्रतीकाच्या सेवन जं जं अैहिक काम्यफल मिळत किंवा पारलौकिक पुण्य लागत म्हणून पोथीत सांगितले आहे ते जर खरं असेल, तर तेही खर असलच पाहिजे की ते ते अैहिक वा पारलौकिक फल मनुष्याच्या सेवेन, परोपकारव्रतान अितर कोणच्याही व्रतापेक्षा अधिक निश्चिततन

'धार्मिक छापाची मुळातच नाही, सृष्टिनियमांच्या अबाधित कार्यकारणभावास देवाच्या काल्पनिक प्रसन्नतेने वा रागाने बदलून घेण्याची आशा ही भाबड्या माणसाची सुखस्वप्न असून त्या दृष्टीने होणारी व्रतवैकल्ये ही मुळातच लटकी आहेत असा ज्यांचा ठाम सिद्धान्त ठरलेला आहे त्यांना ह्या विषयाशी संबंध पोचत नाही. ते व्रतवैकल्यं यांच्यापलीकडे गेलेले, त्यांना व्रताची निवड करण्याचा विवेक लागणे-

राष्ट्रास अत्यंत आवश्यक असलेली कोणती तरी प्रत्यक्ष हितकारक सेवा घडेल. ' ह्या दानाने वा कर्माने माझ्या राष्ट्राची काहीतरी प्रत्यक्ष सेवा घडत आहे ना ?' ही कसोटी प्रत्येक व्रताच्या कर्मास वा दानास लावली की संपलें. तो व्रतविधि त्या कसोटीस अुतरला नाही तर तो साफ सोडून द्यावा नि त्याच काम्य वा निष्काम हेतूने हिंदु राष्ट्राची प्रत्यक्ष सेवा ज्यात घडेल अशा विधीने ते व्रत सांग करावे. नराच्या प्रत्यक्ष सेवेहून म्हणजे राष्ट्राच्या प्रत्यक्ष सेवेहून नारायणाची सेवा करण्याचें योग्यतर साधन मनुष्याच्या हाती दुसरें कोणचेही नसल्याने शास्त्रेंही नरासच नारायणाची अवताराहं विभूति मानीत असल्याने, त्या राष्ट्रसेवेने देव अितर कोणत्याही पूजनाहून अधिक संतुष्ट झालाच पाहिजे आणि ते ते काम्यफल त्या त्या सेवकाला पोचवीत असलाच पाहिजे. जर व्रतांची पारलौकिक वा काम्य फलश्रुति सत्य असेल तर ! पण जरी क्वचित् तें पारलौकिक फल कल्पित ठरलें वा निष्फळलें तरी देखील त्या व्रतार्थ केलेलीं अशी राष्ट्रसेवेचीं कर्में वा दिलेलीं राष्ट्रार्थ दानें हीं अैहिक दृष्टीने तरी केव्हाही निष्फळ‌ु शकणार नाहीत. कारण त्यांच्यायोगे प्रत्यक्षपणे आपल्या हिंदु राष्ट्राच्या म्हणजेच हिंदुधर्माच्या हितास जें साहाय्य होअील तें अैहिक फळ तरी पदरांत पडेलच पडेल. त्या मानाने आत्म-शुद्धिही होअील; सद्धर्मही घडेल.

ह्या दोन सूत्रांची कसोटी प्रत्यक व्रतास लावून दाखविणे अशा लेखात जरी असाध्य असले, तरी दिग्दर्शनापुरतें कसोटीवर व्रतें कशीं पारखावीं ह्याची काही अुदाहरणे देत आहोत.

— ३ —

## ज्योतिर्गोलविषयक सारी पूजाअर्चा नि व्रतवैकल्यें साफ खोटीं असल्यामुळे आजच्या आज टाकून द्यावयास हवींत !

ग्रहणें — हें अशा टाकाअू धर्मविधीचें अेक अुत्तम अुदाहरण आहे. पूर्वी रानटी स्थितीत मनुष्याला ग्रहणाचे नियम माहीत नसत; तेव्हा आकाशात सूर्य वा चंद्र दिसता दिसता अवेळी नाहीसा होत चाललेला पाहून केवढे आश्चर्य नि भीति वाटत असेल ह्याची कल्पना आजही आपणांस सहज करता येअील. आकाशात अेकदम दोन सूर्य अेखाद्या दिवशी दिसू लागले तर आजही तशी भयविव्हल अधीरता आपल्यासही वाटल्यावाचून राहणार नाही. अैतिहासिक काळातही रानटी लोकांच्या ह्या भयाचे अनेक पुरावे सापडतात. अुदाहरणार्थ कोलंबसाविषयी आख्यायिका पाहा. अमेरिकेतील मूळवासी रानटी लोकाना ग्रहण केव्हा येते ते वर्तविता येत नसे. यास्तव तें त्याना देवाच्या कोपाचेच अनियमित नि भीतिप्रद चिन्ह वाटे. कोलंबसाच्या लोकाना ग्रहणें आधी वर्तविता येत, त्यामुळे अमेरिकनास त्यानी भिवविलें, की जर

तुम्ही आम्हास शरण न याल तर आमचा देव येत्या अमुक दिवशी अमक्या वेळी आकाशातून सूर्यासही नाहीसा करील ! त्या धमकावणीप्रमाणे नक्की त्याच वेळी सूर्य नाहीसा होअूं लागला — कारण तो ग्रहणाचा दिवस होता ! घाबरलेले ते मूळ-वासीय कोलंबसास शरण येअून 'देवाचा राग शांत करा ! ' म्हणून प्रार्थूं लागले, कोलंबसाच्या लोकांनीही अुःशाप दिला, की 'अमक्या वेळेस सूर्य परत देअूं' आणि बरोबर त्याच वेळी सूर्य आकाशात पुन्हा पूर्णपणे प्रकाशूं लागला ! ह्या साध्या भाकितानें त्या मूळवासीयांवर कोलंबसाच्या सैन्याच्या अद्भुत शक्तीचा केवढा परिणाम झाला असेल ! ते अमेरिकन त्या नवागत लोकास अजिंक्य असे 'राक्षसदूत' किंवा 'देवदूत' समजूं लागल्यास त्यांत काय नवल आहे ! अशा रानटी अज्ञानाच्या काळी ग्रहणासरशी भयभीत होअून त्या अैश्वरी कोपास पुण्यकृत्यांनी शांतविण्यास्तव लोक 'दे दान सुटे गिऱ्हाण' म्हणून आरडत नि दानें देत, स्नान करीत, ते सूर्याचे सुतक सुटताच कपडे धुवून, झाडून, सारवून त्या संकटाच्या विटाळातून मुक्त होत, ते साहजिकच होते. कित्येक जाति बहुधा चेटकानें आपण ग्रहण लावतो असेंही भासवीत असाव्या आणि ते खरें वाटून त्यास दान देअून, संतोषवून ग्रहण सोडवणें अितरांस भाग पडत असावें. राहुकेतु हे दैत्य, राक्षस, त्यांचे वंशज नि सगेसोयरे म्हणजेच गावाबाहेर राहणारे ते 'अुग्र', मांग, चेटके, गारुडी, महारप्रभृति चांडाल-वर्ग ! म्हणून बहुधा तेच आरडत फिरण्याचीही वहिवाट पडली असावी. 'दे दान

मोरावळ्याची वाटली यावर तुळशीपत्रे ठेवावी, चांडाळ, मांग महारास फाटकी वस्त्रे द्यावी, ब्राह्मणास दाने द्यावी, ग्रहणे लागता सुटता स्नान करावी, गायत्री जपजाप्य याचा धुमधडाका उडवावा ! '

ग्रहणामुळे वातावरणात हवे ते फेरफार होत असले तरी इथे, वाटल्या चरण्यावर तुळशीपत्रे ठेवल्यास आतील लोणची पापड, मोरावळे यावरील अनिष्ट परिणाम टळतात, तेव्हा सृष्टिविज्ञानाचा नियम अजब खरा ! आणि जर त्या चरणीवर, शालीपेंटणीवर तुळशीपत्रे ठेवल्याने ग्रहणाचे संकट टळते, तर त्या घरावरच तुळशीपत्राचा चुचका टाकून मोकळे का होऊ नये? म्हणजे मग घरातील कपडे आदि पदार्थावर प्रत्येकी तुळशीपत्र टाकणे नको ग्रहणात जेवल्याने हिंदु लोकांचेच आरोग्य तेवढे बिघडते असे दिसते कारण युरोप, अमेरिका, चीन, जपान सारे जग ग्रहणातून जेवतही असते आणि जगतही असते ! तिकडे कोणच्याही भयंकर मायी, —ग्रहणात पाणी प्याल्याने, कपडे न धुतल्याने, महारास वा ब्राह्मणास दान न दिल्याने, जपजाप्य न केल्याने ग्रहणानंतर पडल्याचे फारसे ऐकिवात नाही ! त्यांचे वायुमान निराळे, हिंदुस्थानचे वातावरण निराळे म्हणून पुन्हा ऐका भौतिक विज्ञानाच्या नाव घाप ठोकाल तर तुम्हास तीही सोय नाही कारण आधा ऐकाच गावात घराला लागून असणाऱ्या घरात नि पेठात हिंदुमुसलमान, ज्यू, ख्रिस्ती, पारशी जे राहतात त्यापैकी तुळशीपत्राखालील लोणचे खाल्ले म्हणून तो जाला नि तुळशीपत्र नसलेल्या ऐका बरणीतले लोणचे नि ताजा भात ग्रहणात जेवला तो तो उठता तोच पाट फुगून मेला असे वर्षीही घडत नाही !

मनुस्मृतीत निषेध आहे, की, 'नेक्षेतोद्यन्तमादित्यं नास्तं यान्तं कदाचन । नोपसृष्टं न वारिस्थं न मध्यंनभसो गतम्, ॥' ( अ ४, ३७) उगवताना, ग्रहण लागताना, खग्रास ग्रहणात, पाण्यात वा मध्यान्ही सूर्यास मुळी पाहूच नये ! आता या कोणत्याही अवस्थेत, आकाशात वा पाण्यातही जर सूर्याने पाहावयाचे नाही तर आम्ही त्यास पाहावे तरी कुठे ? विश्वात की काय ! सूर्याविषयीची काही, प्रकारची वैज्ञानिक माहिती त्यातल्या त्यात जर केव्हा उत्कृष्टपणे निरीक्षिता येत असेल तर ती त्याच्या ग्रहणाच्या वेळीच होय ऐवढ्याचसाठी युरोपीय ज्योतिर्विद मोठ्या प्रयासाने हजारो मैलांचा प्रवास करून सूर्यग्रहण खग्रास असेल तिथेच

असावा. यासाठीच बहुधा या विमानवाहनांच्या युगातहि वाहन गाढवच पसंत केलें असावें ! असल्या कार्या कार्यवाह होण्याचें शहाणपण गाढवावाचून दुसऱ्या कोणा आढळणारें आहे !

ह्या संक्रांतीच्या पर्वकालात ‘ गाअी-म्हशींचें दूध काढू नये; गवत तोडू नये आणि दात घासू नये ! ’ तसल्या गदळ तोंडाने त्या पर्वाच्या स्तोत्राचे भपकारे सोडीत बसावें ! आणि सगळ्यात मुख्य गोष्ट म्हणजे दानें द्यावी — ब्राह्मणांस दानें द्यावीं ! तीं म्हणजे लोकरीचीं वस्त्रें, तूप, भूमि, गाय आणि सुवर्ण ! आमच्या खेड्यातील वाळंभटाला हें तूप, गाय नि सुवर्ण दिलें, की पृथ्वी नि सूर्य ह्यांच्या त्या गतिस्थिति यथावत् होअून मकरसंक्रमणाची सुखप्रसूति होअील. पण जर तेवढ्यात यजमानाने दात घासले किंवा वाळंभटाला तूप मिळालें नाही तर — तर काय ! तर तें मकरसंक्रमण जाड्कन ठेचाळेल; सूर्य, पृथ्वी, ब्रह्मांड ठिकाणच्या ठिकाणी थांबेल !

आणि ‘ ह्या संक्रांतीच्या कृपेने पश्चिम दिशेचे लोक सुखी होतील आणि पूर्व दिशेवर तिच्या रोषाने संकटें येतील; त्या लोकांची दुर्दशा होअील ! ’ तें ठीकच आहे ! कारण पूर्व दिशेचे हे बिचारे हिंदु त्यातल्या त्यात तिची पूजाअर्चा करतात; तिचीं स्तोत्रें गातात; तिच्या नांवाने दानें देतात; तिचा सारखा बडेजाव ठेवून थरथर कापत असतात म्हणून त्यांच्यावरच ती संक्रांत यावी हें साहजिकच आहे ! पश्चिमेचे लोक जरी तिला दमडीचा धूपही वर्षा जाळीत नाहीत, तिच्या व्रताची टर अुडवून तिच्या पर्वकाळात दूध पितात, मांस खातात, दारू झोकतात, दमडीचें दान देत नाहीत, दात घासतात तरी त्यांचे दात कधीच कुणी पाडीत नाही, संक्रांत पाडते दात ‘ पूर्वेकडच्या ’ लोकांचे — म्हणजेच हिंदूंचे !. कारण पश्चिमेकडे वक्र दृष्टीने पाहण्याची संक्रांतीची छातीच नाही. त्या पश्चिमेच्या वाटेस जाताच गाठ पडणार मशीनगनशी, तोफांशी, वेडराशी, बाँबशी ? म्हणून आज शतकोंशतकें संक्रांत त्यांचे काही अेक वाकडें करीत नाही आणि शतकोंशतकें ह्या हिंदुस्थानच्या अरावर जी ती बसली आहे ती अुठता अुठत नाही ! ह्यावरूनही संक्रांतीस प्रसन्न-

आमच्या आशेच्या-साम्राज्यावर तो मुळीच उगवत नाही ! पण कधीच मावळ
नाही कोणाच्या साम्राज्यावर ? ज्यांनी त्याला युगायुगांतून अेकदाही अर्घ्य दिले
नाहीत, गायत्रीचे जे घातक, सूर्यनमस्कारावाचूनही ज्यांचे स्नायु पोलादी, मनां
वज्रमुष्टि, भर सूर्यग्रहणात जेवणारे, सूर्यवंशाचे अुच्छेदक, राहूचे नि केतूचे वेदवा
साथीदार त्यांच्याच साम्राज्यावर आज तो सूर्य मावळत नाही ! प्राचीन सूर्योपास
बाबिलोन मिश्र मिसर सोडा ते आज झालेले आहेत नामशेषच ! पण आजही
दोनच राष्ट्रे सूर्योपासक आहेत तीं पारस नि भारत, त्यांच्याच राष्ट्रावर आ
राज्य आहे निराशेच्या अेकछत्री काळ्याकभिन्न रात्रीचे ! व्रतविधीने सूर्य प्रसा
नाही—व्रतविधित्यागाने सूर्य रागावत नाही, याचे याहून अुत्कृष्ट प्रत्यक्ष प्रमा